प्रत्येक निमित्तर मनुष्याच्या मनाला पटणाऱ्या त्याच्या सूक्ष्म विचारानें विकसित झालेलें चित्त आनंदसागरात निमग्न होऊन क्षणभर देहभानहीं सोडतें. त्या विद्यानंदाच्या पुढें इतर सर्व विषयानन्द तुच्छ वाटतात व ' या जगात ज्ञानासारखें दुसरें कांहीं नाहीं ' असें जें भगवानांनीं श्रीगीतेंत ह्मटलें आहे त्याचा साक्षात् अनुभव येतो उपनिषद्राचा विचार केल्यानंतर ब्रह्मसाक्षात्कार होऊन जीवन्मुक्तिसुखाचा अनुभव येणें, हें जरी सर्वांनाच व याच जन्मीं अनेक प्रतिबंधामुळें सुशक्य नसलें, तरी त्याचा विचार आचार्य, विद्यारण्य, शकरानद, आनंदगिरि इत्यादि अनुभवी पुरुषाच्या प्रासादिक व्याख्यानांच्या द्वारा केल्यानें जीवन्मुक्तिसुखाच्या अगदीं समीप असलेला व त्यामुळेच जीवन्मुक्तिसुखाचा निश्चय करविणारा विद्यानन्द थोडक्याच अवधींत अनुभवास येता, ही गोष्ट आत्मप्रत्यय, या प्रमाणानें निश्चित झाली आहे वरील महा पुरुषाच्या कृतींचें परिशीलन करीत असताना व आपल्या बांधवानाही त्याचा स्वाद घेण्याचा अवसर मिळावा ह्मणून मराठींत त्याचें विवरण लिहीत असताना आमचा काल केव्हा व कसा जातो तें कळतही नाहीं श्रीयोगवासिष्ठात ' सुखाचा दीर्घ काळही क्षणाप्रमाणें जातो व दु खाचा एकेक क्षणही दीर्घ सवत्सर होतो, ' असें जें ह्मटलें आहे, तें खरें आहे

परतु या वाङमयांत प्रवेश होईपर्यंत तें रूक्ष वाटतें वेदान्त हें विचार शास्त्र असल्यामुळें त्याच्यामध्यें आपातरमणीयता (सुदूरदर्शनीं वाटणारा रमणीयपणा) नाहीं कोणताही विचार हा नेहमींच आरभीं क्लेश व परिणामीं सुख देणारा असतो ह्मणूनच तो सात्त्विक सुखाचें कारण आहे, असें ह्मणता येतें. कारण श्रीमद्भगवद्गीतेंत 'यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्। तत्सुख सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥' ह्मणजे आरंभीं विषासारखें क्लेश देणारें ( न रुचणारें, अनिष्ट वाटणारें ) पण परिणामीं अमृताप्रमाणें भासणारें व आपली बुद्धि प्रसन्न झाल्यामुळें उद्भवणारें जें सुख तें सात्त्विक सुख होय, असें त्याचें लक्षण सांगितलें आहे त्यामुळें, ह्मणजे या वाङ्मयात आपातरमणीयता ( स्वाभाविक रमणीयता ) नसल्यामुळें, आरभीं तें कोणालाही कठिण वाटणें अगदीं स्वाभाविक आहे ह्मणूनच त्यात एकदा प्रवेश होई तों पुढच्या सुखाच्या आशेनें जसे आह्मी आरभीं दुसरे अनेक यत्न करतों, त्याप्रमाणेंच याविषयींही ते करणें उचित आहे दुसऱ्या कोणत्याही यत्नापासून मिळणाऱ्या फला-

पेक्षा या विचारशास्त्रात प्रवेश होण्याकरिता केलेले यत्न अधिक यांग्यतेचें फल देऊ शकतील, हे आह्मी प्रत्येक तत्त्वजिज्ञासूला निश्चयानें सांगून ठेवतों. त्यानीं या आमच्या वचनावर विश्वास ठेवून कांहीं दिवस तरी याविषयीं यत्न करून पहावा.

आता तो यत्न ह्मणजे पुन: पुनः त्या विषयाचें परिशीलन करणें, हाच होय. असले तात्त्विक ग्रंथ कल्पित कादंबऱ्यादिकांप्रमाणें व्यवहारांतील विशेष परिस्थितीशीं संबंध ठेवणारे नसतात उलट व्यावहारिक परिस्थितीच्या विरोधी असतात त्यामुळें व्यवहारप्रिय लोकांना ते अपरिचित वाटतात. किंबहुना अतिव्यवहारज्ञ त्यांचा तिरस्कारही करितात परंतु थोडेसें मान-सिक धैर्य धरून अथवा निग्रह करून कांहीं दिवस अध्यात्मविषयाचा, व त्या-तूनही विशेषतः श्रीशंकराचार्यांच्या व त्यांच्याच संप्रदायांतील शंकरानन्द व विद्यारण्य या गुरुशिष्यांच्या वाग्मृताचा स्वाद घेण्याची योग्यता संपा-दन केल्यास प्रत्येकाला अल्पकाळीं तैत्तिरीय उपनिषदांत ह्मटल्याप्रमाणें ' एत हं वाव न तपति । किमहं साधु नाकरवम् । किमहं पापमकरवामिति ' ह्मणजे आत्मज्ञाला अत्यसमयीं मीं साधु कर्म ( पुण्य ) का केलें नाहीं, पाप का केलें, ही चिंता जाळीत नाहीं कारण मीं आपल्या मनुष्य जन्माचें थोडेसें तरी सार्थक केलें आहे, असें त्याला वाटत असतें यास्तव प्रत्येक मनुष्यानें आपल्या आत्म्याचा ह्मणजे आपल्या स्वरूपाचा विचार करावा

असो, आपल्याला जेवढें कळत आहे तेवढें आपल्या बांधवांना सुबोध करून सांगावें व स्वत ही कमलरसास्वाद घेणाऱ्या मधुपाप्रमाणें विद्यानन्दाचा स्वाद तन्मय होऊन घ्यावा ह्मणून आह्मीं ही रत्नमाला सुरू केली असून आज त्यांतील हें दुसरें रत्न सजवून प्रिय वाचकांच्या हातीं देत आहों त्याचा त्यानीं मननपूर्वक अभ्यास करून या मासिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध होणाऱ्या दुस या अथाचें परिशीलन करण्याची तयारी करून ठेवावी, अशी सविनय प्रार्थना करून आह्मी आता या उपनिषदांचा सारार्थ वाच-कांना निवेदन करतों, ह्मणजे मूळ उपनिषदाच्या तत्त्वार्थांत अनायासानें प्रवेश होईल.

*प्राणादिकांची उपासना करून ज्याचें चित्त शुद्ध ह्मणजे आत्मविचार करण्यास योग्य-समर्थ-झालें आहे, अशा अधिकारी वैदिकांना आत्मविद्-*

चनाची दिशा दाखविण्यासाठीं हें प्रकरण आरंभिलेलें आहे अर्थातच या पूर्वी ऐतरेयारण्यकाचा जो भाग होऊन गेला तो प्रधान नव्हे. त्यामुळेंच देवतात्मभावप्राप्ति हें जें त्याचें फळ तेंही मुख्य नव्हे. कारण तें ( म्ह. कर्म व उपासना याचें फळ ) सविशेष आत्मसंबंधीं असून यापुढें सांगितलेलें ज्ञान निर्विशेष ( सर्व विशेषशून्य ) आत्म्याचें स्वरूपच आहे. यास्तव देवतात्मभाव हा जसा संसाराचाच एक भाग, तसें स्वरूपावस्थान ( स्वरूपानें स्थित होणें ) हा संसार नव्हे. तर मूळची स्वाभाविक स्थिति आहे यास्तव या उपनिषदांत जें वर्णन केलें आहे तें कर्मसंबधीं नव्हे. त्याचप्रमाणें त्याचें फळही नित्यसिद्ध मोक्ष आहे. त्यामुळें यांत कोणत्याही कर्तव्याचा उपदेश केलेला नाहीं. तर ज्ञातव्य आत्मतत्त्वाचेंच वर्णन केलें आहे. परंतु निरुपाधिक आत्मतत्त्व वाणीचा व मनाचाही विषय होणारें नसल्यामुळे या उपनिषदात जें त्याचें वर्णन केलें आहे तेंही त्याच्याठिकाणीं वाच्यवृत्तीनें प्रवृत्त होत नसून लक्षणावृत्तीनें प्रवृत्त होतें. इंद्रियातीत वस्तूचा बोध साक्षात् शब्दानीं करता येत नाहीं, तर शब्दावरून केवळ ती वस्तु लक्षित–सूचित होते. एवढ्यासाठींच अद्वैतवादी आचार्यांनीं ' लक्षणया बोधयन्ति सर्वे वेदा. ' ह्मणजे सर्व वेद लक्षणावृत्तीनें आत्म्याचा बोध करतात, असें ह्मटलें आहे.

असो, त्याच न्यायानें येथें " पूर्वी आत्माच एक होता, आत्मभिन्न दुसरें काहीं नव्हतें. त्यानें मी या सर्व लोकाना उत्पन्न करतों असें ईक्षण-अलोचन केलें व आकाश, वायु इत्यादि पंचभूतोत्पत्तीच्या क्रमानें ब्रह्माड निर्माण करून या सर्व ऊर्ध्व, मध्य व अधोलोकाना ह्मणजे उत्तम, मध्यम व अधम भोगभूमींना निर्माण केलें. त्यानंतर त्याच्या चेतन पालकाना उत्पन्न करण्यासाठीं त्या जलप्रधान पंचभूतापासूनच पुरुषाकार पिंड निर्माण करून त्याला सर्वावयवयुक्त केलें. त्यानें पुनरपि त्या पिंडाला मुखादि गोलक व्हावे, असा संकल्प केला. त्याबरोबर पक्ष्याचें अंडें जसें आपोआप उकलतें, त्याप्रमाणें त्याला तोंड व नासिकादि इतर छिद्रें झालीं. त्यातून इंद्रियें व त्याच्या देवता झाल्या," असें ह्मटलें आहे. देवता ह्म० इंद्रियावर अनुग्रह करणाऱ्या, त्याना स्वविषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य देणाऱ्या शक्ती. ही सर्व कल्पना हलीं आमच्या उत्पन्न होणाऱ्या देहाच्या उत्पत्ति–क्रमावरून ठरविली आहे. त्यानें ' ईक्षण केलें, संकल्प केला' इत्यादि सर्व उल्लेख

आत्मा किंवा जगाचें कारण चेतन आहे, हें सुचविण्यासाठीं आहे. त्यामुळें त्यानें शरीरेंद्रियांवांचून संकल्पादि कसे केले, ही शंका उरत नाहीं. असो, येथवर सांगितलेली ही सर्व विराड्देहाची उत्पत्ति आहे. विराड्देह म्हणजे समष्टिस्थूल देह, समष्टि म्हणजे व्यष्टींचा समूह अर्थात् सर्व स्थूल सृष्टि हाच विराड् देह होय.

त्या महासागरासारख्या अफाट देहांत पडलेल्या देवतांना परमेश्वरानें भूक व तहान या ऊर्मींनीं युक्त केलें. येथेंही युक्त केलें म्हणजे त्या ईश्वराच्या नियतीनें देवता क्षुधा–पिपासायुक्त झाल्या, असें समजावें. तेव्हां त्या दोन ऊर्मींनीं युक्त झालेल्या त्यांनीं अन्न खाण्यासाठीं अल्प शरीरें उत्पन्न करण्याविषयीं ईश्वराची प्रार्थना केली. तेव्हां परमेश्वरानें त्यांना अनेक शरीरें दाखविलीं. परंतु त्यांतील मनुष्य शरीरच त्यांना आवडलें. तें पाहून ईश्वरानेंहि त्यांना त्यांत आपापल्या स्थानीं प्रवेश करावयास सांगितलें. तेव्हां विराड्देहांतील ज्या ज्या छिद्रापासून जी जी देवता उत्पन्न झाली होती ती ती या अल्पशरीरांतील त्या त्याच आपल्या छिद्रांत शिरली. यावरून विराड्देहाच्या आकाराचाच मनुष्यदेह आहे. असें ठरतें. ( पहा आत्मपुराण, रत्न तिसरें, पृष्ठ ८७–९४ ) इंद्रियदेवता त्या अल्प व्यष्टि देहांत शिरल्या आहेत, असें पाहून क्षुधा, व तृष्णा यांनाही त्यांत आपल्याला स्थान असावें, असें वाटलें व त्यांनीं ईश्वराला त्याविषयीं प्रार्थना केली. पण त्यांना विराट्शरीरांतच पृथक्स्थान नव्हतें. म्हणून ईश्वरानें त्यांना त्या व्यष्टि देहांतही देवतांच्या भागिनी केलें. त्यामुळें देवतांच्या प्रत्येक भोगाचा विभाग त्यांना मिळूं लागला. विराड्देहाहून निराळें भोग्यच नसल्यामुळें त्यांतील चेतनाच्या व्यक्त झालेल्या निरनिराळ्या शक्तींना आपापल्या विषयाचें ग्रहण करितां येणें शक्य नव्हतें. म्हणून अनेक व्यष्टिदेहांची कल्पना झाली. पुढें चवथ्या खंडांत वर्णन केल्याप्रमाणें पुरुषशरीरांतील गर्भ मातृशरीरांत जाऊन देह पूर्ण झाला कीं त्यांत इंद्रियांच्या शक्ती व्यक्त होतात. त्याबरोबर क्षुधा व पिपासा त्यांना बाधा करूं लागतात व इंद्रियांच्या अन्नादिविषयांच्या ग्रहणानेंच त्या तृप्त होतात, हें प्रसिद्ध आहे. मातेच्या उदरांतील गर्भालाही तिच्याच शरीरांतील पोषक द्रव्यांचा रस मिळत असतो, हेंही प्रसिद्ध आहे. गर्भांतील बालकालाही त्याच्या शरीराची पूर्ण वाढ होऊन त्यांत इंद्रियशक्ति व्यक्त

विचार करितांच त्या जीवाला ह्मणजे मूळच्या ईश्वरालाच मी सर्वव्यापी ब्रह्म आहें, असें ज्ञान झालें. त्यानें आपल्या आत्म्याला 'हा मी व्यापक आत्मा आहें,' असें साक्षात् जाणलें. 'इदंद्र' यांतील दकाराचा लोप करून त्यालाच 'इंद्र' असें ह्मणूं लागले. कारण पूज्यांना प्रत्यक्ष नांव उच्चारलेलें आवडत नाहीं. तर परोक्ष नांवच आवडतें.

वरील आख्यायिका हा सर्व अर्थवाद आहे. इतिहास नव्हे. यास्तव तिचा लाक्षणिक अर्थ घेऊन वाच्यार्थ सोडला पाहिजे. मी आत्मा नित्य ज्ञानरूप आहें, असें कळेपर्यंत जन्ममरणप्रवाहरूप संसार कुंठित होत नाहीं. तो तुटणें हाच मोक्ष आहे. पण जन्मादिकांतील दोष कळून त्यां-विषयीं पूर्ण वैराग्य आल्यावांचून आत्मविचार करतां येत नाहीं. ह्मणून या उपनिषदाच्या चवथ्या खंडांत तीन जन्मांचें वर्णन केलें आहे. दुसऱ्या शरीरांत अभिव्यक्त होण्यासाठीं इच्छायुक्त सूक्ष्म शरीरानें रेत, गर्भ व वासनाबीज या रूपानें एका शरीरांतून निघणें, याला जन्म ह्मणतात, त्यामुळें पितृशरीरांतून, मातृशरीरांतून व आपल्या शरीरांतून क्रमानें निघणें हेच तीन जन्म आहेत. ते क्लेशकर आहेत, असें समजलें कीं त्यांचा कंटाळा येतो व जीव त्यांतून सुटण्याचा उपाय शोधूं लागतो. आत्मज्ञान हाच एक संसारांतून मुक्त होण्याचा उपाय आहे, असें त्याला शास्त्र व गुरु यांच्या द्वारा कळतें. नंतर तो श्रवणादि साधनाचें अनुष्ठान करतो व वाम-देवाप्रमाणें मुक्त होऊन आपल्या कृतकृत्यतेचें वर्णन करूं लागतो. आत्मज्ञ अविद्यादि शरीरबीजाचा नाश झाला असतां नित्यतृप्त, आनंदमग्न व मरण-रहित होऊन स्वरूपांत मिळून राहतो.

या उपनिषदाच्या पांचव्या खंडांत विचाराचा प्रकार व आत्मनिश्चय यांचें दिग्दर्शन केलें आहे. शरीरांत दोन आत्मे प्रविष्ट झाले आहेत. एक पाव-लांच्या अग्रांतुन व दुसरा मस्तकांतून; पण त्यांतील मुख्य आत्मा एकच असला पाहिजे व तोच आह्मांला उपासना करण्यास योग्य आहे. पण 'तो या दोघांतील कोण ?' असा प्रश्न सामान्यतः 'हा मी' असा जरी अनुभव येत असला तरी विशेषतः आत्म्याचा निश्चय करण्यासाठीं परस्प-रांस करून ते विचार करूं लागले. तेव्हां ज्याच्यायोगानें अनात्मवस्तूंचें ज्ञान होतें तो एक व ज्याला ज्ञान होतें तो दुसरा, असे दोन आत्मे जरी या

शरीरात अनुभवास येत असले, तरी ज्याच्यायोगानें ज्ञान होतें तो आत्मा असणें संभवत नाहीं चक्षु, श्रोत्र, वाक् इत्यादि इंद्रियाच्या योगानें ज्ञाता सर्व जाणतो. पण तीं इंद्रियें ह्मणजे हृदय व मनच आहे आणि हृदय हाच प्राण आहे त्यामुळें प्राण इंद्रियसमुदायरूप आहे यास्तव पादाग्रातून शरीरात शिरलेला तो जरी अपर ब्रह्मरूप असला, तरी करणरूप, ज्ञानसाधनरूप झालेला असल्यामुळें उपास्य आत्मा नव्हे अर्थात् करणरूप नसलेला ज्ञाता आत्माच उपास्य आहे, असा उपासना करावयास प्रवृत्त झालेल्या त्या विचारी ब्राह्मणांनीं निश्चय केला

संज्ञान, आज्ञान, विज्ञान, प्रज्ञान इत्यादि बाह्यान्तर्विषयसंबंधी अन्तःकरणवृत्ती अन्तःकरण या उपाधींत व्यक्त झालेल्या प्रज्ञानरूप ब्रह्माच्या अनुभवाकरिता आहेत त्यामुळेंच त्या सर्व वृत्ती हीं त्याचीं गौण नावें आहेत मुख्य नव्हेत कारण प्रज्ञानात्मा वाङ्मनसातीत आहे त्यामुळें तो मुख्यतः शब्दरूप नावाचा विषय होत नाहीं

याप्रमाणें विचारपूर्वक आत्मानात्मविवेचन करून शोधित आत्मा ह्मणजे उपाधीपासून भिन्न करून दाखविलेला आत्मा प्रत्येक शरीरात निरनिराळा आहे, हा भ्रम घालविण्यासाठीं 'हा ब्रह्मा, हा इंद्र' इत्यादि वाक्यांनीं प्रज्ञानच सर्व चराचर आहे, असें प्रतिपादन करून शेवटीं 'प्रज्ञान ब्रह्म आहे,' हा सिद्धान्त सागून या उपनिषदाची समाप्ति केली आहे ज्ञानी प्रज्ञानात्मरूप होऊन नित्यतृप्त व अमृत होतो, असें ब्रह्मात्मदर्शनाचें फलही शेवटच्या मंत्रात सांगितलें आहे

असो, या मालेंतील हें दुसरें रत्न वाचून वाचकांना या पुढील क्रमानें प्रसिद्ध होणारीं इतर रत्नेंही वाचण्याची सुबुद्धि व्हावो, व त्यामुळें अद्वैत सिद्धान्ताच्या संरक्षणानें सर्व जनतेचें हित होवो, अशी शुभ वासना प्रकट करून आह्मी ही प्रस्तावना समाप्त करतों

पुणें, सदाशिव पेठ २८५
आषाढ कृ. ११ मंगळवार
शके १८२७

आत्मार्पमक्त
विष्णु वामन बापट,
संपादक, ब्र. वि. ग्रंथरत्नमाला

सार्थ

# ऐतरेयोपनिषद्.

[ ऐतरेय उपनिषद् म्हणून ज्याची प्रसिद्धि आहे, त्याचे अध्याय तीन व खंड पांच आहेत. ऐतरेयारण्यकाच्या दुसऱ्या आरण्यकाचे चार, पांच व सहा असे तीन अध्याय म्हणजेच हें उपनिषद् होय. पण त्यांतील चवथ्या अध्यायाचे तीन खंड आहेत आणि पांचव्याचा व सहाव्याचा एकेकच खंड आहे. मिळून सर्व उपनिषदाचे पांच खंड होतात. दुसऱ्या आरण्यकाच्या पहिल्या तीन अध्यायांत प्राणोपासनेचा विस्तार केला. 'प्राणच मी आहें,' अशी भावना सतत चिंतनानें दृढ करणें, याला च प्राणोपासना किंवा प्राणविद्या म्हणतात. त्या उपासनेच्या योगानें पुरुषाला ब्रह्मविद्येचा मुख्य अधिकार येतो. कारण कर्मकांडांत सांगितलेल्या कर्मांचें अनुष्ठान केलें असतां विविदिषा (परमात्म्याला जाणण्याची इच्छा ) होते. पण नुसती विविदिषाच पुरुषाला ब्रह्मविद्येचा मुख्य अधिकारी करूं शकत नाहीं. म्हणजे केवळ परमात्म्याला जाणण्याची इच्छा असणें, एवढेंच ब्रह्मविद्येच्या अधिकाराचें लक्षण नाहीं. तर, चित्ताचें ऐकाग्र्य संपादन केलेलें असणें, हेंही त्याचें लक्षण आहे. किंबहुना ऐकाग्र्य हेंच अधिकारप्राप्तीचें मुख्य अंतरंग साधन असून विविदिषा हें बहिरंग साधन आहे. उपासनेच्या योगानें चित्ताचें ऐकाग्र्य होतें. ऐकाग्र्यांत शम, दम, तितिक्षा इत्यादि गुण अर्थसिद्ध असतात. म्हणजे त्यांत ते अंतर्भाव पावतात. यास्तव प्राणोपासनेनें चित्तैकाग्र्य होऊन आत्मविद्येचीं अंतरंग साधनेंच, असे शम दमादि गुण पुरुषामध्यें आले आहेत असें पाहून, श्रुति तसल्या त्या मुख्य अधिकाऱ्यास पुढील तीन अध्यायांनीं आत्मतत्त्वाचा स्पष्ट उपदेश करण्याकरितां प्रथमतः तत्त्वाचा थोडक्यांत निर्देश करिते—]

ॐ आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किंचन मिषत् ॥ १ ॥

अर्थ—आत्मा दोन प्रकारचा आहे. एक व्यवहारविशिष्ट व दुसरा केवळ. व्यवहारही जागरण, स्वप्न व सुषुप्त असा तीन प्रकारचा आहे. त्यांतील सुषुप्तांत हा जीव, त्याची उपाधि (अंतर्बाह्य इंद्रियें) लीन झाली असतां परमानंदरूप ब्रह्मास प्राप्त होतो. म्हणून त्याला आत्मा म्हणतात. (आप्नोति इति आत्मा) जो परमानंदरूपास प्राप्त होतो तो आत्मा, अशी आत्मशब्दाची एक व्युत्पत्ति आहे. स्वप्नावस्थेंत तो जीव जागरणांतील पदार्थांच्या सर्व वासना घेतो. म्हणून त्याला आत्मा म्हणतात. (आदत्ते इति आत्मा) जो पदार्थवासनांचें ग्रहण करतो तो आत्मा, ही आत्मशब्दाची दुसरी व्युत्पत्ति आहे. हा जीव जागरणसमयीं चक्षुरादि इंद्रियांनीं बाह्य रूपादि विषयांचा उपभोग घेतो, म्हणूनही त्याला आत्मा म्हणतात. (विषयान् अत्ति इति आत्मा) विषयांचा अनुभव घेतो म्हणून आत्मा ही आत्मशब्दाची तिसरी व्युत्पत्ति आहे.

१ ब्रह्माला मिळणें, २ विषयवासनांचें ग्रहण करणें व ३ बाह्यविषयभोगांचा उपभोग घेणें या तीन अवस्थांतील तीन निमित्तांच्या योगानें सोपाधिक आत्मशब्दाची व्युत्पत्ति सांगितली. आतां केवळ आत्मशब्दाची व्युत्पत्ति सांगतों. ज्याअर्थी आत्म्याचा भाव (विशेष स्वभाव) सतत आहे, परिच्छेदरहित आहे, त्याअर्थी हा आत्मा. श्रुतींतील 'अनंत' या पदानें त्याचें देश-काल वस्तुपरिच्छेदशून्यत्व सांगितलें आहे. वास्तव 'अतति—सातत्येन सर्वत्र गच्छति इति आत्मा' म्हणजे जो सतत सर्वत्र जातो तो आत्मा, हें आत्मशब्दाचें यथार्थ निर्वचन आहे तात्पर्य वरील श्रुतींत 'आत्मा' असा जो आरंभींच शब्द आहे त्याच्या प्रवृत्तीचें निमित्त 'अखंड एकरसरूपानें संततत्व' हें आहे. म्हणजे कोठेंही विच्छेद न पावतां एक स्वभावानें सर्वत्र व्यापून असणें हें, 'आत्मा' हें नांव प्राप्त होण्याचें कारण आहे

बरें, धातु व प्रत्यय यांवरून ज्ञात होणाऱ्या अवयवार्थाची उपेक्षा करून व केवळ रूढीचाच आश्रय करून आत्मा हा स्वरूपवाची शब्द आहे, म्हणजे आत्मा या शब्दाचा 'स्वरूप' हाच अर्थ आहे, असें जरी समजलें, तरी त्यात कांहीं हानि नाहीं कारण सर्व जग आत्म्यावर आरोपिलेलें असल्यामुळें अधिष्ठानरूपानें तो सर्वांचें स्वरूप आहे. कारण समोर दोरी असतांना तिच्या आधारानें भासणारा हा सर्प आहे, पाण्याची धार आहे, फाटी आहे,

फुलांची माळ आहे, इत्यादि अनेक भ्रम जरी झाले तरी त्यांतील एकाचेंही वास्तविक स्वरूप रज्जूहून निराळें नसतें. यास्तव कोणत्याही आरोपिताचें स्वरूप अधिष्ठानच असतें, असा निश्चय होतो., तस्मात् श्रुतींतील 'आत्मा' हा शब्द यौगिक किंवा रूढ, त्यांतील कोणताही जरी घेतला तरी त्याचा अर्थ-संतत,अखंड, एकरस, व सर्व जगाचें अधिष्ठान असल्यामुळें त्याचें वास्तव स्वरूप-असाच येथें विवक्षित आहे.

'वै-' हा शब्द निश्चय या अर्थी आहे. म्हणजे आत्माच, दुसरें कोणी नाहीं. 'इदं-'आतां-या स्थितिसमयीं सर्व लोकांना प्रत्यक्षादि सर्व प्रमाणांनीं प्रतीत होणारें हें जगत् 'एकः एव' एकच, त्रिविधभेदशून्य 'अग्रे-' सृष्टीच्या पूर्वी 'आसीत्' होता. 'न अन्यत् किंचन मिषत्-' त्याच्या कार्यभूत नामरूपात्मक जगत् नव्हतें. केवळ जगत् नव्हतें इतकेंच नव्हे, तर आत्मविषयक शब्द व त्यावरून होणारा बोध, हेंही नव्हतें. (व्यवहारांत एकादे वेळीं मातीचीं मडकीं वगैरे नसतात. परंतु माती हा शब्द व त्यावरून होणारा माती या पदार्थाचा बोध, हीं असतात. त्याप्रमाणें आत्मा हा शब्द व त्याचा बोध हे तरी असतील, *अशी शंका राहूं नये म्हणून वर 'वै' हा शब्द योजून* केवळ नित्य तत्त्व होतें, असें सुचविलें आहे. कारण सृष्टीच्या पूर्वी देह व इंद्रियें यांचाही अभाव असल्याकारणानें जिह्वेच्या योगानें उच्चारला जाणारा शब्द व मनाच्या योगानें होणारा बोध या दोघांचाही त्यावेळीं अभाव असणेंच सयुक्तिक होय.)

जगाला सत्य मानणारे द्वैती याविषयीं असें म्हणतात-'इदं आत्मा आसीत्-' म्हणजे हें आत्मा होता, असें येथें वाक्य आहे. म्हणजे 'इदं' व 'आत्मा' यांचें सामानाधिकरण्य आहे. ज्यांचा अर्थ निरनिराळा आहे, अशा अनेक पदांची एका अर्थी योजना करणें, याला सामानाधिकरण्य म्हणतात. जसें—निळें कमळ, या वाक्यांत निळें या शब्दाचा अर्थ रंग आहे व कमळ या शब्दाचा अर्थ फूल आहे. पण निळें व कमळ या शब्दांची प्रथमा, ही एकच विभक्ति असल्यामुळें त्यांचा अर्थ-विषय एकच असणें सयुक्तिक दिसतें. निळें हा गुण व कमळ हें द्रव्य असल्यामुळें कमळच मुख्य असून निळें हें त्याचें विशेषण आहे, असें ठरतें. अर्थात् ज्यांचा अर्थ पृथक् आहे अशा निळें व कमळ या पदांची प्रवृत्ति 'एक फूल' या अर्थी झाली आहे. यास्तव त्याचें सामानाधिकरण्य आहे. त्यावरून नीलगुणविशिष्ट कमळ असा बोध होतो.

याच न्यायानें 'इदं आत्मा' या दोन भिन्नार्थक पदार्थांच्या सामानाधिकरण्या-वरून आत्म्याचें जगद्वैशिष्ट्य प्रतीत होतें. म्हणजे आत्मा जगत् या विशेषणें युक्त होता, असें वाटतें.

समाधान—हें म्हणणें अनुचित होय. कारण जगद्विशिष्ट आत्मा होता, असें म्हटल्यास पुढें 'अग्रे' असें जें पद आहे तें व्यर्थ होतें. स्थितिकाळीं आत्मा जगद्विशिष्ट भासतो. परंतु तें त्याचें तसें भासणें सयुक्तिक नव्हे, म्हणून स्थिति-काळाचा परित्याग करून केवळ आत्म्याचा बोध करण्यासाठीं अग्रशब्दानें सृष्टीच्या पूर्वीच्या काळाचें ग्रहण केलें आहे. तस्मात् 'आत्मा वै इदं अग्रे आसीत्' या वाक्यानें अखंड एकरस आत्मतत्व सुचविलें आहे.

'एक एव न अन्यत् किंचन मिषत्-' इत्यादि शब्दांनीं त्याचें अखंड एकरसत्वच स्पष्ट केलें आहे. व्यवहारांतील कोणत्याही पदार्थाकडे जरी पाहिलें तरी त्याचा तीन प्रकारें भेद झालेला दिसतो. एक-स्वतःच्या आकारांतच अवयवांच्या योगानें; जसें-शरीराचा हात, पाय, कान, मान इत्यादिकांच्या योगानें भेद होतो. या भेदास स्वगत भेद म्हणतात. दुसरा-एकाच जातीच्या अनेक पदार्थांचा परस्पर भेद. जसें-मनुष्यांच्या शरीराचा परस्पर भेद. याला सजातीय भेद असें म्हणतात. तिसरा निरनिराळ्या जातीच्या पदार्थांचा परस्पर भेद. जसें मनुष्यशरीरें, दगड, वृक्ष इत्यादिकांचा परस्पर भेद. याला विजातीय भेद म्हणतात. त्याप्रमाणेंच आत्म्याच्या ठिकाणींही तीन भेदांची शंका आली असतां 'एकः' या पदानें त्याची व्यावृत्ति केली आहे. म्हणजे तो शरीर-वृक्षादिकांप्रमाणें नानात्मक नव्हता. तर एकात्मक होता. 'एव' शब्दानें आत्मे अनेक आहेत, या म्हणण्याचें निरसन केलें आहे. हा जो एक आत्मा तोच होता तशा प्रकारचा दुसरा कोणी नव्हता. 'न अन्यत्' या पदांनीं विजातीय भेदाची निवृत्ति केली आहे. अन्यत्-म्हणजे प्रकृत आत्म्याहून निराळी, विलक्षण अशी दुसरी कोणतीही वस्तु नव्हती. 'न मिषत्' म्हणजे 'न आसीत्-' नव्हती असेंच समजावें. कारण 'मिष' या धातूचा स्पर्धा किंवा सेक करणें, हा जरी सामान्य अर्थ असला तरी प्रत्येक धातूचे अनेक अर्थ आहेत, असा वैयाकरणांचा संकेत असल्यामुळें येथें 'मिषत्' म्हणजे 'आसीत' असेंच समजावें.

आतां यावर कोणी असें म्हणेल कीं, तुम्ही अद्वैतवादीसुद्धां जगाच्या उत्पत्तीकरितां मायामंडक शक्तीचा अंगीकार करीत असतां. त्यामुळें तुमचें अद्वैत

नाममात्र आहे. तर तें बरोबर नाहीं. कारण आम्ही मायेला आत्म्याची शक्ति म्हणून मानीत असतों. वास्तव तसल्या त्या अवस्तुभूत शक्तीची पृथक् गणना करतां येत नाहीं. कारण व्यवहारांतही धनी लोक भृत्यांना वेतन देतांना त्यांच्या शक्तीची पृथक् गणना करीत नाहींत त्याचप्रमाणें भासलेल्या दुसऱ्या चंद्राचीही कोणी गणना करीत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. यास्तव अवास्तविक मायेचा अंगीकार केला तरी अखंड एकरसत्वाला बाध येत नाहीं. तात्पर्य, तो आत्मा अशा प्रकारचा आहे. तेव्हां त्याच्यामध्येंही जर जगाची अनुवृत्ति होत असेल तर 'अग्रे' हा शब्द व्यर्थ होईल. आतां 'इदं' व 'आत्मा' या शब्दांचें सामानाधिकरण्य आहे, ह्मणजे त्या दोन्ही भिन्नार्थक शब्दांचा प्रयोग एकाच विभक्तींत केला आहे, म्हणून जी अडचण भासत आहे, तिचें निवारण अन्य तन्हेनेंही होतें. विशेषणविशेष्यभाव दाखवयाचा असला म्हणजे जसें दोन शब्दांचें सामानाधिकरण्य करितात, म्हणजे विशेषण व विशेष्य यांची एक विभक्ति योजतात, त्याप्रमाणेंच एका भ्रामक पदार्थाचा बाध करून दुसऱ्या वास्तविक पदार्थाचा बोध करावयाचा असतांही सामानाधिकरण्याची योजना करावी लागते. जसें-तुला भासलेला चोर वस्तुतः खांब आहे. येथें चोर व खांब यांचें सामानाधिकरण्य आहे. पण तें विशेषण विशेष्यरूप नाहीं. तर चोराचा बाध करून खांबाचा प्रत्यय करविणारें आहे. यास्तव त्याला बाधसामानाधिकरण्य अथवा 'बाधाया सामानाधिकरण्य' असें ह्मणतात. 'इदं आत्मा' या स्थळीं-हें जें यावेळीं जगत् भासत आहे तें पूर्वी नव्हतें,तर एक आत्माच होता,-असा जगाचा बाध करून आत्म्याचा बोध करावयाचा आहे.म्हणून 'इद आत्मा'हें बाधसामानाधिकरण्य होय.

यावर कोणी ह्मणेल कीं, आतां स्थितिकाळींही तत्त्वदृष्टीनें पाहिल्यास हें जगत् आत्मा आहे, असेंच वाटतें. तर तें खरें आहे. पण विवेकशून्य मूढाला जगाचा दृढ अनुभव येत असल्यामुळें हें सर्व यावेळींही आत्माच आहे, असें ह्मटलेलें ऐकून तें अनुभवाच्या विरुद्ध आहे, अशी शंका येऊं नये, म्हणून सृष्टीच्या पूर्वीच्या काळाचा उपन्यास केला आहे.

यावर पुनः कोणी म्हणेल कीं, काळाचाही सृष्टींतच अंतर्भाव होतो; यास्तव सृष्टीच्या पूर्व अवस्थेला उद्देशून 'अग्रे' असा कालवाचक शब्द योजणें युक्त नव्हे, तर तें बरोबर नाहीं; कारण प्रलयदशेंत काळाची कल्पना करणाराच नसल्यामुळें काळ नसतो हें जरी खरें आहे, तरी जिज्ञासूच्या काळप्रसिद्धीला अनुस-

रून 'अग्रे' असें म्हटलें आहे. परप्रसिद्धीला अनुसरून बोध करावा, असा न्याय आहे. येथें जिज्ञासु हा पर आहे आणि पूर्व सृष्टि व वर्तमान सृष्टि यांच्यामध्यें प्रलयकाळ असतो, अशी त्याची प्रसिद्धि आहे. म्हणजे असें त्याला माहीत आहे, अशी त्याची समजूत आहे. यास्तव त्याच्या समजुतीप्रमाणेंच त्याला बोध करण्यासाठीं 'अग्रे' असें म्हटलें आहे. 'आत्मा आसीत' या ठिकाणींही हेंच समाधान समजावें. नाहींपेक्षां पुनरुक्तिदोषाचा परिहार करण्यासाठीं 'आत्मा' व 'आसीत्' या शब्दाचा निरनिराळा अर्थ असल्यास 'सत्ताविशिष्ट आत्मा' असा अर्थबोध होईल व त्यामुळें आत्म्याचें अखंडार्थत्व बाधित होईल. परंतु श्रुतीला आत्मा व सत् हे पर्याय शब्द आहेत, असें संमत आहे. म्हणूनच येथें आत्मा, असें ज्याला म्हटलें आहे त्यालाच छांदोग्यांत 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' या वाक्यांत 'सत्' म्हटलें आहे. तात्पर्य, येथें सर्वथा सर्वभेदशून्य आत्मा विवक्षित आहे. हिरण्यगर्भादि लौकिक आत्मा विवक्षित नाहीं. उत्तर मीमांसेच्या तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाच्या आठव्या अधिकरणांत हेंच सिद्ध केलें आहे.

( याप्रमाणें पहिल्या वाक्यांत आत्मतत्त्व संक्षेपतः सांगितलें. त्याचाच आतां पुढें अध्यारोप व अपवाद, यांच्या योगानें विस्तार केला जात आहे. या दुसऱ्या वाक्यापासून 'अयं आवसथः' ( खं. ३ वाक्य १२ ) येथपर्यंत अध्यारोप वर्णिला आहे. त्यांतील आरोपाचाच प्रथम संग्रह केला जातो.—)

स ईक्षत लोकान्नु सृजा इति स इमाँल्लोकानसृजत ॥ २ ॥

अर्थ—पहिल्या वाक्यांत 'आत्मा' या शब्दानें ज्याचा निर्देश केला आहे असा 'सः-' तो परमेश्वर 'लोकान्-' पृथिव्यादि लोकास 'सृजै-' मी उत्पन्न करावें, उत्पन्न करीन 'इति-' असें 'ईक्षत-' ईक्षण—विचार करता झाला. 'नु' हा शब्द वितर्क या अर्थी आहे, म्हणजे मी या लोकास उत्पन्न करावें कीं नाहीं? असा त्यानें तर्कयुक्त विचार केला. 'ईक्षत' या शब्दाच्या जागी 'ऐक्षत' असा शब्द पाहिजे होता. पण तो न योजतां 'ईक्षत' असें म्हणून पूर्वीच्या 'आ'चा जो लोप केला आहे तो छांदस आहे, म्हणजे वेदांत असे लोप करितात. असो, असा विचार करून 'सः-' तो परमेश्वर 'इमान् लोकान्-' या लोकांस 'असृजत-' उत्पन्न करता झाला.

( असो; श्रुति आतां परमेश्वरानें उत्पन्न केलेल्या लोकांचा, त्यांच्या त्यांच्या नावांनीं निर्देश करते—)

अम्भो मरीचीर्मरमापः ॥ ३ ॥

अर्थ—अंभ, मरीची, मर व आप या नांवाच्या लोकांना त्यानें उत्पन्न केलें ३. (पण हे शब्द लोकांचीं नावें आहेत, अशी त्यांविषयीं लोकप्रसिद्धि नाहीं. म्हणून स्वतः श्रुतिच त्यांचें व्याख्यान करते—)

अदोऽम्भः परेण दिवं द्यौः प्रतिष्ठा, अन्तरिक्षं मरीचयः पृथिवी मरो या अधस्तात्ता आपः ॥ ४ ॥

अर्थ—'दिवं परेण-' द्युलोकाच्या-स्वर्गलोकाच्या वर जे महर्लोक, जनोलोक, तपोलोक व सत्यलोक आहेत आणि 'प्रतिष्ठा द्यौः-' सर्व देवांचा आश्रयभूत असा जो द्युलोक 'अदः अम्भ-' हा सर्व 'अंभ' या नांवाचा लोक आहे. या सृष्टींतील सर्व लोकांत पांची भूतें साधारण आहेत. तथापि त्यांतील जळ आमच्या इंद्रियजन्य ज्ञानाचा विषय होण्यास योग्य असल्यामुळें त्यालाच प्रधान मानून येथें 'अदः अंभ' असें म्हटलें आहे. शिवाय वरील लोकांतून वृष्टिद्वारा आलेलें जळच आह्मांला जसें साक्षात् दिसतें तसें दुसरें कोणतेंही भूत दिसत नाहीं. यास्तव द्युलोक व त्याच्यावरील लोक यांना 'अंभः' असें येथें ह्मटलें आहे. अंतरिक्ष लोक सूर्याच्या किरणांचा आधार आहे. ह्मणून त्याचा येथें 'अन्तरिक्षं मरीचयः' असा मरीचिशब्दानें उल्लेख केला आहे. 'पृथिवी मरः' पृथिवी हाच मर लोक आहे. कारण भूलोकीं राहणारे प्राणी सहसा (अकस्मात्) मरत असतात. यास्तव मरशब्दानें पृथ्वी उपलक्षित होते. 'या अधस्तात्ताः आप.-' पृथ्वीच्या खालीं पाताळविशेषरूप ज्या भोगभूमी आहेत त्या तेथें राहणाऱ्या नागादिकांकडून पुष्ट होत असल्यामुळें त्यांना 'आप' असें ह्मटलें आहे. ४

(असो; याप्रमाणें लोकांची सृष्टि सांगून, त्यांचे पालक नसल्याकारणानें विनाश न व्हावा, म्हणून श्रुति लोकपालांची उत्पत्ति सांगते—)

स ईक्षतेमे नु लोकाः। लोकपालान्नु सृजा इति सोऽद्भ्य एव पुरुषं समुद्धृत्यामूर्छयत् ॥ ५ ॥

अर्थ—'सः-' तो परमेश्वर 'ईक्षत-' पुनरपि असा विचार करता झाला. 'इमे नु लोकाः' हे लोक तर निष्पन्न झाले. पण प्राण्यांच्या विविध भोगांचीं स्थानें व अचेतन अशा त्या लोकांच्या रक्षणार्थ 'लोकपालन् नु सृजे इति-' चेतन लोकपालांस—देवांस सर्वथा उत्पन्न करतों, असा विचार करता झाला. नतर 'सः-' तो विचारयुक्त आत्मा 'अद्भ्य एव-' जला-

पासूनच म्हणजे जलावरून उपलक्षित होणाऱ्या पंचमहाभूतांपासूनच ' पुरुषं-' पुरुषाकार विराट् पिंडास ' समुद्धृत्य-' वर काढून ' अमूर्छयत्-' मूर्त–कठिण करता झाला. (ज्याप्रमाणें कुंभार तळ्यांत पाण्याच्या खालीं असलेली ओली माती ( चिखल ) आणून व तिला सुकवून तिचा कठिण गोळा करतो, त्याप्रमाणें परमेश्वरानें हा समष्टिरूप विराट् पुरुष–ब्रह्मांडरूप लोकाचा पालक निर्मिला) ५.

( आतां श्रुति त्याच्या अवान्तर लोकपालांची म्हणजे चेतन अग्न्यादि देवतांची सृष्टि दाखविते.—)

तमभ्यतपत्तस्याभितप्तस्य मुखं निरभिद्यत यथाण्डं मुखाद्वाग्वाचोऽग्निर्नासिके निरभिद्येतां नासिकाभ्यां प्राणःप्राणाद्वायुरक्षिणी निरभिद्येतामक्षीभ्यां चक्षुश्चक्षुष आदित्यःकर्णौ निरभिद्येतां कर्णाभ्यां श्रोत्रं श्रोत्राद्दिशस्त्वङ्निरभिद्यत त्वचो लोमानि लोमभ्य ओषधिवनस्पतयो हृदयं निरभिद्यत हृदयान्मनो मनसश्चन्द्रमा नाभिर्निरभिद्यत नाभ्या अपानोऽपानान्मृत्युः शिश्नं निरभिद्यत शिश्नाद्रेतो रेतस आपः ॥ ६ ॥ इति प्रथमः खण्डः ।

अर्थ—' तं-' त्या विराट् पुरुषास उद्देशून ' अभ्यतपत्-' त्यांतील छिद्रें, त्या छिद्रांतील इंद्रियें, त्यांच्या अभिमानी देवता इत्यादिकांच्या सृष्ट्यर्थ तो परमेश्वर पर्यालोचन करूं लागला. त्याचें पर्यालोचन हेंच तप आहे, असें वर सांगितलेंच आहे. ' तस्य अभितप्तस्य-' ज्याच्याविषयीं सर्वप्रकारें पर्यालोचन केलें आहे अशा त्या विराट् पिंडाचें ' मुखं ' मुख हें छिद्र ' निरभिद्यत-' झालें, मुखछिद्र विदारित झालें, उत्पन्न झालें. तें कसें झालें. हें सुचविण्यासाठीं ' यथा अण्ड-' असा दृष्टान्त दिला आहे. म्हणजे पक्षी, सर्प इत्यादिकांचें परिपक्व झालेलें अंडें जसें आपोआप उकलतें त्याप्रमाणें तें मुखछिद्र झालें. ' मुखात् वाक्-' त्या मुखछिद्रापासून वाक् हें इंद्रिय निष्पन्न झालें. 'वाचः अग्निः-' वाक्-पासून अग्निदेवता उत्पन्न झाली, त्याचप्रमाणें ' नासिके-' नाकाचीं दोन छिद्रें 'निरभिद्येतां 'फुटलीं. 'नासिकाभ्यां-' त्या नाकाच्या छिद्रांपासून ' प्राणः-' प्राणेंद्रिय व ' प्राणात्-' प्राणापासून 'वायुः-' वायु–देवता झाली. ' अक्षिणी निरभिद्येतां-' नेत्रांचीं छिद्रें झालीं. 'अक्षीभ्यां-' त्या दोन नेत्रांपासून ' चक्षुः-' चक्षुरिन्द्रिय व 'चक्षुषः-' चक्षूपासून ' आदित्यः-' सूर्य उत्पन्न झाला. 'कर्णौ ' कानाचीं छिद्रें, 'निरभिद्येतां-' झालीं. ' कर्णाभ्यां-' दोन्ही कर्णांपासून ' श्रोत्रं-' श्रोत्रेंद्रिय व 'श्रोत्रात् दिशः-' श्रोत्रापासून दिशा

झाल्या. 'त्वक् निरभिद्यत-' त्वक् इंद्रिय निष्पन्न झालें. 'त्वचो लोमानि-' त्वचेपासून लोम उत्पन्न झाले. येथें लोमशब्दानें लोमाधारभूत व त्वचेंत असणारें स्पर्शनेन्द्रिय घ्यावें. 'लोमभ्यः ओषधिवनस्पतयः-' स्पर्शेंद्रियापासून औषधी व वनस्पती झाल्या. 'हृदयं निरभिद्यत-' हृदय निर्माण झालें. 'हृदयात् मनः-' हृदयापासून मन झालें. 'मनसः चन्द्रमाः-' मनापासून चन्द्रमा झाला. 'नाभिः निरभिद्यत-' नाभि हें छिद्र झालें. 'नाभ्या अपानः-' नाभीपासून अपान झाला. 'अपानात् मृत्युः-' अपानापासून मृत्यु झाला. 'शिश्नं निरभिद्यत-' शिश्न हें छिद्र झालें. त्या छिद्रापासून 'रेतः-' गुह्येंद्रिय झालें आणि 'रेतसः-' गुह्येंद्रियापासून 'आप' झालें. ६ ( १ )

---

( इंद्रियें व त्यांच्या अभिमानिदेवता यांची सृष्टि सांगितली. आतां त्या देवतांच्या भोगास योग्य असलेल्या अल्पशरीरांची उत्पत्ति सांगण्याची इच्छा करणारा वेद त्याच्या उपोद्घातरूपानें प्रथम क्षुधा व पिपासा यांची सृष्टि सांगतो—)

ता एता देवताः सृष्टा अस्मिन् महत्यर्णवे प्रापतंस्तमशनापिपासाभ्या-मन्ववार्जत् ॥ १ ॥

अर्थ—'ताः एताः देवताः सृष्टाः-' त्या ह्या इंद्रियाभिमानिदेवता उत्पन्न झाल्या असतां 'अस्मिन् महति अर्णवे-' वर सांगितलेल्या विराड्-देहरूपी मोठ्या–अति विस्तृत समुद्रांत ( विराड्देहांत ) 'प्रापतन्-' पडल्या. तेव्हां परमेश्वरानें 'तं-' सर्व इंद्रियें व त्यांच्या देवता यांच्या अधिष्ठानभूत अशा त्या विराड्देहास 'अशनापिपासाभ्यां' क्षुधा व पिपासा ( तहान ) यांच्या योगानें 'अन्ववार्जत्' संयुक्त केलें. १.

(आतां ही श्रुति अल्पदेहांची उत्पत्ति सांगते—)

ता एनमब्रुवन्नायतनं नः प्रजानीहि । यस्मिन् प्रतिष्ठिता अन्नमदामेति । ताभ्यो गामानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति ॥ ताभ्योऽश्वमानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति ॥ २ ॥ ताभ्यः पुरुषमानयत्ता अब्रुवन् सुकृतं बतेति पुरुषो वाव सुकृतम् ।

अर्थ—'ताः-' विराड्देहांत पडलेल्या इंद्रियाभिमानिनी देवता 'एनं-' त्या स्रष्ट्या परमेश्वरास 'अब्रुवन्-' म्हणाल्या. हे परमेश्वरा, हा विराड्देह आमच्या भोगास योग्य नाहीं. कारण तो फारच विस्तृत आहे. वास्तव

त्याला नखशिखान्त व्यापून आम्ही त्यांत प्रतिष्ठित होण्यास असमर्थ आहों. त्याचप्रमाणें या एवढ्या देहाला पुरेल इतकें अन्न संपादन करण्यासही आम्ही असमर्थ आहों. यास्तव ' यस्मिन् प्रतिष्ठिताः (सन्तः) अन्नं अदाम-' ज्या अल्पदेहांत प्रतिष्ठित होऊन आह्मी अन्न खावू शकूं [ ह्मणजे त्या अल्पदेहास पुरेल इतकें अन्न खाण्यास समर्थ होऊं ] असें ' आयतनं नः प्रजानीहि-' शरीर ( स्थान ) आह्मांकरितां संपादन कर. ( असें स्थान कोणतें याचा विचार कर. ) ' इति-' असें त्या बोलल्या. तेव्हां परमेश्वर ' ताभ्यः-' त्या देवतांच्या भोगाकरतां ' गां आनयत्-' गायीचा देह आणता झाला. ' ताः अब्रुवन्-' तेव्हां त्या देवता ह्मणाल्या, ' न वै नः अयं अलं-' ' नः-' आह्माला ' अयं-' हा देह ' न वै अलं-' पुरेसा नाहींच, ( आह्मांला जसा पाहिजे तसा हा नाहीं. या शरीराला वरचे दांत नाहींत. यास्तव त्याला दूर्वादि मुळें उपटतां येणें शक्य नाहीं. तस्मात् त्या विराड्देहाप्रमाणें हाही गायीचा देह राहूं दे. ज्याला दोन्ही बाजूस दांत आहेत, असा दुसराच देह निर्माण कर. ) ' इति ' असें त्या बोलल्या. त्यानंतर परमेश्वर ' ताभ्यः-' त्यांच्याकरितां ' अश्वं आनयत्-' अश्व आणता झाला. पण ' ताः अब्रुवन्-' त्या म्हणाल्या. 'न वै नःअयं अलं इति-' हा अश्वदेहही विवेकज्ञानशून्य असल्यामुळें आह्मांला पुरेसा नाहीं. तेव्हां परमेश्वर ' ताभ्यः-' त्यांच्यासाठीं ' पुरुषं आनयत्-' विवेकसंपन्न पुरुषदेह आणता झाला. ' ताः अब्रुवन्-' तेव्हां तेवढ्यानें संतुष्ट झालेल्या त्या देवता ह्मणाल्या, ' सुकृतं वत-' अहाहा परमेश्वरानें हें फार चांगलें केलें, येथें ' वत ' या आश्चर्यवाचकशब्दानें आपला संतोष सुचविणाऱ्या त्या ' सुकृत-' चांगलें केलें ' इति-' असें बोलल्या. यास्तव ' पुरुषः वाव सुकृत ' मनुष्यदेहच ' सुकृतं ' या संतोषद्योतकशब्दानें सांगता येण्यासारखा आहे. ( याविषयीं याच आरण्यकांत मागें ' मनुष्य देहांतच आत्मा अधिक प्रकट झाला आहे. कारण तो प्रज्ञानानें अतिशय संपन्न आहे. तो आपल्याला कळलेलें बोलूं शकतो. कळलेली वस्तु पाहूं शकतो. काळची गोष्ट त्याला आज आठवते. त्याला प्रकाश व अप्रकाश यांचें ज्ञान असतें. तो या मर्त्यशरीराच्या योगानें अमृताच्या [ अमरणाच्या ] प्राप्तीची इच्छा करतो, इत्यादि योग्यतेनें तो संपन्न आहे ' असें ह्मटलें आहे. )

( आतां ईश्वरानें निर्माण केलेल्या भोगयोग्य शरीरांत त्या देवतांचा प्रवेश व्हावा म्हणून श्रुति ईश्वराची प्रेरणा दाखवितें—)

ता अब्रवीद्यथाऽऽयतनं प्रविशतेति ॥ ३ ॥

अर्थ—तो ईश्वर ' ताः यथायतनं प्रविशत इति अब्रवीत्-' त्या देवतांना ' अहो देवतांनो, आपापल्या यथोचित आयतनांत [शरीरांत, स्थानांत] प्रवेश करा,' असें बोलला. [म्हणजे विराड्देहाच्या ज्या छिद्रांत जें इंद्रिय उत्पन्न झालें व त्यांत जी देवता उत्पन्न झाली, त्यांच्याच अनुरोधानें, त्यांच्या स्थानादिकांचें उल्लंघन न करतां प्रवेश करा, अशी आज्ञा ईश्वरानें केली]

( आतां परमेश्वरानें ज्यांस अनुज्ञा दिली आहे अशा देवतांचा प्रवेश श्रुति दाखविते—)

अग्निर्वाग्भूत्वा मुखं प्राविशद्वायुः प्राणो भूत्वा नासिके प्राविशदादित्यश्चक्षुर्भूत्वाऽक्षिणी प्राविशद्दिशः श्रोत्रं भूत्वा कर्णौ प्राविशन्नोषधिवनस्पतयो लोमानि भूत्वा त्वचं प्राविशंश्चन्द्रमा मनो भूत्वा हृदयं प्राविशन्मृत्युरपानो भूत्वा नाभिं प्राविशदापो रेतो भूत्वा शिश्नं प्राविशन् ॥ ४ ॥

अर्थ—' अग्निः-' वागिंद्रियाचा अभिमानी देव ' वाग् भूत्वा ' वाणी होऊन, वाणींत अंतर्भूत होऊन ' मुखं प्राविशत्-' मुखछिद्रांत प्रवेश करिता झाला. ' वायुः प्राणो भूत्वा ' वायु प्राण होऊन ' नासिके प्राविशत्-' नाकाच्या दोन्ही छिद्रांत प्रवेश करता झाला. 'आदित्यः चक्षुः भूत्वा-' सूर्य चक्षुरिंद्रिय होऊन ' अक्षिणी प्राविशत्-' नेत्रछिद्रांत प्रवेश करता झाला. ' दिशः श्रोत्रं भूत्वा-' दिशा श्रोत्रेन्द्रिय होऊन ' कर्णौ प्राविशन्-' दोन्ही कानांच्या छिद्रांत प्रवेश करत्या झाल्या. ' ओषधिवनस्पतयः-' ओषधी व वनस्पती ' लोमानि भूत्वा-' लोम होऊन ' त्वचं प्राविशन्-' त्वचेमध्यें प्रवेश करत्या झाल्या. ' चंद्रमाः मनो भूत्वा-' चंद्र मन होऊन ' हृदयं प्राविशत्-' हृदयांत प्रवेश करता झाला. ' मृत्युः अपानः भूत्वा नाभिं प्राविशत्-' मृत्यु अपान होऊन नाभींत प्रवेश करता झाला. ' आपः रेतः भूत्वा-' आप रेत होऊन ' शिश्नं प्राविशन्-' शिश्नांत प्रवेश करित्या झाल्या. ( येथें सांगितलेल्या वाक्, चक्षु, इत्यादि इंद्रियांमध्यें अग्न्यादि देवता प्रत्यक्ष दिसत नाहींत. पण देवतांनी प्रेरणा केल्यावांचून इंद्रियांच्या ठिकाणीं आपापल्या विषयांचें ग्रहण करण्याचें सामर्थ्यही येत नाहीं. याविषयीं भगवान् व्यासांनीं उत्तर मीमांसेंत ' ज्योतिराद्यधिष्ठानं तु तदामननात् ' ( अ. २

पा. ४ सू. १४ ) या सूत्रांत विचार केला आहे. त्या सूत्राचा अर्थ असा-अग्निप्रभृति देवतांकडून वागादि इंद्रियांना प्रेरणा होत असते, असें मानावें. कारण 'अग्निर्वाग्भूत्वा०' इत्यादि ऐतरेयोपनिषद्वाक्यांत तसें सांगितलें आहे. त्या पादांत इंद्रियांविषयीं आणखींही पुष्कळ विचार केला आहे ई. )

( त्या विराड्देहामध्यें क्षुधा व पिपासा यांचें नियत स्थान वर कोठें सांगितलेलें नाहीं. ह्मणून त्यांचा सर्व शरीरात प्रवेश झाल्याचें श्रुति दाखविते-)

तमशनापिपासे अब्रूतामावाभ्यामभिप्रजानीहीति । ते अब्रवीदेतास्वेव वां देवतास्वाभजाम्येतासु भागिन्यौ करोमीति । तस्माद्यस्यै कस्यै च देवतायै हविर्गृह्यते भागिन्यावेवास्यामशनापिपासे भवतः ॥ ५ ॥ इति द्वितीयः खण्डः ॥

अर्थ—या खंडाच्या पहिल्या वाक्यांत सांगितल्याप्रमाणें परमेश्वरानें विराड्देहांत ज्यांची योजना केली आहे असा 'अशनापिपासे-' क्षुत्पिपासा 'तं-' त्या परमेश्वरास 'आवाभ्यां अभिप्रजानीहि-' आह्मां दोघीजणीं-करितां विशेष स्थानाची योजना कर, आह्मांला विशेष स्थान देण्याचा अनुग्रह कर, 'इति अब्रूताम्' असें ह्मणाल्या. पण ईश्वर या शरीरांत त्यांच्या-करितां कांहीं स्थान नाहीं, असें पाहून 'ते अब्रवीत्-' त्या दोघीजणींस ह्मणाला 'वां-' तुह्मां दोघीजणींना 'एतासु एव देवतासु-' या अग्न्यादि देवतामध्येंच 'आभजामि-' सर्व प्रकारें विभागून देतों. 'एतासु भागिन्यौ करोमि-' या देवतामध्यें विषयांच्या भागानें युक्त करतों. 'इति-' असें तो म्हणाला आणि ज्याअर्थी तो असें म्हणाला 'तस्मात्-' त्याअर्थी यालोकीं 'यस्यै कस्यै च देवतायै हविः गृह्यते-' ज्या कोणत्याही देवतेला उद्देशून हवि–भोग्य वस्तु अर्पण केली जाते 'अस्यां अशनापिपासे भागिन्यौ एव भवतः-' त्या अग्न्यादिदेवतेमध्यें या क्षुत्पिपासा भागयुक्तच होतात. (अग्नि, वायु इत्यादि देवतांच्या शरीरातही आहाराचा स्वीकार केला असतां, त्याच्या योगानें क्षुधा व तृषा याचीच तृप्ति होते, त्याच न्यायानें मनुष्यादि इतर शरीरांतही चक्षुःप्रभृति इंद्रियांच्या द्वारा विषयांचें ग्रहण करतांच क्षुधा व पिपासा यांची शांति होते. ताटांत वाढलेलें अन्न खाण्याची इच्छा करणारा पुरुष जेव्हा त्याच्याकडे आदरानें पाहतो तेव्हां भोग्य समीप आलें आहे, या संतोषानें त्याच्या मनांतील त्याविषयींची तृष्णा शांत होते. ती त्याला पूर्वीप्रमाणें पीडा देत नाहीं. त्याचप्रमाणें अत्यंत प्रिय अन्नाची वार्ता ऐकणें, त्याला स्पर्श

करणें इत्यादि प्रसंगींही थोडी तृप्ति होते, असा अनुभव येतो. वास्तव सर्व देवतांमध्यें क्षुधा व पिपासा यांचा भाग असतो. ) ५ (२.)

---

( गाय, घोडा, पुरुष इत्यादिकांचीं शरीरें, हीं भोगाचीं अधिष्ठानें; अग्न्यादि देवतांकडून अनुगृहीत झालेलीं–वाक्, चक्षुः इत्यादि–भोगाचीं साधनें व त्यांचा त्या शरीरांत प्रवेश, येथपर्यंत अध्यारोपाचें वर्णन करून आतां श्रुति या तिसऱ्या खंडांत प्रथम भोग्यसृष्टीचें वर्णन करते. )

स ईक्षतेमे नु लोकाश्च लोकपालाश्चान्नमेभ्यः सृजा इति ॥१॥

अर्थ—'सः' तो परमेश्वर 'ईक्षत' पुनरपि असा विचार करता झाला. 'लोकाः च लोकपालाः च इमे नु' पृथिव्यादि लोक व सर्व इंद्रियें, हींच ज्यांचीं शरीरें आहेत असे अग्न्यादि लोकपाल, हे मीं उत्पन्न केले. पण अन्नावांचून यांचें जीवन होणें, संभवत नाहीं. 'इति' वास्तव 'एभ्यः अन्नं सृजे' यांच्या करितां मी अन्न उत्पन्न करितों. असा त्या ईश्वरानें विचार केला १.

( नंतर अन्ननिष्पत्तीकरितां– )

सोऽपोऽभ्यतपत्ताभ्योऽभितप्ताभ्यो मूर्तिरजायत । या वै सा मूर्तिरजायतान्नं वै तत् ॥ २ ॥

अर्थ—'सः' तो 'अपः' अन्नाच्या कारणभूत जलाचें ज्यांत प्राधान्य आहे अशा पंचभूतांस उद्देशून 'अभ्यतपत्' सर्व प्रकारें पर्यालोचन करता झाला. (अशा अशा प्रकारच्या जलयुक्त क्षेत्रापासून ( शेतांतून ) व्रीहि, यव, इत्यादि धान्य उत्पन्न होवो. मार्जारादिकांचें अन्न, असीं मूषकादिशरीरें निर्माण होवोत, असा प्रकारचा संकल्प त्यानें केला. ) 'अभितप्ताभ्यः ताभ्यः' याप्रमाणें ज्यांच्याविषयीं संकल्प केला आहे अशा त्या जलप्रधान पंचभूतांपासून 'मूर्तिः' व्रीहियवादिरूप व मूषकादिरूप मूर्ति झाली. त्यांतील (पहिल्याप्रकारची मूर्ति हें मनुष्यादिकांचें अन्न व दुसऱ्याप्रकारची मूर्ति हें मार्जारादिकांचें अन्न.) २

( याप्रमाणें श्रुति अन्नाची उत्पत्ति सांगून अन्वयव्यतिरेकन्यायानें त्या अन्नाच्या ग्रहणाचें साधन काय, त्याचा निश्चय करते– )

तदेनत्सृष्टं पराङत्यजिघांसत्। तद्वाचाऽजिघृक्षत्तन्नाशक्नोद्वाचा ग्रहीतुम्। स यद्धैनद्वाचाऽग्रहैष्यदभिव्याहृत्य हैवान्नमत्रप्स्यत् ॥ ३ ॥

अर्थ—उत्पन्न केलेल्या दोन प्रकारच्या अन्नांतील पहिलें अन्न जड आहे. यास्तव हा आपला भोक्ता, हा आपला हिंसक आहे, हें ज्ञान त्याला नसतें व जड असल्यामुळेंच तें इतस्ततः जाण्यासही समर्थ नसतें. पण ' सृष्टं तत्-' उत्पन्न केलेलें तें दुसऱ्या प्रकारचें अन्न–' एनत्-' हें मूषकादि अन्न, मार्जारादि आपल्याला खाणारें आहे, आपल्या मरणाचें कारण आहे, असा निश्चय करून ' पराङ्-' त्याच्यापासून पराङ्मुख होऊन ( परतून ) ' अत्यजिघांसत्-' अतिशय वेगानें पळून जाण्याची इच्छा करूं लागलें. [ म्हणजे त्या आपल्या मृत्यूपासून दूर पळून जाण्यास आरंभ करतें झालें. ] पण तें पळून जाण्यास उद्युक्त झालें आहे, असें पाहून मार्जारादि भोक्तृवर्ग ' तत् वाचा अजिघृक्षत्-' त्याला वागिंद्रियानें ग्रहण करण्याची इच्छा करता झाला. पण ' तत् वाचा गृहीतुं न अशक्नोत्-' अंगांत जेवढें बळ होतें तेवढें सर्व उपयोगांत आणून जरी त्यानें ( भोक्तृवर्गानें ) त्याला ( भोग्यवर्गाला ) ग्रहण करण्यासाठीं यत्न केला तरी तो त्याला वागिंद्रियाच्या द्वारा ग्रहण करण्यास समर्थ झाला नाहीं. हल्लींच्या प्रत्यक्ष उदाहरणानें सृष्टिकालची त्याची अशक्ति श्रुति स्पष्ट करते. ' सः-' तो भोक्तृवर्ग आदिसृष्टिसमयीं ' यत् ह-' जर ' एनत्-' या मूषकादिरूप अन्नास ' वाचा-' वाणीनें ' अग्रहैष्यत्-' ग्रहण करण्यास समर्थ झाला असता तर आतां ( या वेळींही ) ' अन्नं अभिव्याहृत्य एव अत्रप्स्यत्-' भोक्ता त्या अन्नाच्या नांवाचा उच्चार करूनच तृप्त झाला असता. (कारण वागिंद्रियामध्यें शब्दोच्चारावांचून दुसरें कोणताही प्रकारचें आकर्षणसामर्थ्य नसतें. पण केवळ अन्नवाचक शब्दांच्या उच्चारानेंच कोणाचीही तृप्ति होत नाहीं. यास्तव सृष्टिकालींही वाणीमध्यें अन्नस्वीकाराचें सामर्थ्य नसतें, असें अनुमान होतें ) ३.

तत्प्राणेनाजिघृक्षत् तन्नाशक्नोत्प्राणेन ग्रहीतुम् । स यद्धैनत्प्राणेनाग्रहैष्यदभिप्राण्य हैवान्नमत्रप्स्यत् ॥ ४ ॥ तच्चक्षुषाऽजिघृक्षत् । तन्नाशक्नोच्चक्षुषा ग्रहीतुम् । स यद्धैनच्चक्षुषाऽग्रहैष्यद्दृष्ट्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥ ५ ॥ तच्छ्रोत्रेणाजिघृक्षत् । तन्नाशक्नोच्छ्रोत्रेण ग्रहीतुम् । स यद्धैनच्छ्रोत्रेणाग्रहैष्यच्छ्रुत्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥ ६ ॥ तत्त्वचाजिघृक्षत् । तन्नाशक्नोत्त्वचा ग्रहीतुम् । स यद्धैनत्त्वचाऽग्रहैष्यत्स्पृष्ट्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥ ७ ॥ तन्मनसाऽजिघृक्षत्तन्नाशक्नोन्मनसा ग्रहीतुम् । स यद्धैनन्मनसाऽग्रहैष्यद्ध्यात्वा हैवान्नमत्रप्स्यत् ॥ ८ ॥

तच्छिश्नेनाजिघृक्षत्तन्नाशक्नोच्छिश्नेन ग्रहीतुम् । स यद्धैनच्छिश्नेनाग्रहैष्यद्वि-सृज्य हैवान्नमत्रप्स्यत ॥ ९ ॥

या पुढील ४–९ वाक्यांतील शब्दांचा अर्थही असाच समजावा. म्हणजे भोक्त्यानें त्या अन्नाचें प्राणाच्या योगानें म्हणजे घ्राणेंद्रियानें ग्रहण करण्याची इच्छा केली. पण तो प्राणानें त्याचें ग्रहण करण्यास समर्थ झाला नाहीं. कारण सृष्टीच्या आरंभीं त्यानें घ्राणानें जर त्याचें ग्रहण केलें असतें तर आतांही तो भोक्ता त्या अन्नाचा वास घेऊनच तृप्त झाला असता! ४. चक्षु, श्रोत्र, त्वक्, मन, व शिश्न या इंद्रियांच्या द्वारा क्रमानें त्यानें त्याचें ग्रहण करण्याची इच्छा केली, पण त्यांच्या योगानें त्याला त्याचें ग्रहण करतां आलें नाहीं. कारण तसें जर झालें असतें, तर आतांही त्या त्या इंद्रियाच्या अन्नविषयक व्यापारानें भोक्ता तृप्त झाला असता, पण तसें होत नाहीं. वास्तव त्यानें त्यावेळीं त्यांतील कोणत्याही साधनानें अन्नाचें ग्रहण केलें नाहीं, असें ठरतें. ४-९

तदपानेनाजिघृक्षत्तदावयत् ।

अर्थ–शेवटीं भोक्तृवर्ग 'तत्-'तें अन्न 'अपानेन अजिघृक्षत्-'अपानवायूच्या योगानें ग्रहण करण्याची इच्छा करता झाला. येथें अपानशब्दानें अन्नाला मुखछिद्रांतून आंत प्रवेश करावयास लावणारा अन्तर्मुख वायु घ्यावा. असो; तेव्हां 'तत् आवयत्-' त्या अन्नाला ग्रहण करण्यास तो समर्थ झाला. म्हणजे अपानाच्या योगानें भोक्तृवर्गानें अन्न खाल्लें.

( अन्वयव्यतिरेकन्यायानें वायुच अन्नग्रहणाचें साधन आहे, असा निश्चय करून आतां तीच गोष्ट दृढ करण्याकरितां वायूची प्रशंसा करितात–)

सैषोऽन्नस्य ग्रहो यद्वायुरन्नायुर्वा एष यद्वायुः ॥ १० ॥

अर्थ—'यद् वायुः-' मुखछिद्राच्या आंत संचार करणारा जो वायु आहे 'स एषः-' तो हा 'अन्नस्य ग्रहः-' अन्नाचा ग्राहक आहे व ही गोष्ट आमच्या अनुभवानें सिद्ध आहे. शिवाय 'एषः यद् वायुः-' हा जो वायु 'स अन्नायुः वा-' तो अन्नाच्या द्वारा आयुष्याचें निमित्त आहे. अन्नरसाच्या योगानें, अन्न-रसाकडून प्राण देहांत बांधला जातो. ( म्हणूनच बृहदारण्यकांत शिशुब्राह्म-णांतील प्राणवर्णनप्रसंगीं 'अन्नं दाम' म्हणजे अन्न हें प्राणाला बांधून ठेव-ण्याचें दावें आहे, या वाक्यानें अन्न ही प्राणाला बांधण्याची दोरी आहे, असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें अन्नरूपबंधन शिथिल झालें असतां जीव देहाचा त्याग करतो, हेंही दृष्टान्तपूर्वक असें सांगितलें आहे–' तद्यथानं

वौदुम्बरं वा पिप्पलं वा बन्धनात्प्रमुच्यत एवमेवायं पुरुष एभ्योऽङ्गेभ्यः संप्रमुच्यते' म्हणजे ज्याप्रमाणें आम्रफळ किंवा उदुंबराचें फळ किंवा पिंपळाचें फळ बंधनापासून ( देंठापासून ) सुटतें, त्याचप्रमाणें हा पुरुष या अंगापासून मुक्त होतो, निघून जातो. (अन्नग्रहणामुळें शरीरात होणारें प्राणाचें अवस्थान [ स्थिति ] आयुष्याचें निमित्त आहे, हें लोकांत प्रसिद्ध आहे आणि कौषीतकी उपनिषदातही 'जोंवर या शरीरात प्राण राहतो तोंवर आयुष्य' असेंच म्हटलें आहे. येथेंही 'अन्नायुर्वा एषः' असें ह्याच अभिप्रायानें म्हटलें आहे ) १०.

( भोगाचें अधिष्ठान, भोगाचें साधन, व भोग्यविषय याची उत्पत्ति सांगून भोगाचा स्वामी जो जीव त्याचें प्रदर्शन करण्याकरितां ईश्वराचा विचार या पुढील वाक्यांत सांगितला आहे.—)

स ईक्षत कथं न्विदं मदृते स्यादिति स ईक्षत कतरेण प्रपद्या इति ॥

अर्थ—'सः ईक्षत' तो परमेश्वर विचार करता झाला. देह, इंद्रियें, त्यांच्या अभिमानिनी देवता, अन्न, त्याचा स्वीकार इत्यादि जो हा सर्व व्यवहार आहे 'इदं' तें हें सर्व 'मदृते' मज जीवरूपी भोगस्वामीवांचून 'कथं नु स्यात्' कसें बरें असूं शकेल ? (जीवावांचून तो असणें कधींही संभवत नाही. कारण नगराचा स्वामी जो राजा त्याच्यावाचून नगर किंवा त्यांतील लोक याची रचना शोभत नाही. यास्तव भोगाचा स्वामी असा मला जीवरूपानें देहांत प्रवेश करणें उचित आहे. पण इतकें ठरतांच त्याला प्रवेशाच्या द्वाराचा विचार पडला, तो असा—) 'स ईक्षत कतरेण प्रपद्ये इति' तो विचार करूं लागला कीं मी कोणत्या मार्गानें यांत प्रवेश करावा ? (या शरीरांत दोन मार्ग दिसतात. एक पादाग्र व दुसरें मस्तकावरील ब्रह्मरंध्र. त्यांतील कोणत्या मार्गानें प्रवेश करावा ! )

( शरीरांत जीवरूपानें प्रवेश करण्याचीं प्रयोजनें दोन आहेत. एक देहेंद्रियादिव्यवहाराचें पालन व दुसरें आत्मबोध. त्यांतील पहिल्या प्रयोजनाचा विचार वरच्या वाक्यानें केला. आतां या वाक्यानें श्रुति दुसऱ्या प्रयोजनाचा विचार दाखविते—)

स ईक्षत यदि वाचाऽभिव्याहृतं यदि प्राणेनाभिप्राणितं यदि चक्षुषा दृष्टं यदि श्रोत्रेण श्रुतं यदि त्वचा स्पृष्टं यदि मनसा ध्यातं यद्यपानेनाभ्यपानितं यदि शिश्नेन विसृष्टमथ कोऽहमिति ॥ ११ ॥

अर्थ—'सः' तो परमेश्वर 'ईक्षत-' विचार करता झाला. जर वाणीनेंच संभाषणव्यवहार केला, प्राणानेंच अभिप्राणन केलें, चक्षुरिंद्रियानेंच पाहिलें, श्रोत्रानें ऐकलें, त्वचेनें स्पर्श केला, मनानें ध्यान केलें, अपानानें अन्नादि ग्रहण केलें, व शिश्नानें विसर्ग केला तर मग मी कोण राहिलों? [म्हणजे वागादि इंद्रियांनीं मज स्वामीची अपेक्षा न करतांच जर आपले व्यापार केले व त्यांचे ते स्वतंत्रकर्ते झाले तर मग मी कोण राहिलों? कोणी नाहीं. म्हणजे तीं इंद्रियेंच जर स्वतंत्रपणें व्यवहार करूं लागलीं तर मग देहादिकांहून निराळा कोणी चिदात्मा आहे व तो परमब्रह्मस्वभावच आहे, असें कोणीही जाणणार नाहीं. पण तेंच, मी सर्व व्यापारांचा कर्ता व इतर सर्व इंद्रियें माझ्या प्रेरणेनेंच भाषणादि क्रिया करणारीं माझीं साधनें, असें जर झालें, तर 'या वागादि इंद्रियांचा व्यवहार सकर्तृक आहे. कारण तोही व्यवहार आहे, ती सुद्धां एक क्रिया आहे व गमनादि कोणतीही लोकप्रसिद्ध क्रिया कर्त्यावांचून होत नाहीं,' अशा अनुमानानें माझें अस्तित्व सिद्ध होईल यास्तव देहादिकांहून पृथक् व त्यांचा प्रेरक, अशा आत्म्याचा बोध व्हावा, हेंही त्याच्या जीवरूपानें शरीरांत प्रवेश करण्याचें प्रयोजन आहे. तात्पर्य, परमेश्वरानें प्रवेशाचें द्वार व वर सांगितलेलीं दोन प्रयोजनें यांचा विचार केला ] ११.

( आतां श्रुति साक्षात् प्रवेशच दाखविते—)

स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत । सैषा विदृतिर्नाम द्वास्तदेतन्नान्दनं । तस्य त्रय आवसथास्त्रयः स्वप्ना अयमावसथोऽयमावसथोऽयमावसथ इति ॥ १२ ॥

अर्थ—(मागें आरण्यकांत 'प्रपदाभ्यां प्रापद्यत' या वाक्यानें प्राणरूप क्रियाशक्ति, ही ज्याची उपाधि आहे, असा आत्मा पायांच्या अग्रामध्यें शिरला असें वर्णन केलें आहे, आतां या ठिकाणीं त्या ज्ञानशक्तिप्रधान आत्म्याचा मस्तकावरील छिद्रानें प्रवेश झाला, असें सांगितलें जात आहे—) वर सांगितलेल्या प्रकारच्या विचारानें युक्त असलेला 'सः' परमेश्वर 'एतमेव' मस्तकाच्या मध्यभागास म्हणजे जेथें मस्तकांतील कवट्यांचा संधि आहे, जेथें त्या कवट्या एकमेकींशीं जुळल्या आहेत, त्याच 'सीमानं-' एका विशेष स्थानास 'विदार्य-' विदीर्ण करून, फाडून, छिद्र करून 'एतया द्वारा-' त्या छिद्ररूप द्वारानें 'प्रापद्यत-' ज्ञानशक्तियुक्त असलेला तो देहांत प्रविष्ट झाला. (ज्ञानोपाधीनें युक्त असलेला तो मस्तकांत प्रविष्ट झालेला असल्यामुळेंच मस्त-

कात ज्ञानेंद्रियांचें आधिक्य दिसतें त्याचप्रमाणें क्रियाशक्तिरूप उपाधीनें युक्त असलेल्या त्यानें पादाग्रातून प्रवेश केल्यामुळें कंठाच्या खालींच कर्मेंद्रियांचें बाहुल्य आढळतें. आतां श्रुति या मस्तकांतील प्रवेशाच्या द्वाराची स्तुति करते-) 'सा एषा द्वाः विदृतिः नाम-' त्या ह्या द्वाराला विदृति असें नांव प्राप्त झालें आहे. (कारण आत्म्याच्या भृत्याप्रमाणें असलेल्या चक्षुरादि इंद्रियांनीं अक्षि, श्रोत्र इत्यादि गोलकांत प्रवेश व निवास केल्यामुळेंच त्यांच्या स्वामीला स्वतःच्या प्रवेशाकरिता निराळें द्वार हवें, असें वाटलें व आपल्याला शोभेल असें स्वतंत्र द्वार पाहिजे, या अभिप्रायानें त्यानें मोठ्या प्रेमानें तें केलें. त्याचा उत्कर्ष प्रकट करण्यासाठींच त्याला 'विदृति' हें नांव प्राप्त झालें. त्याचप्रमाणें शरीर सोडून त्या द्वारानें निघालेल्या पुरुषाला ब्रह्मलोकाची प्राप्ति होऊन क्रमानें तो मुक्त होत असल्यामुळें तें द्वार आनंदाचें निमित्त आहे. म्हणून) 'तत् एतत् नान्दनम्-' तें हें द्वार नांदन म्हणजे आनंद देणारें आहे.

(आतां शरीरांत प्रवेश केलेल्या त्याच्या संचाराचीं स्थानें व त्या स्थानांतील संचारामुळें होणाऱ्या अवस्था 'तस्य त्रयः०-' इत्यादि वरील वाक्य दाखवितें-) -ज्याप्रमाणें महाराजाच्या क्रीडेकरितां त्याच्या प्रासादास एकावर एक असे अनेक मजले केले जातात, त्याप्रमाणें 'तस्य' शरीरांत जीवरूपानें प्रविष्ट झालेल्या आत्म्याच्या क्रीडेकरितां 'त्रयः-' तीन 'आवसथाः-' स्थानें केलेलीं आहेत त्या तीन स्थानीं असता 'त्रयः स्वप्ना.' तीन स्वप्नें पाहतो. आतां तीं तीन स्थानें कोणतीं असा संशय राहू नये म्हणून श्रुति बोट पुढें करून-'अयं आवसथः' नेत्र हें एक क्रीडास्थान, 'अयं आवसथः-' कंठ हें दुसरें व 'अयं आवसथः-' हृदय हें तिसरें स्थान आहे, असें दाखवितें. जागरित व सुषुप्त, यांनाही येथें स्वप्न असें म्हटलें आहे. कारण 'विद्यमानवस्तुतत्त्वाला आच्छादित करून विपरीत भास करविणें' हें स्वप्नाचें लक्षण त्यांतही आहे. कारण त्या दोन्ही अवस्थामध्यें विद्यमान ब्रह्मतत्त्वाला आच्छादित करून तद्विपरीत जीवतत्त्वाचा अवभास होतो. 'तीन आवसथ' या पदांनीं पितृशरीर, मातृशरीर व स्वशरीर या स्थानांचाही निर्देश करण्याचा श्रुतीचा उद्देश दिसतो. त्याचाच अधिक विस्तार पुढच्या खंडांत केला आहे.

(संसार दोन प्रकारचा आहे. एक-प्रत्यही होणारा व्यवहार व दुसरा-दुसऱ्या जन्माचा स्वीकार. त्यांतील पहिल्या प्रकारच्या संसाराचीं नेत्र, कंठ व हृदय हीं तीन स्थानें आहेत व दुसऱ्या प्रकारच्या संसाराचीं पित्याचें

शरीर, मातेचें शरीर व स्वशरीर, हीं तीन आहेत. या वाक्याच्या शेवटीं 'इति' असा जो शब्द आहे, तो संसाररूप अध्यारोपप्रकरणाच्या समाप्ती-करितां आहे. ) १२

( आतां श्रुति अपवादप्रकरणाचा अर्थ थोडक्यांत दाखविते–)

स जातो भूतान्यभिव्यैख्यत् किमिहान्यं वावदिषदिति । स एतमेव पुरुषं ब्रह्म ततममपश्यत् ॥ १३ ॥

अर्थ —'सः-' तो परमात्मा 'जातः-' देहांत प्रवेश करून जन्म, मरण, जाग्रत् स्वप्न व सुषुप्ति यांच्या योगानें संसारी झाला. पण पुढें ईश्वराच्या अनुग्रहानें आणि गुरु व शास्त्र यांच्या प्रसादानें 'भूतानि-' आकाशादि भूतें व प्राणी यांना 'अभिव्यैख्यत्-' सर्व प्रकारें विवेकानें जाणता झाला, [म्हणजे हीं दिस-णारीं आकाशादि भूतें व प्राण्यांचे देह कोठून उत्पन्न झाले ? त्याचें रक्षण कोण करतें ? त्यांचा लय कशांत होतो ? इत्यादि प्रकारें आपल्यापाशींच आपल्याला प्रश्न करून त्यानें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें विवेचन केलें. तेव्हां सर्व संसार मायाकल्पित असल्याकारणानें ब्रह्मच सर्वांचें तात्त्विक स्वरूप आहे, असें त्याला कळलें.] तेव्हां तो म्हणाला, 'इह-' या जगांत 'किं वा अन्यं-' कोणती बरें दुसरी ब्रह्माहून निराळी वस्तु आहे? असें 'वावदिषत्-' मी म्हणूं ? ब्रह्माहून पृथक् कांहीं सांगतां येणें शक्य नाहीं. 'इति-' असा निश्चय करून 'सः-' तो जीव 'एतं एव पुरुषं-' याच, शरीरांत प्रविष्ट झालेल्या चिद्रूप देहादि-कांच्या साक्षी पुरुषास 'ततमम् ब्रह्म अपश्यत्-' अतिशय विस्तृत ब्रह्म पाहता झाला. (आपल्या या शरीरांतील केवळ चैतन्यरूप साक्षि प्रज्ञानच सर्व-व्यापी ब्रह्म आहे, असा त्यानें निश्चय केला. श्रुतींत 'ततमम्' असें पद आहे. पण तें वस्तुतः 'तततमम्' असें पाहिजे. वास्तव त्यांतील एक तकार लुप्त झाला आहे, असें समजावें. सर्व दृश्य जग व द्रष्टा जीव यांचें तत्त्व ब्रह्मच आहे असा या सर्व अपवादप्रकरणाचा तात्पर्यार्थ आहे.) १३

( आतां या पूर्वोक्त ब्रह्मसाक्षात्काराची प्रशंसा 'इंद्र' या नांवाची व्यु-त्पत्ति सांगून करतात.–)

इदमदर्शमितिइ । तस्मादिदंद्रो नामेदंद्रो ह वै नाम तमिदन्द्रं सन्तमिन्द्रं इत्याचक्षते परोक्षेण परोक्षप्रिया इव हि देवाः परोक्षप्रिया इव हि देवाः ॥ १४ ॥ इति तृतीयः खंडः । द्वितीयारण्यकस्य चतुर्थोऽध्यायः ॥

अर्थ—शरीरांत प्रविष्ट झालेला तो जीवात्मा 'ब्रह्मच आत्मा आहे' असें साक्षात् जाणून 'इदं अदर्शम्' मीं हें पाहिलें, 'इति३' या वाक्यानें आपला अपरोक्ष अनुभव प्रकट करीत अतिशय संतुष्ट झाला. येथील 'इति३' या शब्दांतील शेवटचा 'इ' हा स्वर प्लुत आहे. (ऱ्हस्व स्वराची एक मात्रा, दीर्घाच्या दोन मात्रा व प्लुत स्वराच्या तीन मात्रा असतात.) जीवाचा संतोष व्यक्त करण्यासाठीं प्लुत स्वराचा उपयोग केला आहे. ज्याअर्थी त्यानें 'इदं अदर्शम्' असें म्हटलें, 'तस्मात् इदंद्रो नाम' त्याअर्थीं 'इदं दृष्टं' या व्युत्पत्तीनेंच तो जीव 'इदंद्र' या नांवास प्राप्त झाला. या व्युत्पत्तीप्रमाणें 'इदंद्र' या नांवाची प्रसिद्धि आहे. पण 'व्यवहारांत परमेश्वराला 'इंद्र' असें म्हणतात; 'इदंद्र' असें कोणी म्हणत नाहीं,' म्हणून कोणी म्हणेल तर तें खरें आहे; पण वर सांगितल्याप्रमाणें वस्तुतः 'तं इदंद्रं सन्तं इन्द्रः इति आचक्षते परोक्षेण-' तो 'इदंद्र' असतानांच त्याच्या नावामध्यें परोक्षत्व हा धर्म यावा म्हणून मधल्या दकाराचा लोप करून 'इन्द्र' असेंच म्हणतात. 'हि-' कारण 'देवाः-' सर्व पूज्य 'परोक्षप्रियाः इव' जणुं काय परोक्षप्रियच असतात. म्हणजे त्यांना त्यांच्या प्रत्यक्ष नांवापेक्षां परोक्ष 'आचार्य, उपाध्याय' इत्यादि नांवेंच प्रिय असतात, असें व्यवहारांतही दिसतें. शेवटच्या चार शब्दांची आवृत्ति करून येथें दुसऱ्या आरण्यकाचा चवथा अध्याय संपला, असें सुचविलें आहे. १४ (३)

---

(आतां या पांचव्या अध्यायांत पितृशरीरादि तीन आवसथांचें वर्णन जीवाला संसाराविषयीं विरक्ति यावी म्हणून श्रुति करते-)

ॐ पुरुषे ह वा अयमादितो गर्भो भवति यदेतद्रेतः॥

अर्थ—जो हा शरीर धारण करण्याची इच्छा करणारा जीवात्मा तो 'अयं-' हा 'पुरुषे-' पित्याच्या शरीरांत 'आदितः-' प्रथम 'गर्भः भवति-' गर्भ होतो. पण तो तेथें स्त्रीगर्भाप्रमाणें पोट मोठें होऊन व्यक्त होत नाहीं. तर 'यत् एतत् रेतः-' पित्याच्या शरीरांतील जें हें रेत तोच गर्भ असें म्हटलें आहे. कारण पुढें जन्म घेणारा जीव त्यात प्रविष्ट झालेला असतो. याविषयीं अधिक विवेचन अनुभूतिप्रकाशाच्या ४४ व्या श्लोकांत (पृष्ठ १४१-१४८) केलें आहे १.

(आतां त्या गर्भाच्या जन्माचा प्रकार सांगतात-)

तदेतत्सर्वेभ्योऽङ्गेभ्यस्तेजः सम्भूतमात्मन्येवात्मानं बिभर्ति तद्यदा स्त्रियां सिञ्चत्यथैनज्जनयति तदस्य प्रथमं जन्म ॥ १ ॥

अर्थ—पुरुषांत गर्भरूपानें स्थित असलेलें 'तत्' तें 'एतत्' हें 'सर्वेभ्यः अङ्गेभ्यः तेजः सम्भूत-' पुरुषाच्या शरीरांतील नखाग्रापासून शिखेपर्यंत असलेल्या सर्व अवयवापासून सारभूत तेज निघालेलें आहे पुरुष त्या 'आत्मान' आपल्याच रेतोरूप रूपान्तराला 'आत्मनि एव-' आपल्या शरीरांतच 'बिभर्ति-' पोसतो, पण 'तत्' तें रेत 'यदा-' ऋतुसमयीं जेव्हां स्त्रीगमनानें 'स्त्रीया-' स्त्रीगर्भाशयांत 'सिञ्चति' सिंपतो, 'अथ-' तेव्हां तो पुरुष 'एनत्' दुसऱ्या जीवानें ज्यांत प्रवेश केला आहे असें रेतोरूप शरीर 'जनयति-' उत्पन्न करतो. 'तत्' तें-रेतोरूपानें पितृशरीरांतून बाहेर पडणें, 'अस्य' या रेतांत प्रविष्ट झालेल्या संसारी जीवाचें 'प्रथम जन्म-' पहिलें जन्म आहे. त्याचे तीन आवसथ आहेत, असें जें वर म्हटलें होतें त्यांतील पितृशरीररूपी प्रथम आवसथापासून झाल्यामुळें तें त्याचें प्रथम जन्म होय १.

( स्त्रीशरीरांत प्रविष्ट झालेलें तें दुसऱ्या शरीरांतील रेत तिला शल्यादिकाप्रमाणें उपद्रव करील, अशी शंका येऊं नये म्हणून श्रुति म्हणते–)

तत्स्त्रिया आत्मभूयं गच्छति यथा स्वमङ्गं तथा तस्मादेनां न हिनस्ति ॥

अर्थ—'तत्' तें 'स्त्रिया-' त्या स्त्रीच्या 'आत्मभूय' स्वशरीरभावास 'गच्छति' प्राप्त होतें. 'यथा स्व अङ्ग तथा-' जसें हस्तादि स्वांग शरीराहून पृथक् नसतें तसें 'तस्मात्' तिच्या शरीराशीं एकता पावल्यामुळें 'एनां' त्या स्त्रीला तें 'न हिनस्ति-' मारीत नाहीं. पोटांत शिरलेल्या बाणादिकांच्या शल्याप्रमाणें तें तिला मारीत नाहीं.

( श्रुति त्या गर्भाच्या द्वारा स्त्री-पुरुषाचें परस्पर उपकारित्व सांगते–)

साऽस्यैतमात्मानमत्रगतं भावयति ॥ २ ॥

अर्थ—'सा-' गर्भ धारण करणारी स्त्री 'अत्रगत-' स्वशरीरांत प्रविष्ट झालेल्या 'अस्य' या पुरुषाच्या 'एत आत्मान' या पुत्ररूप आत्म्याचें 'भावयति' पालन करते. त्या गर्भाला प्रतिकूल असलेल्या आहारादिकांचा त्याग करून अनुकूल आहार विहारादिकांच्या योगानें पुष्ट करते २

सा भावयित्री भावयितव्या भवति ।

अर्थ—'सा भावयित्री-' ती गर्भाच्या पालनानें पुरुषाचेंच अप्रत्यक्षपणें

पालन करणारी होते. यास्तव 'भावयितव्या भवति-' पुरुषाकडून इष्ट अन्न-वस्त्र भूषणादिकांच्या योगानें तीही पालन केली जाण्यास योग्य होते.

तं स्त्री गर्भं बिभर्ति । सोऽग्र एव कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयति ॥

अर्थ—'तं गर्भं' त्या पुत्ररूप गर्भास 'स्त्री' ती माता नऊ महिने अतिशय कष्ट सोसून 'बिभर्ति-' आपल्या उदरांत धारण करते 'सः-' तो पिता 'अग्रे एव-' प्रसूतीच्या पूर्वीच निष्पन्न झालेल्या 'कुमारं' कुमारास 'जन्मनः अग्रे' प्रसूतीनंतर 'अधिभावयति-' शास्त्रीय जातकर्मादि संस्कारांच्या योगानें अधिक सस्कृत करतो.

स यत् कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयत्यात्मानमेव तद्भावयति । एषां लोकानां संतत्या एव सतता हीमे लोकाः । तदस्य द्वितीयं जन्म ॥ ३ ॥

अर्थ—'सः-' पिता 'जन्मनः अग्रे कुमारं अधिभावयति इति यत्-' जन्म होताच पुत्राचें संस्काराच्या योगानें जें पोषण करतो 'तत् आत्मानं एव भावयति' तें तो आपलेंच अधिभावन (अधिक संस्करण) करतो. कशाकरितां? 'एषां लोकानां संतत्यै' या पुत्रपौत्रादिक लोकांच्या अविच्छेदाकरितां—पुत्रपौत्रादिपरंपरा तुटूं नये, म्हणून, 'एवं हि-' अशा रीतीनें म्हणजे आपापल्या पुत्राचे संस्कार विध्यानें करणें या पद्धतीनें 'इमे लोकाः संतताः-' हे लोक अविच्छिन्न होतात. 'तत् अस्य द्वितीयं जन्म-' तें याचें दुसरें जन्म आहे. आईच्या उदरांतून बाहेर येणें, हा संसारी जीवाचा दुसरा जन्म आहे ३.

सोऽस्यायमात्मा पुण्येभ्यः कर्मभ्यः प्रतिधीयतेऽथास्यायमितर आत्मा कृतकृत्यो वयोगतः प्रैति स इतः प्रयन्नेव पुनर्जायते तदस्य तृतीयं जन्म ॥ ४ ॥

अर्थ— 'अस्य-' या पित्याचा 'सः अयं आत्मा-' तो हा पुत्ररूप देह 'पुण्येभ्यः कर्मभ्यः-' शास्त्रोक्त कर्में करण्याकरितां 'प्रतिधीयते' आपला प्रतिनिधि, या रूपानें गृहांत—गृहस्थाश्रमांत स्थापिला जातो. पिता त्या आपल्या देहाला शास्त्रोक्त कर्माचें अनुष्ठान करण्याकरितां गृहस्थाश्रमांत ठेवून 'अथ-' त्यानंतर 'अस्य अयं इतरः आत्मा-' या पित्याचा हा दुसरा वृद्ध देह 'कृतकृत्यः-' कृतकृत्य होतसाता म्हणजे या जन्मांत जेवढी म्हणून कार्यें करावयाचीं होतीं तीं सर्व करून 'वयोगतः-' पूर्व कर्मानें संपादन केलेल्या आयुष्यानें हीन झाला असतां 'प्रैति' मरतो. 'सः-' तो वृद्ध पिता 'इतः

प्रयन् एव-' या जरठ देहांतून निघत असतांनाच स्वकर्मानुसार स्वर्गांत, नरकांत किंवा मनुष्यलोकांत 'पुनः जायते-' पुनरपि जन्म घेतो. भावनारूपानें पुढच्या शरीराचा स्वीकार करूनच तो हें शरीर सोडतो. 'तत् अस्य तृतीयं जन्म-' तेंच या संसारी आत्म्याचें तिसरें जन्म होय ४.

(या निंद्य संसाराची निवृत्ति ज्ञानावांचून होत नाहीं, याविषयीं श्रुति एका मंत्राचा उल्लेख करिते.–)

तदुक्तमृषिणा 'गर्भे नु सन्नन्वेषामवेदमहं देवाना जनिमानि विश्वा ॥ शतं मा पुर आयसीररक्षन्नधः श्येनो जवसा निरदीयमिति ॥' गर्भ एवैतच्छयानो वामदेव एवमुवाच ॥ ५ ॥

अर्थ—वरील चार वाक्यांत संसाराचें कष्टत्व वर्णिलें आहे व यापुढें तत्त्वज्ञानानेंच त्याची निवृत्ति होते असें सांगावयाचें आहे. यास्तव 'तत्-' तें दोन्ही अर्थजात 'ऋषिणा-' एका मंत्रानें 'उक्त' सांगितलें आहे. 'अहं-' मी वामदेव नांवाचा मुनि 'गर्भे नु सन्-' मातेच्या गर्भांत स्थित होत्साता 'एषां देवानां-' या अग्नि-वायु आदित्यादिदेवांचे 'विश्वा जनिमानि' सर्व जन्म 'अनु अवेदम्-' अनुक्रमानें जाणता झालों. म्हणजे मुखापासून वाणी झाली, वाणीपासून अग्नि झाला, इत्यादि श्रुतींत वर्णिलेले व परमात्म्यानें संपादन केलेले देवांचे जन्म मीं यथार्थतः जाणले. उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें मला आत्मज्ञान झालें, असा याचा भावार्थ. 'अधः-' हें ज्ञान झाल्यानंतर 'मा' मज वामदेवाला 'आयसीः-' लोखंडाच्या शृंखलांसारखीं 'शतं पुरः-' शेकडों शरीररूपी नगरें 'अरक्षन्-' राखीत होतीं, म्हणजे कारागारांत टाकलेल्या एकाद्या प्रबळ चोराला त्याच्या हात-पायांतील शृंखला जशा पळून जाऊं देत नाहींत, त्याचें पलायनापासून निवारण करितात, त्याप्रमाणें शतसंख्येनें उपलक्षित होणारीं अनंत शरीरें मीं मुक्त न व्हावें म्हणून माझें रक्षण करीत होतीं. 'श्येनः जवसा निरदीयम्' पण आतां गुरु शास्त्रादिकांच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या तत्त्वज्ञानानें मी या अविद्यामय संसारांतून, श्येन पक्षी जसा जाळें तोडून वेगानें त्यांतून जातो त्याप्रमाणें, त्वरेनें निघालों आहें. 'इति-' हा शेवटचा शब्द मंत्र समाप्त झाला, हें सुचविण्यासाठीं आहे. मंत्रांत 'अहं' असा ज्याचा उल्लेख केला आहे तो 'वामदेवः' वामदेव 'गर्भे एव शयानः सन्-' मातेच्या गर्भांत शयन करीत असतांनाच 'एतद् एवं उवाच-' हें असें बोलला ५.

शिरला ) या वाक्यांत दुसराच कोणी सोपाधिक आत्मा सांगितला आहे. पण 'वयं-' आम्ही प्रतिदिवशीं 'आत्मा इति-' 'आत्मा आत्मा' असें म्हणून 'य-' ज्यास ( ज्याची ) 'उपास्महे-'उपासितों ( उपासना करतों ) 'सः अयं कः-' तो हा कोण, म्हणजे तो सोपाधिक कीं निरुपाधिक ? उपासना म्हणजे निरंतर तत्परायण होऊन सर्व व्यवहार करणें. ( अर्थात् जे विद्यापरायण होऊन अहोरात्र विवेकरिता सर्व व्यवहार करितात ते विद्योपासक; जे धनाकरिता सर्व व्यापार करितात ते धनोपासक; रुद्रोपासक, विष्णूपासक, शिवोपासक, इत्यादि दुसरेही शब्द अशाच प्रकारचे आहेत. ' मी जातों, मी येतों, माझा हा देह, माझें हें गृह, ' अशा रीतीनें आम्ही निरंतर आदरानें आत्मव्यवहार करीत असतों. तेव्हां तो आत्मा कोणता ? तसेंच 'आत्माच पूर्वी होता, ' या श्रुतींत सांगितलेला आत्मा तोच किंवा त्याहून कोणी निराळा आहे ? म्हणजे जगाच्या पूर्वी जो होता तो सोपाधिक व निरुपाधिक यांतील कोणता ?) १.

( अशा प्रकारचा विचार करणें फारसें बरगें नाहीं. कारण आत्मा कोणता, हें केवळ श्रुतिगम्य असल्यामुळें विचारावाचून त्याचा निश्चय होणें शक्य नसतें. पण ' कोऽयमात्मा ' म्हणजे हा आत्मा कोण, अशा प्रकारचा विचार युक्त नव्हे. कारण तो 'अहं ' म्हणजे मी या अनुभवानें ज्याला त्याला प्रतीत होणारा आहे, अशी कोणी शंका घेईल, म्हणून हें पुढील श्रुतिवाक्य विचाराला कारण होणारा अनेक कोट्यात्मक संशयच अगोदर दाखवितें—)

कतरः स आत्मा। येन वा पश्यति येन वा शृणोति येन वा गन्धानाजिघ्रति । येन वा वाचं व्याकरोति येन वा स्वादु चास्वादु च विजानाति यदेतद्धृदयं मनश्चैतत्संज्ञानमाज्ञानं विज्ञानं प्रज्ञानं मेधा दृष्टिर्धृतिर्मतिर्मनीषा जूतिः स्मृतिः संकल्पः क्रतुरसुः कामो वश इति ॥ २ ॥

अर्थ—अहो, पण ' कतरः स आत्मा' म्हणजे तो आत्मा कोणता ? अहंप्रत्ययगम्य चैतन्यरूप आत्मा आहे, अशी जरी सामान्यतः प्रसिद्धि असली तरी तो विशेषतः कोणता, याविषयीं प्रत्येकाला संशयच असतो. कारण उघड्या जागेंत जलानें भरून ठेवलेल्या अनेक पात्रांतील प्रत्येकांत सूर्यादिकांचें प्रतिबिंब जसें पडतें, त्याप्रमाणें सर्व बाह्य व आंतर इंद्रियांत चैतन्य पृथक् पृथक् व्यक्त होतें. तेव्हां देह-इंद्रियास मी म्हणणारा लौकिक पुरुष 'येन वा पश्यति-' ज्या चाक्षुष चैतन्यानें—चक्षूरूपें अभिव्यक्त झालेल्या

चैतन्यानें रूप पाहतो तें चैतन्य आत्मा कीं तो ' येन वा शृणोति-' ज्या श्रोत्रांत अभिव्यक्त झालेल्या चैतन्यानें शब्द ऐकतो तें चैतन्य आत्मा कीं 'येन वा गन्धानाजिघ्रति-' ज्याच्या योगानें गंधाचें ग्रहण करतो, वास घेतो, तो आत्मा कीं ' येन वा वाचं व्याकरोति ' ज्याच्या योगानें वाणीला व्यक्त करतो, उच्चारितो, व ' स्वादु च अस्वादु च विजानाति-' गोड व कडू इत्यादि जाणतो तो आत्मा ? कीं 'यत् एतद् हृदयं ' जी ही बुद्धि तो आत्मा ? कारण ती आत्म्याच्या ठिकाणीं कर्तृत्वादिकांचा आरोप करण्याचें साधन आहे म्हणून तिला अन्तःकरण–अन्तर साधन म्हणतात कीं ' मनः च एतत् ' हें सकल्पविकल्पात्मक मन आत्मा आहे ? कीं ' संज्ञानं-' वृत्तिरूपानें परिणत झालेलें मन, ' आज्ञानं-' आज्ञप्ति, ईश्वरभाव; ' विज्ञानं-' हें पाहून चांगलें आहे इत्यादि विवेक, ' प्रज्ञानं ' ग्रन्थार्थादिकांविषयींचा बुद्धिविकास, ' मेधा ' धारणाशक्ति, ' दृष्टिः-' नेत्रांच्या द्वारा रूपाच्या ज्ञानास कारण होणारी मनोवृत्ति,' धृतिः-' आपत्ति आली असतांही तिला न जुमानणें, तिची विशेष गणना न करणें, ' मतिः-' मनन–राजकार्यादिकांचा विचार ' मनीषा-' त्या विचारांतील स्वातंत्र्य, ' जूतिः-' अनेक कार्ये उपस्थित झालीं असता मनाची व्यग्रता, अथवा रोगादिकांमुळें मनाला होणारें दुःख, ' स्मृतिः ' अनुभविलेल्या वस्तूचें स्मरण, ' संकल्पः-' वाईट वस्तूलाही चांगली समजणें, ' क्रतुः ' मी हें अवश्य करीन असा निश्चय, 'असुः-' जीवनास निमित्त होणारी प्राणवृत्ति, 'कामः ' समीप नसलेल्या विषयांची आकांक्षा, ' वशः ' स्त्रीसंसर्गादिकांविषयींचा अभिलाष कीं ' इति-' अशाच प्रकारच्या दुसऱ्याही ज्या अनेक सात्त्विक,राजस, तामस वृत्ती त्या सर्वांमध्यें अभिव्यक्त होणारें चैतन्य हा आत्मा ? असा संशय येतो. म्हणजे या संशयाच्या एक-दोनच कोटी नाहींत तर अनेक कोटी आहेत, तेव्हां आतां यांचा निर्णय कसा करावयाचा ? २.

(वरील संशयाचा निर्णय करण्याकरितां हें श्रुतीचें तिसरें वाक्य आहे—
सर्वाण्येवैतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवन्ति ॥ ३ ॥

अर्थ—'सर्वाणि एव एतानि-' ज्याच्या योगानें पाहतो येथपासून क्रतु, असु, काम व वश येथपर्यंत ज्या कार्यांचा निर्देश केला आहे तीं सर्व 'प्रज्ञानस्य' प्रज्ञानाचीं, त्या त्या वृत्तिरूप उपाधींच्या द्वारा उपलक्षित होणाऱ्या प्रज्ञानार्थी–शुद्ध चैतन्याचीं 'नामधेयानि-' नांवें 'भवन्ति-' आहेत. (चक्षुः, श्रोत्र,

हृदय, संज्ञान इत्यादि सर्व परिणाम आहेत. अतःकरणाच्या परिणामालाच वृत्ति म्हणतात. वृत्तीमध्यें चैतन्याचा आभास व्यक्त होतो. पण तो जरी निरनिराळ्या कार्यांतील आकाशाप्रमाणें पृथक् पृथक् भासला, तरी वस्तुतः पृथक् नाहीं. वास्तव चक्षुः, श्रोत्र, इत्यादि सर्व शक्ति हीं चैतन्याचींच नांवें आहेत. त्या चैतन्यालाच येथें प्रज्ञान म्हटलें आहे. प्रज्ञान म्हणजे प्रकृष्ट ज्ञान. प्रकृष्ट म्हणजे सर्वांत अधिक. परंतु निराकार ज्ञानामध्यें आधिक्य व न्यूनत्व कसें असणार ? व्यवहारांतही ' हा याच्याहून अधिक ज्ञानी आहे व हा कमी ज्ञानी आहे, ' असें जें म्हणतात तें ज्ञानाचें प्रमाण अधिक किंवा उणें आहे म्हणून नव्हे, तर एकाच्या ज्ञानाचे ज्ञातव्य विषय दुसऱ्याच्या ज्ञातव्यांहून कांहीं अधिक किंवा न्यून असतात, म्हणूनच होय ज्ञान हें स्वतः प्रकृष्टच आहे. वास्तव त्याला ' प्र ज्ञान ' असें म्हणण्याचें वास्तविक कारणच नाहीं. पण अधम उपाधींच्या संसर्गामुळें तें निकृष्टसें भासतें आणि उपाधि जशी उत्तरोत्तर उत्कृष्ट होत जाईल, तसें तसें त्याचें स्वरूपही उत्कृष्ट भासूं लागतें. पण या दोन्ही प्रकारच्या—म्हणजे उत्तमाधम—उपाधींचा त्याग करून त्यांविरून उपलक्षित होणाऱ्या चैतन्याला विवेकी पुरुष जेव्हां पृथक् जाणतो, तेव्हां उपाधिकृत अपकर्षाचा अभाव होतो आणि औपाधिक अपकर्ष भासेनासा होणें हाच त्याचा स्वाभाविक प्रकर्ष होय. ) ३

( या खंडाच्या आरंभीं ' कोऽयमात्मा ' व ' कतरः स आत्मा ' असे दोन प्रश्न निघाले होते. त्यांतील पहिला ' त्वंपदार्थाच्या' विचाराविषयीं असून दुसरा ' तत्पदार्थाच्या ' विचाराविषयीं होता. त्यांतील पहिल्या प्रश्नाचा निर्णय ' प्रज्ञाननांवाचें निरुपाधिक साक्षिचैतन्यच आत्मा आहे ' असा केला. म्हणजेच त्वंपदाच्या अर्थाचा विचार संपला. आतां दुसऱ्या प्रश्नाचा निर्णय पुढील श्रुतिवाक्यांत सांगितला आहे. त्वंपद म्हणजे जीव व तत्पद म्हणजे ईश्वर, परमात्मा ) —

एष ब्रह्मैष इन्द्र एष प्रजापतिरेते सर्वे देवाः । इमानि च पञ्च भूतानि पृथिवी वायुराकाश आपो ज्योतींषीत्येतानीमानि च क्षुद्रमिश्राणीव बीजानीतराणि चेतराणि चाण्डजानि च जारुजानि च स्वेदजानि चोद्भिज्जानि चाश्वा गावः पुरुषा हस्तिनो यत्किंचेदं प्राणि जङ्गमं च पतत्रि च यच्च स्थावरं सर्वं तत्प्रज्ञानेत्रम् ॥ ४ ॥

अर्थ—ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत जें जगत् आहे तें सर्व प्रज्ञानेत्र आहे.

प्रज्ञा ह्मणजे निरुपाधिक ज्ञान. तेंच नेत्र ह्मणजे ज्याच्याकडून सर्व जगत् नेलें जातें तें. ह्मणजे सृष्टि, स्थिति व प्रलय यांचें मूलकारण. अर्थात् सर्व जगाचें मूलकारण असें जें चैतन्य तेंच 'कतरः स आत्मा' या प्रश्नाचें उत्तर आहे. तो आत्मा आहे. असा निर्णय करावा. वस्तुतः प्रज्ञान हा शब्द नपुंसकलिंगी आहे. तथापि त्याचा येथें) 'एष ब्रह्मा' असा पुल्लिंगी निर्देश केला आहे. यास्तव त्यावरून पहिला शरीरी हिरण्यगर्भ घ्यावा. कारण 'हिरण्यगर्भः समवर्ततात्रे-' ह्मणजे सृष्टीच्या पूर्वी हिरण्यगर्भ होता, असें सांगणारें शास्त्र आहे. हिरण्यगर्भ सर्व लिंगशरीरांच्या समष्टीचा अभिमानी आहे. ज्ञान व क्रिया या त्याच्या शक्ती आहेत. पण त्याचेंही निरुपाधिक रूप प्रज्ञानच आहे. असो, 'एषः' तो 'इंद्रः' (देवांचा राजा, प्राण) तोच प्रजापति (पूर्वोक्त इंद्रियें व त्यांच्या अभिमानी देवता, हेंच ज्याचें स्वरूप आहे, असा विराट्देह,) हेच सर्व देव (वाक्, त्वक् इत्यादि इंद्रियांवर अनुग्रह करणारे अग्नि, वायु इत्यादि), हींच पृथिवी, वायु, आकाश, आप व तेज या नांवांनीं प्रसिद्ध असलेलीं पांच भूतें, 'इमानि च क्षुद्रमिश्राणीव बीजानि-' व हीं दुसरीं मशक, पिपीलिकादि (डांस, माशा, मुंग्या इत्यादि) क्षुद्र शरीरांनीं मिश्रित झालेलीं बीजें. बीजें म्हणजे कारणें; मनुष्यापासून मुंगीपर्यंत सर्व प्राण्यांचे देह स्वतः पंचभूतांच्या कार्यरूप असून आपल्या जातीच्या दुसऱ्या देहांचें बीज होतात. म्हणून त्यांना येथें बीज असें म्हटलें आहे. तीं बीजें परस्पर विरुद्धलक्षणांच्या अनेक भेदांनीं युक्त आहेत, तीं अनेक जातींचीं आहेत, हें 'इतराणि चेतराणि च' या पदांनीं सांगितलें आहे. त्यांचाच आतां नामनिर्देश करितात—पक्षि-सर्पादिक अण्डज, मनुष्य, गायी इत्यादि जारुज-जरायुज, कृमि-दंश इत्यादि स्वेदज, वृक्ष गुल्मादि उद्भिज्ज. जरायुजांतीलच घोडे, बैल, पुरुष, हत्ती; आणि सांगितलेल्या व न सांगितलेल्या सर्वांचा संक्षेपतः संग्रह करण्याकरितां 'यत्किंचेदं॰' इत्यादि पुढील सर्व वाक्य आहे आणि दुसरें हें सर्व जें म्हणून प्राणिजात ह्मणजे जंगम (जाणारें येणारें), पतत्रि (पक्षयुक्त) व स्थावर (वृक्षादि, एकाच जागीं राहून स्वकर्मफलभोग घेणारें) आहे तें सर्व प्रज्ञानेत्र आहे. (प्रज्ञानेत्र या शब्दाचा अर्थ आरंभीं सांगितलाच आहे.) ४.

(वर प्रज्ञानेत्र या शब्दानें प्रज्ञानात्मा जगाच्या उत्पत्त्यादिकाचें कारणच आहे, असें संक्षेपतः सांगितलें. आतां तेंच थोड्या अधिक विस्तारानें श्रुति सांगते—)

प्रज्ञाने प्रतिष्ठितं प्रज्ञानेत्रो लोकः प्रज्ञा प्रतिष्ठा ॥ ५ ॥

अर्थ—तें सर्व जगत् 'प्रज्ञाने-'पूर्वोक्त प्रज्ञानाचे ठिकाणीं, निरुपाधिक चैतन्यावर 'प्रतिष्ठितं-' आरोपिलेलें आहे. 'प्रति' म्हणजे विपरीतपणें 'स्थितं' म्हणजे राहिलेलें. अर्थात् दोरीवर जसा सापाचा आरोप तसाच प्रज्ञानावर जगाचा आरोप झाला आहे. आरोपित पदार्थ नेहमीं अधिष्ठानावर राहतो, हें प्रसिद्ध आहे. 'जगत् प्रज्ञानांत प्रतिष्ठित आहे' या वाक्यानें प्रज्ञान जगाच्या उत्पत्तीचें निमित्त आहे, हें सांगितलें. 'लोकः-' म्हणजे सर्व प्राणिसमूह 'प्रज्ञानेत्र' आहे. म्हणजे प्रज्ञा-चैतन्य हेंच ज्याचें नेत्र-व्यवहारकारण आहे, असा आहे, प्राणिसमूहाच्या सर्व व्यवहाराचें कारण प्रज्ञान आहे, असा याचा भावार्थ. या वाक्यानें प्रज्ञान जगाच्या स्थितीचें निमित्त आहे, असें सुचविलें. 'प्रज्ञा-' चैतन्य 'प्रतिष्ठा-' लयस्थान आहे. (सर्व जगत् या प्रज्ञेंत विलीन होतें-ज्याचा समय आला असतां आपला स्थूल आकार सोडून तें सूक्ष्मरूप होतें. सूक्ष्मरूपालाच बीजावस्था, अथवा शक्तिरूपानें राहणें, असें म्हणतात. जगत् आपला स्थूलभाव सोडून शक्तिरूपानें प्रज्ञानामध्यें राहतें. वस्तुतः प्रज्ञानांत राहतें, या म्हणण्यांत कांहीं विशेष अर्थच नाहीं. कारण प्रज्ञान सर्वांचाच आधार आहे. यास्तव स्थूलसृष्टीही सांतच असते. परंतु स्थूलानें आपल्या आकाराचा त्याग केल्यावर तें जातें कोठें? अशी शंका राहूं नये, म्हणून येथें-तें स्थूल जगत् पूर्वी-स्थितिसमयीं जसें प्रज्ञानाच्या आधारावर राहतें, तसेंच आतां स्थूलभाव सोडून शक्तिरूप झाल्यावरही तें त्याच्याच आधारानें राहतें; त्याला सोडून कोठें जात नाहीं, असें सांगितलें आहे. यावरून प्रज्ञानच संहाराचें कारण आहे, असें ठरतें. तैत्तिरीयशाखेच्या उपनिषदांत 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते॰' इत्यादि जें ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगितलें आहे, त्याचाच या वाक्यांत उल्लेख केला आहे, असें भासतें. ) ५.

( येथेंप्रमाणें त्वंपद जीव व तत्पद ईश्वर-परमात्मा यांच्या अर्थांचें शोधन वरील दोन प्रकारच्या विचारानें केलें. आतां श्रुति महावाक्यानें 'तत्' व 'त्वं' या पदांच्या अर्थांचें म्हणजे प्रज्ञानाचें ऐक्य दाखविते.—)

प्रज्ञानं ब्रह्म ॥ ६ ॥

अर्थ—'हीं सर्व प्रज्ञानाचीं नांवें आहेत' या तिसऱ्या वाक्यानें देह, इंद्रियें, मन ब्रह्मादिकांच्या साक्षिभूत व त्वंपदार्थरूप असा ज्या प्रज्ञानाचा

निर्णय केला आहे तें 'प्रज्ञान' व 'हा ब्रह्मा, हा इंद्र,' इत्यादि चवथ्या वाक्यानें जग कारणत्वानें ज्याचा निर्णय केला आहे तें 'ब्रह्म' या दोघांमध्यें थोडासुद्धां भेद नाहीं (तर 'अहं' या प्रत्ययानें गम्य होणें, या आकारानें जव्हां तें विवक्षित असतें, तेव्हां त्याला जीव असें म्हणतात व शास्त्राचें प्रतिपाद्य या आकारानें जेव्हां तें विवक्षित असतें, तेव्हां त्यालाच ब्रह्म म्हणतात. म्हणजे केवळ व्यवहाराचा भेद, तत्त्वाचा भेद नाहीं पण असें जर म्हटलें तर त्यावर पुनरुक्ति दोष येईल, असेंही समजूं नये. कारण त्वंपदार्थाचें अब्रह्मत्व व ब्रह्माचें परोक्ष व व्यावृत्त करावयाचें आहे म्हणजे त्वंपदार्थ—साक्षिचैतन्य आपल्या या शरीरांत मर्यादित झालेलें आहे, तें सर्व जगभर व्यापलेलें नाहीं, असें समजणें, हेंच अब्रह्मत्व, व श्रुतीनें ज्याला 'ब्रह्म' असें म्हटलें आहे, तें अपरोक्ष नाहीं, तर स्वर्गाप्रमाणेंच परोक्ष आहे, असें वाटणें, हेंच परोक्षत्व. पण श्रुतीला या दोन्ही समजुती घालवावयाच्या आहेत. कारण त्वंपदार्थाचें अब्रह्मत्व व तत्पदार्थाचें परोक्षत्व, हेंच परस्परांचा भेद करणारे आहेत वास्तव त्यांच्या निवृत्तीवांचून त्वंपदार्थ व तत्पदार्थ यांचें ऐक्य संभवत नाहीं. म्हणून 'प्रज्ञान ब्रह्म' आहे असें म्हणून, म्हणजेच त्या व्यावर्त्य [व्यावृत्ति करण्यास योग्य असलेल्या] अंशांचा बाध करून या वाक्यानें त्यांचें ऐक्य सांगितलें आहे. अर्थात् या दोन व्यावर्त्यांशांचा स्पष्ट बोध होण्यासाठीं 'प्रज्ञान व 'ब्रह्म' या दोन्ही पदांची आवश्यकता आहे ) ६.

( येणेंप्रमाणें चवथ्या अध्यायांतील अपवादप्रकरणानें संक्षेपतः सिद्ध झालेल्या आत्मतत्त्वाचें या अध्यायांत 'तत्त्व' पदार्थांच्या विचाराच्या द्वारा सविस्तर वर्णन केलें. आतां श्रुति त्या तत्त्वज्ञानाचें फळ सांगते—)

स एतेन प्रज्ञेनात्मनास्माल्लोकादुत्क्रम्यामुष्मिन्स्वर्गे लोके सर्वान्कामानाप्त्वाऽमृतः समभवत्समभवत् ॥ ७ ॥

अर्थ—जो पुरुष 'प्रज्ञान ब्रह्म' असें जाणतो 'सः' तो, 'एतेन प्रज्ञेन आत्मना' या चैतन्यस्वरूपानें स्वतः आविर्भूत होतो. त्यानंतर तो विदेहमुक्तीस प्राप्त होतो, असें श्रुति सांगते—'अस्मात् लोकात्' या लोकापासून, या शरीरापासून 'उत्क्रम्य' निघून—सर्व संसारबंधापासून सुटून 'अमुष्मिन् स्वर्गे लोके' इंद्रियगोचर नसलेल्या स्वर्ग लोकांत म्हणजे तत्त्वज्ञानानें प्रकट केलेल्या स्वप्रकाश स्वरूपांत 'सर्वान् कामान् आप्त्वा' संपूर्ण व सर्व आनंदास प्राप्त होऊन 'अमृतः' अमृत 'समभवत्' झाला. असें

जो जाणतो तो मरणधर्मशून्य होतो असा याचा भावार्थ. हा सहावा अध्याय संपला हें सुचविण्यासाठीं 'समभवत्' या पदाची द्विरुक्ति केली आहे. ७(६)

---

वाङ्मे मनसि प्रतिष्ठिता मनो मे वाचि प्रतिष्ठितमाविराविर्म एधि ॥ वेदस्य म आणी स्थः श्रुतं मे मा प्रहासीरनेनाधीतेनाऽहोरात्रान्संदधाम्यृतं वदिष्यामि ॥ सत्यं वदिष्यामि ॥ तन्मामवतु ॥ तद्वक्तारमवत्ववतु मामवतु वक्तारमवतु वक्तारम् ॥७॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

अर्थ—'मे-' माझी तत्त्वविद्याप्रतिपादक ग्रन्थाच्या पाठांत प्रवृत्त झालेली 'वाक्-' वाणी 'मनसि-' मनामध्यें 'प्रतिष्ठिता-' प्रतिष्ठित झाली आहे. म्हणजे मनाला जो जो शब्द बोलावा असें वाटतें तो तोच ती उच्चारते. 'मे-' माझें 'मनः-' मन 'वाचि-' वाणीमध्यें 'प्रतिष्ठितं-' प्रतिष्ठित झालें आहे. [म्हणजे विद्याप्रतिपादक, या हेतूनें उच्चारण्यास योग्य असलेले जेवढे म्हणून शब्द आहेत तेच उच्चारण्याची इच्छा मन करतें. याप्रमाणें परस्परांकडून अनुगृहीत झालेली वाणी व मन आत्मज्ञानोपयोगी ग्रंथाचा निश्चय पूर्णपणें करण्यास समर्थ होतात. कारण मन सावधान नसलें तर पुरुष निजलेल्या किंवा वेड्या मनुष्याच्या बरळण्याप्रमाणें कांहीं तरी असंगत बोलेल; त्याचप्रमाणें वाणी पटु नसल्यास स्खलन पावणाऱ्या तिला सर्व विवक्षित अर्थ पूर्णपणें उच्चारतां येणार नाहीं. यास्तव त्या दोघांचें अन्योन्य आनुकूल्य असो, अशी येथें प्रार्थना केली जात आहे.] 'आविः' या शब्दानें स्वप्रकाशब्रह्मचैतन्य सांगितलें जातें. 'प्रज्ञान' या शब्दानें त्याचा या उपनिषदांत व्यवहार केलेला असल्यामुळें त्याला आविर्भूतरूपत्व आहे. अशा प्रकारच्या हे 'आविः-' प्रकाशरूप आत्मन्, 'मे-' मजकरितां 'आविः एधि-' प्रकट हो. अविद्येचें आवरण दूर सारून प्रकट हो. हे वाणि व हे मना, 'मे-' मजसाठीं 'वेदस्य-' तत्त्वप्रतिपादक ग्रंथाच्या 'आणी स्थः' आणण्यास समर्थ व्हा. वेदोक्त तत्त्वज्ञानाला मजपाशीं आणण्यास, मला तें कळेल असें करण्यास समर्थ व्हा. 'मे श्रुतं-' मी श्रोत्रानें जाणलेला ग्रंथ व त्याचा अर्थ 'मा प्रहासीः-' माझा त्याग न करो. मला त्याचें विस्मरण न होवो. 'अनेन अधीतेन' या अध्ययन केलेल्या ग्रंथानें (विस्मरणरहित ग्रंथानें) 'अहोरात्रान्-' रात्र व दिवस, यांस 'संदधामि-' संयुक्त करीन. म्हणजे मी आळस सोडून अहोरात्र त्याचा पाठ करीन आणि ह्या ग्रंथाचा पाठ केला असतां 'ऋतं वदिष्यामि-' परमार्थभूत वस्तु बोलेन. म्हणजे माझ्या तोंडून

विपरीत अर्थाचा उच्चार कधींही न होवो. तसेंच ' सत्यं वदिष्यामि ' सत्य बोलेन. ऋत ह्मणजे मानस सत्य व सत्य म्हणजे वाचिक सत्य. मनानें परमार्थतत्त्वाचा विचार करून वाणीनें त्याचाच उच्चार करीन. 'तत् मां अवतु-' तें मजकडून बोललें जाणारें ब्रह्मतत्त्व मज शिष्याचें यथार्थ बोधानें पालन करो. 'तत् वक्तारं अवतु-' तसेंच तें ब्रह्मतत्व वक्त्याचें-आचार्याचें रक्षण करो. आचार्याला बोध करण्याचें सामर्थ्य देऊन त्याचें पालन करो. ' अवतु मां-' माझें अवन-रक्षण करो. ' अवतु वक्तारं-' वक्त्याचें रक्षण करो. ही पुनरुक्ति फलाविषयीं आहे. म्हणजे पूर्वी साधनकाळीं शिष्य व आचार्य यांच्या पालनाविषयीं प्रार्थना केली, आता फलकाळींही त्याविषयींच प्रार्थना केली जात आहे. त्यांतील शिष्याचें अविद्याकार्यनिवृत्ति हें फळ आहे व आचार्याचें तशाप्रकारच्या उत्तम शिष्याला पाहून विद्यासंप्रदायाची प्रवृत्ति झाल्यामुळें होणारा संतोष, हें फळ आहे. 'अवतु वक्तार-' या पदाचा अभ्यास ( आवृत्ति ) सातव्या अध्यायाच्या समाप्तीकरितां व दुसऱ्या आरण्यकाच्या समाप्तीकरितां केला आहे. १ या मन्त्राच्या पाठानें विद्या उत्पन्न होण्यापूर्वी विद्येला प्रतिबंध करणाऱ्या विघ्नाचा परिहार केला जातो व विद्योत्पत्तीनंतर तत्त्वाविषयीं विपरीत भावना, असंभावना इत्यादिकांस उत्पन्न करण्याऱ्या विघ्नाचा परिहार केला जातो. 'शांतिः शांतिः शांतिः' असा त्रिवार उच्चार आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक तापाची शांति व्हावी म्हणून केला आहे.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत सार्थ ऐतरेयोपनिषद् समाप्त झालें.

श्रीकृष्णार्पणमस्तु

श्री

# ॐ ऐतरेयोपनिषद्भाष्यार्थ.

## ( उपोद्घात )

श्रीगणेशाय नमः । ॐतत्सद्ब्रह्मणे नमः । श्रीशंकराचार्यप्रभृति वेदान्त-संप्रदायप्रवर्तक आचार्यांचें हृद्गत अनुसंधान करून प्रस्थानत्रयभाष्यार्थ ब्रह्मविद्या-जिज्ञासूंना अनायासानें अवगत व्हावा म्हणून ऋग्वेदाच्या उपनिषदावरील आचार्यभाष्याचा स्पष्ट शब्दशः अर्थ आरंभितों

### १ केवळ आत्मविद्येच्या प्रतिपादनाचा उचित अवसर.

( ' आत्मा वा इदमग्र आसीत् ' इत्यादि ( ऐतरेय ब्राह्मण, आरण्यकांड, दुसरें आरण्यक, अध्याय ४, ५ व ६ ) तीन अध्यायांत केवळ आत्मविद्येचें प्रतिपादन केलें आहे तिच्या प्रतिपादनाचा हाच योग्य काल व हेंच योग्य स्थान आहे, हें सुचविण्यासाठीं भाष्यकार मागें होऊन गेलेल्या प्रकरणाचा परामर्ष ( विचार ) करितात " **परिसमाप्तं कर्म सहापरब्रह्मविषयविज्ञानेन ।** " अन्वय –अपरब्रह्मविषयविज्ञानेन सह कर्म परिसमाप्तं । अर्थ–अपरब्रह्म म्हणजे कार्यब्रह्म–हिरण्यगर्भ. तद्विषयक विज्ञान म्हणजे कार्यब्रह्म ज्याचा विषय आहे अशी उपासना ( कार्य ब्रह्माची उपासना ). त्या उपासनेसह कर्म परिसमाप्त झालें. परिसमाप्त म्ह सर्व

---

टीपः–१ या भाष्यार्थांत आरंभीं ठळक अक्षरांनीं अनुक्रमांकासह विषय दाखविला आहे " " अशा अवतरण चिह्नांत जाड अक्षरांनीं दिलेलें आचार्यांचें भाष्य आहे. ज्या वाक्याचा दूरान्वय असेल त्याचा अन्वय लागलाच भाष्यापुढें दिला आहे जेथें अन्वय सरळ असेल तेथें नुसता अर्थच दिला आहे ( ) अशा कंसांत आनंदगिरींच्या टीकेच्या अनुरोधानें स्पष्टीकरण केलें आहे. सर्व प्रस्थानत्रयभाष्यांत हाच क्रम राहील.

प्रकार समाप्त झाला आता त्यातील काहीं उरलें नाहीं ( पण हें तुम्हाला कसें समजलें, असें कोणी विचारील म्हणून भाष्यकार ' त्यान्या फलाचा उपसहार केला आहे त्यावरून,' असें उत्तर देतात ) "सैषा कर्मणो ज्ञानसहितस्य परा गतिरुक्थविज्ञानद्वारेणोपसहृता।" अन्वय –ज्ञानसहितस्य कर्मण सा एषा परा गति उक्थविज्ञानद्वारेण उपसहृता। अर्थ–ज्ञानसहित ( उपासनायुक्त ) कर्माची ती ही परा गति उक्थविज्ञानान्या द्वारा उपसहृत केली ( *परा गति म्ह प्राप्य फल उपासनायुक्त कर्मांच्या परम फलाचा उपसहार उक्थ-उपासनेच्या द्वारा केला आहे उक्थ म्हणजे प्राण,* त्याची उपासना केली असता, ' तो प्राण मी आहें,' अशी दृढभावना केली असता देवताच्या स्वरूपात लय पावणे, हे फळ मिळतें, असें सागून पूर्वी कर्मफलाचा उपसहार केला आहे. तो उपसहारच मूळ वचनें देऊन दाखवितात–) "एतत्सत्य ब्रह्म प्राणाख्य।" अन्वय –एतत प्राणाख्य सत्य ब्रह्म। अर्थ–हें प्राणसज्ञक सत्य ब्रह्म आहे ( त्यात सर्व भोज्यानें युक्त असलेला अध्यात्म व अधिदैव प्राण सत्य व एक–ब्रह्म या शब्दाचा वाच्य होतो. असें म्हणून या वाक्यानें प्राणाच्या स्वरूपाचा उपसहार केला आहे भोज्य म्ह खाण्यास योग्य अन्नादि विषयजात **अध्यात्म**–शरीरसबधी, अधिदैव–देवतासबधी. वाच्य म्हणजे शब्दान बोलता येण्यासारखा अर्थ तात्पर्य, सर्व भोज्याशी सयुक्त झालेला अध्यात्म व अधिदैव प्राण सत्य व एक या शब्दाचा वाच्य–अर्थ होतो, असें म्हणून या वाक्यानें प्राणाच्या स्वरूपाचा उपसहार केला आहे )

( आता या दुसऱ्या वाक्यानें प्राण एकच आहे, असें सागितलें आहे, असे भाष्यकार सागतात ) "एष एको देव ।" अर्थ–हा एक देव आहे. (म्हणजे देव देव म्हणून जो कोणी आहे, तो हा एकच, तर मग वाक, अग्नि इत्यादि देव कोण ' अशी आशका घेऊन " तस्य वाक्तन्तिरथातो विभूतयो स्य पुरुषस्य " इत्यादि वचनानें इतर देवता ह्या प्राणाच्याच विभूति–विस्तार आहेत, असें सागितल आहे, असें सागतात ) " एतस्यैव प्राणस्य सर्वे देवा विभूतय ।" अन्वय –सर्व देवा एतस्य एव प्राणस्य विभूतय । अर्थ–सर्व देव या प्राणाच्याच विभति आहेत (याप्रमाणं सर्वात्मक प्राणच माझा आत्मा आहे, अशी कर्मसहित उपासना केल्यानें सर्व

देवतात्मक ( देवतारूप ) प्राणाची प्राप्ति होणें, एतद्रूप फळाचा 'प्रज्ञामयो देवतामयो ब्रह्ममयो अमृतमय सभूय देवता अप्येति य एव वेद' या वाक्यानें उपसहार केला आहे, असें सागतात ) "**एतस्य प्राणस्यात्मभाव गच्छन्देवता अप्येति, इत्युक्तम्।**" अर्थ–या प्राणाच्या आत्मभावास प्राप्त होणारा उपासक देवतामध्य लय पावतो, असें सागितलें आहे (अर्थात् उपासना सहित कर्माच्या योगानें केवल आत्मस्वरूपान राहणें, या मोक्षाची सिद्धि होत नाहीं, असें वरील फळोपसहारावरून ठरतें आणि त्यामुळें आत्मस्वरूपावस्थानलक्षण मोक्षाच्या सिद्धिकरिता केवल आत्मविद्येच्या आरभाचा हाच उचित अवसर आहे )

## २ त्याविषयीं मतभेद

( पण हें आमच म्हणणं सर्वांनाच मान्य होत नाहीं कित्येकाचें असें मत आहे कीं, सर्वात्मक सूत्रात्मा जो हिरण्यगर्भ त्याची प्राप्ति होणें, हाच मोक्ष आहे यापेक्षा निराळा मोक्ष नाहीं एवढ्याकरिता केवल आत्म विद्येचा आरभ येथून केला आहे, अस समजणें युक्त नव्हे, असें म्हणून भाष्यकार कित्येकाचें मत उत्थापित करितात –) "**साऽय देवताप्ययलक्षण पर पुरुषार्थ।**" अर्थ–तो हा देवतालयरूप परम पुरुषार्थ आहे (विषयादिकानीं युक्त असलेल्या या देवतालयाला सुखरूपत्व आहे त्यामुळें पुरुषार्थत्वही आहे कारण पुरुष–जीव सुखाचीच अर्थना, इच्छा, आकाक्षा करीत असतो यास्तव सुखच पुरुषार्थ आहे अर्थात सुखरूप देवतालयच मोक्ष आहे केवल आत्मस्वरूपावस्थान, केवळ आत्मस्वरूपान राहणें, ही अवस्था निर्विषय असल्यामुळें, या दृष्टांत अत करणाचा किंवा बाह्य इंद्रियाचा विषय होईल, असा आत्मभिन्न पदार्थच नसतो त्यामुळें सुखशून्य केवल आत्मस्वरूपावस्थान हा मोक्ष नव्हे, अस एकदेशी म्हणतात, असें आचार्य सागतात –) "**एष मोक्ष।**" अर्थ–हाच मोक्ष आहे (देवतामध्य लय पावणें, हाच मोक्ष आहे केवल आत्मस्वरूपानें अवस्थित होणें, हा मोक्ष नव्हे 'अहो पण, नाही तुमचा मोक्ष केवळ (म्ह निरुपाधिक ) आत्म्याच्या ज्ञानानें जर साध्य होत असेल, तर आत्मविद्येचा आरभ करण व्यर्थ कसें होईल,' असें कोणी विचारतील, असें समजून एकदेशी 'सविशेष साधनानेंच सिद्धि होणें, युक्त आहे निर्विशेष साधनानें कोणतीही सिद्धि होणें

युक्त नाहीं,' असें सांगतात.) "स चाय यथोक्तेन ज्ञानकर्मसमुच्चयेन प्राप्तव्यः।" अर्थ–आणि तो हा (देवतात्मरूप) मोक्ष वर सांगितलेल्या ज्ञान (उपासना) व कर्म यांच्या समुच्चयानें (एकाच वेळीं अनुष्ठान केल्यानें) प्राप्त होण्यास योग्य आहे. (शिवाय आत्मा सदा सविशेषच असतो. त्यामुळें केवल आत्मविद्येचा अभाव आहे. त्या कारणानेही केवलात्मविद्या मोक्षाचें निमित्त होऊं शकत नाहीं, असें एकदेशी म्हणतात, असें आचार्य सांगतात.–) "नातः परमस्तीत्येके प्रतिपन्नाः।" अन्वयः–अतः परं (मोक्षः) न अस्ति इति एके प्रतिपन्नाः। अर्थ–याच्या पलीकडे (मोक्ष म्हणून) नाहीं, असें कित्येक समजले.

**३ त्यांचें निरसन करण्यासाठींच पुढचा ग्रंथ आहे, अशी प्रतिज्ञा.**

(*याप्रमाणें एकदेशी वेदान्त्यांचें मत दाखवून त्यांचें निराकरण करण्याकरिताच श्रुतीनें (ऐतरेयोपनिषदानें) उच्चारलेलें, पहिलें, केवल आत्मविद्येचें प्रतिपादन करणारें वाक्यच आचार्य व्याख्यानासाठीं घेतात*) "*तान्निराचिकीर्षुरुत्तरं केवलात्मज्ञानविधानार्थमात्मा वा इदमित्याद्याह।*" अन्वय–तान् निराचिकीर्षु (वेद) केवलात्मज्ञानविधानार्थं 'आत्मा वै' इत्यादि उत्तर आह। अर्थ–त्या एकदेशी विद्वानांचें निराकरण करण्याची इच्छा करणारा वेद केवल आत्म्याच्या साक्षात्काराच्या विधानार्थ 'आत्मा वा इदं' इत्यादि पुढील ग्रंथ सांगतो (केवलात्मज्ञान या पदानें निर्विशेष आत्मा हाच ज्याचा विषय आहे, कर्मिपुरुषाच्या निष्ठेचा विषय जें होत नाहीं, कर्माचें अंग न होणें, हेंच ज्याचें लक्षण आहे आणि कर्मांशीं ज्याचा संबंध नाहीं, असें कैवल्य येथें विवक्षित आहे)

**४ त्याविषयीं पूर्वपक्ष**

(शंका—अहो पण 'आत्मा वा इदम्' इत्यादि पुढचा ग्रंथ केवल आत्म्याविषयीं आहे, असें कसें म्हणता? कारण "स इमाल्लोँकानसृजत" म्हणजे तो या लोकांस उत्पन्न करता झाला, असें दुसऱ्याच वचनांत म्हटलेलें असल्यामुळें त्यानें लोकांना उत्पन्न केलें, अशी प्रतीति येते, आणि लोकांना निर्माण करणें, हें तर सर्व विशेषांनीं युक्त असलेल्या हिरण्यगर्भादिकांचें काम आहे अशी पुराणामध्यें प्रसिद्धि आहे. 'त्या सृष्टिकर्त्या आत्म्यानें त्या देवतांच्या पुढें गाय आणली' इत्यादि याच उपनिषदांत

वर्णिलेले व्यवहार नाम-जाति-रूप-सामर्थ्य इत्यादि अनेक विशेषांनीं युक्त असलेल्या चेतनाकडूनच होऊं शकतात, हें मनुष्यमात्राला ठाऊक आहे. त्याचप्रमाणें पूर्वींचें प्रकरण जरी पाहिलें तरी " अथातो रेतस सृष्टिः " " प्रजापते रेतो देवा: " इत्यादि स्थळीं प्रजापतिसंज्ञक हिरण्यगर्भाचें वर्णन आरंभलेलें आहे, असेंच दिसतें. यास्तव " आत्मा वा इदम् " या प्रथम वाक्यातील आत्मशब्द हिरण्यगर्भवाचक आहे. ब्रह्मवाचक नव्हे हीं शंका म्हणजे उत्तरमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायाच्या आठव्या अधिकरणाचा पूर्वपक्षच आहे व तो फारच महत्त्वाचा आहे. कारण अद्वैतवेदान्त्याखेरीज दुसरे सर्व द्वैती ही सृष्टि ईश्वरानें केली आहे व तो ईश्वर वैकुंठादि कोठें दूर राहून राजाप्रमाणें तिचें रक्षणादि करतो, असें म्हणतात. द्वैती लोकांनीं मानलेला ईश्वर म्हणजे वेदान्ताचें प्रतिपाद्य ब्रह्म नव्हे तर वेदान्त्याचा विराट् ( कार्यब्रह्म ) आहे. अर्थात् द्वैती, विशिष्टाद्वैती, शुद्धाद्वैती व इतर ईश्वरवादी विराटाच्या पलीकडे जात नाहींत त्याची तीच पराकाष्ठा आहे त्या विराटाचें सुख त्याच्याच कृपेनें संपादन करणें, हाच परम पुरुषार्थ आहे, इत्यादि ते मानतात. असो, भाष्यकार त्या लोकाच्या म्हणण्याचा शंकारूपानें निर्देश करितात –) "कथ पुनरकर्मसंबन्धिकेवलात्मविज्ञानविधानार्थ उत्तरो ग्रन्थ इति गम्यते।" अन्वय:-उत्तरः ग्रन्थ अकर्मसंबन्धिकेवलात्मविज्ञानविधानार्थ इति कथ पुनर् अवगम्यते। अर्थ– 'आत्मा वा' इत्यादि हा पुढील ग्रन्थ कर्माशीं ज्याचा काहीं संबंध नाहीं, कर्माचा जो शेष नव्हे, अशा केवल ( निरुपाधिक, निर्विशेष ) आत्म्याच्या साक्षात्काराचें विधान करण्यासाठीं आहे, हे कसें बरें अवगत होतें ? ( कसें बरे कळतें ? आत्मविद्येचा विषय जर सविशेष-विशेषसहित वस्तु, हा असला तर त्या विद्येचा संबंध कर्माशीं नाहीं, असें म्हणणेंही योग्य नव्हे, या अभिप्रायानें भाष्यात 'अकर्मसंबंधि' असें आत्म्याला विशेषण योजलें आहे )

५ त्याचें निरसन

( समाधान-वरील शंकेचें निरसन सहा तात्पर्यबोधक लिंगावरून करता येतें १ उपक्रमोपसंहार, २ अभ्यास, ३ अपूर्वता, ४ फल, ५ अर्थवाद व ६ उपपत्ति हीं सहा तात्पर्यबोधक लिंगें आहेत त्यावरून एकाद्या

ग्रंथाचें, शास्त्राचें अथवा प्रकरणाचें तात्पर्य ( प्रतिपाद्य ) काय आहे, याचा निश्चय करिता येतो ऐतरय उपनिषद् या नावानें प्रसिद्ध असलेल्या ऐतरेय ब्राह्मणाच्या दुस या आरण्यकाच्या चार, पाच व सहा या तीन अध्यायाचें मिळून एक प्रकरण होतें त्याचें तात्पर्य कशात आह, त्याचा प्रतिपाद्य विषय काय आहे, ह आपण वरील तात्पर्यबोधक लिगावरून पाहू या १ ' आत्मा वा इदमग्र आसीत् ' म्हणजे पूर्वी ह सर्व आत्मा होता, हा याचा उपक्रम आहे उपक्रम म्हणजे आरभ, व ' सर्व तत्प्रज्ञानेत्र प्रज्ञाने प्रतिष्ठित ' म्हणजे प्रज्ञाच ( चित्-तत्त्वच ) त्या सर्वांचें ( ब्रह्मादिकांचें ) नत्र ( प्रवर्तक ) आहे, प्रज्ञानातच सर्व स्थिर स्थित आहे, इत्यादि हा उपसहार आहे आत्म्याचा उपक्रम करून त्यात हें सर्व जग प्रतिष्ठित आहे, असा उपसहार करणें, हें आत्माच या प्रकरणाचा प्रतिपाद्य आहे असा निश्चय करवितें म्हणून तें पहिलें लिग होय २ स एतमेव पुरुष ब्रह्मततममपश्यत ' म्हणजे तो साधक याच आत्माला फार मोठा, अतिशय विस्तार पावलेला पाहता झाला, हा अभ्यास होय अभ्यास म्हणजे मध्य मध्यें प्रतिपाद्याचा परामर्ष ( निर्देश ) करणें ३ ब्रह्मच अद्वितीय आत्मा आहे, हें तत्त्व दुसऱ्या कोणत्याही ( *म्हणजे उपनिषदावाचून प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि दुसऱ्या* कोणत्याही ) प्रमाणानें ज्ञात होत नाहीं हेंच अपूर्वतासंज्ञक तात्पर्य लिग आहे ४ ' अमुष्मिन्स्वर्ग लोके सर्वान्कामानाप्त्वामृत समभवत् ' म्हणजे त्या स्वर्गसंज्ञक सुखरूप लोकात सर्व कामनास प्राप्त होऊन अमृत झाला, हें वाक्य आत्मज्ञानाचें फल सागत येथें स्वर्ग म्हणजे निरतिशय सुखरूप ब्रह्म त्याच्याशीं ऐक्य पावन गेलेल्या पुरुषाला ब्रह्माच्या अशाभूत विषयानन्दाशींहि प्राप्ति होणें, हें फल होय ५ ' स एतमेव सीमान विदार्यैतया द्वारा प्रापद्यत ' म्हणजे ता याच मस्तकावरील केशविभागस्थानास विदीर्ण करून त्या द्वारान आत शिरला, हा अर्थवाद आहे अर्थवाद म्हणजे स्तुति, प्रतिपाद्याच माहात्म्य वर्णन करणें, व ६ ' तस्य त्रय आवसथास्त्रय स्वप्ना ' म्हणजे त्याचे तीन आवसथ व तीन स्वप्न आहेत या वाक्यानें जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तिन्ही अवस्थाचा ' स्वप्न ' या शब्दानें उल्लेख कलेला आहे, त्यामुळें त्या अवस्था मिथ्या आहेत, अशी सूचना होते हीच उपपत्ति म्हणजे युक्ति होय

या सहा चिन्हांवरून प्रस्तुत ग्रंथ सर्व विशेषशून्य अद्वितीय आत्मवस्तूचें प्रतिपादन करणारा आहे, असें होतें. वास्तव तो ग्रंथ आत्मभिन्न विषयाचें प्रतिपादन करणारा आहे, असें समजण्यास अवकाशच उरत नाहीं. शिवाय त्यानें लोक, देवता, अन्न इत्यादिकांना उत्पन्न केलें, असें जें सांगितलें आहे, तें अध्यारोप व अपवाद यांच्या योगानें, या दोन उपायांनीं पूर्वोक्त आत्म्याचें ज्ञान व्हावें ह्मणून आहे. कारण आत्म्याच्या ठिकाणीं त्या सर्वांचा अध्यारोप केला आहे. ह्मणूनच व्यास ह्मणतात "आत्मगृहीतिरितरवदुत्तरात्," (ब्रह्मसूत्र अ. ३ पा. ३ सू. १६) येथें आत्मशब्दानें आत्म्याचें-परमात्म्याचें ग्रहणच केलें जातें. तें कसें तर 'इतरवत्' ह्मणजे सृष्टीविषयीं वर्णन करणाऱ्या इतर श्रुतींत ( ह्मणजे 'आत्मन आकाशः सभूतः' इत्यादि उपनिषद्वाक्यांत ) आत्मशब्दानें परमात्म्याचें ग्रहण जसें करतां, अथवा इतर ह्मणजे सामान्य लौकिक वाक्यांत आत्मशब्दाचा प्रयोग केला असतां मुख्य प्रत्यगात्माच जसा ग्रहण केला जातो त्याप्रमाणें येथेंही आत्मा ह्मणजे परमात्मा. कारण पुढचें 'स ईक्षत लोकान्नु सृजे' ह्मणजे मीं लोकांना उत्पन्न करावें, असें तो ईक्षण करता झाला. हें वाक्य परमात्म्याच्या ग्रहणासच अनुकूल आहे. हिरण्यगर्भादि कार्यब्रह्माचें ग्रहण करण्यास अनुकूल नाहीं, अशा अभिप्रायानें भाष्यकार सांगतात.) "अन्यार्थानवगमात्" अर्थ– कारण (उत्तर ग्रंथ) दुसऱ्या कशाकरितां आहे, असें प्रत्यक्ष त्या ग्रंथावरून कळत नाहीं. (आतां 'हाच मोक्ष' असें जें वर पूर्वपक्षांत ह्मटलें आहे, त्याविषयीं आचार्य ह्मणतात–) "तथा च पूर्वोक्तानां देवतानामग्न्यादीनां संसारित्वं दर्शयिष्यत्यशनायादिदोषवत्त्वेन 'तमशनापिपासाभ्यामन्ववार्जद्' इत्यादिना।" अन्वय.–पूर्वोक्तानां अग्न्यादीनां देवतानां तथा संसारित्वं च अशनायादिदोषवत्त्वेन 'तमशनापिपासाभ्यामन्ववार्जत्' इत्यादिना दर्शयिष्यति। अर्थ– पूर्वी सांगितलेल्या अग्न्यादि देवतांचें तसेंच संसारित्वही अशनाया ( भूक ) पिपासा ( तहान ) इत्यादि दोषांनीं युक्त असणें, या कारणानें 'तमशनापिपासाभ्यामन्ववार्जत्' ह्म० हिरण्यगर्भाच्या स्थूल विराड्रूप देहाला अशना आणि पिपासा यांच्या योगानें ईश्वर संयुक्त करता झाला, अशा अर्थाच्या वाक्यानें श्रुति दाखवील. ('अहो, पण देवताभाव अशनायादिकांनीं जरी युक्त झालेला असला, तरी

तो निरतिशय सुखसंपन्न असल्यामुळें मोक्षच आहे,' असें वादी ह्मणेल, यास्तव आचार्य ह्मणतात,–) "अशनायादिमत्सर्वं संसार एव।" अन्वय – सर्वं अशनायादिमत् संसार. एव। अर्थ–सर्व काहीं अशनायादिकांनीं युक्त असलेलें संसारच आहे ( अशनायादिकांमुळें दुःख होणें अगदीं नियत आहे ह्मणजे ज्याला भूक किंवा तहान लागते त्याला दुःख होणें अवश्य आहे. त्यामुळें क्षुधायुक्त देवताभाव निरतिशय सुखसंपन्न आहे, या ह्मणण्यांत काहीं अर्थ नाहीं यास्तव जगतींल जो जो भाव अशनायादिकांनीं युक्त आहे, तो तो संसारच. )

६ मोक्षाचें स्वरूप

( आता निर्विशेष आत्मस्वरूप होऊन राहणें, हा मोक्षच नव्हे कारण ती अवस्था विषय, इंद्रियें इत्यादिकांनीं रहित असल्यामुळें तिच्यामध्यें सामान्य सुखही संभवत नाहीं मग निरतिशय ( सर्वोत्कृष्ट ) सुख तर दूरच राहिलें, असें जें वाद्याचें म्हणणें आहे तें खोटें आहे. कारण ' योऽशनायापिपासे शोकं मोहं जरां मृत्युमत्येति ' म्हणजे जो भूक, तहान, शोक, मोह, जरा, मृत्यु इत्यादिकांचें उल्लंघन करतो, इत्यादि श्रुतिवचनावरून मोक्ष, अशनायादिकांनीं रहित आहे, असें ठरतें, आणि त्यामुळें मोक्षावस्थेंत अशनायादिकांस अवश्य असलेल्या दुःखाचीही प्राप्ति होत नाहीं यास्तव मोक्ष सुखदुःखातीत आहे तो स्वतः आनंद आहे, असेंही तैत्तिरीय उपनिषदांत सांगितलें आहे यास्तव मोक्ष म्हणजे आनंद होय. ' अमुष्मिन् स्वर्गे लोके ' येथेंही लोकाच्या आनंदरूपतेचेंच भान होत असल्यामुळें स्वर्ग म्हणजे सामान्य सुख, असेंच समजणें उचित होय ' अनन्ते स्वर्गे लोके० ' इत्यादि श्रुतींमध्यें ब्रह्मानंद या अर्थी स्वर्ग या शब्दाचा प्रयोग केला आहे अर्थात् मोक्ष सर्व दुःखशून्य व म्हणूनच आनंदरूप आहे )

( आता त्या आनंदामध्यें विषयाचा अभाव असतो, हें जरी खरें आहे, तरी विचारी लोक त्या विषयाभावदशेचीच आकांक्षा करतात. यास्तव त्याला मोक्षत्व–पुरुषार्थत्व आहे, असें भाष्यकार सांगतात. ) " परस्य तु ब्रह्मणोऽशनायाद्यत्ययश्रुतेः । " अर्थ–आणि पर ब्रह्म अशनायादिकांचें उल्लंघन करून राहतें ( म्हणजे तें तहान, भूक इत्यादि दुःखनिमित्तांनीं रहित आहे, ) असें सांगणारी श्रुति आहे.

## ७ संन्यासाविषयीं आक्षेप.

(याप्रमाणें वादी निर्विशेष आत्म्याचें ज्ञान मोक्षाचें साधन आहे, असें क्षणभर मान्य करून 'पण तें ज्ञान कर्मरहित पुरुषाच्या ठिकाणींच नियमानें राहतें, व तेंच कैवल्य होय, हें म्हणणें संभवत नाहीं,' असें म्हणून संन्यासाविषयीं आक्षेप घेतो. ) "**भवत्वेव केवलात्मज्ञानं मोक्षसाधनं न त्वत्रकर्म्येवाधिक्रियते । विशेषाश्रवणात् ।**" अन्वयः-एवं केवलात्मज्ञानं मोक्षसाधनं भवतु । तु अत्र कर्मी एव न अधिक्रियते । ( कुत. ) विशेषाश्रवणात् । अर्थ-या प्रकारें केवळ आत्म्याचें ज्ञान मोक्षाचें साधन असो, पण त्यामध्यें केवळ अकर्मीच अधिकारी आहे, असें ह्मणता येत नाहीं. कारण श्रुतीनें तसा विशेष कोठेंही सांगितलेला नाहीं. ( आता विशेष सांगितलेला नाहीं, हेंच ह्मणणें वादी अधिक स्पष्ट करतो.) "**अकर्मिण.आश्रम्यन्तरस्येहाश्रवणात् ।**" अर्थ- कारण अकर्मी ह्मणजे संन्यासी हा दुसरा ( निराळा ) आश्रमी आहे, असें येथें सांगितलेलें नाहीं.

( आणि विशेष सांगितलेला नाहीं एवढेंच नव्हे; तर 'आत्मा वा इदं०' या अध्यायाशीं कर्मी अधिकाऱ्याचेंच सान्निध्य प्रतीत होतें. त्यावरूनही आत्मज्ञानाचा कर्माशीं नियत संबंध आहे असें ठरतें, असें वादी सांगतो. ) "**कर्म च बृहतीसहस्रलक्षण प्रस्तुत्यानन्तरमेवात्मज्ञानं प्रारभ्यते**" अन्वयः-बृहतीसहस्रलक्षणं कर्म प्रस्तुत्य अनंतर एव आत्मज्ञानं प्रारभ्यते। अर्थ-बृहतीसहस्ररूप कर्म आरंभून ( या कर्माच्या विधानास आरंभ करून ) नतर लागलेच येथें आत्मज्ञान आरंभिलेलें आहे. ( यास्तव त्या कर्माच्या द्वारा, तें कर्म करणारा पुरुष आत्मज्ञानाला समीप आहे ) "**तस्मात्कर्म्येवाधिक्रियते ।**" अर्थ- यास्तव आत्मज्ञानामध्यें कर्मीच ह्मणजे कर्मठ पुरुषच अधिकारी केला जातो. ( ह्मणजे आत्मज्ञानाचा अधिकारी कर्मठच आहे, संन्यासी नव्हे. अर्थात् कर्मत्यागरूप संन्यासाश्रम नाहीं. )

## ८ कर्माशीं संबंध न ठेवणारें केवळ आत्मज्ञानच नाहीं, असें वाद्याचें ह्मणणें.

(याप्रमाणें वाद्यानें कर्माशीं संबंध न ठेवणारी केवळ आत्मविद्या मान्य करून ती संन्याशाचे ठिकाणींच राहते, या नियमाचे निराकरण केलें. ह्मणजे कर्माशीं संबंध न ठेवणारें आत्मज्ञान आहे, पण तें संन्याशाचे ठिकाणीच

असतें, संन्याशीच त्याचा अधिकारी आहे, असा काहीं नियम नाहीं, असें वर ह्मटलें पण आता कर्माशीं संबंध न ठेवणारें ज्ञान आहे, हें ह्मणणेंच तो मान्य करीत नाहीं. ) " न च कर्मासंबन्ध्यात्मविज्ञानं पूर्ववदन्त उपसंहारात् । " अन्वय - च कर्मासंबंधि आत्मविज्ञानं न । पूर्ववत् अन्ते उपसंहारात् । अर्थ-वस्तुतः कर्माशीं संबंध न ठेवणारें आत्मविज्ञान नाहीं. कारण पूर्वीप्रमाणेंच शेवटीं उपसंहार केला आहे ( आता यावरील संक्षिप्त वाक्याचाच विस्तार करितात. ) " यथा कर्मसंबन्धिनः पुरुषस्य सूर्यात्मनः स्थावरजङ्गमादिसर्वप्राण्यात्मत्वमुक्तं ब्राह्मणेन, मन्त्रेण च ' सूर्य आत्मा ' इत्यादिना तथैव ' एष ब्रह्मैष इन्द्र ' इत्युपक्रम्य सर्वप्राण्यात्मत्वम् । ' यच्च स्थावरं सर्वं तत्प्रज्ञानेत्रं ' इत्युपसंहरिष्यति ॥ " अन्वय -यथा ब्राह्मणेन कर्मसंबन्धिनः सूर्यात्मनः पुरुषस्य स्थावरजङ्गमादिसर्वप्राण्यात्मत्वं उक्तं ' सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ' इत्यादि मन्त्रेण च उक्तं । तथा एव ' एष ब्रह्मैष इन्द्र ' इत्यादि उपक्रम्य सर्वप्राण्यात्मत्वं ' यच्च स्थावरं सर्वं तत् प्रज्ञानेत्रं ' इति उपसंहरिष्यति । अर्थ-ज्याप्रमाणें ब्राह्मणानें कर्मसंबंधी, व सूर्याच्या आत्मरूप ( सूर्यमंडलान्तर्वर्ती ) पुरुषाला स्थावरजंगमादि सर्वप्राण्यांचें आत्मत्व ( म्ह तो पुरुषच अचर व चर प्राण्यांचा आत्मा आहे, असें ) सांगितलें आहे, आणि जसें ' सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ' म्ह० सूर्य चर व अचर यांचा आत्मा आहे, या मंत्रानेंही सांगितलें आहे, तसेंच ( या उपनिषदातही ) ' एष ब्रह्मैष इन्द्र ' म्ह० हा ब्रह्मा, हा इंद्र इत्यादि वाक्यानें सर्व प्राण्यांचें आत्मत्व सांगावयास आरंभ करून ' यच्च स्थावरं सर्वं तत्प्रज्ञानेत्रं ' ह्मणजे आणि जें स्थावर तें सर्व प्रज्ञे कडून प्रवृत्त होणारें आहे, असा उपसंहार केला आहे ( पूर्वीच्या अध्यायात कर्मसंबंधी उपासनेचा विषय होणाऱ्या उपास्याचें सर्वात्मत्व जसें वर्णिलें आहे तसेंच तें या अध्यायातही 'एष ब्रह्म०' इत्यादि वाक्यानें सांगितलें आहे यास्तव ते आत्मज्ञान जसें कर्मसंबंधी तसेंच हेंही देवताज्ञान कर्मसंबंधी होय, असें अनुमान होतें )

( आता संहितेंत जसें सांगितलें असेल तसेंच ब्राह्मणाविषयीं समजावयाचें, या पद्धतीनें जरी पाहिलें, तरी सर्वात्मत्व हें चिह्न कर्मसंबंधी

आत्म्याच्या ठिकाणींच नियमानें राहणारें आहे, असें वादी म्हणतो.)
"तथाच संहितोपनिषदि 'एतं ह्येव बह्वृचा महत्युक्थे मीमांसन्ते' इत्यादिना कर्मसंबन्धित्वमुक्त्वा सर्वेषु भूतेष्वेतमेव ब्रह्मेत्याचक्षते इत्युपसंहरति।" अर्थ—त्याचप्रमाणें संहितोपानिषदामध्यें (संहितेच्या उपानिषदांत) बह्वृच (ह्मणजे ऋग्वेदी) 'बृहतीसहस्र' (ह्मणजे एक सहस्र बृहती नांवाचे छंद) या नांवाच्या शस्त्रात (शंसिता या नावाच्या ऋत्विजानें ह्मणावयाच्या स्तोत्रांत) या प्रकृत आत्म्याचाच विचार करितात, अशा अर्थाच्या 'एतं ह्येव०' इत्यादि वाक्यानें कर्मसंबंधित्व सांगून शेवटीं सर्व भूतांतील त्या आत्म्यालाच ब्रह्म ह्मणतात अशा अर्थाच्या 'सर्वेषु भूतेषु०' या वाक्यानें उपसंहार केला आहे. तस्मात् आत्मज्ञानही कर्मसंबंधी आहे.

(संहितोपनिषद्रात 'प्रज्ञात्मा' ह्मणून ज्याला नांव दिलें आहे त्या आत्म्याचा, 'यो यज्ञस्योल्बणं पश्येत्' इत्यादि वाक्याचा विचार केला असता कर्मांशीं संबंध आहे अशी प्रतीति येते, आणि या उपानिषदांतही 'प्रज्ञात्मा' असेंच ह्मटलें आहे त्यामुळें प्रज्ञात्मा कर्मसंबंधी आहे, असा निश्चय होतो. ह्मणून आत्मविद्या आत्मज्ञानही कर्मसंबंधी आहे, असें वादी ह्मणतो–)
"*तथा तस्यैव योऽयमशरीरः प्रज्ञात्मेत्युक्तस्य यश्चासावादित्य एकमेव तदिति विद्यादित्येकत्वमुक्तम्* । इहापि कोऽयमात्मेत्युपक्रम्य प्रज्ञात्मत्वमेव प्रज्ञानं ब्रह्मेति दर्शयिष्यति॥" अन्वयः—तथा 'य. अयं-अशरीर. प्रज्ञात्मा' इत्युक्तस्य तस्य एव 'यः च असौ आदित्यः एकं एव तत् इति विद्यात्' इति एकत्वं उक्तम्। अर्थ— त्याचप्रमाणें 'जो हा शरीररहित प्रज्ञात्मा' अशा रीतीनें ज्याच्या विषयीं ह्मटलें आहे, त्याचेंच 'आणि जो हा आदित्यामध्यें आहे तो (तें) एकच आहे, असें समजावें,' असें ह्मणून एकत्व सांगितलें आहे. (आता शंकावादी आपली शंका संपवितो— "तस्मात्कर्मसंबन्ध्यात्मज्ञानम्।" अन्वयः— तस्मात् आत्मज्ञान अकर्मसंबन्धि न। अर्थ—यास्तव आत्मज्ञान कर्मसंबंधी नाहीं, असें नाहीं.

## ९ वादी शंकेचा अनुवाद व समाधान करतो.

आता शंकावादीच सिद्धान्त्याच्या आशंकेचा अनुवाद करतो—
"पुनरुक्त्याऽनर्थक्यमिति चेत्।" अर्थ—पुनरुक्ती हा दोष येत असल्यामुळें

हें प्रकरण अनर्थक होतें, म्हणून म्हणाल तर (आता या संक्षिप्त वाक्याचाच विस्तार करितात) " कथं 'प्राणो वा अहमस्म्यृषे' इत्यादि ब्राह्मणेन 'सूर्य आत्मा' इति मन्त्रेण च निर्धारितस्यात्मन 'आत्मा वा इदम्' इत्यादि ब्राह्मणेन कोऽयमात्मेति प्रश्नपूर्वकं पुनर्निर्धारणं पुनरुक्तम-नर्थकमिति चेत्। " अन्वय.-कथं ? (इति चेत शृणु) ' प्राणो वा अहमस्म्यृषे " इत्यादि ब्राह्मणेन, च " सूर्य आत्मा " इति मन्त्रेण निर्धारितस्य आत्मन " आत्मा वा इदं ' इत्यादि ब्राह्मणेन " कोऽयम् आत्मा " इति प्रश्नपूर्वकं पुनर्निर्धारणं पुनरुक्तं अनर्थकं । अर्थ-आनर्थक्य कसें' म्हणून विचारशील तर सांगतों " हे ऋषे, मी प्रसिद्ध प्राण आहे, ' इत्यादि अर्थाच्या ब्राह्मणानें व " सूर्य चराचर जगाचा आत्मा आहे " इत्यादि अर्थाच्या मन्त्रानें ज्याचा निश्चय केला आहे, त्याच आत्म्याचा " पूर्वी हें सर्व आत्माच होता, " इत्यादि वाक्यानें आरंभिलेल्या या ब्राह्मणानें, 'तो आत्मा कोण आहे,' असा पुन प्रश्नपूर्वक निश्चय करणें, ही पुनरुक्ति असून त्यामुळेंच ती व्यर्थ आहे, ह्मणून तुम्ही अद्वैतवादी ह्मणाल तर " न। तस्यैव धर्मान्तरविशेषनिर्धारणार्थत्वान्न पुन रुक्ततादोष ।" अर्थ- तें बरोबर नाहीं कारण त्याच्याच दुसऱ्या विशेषधर्मांचा निश्चय करण्याकरिता पुन प्रश्नपूर्वक आरंभ केला आहे त्यामुळें पुनरुक्तता दोष येत नाहीं. (आता हेंच प्रश्नपूर्वक स्पष्ट करून सांगतो) " कथं। तस्यैव कर्मसंबन्धिनो जगदुत्पत्तिस्थितिसंहारादि-धर्मविशेषनिर्धारणार्थत्वात्।" अर्थ- तें कसें ? (सांगतों) कर्माशीं संबंध ठेवणाऱ्या त्या आत्म्याचेच-जगाला उत्पन्न करणें, त्याची स्थिति व संहार करणें -इत्यादि विशेष धर्म आहेत, या गोष्टींचा निश्चय करण्या करिता तो प्रश्न आहे (कारण त्यानें या लोकांना उत्पन्न केलें, असें त्यात सांगितलें आहे किंवा वादी दुसऱ्या प्रकारें पुनरुक्तिदोषाचा परिहार करतो) " केवलोपास्त्यर्थत्वाद्वा।" अर्थ- अथवा केवळ उपासने करिता आत्म्याचा पुन निश्चय केला आहे (आता याचच अधिक स्पष्टीकरण करतो) ' अथवाऽऽत्मेत्यादि परो ग्रन्थसंदर्भ आत्मनः कर्मिण कर्मणोऽन्यत्रोपासनाप्राप्तौ कर्मप्रस्तावेऽविहितत्वात्केवलो प्यात्मोपास्य इत्येवमर्थ।" अन्वय - अथवा आत्मेत्यादि पर

ग्रन्थसंदर्भः कर्मिणः आत्मनः कर्मणः अन्यत्र उपासनाप्राप्तौ कर्मप्रस्तावे अविहितत्वात् केवलः अपि आत्मा उपास्यः इति एवं अर्थः । अर्थ– अथवा ' आत्मा वा इदम् ' इत्यादि पुढचा ग्रंथसमुदाय कर्मसंबंधीं जो आत्मा त्याची कर्मावांचून उपासनाच होऊं शकत नाहीं. कारण कर्मप्रकरणामध्यें त्याचें विधान केलेलें नाहीं, अशी प्राप्ति झाली असतां केवल आत्माही उपास्य ( उपासना करण्यास योग्य ) आहे, हें सुचविण्याकरितां आहे. ( ह्मणजे कर्माच्या अंगत्वानेंच आत्म्याची उपासना होऊ शकते. केवल आत्म्याची उपासना होऊं शकत नाहीं, असें कोणी समजतील. कारण, कर्मप्रकरणामध्येंच आत्मोपासनेचें प्रतिपादन केलेलें आहे. यास्तव त्या शंकेचें निरसन करून केवल आत्म्याचीही उपासना होऊं शकते, हें सुचविण्याकरितां पुढचा ह्मणजे ऐतरेय उपनिषद्रूप ग्रंथ आहे, असें याचें तात्पर्य. पण असें ह्मटल्यास आम्हीं ' आत्मा कर्मसंबंधीच आहे, ' असा जो वर नियम सांगितला आहे, त्याला बाध येतो, असें ह्मणण्याचेंही कारण नाहीं. कारण केवल कर्मांगाचा आश्रय करूनच आत्म्यानें उपास्य होणें, एवढ्या अंशाचा जरी बाध झाला तरी त्यामुळें उपास्य आत्म्याच्या कर्मसंबंधाचा ह्मणजे सविशेषत्वाचा बाध अथवा त्यानें कर्मसमुच्चयानें उपास्य होणें, या मुख्य अंशाचा बाध होत नाहीं. त्यामुळें हा पक्ष गृहीत धरला तरी ज्याला कर्माचा अधिकार असतो, तोच आत्म्याचा उपासक होतो. अकर्मी ( संन्यासी ) आत्मोपासक होऊं शकत नाहीं असा याचा भाव. )

### १० याच पक्षीं दुसरा विशेष

( आतां याच पक्षीं, आणखी दुसरा विशेष कोणता आहे तें सांगतात. )

" भेदाभेदोपास्यत्वाद् वा एक एव आत्मा कर्मविषये भेददृष्टिभाक् । स एवाकर्मकालेऽभेदेनाप्युपास्य इत्येवमपुनरुक्तता । "

अन्वयः– वा भेदाभेदोपास्यत्वात् एकः एव आत्मा कर्मविषये भेददृष्टिभाक् सः एव अकर्मकाले अभेदेन अपि उपास्यः इति एवं अपुनरुक्तता । अर्थ– किंवा भेद व अभेद अशा दोन दृष्टींनीं आत्मा उपास्य होत असल्यामुळें एकच आत्मा कर्मविषयामध्यें भेददृष्टीस पात्र होतो आणि तोच अकर्मकालीं ( ह्मणजे जेव्हां कर्म करण्याचा अवसर नसतो ) तेव्हां अभेदानेंही उपास्य होतो. अशा रीतीनें पुढील ग्रंथाला पुनरुक्तता नाहीं.

( भेददृष्टि ह्मणजे आत्म्याची, ' हा, मजहून भिन्न, ' अशा रीतीनें उपासना करणें आणि अभेदानें ह्मणजे ' मीच आत्मा ' अशी एकरूपानें उपासना करणें )

११ ऐतरेय आत्मज्ञानार्थ आहे, असें मानल्यास श्रुतिविरोध

( ऐतरेय उपनिषद्, हें प्रकरण आत्मज्ञानार्थ आहे, यापक्षीं अनेक श्रुतींशीं विरोध येतो असें वादी सांगतो ) " विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभय सह अविद्यया मृत्यु तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते इति । " अन्वय–य. विद्या च अविद्या च तत् उभय सह वेद ( स ) अविद्यया मृत्यु तीर्त्वा विद्यया अमृत अश्नुते इति । अर्थ–जो कर्म आणि उपासना या दोघांना एकाच काळीं आचरितो, तो कर्माच्या योगानें मृत्यूचें उल्लंघन करून विद्येच्या योगानें अमृतत्वाचा ( मोक्षाचा ) उपभोग घेतो " कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः " इति च वाजिनाम् । अन्वय–इह कर्माणि कुर्वन् एव शत समाः जिजीविषेद् इति वाजिनाम् । अर्थ–या लोकीं कर्मे करीतच शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी, असे वाजसनेयि शाखेच्या ईशावास्योपनिषदांत म्हटलें आहे ( शंभर वर्षांनंतर केवळ आत्म्याचें ज्ञान संपादन करून ह्मणून ह्मणावें तर ) " न च वर्षशतात्परमायुर्मर्त्यानाम् । येन कर्मपरित्यागेनात्मानमुपासीत । " अन्वय–च मर्त्यांना आयु वर्षशतात पर न अस्ति, येन कर्मपरित्यागेन आत्मानं उपासीत । अर्थ–मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षांहून अधिक नसतें, की ज्याच्या योगानें पुरुष शंभर वर्षे नंतर कर्मांचा त्याग करून आत्म्याची उपासना करील ( ' शतायुर्वै पुरुषः ' या श्रुतीवरून मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षे आहे हें ठरतें. ऐतरेय आरण्यकांत एक सहस्र बृहती छन्दानें युक्त असलेल्या शस्त्राची ( स्तोत्राची ) छत्तीस हजार अक्षरें आहेत, असें मानून, पुरुषाच्या आयुष्याचे दिवस तितकेच आहेत, असें म्हटलें आहे. छत्तीस हजार दिवस म्हणजे शंभर वर्षे होत अर्थात् या उल्लेखावरूनही पुरुषाचें आयुष्य शंभर वर्षे आहे, असें ठरतें. आयुष्याची पूर्ति शंभरांत होते असें लागतात )

" दर्शितं च ' तावन्ति पुरुषायुषोऽह्नां सहस्राणि भवन्ति ' इति " अन्वय–पुरुषायुषः अह्नां तावन्ति सहस्राणि भवन्ति इति च दर्शितं

अर्थ–पुरुषाच्या आयुष्याचे दिवस तितकेच ( छत्तीस ) सहस्र होतात, असेंही मागें दाखविलें आहे.

( बरें, पुरुषाचें आयुष्य शंभर वर्षांहून जर अधिक नसेल तर त्यानें मध्येंच कर्मसंन्यास करावा, ह्मणून ह्मणाल, तर तेंही बरोबर नाहीं. कारण ) " **वर्षशतं चायुः कर्मणैव व्याप्तं** " अर्थ–शंभर वर्षें आयुष्य कर्मानेंच व्यापिलें आहे. ( त्याविषयीं प्रमाण सांगतात. ) " **दर्शितश्च मन्त्रः ' कुर्वन्नेवेह कर्माणि ' इत्यादि.** " अन्वयः–कुर्वन्नेवेह कर्माणि इत्यादिः मन्त्रः च दर्शितः । अर्थ–' या लोकीं कर्में करीतच ' इत्यादि अर्थाचा मंत्रही वर दाखविलाच आहे. ( तर मग पुराणामध्यें दशरथादिकांचें अधिक आयुष्य वर्णिलें आहे, त्याची वाट काय ? ह्मणून ह्मणाल, तर सांगतों. पुरुषाचें आयुष्य शंभर वर्षेंच असतें, अशा अर्थाच्या श्रुतींशीं विरोध येत असल्यामुळें पुराणांतील वर्णन हा अर्थवाद ( स्तुति ) आहे, असें समजावें. अथवा तें खरेंच आहे, असें जरी घेऊन चाललें, तरी जेवढें आयुष्य असेल तेवढें सर्व कर्मानेंच व्यतीत करावें, असें सांगणारी श्रुति असल्यामुळें, दशरथादिकांसारखे दीर्घायु पुरुष, शंभर वर्षांनंतर कर्मत्याग करून आत्मोपासना करतील, असेंही ह्मणतां येत नाहीं, असें वादी सांगतो. ) " **तथा ' यावज्जीवमग्निहोत्रं जुहोति ' ' यावज्जीवं दर्शपूर्णमासाभ्यां यजेत ' इत्याद्याश्च** " अर्थ–' यावज्जीव अग्निहोत्र करावें ' ' यावज्जीव दर्शपूर्णमास याग करावेत, ' इत्यादि अर्थाच्या दुसऱ्याही श्रुती आहेत.

( ' जीर्णो वा विरमेत् ' अथवा जीर्ण झालेल्या पुरुषानें कर्मांचा त्याग करावा, असें वचन असल्यामुळें वृद्धावस्था प्राप्त झाल्यानंतर संन्यास करितां येईल, असें ह्मणावें तर पुरुषाला, यज्ञपात्रांसह जाळण्याविषयीं विधान असल्यामुळें तें बरोबर नाहीं, असें सांगतात. ) " **तं यज्ञपात्रैर्दहन्ति इति च ।** " त्याला यज्ञपात्रांसह जाळतात, असेंही विधान आहे. ( यास्तव अग्निहोत्रादि कर्मांचा त्याग करून आत्मोपासना करण्यास अवकाशच राहत नाहीं. )

( अहो, पण यावज्जीव कर्में करावयास सांगणारीं वरील वाक्यें, ज्यानें गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आहे, त्याच्याकरितां आहेत, असें

समजणेंच सयुक्तिक आहे नाहीं तर ब्रह्मचाऱ्यालाही कर्मे करण्याचा प्रसंग येईल पण तो तर अग्निहोत्रादि कर्म करीत नाहीं यास्तव गृहस्थाश्रम स्वीकार ण्याच्या पूर्वीच कर्मत्याग करिता येणें शक्य आहे, असें ह्मणाल तर सांगतों ) " ऋणत्रयश्रुतेश्च । " अर्थ–श्रुतीनें तीन ऋणेंही सांगितलीं आहेत ( उत्पन्न होणारा ब्राह्मण तीन ऋणानीं युक्त होऊनच जन्मास येतो, ' अशा अर्थाची श्रुति व ' तीन ऋणाची फेड करून मन मोक्षामध्यें लावावें, अशी स्मृति आहे यास्तव देव, ऋषि व पितर या तिघांचीं ऋणें पंचमहायज्ञ, वेदाध्ययन व पुत्रोत्पादन याच योगानें फेडण्याकरिता ब्रह्म चाऱ्यालाही गृहस्थाश्रमाचा स्वीकार करणेंच उचित आहे, संन्यास करणें उचित नव्हे )

१२ यावर मध्यस्थाचा आक्षेप घेऊन वादीच त्याचें समाधान करतो

( ब्रह्मचाऱ्यालाही गृहस्थाश्रम स्वीकारणच अवश्य आहे व सर्व जन्म कर्मे करण्यात घालवावयाचा असल्यामुळें संन्यासाश्रमास अवकाशच नाहीं, असेंच जर नियमानें समजलें तर ? १ ' ज्या दिवशीं विरक्ति उद्भवेल त्याच दिवशीं सर्वसंगपरित्याग करून जावें २ ' सर्वसंग परित्याग करून भिक्षावृत्तीनें निर्वाह करितात ' ३ ' ब्राह्मणानें गृहस्थाश्रमास सोडून जावें, ' इत्यादि अर्थाच्या श्रुती व स्मृती यांची काय वाट ? असें मध्यस्थानें विचारलें असता वादी ह्मणतो ) ' तत्र पारिव्राज्यादि शास्त्र ' व्युत्थाय अथ भिक्षाचर्यं चरन्ति ' इति आत्मज्ञानस्तुतिपरोऽर्थवादः " अन्वय – तत्र ' व्युत्थाय अथ भिक्षाचर्यं चरन्ति इति पारिव्राज्यादि शास्त्र आत्म ज्ञानस्तुतिपर अर्थवाद । अर्थ– श्रुतींतील ' सर्वसंग परित्याग करून भिक्षावृत्तीनें निर्वाह करितात इत्यादि संन्यास, भिक्षाटन इत्यादिकाचें विधान करणारें शास्त्र हा आत्मज्ञानाची स्तुति करणारा अर्थवाद आहे ( सर्वांचा त्याग करूनही आत्मज्ञान संपादन करावें, अशी आत्मज्ञानाची स्तुति येथें प्रतीत होते यास्तव अशाप्रकारचें वाक्य, हें विधिवाक्य नव्हे ह्मणजे ते आत्म ज्ञानाचें विधान करीत नाहीं तर सर्वस्वाचा त्याग करूनही आत्मज्ञानाचें संपादन करावें, एवढेंच सांगते )

( यास्तव असीं वाक्यें, हा आत्मज्ञानाचा स्तुतिपर अर्थवाद आहे ज्याचें विधान केलेलें असते तें अवश्य करावें लागतें कारण विहित कर्त

ण्याचें अनुष्ठान न करणें ह्मणजे प्रत्यवायी व पतित होणेंच आहे. पण अर्थवादावरून, ज्याची स्तुति केली असेल तें कर्म करणें प्रशस्त आहे, एवढेंच ठरतें. तें न केल्यास पतित पुरुष होत नाहीं, असा याचा भावार्थ. )

( आतां तें वाक्य विधिवाक्यच आहे, असें जरी समजलें तरी कर्म करण्याचा ज्याना अधिकार नाहीं, अशा आंधळ्या, पांगळ्या, मुक्या मनुष्यास उद्देशून तें आहे, असें वादी सांगतो.) "अनधिकृतार्थो वा ।" अर्थ– अथवा तो अर्थवाद कर्माचा ज्याना अधिकार नाहीं, त्यांच्याकरितां आहे. ( वास्तव आत्मविद्या संन्यासी पुरुषाचे ठिकाणीं राहणारी नाहीं. तर कर्मिष्ठाचेच ठिकाणीं राहणारी आहे, व ती कर्माशीं संबंध ठेवणारी आहे. )

## १३ सिद्धांती या पूर्वपक्षाचा सविस्तर परिहार करितात

( भाष्यकार म्हणतात–) "न" अर्थ– हें तुमचें ह्मणणें बरोबर नाहीं. ( आत्मज्ञानी पुरुषालाही कर्मानुष्ठान जर अवश्य असेल तर आत्मविद्या कर्मनिष्ठ आहे असें ठरेल. विद्वानाचें कर्मानुष्ठानही, एक तर कर्मफलाची इच्छा असल्यास, काम्य कर्माप्रमाणें होईल, अथवा प्रभाकर मीमांसकाच्या ह्मणण्याप्रमाणें नियोगबलानें होईल. नियोग ह्मणजे श्रुतीची आज्ञा, विधान. नित्यकर्में जशीं केवळ श्रुति विधान करते ह्मणून करावीं लागतात, त्याप्रमाणेंच विद्वानाला कर्मानुष्ठानही विधिबलानें करावें लागेल. पण या दोन पक्षांपैकीं तुला येथें कोणता पक्ष मान्य आहे? विद्वान् फलाच्या इच्छेनें कर्म करतो, हा पक्ष घेतला तर तो बरोबर नाहीं. कारण.) "परमार्थविज्ञाने फलादर्शनि क्रियानुपपत्ते ।" अर्थ– परमार्थाचें विज्ञान झालें असतां कर्माचें फळच दिसत नाहीं आणि कर्माचें कांहीं फळच नाहीं, असें कळल्यावर पुरुषाच्या हातून क्रिया घडणें शक्य नाहीं ( आता या समुदायवाक्याचाच विस्तार करितात– ) "यदुक्तं कर्मिण एव चात्मज्ञानं कर्मसंबन्धि च इत्यादि तन्न ।" अन्वय –– आत्मज्ञानं कर्मिणः एव च कर्मसंबन्धि इत्यादि यत् उक्तं तत् न । अर्थ— ( वादानें ) आत्मज्ञान कर्म करणाऱ्या पुरुषालाच होतें व तें कर्माशीं संबंध ठेवणारें आहे, इत्यादि जें वर

म्हटलें आहे तें बरोबर नव्हे. ( कर्मसंबंधी म्हणजे कर्मांगभूत उक्थादिकांशीं संबंध ठेवणारें, त्यांचा आश्रय करून राहणारें. )

( वरील संग्रहवाक्यातील 'परमार्थविज्ञाने०' इत्यादि वाक्यांशाचा विस्तार करितात.) "परं ह्याप्तकामं सर्वसंसारदोषवर्जितं ब्रह्माहमस्मीति आत्मत्वेन विज्ञाने कृतेन कर्तव्येन वा प्रयोजनमात्मनोऽपश्यतः फलादर्शने क्रिया नोपपद्यते" अन्वय.—हि परं आप्तकामं सर्वसंसारदोषवर्जितं ब्रह्म अहं अस्मि इति आत्मत्वेन विज्ञाने (जाते सति) कृतेन कर्तव्येन वा (कर्मणा) आत्मनः प्रयोजन अपश्यतः (पुरुषस्य) फलादर्शने क्रिया न उपपद्यते । अर्थ—कारण पर म्हणजे प्राप्तकाम ( तृप्त ) व सर्व संसारदोषांनीं रहित असें ब्रह्म मी आहें, अशा रीतीनें आत्मत्वानें ( आत्मरूपानें ) ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां केलेल्या किंवा पुढें करावयाच्या कर्मामुळें आपल्याला कांहीं फळ प्राप्त करून घ्यावयाचें नाहीं, ( अथवा कृत किंवा कर्तव्य कर्मानें आपल्याला कांहीं प्रयोजन प्राप्त होण्यासारखें नाहीं; ) असें विचारानें जाणणाऱ्या पुरुषाची फळाच्या अभावीं क्रिया उपपन्न होत नाहीं. ( कारण कोणतेंही कर्म दोन कारणांनीं होतें. एक इष्टप्राप्तीकरितां व दुसरें अनिष्ट निवृत्तीकरितां, पण ज्याला आप्तकाम व सर्वसंसारदोषरहित ब्रह्मच मी आहें, असें साक्षात् कळलेलें असतें, त्याला आजवर केलेल्या व पुढें करावयाच्या कर्मांचें कांहीं फळ आपल्याला मिळेल, असें मुळींच वाटत नाहीं. फळ हेंच कोणत्याही प्रवृत्तीचें निमित्त आहे. म्हणूनच मनुस्मृतींत 'अकामस्य क्रिया काचिद् दृश्यते नेह कस्यचित् । यद्यद्धि कुरुते जन्तुस्तत्तत्कामस्य चेष्टितम् ॥' म्हणजे या जगांत कोणाही निष्काम ( निरिच्छ ) पुरुषाची कोणतीही क्रिया दिसत नाहीं. कारण प्राणी जें जें करतो, तें तें कामाचें चेष्टित आहे ( इच्छेचा व्यापार आहे ), असें म्हटलें आहे. फलाच्या अभावीं क्रिया संभवत नाहीं. ब्रह्माला आप्तकाम म्हणजे पूर्णमनोरथ ( ज्याचे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत ) असें विशेषण देऊन त्याळ कोणत्याही प्रयोजनाची, फळाची प्राप्ति करून घ्यावयाची नाहीं, असें सुचविलें व 'सर्वसंसारदोषवर्जितं' या विशेषणानें संसारदोषरूप अनर्थाचीही निवृत्ति करावयाची नाहीं, असें सांगितलें आहे. म्हणजे अशा-प्रकारचें ब्रह्मच आत्मा आहे, असें समजल्यावर तीं दोन्ही कर्मनिमित्तें अव-

शिष्ट रहात नाहींत. त्यामुळें विद्वानाची कोणतीही क्रिया उपपन्न होत नाहीं. त्याच्या हातून कोणतेंही कर्म संभवत नाहीं. तसेंच 'संसारदोष०' येथील दोष या पदानें राग व द्वेष या दोन दोषांचा अभाव असल्यामुळेंही प्रवृत्तीचा अभाव सूचित होतो. राग ह्मणजे आसक्ति, प्रेम व द्वेष ह्मणजे क्रोध. या दोन दोषांमुळेंच क्रमानें इष्टप्राप्ति व अनिष्टनिवृत्ति या दोन प्रयोजनांची इच्छा होते आणि त्या इच्छेमुळें प्रवृत्ति होते. ज्ञानानंतर पूर्वी केलेल्या कर्माशींही जर आत्म्याचा कांहीं संबंध नाहीं, तर पुढें करावयाच्या कर्माशीं तो कोठून असणार? हें 'कृतेन कर्तव्येन वा' या भाष्यानें सुचविलें आहे. कारण ज्ञानाच्यापूर्वी अनेक जन्मीं जीं कर्में घडलेलीं असतात तीं सर्व 'मी यांचा कर्ता आहें' या भावनेनेंच झालेलीं असतात, पण आत्मा पूर्ण व शुद्ध ब्रह्म आहे, असें ज्ञान, असा साक्षात्कार होताच त्यांचा व असंग आत्म्याचा कांहीं संबंध नाहीं, असें वाटून तींसुद्धा जर प्रयोजनशून्य होतात, तर साक्षात्कारानंतर मी कर्ता नाहीं तर नुस्ता साक्षी पूर्ण ब्रह्म आहें, असें कळल्यानंतर होणारीं कर्में सप्रयोजन कशीं होतील ? )

( वरील भाष्यानें 'प्रयोजनाच्या इच्छेनें ज्ञानी कर्में करील' या पक्षाचें निरसन केलें; आतां 'नित्यकर्मांप्रमाणें केवळ विधिवलानें ( श्रुतीनें सांगितलें आहे ह्मणून ) तो तीं करील' या दुसऱ्या पक्षाचें निरसन करितात ) "फलादर्शनेऽपि नियुक्तत्वात्करोतीति चेत् ।" अर्थ-फलाचें जरी अदर्शन ( अभाव ) असलें तरी श्रुतीनें नियुक्त केलेलें असल्यामुळें ज्ञानी कर्में करितो, ह्मणून ह्मणावें तर ( माझें हें कर्तव्य आहे, असें जाणणाराच श्रुतीच्या नियोगाचा विषय होतो. नियोग म्हणजे विधि, आज्ञा. नियोगाचा विषय होतो. म्हणजे नियोज्य होतो आणि एखाद्या कर्मापासून मिळणाऱ्या फळाची इच्छा ज्याला असते, तोच पुरुष 'हें माझें कर्तव्य आहे' असें जाणतो. म्हणजे कर्मफळाच्या इच्छेनें कर्तव्याचें ज्ञान, त्या ज्ञानामुळें श्रुतीच्या नियोगाचा विषय होणें, व नियोज्य झाल्यानंतर कर्मानुष्ठान, अशी परंपरा आहे. परंतु आत्मा असंग आहे, असें ज्याला कळतें त्याला हें माझें कर्तव्य आहे, असें मुळीं वाटतच नाहीं. त्यामुळें तो श्रुतिनियुक्तही होत नाहीं, असें भाष्यकार सांगतात ) "न । नियोगाविषयात्मदर्शनात् ।" अर्थ-नियुक्त झाल्यामुळें तो करील, असें ह्मणणें योग्य

नाहीं, कारण आत्मा नियोगाचा विषय होत नाहीं, असें त्यानें जाणलेलें असतें (आता त्याचेंच अधिक स्पष्ट उपपादन करितात) "**इष्टयोगमनिष्टवियोग चात्मनः प्रयोजनं पश्यस्तदुपायार्थी यो भवति स नियोगस्य विषयो दृष्टो लोके। न तु तद्विपरीतनियोगाविषयब्रह्मात्मत्वदर्शी॥**" अन्वय –आत्मन इष्टयोग अनिष्टयोगं च प्रयोजन पश्यन् य तदुपायार्थी भवति स लोके नियोगस्य विषय दृष्ट। तु तद्विपरीतनियोगाविषयब्रह्मात्मत्वदर्शी न। अर्थ–आत्म्याचें (आपलें) इष्टयोग व अनिष्टवियोग हें प्रयोजन पाहणारा जो त्याच्या (इष्टप्राप्ति–अनिष्टपरिहाराच्या) उपायाची इच्छा करणारा असतो तोच या लोकीं नियोगाचा विषय होतो, असें दिसतें. पण जो याच्या उलट नियोगाचा विषय न होणारें ब्रह्मच माझा आत्मा आहे, असें पाहणारा असतो, तो नियोगाचा विषय होतोसें दिसत नाहीं (कारण हें माझें कर्तव्य आहे, असें जाणत नसतानाही जर एखादा श्रुतीकडून नियुक्त होऊं लागला, तर मोठा अतिप्रसंगच होईल कारण श्रुतीच्या नियोगाला निमित्त काहीं लागत नाहीं, असें म्हटल्यास क्षत्रियानाच नियत असलेले राजसूयादि यज्ञही ब्राह्मणाचें कर्तव्य होईल कदाचित् करावयास योग्य असलेले अग्निष्टोमादिक सर्वदा करण्याचा प्रसंग येईल, असें भाष्यकार सांगतात–) "**ब्रह्मात्मत्वदर्श्यपि सन्नेन्नियुज्येत नियोगाविषयोऽपि सन्न कश्चिन्न नियुक्त इति सर्वं कर्म सर्वेण सर्वदा कर्तव्यं प्राप्नोति। तच्चानिष्टम्।**" अन्वय –ब्रह्मात्मत्वदर्शी अपि सन् नियोगाविषय. अपि सन् नियुज्येत चेत् कश्चित् न नियुक्त इति न। इति सर्वं कर्म सर्वेण सर्वदा कर्तव्यं प्राप्नोति। तत् च अनिष्ट अस्ति। अर्थ–एखादा पुरुष ब्रह्मच आत्मा आहे, असें जाणणाराही असून व (त्यामुळें) नियोगाचा अविषयही असून जर श्रुतीकडून नियुक्त केला गेला तर न नियोग केला गेलेला, असा कोणीही उरत नाहीं (म्हणजे प्रत्येक पुरुष नियुक्त झालेलाच असतो) त्यामुळें प्रत्येक कर्म प्रत्येकाला सदा अवश्य कर्तव्य आहे, असं होतें, पण तसें होणें इष्ट नव्हे

(शिवाय आत्मज्ञाला नियोग करणारा (नियोक्ता) कोण? कोणी आमच्या–तुमच्यासारखा सामान्य पुरुष कीं वेद? सामान्य पुरुष म्हणून म्हटलें तर तो विद्वानाचा नियोक्ता होऊं शकत नाहीं कारण आत्मज्ञ ईश्व–

रच माझा आत्मा आहे, असें जाणतो. त्यामुळें ईश्वररूप असलेला तोच सर्वांचा नियोक्ता आहे. स्वतः नियोक्ता असलेल्या त्याला त्याचाच नियोज्य (त्याच्या नियोगाचा विषय होणारा, आपल्या नियोक्त्याला) नियुक्त करील, त्याचा तो नियोज्य होईल, असें समजणें अगदींच विरु आहे, असें भाष्याकार सांगतात-) "न च स नियोक्तुं शक्यते केनचित्।" अन्वयः-च सः केनचित् नियोक्तुं न शक्यते। अर्थ-पण तो (ज्ञानी) कोणा दुसऱ्या पुरुषाकडून नियुक्त होणें शक्य नाहीं. (कोणाच्या नियोगाचा (आज्ञेचा, विधानाचा, प्रेरणेचा) विषय होऊं शकत नाहीं. कारण ज्ञानी ह्मणजे स्वतः आत्मा व आत्माच सर्वांचा नियोक्ता-सर्वांना नियुक्त करणारा, प्रेरणा करणारा आहे. तेव्हा या प्रेरकालाच दुसरा प्रेर्य नियुक्त कसा करणार? धनी आपल्या सेवकाचा प्रेरक असतो. ह्मणून तो जरी त्यांतील अनेकांना 'हें कर, हें कर' असें सांगून अनेक कार्यांत नियुक्त करीत असला तरी त्याला सेवकांतील कोणी एकादाही कधीं 'हें कर' असें ह्मणू शकत नाहीं. याच न्यायानें या चेतन प्रेरकाला दुसरा कोणीही अचेतन व म्हणूनच प्रेर्य प्रेरणा करूं शकत नाहीं.)

(अहो, पण ज्ञानी दुसऱ्या पुरुषाकडून जरी नियुक्त होणारा नसला तरी वेदाकडून नियुक्त केला जाईल. असा दुसरा पक्ष घेऊन त्यानें निरसन करितात.) "आम्नायस्यापि तत्प्रभवत्वात्। न हि स्वविज्ञानोत्थेन वचसा स्वयं नियुज्यते।" अर्थ-(वेदाकडूनही तो नियुक्त होऊं शकत नाहीं.) कारण आम्नाय ह्मणजे वेदही तत्प्रभव आहे-ह्मणजे त्याच्यापासून झालेला आहे. (ईश्वरभावास प्राप्त झालेल्या त्याच्यापासून वेद झालेला आहे. कारण शब्दराशिरूप वेद ह्मणजे ज्ञानी पुरुषाचा अनुभवच आहे. अर्थात् स्वात्मसाक्षात्कार जेव्हां होईल तेव्हांच वेदवाणी प्रवृत्त होईल, हें उघड आहे. अर्थात् वेद ह्मणजे आत्मज्ञाचें अनुभवानुसार वचन. आपल्या अनुभवानें उद्भवलेल्या वचनानें स्वतःच कोणी नियुक्त होत नाहीं.)

(शिवाय पाणिनीनें व्याकरणशास्त्र केलें. पण तें शास्त्र ह्मणजे त्याच सर्व ज्ञान नव्हे. तर त्याला जे अनेक विषय अवगत होते त्यांतील व्याकरण या एकाच विषयाचें तें ज्ञान आहे. अर्थात् त्या शास्त्राहून स्वतः शास्त्रकर्ता पाणिनी अधिक विषयांस जाणणारा, अधिक ज्ञानी होता, असें निःसं-

शय ठरतें त्याच न्यायानें वेदही जर ईश्वरापासून ( परमात्म्यापासून ) झालेला आहे तर तोही ईश्वराच्या अपरिमित ज्ञानाचा एकदेश ( अंश ) आहे, त्यामुळेंच तो ईश्वराहून अल्पज्ञ होय स्वत अल्पज्ञ असलेला तो बहुज्ञ ईश्वराला ( आत्म्याला ) नियुक्त कसा करणार ? असें भाष्यकार सांगतात "नापि बहुवित्स्वाम्यविवेकिना भृत्येन।" अन्वय – बहुवित् स्वामी अविवेकिना भृत्येन अपि न ( नियुज्यते )। अर्थ–बहुज्ञ स्वामी अविवेकी भृत्याकडूनही नियुक्त केला जात नाहीं. ( येथें अविवेकी ह्मणजे 'अल्पज्ञ' असें समजावें अथवा शब्दराशिरूप वेद जड आहेत, अचेतन आहेत त्यामुळेंही त्याना अविवेकित्व आहे. )

( वेद ईश्वरज्ञानपूर्वक आहे, ईश्वराच्या ज्ञानाचा तो एकदेश आहे, यापक्षीं वरील दोष जरी येत असला तरी वेद नित्य आहे, त्यापक्षीं तो येत नाहीं, अशी शंका घेतात– ) "आम्नायस्य नित्यत्वे सति स्वातन्त्र्यात्सर्वान्प्रति नियोक्तृत्वसामर्थ्यमिति चेत्।" अर्थ— वेदाला नित्यत्व असून त्यामुळेंच स्वातंत्र्यही असल्यामुळें ( ह्या-वेद नित्य असून शिवाय स्वतंत्रही आहे ह्मणून ) त्याला सर्वांचें नियोक्तृत्व आहे. ( ह्य वेद सर्वांचा नियोक्ता–प्रेरक होतो ) सर्वांना नियुक्त करण्याचें सामर्थ्य त्याच्या मध्यें आहे, असें ह्मणावें तर 'न। उक्तदोषात्।" अर्थ– तें बरोबर नाहीं. कारण ( वेद अचेतन आहे. अचेतन ह्मणजे जड जड पदार्थ नियोक्ता होऊं शकत नाहीं कारण नियोक्तृत्व हा चेतनाचाच धर्म आहे शिवाय जड वेदही नियोक्ता आहे, असें जरी क्षणभर मानलें तरी ) वर सांगितलेला दोष येतो. ( आता या संग्रह-वाक्याचाच विस्तार करितात– ) "तथापि सर्वेण सर्वदा सर्वमविशिष्टं कर्म कर्तव्यमित्युक्तो दोषोऽप्यपरिहार्य एव।" अर्थ–( आणि तसें जरी मानलें ) तरी प्रत्येकानें सर्वदा सर्व कर्म कांहीं विशेष न ठेवता करावें, हा पूर्वोक्त दोषही अपरिहार्यच होतो ( येथें 'सर्वमविशिष्टं' याच्या जागीं 'सर्वं शिष्टं' असा पाठ असावा, असें आनंदगिरींच्या टीकेवरून वाटत वेदाच्या नियोगाचा विषय न होणाऱ्या ( म्ह अनियोज्य ) अशाहीं विद्वानाला जर कर्तव्य आहे, असें ह्मटलें, तर सर्व शिष्ट (ह्मणजे विहित) कर्म सर्वांनींही करावें, असें होईल कारण मग अमक्यानेंच करावें व अमक्यानें करू नये, असा विहित कर्मांचा संकोच करण्यास कांहीं कारण उरत नाहीं.)

( आतां असंग ब्रह्मच आत्मा आहे, हा साक्षात्कार व कर्मांची कर्तव्यता हीं दोन्ही शास्त्रानेंच सांगितलेलीं असल्यामुळें आणि दोन्हीं विधानें करणाऱ्या शास्त्राला एकसारखेंच प्रामाण्य असल्यामुळें कांहीं वेळ आत्मज्ञान व कांहीं वेळ कर्मानुष्ठान होऊं शकेल, अशी शंका घेतात.–) "तदपि शास्त्रेणैव विधीयत इति चेत्।" अर्थ–तेंही शास्त्राकडूनच विधान केलें जातें, म्हणून म्हणाल ( म्हणजे ) "यथा कर्मकर्तव्यता शास्त्रेण कृता तथा तदप्यात्मज्ञानं तस्यैव कर्मिणः शास्त्रेण विधीयत इति चेन्न।" अर्थ–ज्याप्रमाणें शास्त्रानें कर्मकर्तव्यता केलेली आहे, त्याचप्रमाणें तें आत्मज्ञानही त्याच कर्में करणाऱ्या कर्मी पुरुषाला शास्त्रानेंच सांगितलेलें आहे, ( शास्त्रानेंच आत्मज्ञानाचें विधान केलें आहे, ) असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. ( स्वाभाविकपणेंच आत्मा अकर्ता आहे, असा आत्म्याविषयींचा बोध एकदा झाला असतां तो कर्ता आहे, या पूर्वीच्या समजुतीचा बाध होतो. त्यामुळें शास्त्रानें पुनः त्याच्या कर्तृत्वाचा बोध करणें, संभवत नाहीं, असें सांगतात.–) "विरुद्धार्थबोधकत्वानुपपत्तेः। न ह्येकस्मिन्कृताकृतासंबन्धित्वं तद्विपरीतत्वं च बोधयितुं शक्यम्। शीतोष्णतामिवाग्नेः।" अर्थ–शास्त्राला विरुद्धार्थबोधकत्व असणें, म्हणजे त्यानें विरुद्ध अर्थाचा बोध करणें शक्य नाहीं. कारण एकाच वस्तूचे ठिकाणीं कृत व कर्तव्य यांचें असंबन्धित्व ( म्ह. केलेलें व करावयाचें कर्म यांचा कांहीं संबंध नसणें ) व तद्विपरीतत्व ( म्ह. त्याच्या विपरीत कृत व कर्तव्य यांचा संबंध असणें ) यांचा बोध करविणें शक्य नाहीं. एकाच अग्नीच्या ठिकाणीं शीतत्वही आहे व उष्णत्वही आहे, असा बोध करतां येणें जसें अशक्य, त्याप्रमाणें. ( आत्मा मागें केलेल्या व पुढें करावयाच्या कर्मांशीं संबंध ठेवणारा, त्यांच्या योगानें लिप्त होणारा, पुण्यवान् व पापी होणारा नाहीं, व तो त्यांच्याशीं संबंधादि ठेवणारा आहे, असा विरुद्ध अर्थ शास्त्रालाहि सांगतां येणार नाहीं. )

( येणेंप्रमाणें अगोदर विद्वान्–नियोगाचा विषय न होणारा व अकर्ता, अशा आत्म्याला साक्षात् जाणणारा असल्यामुळें आणि त्याला प्रयोजनाची ( फळाची ) इच्छा नसल्यामुळें कर्म नाहीं, असें सांगितलें. आतां स्वतः विद्वानाला इष्टप्राप्ति व अनिष्टनिवृत्ति या फळांची इच्छा नसली

तरीही ' स्वर्गकामो यजेत् ' ह्मणजे ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्यानें यज्ञ करावा, या शास्त्राकडूनच ती इच्छा पुरपाच्या मनांत घातली जाते, उत्पन्न केली जाते, असें कोणी मीमांसक ह्मणतील. यास्तव आचार्य सांगतात.–) " न चेष्टयोगचिकीर्षाऽऽत्मनोऽनिष्टवियोगचिकीर्षा च शास्त्रकृता। सर्वप्राणिनां तद्दर्शनात्। शास्त्रकृतं चेत्तदुभयं गोपालादीनां न दृश्येत। अशास्त्रज्ञत्वात्तेषाम्।" अन्वयः–आत्मनः इष्टयोगचिकीर्षा अनिष्टवियोगचिकीर्षा च न शास्त्रकृता। सर्वप्राणिनां तद्दर्शनात्। तत् उभयं शास्त्रकृतं चेत् गोपालादीनां न दृश्येत। तेषां अशास्त्रज्ञत्वात्। अर्थ–आपला इष्ट पदार्थांशीं योग ( संबंध ) व्हावा, अशी इच्छा व अनिष्ट पदार्थांशीं वियोग व्हावा अशी इच्छा शास्त्रकृत नव्हे. ( म्ह. आपला अनुकूल वस्तूंशींच संयोग व्हावा व प्रतिकूल वस्तूंशीं झालेल्या संयोगाचा वियोग व्हावा, ही इच्छा शास्त्राच्या विधानामुळें, शास्त्राच्या उपदेशामुळें होत नाहीं ) कारण सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं ती ( स्वाभाविकपणेंच ) दिसते. ती दोन्ही प्रकारची इच्छा शास्त्रकृतच जर असती तर गुराखी इत्यादि अशास्त्रज्ञांच्या ठिकाणीं ती दिसली नसती. कारण ते शास्त्रज्ञ नसतात. ( भाष्यांत ' चिकीर्षा ' ह्मणजे करण्याची इच्छा असा जरी शब्द असला, तरी त्याचा अर्थ नुसती फलेच्छा असाच समजावा. कारण फलाच्या ठिकाणीं करण्याची इच्छा होणें अयोग्य आहे. फल आपोआप होतें; तें कोणाच्या करणाच्या इच्छेनें होत नाहीं. )

( कृत व कर्तव्य यांच्याशीं आत्म्याचा संबंध नाहीं, असें सांगणें व त्याच्याशीं आत्मसंबंध आहे, असें ह्मणणें हें परस्परविरुद्ध आहे, यास्तव शास्त्र त्याचा बोध करीत नाहीं, असें जर वाटत असेल, तर कृत व कर्तव्य यांच्याशीं आत्मसंबंध नाहीं, असा बोध तें करीतच नाहीं, तें आत्मा कृत व कर्तव्य कर्माशीं संबंध ठेवणारा आहे, असाच बोध करतें, असें समजा, ह्मणून ह्मणाल तर सागतों– ) " यद्धि स्वतोऽप्राप्तं तच्छास्त्रेण बोधयितव्यम्।" अर्थ— जें स्वतः ( स्वाभाविकपणेंच ) अप्राप्त असतें, त्याचा शास्त्रानें बोध करणें उचित होय. ( जें लौकिक प्रत्यक्षादि दुसऱ्या प्रमाणांनीं प्राप्त ( ज्ञात ) झालेलें नसतें त्याचाच बोध शास्त्र करतें. जें अन्यप्रमाणांनीं प्राप्त असतें त्याचें विधान तें करीत नाहीं, असा नियम आहे.

आत्म्याचा कृत अथवा कर्तव्य कर्माशीं संबंध नाहीं, हें ज्ञान दुसऱ्या कोणत्याही प्रमाणानें प्राप्त नाही. यास्तव शास्त्रासच त्याचा बोध करणें उचित आहे. आत्म्याचा कर्माशीं संबंध आहे, हेंच ज्ञान स्वाभाविकपणें सर्वांना असतें. यास्तव वस्तुतः शास्त्राला त्याचाच बोध करण्याची आवश्यकता नाहीं.) ' तच्चेत्कृतकर्तव्यताविरोध्यात्मज्ञानं शास्त्रेण कृतं कथं तद्विरुद्धां कर्तव्यतां पुनरुत्पादयेच्छीततामिवाग्नौ तम इव च भानौ । " अन्वयः-- कृतकर्तव्यताविरोधि तत् आत्मज्ञानं शास्त्रेण कृतं चेत् ( तर्हि ) पुनः तद्विरुद्धां कर्तव्यता, अग्नौ शीततां इव भानौ च तमः इव कथं उत्पादयेत् । अर्थ— कृत व कर्तव्यता यांच्या विरुद्ध असलेलें तें आत्मज्ञान जर शास्त्राकडून केलें गेलेलें असलें तर मग पुनः त्याच्या विरुद्ध असलेल्या कर्तव्यतेला ( तेंच शास्त्र ), अग्नीच्या ठिकाणीं जशी शीतता व सूर्यामध्यें अंधकार त्याप्रमाणें, कसें उत्पन्न करील? ( मीं हें केलें आहे व मला हें करावयाचें आहे, या ज्ञानाच्या विरोधी असलेल्या आत्मज्ञानाचा उपदेश केल्यावर तेंच शास्त्र त्या ज्ञानाच्या विरुद्ध असलेल्या कर्तव्यताज्ञानाचा उपदेश कसा करील? )

( अहो, पण कर्माशीं संबंध न ठेवणाऱ्या आत्म्याचें ज्ञान करून घ्यावें, असा विधि कोठेंही नाहीं. ह्मणून वेदान्तही तशा प्रकारच्या आत्म्याचा बोध करीत नाहीं, अशी शंका घेतात- ) " न बोधयत्येवेति चेत् " अन्वयः— न बोधयति एव इति चेत् । अर्थ— बोध करीत नाहींच, असें ह्मणाल तर " न । स मे आत्मेति विद्यात्प्रज्ञानं ब्रह्मेति चोपसंहारात् । " अन्वयः— न सः मे आत्मा इति विद्यात् । च प्रज्ञानं ब्रह्म इति उपसंहारात् । अर्थ— तें बरोबर नाहीं. तो माझा आत्मा आहे, असें जाणावें व प्रज्ञान ( जीवचैतन्य ) ब्रह्म आहे, असा उपसंहार केला आहे. ( आत्मज्ञानाविषयीं विधि नाहींच, हें ह्मणणें साहस होय. कारण पुरुषाला कर्तव्याभिमुख करणें, हें विधीचें प्रयोजन आहे. ' आत्मा वा अरे द्रष्टव्यः ' इत्यादि वेदान्तवाक्यें अर्थवादरूप असलीं तरी त्यांच्यामध्यें विधीचें स्वरूप आहे. ' द्रष्टव्य. ' हा शब्द विध्यर्थीच आहे. शिवाय स्वरूपाचा बोध करणारें केवळ आत्मपर वाक्यही आहे. यास्तव आत्मबोधक वेदान्त वाक्यच नाहीं, असें ह्मणणें अयोग्य आहे. )

( त्याचप्रमाणें ज्ञानाच्या उत्पत्तीचा अनुवाद करणारी श्रुति असल्यामुळेंही ज्ञान होत नाहीं, अशी आशंका करणें अनुचित होय, असें सांगतात–) " तदात्मानमेवावेत् । " अर्थ–तें जीवरूपानें अवस्थित असलेलें ब्रह्म आपल्यालाच जाणतें झालें ( त्याचप्रमाणें ) "तत्त्वमसि" अर्थ–तत्–तें सद्रूप ब्रह्मच त्वं–तूं श्वेतकेतु असि–आहेस "इत्येवमादीनां तत्परत्वात्"। अर्थ–इत्यादि वाक्यांना आत्मपरता आहे. ( म्ह० तीं वाक्यें आत्म्याचें प्रतिपादन करणारीं आहेत. वरील भाष्यांतील आदिशब्दानें ' अयमात्मा ब्रह्म ' इत्यादि दुसरींही महावाक्यें घ्यावीं. पण हीं वाक्यें ' आत्मा कर्ता आहे ' असा बोध करणाऱ्या सर्व कर्मकांडाच्या विरुद्ध आहेत. यास्तव तसल्या वाक्यांनीं आत्मा अकर्ता आहे, इत्यादि ज्ञान जरी होत असलें, तरी तें भ्रांत ज्ञान आहे, असें कोणी ह्मणेल ह्मणून आचार्य सांगतात– ) " उत्पन्नस्य च ब्रह्मात्मविज्ञानस्याबाध्यमानत्वान्नानुत्पन्नं भ्रान्तं वेति शक्यं वक्तुम् । " अर्थ–आणि उत्पन्न झालेल्या त्या ब्रह्मात्मज्ञानाचा बाध होत नसल्यामुळें तें मुळीं उत्पन्नच झालें नाहीं, अथवा भ्रान्त ज्ञान आहे, असें ह्मणतां येणें शक्य नाहीं. ( कर्मकांडावरून होणारें ' आत्मा कर्ता आहे, ' हें ज्ञान वास्तविक नव्हे. कर्मकांडानें मनुष्यमात्राला स्वाभाविकपणेंच ज्ञात होणाऱ्या आत्म्याच्या कर्तृत्वाचा अनुवाद करून केवळ उत्कर्षाचा उपाय सांगितला आहे. त्यामुळें त्याच्या योगानें केवळ आत्मबोधक वेदान्तवाक्यजन्य ज्ञानाचा बाध होत नाहीं. शिवाय आत्मबोधक वाक्य ऐकलें असतां ' अकर्ता आत्मा मी आहे ' असें ज्ञान होतें, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. तसेंच, ' मी अकर्ता आत्मा नव्हे, ' असें विपरीत ज्ञानही होत नसल्यामुळें ' ज्ञान होत नाहीं व तें भ्रान्त आहे, असें ह्मणणें सर्वथा अनुचित आहे )

( विद्वानाला कर्माच्या योगानें कांहीं फळ मिळवावयाचें नसल्यामुळें त्याची कर्मामध्यें प्रवृत्ति होत नाहीं, असें आह्मी वर सांगितलें आहे. पण त्यावर वादी शंका घेतो–) " त्यागेऽपि प्रयोजनाभावस्य तुल्यत्वामिति चेत् । " अर्थ–कर्माच्या त्यागामध्यें ही प्रयोजनाचा अभाव तुल्यच आहे ( म्हणजे विद्वानाला कर्मानुष्ठानामुळें जसें कांहीं फळ मिळवावयाचें नाहीं, तसेंच कर्मत्यागामुळेंही कांहीं फळ मिळणें शक्य नाहीं. यास्तव फळाच्या अभावीं त्याची प्रवृत्ति कर्माप्रमाणेंच कर्मत्यागामध्येंही होणार नाहीं ), ह्मणून ह्मणाल कारण

" नाकृतेनेह कश्चन इति स्मृतेः । " अर्थ– ( त्या विद्वानाला कर्मानुष्ठान केल्यामुळें जसें कांहीं फळ मिळत नाहीं त्याचप्रमाणें ) तें अकृतेन–न केल्यानेंही इह–या लोकीं कश्चन–कांहीं अर्थ न–नाहीं, असें भगवद्गीतेंत सांगितलें आहे, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. ( आतां या शंकेचेंच अधिक विवरण करितात– ) " य आहुर्विदित्वा ब्रह्म व्युत्थानमेव कुर्यादिति तेषामप्येष समानो दोषः प्रयोजनाभाव इति चेत् । न ।" अन्वयः–' ब्रह्म विदित्वा व्युत्थानमेव कुर्यात् ' इति ये आहुः तेषां अपि एषः प्रयोजनाभावः दोषः समानः इति चेत् । न । अर्थ–ब्रह्माला जाणून व्युत्थानच करावें ( संन्यास करावा ), असें जे ह्मणतात त्यांच्या ह्मणण्यावरही हा प्रयोजनाभावरूप दोष तसाच येतो, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. ( कर्मत्याग ह्मणजे संन्यास, हा जर व्यापाररूप असता तर कोणताही व्यापार क्लेशात्मक असतो, असा न्याय असल्यामुळें व कोणीही कोणताही क्लेश फळावाचून सहन करण्यास तयार होत नाहीं, असा नियम असल्यामुळें पुरुष संन्यासही फळाच्या अपेक्षेनेंच करितो, असें ह्मणतां आलें असतें. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. तर संन्यास ह्मणजे नुस्ता क्रियांचा अभाव; औदासिन्य; यापेक्षां संन्यासाचें पृथक्स्वरूप नाहीं. अर्थात् सर्व कर्मांचा अभाव किंवा औदासिन्य हें स्वास्थ्यरूप आहे. त्यामुळें स्वतः तेंच प्रयोजन आहे. यास्तव संन्यास आपणही एकाद्या फळाच्या अपेक्षेनें होतो, असें ह्मणण्याचें कांहीं कारण नाहीं, असें आचार्य सांगतात– ) " अक्रियामात्रत्वाद्व्युत्थानस्य । " अन्वयः–व्युत्थानस्य अक्रियामात्रत्वात् । अर्थ–कारण व्युत्थान अक्रियामात्र आहे. ( त्याग हा व्यापार नव्हे. कारण कोणताही व्यापार सहेतुक असतो. त्यागाला कांहीं नियत हेतु नाहीं, असें सांगण्यासाठीं भाष्यकार ह्मणतात. ) " अविद्यानिमित्तो हि प्रयोजनस्य भावः ।" अन्वयः–हि प्रयोजनस्य भावः अविद्यानिमित्तः । अर्थ–कारण फळाची तृष्णा अविद्यानिमित्तक आहे. ह्मणजे अविद्या–आत्मस्वरूपाचें अज्ञान हें फळाच्या तृष्णेचें निमित्त आहे. त्यामुळें " न वस्तुधर्मः " अन्वयः–वस्तुधर्मः न । अर्थ–तो वस्तुधर्म नव्हे. ( कारण तृष्णा हा जर वस्तुधर्म असता, तर विद्वानालाही तृष्णा होणें साहजिक होतें. पण तो वस्तुधर्म ( आत्मस्वभाव ) नव्हे. तर अविवेकामुळें आत्म्याचे ठिकाणीं उद्भवणारा औपाधिक

स्वभाव आहे. तो जर वस्तुधर्म असता तर विद्वान्, अविद्वान्, निजलेले, मूर्च्छित होऊन पडलेले, इत्यादि सर्वांना तृष्णा होत असल्याचा अनुभव आला असता. कारण त्या त्या सर्व दृष्टांत वस्तु–आत्मा असतो त्यामुळें त्याच्या स्वभावभूत तृष्णेचाही अनुभव येणें साहजिक आहे. पण तसा तो येत नाहीं. तस्मात् तृष्णा हा वस्तुस्वभाव नव्हे. कारण ) " सर्वप्राणिनामदर्शनात् । " अर्थ–सर्व प्राण्यांना ( सर्वदा ) तृष्णा असते, असें दिसत नाहीं.

१४ तृष्णाच सर्व प्रवृत्तींचें निमित्त.

( याप्रमाणें तृष्णा अविद्याजन्य आहे, असें सांगून आतां ती तृष्णाच प्राण्याच्या सर्व प्रवृत्तींचें, सर्व व्यापाराचें निमित्त आहे, असें सांगतात– ) " प्रयोजनतृष्णया च प्रेर्यमाणस्य वाङ्मनःकायैः प्रवृत्तिदर्शनात् । " अर्थ–फलाच्या तृष्णेनें प्रेरित होणाऱ्या पुरुषाची वाणी, मन व शरीर यांच्या योगानें प्रवृत्ति होते, असें आढळतें. ( म्हणजे तृष्णेच्या योगानेंच प्राण्याची सर्व प्रवृत्ति होत असते असें दिसतें आणि नुसतें दिसतें इतकेंच नव्हे तर तसें सांगणारी श्रुतिही आहे. ) " सोऽकामयत जाया मे स्यात्, इत्यादिना पुत्रवित्तादि पाङ्क्तलक्षणं काम्यमेवेति । 'उभे ह्येते साध्यसाधनलक्षणे एषणे एव ' इति वाजसनेयिब्राह्मणेऽवधारणात् । " अन्वयः–' सः जाया मे स्यात् ( इति ) अकामयत ' इत्यादिना च 'उभे हेते साध्यसाधनलक्षणे एषणे एव ' इति ( वाक्येन ) पुत्रवित्तादि पाङ्क्तलक्षणं काम्यं एव इति वाजसनेयि ब्राह्मणे अवधारणात् । अर्थ–' तो आत्मा मला भार्या असावी, अशी इच्छा करता झाला,' या वाक्यानें व 'या दोन्ही साध्यसाधनरूप एषणाच आहेत ' या वाक्यानें पुत्रवित्तादि पांक्तलक्षण कर्म काम्यच आहे, असा वाजसनेयि ब्राह्मणात निश्चय केला आहे. ( पंक्ति हा छंद पांच अक्षरांचा असतो. येथेंही भार्या, पुत्र, दैववित्त, मानुषवित्त व कर्म या पांचांचा योग आहे. म्हणून हें कर्म पांक्तलक्षण, पंक्ति–छंदाच्या लक्षणानें युक्त आहे. )

१५ तृष्णेच्या अभावीं संन्यास अनायासानें सिद्ध होतो.

( याप्रमाणें क्रियेचें निमित्त सांगून तें नसल्यामुळेंच आत्मज्ञाचा कर्मत्याग अनायासानेंच सिद्ध होतो, असें आचार्य सांगतात. ) " अविद्या-

कामदोषनिमित्ताया वाङ्मनःकायप्रवृत्तेः पाङ्क्तलक्षणाया विदुषोऽविद्यादिदोषाभावादनुपपत्तेः क्रियाभावमात्रं व्युत्थानं न तु यागादिवदनुष्ठेयरूपं भावात्मकम्। " अन्वयः–विदुषः अविद्यादिदोषाभावात् अविद्याकामदोषनिमित्तायाः पाङ्क्तलक्षणायाः वाङ्मनःकायप्रवृत्तेः अनुपपत्तेः क्रियाभावमात्रं व्युत्थानं। न तु यागादिवदनुष्ठेयरूपं भावात्मकम्। अर्थ–विद्वानाला अविद्या–काम–कर्म या दोषांचा अभाव असल्यामुळें ( आत्मज्ञाचे ठिकाणीं त्यांचा अभाव असल्यामुळें ) अविद्या व तज्जन्य फलतृष्णा हे दोषच जिचें निमित्त आहे, अशा पांचलक्षण वाचिक, मानसिक व शारीर प्रवृत्तीचीच अनुपपत्ति होते. ( म्ह. तीन्ही प्रकारची प्रवृत्ति होणें अशक्य होतें. ) त्यामुळें नुसता क्रियेचा–प्रवृत्तीचा अभाव हेंच व्युत्थान आहे. तें यज्ञादिकांप्रमाणें अनुष्ठानरूप, भावरूप नव्हे. तर अनुष्ठानाच्या अभावरूप आहे. तृष्णेच्या अभावीं विद्वानाचें क्रियाभावरूप व्युत्थान अनायासानेंच सिद्ध होतें. अर्थात् अशा रीतीनें औदासिन्यरूप कर्माभाव हा आत्मज्ञाचा स्वभाव असल्यामुळें तो यत्नावाचूनच सिद्ध आहे, असें एकदा ठरलें ह्मणजे मग त्याच्या प्रयोजनाची अपेक्षाच रहात नाहीं, असें भाष्यकार सांगतात–) " तच्च विद्यावत्पुरुषधर्म इति न प्रयोजनमन्वेष्टव्यम्। " अर्थ–तें व्युत्थान हा विद्यावान् पुरुषाचा धर्म ( स्वभाव ) आहे, यास्तव प्रयोजन शोधण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. ( अज्ञानाची निवृत्ति झाली असतां अज्ञानाचें कार्य आपोआप निवृत्त होतें, याविषयीं दृष्टान्त सांगतात ) " न हि तमसि प्रविष्टस्योदित आलोके यद्गर्तपङ्ककण्टकाद्यपतनं तत्किंप्रयोजनमिति प्रश्नार्हम्"। अन्वयः–हि तमसि प्रविष्टस्य आलोके उदिते सति यद् गर्तपङ्ककण्टकाद्यपतनं तत् किंप्रयोजनं इति प्रश्नार्हम्। अर्थ–कारण अंधकारात प्रविष्ट झालेल्या पुरुषाचें–प्रकाशाचा उदय झाला असता खळगे, चिखल, कांटे इत्यादिकांमध्यें–न पडणें याचें प्रयोजन काय, असा प्रश्न करतां येत नाहीं. ( ह्मणजे अंधकारातून जात असतांना जसा एकादा पुरुष अडखळतो, खड्ड्यांत पडतो, चिखल, कांटे इत्यादिकांत पडतो, तसा तो प्रकाशाचा उदय झाला असता पडत नाहीं, पण त्याच्या त्या न पडण्याचें फळ काय, असा प्रश्न करणें, फारसें शहाणपणाचें नव्हे. )

१८सर्वप्रवृत्तींचा त्याग, हाच संन्यास, याविषयीं शंका व समाधान

(आता याविषयीं वादी– अहो व्युत्थान पुरुषाच्या व्यापाराधीन नाहीं, संन्यास करणें, ह्मणजे सर्व प्रवृत्तींचा त्याग करणेंच आहे, त्याहून दुसरें कांहीं कर्तव्य नाहीं, ह्मणून जर ह्मणाल तर विधीला अवकाशच रहात नाहीं. त्यामुळें विद्वानाचें नियमानें व्युत्थानच होईल, असाही भरंवसा देता येत नाहीं– अशी शङ्का घेतो–) "व्युत्थान तर्ह्यर्थप्राप्तत्वान्न चोदनार्हमिति गार्हस्थ्ये चेत्परब्रह्मविज्ञानं जात तत्रैवासत्वकुर्वत आसनं न ततोऽन्यत्र गमनमिति चेत्।" अन्वयः— तर्हि व्युत्थान अर्थप्राप्तत्वाद् न चोदनार्ह इति गार्हस्थ्ये परब्रह्मविज्ञानं चेत् जात तत्र एव अकुर्वत. आसनं अस्तु तत. अन्यत्र गमन न भवतु इति चेत्। अर्थ— तर मग व्युत्थान अर्थप्राप्तच असल्यामुळें (त्याच्याकरिता दुसऱ्या विधानादिकाची आवश्यकताच नसल्यामुळें) तें चोदनावाक्याचा (अमुक कर, अशा प्रवर्तक वाक्याचा) विषयच होण्यास योग्य नाहीं. यास्तव गृहस्थाश्रमातच परब्रह्मविज्ञान जर झालें, तर त्या आश्रमातच कांहीं एक *कर्म न करणाऱ्या त्याचें आसन (अवस्थान, स्थिति) असो, त्या आश्रमास* सोडून दुसऱ्या आश्रमात (सन्यासाश्रमात) त्याचें गमन न होवो. ह्मणून जर ह्मणशील तर "न। कामप्रयुक्तत्वाद्गार्हस्थ्यस्य। 'एतावान्वै काम' इति। 'उभे ह्येते एषणे एव' इत्यवधारणात्।" अर्थ— तें बरोबर नाहीं. कारण गार्हस्थ्य (गृहस्थाश्रम) कामप्रयुक्त आहे. (तृष्णेमुळें, पुत्रादिकांच्या कामनेमुळें गृहस्थाश्रम प्रवृत्त होतो.) कारण 'काम काय तो एवढाच,' 'ह्या दोन्ही एषणाच आहेत' असा निश्चय केलेला आहे. (तू गृहस्थाश्रम कशाला समजतोस? 'मी गृहस्थ आहें,' अशा अभिमानपुरःसर 'हा माझा पुत्र, हें माझें धन' इत्यादि अभिमान असणें, हा गृहस्थाश्रम कीं शिखा, यज्ञोपवीत, शुभ्र वस्त्रें इत्यादि गृहस्थाचीं चिन्हें, हा गृहस्थाश्रम? पहिला पक्ष तुला मान्य असेल तर आत्मज्ञ हा गृहस्थ नव्हे, असें तुलाही कबुल करावें लागेल. कारण विद्येमुळें आत्म्याच्या ठिकाणचा अविद्याकार्यरूप अभिमान निवृत्त झालेला असतो आणि दुसरा पक्ष तुला मान्य असेल तर विद्वानाच्या ठिकाणीं गृहस्थाचीं पूर्वोक्त चिन्हें जरी असलीं तरी त्याविषयींचा अभिमान नसल्यामुळें तीं (चिन्हें)

अकिंचित्कर ( व्यर्थ ) आहेत. सन्याशाच्या ठिकाणीं जसा अभिमान नसतो, तसाच त्याच्याही ठिकाणी तो नसल्यामुळे गृहस्थाच्या चिह्नांनी बाहेरून मंडित झालेलाही तो परमार्थत सन्याशीच आहे पण यावर-असें जर आहे तर सन्याशाच्या लिंगविषयींही विद्वानाला अभिमान नसल्यामुळें त्याच्या सन्यासाश्रमाचीही असिद्धि होते. ह्मणजे त्याचा सन्यासाश्रमही सिद्ध होत नाही,-ह्मणून ह्मणाल तर सांगता. ) "कामनिमित्त-पुत्रवित्तादिसंबन्धनियामाभावमात्रं न हि ततोऽन्यत्र गमनं व्युत्थानमुच्यते।" अर्थ-कामनाप्रयुक्त पुत्रवित्तादिसंबधाचा नियमानं अभाव, हे एवढेंच व्युत्थान आहे. त्याच्यापासून दुसऱ्या कोठें जाणे, याला व्युत्थान ह्मणत नाहीत ( मला पुत्र व्हावा, अशा कामनेमुळे पुत्रादिकांशी संबंध होतो. त्याचा नियमानें अभाव होणें, हेंच काय ते व्युत्थान आहे. दुसऱ्या कोठें जाणें, हे व्युत्थान नव्हे. हा माझा पुत्र आहे, हे धन आहे, इत्यादि प्रकारचा सर्व अभिमान टाकणे, हाच संबंधाचा नियमानें अभाव आहे आणि अभिमानत्यागाच्या द्वारा सर्वांचा संबंध सोडणे, हेच परमहंस परिव्राजाचें मुख्य लक्षण आहे. कोणत्याही प्रकारचे विशेष लिंग ( चिह्न ) धारण करणे हे त्याचे ( सन्याशाचें ) लिंग नव्हे कारण 'कोणतेंही चिह्न हे धर्माचें निमित्त नव्हे,' असें सांगणारी स्मृति आहे. यास्तव गृहस्थांचें चिह्न असले तरी अभिमानशून्य गृहस्थाचें व्युत्थान ( पारिव्राज्य, सन्यास ) सिद्ध आहे, असा भाव. ) "ततो न गार्हस्थ्य एवाकुर्वत आसनमुत्पन्नविद्यस्य।" अन्वय-ततः उत्पन्नविद्यस्य गार्हस्थ्ये एव अकुर्वतः आसनं न ( भवति )। अर्थ-यास्तव ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे, त्या पुरुषाचें अभिमानात्मक गृहस्थाश्रमामध्ये कर्म न करिताना ( कर्म केल्यावाचून ) अवस्थान होत नाहीं ( तर मग त्याला गुरुशुश्रूषा इत्यादिकांविषयींही अभिमान नसतें, असें होईल, असें कोणी ह्मणेल तर ती इष्टापत्तिच आहे ह्मणजे तसें होणें आह्माला इष्टच आहे, असें सांगतात-) "एतेन गुरुशुश्रूषातपसोरप्यप्रतिपत्तिर्विदुषः सिद्धा।" अन्वयः-एतेन विदुषः गुरुशुश्रूषातपसी अपि अप्रतिपत्तिः सिद्धा। अर्थ-या सांगण्यावरून विद्वान् गुरुशुश्रूषा व तप याचाही स्वीकार करीत नाहीं, असें ठरलें

### १७ याविषयीं शंका

( ज्याप्रमाणें तुज सिद्धान्ताच्या मतीं-पुत्रादिसंग्रहरहित भिक्षूचेंही देहधारण अवश्य आहे पण तें व्हावें अशी इच्छा करणाऱ्या त्याला परिग्रहाचा ( दान घेण्याचा ) कलंक लागू नये ह्मणून भिक्षाटनादिकांचाच नियम मानलेला आहे, त्याचप्रमाण अभिमानशून्य असलेल्याही गृहस्थाचें अवस्थान गृहांतच होऊं दे त्याला भिक्षुक होण्याचेंच कांहीं कारण नाहीं कारण अभिमान सोडून गृहांत राहणें व अभिमान सोडून भिक्षु होणें, हीं दोन्हीं सारखींच आहेत त्यांत विशेष कांहीं नाहीं, अशी शंका घेतात )

**' अत्र केचिद्गृहस्था भिक्षाटनादिभयात्परिभवाच्च त्रस्यमानाः सूक्ष्मदृष्टिता दर्शयन्त उत्तरमाहुः । भिक्षोरपि भिक्षाटनादिनियमदर्शनाद्देहधारणमात्रार्थिनो गृहस्थस्यापि साध्यसाधनैषणोभयविनिर्मुक्तस्य देहमात्रधारणार्थमशनाच्छादनमात्रमुपजीवतो गृह एवास्त्वासनमिति। "** अन्वय -अत्र केचित् गृहस्था भिक्षाटनादिभयात् च परिभवात् त्रस्यमाना सन्त सूक्ष्मदृष्टिता दर्शयन्त उत्तर आहु -देहधारणमात्रार्थिन भिक्षो अपि भिक्षाटनादि नियमदर्शनात साध्यसाधनैषणोभयविनिर्मुक्तस्य देहमात्रधारणार्थं अशनाच्छादनमात्र उपजीवत गृहस्थस्य अपि गृहे एव आसन अस्तु " इति । **अर्थ**-याविषयीं कांहा गृहस्थ भिक्षाटनादिकांच्या भीतीनें व पामर जन तिरस्कार करतील ह्मणून भयभीत होत्साते आपली सूक्ष्मदृष्टिता दाखवीत असें उत्तर सांगतात -केवळ देहधारणाचीच इच्छा करणाऱ्या भिक्षूला ह्मणजे सन्याशाला ही भिक्षाटनादिकांविषयीं नियम आहे, असें आढळत असल्याकारणानें साध्य-पुत्र, लोक इत्यादि व साधन-कर्म, उपासना इत्यादि या दोन्ही विषयींच्या इच्छेपासून मुक्त झालेल्या, व केवल देहधारण व्हावें एवढ्याचसाठीं नुसतें भोजन व आच्छादन यांच्यावरच निर्वाह करणाऱ्या गृहस्थाचेंही गृहांत आसन असू दे ( ज्याना कधीं कोणाच्या दारापाशीं जाऊन कांहीं मागण्याची सवय नसते, त्याना सन्यास घेतल्यास भिक्षा मागावी लागल, हीं मोठी भीति वाटत अथवा आपण एकाद्या पामराच्या घरीं जाऊन ' नारायण ' असें ह्मटल्यास ' अरे जा जा मोठा आला आहे नारायण ह्मणून भिक्षा मागण्यास ! आमच्या येथे कांहीं मिळणार नाहीं, जा ' असें बोलून तो आपला तिरस्कार करील,

या भीतीनेंही ते व्याकुळ होतात आणि त्यामुळें आपलें सूक्ष्मदर्शित्व (सूक्ष्मबुद्धिमत्ता,) दाखवीत ते असें ह्मणतात. पण वस्तुतः भयानें एखाद्या विधीचा विपरीत अर्थ सांगणें, हें सूक्ष्मदर्शित्व नसून स्थूलबुद्धित्वच आहे. केवळ देहधारणार्थ भिक्षूला जसा भिक्षा मागण्याविषयीं नियम सांगितलेला आहे, तसाच साध्य व साधनरूप एषणांपासून निवृत्त झालेल्या गृहस्थालाही केवळ देहनिर्वाहापुरतें अन्न–वस्त्र घेऊन गृहांतच रहातां येणें शक्य आहे, असें संन्यासाला भिणारे ते ह्मणतात.)

१८ समाधान.

(पण सर्व एषणाचा त्याग करून गृहात राहणाऱ्या त्याला स्त्री आहे कीं नाहीं ? जर असेल तर–) "न। स्वगृहविशेषपरिग्रहनियमस्य कामप्रयुक्तत्वादित्युक्तोत्तरमेतत् ।" अर्थ–तें बरोबर नाहीं. कारण स्त्री, या विशेष परिग्रहाविषयीं नियम करणें, कामनाप्रयुक्तच आहे, असें याचें उत्तर दिलेंच आहे. (आत्मज्ञानानंतरही स्त्री, हा एवढाच एक परिग्रह मजपाशीं असावा, अशी इच्छा करणें याचेंही निमित्त कामनाच आहे. कामनेवांचून अशी इच्छा किंवा नियमही करितां येणें शक्य नाहीं. वर 'कामप्रयुक्तत्वाद्गार्हस्थ्यस्य' (पृष्ठ २०) या वाक्यानेंच आह्मीं यांचें उत्तर दिलें आहे. बरें, स्त्रीपरिग्रह नाहीं, ह्मणून ह्मणाल तर त्याला द्रव्यादि दुसऱ्या परिग्रहाचा अधिकार नाहीं, असें होतें. कारण ज्याला स्त्री असते, त्यालाच द्रव्यपरिग्रहाचा अधिकार असतो त्यामुळें स्त्रीच्या अभावीं गृहांत राहणाऱ्याही त्याला अर्थात्च द्रव्याचा परिग्रह करता येत नाहीं. फार काय, पण त्याला स्वतःच्या द्रव्याचाही परिग्रह करितां येत नाहीं. त्यामुळें निर्वाहाचें साधनच नाहींसें होतें आणि दुसऱ्या कोणत्याही प्रकारें जीवनाची सिद्धि होत नसल्याकारणानें भिक्षाटनाचा नियम आपोआप ठरतो, असें भाष्यकार सांगतात–) "स्वगृहविशेषपरिग्रहाभावे च शरीरधारणमात्रप्रयुक्ताशनाच्छादनार्थिनः स्वपरिग्रहविशेषाभावेऽर्थाद्भिक्षुकत्वमेव।" अर्थ–आणि स्त्री, या विशेष परिग्रहाच्या अभावीं केवळ शरीरधारणाला अवश्य तितकेंच भोजन व आच्छादन, यांची इच्छा करणाऱ्या पुरुषाला स्वतःचा वित्तरूपी विशेष परिग्रहही नाहींसा झाला असतां अर्थात् भिक्षुत्वच प्राप्त होतें. (पुत्रादिकांपासून धन घेऊन जीवन करण्यास काय हरकत

आहे, ह्मणून ह्मणाल तर सांगतों. पुत्रादिकांचें धनही त्यांना परकीयच होय. कारण त्या धनावर वित्ताचें स्वत्व नसतें व पुत्रादिक 'हें माझें' असें ह्मणत असतात त्यामुळें स्वतः गृहस्थानें स्वकष्टानें संपादन केलेल्याही धनावर 'हें माझें' असा त्याचा अभिमान नसल्यामुळें व पुत्र तसा अभिमान ठेवीत असल्यामुळें पुत्रादिकांचें धनही परकीय धनासारखेंच होय. यास्तव आत्मज्ञाला भिक्षुत्वाचाच नियम आहे )

## १२ याविषयीं आणखी एक मत व त्याचें निरसन

( दुसरे कित्येक ह्मणतात कीं, भिक्षूलाही भिक्षाटनादिकाविषयीं–'त्यानें पूर्वी संकेत करून न ठेविलेल्या सात घरीं भिक्षा मागावी,' शौचाविषयीं–'भिक्षूनें ब्रह्मचाऱ्याच्या चतुर्गुण ( चौपट ) शौच करावें' इत्यादि नियम प्रत्यवायपरिहारार्थ जसे आहेत, त्याप्रमाणें गृहस्थाचीही 'यावज्जीव अग्निहोत्र करावें' इत्यादि अर्थाच्या श्रुतीच्या बळानें प्रत्यवायपरिहारार्थ नित्य कर्मामध्यें नियमानें प्रवृत्ति होऊं शकेल भाष्यकार आतां अगोदर याच त्याच्या म्हणण्याचा अनुवाद करितात –) "शरीरधारणार्थायां भिक्षाटनादिषु प्रवृत्तौ यथा नियमो भिक्षो शौचादौ च तथा गृहिणोऽपि विदुषोऽकामिनोऽस्तु नित्यकर्मसु नियमेन प्रवृत्तिर्यावज्जीवादिश्रुतिनियुक्तत्वात्प्रत्यवायपरिहारायेति ।" अन्वयः–यथा भिक्षोः शरीरधारणार्थायां भिक्षाटनादिषु प्रवृत्तौ शौचादौ च नियमः तथा विदुषः अकामिन गृहिण अपि यावज्जीवादिश्रुतिनियुक्तत्वात्प्रत्यवायपरिहाराय नित्यकर्मसु नियमेन प्रवृत्तिः अस्तु । इति । अर्थ–ज्याप्रमाणें भिक्षूला शरीर धारणार्थ अवश्य असलेल्या भिक्षाटनादिप्रवृत्तीविषयीं व शौचादिकाविषयीं नियम आहे, त्याप्रमाणें विद्वान् व निष्काम गृहस्थाचीही–'यावज्जीवादि०' पूर्वोक्त श्रुतीनें विधान केलेलें असल्यामुळें प्रत्यवायपरिहारार्थ नित्यकर्मामध्यें नियमानें प्रवृत्ति असो. ( असें ते म्हणतात ) पण 'एतन्नियोगाविषयत्वेन विदुष प्रत्युक्तमशक्यनियोज्यत्वाच्चेति।" अन्वय–विदुष नियोगाविषयत्वेन अशक्यनियोज्यत्वात् च इति एतत् प्रत्युक्त । अर्थ–विद्वान् नियोगाचा विषय होत नाहीं व तो ( स्वतः सर्वनियोक्ता जो ईश्वर तद्रूप होत असल्यामुळें ) नियोज्य होणें शक्य नाहीं,

वास्तव त्याची प्रवृत्तिही नित्यकर्मांत होत नाहीं, असें ह्मणून या मताचें निरसन ( पृष्ठ २० ) केलें आहे.

( वर जीं दोन मतें सांगितलीं आहेत, त्यांतील विशेष असा-पहिल्या मतांत विद्वान् गृहस्थ काहीं कर्म न करितांच गृहस्थाश्रमात राहतो, असें ह्मटलें व या दुसऱ्या मतांत त्यानें अग्निहोत्रादि अनुष्ठानही करावें, असें ह्मटलें आहे. तसेंच पहिल्या मतीं शरीरधारण हें ज्याचें प्रयोजन आहे अशा भिक्षाटनादिकांविषयींच्या नियमाचा दृष्टान्त परिमह्याचीं व्यावृत्ति करण्याकरितां दिला आहे व या दुसऱ्या मतीं सात घरीं भिक्षा मागणें, इत्यादि अदृष्टफलक नियमाचा दृष्टान्त दिला आहे. )

## २०. तर मग यावज्जीवादिश्रुति व्यर्थ होय, अशी शंका व तिचें निरसन.

तर मग "*यावज्जीवादिनित्यचोदनानर्थक्यमिति चेत्*" अर्थ-'यावज्जीव अग्निहोत्र करावें' इत्यादि नित्यकर्मांविषयींच्या विधींना आनर्थक्य आहे, असें होतें ( म्हणजे ते विधि निरुपयोगी आहेत, असें ठरतें, आणि या श्रुतीला अप्रमाण ह्मटलें कीं भिक्षाटनादिकाविषयींचे नियमविधीही अप्रमाण होणार! पण आता भाष्यकार या शंकेचें समाधान सांगतात-) "न। अविद्वद्विषयत्वेनार्थवत्वात्। " त्यांना अप्रमाण्य नाहीं. कारण ते विधिनियम अविद्वानाचे ठिकाणीं प्रमाणभूत होतात ( अर्थात् आत्मसाक्षात्काररहित पुरुष हा त्यांचा विषय आहे. अविद्वान् हा नियोगाचा नियोज्य आहे. यास्तव त्याच्या ठिकाणीं त्या नियमाचें प्रामाण्य ठरतें. ) "*यत्तु भिक्षोः शरीरधारणमात्रप्रवृत्तस्य प्रवृत्तेर्नियतत्वं तत्प्रवृत्तेर्न प्रयोजकम्*। आचमनप्रवृत्तस्य पिपासापगमवदान्यप्रयोजनार्थत्वमवगम्यते।" अन्वयः-तु 'शरीरधारणमात्रप्रवृत्तस्य भिक्षोः प्रवृत्तेः यत् नियतत्वं तत् प्रवृत्तेः प्रयोजकं न ( भवति )। आचमनप्रवृत्तस्य पिपासापगमवत् तस्य अन्य-प्रयोजनार्थत्वं न अवगम्यते॥ अर्थ-आता केवळ शरीरधारण व्हावें, या उद्देशानें भिक्षाटनादिकामध्यें प्रवृत्त झालेल्या भिक्षूच्या प्रवृत्तीचें जें नियतत्व ( तूं ह्मणतोस ) तें त्या प्रवृत्तीचें प्रयोजक नव्हे ( ह्मणजे भिक्षूला ती प्रवृत्ति नियत केलेली आहे, ह्मणून त्यानें भिक्षावृत्ति केली पाहिजे, असें नाहीं )

तर आचमन करावयास प्रवृत्त झालेल्या पुरुषाची तहान जशी भागते व ती भागणें, हें जसें त्या आचमनाकडे होणाऱ्या पुरुषाच्या प्रवृत्तीचें निमित्त नव्हे, ( कारण पुरुष शास्त्रानें विधान केल्यामुळें आचमन करावयास प्रवृत्त होतो व तें शास्त्रविहित आचमन केलें असता त्याच्या अनुषंगानें तहान भागते. त्यामुळें तहान भागणें हें आचमनाचें प्रयोजक ( तें करावयास लावणारें ) नव्हे, ) त्याचप्रमाणें शरीररक्षणार्थ भिक्षाटिकामध्यें प्रवृत्त झालेल्या यतीचा त्यानें सात घरेंच भिक्षा मागावी, इत्यादि जो नियम तो भिक्षाप्रवृत्तीचा प्रयोजक आहे, असें वाटत नाहीं ( याचें तात्पर्य असें–ब्रह्मवेत्ता नियोगाचा वेद विधीचा–विषय ( नियोज्य ) होत नाहीं त्यामुळें त्याच्याविषयीं नियम करणारा विधि अनुपपन्न आहे, असें जें आमचें ह्मणणें आहे, त्याविषयीं येथें वादानें शंका घेतली आहे पण ती अयुक्त होय. कारण नियोगाच्या सिद्धीकरितांच नियोज्याची अपेक्षा असते व नियोग प्रवृत्तीच्या सिद्धीकरितां हवा असतो. पण ती प्रवृत्तिच जर दुसऱ्या कांहीं निमित्तानें सिद्ध झाली तर नियोगाचें काय काम ? ह्मणूनच दर्श व पूर्णमास या इष्टींच्या नियोगानेंच त्या इष्टींत होम करावयाचें भात कुटण्याकडे नियमानें प्रवृत्ति होत असल्यामुळें त्याविषयीं निराळा नियोग मानलेला नाहीं. नियोगच जर नाहीं तर नियोज्य पुरुषाचीही अपेक्षा नाहीं. नियोग ह्मणजे वेद व स्मृति यांनीं केलेलीं ' प्रत्यहीं संध्या करावी, दर्शपूर्णमासयाग करावे, असत्य भाषण करूं नये ' इत्यादि प्रकारचीं विधानें व नियोज्य ह्मणजे ते विधी ज्या पुरुषास उद्देशून केलेले असतात तो पुरुष. ब्रह्मवेत्ता नियोज्य होत नसल्यामुळेंही त्याला उद्देशून होणारा विधि उपपन्न होत नाहीं. पण गृहस्थाच्या अग्निहोत्रादि कर्मांची प्रवृत्ति अन्य निमित्तानें प्राप्त नाहीं. ह्मणून पुरुषाची त्याचे ठिकाणीं प्रवृत्ति नियोगावांचून होत नाहीं आणि त्या प्रवृत्तीकरितां नियोग हाता कीं नियोज्याचीही अपेक्षा आहेच. असें वैषम्य आतां सांगतात–) " न चाग्निहोत्रादीनां तद्वदर्थप्राप्तप्रवृत्तिनियतत्वोपपत्तिः । " अन्वयः–तद्वत् च अग्निहोत्रादीनां अर्थप्राप्तप्रवृत्तिनियतत्वोपपत्तिः न अस्ति। अर्थ–आणि त्याप्रमाणें अग्निहोत्रादिकांना अर्थप्राप्तप्रवृत्तिनियतत्वाची उपपत्ति नाहीं. ( ह्मणजे तीं अग्निहोत्रादि कर्में अन्य निमित्तानें प्राप्त होणार. तीं मोक्षसाधनामुळें त्याचाधिकप्रवृत्तीनेंच नियत झालीं आहेत,

असें ह्मणण्यास कांहीं विशेष युक्ति नाहीं. तस्मात् भिक्षूचें भिक्षाटन व ज्ञानी गृहस्थाचें कर्मानुष्ठान यांत मोठें अंतर आहे

## २१. याविषयीं पुनः शंका व समाधान

अहो पण "अर्थप्राप्तप्रवृत्तिनियमोऽपि प्रयोजनाभावेऽनुपपन्न एवेति चेत्"। अर्थ–अर्थप्राप्तप्रवृत्तिनियमही प्रयोजनाच्या अभावीं अनुपपन्न आहे, (म्ह. स्वाभाविक प्रवृत्तीचा नियमही फलावांचून सिद्ध होत नाहीं. कांहीं फळ मिळणें जर शक्य असलें, तरच प्राण्याची स्वाभाविक प्रवृत्तिही एकाद्या कर्माकडे होते पण तें नसल्यास प्रवृत्ति संभवत नाहीं, ) असें जर ह्मणशील तर "न, तन्नियमस्य पूर्वप्रवृत्तिसिद्धत्वात्तदतिक्रमे यत्नगौरवात् ॥" अर्थ–तें बरोबर नाहीं कारण तो नियम पूर्वप्रवृत्तीनें सिद्ध आहे त्यामुळें त्याचा अतिक्रम करावयाचा झाल्यास फार मोठा यत्न करावा लागतो. (ह्मणजे तो स्वाभाविक कर्माविषयींचा नियमही पूर्व वासनांमुळेंच प्राप्त असतो. त्यामुळें त्या नियमाविषयीं विधान करावें लागत नाहीं आणि विधानाच्या अभावीं त्याच्या फलाचीही अपेक्षा नसते कारण कोणतेंही विधान फलाच्या उद्देशानेंच होतें ज्या प्रवृत्तीचें कांहीं फल नाहीं, तिचें विधानही नाहीं भिक्षाटन नियमानें (शास्त्रीय नियोगानुसार) केलें तरी पोट भरून जीवन होतें व अनियमानें केलें तरी तें होतेंच, हें खरें, पण आत्मसाक्षात्काररूप विद्या उत्पन्न होण्यापूर्वीं तिच्या सिद्धीकरितां नियत भिक्षाटनादिकाचें अनुष्ठान केलेलें असल्यामुळें त्याची वासना दृढ झालेली असते. त्यामुळें विद्योत्पत्तीच्या नंतरही तो विद्वान् त्या प्रबळ वासनेमुळें त्या नियमांतच प्रवृत्त होतो. अनियमांत कधींही प्रवृत्त होत नाहीं कारण अनियत प्रवृत्तीची वासना नियत प्रवृत्तीच्या वासनेनें पराभूत झालेली असते. त्यामुळें मोठ्या यत्नानेंच तिचा पुनः उद्भव होणें शक्य असतें. पण नियत प्रवृत्तीचीच सवय लागल्यामुळें विद्वान् विशेष यत्नानें अनियत प्रवृत्तीच्या वासनेला उत्पन्न करण्याची इच्छाच करीत नाहीं त्यामुळें स्वाभाविकपणेंच त्याची नियत प्रवृत्ति होते अर्थात् विधिनिषेधरहित झालेला परमहंस 'यथेष्ट आचरण करूं लागेल,' ही भीति व्यर्थ आहे त्याचप्रमाणें प्रत्यवायाचा परिहार करण्यासाठीं त्याची नियमानेंच प्रवृत्ति होईल, या

ह्मणण्यानेंही वरील उत्तरानें निरसन झालें कारण नियोज्यच नियोगानुष्ठानाच्या अभावीं प्रत्यवायी होतो. विद्वान् नियोज्य होत नाहीं. त्यामुळें तो प्रत्यवायीही होत नाहीं )

(सारांश, याप्रमाणें व्युत्थान ( सन्यास ) विधीच्या अभावीं स्वत प्राप्त असलें तरी तें करण्याविषयीं शास्त्रांनीही सागितलें आहे, असें जाणून विद्वान् 'व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति' ह्मणजे सन्यास करून भिक्षाचरण करितात, या विधिवाक्यास अनुमोदन देतात व स्वत त्याप्रमाणें आचरण करितात, असें भाष्यकार सागतात- ) "अर्थप्राप्तस्य व्युत्थानस्य पुनर्वचनाद्विदुष कर्तव्यत्वोपपत्ति । अन्वय.-विदुष अर्थप्राप्तस्य व्युत्थानस्य वचनात् पुन कर्तव्यत्वोपपत्ति । अर्थ-विद्वानाला स्वभावत च प्राप्त आलेल्या व्युत्थानाची विधिवचनावरून पुन कर्तव्यता उपपन्न होते (ह्मणजे विद्वानाला सन्यास आपोआप प्राप्त होतो विधिवाक्याचीच त्याला काहीं आवश्यकता नसते परतु स्वाभाविक प्राप्त, अशाही त्याविषयीं विधिवचन आहे, असे पाहून तर विद्वान् सन्यास अवश्य करितात त्याच्याकडून तो होतो विधीच्या बळानेंच प्राप्त होणारा सन्यास विद्वानानें शास्त्रीय वचनानुसार करणें, हे युक्तच आहे. यात अयुक्त असें काहीं नाहीं विद्वान् स्वभावप्राप्त सन्यास यथाशास्त्र करतो 'पण विधि विद्वानाचा प्रवर्तक होत नसल्यामुळें निष्फळ आहे,' असेंही ह्मणता येत नाहीं कारण प्रैषोच्चार, सर्व भूतास अभयदान इत्यादि विहित मुख्य धर्म प्राप्त होणें, हे त्याचें प्रयोजन असल्यामुळें विधि व्यर्थ नाहीं. विद्वानाला प्रैषोच्चारादिकाचीही आवश्यकता नाहीं ह्मणून म्हणाल, तर ते बरोबर नाहीं कारण मुक्तीकरिता जरी त्याला त्याची गरज नसली तरी विद्वान् परमहसाला लोकसग्रहाकरिता त्याची अवश्यकता आहे ज्ञानाच्या पूर्वी मैत्री, करुणा, मुदिता इत्यादिकाचा त्यानें दृढ अभ्यास केलेला असतो त्यामुळें त्याच्या वासनेनेंच तो लोकसग्रह करतो. वास्तव त्याला त्याच्या प्रयोजनाचीही (फळाची) काहीं अपेक्षा नसते ह्मणजे ज्ञानी सन्यासी योग्य शिष्याला ब्रह्मविद्येचा उपदेश करतो, पण त्याचें आपल्याला काहीं तरी फळ मिळावें, ह्मणून काहीं तो करीत नाहीं तर ब्रह्मविद्याप्रदेश करणे, हाही त्याचा स्वभावच असल्यामुळें तो अनायासानें व निरपेक्ष बुद्धीनें होतो. त्याच न्यायानें त्याच्या हातून पूर्वोक्त धर्म होतात

व त्याच्या फळाचीही अपेक्षा त्याला नसते. अथवा प्रारब्ध कर्माच्या बळानें 'हा माझा देह, हीं इंद्रियें' इत्यादि भास होऊन 'यावज्जीव कर्म करावें' इत्यादि अर्थाच्या श्रुतिवचनाचा विचार न केल्यामुळें मला कर्मे अवश्य केलीं पाहिजेत, अशी भ्रान्ति झाली असता तिचें निवर्तन करण्यासाठीं विद्वानालाही व्युत्थानविधीची आवश्यकता आहे तात्पर्य संन्यासविधि विद्वानाच्या प्रारब्ध दोषामुळें होणाऱ्या कर्मकर्तव्यताभ्रमाचें निरसन करण्याच्या उपयोगी आहे आणि त्यामुळें तो व्यर्थ नाहीं, अशी त्या विधीची उपपत्ति लावावी.)

## २२ विविदिषूलाही संन्यास अवश्य आहे त्यामुळें विद्या कर्मनिष्ठ नव्हे

(याप्रमाणें विद्वानाच्या व्युत्थानाची सिद्धि करून विद्या कर्मनिष्ठ नाहीं, असें सिद्ध केलें आणि त्यामुळेंच त्या विद्येचा कर्माशीं काहीं संबंध नाहीं, असेंही अर्थात् सिद्ध झालें. जी गोष्ट प्रत्यक्ष शब्दांनीं सिद्ध न झाली तरी त्याच्या अर्थावरून ठरते, तिला अर्थसिद्ध, अर्थात् सिद्ध, असें म्हणतात असो, आता एखादा विद्वान् नाहीं पण विविदिषु आहे, म्हणजे त्याला आत्मसाक्षात्कार झालेला नाहीं, पण तो करून घेण्याची तीव्र इच्छा आहे, तर त्यालाही व्युत्थान-संन्यास अवश्य आहे, असें ठरविणारे भाष्यकार विद्येला कर्मनिष्ठत्व किंवा कर्मसंबंधित्व असंभवनीयच आहे, असें सांगतात-)
"अविदुषापि मुमुक्षुणा पारिव्राज्य कर्तव्यमेव।" अर्थ-अविद्वान् मुमुक्षूनेंही पारिव्राज्य करावेंच (ज्याला आत्मज्ञान अजून झालेलें नाहीं, पण तें व्हावें, व आपण मुक्त व्हावें अशी इच्छा मात्र आहे त्या अविद्वानालाही संन्यास अवश्य आहे, याविषयीं श्रुतीचें प्रमाण देतात-) "तथा च 'शान्तो दान्त०' इत्यादिवचनं प्रमाणम्।" अर्थ-त्याविषयीं 'शान्त दान्त' इत्यादि वचन प्रमाण आहे. (उपरत, तितिक्षावान् व एकाग्रचित्त होऊन स्वहृदयांतच आत्म्याला अवलोकन करावें, असा त्या श्रुतीचा शेष (पुढील भाग) आहे यांतील उपरतशब्दानें संन्यासाचें विधान केलें आहे. गृहस्थादि इतर आश्रमांत शमादि साधनांचें पुष्कळपणें अनुष्ठान संभवत नाहीं. त्यामुळें शमादिकाच्या विधानावरूनही संन्यास अर्थात् प्राप्त

रूपानें या वाक्यात त्यागाचें विधान केलें आहे ) "ज्ञात्वा नैष्कर्म्यमाचरेत्, इति च स्मृते ।" अर्थ— आणि सामान्यत: ब्रह्माला जाणून त्याचाच दृढनिश्चय होण्यासाठीं कर्मत्यागरूप सन्यास करावा, अशी स्मृति आहे. " ब्रह्माश्रमपदे वसेत् । इति च । " अर्थ— ब्रह्माश्रम ह्मणजे ब्रह्मज्ञानाचे साधन होणारा आश्रम– संन्यास त्या स्थानात वास करावा, अशा अर्थाचीही स्मृति आहे. ' शिवाय श्रीमद्भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायात 'एकाकी यतचित्तात्मा' येथपासून 'ब्रह्मचारिव्रते स्थित:, मन: संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्पर ।' येथपर्यंत जीं ब्रह्मचर्यादि साधनें सांगितलेलीं आहेत, त्याच्या विधीवरूनही अर्थात् संन्यासविधीची सिद्धि होते, असें भाष्यकार सांगतात— ) " ब्रह्मचर्यादिविद्यासाधनानां च साकल्येनात्याश्रमिषूपपत्तेर्गार्हस्थ्येऽसंभवात् ।" अर्थ— तसेंच ब्रह्मचर्यादि विद्यासाधनाचें संपूर्णपणें अनुष्ठान अत्याश्रमी संन्याशाचे ठिकाणींच संभवतें. गृहस्थाश्रमात त्याचा संभव नाहीं. (यावर कोणी ह्मणेल कीं, गृहस्थाचे ठिकाणींही ऋतुकाळीं मात्र भार्यागमन करणें, हें गौण ब्रह्मचर्य, एखादेवेळीं ध्यानादिकाचें अनुष्ठान करीत असताना एकाकित्व, इत्यादि धर्म संभवतात, ते गृहस्थाचे ठिकाणीं मुळींच संभवत नाहींत, असें नाहीं परंतु तें बरोबर नाहीं. कारण तसलें गौण ब्रह्मचर्य व एकाकित्वादि हें पुर्ण साधन होऊं शकत नाहीं. त्यामुळें त्याच्या योगानें ज्ञानाची सिद्धिही होत नाहीं. शिवाय ध्यानादिकाचे वेळीं पत्नीचा संबंध प्राप्तच नसल्यामुळें त्यावेळच्या एकाकित्वाचें विधान करणेंही व्यर्थ आहे ह्मणजे ध्यानाच्या वेळीं ध्यान करणारा पुरुष एकटाच एकातात बसून तें करील, हें उघड आहे त्यावेळीं तो आपल्या पत्नीला आपल्या बरोबर घेईल, हें ह्मणणें संभवतही नाहीं. तेव्हा तसल्या एकाकित्वाचें विधान करणें व्यर्थच नव्हे का? तस्मात् गीतेंतील ब्रह्मचर्यादि धर्म गौण नसून मुख्यच आहेत, असें भाष्यकार सांगतात— ) " न चासंपन्नं साधनं कस्यचिदर्थस्य साधनायालम् ।" अन्वय — च असंपन्नं साधनं कस्यचित् अर्थस्य साधनाय न अलम् । अर्थ— आणि असंपन्न ( अपुष्कळ, अपूर्ण ) साधन कोणत्याही फलाच्या सिद्धीस पुरेसें होत नाहीं. ( वास्तव आत्मज्ञान कर्मनिष्ठ अथवा कर्मसंबंधी नाहीं )

( आता बृहतीसहस्रलक्षण कर्माच्या विधानाला आरंभ करून त्याच्या पुढें लागलेंच आत्मज्ञान आरंभिलें आहे, ह्मणून तें (आत्मज्ञान) कर्म संबंधी आहे, असें जें वर (पृष्ठ ९) वाद्यानें ह्मटलें आहे, त्याचें उत्तर सांगतात-) "यद्विज्ञानोपयोगीनि च गार्हस्थ्याश्रमकर्माणि तेषां परं फलमुपसहृतं देवताप्ययलक्षणं संसारविषयमेव।" अन्वय — च यद्विज्ञानोपयोगीनि गार्हस्थ्याश्रमकर्माणि तेषां देवताप्ययलक्षणं संसारविषयं एव परं फलं उपसहृतं। अर्थ— आणि ज्या विज्ञानाच्या उपयोगी गृहस्थाश्रमाचीं कर्में आहेत त्यांचें देवतेमध्यें लय पावणें, एतद्रूप संसारविषयकच पृथक् फल सांगून उपसंहार केला आहे ( अर्थात् पूर्वींच्या कर्मसंबंधी ज्ञानाचें फल संसारातच अन्तर्भूत होणारें आहे. देवतारूप होणें, ही त्या फळाची सीमा आहे, पण तें मोक्षाख्य श्रेष्ठ फलाहून अगदीं निराळें आहे आणि बृहतीसहस्रलक्षण कर्माच्या शेवटीं त्याच फलाचा उपसंहार केला आहे यास्तव त्या कर्माचें ज्ञान हें आत्मज्ञान नव्हे व आत्मज्ञान त्याच्याशीं काहीं संबंधही ठेवीत नाहीं )

( वर सांगितलेलें परमात्मज्ञानच आहे व तें परमात्मज्ञान कर्मसंबंधींच आहे, असें कोणी पुन ह्मणेल, असें वाटल्यामुळें शंकराचार्य ह्मणतात, त्या पूर्वोक्त ज्ञानाचा 'संसारफल देणारें' या रूपानें उपसंहार केला आहे व परमात्मज्ञान तर मुक्तिफलक आहे, ह्मणजे तें मुक्तिफल देणारें आहे. यास्तव पूर्वोक्त ज्ञान परमात्मज्ञान नव्हे –) "यदि कर्मिण एव परमात्मविज्ञानमभविष्यत्संसारविषयस्यैव फलस्योपसंहारो नोपापत्स्यत्।" अर्थ— जर कर्मवानालाच ( कर्मठालाच ) परमात्म्याचें ज्ञान झालें असतें तर संसारविषयक फलाचाच उपसंहार उपपन्न झाला नसता. ( कर्मनिष्ठ ह्मणून सांगितलेलें जें ज्ञान तेंच परमात्मज्ञान, असें मानल्यास श्रुतीनेंच त्या कर्मसंबंधी ज्ञानाचें संसारविषयक फल सांगून जो प्रकरणाचा उपसंहार केला आहे तो उपपन्न होत नाहीं, असा याचा भावार्थ. )

२३ तें अंगफल आहे, अशी शंका व समाधान

( तें जें संसारविषयक फळ सांगितलें आहे तें अंगी परमात्मज्ञानाचें नव्हे तर त्याच्या अंगभूत पृथ्वी, अग्नि इत्यादि देवताज्ञानाचें तें (संसाररूप) फळ आहे परमात्मज्ञान अंगी आहे अंगी ह्मणजे मुख्य, शेषी इतर ज्ञानें हीं अंगें

अमुख्य, शेष इत्यादि असून परमात्मज्ञान त्या सर्व ज्ञानरूप अंगांचा अंगी आहे. यास्तव वर ज्याचा उपसंहार केला आहे तें संसारफल अंगभूत ज्ञानाचें आहे. अंगी परमात्मज्ञानाचें नव्हे आणि त्यामुळें त्याच्या मुक्तिरूप फलाशीं पूर्व संसारफलाचा विरोध येत नाहीं, अशी शंका घेतात— ) " अङ्गफलं तदिति चेत् । " अर्थ — तें अंगफल आहे, असें जर ह्मणाल तर " न । तद्विरोध्यात्मवस्तुविषयत्वादात्मविद्यायाः । " अन्वय.— न आत्मविद्यायाः तद्विरोध्यात्मवस्तुविषयत्वात् । अर्थ— तें बरोबर नाहीं. कारण आत्मविद्येला त्या फलाच्या विरोधी असलेल्या आत्मवस्तूचें विषयत्व आहे. ह्मणजे ह्या आत्मविद्येचा विषय आत्मा आहे व तो त्या संसारविषयक फलाच्या विरुद्ध आहे. ( परमात्मज्ञानाचा विषय अंगसंबंध, फलसंबंध इत्यादि सर्व संबंधशून्य निर्विशेष आत्मवस्तु आहे. त्यामुळें त्या ज्ञानाचा अंगादिकाशीं संबंध संभवत नाहीं. त्यामुळें पूर्वोक्त फलही त्याच्या अंगाचें आहे, असें ह्मणता येत नाहीं, अशा अभिप्रायानें भाष्यकारानीं हें वरील समाधान सांगितलें आहे. आता त्याचेंच अधिक स्पष्टीकरण करितात–) "निराकृतसर्वनामरूपकर्मपरमार्थात्मवस्तुविषयं ज्ञानममृतत्वसाधनम् । " अर्थ— नाम, रूप व कर्म या सर्व विशेषांनीं रहित असलेली जी परमार्थ ( श्रेष्ठ अर्थरूप ) आत्मवस्तु, तो ज्याचा विषय आहे, असें ज्ञान अमृतत्वाचें साधन आहे. ( अमृतत्व ह्मणजे मोक्ष अर्थात् निर्विशेष आत्म्याचें ज्ञान मोक्षाचें साधन आहे. ) " गुणफलसंबन्धे हि निराकृतसर्वविशेषात्मवस्तुविषयत्वं विज्ञानस्य न प्राप्नोति । तच्चानिष्टम् ।" अन्वयः— हि विज्ञानस्य गुणफलसंबन्धे सति निराकृतसर्वविशेषात्मवस्तुविषयत्वं न प्राप्नोति । तत् च अनिष्टं । अर्थ—कारण आत्मसाक्षात्काराचा गौण फलाशीं संबंध आहे, असें ह्मटल्यास त्याला निर्विशेष आत्मवस्तुविषयत्व प्राप्त होत नाहीं. ह्मणजे त्या ज्ञानाचा ( साक्षात्काराचा ) विषय सर्व विशेषशून्य आत्मवस्तु आहे, असें ठरत नाहीं. पण तें अनिष्ट आहे. ( कारण ' आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् ' इत्यादि प्रकरणाचें तात्पर्य कशात आहे, याचा विचार पूर्वोक्त ( पृष्ठ ५ ) उपक्रमादि लिंगांवरून केला असतां आत्मा निर्विशेष आहे, असें निश्चित होतें. ह्मणून सर्व विशेषशून्य आत्मा विज्ञानाचा विषय आहे, असें सिद्ध न होणें, हें अनिष्ट आहे. वाजसनेयि ब्राह्मणांत

' परम तत्ववेत्ता सर्वसंबंधशून्य आहे, असें सांगून आत्म्याला न जाणणाऱ्या अविद्वानाला संसार हेंच फळ मिळतें,' असेंही म्हटलें आहे यास्तव येथें पूर्वी सांगितलेल्या ज्ञानाला परमात्मज्ञानत्व नाहीं तर ' आत्मा वा इदमेक एव० ' इत्यादि पुढच्या प्रकरणात सांगावयाच्या निर्विशेषवस्तुविषयक ज्ञानालाच परमात्मज्ञानत्व व मुक्तिफलत्व आहे, असें भाष्यकार सांगतात— ) " यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्, इत्यधिकृत्य क्रियाकारकफलादिसर्वव्यवहारनिराकरणाद्विदुष । ' अन्वय — 'यत्र तु अस्य सर्वं आत्मा एव अभूत् ' इति अधिकृत्य विदुषः क्रियाकारकफलादिसर्वव्यवहारनिराकरणात् । अर्थ— ' ज्यावेळीं या अधिकारी पुरुषाला सर्व आत्माच आहे, असें साक्षात् ज्ञान होतें त्यावेळीं तो कोणत्या साधनानें कोणत्या विषयाला पाहणार? इत्यादि अर्थाच्या वाक्यानें आरंभ करून विद्वानाच्या क्रिया, कारक, फल इत्यादि सर्व व्यवहाराचें निराकरण केलें आह ( कर्ता, कर्म, साधन, इत्यादि कारकें आहेत ) " तद्विपरीतस्याविदुषो यत्र हि द्वैत मिवेत्युक्त्वा क्रियाकारकफलरूपस्यैव संसारस्य दर्शितत्वाच्च वाजसनेयिब्राह्मणे । ' अन्वय — च वाजसनेयिब्राह्मणे ' यत्र हि द्वैत इ० इति उक्त्वा तद्विपरीतस्य अविदुषः क्रियाकारकफलरूपस्य संसारस्य एव दर्शितत्वात् । अर्थ— आणि वाजसनेयि ब्राह्मणात ( बृहदारण्यकात ) 'ज्यावेळीं पुरुषाला द्वैतसें दिसतें, तेव्हा इत्यादि सांगून पूर्वोक्त विद्वानाच्या विपरीत असलेल्या अविद्वानाला क्रियाकारकफलरूप संसारच मिळतो, असें दाखविलेलें आहे ' तथेहापि देवताप्ययं संसारविषयं यत्फल मशनायादिमद्वस्त्वात्मकं तत्फलमुपसंहृत्य, केवलसर्वात्मकवस्तु विषयं ज्ञानममृतत्वाय वक्ष्यामीति प्रवर्तते । ' अन्वय — तथा इह अपि यत् अशनायादिमद्वस्त्वात्मकं संसारविषयं देवताप्ययं फलं तत् फलं उपसंहृत्य अमृतत्वाय केवलसर्वात्मकवस्तुविषयं ज्ञानं वक्ष्यामि इति प्रवर्तते । अर्थ— त्याचप्रमाणें येथें म्हणजे या ऐतरेय उपनिषदातही जें अशनाया दिकानीं युक्त असलेल्या वस्तुरूप, संसारविषय देवताप्ययलक्षण फल त्याचा उपसंहार करून मोक्षाकरिता मी आता केवळ सर्वात्मक वस्तुसंबंधीं ज्ञान सांगेन, अशा अभिप्रायानें श्रुति प्रवृत्त होत आहे ( या वाक्यात फल हा शब्द दोनदा योजिला आहे यास्तव त्यातील एक शब्द फल निष्प्रयोजन आहे,

असें सुचविण्यासाठीं आहे. अर्थात् तें फल निष्पाद्य ( संपादन करतां येण्यासारखें ) असल्यामुळेंही संसारविषय आहे. संसारविषय ह्मणजे संसारान्तर्गत. )

२४ तीन ऋणांची वाट दाखवितात.

( येणेंप्रमाणें आत्मज्ञानाचा कर्माशीं कांहीं संबंध नाहीं, असें सांगून 'यावज्जीव अग्निहोत्र करावें,' अशी श्रुति असल्यामुळें कर्माचा त्याग संभवत नाहीं, असें जें बाधाचें ह्मणणें होतें, त्याचें निराकरण भाष्यकारानीं 'यावज्जीव कर्मविधान करणारी श्रुति अविद्वानाविषयीं आहे' या उत्तरानें केलें. ( पृष्ठ ३५ ) आता तीन ऋणाविषयीं त्यानें जो आक्षेप घेतलेला होता त्याची व्यवस्था कशी लावावी तें सांगतात—) "**ऋणप्रतिबन्धश्चाविदुष एव मनुष्य पितृ देवलोकप्राप्तिं प्रति न विदुषः।**" अन्वयः— च अविदुषः एव मनुष्य-पितृ देवलोकप्राप्तिं प्रति ऋणप्रतिबन्धः न विदुषः। **अर्थ**— आणि अविद्वानाच्याच मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक यांच्या प्राप्तीस तीन ऋणें प्रतिबंध करितात विद्वानाच्या नाहीं. ( अपाकृत न केलेलें, न फेडलेलें ऋण अविद्वानाच्याच मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक या तीन लोकांस प्रतिबंध करतें कारण त्या त्या लोकाचीं इच्छा करणाऱ्या अविद्वानाचेंच ऋणापकरण हें कर्तव्य आहे. मुक्तीची इच्छा करणाऱ्या उत्तम साधकाचें तें कर्तव्य नव्हे. त्यामुळें ऋषि-ऋण, पितृ-ऋण व देव-ऋण, हीं तीन ऋणें मुमुक्षूच्या मुक्तीलाही प्रतिबंध करीत नाहींत. )

( अहो, पण 'अनपाकृत्य मोक्षं तु सेवमानो व्रजत्यधः।' ह्मणजे ऋणाचें अपाकरण ( फेड ) न करिता मोक्षाचें सेवन करणारा अधोगतीस जातो, अशा अर्थाची स्मृति आहे. यास्तव पूर्वोक्त त्रिविध ऋण मुक्तीलाही प्रतिबंध करतें, असें ह्मणणें भाग आहे कारण या स्मृतिवचनात ऋण मनुष्यादि लोकांनाच प्रतिबंध करतें व मुक्तीला प्रतिबंध करीत नाहीं, असा विशेष सांगितलेला नाहीं, अशी आशंका घेऊन आचार्य ह्मणतात) "**सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेणैव, इत्यादिलोकत्रयसाधननियमश्रुतेः।**" **अर्थ**—कारण 'तो हा मनुष्य लोक पुत्राच्या योगानेंच ( जिंकता येतो )' इत्यादि प्रकारें तीन लोकांच्या साधनाविषयींचा नियम सांगणारी श्रुति आहे. ( 'सोऽयं मनुष्यलोकः पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणा कर्मणा पितृलोको विद्यया देवलोकः'

अशी श्रुति असून तिचा अर्थ—तो हा मनुष्यलोक पुत्राच्या योगानेंच जिंकता येण्यासारखा आहे दुसऱ्या कर्मांच्या योगानें जिंकता येण्यासारखा नाहीं कर्मांच्या योगानें पितृलोक व विद्येनें ( उपासनेनें ) देवलोक जिंकता येतो— असा आहे त्या श्रुतिवचनावरून पुत्र, कर्म व उपासना यांना क्रमानें मनुष्यलोक, पितृलोक व देवलोक यांचें हेतुत्व ( कारणत्व ) आहे, असें ज्ञान होतें त्यामुळें पुत्रादिकांच्या योगानेंच फेडता येण्यासारखीं असलेलीं पुत्रादिकांच्या अभावरूप ऋणें त्या पुत्रादिकांनीं साध्य होणाऱ्या लोकप्राप्तीस प्रतिबंधक होणें साहजिक आहे त्या ऋणांनीं लोकप्राप्तीस प्रतिबंध करावा, हें योग्यच आहे कारण ऋणाचें अपाकरण न केल्यास पुत्रादिसाधनाचा अभाव होणार, आणि साधनाच्या अभावीं साध्य लोकाचा अभाव होणार, हें अर्थसिद्धच आहे पण तीं पुत्रादिकांच्या अभावरूप ऋणें मुक्तीला प्रतिबंध करूं शकत नाहींत कारण मुक्ति त्या ऋणाच्या अपाकरणानें साध्य होणारी नाहीं 'अनपाकृत्य मोक्ष तु०' इत्यादि जें स्मृतिवचन आहे तें रागी ( विषयासक्त ) पुरुषाच्या सन्यासाची निंदा करण्याकरिता केवळ अर्थवादरूप आहे )

(पुत्रादि—अभावरूप ऋण मुक्तीला प्रतिबंध करूं शकत नाहीं, याविषयीं केवळ हा न्यायच प्रमाण आहे, असें नाहीं, तर श्रुतिही प्रमाण आहे, असें आता सांगतात—) "विदुषश्चर्णप्रतिबन्धाभावो दर्शित आत्मलोकार्थिन 'किं प्रजया करिष्याम' इत्यादिना। तथा 'एतद्ध स्म वै तद्विद्वांस आहुर्ऋषय कावषेया' इत्यादि। 'एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसोऽग्निहोत्रं न जुहवांचक्रु' इति च कौषीतकीनाम्।" अन्वय—च आत्मलोकार्थिन विदुष ऋणप्रतिबन्धाभाव 'किं प्रजया करिष्याम' इत्यादिना दर्शित । तथा 'एतत् ह स्म वै तद्विद्वांस आहु ऋषय कावषेया' इत्यादि। एतत् ह स्म वै तत्पूर्वे विद्वांस अग्निहोत्रं न जुहवांचक्रु इति च कौषीतकीनाम्। अर्थ—आणि आत्मा, याच एका लोकाची इच्छा करणाऱ्या विद्वानाला या ऋणप्रतिबंधाचा अभाव आहे, हें 'संततीनें आम्ही काय करणार ( संततीचा आम्हाला काय उपयोग )' इत्यादि अर्थाच्या वाक्यानें दाखविलें आहे त्याचप्रमाणें 'आत्मवेत्ते कावषेय ऋषी आम्ही अध्ययन कशाला करूं? होम कशाला करूं? इत्यादि म्हणाले'.

त्याचप्रमाणें त्या ह्या आत्मतत्त्वाला जाणणारे पूर्वींचे विद्वान् अग्निहोत्रहवन करीत नसत, असें कौषीतकी शाखेच्या उपनिषदांत ह्मटलें आहे. ( येथें दिलेल्या तीन श्रुतिवचनांनीं क्रमानें प्रजा, अध्ययन व कर्म यांचें अनुष्ठान न केलें तरी तीं विद्वानाला प्रतिबंधक होत नाहींत, असें दाखविलें आहे. )

२५ याविषयीं शंका व समाधान.

( वादी शंका घेतो- ) "अविदुषस्तर्हि ऋणानपाकरणे पारिव्राज्यानुपपत्तिरिति चेत्।" अन्वयः-तर्हि ऋणानपाकरणे अविदुषः पारिव्राज्यानुपपत्तिः इति चेत्। अर्थ-तर मग ऋणाचें अपाकरण केलेलें नसल्यास अविद्वानाच्या संन्यासाची अनुपपत्ति होते, ह्मणून ह्मणाल तर ( ज्याला आत्मज्ञान झालेलें नाहीं पण मोक्षाची इच्छा आहे अशा पुरुषाच्याही मुक्तीला वरील ऋण प्रतिबंध करण्यास समर्थ नसतें. कारण तें अविद्वानाच्याही केवळ तीन लोकांनाच प्रतिबंध करूं शकतें. मुक्तीला प्रतिबंध करूं शकत नाहीं. यास्तव अविद्वान् मुमुक्षूलाही संन्यास घेतां येतो. त्यामुळें त्याविषयीं शंकाच संभवत नाहीं. पण वरील श्रुतिवाक्यांत आह्मी कर्मादिक कशाला करूं? असें 'विद्वान्' ह्मणाले असें ह्मटलें आहे. यास्तव केवळ त्या विद्वान्-शब्दावर कटाक्ष ठेवून 'तर मग अविद्वानाला कर्मत्याग करतां येत नाहीं,' अशी शंका येथें घेतली आहे. अथवा दुसराच परिहार सांगण्याकरितां ही शंका आहे, असें जाणावें. आचार्य आतां या शंकेचें निराकरण करितात. ) "न। प्राग्गार्हस्थ्यप्रतिपत्तेर्ऋणित्वासंभवात्।" अन्वयः-गार्हस्थ्यप्रतिपत्तेः प्राक् ऋणित्वासंभवात् न पारिव्राज्यानुपपत्तिः। अर्थ-गृहस्थाश्रमाचा अंगीकार करण्याच्या पूर्वी पुरुषाला ऋणित्वाचाच संभव नाहीं. ( म्ह. गृहस्थाश्रमी झाल्यावांचून तो पित्रादिकांचा ऋणीच होत नाहीं. ) यास्तव अविद्वानाला संन्यासाची अनुपपत्ति नाहीं. ( गृहस्थालाच पुत्रादिकांस निर्माण करून पित्रादिकांच्या ऋणांतून मुक्त होतां येणें शक्य आहे. यास्तव गृहस्थांनाच ऋणाच्या निराकरणाचा अधिकार आहे. त्यामुळें गृहस्थालाच ऋणें प्रतिबंध करितात. अगृहस्थाच्या संन्यासाला तीं प्रतिबंध करूं शकत नाहींत. तस्मात् गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वी ब्रह्मचर्याश्रमांत मुमुक्षूचें पारिव्राज्य संभवतें, असा परिहार भाष्यकारांनीं या वाक्यांत केला आहे. ज्ञातां उपनयनानंतर तत्काळ ऋषींचें ऋण फेडण्याचा अधिकार प्राप्त

होतो, व त्यामुळें 'गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्यापूर्वी ऋणित्वाचा संभवच नाहीं,' हें म्हणणें युक्त नव्हे, हें खरें; तथापि विविदिषा संन्यासाचा अधिकार ज्यानें वेदाध्ययन केलेलें असतें, त्यालाच असतो. यास्तव त्या वेदाध्ययन केलेल्या पुरुषाला उद्देशून भाष्यकारांनीं हें म्हटलें आहे, असें समजावें.)

(आतां यावर कोणी असें म्हणेल, अहो 'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते ब्रह्मचर्येणर्षिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः' म्हणजे उत्पन्न होणारा ब्राह्मण (उत्पत्ति होतांच) तीन ऋणांनीं ऋणी होतो. ब्रह्मचर्यानें ऋषींचा, यज्ञानें देवांचा, व प्रजेनें पितरांचा. या श्रुतिवचनावरून केवळ उत्पन्न होणारा ऋणवान् होतो, असें प्रतीत होतें (वाटतें). कारण या वचनातील 'जायमानः' या पहिल्या पदानें जन्माचा बोध होतो. उपनयन, दारपरिग्रह इत्यादिकांचा बोध होत नाहीं. यास्तव ब्राह्मणकुळांत जन्म घेणें हेंच ऋणी होण्याचें निमित्त आहे.

या आशंकेचें समाधान थोडक्यांत असें आहे. या श्रुतिवचनांत जें ऋणित्व सांगितलें आहे, त्याचें साक्षात् प्रयोजन कांहीं नाहीं. तर ब्रह्मचर्यादिकांच्या कर्तव्यतेचें ज्ञापन करणें म्हणजे ब्रह्मचर्यादि आश्रमांचा क्रमानें स्वीकार करावा, हें सुचविणें एवढेंच त्याचें प्रयोजन आहे व जो अधिकारारूढ झालेला नाहीं तो तें करूं शकतही नाहीं. केवळ जन्माला आलेला ब्राह्मण-अर्भक ब्रह्मचर्य, दारपरिग्रह इत्यादि करण्यास असमर्थ असतो, हें प्रसिद्ध आहे. यास्तव नुसत्या 'जायमानः' या शब्दावरच सर्व भार टाकणें प्रशस्त नव्हे. तर त्याच्या योग्य अर्थाचा विचार करणेंच सयुक्तिक आहे.

दुसरें, वरील श्रुतिवचनांत 'जायमानः ब्राह्मणः' असें म्हटलें आहे. पण त्यावरून केवळ ब्राह्मणाचाच स्वीकार केल्यास क्षत्रियादिकांना ऋणाचा अभाव आहे, असें होईल व तें तर अनिष्ट आहे. यास्तव उपलक्षणेनें ब्राह्मणशब्दानें द्विजांचें ग्रहण करावें लागतें आणि तें केलें म्हणजे अधिकारी पुरुषांचें उपलक्षणेनें ग्रहण करणें उचित होतें. तस्मात् 'जायमानः' हें पद अधिकार सुचवितें. अर्थात 'जायमानः' म्हणजे अधिकारी होणारा, असा अर्थ समजावा. म्हणजे, अधिकार प्राप्त होण्यापूर्वी ऋणांचा संबंध नाहीं,

असें भाष्यकार सांगतात- ) " अधिकारानारूढोऽप्यृणी चेत्स्यात्सर्व-स्यर्णित्वमित्यनिष्टं प्रसज्येत।" अन्वय –अधिकारानारूढ अपि ऋणी स्यात् चेत् सर्वस्य ऋणित्वं इति अनिष्टं प्रसज्येत। अर्थ–अधिकारारूढ न झालेलाही जर ऋणी होऊं लागला, तर सर्वांलाच ऋणित्व आहे, असें अनिष्ट प्राप्त होईल ( ब्रह्मचाऱ्यालाही जर ऋणित्व आहे, ह्मणून ह्मटलें, तर ब्रह्मचर्याश्रमात असतानाच मेलेल्या नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याच्या उत्तम लोकाला प्रतिबंध होणें, हा अनिष्ट प्रसंग ओढवेल कारण पुराणांत ' तद्वेव गुरुवत्सिना ' या वचनानें नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याला उत्तम लोकाची प्राप्ति होते, असें सांगितलें आहे. वास्तव ब्रह्मचर्याश्रमातच मेलेल्या पुरुषाच्या उत्तम लोकाला प्रतिबंध होणें, हें अनिष्ट आहे आतां भाष्यकार ' केवळ गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वींच सन्यासाची सिद्धि होते, एवढेंच नव्हे तर विधिवलानें गृहस्थाला ही सन्यास करितां येतो,' असें सांगतात ) " प्रतिपन्नगार्हस्थ्यस्यापि ' गृहाद्वनी भूत्वा प्रव्रजेद्यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा ' इत्यात्मदर्शनोपायसाधनत्वेनेष्यत एव पारिव्राज्यम्।" अन्वय –प्रतिपन्नगार्हस्थ्यस्य अपि ' गृहात् वनी भूत्वा प्रव्रजेत्। यदि वा इतरथा। ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत् गृहात् वा वनात् वा ' इति आत्मदर्शनोपाय साधनत्वेन पारिव्राज्य इष्यते एव। अर्थ–ज्यानें गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आहे, त्यालाही ' गृहस्थाश्रमातून वानप्रस्थ होऊन सन्यास करावा. किंवा या क्रमास सोडून सन्यास घ्यावा ह्मणजे ब्रह्मचर्यापासूनच सन्यस्त व्हावें, किंवा गृहस्थाश्रमातून, अथवा वानप्रस्थाश्रमातून सन्यासाश्रम स्वीकारावा ' असें श्रुतीचें विधान असल्यामुळें आत्मदर्शनाच्या उपायाचें साधन या दृष्टीनें परिव्राज्य इष्टच आहे ( आत्मदर्शनाचे–आत्मसाक्षात्काराचे श्रवणादिक उपाय आहेत त्यांचें साधन या रूपानें गृहस्थालाही सन्यास इष्ट आहे तर मग तीन ऋणाचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींशीं सन्यासविधीचा विरोध आहे, असें ह्मटलें पाहिजे, ह्मणून ह्मणाल तर तेंही योग्य नव्हे कारण ऋणश्रुति केवळ अर्थवादरूप आहे व कोणताही अर्थवाद ( स्तुतिवाद ) स्वार्थीं तात्पर्यवान् नसतो. ह्मणजे कोणत्याही अर्थवादाचें तात्पर्य त्या अर्थवादांतील शब्दावरून व्यक्त होणाऱ्या अर्थांत नसतें तर तो ज्या विधेयाचा स्तुति करण्याकरितां अथवा ज्या

७८ विद्वत्संन्यासाविषयीं शंका व समाधान.

( याप्रमाणें विविदिषासन्यासाची सिद्धि करून पूर्वी सिद्ध केलेल्या विद्वत्संन्यासाविषयीं आणखी एका शंकेचा अनुवाद करितात- ) "यत्तु विदुषोऽर्थप्राप्तं व्युत्थानमित्यशास्त्रार्थत्वे गृहे वने वा तिष्ठतो न विशेष इति।" अन्वय -- तु विदुष व्युत्थान अर्थप्राप्त इति ( हेतो व्युत्थानस्य ) अशास्त्रार्थत्वे गृहे वने वा तिष्ठत ( विदुष ) विशेष न इति यत्। अर्थ-- परंतु विद्वानाचें ( आत्मज्ञाचें ) व्युत्थान ( सन्यास ) अर्थप्राप्त ( अर्थात् सिद्ध, सहज होणारा, विधीवाचूनच स्वाभाविकपणेंच होणारा ) आहे यास्तव व्युत्थानाला शास्त्रार्थत्व नाहीं ह्मणजे व्युत्थान हा शास्त्राचा अर्थ शास्त्राचा विषय होत नाहीं, आणि तो शास्त्राचा विषय नव्हे, असें झालें असता तो गृहात किंवा वनात वास करीत असला तरी, ह्मणजे तो कोणत्याही आश्रमात जरी राहिला तरी, त्याच्यामध्यें कोणत्याही प्रकारचा विशेष येत नाहीं, असें जें ह्मणणें आहे, पूर्वी ( पृष्ठ ३० ) गृहातच त्याचें आसन असो, अशी शंका घेऊन तिचें निरसन केलें आहे व आता गृहात किंवा वनात ह्मणजे कोठेंही त्याचें अवस्थान असो, ह्मणजे विद्वानानें अमुकच अवस्थेंत असावें, असा काहीं नियम नाहीं, अशी शंका घेतली आहे. तसेच, विद्वानाला सन्यास जर शास्त्रत प्राप्त नसून केवळ अर्थत प्राप्त आहे असें ह्मटलें, तर त्याचें आचरण यथेष्ट होऊं लागेल, या आणखी एका शंकेचें निरसन करण्यासाठीं भाष्यकारानीं या शंकेचा अनुवाद केला आहे, असेंही जाणावें 'अर्थप्राप्तस्यापि पुनर्वचनात्' इत्यादि भाष्यात (पृष्ठ ३८) विद्वत्सन्यासालाही शास्त्रार्थत्व आहे, असें जरी सांगितलेंच आहे, तथापि येथें शंकेंनें सांगितलेलें अशास्त्रार्थत्व कबूल करून-(त्याचा अंगीकार करून)हें समाधान सांगतात- ) "तदसत्।" अर्थ-तें बरोबर नाहीं ( कारण व्युत्थानाप्रमाणें गृहस्थाश्रमही जर विद्वानाला अर्थप्राप्त असता, तर तुह्मी ह्मणता तसा अनियम सिद्ध झाला असता. पण तसा तो अर्थप्राप्त नाहीं असें भाष्यकार स्पष्टीकरण करितात ) 'व्युत्थानस्यैवार्थप्राप्तत्वान्नान्यत्रावस्थानं स्यात्। अन्यत्रावस्थानस्य कामकर्मप्रयुक्तत्वं ह्यवोचाम "। (पृष्ठ २०) अर्थ- ( विद्वानाला ) व्युत्थानच अर्थप्राप्त असल्यामुळें 'अन्यत्र ' ह्मणजे गृहस्थाश्रमात त्याचें अवस्थान होणार नाहीं कारण अन्य ( गृहस्थ ) आश्रमातील

अवस्थान कामप्रयुक्त आहे, असें आह्मीं सांगितलें आहे. ( अहो, पण गृहस्थाश्रमात राहणें हें जसें कामप्रयुक्त तसेंच व्युत्थानहीं कामादिकामुळेंच प्राप्त आहे. कारण तेंही गार्हस्थ्याप्रमाणें अनुष्ठेय आहे, अशी आशंका घेऊन सांगतात- ) " तदभावमात्रं व्युत्थानमिति च । " (पृष्ठ ३१) अन्वयः-च तदभावमात्रं व्युत्थानं इति अवोचाम । अर्थ-- आणि कामकर्माचा केवळ अभाव, हेंच व्युत्थान आहे, असेंही सांगितलें आहे ( अर्थात् कामादिकाच्या अभावरूप व्युत्थानाला अनुष्ठेयरूपता नाहीं. अनुष्ठेय ह्मणजे अनुष्ठानास योग्य गृहस्थधर्म अनुष्ठेय आहेत. पण सर्व कर्तव्याभावरूप व्युत्थान अनुष्ठेय नाहीं )

२९. विद्वानाच्या यथेष्ट आचरणाविषयीं आशंका घेऊन समाधान.

( येणेंप्रमाणें विद्वानाच्या आश्रमाविषयीं कांहीं नियम नाहीं, त्यानें हव्या त्या आश्रमात रहावें, अशी शंका घेऊन तिचें निरसन केल्यावर भाष्यकार ' व्युत्थान-संन्यास जर शास्त्राचा विषय होत नाहीं, असें ह्मटलें तर विद्वानाचें आचरण यथेष्ट होऊं लागेल,' अशी आशंका घेऊन तिचें निरसन करितात-) "यथाकामित्वं तु विदुषोऽत्यन्तमप्राप्तमत्यन्तमूढविषयत्वेनावगमात् । " अन्वय - तु यथाकामित्वं अत्यन्तमूढविषयत्वेन अवगमात् विदुषः अत्यन्तं अप्राप्तम् । अर्थ-परंतु यथाकामित्व ( यथेष्ट आचरण ), हा अत्यंत मूढाचा विषय आहे, असें अवगत झालेलें असल्यामुळें विद्वानाला अगदींच अप्राप्त आहे ( कोणतीही चेष्टा-क्रिया कामप्रयुक्त होते, ह्मणजे प्रत्येक हालचाल कामनाप्रयुक्त, कामनेमुळें होणारी आहे. पण त्यातील निषिद्ध चेष्टा ज्याला शास्त्रार्थाचें ज्ञान नाहीं अशा अत्यंत मूढाचा विषय आहे विद्वानाची स्थिति अगदींच विपरीत असते तो कामनाशून्य असतो व शास्त्रार्थज्ञानशून्य नसतो यास्तव त्याच्या हातून कोणतीच चेष्टा होत नाहीं, आणि सामान्यत. कोणतीच क्रिया जर प्राप्त नाहीं तर त्याच्या हातून निषिद्ध आचरण तरी कसें होणार ? असा वरील भाष्याचा आशय. आता त्याचेंच अधिक विवरण करितात- ) " तथा शास्त्रचोदितमपि कर्मात्मविदोऽप्राप्तं गुरुभारतयाऽवगम्यते । किमुतात्यन्ताविवेकनिमित्तं यथाकामित्वम् । "

अन्वय.-- तथा शास्त्रचोदितं अपि कर्म गुरुभारतया यतः अवगम्यते ततः तत् आत्मविदः अप्राप्तम् । तदा अत्यन्ताविवेकनिमित्तं यथाकामित्वं अप्राप्तं

इति किमु । अर्थ-- कारण शास्त्रानें सांगितलेलेंही कर्म अतिक्लेशरूप आहे, असें ज्याअर्थी जाणलें जातें, त्याअर्थी आत्मज्ञाला तें अप्राप्त आहे, मग अत्यंत अविवेकामुळें होणारें यथाकामित्व त्याला अप्राप्त आहेच, हें काय सांगावें ? ( शास्त्रीय कर्महीं क्लेशकारक आहे, असें जर विद्वानाला वाटतें व तो त्याचा त्याग करतो, तर अशास्त्रीय व अविवेकजन्य निषिद्ध कर्म तो सर्वथा सोडतोच, हें काय सांगावें ? असा याचा भावार्थ, अविवेकादि निमित्त नष्ट झालें असता नैमित्तिकही नष्ट होतें, याविषयीं दृष्टान्त सांगतात- ) ' न ह्युन्मादतिमिरदृष्टयुपलब्धं वस्तु तदपगमेऽपि तथैव स्यादुन्मादतिमिरदृष्टिनिमित्तत्वादेव तस्य । तस्मादात्मविदो व्युत्थानव्यतिरेकेण न यथाकामित्वम् । ' अर्थ- हि उन्मादतिमिरदृष्टयुपलब्धं वस्तु तदपगमे अपि तथा एव न स्यात् । तस्य उन्मादतिमिरदृष्टिनिमित्तत्वात् एव । तस्मात् आत्मविद् व्युत्थानव्यतिरेकेण यथाकामित्वं न । अर्थ-- कारण उन्माददृष्टि व तिमिरदृष्टि या निमित्तानें दिसलेली वस्तु उन्माद व तिमिर यांचें निरसन केल्यावरही तशीच दिसत नाहीं कारण तिचें उन्माद व तिमिरदृष्टि हेंच निमित्त असतें यास्तव आत्मज्ञाला व्युत्थानाहून निराळें यथाकामित्व नाहीं ( उन्माद म्हणजे वेड त्यात दिसणारें गंधर्वनगर वगैरे हें उन्माददृष्टीनें दिसणारें व तिमिर म्हणजे एक प्रकारचा नेत्ररोग त्याच्या योगानें दिसणारें तें तिमिरदृष्टीनें दिसणारें होय, असा विवेक समजावा ) " न चान्यत्कर्तव्यमित्येतत्सिद्धम् । " अन्वय — च अन्यत् कर्तव्यं न अस्ति इति एतत् सिद्धम् । अर्थ-- आणि त्याचप्रमाणें दुसरें ( वैदिक ) कर्मही नाहीं, हें सिद्ध झालें

( अहो, पण विद्या व अविद्या एकत्र राहतात, असें श्रुतीनें सांगितलेलें असल्यामुळें विद्वानाला अविद्यामूलक कामादिक होतील आणि कामादिप्रयुक्त यथेष्ट आचरणही होईल, असें वादी म्हणेल म्हणून आचार्य सांगतात-) ' यत्तु ' विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयं सह' इति (पृष्ठ १४) न विद्यावतो विद्यया सहाविद्यापि वर्तत इत्ययमर्थः । कस्तर्हि । " अन्वय — ' तु य विद्या च अविद्या च इति तत् उभयं सह वेद ' इति यत् तस्य विद्यावत विद्यया सह अविद्या अपि वर्तते इति अयं अर्थ न अस्ति । कः तर्हि । अर्थ— परंतु ' जो विद्या व अविद्या या दोन्ही सह-

वास करितात, असें जाणतो' अशा अर्थाचें जें वचन आहे त्याचा-विद्याज्ञानाच्या विद्येसह अविद्याही असते,—हा अर्थ नव्हे. तर कोणता? "एकस्मिन्पुरुषे एकदैव न सह संबध्येयातामित्यर्थः।" अर्थ—एकाच पुरुषाचे ठिकाणीं एकदाच त्यांचा सहसंबंध होत नाहीं, हा अर्थ आहे. "यथा शुक्तिकायां रजतशुक्तिकाज्ञाने एकस्य पुरुषस्य।" अर्थ-- जसें- शिंपीच्या ठिकाणीं रुपें व शिंप या दोघांचें ज्ञान एकाच पुरुषाला एकाच वेळीं होत नाहीं, त्याप्रमाणें (ह्मणजे निरनिराळ्या वेळीं एका पुरुषाचे त्याचा ठिकाणीं सहभाव संभवतो. एकाच वेळीं एका पुरुषामध्यें न राहणें, हा ज्यांचा स्वभाव आहे अशाही परस्परविरोधी विद्या-अविद्या एकाच पुरुषाचे ठिकाणीं निरनिराळ्या वेळीं राहूं शकतात. अशा प्रकारचें त्यांचें साहित्य (सहभाव) संभवतें. हा त्या वचनाचा अर्थ आहे.)

(अहो, पण हें साहित्य स्वरस नाहीं ह्मणजे वाक्य ऐकताच आपोआप ध्यानात येणारें नाहीं परंतु एकाच कालीं विद्या व अविद्या याचा सहवास स्वरस आहे. म्हणजे वाक्य ऐकताच हें साहित्य श्रोत्याच्या चित्तात आरूढ होतें, अशी आशंका घेऊन विद्या व अविद्या याच्या साक्षात् साहित्याचा असंभव दुसऱ्या श्रुतींत सांगितलेला असल्यामुळें आह्मी ह्मणतों तशाच प्रकारचें साहित्य येथें स्वीकारलें पाहिजे, असें भाष्यकार सांगतात-) "'दूरमेते विपरीते विषूची अविद्या या च विद्येति ज्ञाता' इति हि काठके। तस्मान्न विद्यायां सत्यामविद्यासंभवोऽस्ति" अन्वय—या अविद्या च विद्या इति ज्ञाता ते एते दूरं विपरीते विषूची इति हि काठके। तस्मात् विद्यायां सत्यां अविद्यासंभवः न अस्ति। अर्थ—ज्या अविद्या व विद्या, या नांवानीं प्रसिद्ध आहेत, त्या दोघीही अत्यंत विपरीत व विरुद्ध आहेत, असें काठकांत सांगितलेलें प्रसिद्ध आहे. यास्तव विद्या असताना अविद्येचा संभव नसतो. ('विद्या चाविद्या च' या मंत्राच्या 'अविद्यया मृत्युं तीर्त्वा.' या उत्तरार्धाचें पर्यालोचन केलें असता अविद्येला विद्येच्या उत्पत्तीचें कारणत्व आहे; ह्मणजे अविद्या विद्येच्या उत्पत्तीचें निमित्त आहे, असें ध्यानांत येतें त्यामुळें त्या दोघींचें साहित्य भिन्न भिन्न कालींच संभवतें, असें आतां सांगतात-) "तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व, इत्यादि श्रुतेः।

अर्थ–कारण तपाच्या योगानें ब्रह्माला जाणण्याची इच्छा कर, इत्यादि अर्थाची श्रुति आहे (अविद्यारूप तप व विद्या यांच्यामध्यें कारण–कार्यभाव आहे कारण व कार्य एकाच पुरुषामध्यें एकाच वेळीं राहूं शकत नाहींत, हें प्रसिद्ध आहे यास्तव अविद्या व विद्या भिन्नकालीं एका पुरुषामध्यें रहातात, असा त्या वाक्याचा अर्थ समजणेंच युक्त होय )

( किंवा गुरुशुश्रूषा व तप याना अविद्या ह्मटलेलें असून श्रवणाचे वेळीं त्या दोघांचेंही अनुष्ठान करावें लागतें यास्तव साधकाचे ठिकाणीं एकाच विद्योत्पत्तीच्या वेळीं त्या दोघींचें साहित्य असतें असा त्या वाक्याचा निराळा अर्थ भाष्यकार सागतात–) "तपआदि विद्योत्पत्तिसाधन गुरूपासनादि च कर्म, अविद्यात्मकत्वादविद्योच्यते ।" अन्वय – तपआदि च गुरूपासनादि विद्योत्पत्तिसाधन कर्म, तस्य अविद्यात्मकत्वात् 'अविद्या इति उच्यते । अर्थ—तप इत्यादि व गुरुशुश्रूषा प्रभृति विद्येच्या उत्पत्तीच साधन, हेंच कर्म होय तें अविद्यात्मक असल्यामुळें त्याला अविद्या असें ह्मटलें जातें (या अर्थाला वरील मन्त्राचा उत्तरार्धही अनुकूल आहे, असें सागतात–) "तेन विद्यामुत्पाद्य मृत्यु काममतितरति ततो निष्कामस्त्यक्तैषणो ब्रह्मविद्ययामृतत्वमश्नुते इत्येतमर्थं दर्शयन्नाह अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययामृतमश्नुते' इति।" अर्थ—त्याच्या योगानें विद्येला उत्पन्न करून साधक मृत्यूचें ह्मणजे कामाच उल्लघन करतो यास्तव निष्काम व ज्यानें सर्व एषणाचा त्याग केला आहे, असा पुरुष ब्रह्मविद्येच्या योगानें मोक्षास प्राप्त होतो, हा अर्थ दाखवीत तोच मत्र पुढें 'अविद्येच्या योगानें मृत्यूचें उल्लघन करून विद्येच्या योगान अमृतत्वाचा अनुभव घेतो ' असें ह्मणता (साक्षात् अविद्येलाच मृत्युत्व असल्यामुळें ती स्वत मृत्यूच्या उल्लघनाचें कारण होणें शक्य नाहीं यास्तव येथील अविद्याशब्दानें तपआदिक साधनरूप कर्म सांगितलें जातें व विद्येचें व्यवधान अर्थावरून कल्पिलें जातें ह्मणजे तपादि कर्मांच्या अनुष्ठानानें अर्थात् विद्या उत्पन्न होते व तिच्या योगानें अमृतत्वाची प्राप्ती होते )

२०५क दोन अवशिष्ट आक्षेपाचें निरसन व उपोद्घाताचा उपसहार

"यत्तु पुरुषायु सर्व कर्मणैव व्याप्त 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छत समा' इति । (तत्) अविद्वद्विषयत्वेन परिहृत-

मितरथाऽसंभवात् ।" अन्वयः—तु 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः' इति श्रुतेः सर्वं पुरुषायुः कर्मणा एव व्याप्तं इति यत् (तत्) अविद्वद्विषयत्वेन परिहृतं इतरथा असंभवात्। अर्थ—परंतु 'यालोकीं कर्मे करीतच शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी,' अशी श्रुति असल्यामुळें पुरुषाचें सर्व आयुष्य कर्मानेंच व्याप्त झालें आहे, असें जें ह्मटलें आहे त्याचा अविद्वद्विषयत्वानें ह्म. तें विधान अविद्वानाकरितां आहे, असें सांगून परिहार केला आहे. 'इतरथा –' तसें न समजल्यास ह्मणजे विद्वान् व अविद्वान् या दोघांनाही यावज्जीवादिश्रुतिचोदित कर्मे अवश्य केलीं पाहिजेत, असें मानल्यास त्यांचा असंभवच होतो. ('जिजीविषेत्' या पदांतील जीविताची इच्छा हें अविद्येचें कार्य आहे. त्यावरून पुरुषाच्या ठिकाणच्या अविद्येचे अनुमान होतें. वर 'यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात्' या श्रुतीची व्यवस्था जशी लाविली आहे (पृष्ठ २५), त्याच न्यायानें या श्रुतिवचनावरून उद्भवणाऱ्या शंकेचें समाधान करावें, असें भाष्यकारानीं 'परिहृत' या वाक्यावरून निश्चित केलें आहे. अथवा 'नाविशेषात्' (ब्रह्म. अ. ३ पा. ४ सू. ११) या सूत्रानें त्याचा परिहार केला आहे, असें समजावें. त्या सूत्राचा अर्थ असा–'कुर्वन्नेवेह०' इत्यादि नियमश्रवणामध्यें 'विद्वानाला कर्मे करूनच जिवंत राहण्याची इच्छा करणें उचित आहे,' असा विशेष नाहीं. तर त्यांत सामान्यतः नियमाचें विधान केलेलें आहे. 'असंभवात्' या भाष्यांतील पदाचें तात्पर्य असें–विद्या व अविद्या यांच्यामध्यें विरोध असल्यामुळें विद्येशीं अविद्येचा सहभाव संभवत नाहीं. किंवा विद्या व अविद्या याचा विरोध असल्यामुळें वर सांगितलेल्या श्रुतीचा व स्मृतीचा असंभव आहे. 'प्रत्युक्तं–' निर्विशेष आत्म्याचा साक्षात्कार कर्ता, कर्म, करण इत्यादि कारकाचा नाश (बाध) करीत असतो त्यामुळें तो कर्माच्या विरुद्ध आहे. एवढ्यासाठींच 'उपमर्दं च' (ब्रह्म. अ. ३ पा. ४ सू. १६) या सूत्रात विद्या व अविद्या यांचा विरोध नाहीं, या ह्मणण्याचें निरसन केलें आहे. वरील सूत्राचा अर्थ असा– अविद्याकृत प्रपंचाचा विद्यासामर्थ्यानें उपमर्द (नाश, बाध) होतो, असें 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्०' या श्रुतींत सांगितलें आहे. तस्मात् पुढील तीन अध्यायांत ह्म. पाच खंडांत सांगितली जाणारी विद्या कर्मनिष्ठ-

(कर्मी पुरुषाचे ठिकाणीं असणारी) नाहीं, व ती कर्माशीं संबंध ठेवणारीही नाहीं. तर केवल आत्मा हाच तिचा विषय आहे, हें ठरलें. या अध्यायांच्या पूर्वीच्या सर्व वेदभागांत सांगितलेलें कर्म व उपासना यांच्या योगानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे आणि त्यामुळेंच जो साधनचतुष्टयसंपन्न झालेला आहे, त्याच्या 'केवल आत्मस्वरूपानें अवस्थित होणें,' या मोक्षाकरितां यापुढें केवल आत्मविद्या आरंभिली जाते, असें सांगून भाष्यकार उपोद्घाताचा उपसंहार करितात–) "अतः केवलनिष्क्रियब्रह्मात्मैकत्वविद्याप्रदर्शनार्थमुत्तरो ग्रन्थ आरभ्यते।' अन्वयः–अतः उत्तरः ग्रन्थः केवलनिष्क्रियब्रह्मात्मैकत्वविद्याप्रदर्शनार्थं आरभ्यते। अर्थ––यास्तव पुढील ग्रंथ केवल (निरुपाधिक) निष्क्रिय ब्रह्म व आत्मा यांचें एकत्व, याच विद्येचें प्रदर्शन करण्याकरितां आरंभिला जात आहे.

आतां या सर्व उपोद्घातभाष्याचें रहस्य सर्व सामान्यवाचकांस कळावें, ह्मणून त्याचा सारांश सांगून उपनिषद्भाष्याच्या व्याख्यानास आरंभ करितों. अगोदर येथें अशी शंका येते कीं, भाष्यकारांनीं हा वाद येथें उपस्थितच कां केला? यास्तव आरंभीं त्याचेंच कारण सांगणें उचित आहे. ऐतरेय ही ऋग्वेदाची शाखा आहे. ऋग्वेद मंत्रमय व सूक्तमय आहे, हें प्रसिद्ध आहे. मंत्रांचा विनियोग प्रायः कर्मांकडे करीत असतात व पूर्वमीमांसक वेदाचा सर्व भाग कर्माकरितां व कर्मसंबंधी आहे, असें ह्मणतात. त्याचप्रमाणें कर्मठ वैदिक संन्यास हा आश्रमच कबूल करीत नाहींत. तर 'पहिल्या ब्रह्मचर्य आश्रमांतील वेदाध्ययन संपतांच दारपरिग्रह (विवाह) करून अग्निहोत्रादि नित्य, नैमित्तिक, काम्य, प्रायश्चित्त, व उपासना कर्में करावयास आरंभ करावा, निषिद्ध कर्मांचा त्याग करावा आणि मरेपर्यंत हा क्रम चालवावा,' असें ह्मणतात. त्याचप्रमाणें वानप्रस्थ व संन्यास हे आश्रम वेदांत सांगितलेले आहेत, असें जरी मानलें, तरी कांहीं कारणानें गृहस्थ होण्यास योग्य नसलेल्या ह्मणजेच अनधिकारी पुरुषांकरितां ते आहेत, असें त्यांचें मत आहे. त्यामुळें ऐतरेय आरण्यकांतील हे पुढील पांच ('धाइमे०' या शेवटच्या खंडासह सहा) खंडही निरुपाधिक व निष्क्रिय आत्म्याचें प्रतिपादन करीत नाहींत तर कर्मसंबंधी आत्म्याचेंच प्रतिपादन करितात, असें ते ह्मणतात. यास्तव त्यांचें ह्मणणें खोडून काढून

पुढील अध्याय केवळ आत्मप्रतिपादक आहेत, विरक्त संन्यासीच त्यांचा अधिकारी आहे, व संन्यास हा चतुर्थाश्रम ब्राह्मणांना अवश्य आहे, असें सिद्ध करण्यासाठीं आचार्यांनीं हा वाद येथें उपस्थित केला आहे. आतां त्या वादांतील पूर्वपक्षाचे व उत्तरपक्षाचे मुद्दे क्रमानें पुढें सांगून हा सारांश संपवितों. (येथें वादी ह्मणजे पूर्वपक्ष करणारा मीमांसक. मध्यस्थ म्हणजे वादी व प्रतिवादी यांचें म्हणणें ऐकून घेऊन त्यांना मध्येंच विरुद्ध पक्षाकडून येणाऱ्या शंका विचारणारा निःपक्षपात श्रोता व सिद्धान्ती म्हणजे उत्तरपक्ष सांगणारा शास्त्रकार आचार्य.)

सिद्धान्ती—मागच्या अध्यायापर्यंत कर्म व उपासना याचें प्रतिपादन केलें व शेवटच्या प्राणोपासनेचें फल सांगून त्या प्रकरणाचा उपसंहारही केला. आता कर्म व उपासना याच्या अनुष्ठानानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे, अशा पुरुषाला 'केवळ आत्मरूपानें अवस्थित होणें,' या मोक्षाची प्राप्ति व्हावी ह्मणून केवळ आत्मविद्येचें विधान करण्याकरितां पुढील ग्रंथ आरंभिला आहे. कारण त्या विद्येचा उचित अवसर आताच आला आहे. चित्तशुद्धि होण्यापूर्वी तो नव्हता. चित्तशुद्धि म्हणजे पुरुषाच्या चित्तानें काम व क्रोध यांनीं रहित होणें. उपास्यदेवतेच्या स्वरूपांत मिळून जाणें हाच मोक्ष आहे, असें कित्येक (उपासनाप्रिय लोक) समजतात. पण तें बरोबर नाहीं. यास्तव त्याचें निराकरण करण्यासाठींही पुढचा ग्रंथ आहे. ज्यांची उपासना करावयाची त्या अग्नि–वायु–प्रभृति देवताही संसारी आहेत, असें याच उपनिषदांत पुढें सांगितलें आहे. भूक व तहान (किंवा तत्प्रयुक्त भोगाची इच्छा), हाच संसार आहे. देवता त्या दोन ऊर्मींनीं युक्त आहेत. म्हणून त्याही संसारयुक्त आहेत. पण आत्मा अशनाया व पिपासा या ऊर्मींनीं रहित आहे, असें श्रुतीनें वर्णन केलें आहे.

वादी—(केवळ आत्म्याचा साक्षात्कार, हें मोक्षाचें साधन आहे, असें नुसतें गृहीत धरून शंका घेतो.) केवळ आत्मज्ञान मोक्षाचें साधन आहे, असें जरी क्षणभर कबूल केलें, तरी त्याचा अधिकारी अकर्मी (यथाशास्त्र कर्मांचा व कर्मांच्या साधनांचा त्याग करणारा) संन्यासीच आहे, असें ह्मणतां येत नाहीं. कारण संन्यास हा पृथक् आश्रम आहे, असें येथें सांगि-

तलेलें नाहीं उलट 'वृत्तीसहस्र' या नावाच्या कर्माचें विधान आरभून लागलेंच त्याच्या मागोमाग आत्मज्ञान आरभिलें आहे यास्तव कर्मी गृहस्थच त्याचा अधिकारी आहे कर्माशीं सबध न ठेवणाऱ्या केवल आत्मविद्येचा अगीकार करून मीं हें ह्मटलें आहे पण वस्तुत: कर्माशीं सबध न ठेवणारें आत्मज्ञानच नाहीं. कारण या आत्मप्रकरणाच्या पूर्वी–कर्मसबधी उपासनेचा विषय जो सूर्य तो सर्व चराचर भूताचा आत्मा आहे, –हें जसें सागितलें आहे, तसेंच 'हा ब्रह्मा ( हिरण्यगर्भ ), हा इद्र०' ( अनुभूतिप्रकाश अ १ रत्न १ लें पान २५० पहा,) इत्यादि या पुढील प्रकरणातही प्रज्ञानात्मा सर्व प्राण्याचा आत्मा आहे, असें ह्मटलें आहे सहितोपनिषदामध्येंही आत्मा कर्मसबधी आहे, असें सागून तोच सर्वभूतातील ब्रह्म आहे, असा उपसहार केला आहे प्रज्ञात्मा व आदित्यस्थ आत्मा हे दोन्ही एकच आहेत, असें ह्मटलें आहे या प्रकरणातही पाचव्या खडात 'आह्मी आत्मा आत्मा ह्मणून ज्याला ह्मणतों तो कोण?' असा उपक्रम करून तोच प्रज्ञात्मा आहे, असें 'प्रज्ञान ब्रह्म' या वाक्यानें श्रुति दाखवील तस्मात् आत्मज्ञान अकर्मसबधी नाहीं, तर कर्मसबधीच आहे.

यावर येणाऱ्या सिद्धान्त्याच्या एका शकेचा अनुवाद करून वादी तिचें समाधान सागतो–मत्र व ब्राह्मण या दोघानींही एकद। ज्याचा निश्चय केला आहे त्याच आत्म्याचा या पुढील प्रकरणानें पुन निश्चय करण्यास आरभ करणें व्यर्थ आहे त्यावर पुनरुक्ततादोष येतो, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण पूर्वी ज्याचा निश्चय केला आहे त्याच्याच विशेष धर्माचा निश्चय करण्यासाठीं हें पुढील प्रकरण आहे, यास्तव त्यावर पुनरुक्तादोष येऊं शकत नाहीं १ कर्माशीं सबध ठेवणाऱ्या त्या आत्म्याचेच जगाची सृष्टि, स्थिति व सहार करणें, हे विशेष धर्म आहेत, असा निश्चय करण्यासाठीं हें निराळें प्रकरण आरंभिलें आहे किंवा २ कर्मसबधी आत्म्याची कर्मावाचून स्वतत्र उपासना होऊ शकते, हें मागच्या प्रकरणावरून सिद्ध होत नाहीं कारण यापूर्वी जी उपासना सांगितली आहे, ती कर्मप्रकरणातच सांगितली असल्यामुळें स्वतत्र होऊ शकत नाहीं यास्तव केवळ आत्म्याची कर्मावाचून स्वतत्रानेंही उपासना होऊ शकते, हें सांगण्यासाठीं पुढील प्रकरण आहे अथवा ३ एकच आत्मा कर्मसमयीं 'हा, मग हून निराळा,' असा भेद

दृष्टीनें उपास्य ( उपासना करण्यास योग्य ) होतो व कर्म करावयाचें नसेल तेव्हां 'तोच मी' या अभेददृष्टीनें उपास्य होतो; हें सांगण्याकरितां पुढचा ग्रंथ आहे, आणि अशा तीन कारणांनीं त्यावर पुनरुक्ततादोष येत नाहीं.

येणेंप्रमाणें या उपनिषदाचा आपल्या पक्षीं उपयोग कसा आहे, तें सांगून आतां हेंच ऐतरेयोपनिषद् कर्माचा त्याग करून केवल आत्मज्ञान संपादन करावें, असें सांगणारें आहे; हा पक्ष स्वीकारल्यास अनेक श्रुतींशीं विरोध, हा दोष कसा येतो तें मीमांसक सांगतो–' विद्यां चाविद्यां च ' व ' कुर्वन्नेवेह कर्माणि० ' या श्रुती कर्म व ज्ञान यांचें एकाच वेळीं ( सह ) अनुष्ठान करण्याविषयीं व कर्में करीतच शंभर वर्षें जिवंत रहाण्याची इच्छा करण्याविषयीं सांगत आहेत. पुरुषाचें आयुष्यही शंभर वर्षांहून अधिक नाहीं. तेव्हां पुरुषाला कर्मांचा त्याग करून केवळ आत्म्याची उपासना करावयास अवकाश कोठें आहे ? कारण आयुष्याचीं शंभर वर्षें कर्में करीतच घालवावीं, असें विधान आहे. यावज्जीव अग्निहोत्र, दर्शपूर्णमास इत्यादि करण्याविषयीं सांगणारींही श्रुतिवचनें आहेत. गृहस्थाला यज्ञपात्रांसह जाळतात, असेंही श्रुतीचें कथन आहे. शिवाय उत्पन्न होणाऱ्या ब्राह्मणावर तीन ऋणें असतात, असेंही विधान आहे.

पण यावर तुह्मी जर विचाराल कीं, तर मग संन्यासाचें विधान करणाऱ्या शास्त्राचा काय उपयोग? तर त्याचें समाधान असें–एक तर तो आत्मज्ञानाची स्तुति करणारा अर्थवाद आहे, असें समजावें; किंवा तें विधान कर्मांचा ज्याला अधिकारच नाहीं अशाकरितां आहे, असें जाणावें. तात्पर्य, ऐतरेयोक्त विद्या, हा संन्यासाचा विषय नव्हे. तर तीं कर्में करणाऱ्या पुरुषाचाच विषय आहे व त्या विद्येचा संबंध कर्मांशीं आहे, हें सिद्ध झालें.

मीमांसकानें असा पूर्वपक्ष केला असतां सिद्धान्ती त्याचा उत्तरपक्ष सांगतात.–हें तुमचें ह्मणणें योग्य नाहीं. तें कसें ह्मणून विचाराल तर सांगतों–परिपूर्ण, कामनाशून्य व सर्व संसारदोषरहित ब्रह्म मी आहें, अशा प्रकारें आत्मरूपानें ब्रह्माचें ज्ञान झालें असतां त्या विद्वानाला मागें केलेल्या

अथवा पुढें करावयाच्या कर्माचें कांहीं फळ आहे, असेंच मुळीं वाटत नाहीं आणि फळाच्या अभावीं त्याच्या हातून क्रिया होणेंही युक्त नाहीं. 'कर्माचा कांहीं उपयोग नाहीं, असें जरी त्याला ठाऊक असलें, तरी शास्त्रानें नियोग (प्रेरणा, विधान) केलेले असल्यामुळें तो तीं करील.' असें जर म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण आत्म्याचा इष्ट विषयाशीं योग व अनिष्ट विषयाशीं वियोग होणें हें फळ संभवतें, असें ज्याला वाटतें, तोच इष्टप्राप्ति व अनिष्टनिवृत्ति यांच्या उपायाची इच्छा करतो आणि असला उपायार्थीच शास्त्रीय नियोगाचा विषय होतो. आत्मा असंग व नित्यतृप्त आहे, असें जो जाणतो त्याला इष्टप्राप्ति व अनिष्टनिवृत्ति हें फळ आत्म्याला मिळतें, असें मुळीं वाटतच नाहीं. त्यामुळें त्याला त्याच्या उपायाची इच्छा होत नाहीं व उपायेच्छेच्या अभावीं तो ब्रह्मात्मत्वदर्शीही शास्त्रीय नियोगाचा विषय होत नाहीं. ब्रह्मात्मज्ञही नियोगाचा विषय होतो असें म्हटल्यास प्राणिमात्र नियोगाचा विषय आहे, असें होईल व त्यामुळें सर्व कर्म सर्वांनीं सदा करावें, असें म्हणावें लागेल, पण तें अनिष्ट आहे.

शिवाय आत्मज्ञाला कोणी नियुक्तही करू शकत नाहीं. वेद आत्म्यापासून झालेला आहे तेव्हां स्वतः त्या ज्ञानमाहात्म्यानें उत्पन्न झालेल्या वेदरूप वचनानें तो स्वतःच नियुक्त कसा होणार? आत्मज्ञ स्वतः आत्माच झालेला असतो. तेव्हा आपल्याच वचनानें पुरुष आपणच नियुक्त कसा होईल? नियोग करणारा नियोक्ता नेहमीं पृथक् असतो, असा व्यवहारांतही अबाधित अनुभव आहे. तसेंच, वेद ज्ञानानें भरलेले जरी असले तरी ते ज्याच्यापासून झाले त्या आत्म्याहून कमीच ज्ञानी असणार हें उघड आहे. कारण व्यवहारांतही एखादें शास्त्र रचणाऱ्या पुरुषाचें ज्ञान त्या शास्त्रांतील ज्ञानाहून अधिक असतें, असें दिसतें. तेव्हां एखादा अविवेकी सेवक जसा अधिक ज्ञानी स्वामीला कोणत्याही कार्याविषयीं प्रेरणा करीत नाहीं, अथवा करूं शकत नाहीं त्याचप्रमाणें अल्पज्ञ वेद सर्वज्ञ आत्म्याला उद्देशून नियोग करण्यास समर्थ नसतो. वेद नित्य व स्वतंत्र आहे व त्यामुळें त्याला सर्वांना नियुक्त करता येतें म्हणून म्हणावें, तर सर्वांनी सर्वदा सर्वत्र कर्मे करावीं, हा दुसरा दोष येतो. कर्माचें कर्तृत्व व आत्मज्ञान हीं दोन्ही शास्त्र-

कृतच आहेत, ह्मणजे एकाच वेळीं एकाच पुरुषानें त्या दोघांचें सपादन करावें, असें शास्त्रच सागत आहे ह्मणून ह्मणावें तर शास्त्रही अग्नि शीत ( थड ) आहे, या सागण्याप्रमाणें तसा विरुद्ध अर्थ सागू शकणार नाहीं ह्मणजे शास्त्रानें आत्म्याचा कर्माशीं सबध आहे व नाहीं, असा विरुद्ध अर्थ सागणें, योग्य नाहीं

इष्टयोग व अनिष्टपरिहार हें फल प्राप्त व्हावें, अशी इच्छाही शास्त्रकृत नव्हे कारण ती सर्वप्राणिसाधारण आहे आणि जें स्वभावत च अप्राप्त असतें, त्याचाच शास्त्रानें बोध करावा, हें उचित होय या नियमास अनुसरून शास्त्रानें जर कर्मविरोधी आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे, तर पुन तेंच शास्त्र आत्मज्ञानाच्या विरोधी असलेल्या कर्तव्यतेचा उपदेश कसा करील ? शास्त्र तसा उपदेशच करीत नाहीं, ह्मणून ह्मणावें तर तसेंही नाहीं कारण अकर्तृ व अभोक्तृ ब्रह्मच आत्मा आहे, असें प्रतिपादन करणारीं हजारों वाक्यें आहेत व तसा साक्षात्कार येतो, हेंहि अनुभवानें सिद्ध आहे ब्रह्मच आत्मा आहे हा अनुभव भ्रामक आहे, असेंही ह्मणता येत नाहीं कारण ज्याचा बाध होतो, त्यालाच भ्रामक ज्ञान ह्मणता येतें ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा बाध होतो, असा अनुभव कोठेंही येत नाहीं

भगवद्गीतेंत 'नाकृतेनेह कश्चन' असें ह्मटलेलें असल्यामुळें आत्मज्ञानें सन्यास ( कर्मत्याग ) जरी केला तरी त्याचें प्रयोजन काहीं नाहीं ह्मणजे केलेल्या कर्माचें जसें काहीं प्रयोजन नाहीं, तसेंच कर्मत्यागाचेंही काहीं प्रयोजन नाहीं ह्मणजे ब्रह्माला जाणून सन्यासच करावा, असें जे ह्मणतात त्याच्या त्या ह्मणण्यावरही प्रयोजनाचा अभाव हा दोष येतोच, असें ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण सन्यास ह्मणजे निव्वळ कर्माचें अनुष्ठान न करणें यापेक्षा सन्यासाचें निराळें स्वरूप नाहीं आत्म्याचें अज्ञान हेंच प्रयोजनाच्या इच्छेचें निमित्त आहे प्राय सर्व प्राण्याना आत्म्याचें ज्ञान नसत त्यामुळें ते प्रत्येक प्रयत्नाच्या फलाची इच्छा करितात आणि त्या प्रयोजनाच्या तृष्णनें प्रेरणा केल्यामुळेंच सर्वांच्या शरीरादिकाची प्रवृत्ति होते पण ज्याला आत्मज्ञान होतें त्याला अविद्याजन्य तृष्णा नसते. तिच्या अभावीं त्याच्या शरीरादिकांची प्रवृत्तिही सभवत नाहीं व्युत्थान किंवा सन्यास

यज्ञादिकाप्रमाणें अनुष्ठेय नाहीं, तर तो नुसता क्रियाभावरूप व विद्वानाचा धर्म आहे त्यामुळें त्याचें प्रयोजन काय, हा प्रश्नच उद्भवत नाहीं. अंधकारातून जाताना जसा एखादा पुरुष ठेंचकाळतो किंवा काटे, सळगा इत्यादिकांत पडतो, तसाच तो प्रकाशातून जाताना का पडत नाहीं, असें विचारणेंच अयुक्त आहे

गृहस्थाश्रम कामनाप्रयुक्त आहे, त्यामुळें परब्रह्मविज्ञान झाल्यावर पुरुषाचें त्याच आश्रमात कर्म न करता अवस्थान होणें शक्य नाहीं. व्युत्थान ह्मणजे तरी काय, तर कामनेचीं निमित्तें, अशा पुत्र वित्तादिकांच्या संबंधाचा नियमानें अभावच होय त्याच्यापासून दूर कोठें जाणें ह्मणजे व्युत्थान, असें नव्हे यास्तव ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे तो गृहस्थाश्रमातच कर्में न करता राहील, असें ह्मणणें अयुक्त आहे यावरून विद्वानाला गुरुशुश्रूषा, तप, इत्यादिकांचीही आवश्यकता नाहीं, असें ठरलें.

भिक्षाटनाची सवय नसल्यामुळें ज्याना त्याची लाज वाटते, अथवा आपला कोणी अपमान करील ह्मणून भय वाटतें, असे कित्येक यावर अशी युक्ति लढवितात–प्रारब्धक्षयार्थ केवळ शरीरधारण व्हावें, एवढीच इच्छा करणाऱ्या भिक्षूलाही भिक्षाटनादिकाचा नियम आहे, असें दिसतें त्याच न्यायानें केवळ शरीरधारणाची इच्छा करणाऱ्या व साध्यसाधनरूप दोन्हीं प्रकारच्या एषणानीं रहित झालेल्या गृहस्थाचें अवस्थान गृहातच झाल्यास त्यात दोष कोणता ? अवश्य तेवढेंच अन्न व वस्त्र घरातून घेणाऱ्या त्याला वस्तुत शास्त्रदृष्ट्या काहीं दोष लागू नये!

पण हें ह्मणणें फारसें सयुक्तिक नाहीं कारण आपल्या गृहातील स्त्री पुत्र-वित्त इत्यादिकांतील एकाद्या परिग्रहाचाही नियम करणें, ह्मणजे त्यातील अन्न व वस्त्रच मी घेईन, दुसरें काहीं घेणार नाहीं, असा नियम करणें, हें मुद्दा कामनाप्रयुक्त आहे. कारण माझ्या घरातील अन्नाचाच मी स्वीकार करीन, दुसऱ्याच्या घरच्या अन्नाचा अंगीकार करणार नाहीं, असा नियम करण्याचें कारण तरी कामनेवाचून दुसरें काय असणार ! बरें, आपल्या घरांतीलच अन्नादिक घेईन, असा आग्रह न धरल्यास शरीरधारणेकरिता

अवश्य असलेल्या अन्नादिकांच्या संपादनार्थ भिक्षावृत्ति स्वीकारणें भाग आहे. अर्थात् स्वगृहपरिग्रहाच्या अभावीं ज्ञान्याचें व्युत्थान स्वाभाविक आहे.

विद्वान् शास्त्रीय नियोगाचा विषय होत नसल्यामुळें व त्यानें नियोज्य होणें अशक्यही असल्याकारणानें 'भिक्षूची भिक्षाटन, शौच इत्यादिकांमध्यें जशी प्रवृत्ति होते, तशीच विद्वान् व कामनारहित गृहस्थाची प्रवृत्ति नित्यकर्मामध्यें नियमानें होऊं शकेल. कारण यावज्जीवादिश्रुतीनें विधान केल्यामुळें प्रत्यवाय परिहाराकरितां तिची अत्यंत आवश्यकता असते,' या म्हणण्याचें निरसन होतें. कारण विद्वान् नियोगाचा विषयच जर होत नाहीं, तर त्याला प्रत्यवाय कसा लागणार !

मग यावज्जीवादि नित्य चोदनाचा उपयोग काय? म्हणून विचाराल तर सांगतों—त्या चोदना ज्यांना आत्मज्ञान झालेलें नसतें त्याच्याकरितां आहेत. आचमन करावयास प्रवृत्त झालेल्या पुरुषाची तहानही भागते. पण तहान भागणें हें त्या प्रवृत्तीचें निमित्त नव्हे त्याचप्रमाणें भिक्षु केवळ शरीरधारण व्हावें म्हणून भिक्षा मागावयास जरी प्रवृत्त होत असला, तरी त्यावरून त्या प्रवृत्तीचें नित्यत्वच सिद्ध कारण ना', म्हणजे भिक्षूला शास्त्रानें ती नियत केली आहे, म्हणून तो ती करतो, असें नाहीं. तर आचमन करणाऱ्या पुरुषाची तहान जशी आपोआप भागते, तशीच शरीर रहावें म्हणून भिक्षादिकांमध्यें प्रवृत्त होणाऱ्या पुरुषाची नियत प्रवृत्ति आपोआप होते. अग्निहोत्रादिकांतील प्रवृत्ति तशी नियत नाहीं. कारण अन्नाप्रमाणें अग्निहोत्र स्वभावतः प्राप्त नाहीं, तर तें केवळ नियोगप्राप्तच आहे.

आतां—जर कांहीं प्रयोजनच नाही, तर अर्थप्राप्त प्रवृत्तीविषयींही नियम करणें अयोग्य आहे, म्हणून म्हणाल तर सांगतों. स्वाभाविकपणें प्राप्त होणाऱ्या प्रवृत्तीचाही नियम पूर्वप्रवृत्तीनेंच सिद्ध होतो. म्हणजे अन्न स्वभावतःच जरी अवश्य असलें तरी तें संपादन करण्यासाठीं भिक्षाच मागावी, हा नियम पूर्वप्रवृत्तीनें सिद्ध होतो. साधक अवस्थेंत असतांना भिक्षाटनाचा अभ्यास झालेला असतो व त्याच्याच संस्कारानें सिद्ध झाल्यावरही विशेष प्रयत्नावांचून पुरुषाची प्रवृत्ति भिक्षाटनाकडे होते. त्या प्रवृत्तीचा इतका परिचय झालेला असतो कीं, तिचा अतिक्रम करावयाचा झाल्यासच सिद्ध पुरुषाला अधिक यत्न करावा लागतो.

शिवाय विद्वानाला संन्यास स्वाभाविक आहे. ह्मणजे तो करावा, अशी इच्छा त्यानें जरी न केली तरी तो आपोआप होतोच. ह्मणजे विद्वानाचा संन्यास अर्थसिद्धच आहे. पण त्याविषयीं शास्त्रानेंही विधान असल्यामुळें लोकसंग्रहाकरिता विद्वान् तो अवश्य करतो.

अविद्वान् मुमुक्षूलाही संन्यास करणें अवश्य आहे. कारण शम, दम इत्यादि आत्मदर्शनाच्या साधनाचा गृहस्थादि इतर आश्रमात फारसा संभव नसतो एकांतात एकाकी राहणें, चित्ताला स्थिर करणें, ब्रह्मचारित्वामध्यें स्थित होणें, केवळ परमात्म्याकडेच चित्त लावणें, इत्यादि साधनाचें संपूर्णपणे अनुष्ठान संन्यासावाचून दुसऱ्या कोणत्याही आश्रमात संभवत नाहीं. यास्तव मुमुक्षूनेंही संन्यासच करावा

कोणत्याही साधनाचें पूर्णपणें अनुष्ठान झाल्यावाचून तें आपलें फल देण्यास समर्थ होत नाहीं यास्तव वरील ब्रह्मचर्यादिक–ऋतुकालींच भार्यागमन करणें– इत्यादिरूप गौण आहे, अशी कल्पना करता येत नाहीं. गृहस्थाश्रमातील कर्माच्या फलाचा उपसंहार पूर्वी केला आहे. देवतामध्यें लय पावणें हें त्याचें फल असून तें संसारातीलच एक आहे. ह्मणजे तें मुख्य मोक्षरूप फल नव्हे. कर्मठ पुरुषालाच परमात्म्याचें विज्ञान होणें जर शक्य असतें, तर संसारविषयक फलाचा उपसंहार करून प्रकरण संपविलें नसतें. आता ते अंगफळ आहे, मुख्य नव्हे ह्मणून ह्मणाल तर तेंहीं युक्त नव्हे कारण आत्मविद्येचा विषय अगफलादि दुसऱ्या कोणत्याही विशेषानें युक्त नसलेला आत्मा आहे सर्वविशेषशून्य आत्म्याचा साक्षात्कार हेंच ससारातून मुक्त होण्याचें खरें साधन आहे यास्तव त्या आत्म्याचा अगफलादिकासारख्या गौणफलाशीं सबंध आहे, असें ह्मणणें अयोग्य होय. बृहदारण्यकातही 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्' इत्यादि भागानें विद्वानाच्या सर्व व्यवहाराचें निराकरण करून अविद्वानाकरिता ससार सांगितला आहे. त्याचप्रमाणें या ऐतरेयारण्यकातही येथवर कर्म व उपासना याचें प्रतिपादन करून ससारविषयक फलाचा उपसहार केला आहे आणि आता यापुढें मोक्षाकरिता केवल सर्वात्मवस्तुविषय ज्ञान सागण्याच्या उद्देशानें श्रुति प्रवृत्त झाली आहे.

ज्याला आत्मज्ञान झालेलें नसतें त्याच्याच–मनुष्य, पितर व देव या लोकाच्या–प्राप्तीस पूर्वोक्त तीन ऋणें प्रतिबंध करूं शकतात विद्वा-

नाच्या फलप्राप्तीला तीं प्रतिबंध करूं शकत नाहींत. कारण तीन ऋणांची फेड हेंच मनुष्यादि लोकांच्या प्राप्तीचें साधन आहे. शिवाय केवल आत्मरूप फलाचीच इच्छा करणाराला वरील ऋणें प्रतिबंध करूं शकत नाहींत, असें ' किं प्रजया करिष्यामः ' इत्यादि श्रुतीनें सांगितलें आहे.

आत्म्याला न जाणणारा अविद्वान्ही गृहस्थाश्रमाचा स्वीकार केल्यावरच वरील तीन ऋणांस पात्र होतो. ब्रह्मचर्याश्रमांत असेपर्यंत पुरुष ऋणी होत नाहीं. यास्तव तीव्र वैराग्य झाल्यास ब्रह्मचारीही मधल्या दोन आश्रमांचें उल्लंघन करून एकदम संन्याशी होऊं शकतो. कारण संन्यास हा आत्मसाक्षात्काराचा उपाय आहे. तात्पर्य, यावज्जीवादिश्रुती अविद्वान् व अमुमुक्षु यांच्याकरितां आहेत.

आतां ज्यांना कर्मादिकांचा अधिकार नाहीं त्यांच्याकरितां संन्यास आहे, असें जें वर ( पृष्ठ ५० ) पूर्वपक्षांत ह्मटलें आहे, तें बरोबर नाहीं. कारण त्यांच्याकरितां श्रुतीनें निराळें विधान केलें आहे. सर्व स्मृतींमध्येंही आश्रमांचा विकल्प व समुच्चय प्रसिद्ध आहे. ह्मणजे त्रैवर्णिकांनीं पाहिजे तर क्रमानें आश्रमांचा स्वीकार करावा अथवा पूर्वीच्या कोणत्याही आश्रमांतून एकदम संन्यास घ्यावा, असें सामान्यतः विधान केलें आहे.

विद्वानाला संन्यासच अर्थप्राप्त आहे. यास्तव त्याला गृहांत किंवा वनांत राहतां येत नाहीं. स्वाभाविक संन्यासावांचून इतरत्र राहणें, हें कामनाप्रयुक्त आहे, असें आह्मीं वर सांगितलेंच आहे. पण विद्वानाला विधिनिषेध नाहीं, असें ह्मटल्यास त्याचें यथेष्ट आचरण होईल, अशी भीति बाळगण्याचेंही कांहीं कारण नाहीं. कारण कामना हा अत्यंत मूढाचा विषय आहे. अहो विद्वानाला शास्त्रविहित कर्माचाही जर मोठा भार वाटतो, तर तो निषिद्ध यथेष्ट आचरणाचा अंगीकार कसा करील? तस्मात् आत्मज्ञाला व्युत्थानावांचून दुसरें कांहींच प्राप्त नाहीं.

विद्येबरोबर अविद्येनें राहणें सर्वथा अनुचित आहे. ' विद्या व अविद्या यांना जो सह ( एकत्र ) जाणतो, ' या श्रुतिवाक्याचा अर्थ विद्वानाच्या विद्येबरोबर अविद्या रहाते असा नव्हे, तर एका पुरुषाचे ठिकाणीं त्या दोघी एकदाच रहात नाहींत, क्रमानें रहातात, असा त्याचा अर्थ समजावा. कारण काठकोपनिषदांत त्या दोघी अत्यंत विरुद्ध आहेत, असें

सांगितलें आहे. तप, गुरूपासना इत्यादि विद्योत्पत्तीच्या साधनभूत कर्माला अविद्या ह्मणतात. तिच्या योगानें विद्येला उत्पन्न करून पुरुष कामरूप मृत्यूचें उल्लंघन करतो आणि निष्काम पुरुष पुत्र, वित्त व परलोक यांविषयींच्या एषणांचा त्याग करून ब्रह्मविद्येच्या योगानें अमृतत्वाचा अनुभव घेतो, असें ' अविद्यया मृत्युं तीर्त्वा ' हें श्रुतिवाक्य सांगतें.

' कर्मे करीतच जिवंत राहण्याची इच्छा करावी, असें सांगणारें श्रुतीचें वचन आहे. त्यामुळें पुरुषाचें सर्व आयुष्य कर्मे करण्यांतच क्षीण होतें. तेव्हां संन्यासाला अवकाश कोठें आहे ? ' ह्मणून जें विचारलें होतेंत त्याचें उत्तर वर दिलेंच आहे. ' ज्याला जिवंत राहण्याची इच्छा असते तोच कर्माचा अधिकारी आहे, असें स्वतः श्रुतिच सांगत असल्यामुळें निष्काम आत्मज्ञाकरितां तीं नाहींत. तर अविद्वानाकरितां आहेत,' असें वर ह्मटलें आहे. कर्मेही पुढें सांगितल्या जाणाऱ्या आत्मज्ञानाच्या विरुद्ध नाहींत, तर तीं दोन्ही सारखींच आहेत, असें जर ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण कर्माचा विषय सविशेष आत्मा आहे व ज्ञानाचा विषय निर्विशेष आत्मा आहे, असें ह्मणून व्यासांनीं ब्रह्ममीमांसेंत त्या शंकेचा परिहार केला आहे व आह्मीही पुढें या उपनिषद्भाच्या व्याख्यानांत तेंच सांगणार आहों. यास्तव केवळ निष्क्रिय ब्रह्म व आत्मा यांचें एकत्वज्ञान करून देण्याकरितां पुढचा ग्रंथ आहे.

येथें उपोद्घात समाप्त झाला.

' वाङ्मे मनसि प्रतिष्ठिता० ' इत्यादि ऐतरेय उपनिषदाचा सहावा खंड, हा द्वितीय आरण्यकाचा सातवा किंवा शेवटचा अध्याय आहे. पण तो शांतिरूप असल्यामुळें ' आत्मा वा० ' इत्यादि उपनिषद्भाच्या आरंभींच त्याचा पाठ करण्याचा संप्रदाय आहे. या शांतीचा शब्दार्थ प्रथम रत्नाच्या 'अ' परिशिष्टाच्या आरंभींच पहावा. या शांतीच्या जागीं ' ॐ भूर्मिमुपस्पृशेद्म इत्या ' इत्यादि शांति ह्मणण्याचाही कचित् परिपाठ आहे.

## ३१ ' आत्मा वै० ' या वाक्याचें व्याख्यान.

( अहो पण आत्मा सविशेष आहे, अशीच प्रतीति येत असल्यामुळें त्याचा केवलभाव ( निर्विशेष अवस्था ) शक्य कसा आहे ? अशी आशंका

घेऊन सर्व विशेष आत्म्याच्या ठिकाणीं मायेनें कल्पित असल्यामुळें त्याच्या स्वाभाविक निर्विशेषत्वाशीं कांहीं विरोध येत नाहीं आणि हाच तत्त्वार्थ सांगण्याकरितां मायेच्या योगानें आत्म्यापासून सृष्टि झाली, असें सांगणें भाग आहे. यास्तव त्या मायिक सृष्टीच्या पूर्वी आत्म्याचें निर्विशेष रूप होतें, हें दाखविण्याकरितां 'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्' हें ऐतरेयोपनिषद्‌चें वाक्य आहे. त्यांतील 'आत्मा' या पहिल्याच पदाचा अर्थ भाष्यकार सांगतात- ) "आत्मा आप्नोतेरत्तेरततेर्वा परः सर्वज्ञः सर्वशक्तिः, अशनायादिसर्वसंसारधर्मवर्जितो नित्यशुद्धबुद्ध-मुक्तस्वभावोऽजोऽजरोऽमरोऽमृतोऽभयोऽद्वयः (उच्यते ।)" अर्थ— व्यापीत असल्यामुळें, उपभोग घेत असल्यामुळें व संततभावामुळें 'आत्मा' या शब्दानें सर्वज्ञ, सर्वशक्ति, क्षुधा, तृषा इत्यादि सर्वसंसारधर्मरहित नित्य शुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभाव, अज, अजर, अमर, अमृत व अद्वय परमात्मा सांगितला जातो. ( येथील पहिल्या 'आत्मा' या शब्दानें 'सर्वज्ञ, सर्वशक्ति' इत्यादि रूप आत्मा सांगितला जातो, असा अन्वय लावावा. 'अद्वयः' या पदाच्या पुढें 'उच्यते' असा शेष लावावा. अहो, पण मूळ वाक्यांत नुसत्या आत्म-शब्दाचाच प्रयोग केला आहे. तेव्हा त्या शब्दानें सर्वज्ञादिलक्षण आत्मा सांगितला जातो, असें कसें ह्मणता, अशी आशंका घेऊन 'स्मृतींत सांगि-तलेल्या त्या शब्दाच्या व्युत्पत्तीच्या बलानें व रूढीवरूनही आत्मा सर्वज्ञत्वा-दिलक्षण आहे, असें ठरतें, असें 'आप्नोतेरत्तेरततेर्वा' या भाष्यानें सांगतात. 'अततेर्वा' येथें 'वा' असा जो शब्द आहे तो 'च' ह्मणजे आणि या अर्थी आहे. त्याच्या योगानें आप्ति, अत्ति व अतति या तीन शब्दांशीं 'आदानं' या चवथ्या शब्दाचाही समुच्चय करतां येतो. याविषयीं स्मृति-वचन असें आहे— 'यच्चाप्नोति यदादत्ते यच्चात्ति विषयानिह । यच्चास्य संततो भावस्तस्मादात्मेति कीर्तितः ॥' अर्थ—ज्या अर्थी हा व्यापतो, ग्रहण करतो, या शरीरांत विषयांचा उपभोग घेतो व याचा संतत ( अविच्छिन्न ) भाव आहे, त्याअर्थी याला आत्मा असें ह्मटलें आहे. येथें 'आप्ति' ह्मणजे ज्ञान व व्याप्ति. सत्ता व स्फुरण ( भान ) यांच्या योगानें सर्वांना व्यापितो ह्मणून त्याचें सर्वज्ञत्व व सर्वशक्तित्व सांगितलें जातें. आत्मभिन्न सर्व पदार्थांना आपली सत्ता देऊन सत्तावान् करीत असल्यामुळें

आत्मा सर्वांचें उपादान कारण आहे, असें आपल्या ध्यानांत येतें. हेंच, त्याचें सर्वशक्तित्व आहे. अर्थात् ज्यांना वेदान्ताची परिभाषा अवगत नसते ते आत्मा-ईश्वर सर्वज्ञ ह्मणजे सर्व जाणणारा व सर्वशक्ति ह्मणजे जगांत दिसणाऱ्या सर्वशक्तींनीं संपन्न, असें समजतात. ह्मणजे ते त्याच्या निरुपाधिकत्वाला बाध आणतात. पण तात्त्विकदृष्ट्या त्याला सर्वज्ञ व सर्वशक्तिही ह्मणतां येत नाहीं, हें सुचविण्यासाठींच आनंदगिरि ह्मणतात-तो आपल्या स्वाभाविक स्फुरणानें सर्वांना स्फुरणयुक्त करतो, हेंच त्याचें सर्वज्ञत्व; व आपल्या सत्तेनें सत्तायुक्त करतो, हेंच त्याचें सर्वशक्तित्व आहे. ह्मणजे सूर्य प्रकाशरूप, प्रकाशस्वभाव असल्यामुळें त्याच्या प्रकाशानें दुसरे सर्व अप्रकाशवान् पदार्थ जसे प्रकाशयुक्त होतात, अर्थात् सूर्य बुद्धिपुरःसर कांहीं त्यांना प्रकाशवान् करीत नाहीं, तर त्याच्या प्रकाशस्वभावामुळें ते प्रकाशमान होतात, त्याप्रमाणें आत्मा बुद्धिपुरःसर, मी या पदार्थांना सत्तास्फुरणयुक्त करतों, असा संकेत करून स्फुरणादिमान् करीत नाहीं. तर मग त्यानें ईक्षण ( संकल्प, विचार ) केलें, कामना केली, इत्यादि उल्लेख सर्व उपनिषदांत जे आढळतात ते कां? ह्मणून विचाराल तर सांगतों- जगाचें मूळ कारण जड प्रकृति, परमाणु इत्यादि नसून चेतन आत्मा आहे, हें सिद्ध करण्याकरितां उपनिषदांत तसे उल्लेख आढळतात. पण त्यांचा वाच्य अर्थ घेऊन निर्दोष ( अविरुद्ध ) वाक्यार्थ होत नाहीं. यास्तव शुद्ध आत्म्यानें ईक्षण केलें, कामना केली, असें न समजतां मायाशबल आत्म्यानें तें केलें, व तोच मायेच्या योगानें सर्वज्ञ व सर्वशक्ति इत्यादि होतो, असें लक्षणावृत्तीनें समजावें. असो,

स्मृतिवचनांतील ' अत्ति ' ( विषयोपभोग घेतो. ) या शब्दानें त्या आत्म्याचें संहारकर्तृत्व व ' अतति ' ( संतत असतो ) या पदानें त्याचें त्रिविधपरिच्छेदराहित्य सांगितलें आहे. अशनायादिसंसारधर्मरहित आहे, या कथनानें व विषयांचें ग्रहण करणें, या रूढीनें प्रत्यगात्मा एक व असंड आहे, असेंही सांगितलें जातें. तात्पर्य, अशाप्रकारचें जगाचें आदि कारणच येथें ' आत्मा ' या शब्दानें सांगितलेलें आहे.

श्रुतिवाक्यांत ' वै ' हा दुसरा शब्द आहे. त्याच्या पुढें ' इ ' हा स्वर आल्यामुळें त्याचें ' वा ' असें रूप झालें आहे. सृष्टिसमयीं व्यक्त

होणारें नाम व रूप, यांचें निरसन करून केवल आत्म्याचा निश्चय करण्यासाठीं वै शब्द योजला आहे. असो; ) " इदं यदुक्तं नामरूपकर्मभेदभिन्नं जगदात्मैवैकोऽग्रे जगतः सृष्टेः प्रागासीत् ।" अर्थ— 'इदं–' हें 'यत्–' जें 'उक्तं–' सांगितलेलें 'नामरूपकर्मभेदभिन्नं जगत्' नाम, रूप, व कर्म यांच्या भेदांनीं भिन्न झालेलें जगत् (निरनिराळीं नावें, निरनिराळे आकार व निरनिराळीं कर्में यांच्या योगानें अनेक भेदवान् झालेलें जगत्) 'आत्मा एव एकः–' एक आत्माच 'अग्रे– जगतः सृष्टेः प्राक्–' जगाच्या उत्पत्तीच्या पूर्वी 'आसीत्–' होता. (हें जें पूर्वी प्राणसंज्ञक प्रजापतीच्या रूपानें सांगितलेलें व निरनिराळीं नावें, रूपें व कर्में यांच्या योगानें अनेक प्रकारचें झालेलें जगत् तें जगाच्या उत्पत्तीच्या पूर्वी एक आत्माच होतें. भाष्यांतील 'यदुक्तं' याच्या जागीं 'यदुत' असा पाठ असणें अधिक चागलें. ह्मणजे 'उत' या पदानें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं प्रसिद्ध असलेलें जगत् सांगितलें आहे, असा बोध होतो.)

(अहो, पण या श्रुतिवाक्यांत 'अग्रे' असें विशेषण असल्यामुळें व 'आसीत्' असें ह्मणून भूतकाळाचा निर्देश केलेला असल्यामुळें जगाच्या उत्पत्तीपूर्वींच केवल आत्मा होता. आतां केवल आत्माच नाहीं, तर त्याहून निराळें असलेलें हें जगतही विद्यमान आहे, असें भासतें. त्यामुळें आत्मा अद्वितीय आहे, हें ह्मणणें खोटें ठरतें, अशा अभिप्रायानें भाष्यकारच शंका घेतात.) किं नेदानीं स एवैकः ।" अन्वय.–इदानीं सः एव एकः न अस्ति किं । अर्थ–आता तोच एक आत्मा नाहीं का ? (मायिक जड जगाला स्वतःची सत्ता कधींही संभवत नाहीं. कारण आत्म्याची स्वाभाविक शक्ति-माया चिदात्म्याहून पृथक् असल्यामुळें जड आहे. यास्तव तिचें कार्य, असें हें जगतही मायिक असणेंच सयुक्तिक आहे. पण जडाला स्फुरण व सत्ता (भान) नसतें. स्फुरण व सत्ता यांचें साहचर्य आहे. ह्मणजे जेथें स्फुरण तेथेंच सत्ता व जेथें स्फुरण नाहीं तेथें सत्ताही नाहीं, अशी अबाधित प्रतीति येते. यास्तव जड (स्फुरणरहित) जगाला स्वतःची सत्ता नसते. त्यामुळें जगाच्या स्थितिसमयींही आत्म्याच्या अद्वितीयत्वाला कांहीं बाध येत नाहीं, असें भाष्यकार सांगतात.–) "न" अर्थ–असें नव्हे. (आतां तोच आत्मा नाहीं, असें नाहीं. मग केवळ आत्मा जर आतांही आहे तर 'आसीत्'

ह्मणजे होता, या भूतकाळीं प्रयोगाची वाट काय? अशा प्रश्नाचा भाष्यकार अनुवाद करितात –) ' कथं तर्ह्यासीदिति " अर्थ–तर मग 'आसीत्' असें कसें ह्मटलें आहे? (तसेंच 'अग्र' असेंही कसें ह्मटलें? आत्म्याला सोडून जगाचा त्रिकालींही भाव (अस्तित्व) जरी संभवत नाहीं तरी तसाच बोध करूं लागल्यास ज्याला बोध करावयाचा त्याला–प्रत्यक्षादि सर्व प्रमाणांनीं दिसणारें (प्रतीत होणारें) 'हें जगत् नाहीं, असें कसें ह्मणता येईल?–अशी शंका येणें अगदीं साहजिक आहे आणि ती आली असतां सांगितलेलें आत्मतत्त्व त्याच्या बुद्धीवर आरूढ होणेंही शक्य नाहीं. यास्तव ज्याला बोध करावयाचा त्या शिष्याच्या बुद्धीस अनुसरून, त्याच्या समजुतीप्रमाणेंच जगाच्या उत्पत्तीच्या पूर्वीं आत्माच होता, असें ह्मटलें आहे आणि तें सुद्धां उत्पत्तीच्या पूर्वीं जगाचें नाम व रूप यांच्या अभिव्यक्तीचा जो अभाव होता ह्मणजे पूर्वीं जगाचा आकार व त्याचें नांव जीं उत्पन्न होतीं, ती त्याप्रमाणें स्पष्ट नव्हतीं, त्या अपेक्षेनें ह्मटलें आहे. सृष्टिसमयीं केवळ आत्म्याचा अभाव असतो या अभिप्रायानें तसें ह्मटलेलें नाहीं, असें आतां भाष्यकार उत्तर देतात –)' यद्यपीदानीं स एवैकस्तथाप्यस्ति विशेष " अर्थ–जरी या स्थितिसमयीं तोच एक आत्मा आहे, तथापि (जगाच्या अवस्थेंत) विशेष आहे (तो कोणता तेंच सांगतात) " प्रागुत्पत्तेरव्याकृतनामरूपभेदमात्मभूतमात्मैकशब्दप्रत्ययगोचरं जगत्। इदानीं व्याकृतनामरूपभेदत्वादनेकशब्दप्रत्ययगोचरं आत्मैकशब्दप्रत्ययगोचरं चेति विशेष।' अर्थ–'उत्पत्तेः प्राक्' उत्पत्तीच्या पूर्वीं 'अव्याकृतनामरूपभेद–' ज्यांतील नाम व रूप हे भेद अव्यक्त आहेत असें, 'आत्मभूत' आत्मरूप व 'आत्मैकशब्दप्रत्ययगोचर–' आत्मा याच एका शब्दाचा व अनुभवाचा विषय होणारें जगत् असतें (नाम व रूप व्यक्त होणें, हीच जगाची उत्पत्ति आहे ती होण्यापूर्वीं जगाचा सर्वथा अभाव होता, असें नाहीं कारण त्याचा जर अत्यंत अभाव असता तर तें मुळीं उत्पन्नच झालें नसतें यास्तव आत्म्याच्या ठिकाणीं जगाच्या नांवाचा व रूपाचा भेद बीजरूपानें अव्यक्त होऊन (लीन होऊन) राहिला होता ह्मणजे जगाचें नाम व रूप हा भेद व्यक्त होण्यापूर्वीं तो ज्याच्यामध्यें लीन होऊन राहिला आहे, असा आत्मा होता त्यामुळें तें अव्यक्त जगत् 'आत्मा'

याच एका शब्दाचा व प्रत्ययाचा विषय होतें तें 'जगत्' या शब्दाचा व प्रत्ययाचा विषय होत नव्हतें. उत्पत्तीच्या पूर्वी वाणी व बुद्धिही नसते. त्यामुळें त्या वेळीं 'आत्मा' हें नांव व 'आत्मा' असा प्रत्यय, हीं दोन्ही जरी संभवत नाहींत, तरी निजून उठलेला पुरुष निद्राकालीन आत्मतत्त्वाला दुसऱ्या प्रमाणानें जाणून त्याविषयीं जसें बोलतो, त्याप्रमाणें स्थितिसमयीं त्यावेळच्या आत्मतत्त्वाला दुसऱ्या प्रमाणानें जाणून त्यावेळीं 'आत्मा एकच होता' असें बोलतो व तसाच त्याला अनुभव येतो.

( पण ) '**इदानीं**– ' आतां या स्थितिकाळीं तेंच जगत् नामरूपभेद व्यक्त झालेले असल्यामुळें '**अनेकशब्दप्रत्ययगोचरं**–' अनेक शब्द व अनेक प्रत्यय ( अनुभव ) यांचा विषय होतें व त्याचप्रमाणें तें '**आत्मैकशब्दप्रत्ययगोचरं च**– ' यावेळीं ' हें सर्व आत्माच आहे ' या आत्मैकशब्द व आत्मैकप्रत्यय यांचाही विषय होतें. '**इति विशेषः**– ' हा विशेष आहे. ( स्थितिसमयीं हें जगत् आत्मानात्मविवेकशून्य पुरुषाच्या घट, पट इत्यादि अनेक शब्दांचा व प्रत्ययाचा विषय होतें. त्याचप्रमाणें घट विद्यमान आहे, अशारीतीनें आत्मशब्दाच्या ' सत् ' या पर्यायशब्दाचाही विषय होतें. पण आत्मानात्मविवेकसंपन्न पुरुषांना ' हें सर्व जगत् आत्माच आहे, असा अनुभव येत असल्यामुळें व ते ' सर्व आत्माच आहे, ' असा शब्दव्यवहार करीत असल्यामुळें त्याच्या दृष्टीनें हें जगत् स्थितिसमयींही आत्मशब्दप्रत्ययगोचर होतें. )

( आतां हीच गोष्ट दृष्टान्तानें स्पष्ट करितात– ) " **यथा सलिलात्पृथक्फेननामरूपव्याकरणात्प्राक्सलिलैकशब्दप्रत्ययगोचरमेव फेनं यदा सलिलात्पृथङ्नामरूपभेदेन व्याकृतं भवति तदा सलिलं फेनं चेत्यनेकशब्दप्रत्ययभाक्सलिलमेवेति चैकशब्दप्रत्ययभाक्च फेनं भवति तद्वत्** ।" अर्थ— ज्याप्रमाणें पाण्याहून फेंस हें पृथक् नांव व आकार व्यक्त होण्यापूर्वी पाण्यांत अव्यक्त असलेला फेंस ' पाणी ' या एकाच शब्दाचा व ' पाणी ' या एकाच अनुभवाचा विषय होतो, पण तोच जेव्हां पाण्याहून निराळें ' फेंस ' असें नांव व निराळें घनरूप या भेदानें व्यक्त होतो त्यावेळीं पाणी व फेंस अशा अनेक ( दोन ) शब्दांस व दोनप्रकारच्या अनुभवास पात्र होतो. पण तात्त्विक दृष्टीनें तो 'हें सर्व पाणीच

सांख्यानामनात्मपक्षपाती स्वतन्त्रं प्रधानं।" अर्थ— ज्याप्रमाणें सांख्यांचें अनात्मपक्षपाती स्वतंत्र प्रधान ( माया ही आत्म्याची शक्ति असल्यामुळें आत्म्यामध्येंच अंतर्भूत होते. ह्मणूनं तिला आत्मपक्षपाती ह्मणतां येतें. पण सांख्यांचें प्रधान पुरुषाची शक्ति नव्हे. ह्मणून तें अनात्मपक्षपाती आहे. अनात्मपक्षपाती ह्मणजे आत्म्याच्या स्वरूपांत अंतर्भूत न होणारें; ह्मणजेच आत्म्याहून भिन्न. पण प्राभाकर मीमांसकांच्या मताप्रमाणें तिला शक्तित्व जरी असलें, तरी स्वतःसत्ताही असूं शकेल, असें कोणी ह्मणेल ह्मणून 'स्वतंत्र' असें प्रधानाला विशेषण दिलें आहे. त्यामुळें प्रधान ही शक्ति ठरत नाहीं. तात्पर्य सांख्यांचें प्रधान ही शक्ति नसून स्वतन्त्र तत्त्व आहे. कारण कोणतीही शक्ति आपल्या आश्रयाच्या सत्तेनें सत्तायुक्त असते. तिला स्वतःसत्ता नसते. पण सांख्य प्रधानाला पुरुषाची शक्ति मानीत नाहींत, तर तें पुरुषासारखेंच स्वतंत्र तत्त्व आहे, असें समजतात. )

"यथा च काणादानामणवो न तद्वदिहान्यदात्मनः किंचिदपि वस्तु विद्यते। किं तर्ह्यात्मैवैक आसीदित्यभिप्रायः।" अर्थ— आणि ज्याप्रमाणें वैशेषिकांचे अणू त्याप्रमाणें या उपनिषद्दर्शनाच्या मतीं सृष्टीच्या पूर्वी आत्म्याहून दुसरी कोणतीही वस्तु नव्हती, तर केवळ एक आत्माच होता, असा अभिप्राय ( ज्याप्रमाणें सांख्यांचें प्रधान स्वतःसत्ताक असतें, किंवा काणादांचे परमाणू तसेच-स्वतःसत्ताक असतात, तशाप्रकारच्या आत्म्याहून निराळ्या दुसऱ्या तत्त्वाचा येथें 'मिषत्' या पदानें अनुवाद करून निषेध केला आहे. उपनिषदांत जिचा उल्लेख केला आहे ती माया प्रधान, परमाणू इत्यादिकांप्रमाणें स्वतःसत्तायुक्त नाहीं. ह्मणून विजातीय भेदाची प्राप्ति होत नाहीं. विद्यारण्यांनीं दीपिकेंत 'मिषत्' या पदाचा 'आसीत्' असा अर्थ केला आहे. ( पहा रत्न १, परिशिष्ट अ पृष्ठ ७ ) असो, या वाक्याचा 'हें जगत् पूर्वी सजातीय, विजातीय, स्वगतभेदरहित आत्माच होता,' असा अर्थ आहे. या वाक्यानें आत्म्याचें अद्वितीयत्व व जगत् केवळ तसल्या अद्वितीय आत्मरूप असल्यामुळें त्याचें मिथ्यात्व सुचविलें आहे. त्यामुळें 'उत्पत्तीच्या पूर्वी जगत् आत्ममात्र होतें, या सांगण्याचा कांहीं उपयोग नाहीं; कारण आत्मा एकच होता; व्यापारयुक्त, असें दुसरें कांहीं नव्हतें, एवढें सांगितल्यानेंच त्याच्या

असंदत्वाची सिद्धि होते, ' या शंकेचें निरसन झालें. कारण जगत् मिथ्या आहे, असें सुचविणें, हेंच ' पूर्वी तें आत्ममात्र होतें ' असें म्हणण्याचें प्रयोजन आहे. तें सुचविण्याकरितांच 'जगत् आत्ममात्र आहे' असें म्हटलें आहे. पण 'एकाच वाक्याचे असे दोन अर्थ केल्यास वाक्यभेद होतो, प्रकरणास सोडून वाक्याचा अर्थ केला, असें होतें; ' म्हणून म्हणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण आत्म्याच्या असंडत्वाचें समर्थन करण्यासाठींच या वाक्यानें जगाचें अनिर्वचनीयत्व सांगितलें आहे.

येथें हे दोन्ही अर्थ सुचविलेले असल्यामुळेंच श्रुति या प्रकरणाच्या शेवटीं ' त्याचे तीन आवसथ व तीन स्वप्न आहेत ' असें म्हणून जाग्रदादि अवस्थांना स्वप्नत्व व त्यामुळेंच मिथ्यात्व सांगून ' तो या पुरुषालाच अतिशय व्यापक ब्रह्म पाहता झाला ' या वाक्यानें त्रिविध परिच्छेदराहित्यरूप अखंडत्व सांगणार आहे.

शंका— अहो पण ' हें आत्माच होता, ' अशा रीतीनें हें व आत्मा यांचें सामानाधिकरण्य केलेलें असल्यामुळें त्यावरून आत्मा जगत् या कार्यानें युक्त आहे, जगद्विशिष्ट आहे एवढें प्रतीत होतें. जगाचें मिथ्यात्व कांहीं त्यावरून प्रतीत होत नाहीं.

समाधान— ' आत्मा एकच ' या पदांनीं सांगितलेल्या अखंड एकरूप आत्म्याचे ठिकाणीं त्या आत्म्याहून अगदीं विपरीत असलेल्या जगाची प्रतीति येणें, ही ' अतस्मिंस्तद्बुद्धिच ' आहे. म्हणजे एका वस्तूच्या ठिकाणीं दुसऱ्या वस्तूची प्रतीति होणेंच आहे. त्यामुळें जगत्प्रतीति मिथ्या आहे. आत्म्याचें नुसतें जगद्वैशिष्ट्य, हें उपनिषदांचें प्रतिपाद्यच होऊं शकत नाहीं. कारण उपनिषद् हें एक प्रमाण आहे व प्रत्येक प्रमाणाचा विषय असाधारण-स्वतंत्र असावा लागतो. एका प्रमाणानें सिद्ध होणारें प्रमेयच जर दुसरें प्रमाण दाखवूं लागलें तर तें त्याचें केवळ अनुवादक होतें. या जगांतील प्रत्येक पदार्थ सत्-तत्त्वानें युक्त आहे. कारण प्रत्येक वस्तु 'आहे,' अशा रूपानें प्रतीत होते ' आहे ' असें वाटणें, हीच आत्मसत्ता आहे. तिला सोडून कोणत्याही पदार्थाची प्रतीति येत नाहीं. हेंच आत्म्याचें जगद्वैशिष्ट्य आहे. पण तें प्रत्यक्षप्रमाणानें सिद्ध आहे. यास्तव उपनिषदें त्याचाच अनुवाद करितात, असें म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं.

त्या प्रमाणभूत शब्दाचा असाधारण, अन्य प्रमाणांचा विषय न होणारा, स्वतंत्र विषय असणेंच योग्य आहे. यास्तव ' जगाचें मिथ्यात्व ' हेंच त्याचें प्रयोजन आहे.

त्याचप्रमाणें ' विपत् ' या पदानें मायेच्या स्वातंत्र्याचें निरसन केलें आहे. त्यामुळें तिच्या स्वतःसत्तेचाही निषेध होऊन मिथ्यात्व सिद्ध होतें. कारण तिला जर स्वतःची स्वतंत्र सत्ता असती, तर स्वतःच्या व्यापाराविषयींही ती स्वतंत्रच असती. पण तिला स्वातंत्र्य नाहीं. ह्मणूनच स्वतःसत्ताही नाहीं, स्वतःसत्ता नसल्यामुळेंच तिच्या मृषात्वाची सिद्धि होते.

शंका— असें जर आहे तर याच न्यायानें आतां ह्मणजे या व्यवहारकाळींही जगाचें मिथ्यात्व व आत्म्याचें अखंडत्व सांगतां येण्यासारखें आहे. तेव्हां श्रुतीमध्यें ' अग्रे ' असें ह्मणण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. अर्थात् तें पद व्यर्थ आहे, असें वाटतें.

समाधान— प्रस्तुत स्थितिसमयीं जगत् आत्म्याहून निराळें व पृथक् सत्तेनें युक्त आहे, अशी प्रतीति येते. यास्तव त्या प्राणिमात्रसाधारण प्रतीतीच्या विरुद्ध एकाएकीं ' हें जगत् आत्ममात्र आहे, केवळ आत्मरूप आहे, ' असें सांगूं लागल्यास तें साधारण लोकांच्या बुद्धीवर आरूढ होणार नाहीं. यास्तव प्रथम, जगाचें प्रथक् नाम व रूप व्यक्त होण्यापूर्वीं ह्मणजे प्रळयदशेंत तें आत्म मात्र होतें, असा बोध केला आहे. पूर्वीं हें जगत् आत्ममात्र होतें, असें एकदा निश्चयानें कळलें ह्मणजे मग तो विचारी पुरुष आतां स्थितिकाळींही तें आत्ममात्र आहे, असें आपोआप जाणील, अशा अभिप्रायानें श्रुतींत ' अग्रे ' हें पद योजलें आहे.

किंवा बृहदारण्यकांत ' उत्पत्तीच्या पूर्वीं हें अव्याकृत होतें ' असें ह्मटलें आहे. ह्मणजे सृष्टीच्या पूर्वीं हें सर्व जगत्कार्य बीजभूत अव्याकृतरूप होतें, असें सांगितलें आहे व येथें तें आत्ममात्र होतें, असें ह्मटलें आहे. त्यामुळें या दोन श्रुतिवाक्यांत विरोध आहे, ह्मणजे तीं परस्परविरुद्ध अर्थ सांगत आहेत, असा भास होतो. यास्तव त्याचा परिहार करण्यासाठीं गुणोपसंहार न्यायानें ( रत्न १ लें, परिशिष्ट अ पृष्ठ ११ पहा ) येथें बृहदारण्यकांतील अव्याकृत पदाचा व बृहदारण्यकांत येथील आत्मशब्दाचा उपसंहार करावा लागतो आणि तो केला असतां ' हें पूर्वीं अव्याकृत होतें व तें

अव्यक्त असलेलें जगत् केवल आत्मरूप होतें,' असें वाक्य सिद्ध होतें. त्यांतील अव्याकृतशब्दानें तमोरूप माया सांगितली जाते. कारण 'तम आसीत्,' 'मायां तु प्रकृतिं विद्यात्' इत्यादि श्रुतिवाक्यांत त्या जगद्बीजावस्थेस 'तम, माया' इत्यादि नांवेंही दिलेलीं आढळतात; आणि अव्याकृतशब्दानें मायेचा निर्देश केलेला असल्यामुळें पूर्वी जगद्रूप कार्याचें अव्यक्तनामरूपात्मक मायामयत्व ह्मणजे अव्यक्त नाम व रूप हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा मायेमध्यें मिळून जाणें, तद्रूप होणें, हें सिद्ध होतें.

ती माया आत्म्याशीं तादात्म्य पावलेली असते, असेंही सांगितलेलें असल्यामुळें सांख्यमताप्रमाणें ती स्वतंत्र आहे, असें ठरत नाहीं. त्यामुळें तिचें कल्पितत्व सिद्ध होतें. कारण त्यावांचून ह्मणजे ती कल्पित असल्याशिवाय आत्मा व माया यांचें तादात्म्य आहे, असें ह्मणतां येत नाहीं. कार्य व कारण, गुण व गुणी इत्यादि उपादान-उपादेय भावानें राहणाऱ्या पदार्थांचें परस्पर तादात्म्य दिसतें. पण आत्मा व माया याच्यामध्यें त्यांतील एकही प्रकार संभवत नाहीं. कारण आत्मा असंग, उदासीन, नित्य तृप्त, निर्गुण इत्यादि असल्यामुळें तो कोणाचें कारण, गुणी इत्यादि होऊं शकत नाहीं आणि असा प्रकार असल्यामुळें या श्रुतिवचनावरून आत्म्याचें असंगत्व, आत्मभिन्न मायेचें व मायाकार्याचें (जगाचें) मिथ्यात्व, परिणाम पावणाऱ्या अविद्येचें अधिष्ठान झाल्यामुळें आत्म्याचें विवर्त-उपादानत्व व अविद्येचें परिणामित्व इत्यादि गोष्टी सूचित होतात.

कार्य मिथ्या आहे, असें सांगण्याकरितांच तें अव्याकृतरूप आहे, असें ह्मटलें आहे. त्या अव्याकृताला आत्मतादात्म्य व मायात्व असल्यामुळें मिथ्यात्व आहे. पण आतां स्थितिसमयीं तें तसें नाहीं. तर यावेळीं नाम व रूप अगदीं व्यक्त आहे आणि हा विशेष दाखविण्याकरितांच योजलेलें 'अग्रे' हें पद सार्थ आहे (व्यर्थ नाहीं), या अभिप्रायानेंच भाष्यांत 'प्रागुत्पत्तेरनभिव्यक्तनामरूपभेदात्ममभूत्०' इत्यादि ह्मटलें आहे. सारांश,'अग्रे'-शब्दानें स्थितिकालच्या व्यक्त नाम-रूप-बीजात्मकतेची व्यावृत्ति केली आहे.

शंका--अहो, मग असें जर आहे तर साक्षात् स्थितिकालींही जगाला मायामयत्व असल्यामुळें मिथ्यात्व आहे, असें ह्मणण्यास कोणता प्रत्यवाय आहे?

**समाधान**-- या स्थितिसमयीं जगाला मिथ्या ह्मटल्यास प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध होणाऱ्या त्याच्या सत्यत्वाशीं विरोध येतो. त्यामुळें एका-एकीं ( ह्मणजे विचार करविल्यावांचून ) तसा बोध करतां येत नाहीं, असें वर ह्मटलें आहे. शिवाय नाम-रूप व्यक्त होणें, या सृष्टीच्या पूर्वी या जगाचा अभाव होता व तें आतांच विद्यमान आहे, असें वाटत आहे. त्यामुळें त्याला कादाचित्कत्व आहे. ह्मणजे तें नित्य नसून केव्हां केव्हां व्यक्त होणारें आहे. त्यामुळेंच तें रज्जूवर केव्हां केव्हां भासणाऱ्या सर्पाप्रमाणें मिथ्या आहे, असें सांगण्यासाठींही पूर्वी अव्याकृत होतें, असें ह्मणणें योग्य होय.

किंवा जगाचें कांहीं सद्रूप अधिष्ठान संभवतें, असें सुचविण्यासाठीं ' इदं अग्रे आसीत् ' असें ह्मटलें आहे. कारण त्याचीच जर संभावना नसेल तर त्याला असंड ह्मणणें अयुक्त होईल. ह्मणजे या कथनानें-सशाच्या शिंगासारख्या अत्यंत असत् वस्तूची सद्रूपानें उत्पत्ति होण्याचा असंभव असल्यामुळें कोणत्याही कार्याची सद्रूप पूर्वावस्था संभवनीय आहे,-असें सुचविलें. पण ती कार्याची सद्रूप पूर्वावस्था अचेतन आहे, असें समजल्यास त्याची कार्याच्या आकारानें आपोआप प्रवृत्ति होणें शक्य नाहीं. ह्मणून त्या प्रवृत्तीकरितां दुसऱ्या चेतनाधिष्ठानाचा अंगीकार केल्यास गौरव दोष येतो. पण घटाच्या संयोगाचें अधिष्ठानही घट व उपादानही घट, असा अनुभव येत असल्यामुळें एकाच आत्म्याला जगत्कार्याचें उपादान-कारणत्व व जग-द्भ्रमाचें अधिष्ठानत्व संभवतें. यास्तव तें सद्रूप कारण चेतन आत्माच आहे, हें या वाक्यानें सांगितलें आहे.

येणेंप्रमाणें अधिष्ठानाभिन्न उपादानकारण आत्मा आहे, अशी संभा-वना झाली असतां त्याला असंड एकरसत्व आहे, असें सांगण्यासाठीं 'एकः एव न अन्यत् किंचन ' हीं पदें आहेत. यापक्षीं ' इदं अग्रे आत्मैव आसीत् ' या श्रुत्यंशानें कार्याच्या पूर्वरूपाचा अनुवाद करून हें जगत् ज्या रूपानें होतें, त्याच्याच असंड एकरसत्वाचें विधान ' सः एकः एव नान्यत्किंचन ' या वाक्यानें केलें आहे. त्यामुळें या श्रुतींतील कोणत्याही पदाला आनर्थक्य नाहीं. तर त्यांतील प्रत्येक पद सार्थ आहे.

ह्मणूनच छान्दोग्यांतही ' सदेव सोम्य ' या वाक्यानें सद्रूप कारणा-च्याच संभव कसा आहे तें दाखवून असत्कारणवादाचें ह्मणजे शून्यापासून '

हें सर्व झालें आहे, या माध्यमिक बौद्धांच्या शून्यवादाचें निरसन केलें आहे. नाहीं तर ह्मणजे सद्रूप कारणाचीच जर तेथें संभावना विवक्षित नसती तर पुढच्याच वाक्यांत 'एकमेवाद्वितीयं' असें ह्मणून त्याचें अद्वितीयत्व सांगण्याचा जो प्रयत्न केला आहे तो व्यर्थ झाला असता; कारण 'सत्' जर मुळीं सिद्धच नाहीं तर त्याला अद्वितीयत्व तरी कोठचें असणार? छान्दोग्यांतील या व्याख्यानांतही कारणाचें अद्वितीयत्व सांगितलेलें असल्यामुळें त्याहून प्रथक् असलेल्या दुसऱ्या सर्वांना मिथ्यात्व आहे, हें सहजच सिद्ध होतें आणि कार्य मिथ्या ठरल्यावर त्यावरून ज्ञात होणारें कारणही मिथ्या आहे, असा निश्चय होऊन कार्य-कारणभावशून्य केवळ आत्म्याच्या साक्षात्कारानें पुढें सांगितलेली मुक्तिही सिद्ध होते. तात्पर्य, या श्रुतींतील पदांवरून असे अनेक तात्त्विक सिद्धान्त ठरत असल्यामुळें तें श्रुतिवाक्य निर्दोष आहे.)

### ३२ 'स ईक्षत लोकान्नु०' याचें व्याख्यान.

(येणेंप्रमाणें संक्षेपतः सांगितलेल्या आत्म्याच्या अखंडैकरसत्वाची सिद्धि करण्यासाठीं वर प्रपंचाच्या मिथ्यत्वाचा उल्लेख केला. आतां त्यालाच अध्यारोप व अपवाद यांच्या योगानें दृढ करण्यासाठीं यापुढील सर्व अध्याय आहे. त्यांतील 'स जातो भूतान्यभिव्यैख्यत्' येथपर्यंतचा भाग अध्यारोपाकरितां व त्यापुढील अध्यायसमाप्तीपर्यंतचा भाग अपवादाकरितां आहे. त्यांतही वाचारंभणन्यायानें ह्मणजे कोणताही विकार आपल्या कारणाहून शब्दमात्र प्रथक् असतो, वस्तुतः नाहीं; या न्यायानें आत्म्याहून निराळें असलेलें सर्व विकाररूप असल्यामुळें मिथ्या आहे, असें सांगण्यासाठीं हें पुढील सृष्टिवाक्य आहे. सृष्टिवाक्य ह्मणजे उत्पत्तीविषयीं वाक्य. त्यांत आरंभींच स्रष्ट्या आत्म्याचें संभवनीय ह्मणून वाटणारें चेतनत्व दृढ करण्यासाठीं 'स ईक्षत लोकान्नु सृजा इति' या वाक्यानें ईक्षण सांगतात-)

"स सर्वज्ञस्वाभाव्यादात्मैकः सन्नीक्षत लोकान्नु सृजा इति।"

अर्थ-तो आत्मा एक असूनही सर्वज्ञस्वभावतेमुळें 'लोकान् नु सृजे' म्ह. मी लोकांना उत्पन्न करतों, असें ईक्षण करता झाला ('पण त्या एक व अखंड आत्म्याचें ईक्षण कसें संभवतें? कारण त्याच्यापाशीं त्यावेळीं विचाराचें साधन कांहीं नव्हतें,' अशी कोणी शंका घेईल ह्मणून त्याला साधनाची

अपेक्षा नाहीं, या अभिप्रायानें 'तो एक असूनही सर्वज्ञ स्वभावतेमुळें ईक्षण करता झाला, असें भाष्यांत म्हटलें आहे. आतां भाष्यकार हाच अभिप्राय शंकासाधनांच्या योगानें स्पष्ट करितात. ) "ननु प्रागुत्पत्तेरकार्यकरण-त्वात्कथमीक्षितवान्। नायं दोषः सर्वज्ञत्वाभाव्यात्।" अर्थ–शंका–अहो पण उत्पत्तीच्या पूर्वी देह, इंद्रियें इत्यादि कांहीं नसल्यामुळें त्यानें ईक्षण कसें केलें ? समाधान–त्यात कांहीं दोष नाहीं. त्याला सर्वज्ञस्वभावता असल्यामुळें त्यानें देहेंद्रियांवांचूनही ईक्षण केलें. "तथा च मन्त्रवर्णः–'अपाणिपादो जवनो महीता' इत्यादिः। केनाभिप्रायेणेत्याह लोका-नम्भःप्रभृतीन्प्राणिकर्मफलोपभोगस्थानभूतान्नु सृजै–सृजेऽहमिति" अर्थ–त्याविषयीं 'अपाणिपादो०' इत्यादि मंत्रवर्ण आहे. 'त्याला हात व पाय नाहींत, पण तो धरणारा व वेगानें धावणारा आहे' असा त्याचा अर्थ आहे. कोणत्या अभिप्रायानें त्यानें ईक्षण केलें, तें श्रुति सांगते–मी अंभः, मरीची, मर व आप या प्राणि–कर्मफलोपभोगस्थानभूत ( म्ह. प्राण्यांच्या कर्मांच्या फलाचा उपभोग घेण्याचीं स्थानेंच अशा ) लोकांस उत्पन्न करतों, असें ईक्षण केलें. ( अपाणिपादो० या मंत्राच्या पुढील तीन चरणांचा अर्थ असा आहे. त्याला नेत्र नसतानाही तो पाहतो. कानावांचूनच असलेला तो ऐकतो. तो सर्व वेद्याला जाणतो, पण त्याला जाणणारा दुसरा कोणी नाहीं. त्याला सर्व श्रेष्ठ महापुरुष म्हणतात. भाष्यांतील 'इत्यादि' येथील आदिशब्दानें 'न तस्य कार्यं करणं च विद्यते' इत्यादि मंत्रांचें ग्रहण करावें. त्याचा अर्थ असा–त्याला शरीर व इंद्रिय नाहीं. त्याच्यासारखा किंवा त्याहून अधिक, असाही दुसरा कोणी दिसत नाहीं. त्याची सर्वोत्तम शक्ति नाना-प्रकारचीच आहे, असें सांगितलें आहे. त्याची ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति स्वाभाविक आहे.

पण यावर 'स्वाभाविक नित्य चैतन्याच्या योगानें केव्हां केव्हां होणारें ईक्षण कसें संभवतें ?' अशी शंका येते व त्याचीं उत्तरोत्तर अधिक चांगलीं अशीं तीन उत्तरें आहेत. १ सृष्टीच्या आरंभीं प्राण्यांच्या कर्मांमुळें एक सृज्य ( उत्पन्न करावयाच्या ) पदार्थांच्या आकाराची अविद्यावृत्ति उत्पन्न होते. तिच्यामध्यें आत्मचैतन्य उत्पन्न होतें. तेंच ईक्षण आहे. तें पहिलें कार्य

असल्यामुळें आपला व दुसऱ्याचाही निर्वाह करूं शकतें. पण त्या ईक्षणालाही दुसऱ्या ईक्षणाची अपेक्षा आहे, असें ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण अनवस्थादोषाचा परिहार करण्यासाठीं कोणालाही झालें तरी असेंच मागणें उचित आहे, असें कित्येक ह्मणतात २ दुसरे कांहीं वेदान्ती–सृष्टीच्या वेळीं प्राण्याच्या कर्मांमुळें अभिव्यक्तीच्या उन्मुख झालेलें पण अव्यक्तनाम रूपानीं अवच्छिन्न असलेलें सत्स्वरूप चैतन्यच ईक्षण आहे, असें समजतात अर्थात् ईक्षण ह्मणजे चैतन्यच. पण तें शात व शुद्ध चैतन्य नव्हे तर सृष्टिसमयीं प्राण्याच्या कर्मांमुळें सृष्टि व्यक्त करावयास उन्मुख झालेलें व अव्यक्तनामरूप या उपाधीनें युक्त असलेलें चैतन्य होय त्याची उन्मुखता कदाचित् होते, नेहमींच होत नाहीं यास्तव ईक्षणही कदाचित् ह्मणजे सृष्टीच्या वेळींच संभवतें. ३ पण बाकीचे सर्व वेदांती असें ह्मणतात–ईक्षण, कामना, इत्यादि सांगणारीं वाक्यें जगाचें कारण जड नाहीं, एवढेंच सुचविण्यासाठीं आहेत त्यामुळें त्याचें तात्पर्य चैतन्यानें 'विचार केला' 'कामना, इच्छा केली,' इत्यादि वाच्य अर्थामध्यें नाहीं यास्तव त्यानें अन्तःकरणावाचून आलोचन कसें केलें, तें खरेंखरेंच केलें किंवा नाहीं, इत्यादि प्रश्नाविषयीं फारसा आग्रह धरू नये.)

•

(आता 'स इमाँल्लोकानसृजत' या श्रुत्यंशाचें व्याख्यान करितात)
"एवमीक्षित्वाऽऽलोच्य स आत्मेमाँल्लोकानसृजत–सृष्टवान्।" अर्थ–याप्रमाणें पूर्वी आलोचन करून तो आत्मा या लोकांस उत्पन्न करता झाला (येथें ईक्षणपूर्वक सृष्टि केली, असें सांगण्याचें कारण स्रष्टा चेतन आहे हें सिद्ध व्हावें, हेंच आहे, असा अभिप्राय मनात धरून लौकिक कार्यकर्त्या सुताराच्या सचेतनत्वाचा दृष्टान्त देतात–) "यथेह बुद्धिमांस्तक्षादिरेवं-प्रकारान्प्रासादादीन् सृजे, इति ईक्षित्वेक्षानन्तरं प्रासादादीन्सृजति तद्वत्।" अर्थ–ज्याप्रमाणें या लोकीं बुद्धिमान् सुतार इत्यादि 'मी अशा प्रकारच्या मंदिरादिकांस उत्पन्न करतों' असा विचार करून त्या विचारानंतर मंदिरादिक कार्य निर्माण करतो, त्याप्रमाणें (तो मायाशक्तियुक्त परमात्मा–चेतन ईक्षण (आलोचन, विचार) करून लोकांस निर्माण करतो अर्थात् सृष्टीचें कारण जड नाहीं, चेतन आहे)

### ३३ सहकारी साधनरहित चेतन सृष्टि कशी करतो?

( अहो पण ईक्षण करणारा चेतन सुतार, कुंभार इत्यादि कर्ता काष्ठ, मृत्तिका इत्यादि उपादान कारणानें युक्त असतो. त्यामुळें तो राजमंदिरादि कार्यें निर्माण करतो, हें ठीक आहे पण या उपनिषदात तर 'हें जगत् पूर्वी एक आत्माच होता' असें सांगितलें आहे त्यामुळें तो अद्वितीय होता, असा निश्चय होतो त्या अद्वितीय आत्म्यापाशीं दुसऱ्या उपादान कारणादिकाचें अस्तित्व संभवत नाहीं. यास्तव सहकारी कारणशून्य असलेल्या त्या आत्म्याला जगाचा स्रष्टा ह्मणणें सर्वथा अनुपपन्न आहे, अशी शंका घेतात–) "ननु सोपादानस्तक्षादिः प्रासादादीन्सृजतीति युक्तं निरुपादानस्त्वात्मा कथं लोकान्सृजतीति।" अर्थ— अहो पण उपादानयुक्त सुतार इत्यादि प्रासादादिकास उत्पन्न करतो हें ह्मणणें युक्त आहे पण उपादानशून्य आत्मा लोकास कसा निर्माण करतो? ('मी अनेक होतों, जन्म घेतों, असा संकल्प करून तो स्वतःलाच सर्व जग करतो,' अशा अर्थाच्या श्रुतीनें आत्माच जगाचें उपादान कारण आहे, असें सांगितलें आहे यास्तव त्याला दुसऱ्या लौकिक उपादानाची अपेक्षा नाहीं, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण आकाशादि पदार्थ व्यावहारिक आहेत त्यामुळें घटादि इतर व्यावहारिक पदार्थांप्रमाणेंच त्यानाही परिणामत्व असणें सयुक्तिक होय. यास्तव आकाशादिकाचें परिणामी उपादान कोणतें तें सांगितलें पाहिजे आत्मा निरवयव असल्यामुळें तो परिणामी—परिणाम पावणारा नाहीं यास्तव तो आकाशादिकाचें उपादानही होऊं शकत नाहीं )

### ३४ वरील शंकेचें समाधान.

( आकाशादि व्यावहारिक पदार्थ परिणामी आहेत, ही गोष्ट आह्मा अद्वैतवाद्यानाही मान्य आहे निरवयव आत्मा परिणामी पदार्थांचें उपादान कारण होऊं शकत नाहीं, हेंही आमच्या मताच्या विरुद्ध नाहीं ह्मणूनच आह्मी अव्यक्त नाम–रूपावस्थेंत असलेलें बीजभूत अव्याकृत आकाशादिकाचें परिणामी उपादान आहे, असें मानतों, असें आचार्य सांगतात–) "नैष दोषः। सलिलफेनस्थानीये आत्मभूते नामरूपे अव्याकृते आत्मैकशब्दवाच्ये

व्याकृतफेनस्थानीयस्य जगत उपादानभूते सम्भवत । तस्मादात्म-भूतनामरूपोपादानभूत सन्सर्वज्ञो जगन्निर्मिमीत इत्यविरुद्धम् । ”

अर्थ—त्यात काहीं दोष नाहीं पाण्यातील अव्यक्त फेंसाच्या स्थानीं असलेलीं आत्मभूत, अव्यक्त व केवळ आत्मशब्दवाच्य अशीं नामें व रूपें व्यक्त फेनाच्या स्थानीं असलेल्या जगाचीं उपादान कारणें सम्भवतात तस्मात् आत्मरूप झालेलीं नामें व रूपें, ह्याच उपादानानें युक्त होत्साता तो सर्वज्ञ आत्मा जगाला निर्माण करतो, अशी कल्पना केल्यानें काहीं विरोध येत नाहीं ( पाणी व त्यापासून होणारा फेंस, याचा वर दृष्टान्त दिला आहे ह्मणून त्याच्याशीं दार्ष्टान्तिक आत्मा व जगत् याच साम्य दाखविण्यासाठीं पाण्यात अव्यक्त असलेल्या फेंसाप्रमाणें आत्म्यामध्यें अव्यक्त असलेलें नामरूपात्मक जगत् व्यक्त जगाचें उपादानकारण आहे अव्यक्त फेंस जसा जलरूप होऊन राहतो, त्याप्रमाणेंच अव्याकृत– अव्यक्त नाम रूपें आत्मभूत झालेलीं असतात अव्यक्त फेंसाला जसें केवळ पाणी ह्मणतात, त्याप्रमाणें अव्यक्त नाम रूपें केवळ 'आत्मा' याच एका शब्दानें वाच्य होतात यास्तव तीं अव्यक्त नाम रूपें व्यक्त फेंसाच्या स्थानीं असलेल्या जगाचें उपादान कारण होऊ शकतात तस्मात आपल्या स्वरूपात येऊन मिळालेलीं नाम रूपें, याच उपादानानें युक्त झालेला सर्वज्ञ– चेतन आत्मा जगाला निर्माण करतो, अशी कल्पना केली असता कोणत्याही प्रकारची शंका येत नाहीं भाष्यातील ‘ आत्मभूते’ या पदानें आत्म्यावर अव्यक्त नामरूप या नावाच्या अव्याकृताचा अध्यास झालेला आहे, असें सुचविलें आहे त्यामुळें आत्मा परिणाम पावणाऱ्या अविद्येचें अधिष्ठान आहे, असें सिद्ध झालें अर्थात् तो आत्मा जगत्–विवर्ताचें उपादान आहे, नामरूप आत्ममात्र असल्यामुळें मिथ्या आहे व नामरूप मिथ्या असल्याकारणानेंच आत्म्याच्या अद्वितीयत्वालाही काहीं बाध येत नाहीं तात्पर्य, अव्याकृत आत्म्याच्या आधारानें राहतें व तें तदधीन आहे )

### २५ वरील शंकेचा दुसऱ्या रीतीनें परिहार

( आता घटादि पदार्थांलाही विवर्तताच आहे ह्मणजे घटादि पदार्थही विवर्त ( अन्यथा भास, भ्रम, ) आहेत कोणताही परिणाम विवर्तावून निराळा नाहींच कारण विवर्त व परिणाम हे पर्याय शब्द आहेत,

असें उत्तर मीमांसेंतील ' तदनन्यत्वमारम्भणशब्दादिभ्यः ' ( अ. २ पा. १ सूत्र १४ ) व ' आत्मकृतेः परिणामात् ' ( अ. १ पा. ४ सू. २६ ) या दोन सूत्रांवरून ठरतें. कारण यांतील पहिल्या सूत्रांतील न्यायानें विवर्तरूपानें सिद्ध झालेल्या विकारालाच दुसऱ्या सूत्रांत परिणाम ह्मटलें आहे. वास्तव सत् आत्म्यालाच उपादानत्व आहे. माया केवळ त्याला साहाय्य करते, या अभिप्रायानें ' आत्मनि चैवं विचित्राश्च हि ' या सूत्राचा आश्रय करून भाष्यकार वरील शंकेचा दुसऱ्या रीतीनें परिहार करितात- ) " अथवा यथा विज्ञानवान् मायावी निरुपादान आत्मानमेवात्मान्तरत्वेनाकाशेन गच्छन्तमिव निर्मिमीते तथा सर्वज्ञो देवः सर्वशक्तिर्महामाय आत्मानमेवात्मान्तरत्वेन जगद्रूपेण निर्मिमीत इति युक्ततरम्। एवं च सति कार्य-कारणोभयासद्वाद्यादिपक्षाश्च न प्रसज्जन्ते सुनिराकृताश्च भवन्ति। " अर्थ-- किंवा ज्याप्रमाणें 'आपण अमुक करावें' अशा संकल्पज्ञानानें युक्त असलेला लौकिक मायावी ( गारुडी ) त्याच्यापाशीं कांहींएक उपादानकारण नसतांनाही ( सहकारी साधनरहित असूनही ) आपल्यालाच आपल्याहून निराळ्याचशारूपानें आकाशानें जात असल्याप्रमाणें निर्माण करतो, त्याप्रमाणें सर्वज्ञ, सर्वशक्ति, महामायावान् देव आपल्याला निराळ्यारूपानें ( अनात्मरूपानें ), जगद्रूपानें निर्माण करतो, असें ह्मणणें अधिक सयुक्तिक आहे. असें मानलें असतां कार्य असत् आहे, कारण असत् आहे, कार्य व कारण हीं दोन्ही असत् आहेत, इत्यादि वाद्यांचे पक्ष प्राप्त होत नाहींत व ते कोणी उद्भावित केले तरी चांगल्याप्रकारें निराकृत होतात; त्यांचें निराकरण होतें. ( ' विज्ञानवान्-' मी आतां आकाशांतून जात असल्याप्रमाणें दिसणाऱ्या आपल्या दुसऱ्या देहास निर्माण करतों, असा संकल्प करण्याची योग्यता ज्याच्या मध्यें आहे, असा ह्मणजे सचेतन. वस्तु एक असतांना ती दुसरीच भासणें, हा विवर्त आहे. पण रज्जूवर सर्प, किंवा शिंपीवर रूपें भासणें व एका जादूगारानें आपलेंच दुसरें शरीर उत्पन्न करून दाखविणें, मातीचा रुपाया करणें, यांत फरक आहे. पहिल्या प्रकारच्या विवर्तांत ईक्षण, सद्रूत्व इत्यादिकांचें भान होत नाहीं. पण दुसऱ्या प्रकारच्या विवर्तांत त्यांचें भान होतें. वास्तव जगत् हा

विवर्त यातील दुसऱ्या प्रकारचा आहे, असें सुचवून सृष्टि रज्जुसर्पाप्रमाणें संकल्प व स्रष्टा यावाचूनच झाली आहे, यास्तव निराळा त्या दोघांचीही गरज नाहीं, या शंकेचें निरसन विज्ञानवान् या विशेषणानें केलें आहे

'निरुपादान-' आपल्या स्वरूपाहून व्यतिरिक्त अशा दुसऱ्या कोणत्याही उपादानावाचून असलेल्या देवाला 'महामायः' म्हणजे महामायावी, हें विशेषण देऊन तो महामायावी असल्यामुळेंच सर्वशक्ति, असें सुचविलें आहे म्हणजे सर्वशक्तित्व हा त्याचा स्वाभाविक धर्म नव्हे. औपाधिक आहे 'युक्ततरं-' 'इंद्र (आत्मा) मायाच्या योगानें अनेकाकार होतो, मायेच्या योगानेंच आत्मतत्त्व अनात्माकार होणें, मी बहु होतों, मी उत्पन्न होतों, विकार वाङ्मात्र आहे अग्नींतील लाल, शुभ्र व काळें, या रूपाविषयीं विचार करून त्यांतील प्रत्येक रूप, हा क्रमानें तेज, जळ व पृथ्वी या तत्त्वाचा गुण आहे, असें कळलें असता अग्नीचें अग्नित्व जातें' इत्यादि अनेक विचारपूर्ण श्रुतींना संमत असल्यामुळें आत्मा संकल्पपूर्वक जग निर्मितो, हा दुसरा पक्ष पहिल्याप्रकारच्या विवर्त पक्षाहून अधिक सयुक्तिक आहे

'एवं च सति-' सत् आत्माच कार्य-कारणरूपानें स्थित आहे, असा अंगीकार केला असता १ कांहीं कारणावाचूनच कार्य उत्पन्न होतें, हा यदृच्छावाद्याचा पक्ष, २ उत्पत्तीच्या पूर्वी अविद्यमान असलेलेंच कार्य कर्ता, करण इत्यादि कारकांच्या व्यापारानंतर नवेंच उत्पन्न होतें, हा नैयायिकाचा पक्ष, ३ कार्य व कारण हीं दोन्ही असत् ( शून्य, अविद्यमान ) आहेत, हा शून्यवादी माध्यमिक बौद्धांचा पक्ष, आणि 'वादादिपक्षाः' येथील 'आदि' शब्दानें ४ उत्पत्तीच्या पूर्वीही कारणरूपानें विद्यमान असलेलेंच कार्य उत्पन्न होणें, हा सांख्यादिकांचा परिणाम पक्ष सांगितला आहे. 'वादादिपक्षाः' येथील पक्षशब्दानें त्या त्या पक्षांतील दोषही जाहीर होणार ते असे- १ असत्कारण पक्षीं म्हणजे कारणावांचूनच कार्य यदृच्छेनें होतें, असें म्हणणाऱ्या लोकांच्या पक्षावर 'तर मग ज्यांना दहीं, घटादि इत्यादि कार्यांची अपेक्षा असते त्यांना दूध, काष्ठ, इत्यादि त्यांच्या कारणांचें संपादन करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, कारण तीं कार्यें

आपोआपच यदृच्छेनें होऊं शकतील,' हा दोष येतो. २ कार्य उत्पत्तीच्या पूर्वीही असत् असतें, या नैयायिकांच्या असत्कार्यपक्षावर 'तर मग असत् असलेल्या सशाच्या शिंगाचीही उत्पत्ति होणें शक्य आहे, असें ह्मणावें लागेल,' हा दोष येतो. ५ सांख्यांच्या परिणामवादावर ह्मणजे कार्य उत्पत्तीच्या पूर्वीही असतें, या सत्कार्यवादावर 'कार्य कारणात विद्यमान असतें, असें ह्मटल्यास, तर मग कुंभारादि कारकांच्या व्यापाराची कांहीं आवश्यकता नाहीं, तो व्यर्थ आहे, असें होतें. बरें, तें पूर्वी कारणांत नव्हतें, असें ह्मटल्यास कारणालाच निराळी अवस्था प्राप्त होणें, यां परिणामाची अनुपपत्ति होते व उत्पत्तीच्या नंतर तें नसतें असें ह्मटल्यास व्यवहार सिद्ध न होणें व कार्य जें प्रत्यक्ष दिसतें त्याची अनुपपत्ति होणें,' हे दोष येतात. ३ कार्य व कारण हीं दोन्हीं असत् आहेत, या पक्षीं वर दोन्ही पक्षीं सांगितलेले दोष येतात. पण यांतील कोणताही दोष आह्मीं अंगीकारलेल्या या श्रुतिसंमत विवर्तवादावर येत नाहीं.

किंवा आह्मीं विवर्तवादाचाच अंगीकार केलेला असल्यामुळें परिणामादि पक्षाचा स्वीकार केल्यास परपक्षाचा अंगीकार करणें, हा दोष आह्मांवर येईल, ही शंका संभवत नाहीं. असें 'एवं च सति॰' इत्यादि शेवटच्या वाक्यानें भाष्यकार सांगत आहेत कारण आम्हीं विवर्तवादाचाच अंगीकार करून इतर पक्षांवरील दोष सुचविलेले आहेत, 'सुनिराकृताश्च--' अद्वितीय आत्मवस्तुला त्याच्या विपरीत प्रपंचाकार प्राप्त होतो, असें सांगणाऱ्या 'बहु स्यां' या श्रुतीनें विवर्तवादाचाच अंगीकार केलेला असल्यामुळें इतर सर्व पक्ष श्रुतिबाह्य आहेत असें ठरतें व त्यामुळेंच त्यांचें निराकरण होतें.)

**" कालॅलोकानसृजतेत्याह–' अम्भो मरीचीर्मरमापः' इति।"**

**अर्थ**–तो कोणत्या लोकांना उत्पन्न करता झाला, अशी आकांक्षा झाली असतां 'अम्भो मरीचीर्मरमापः' इत्यादि श्रुति उत्तर सांगते. (तें सर्व श्रुतिवचन असें आहे– 'अम्भो मरीचीर्मरमापोऽदोम्भः परेण दिवं द्यौः प्रतिष्ठाऽन्तरिक्षं मरीचयः पृथिवी मरो या अधस्तात्ता आपः।' लोक भौतिक (भूताचे परिणाम) असल्यामुळें व ब्रह्मांडामध्यें अंतर्भाव पावलेले असल्याकारणानें सूक्ष्म भूतांची सृष्टि, त्यांचें पंचीकरण, व ब्रह्मांडसृष्टि इतकें झाल्यानंतर

येथें सांगितलेल्या अंभ प्रभृति लोकांची उत्पत्ति झाली, असें गुणोपसंहार-न्यायाचा आश्रय करून भाष्यकार सांगतात- ) "आकाशादिक्रमेणाण्डमुत्पाद्याम्भ प्रभृतीँल्लोकानसृजत । तत्राम्भ प्रभृतीन्स्वयमेव व्याचष्टे श्रुति ।" अर्थ-आकाशादि क्रमानें ब्रह्मांड उत्पन्न करून अंभ-प्रभृति लोकांस तो उत्पन्न करता झाला त्यांतील अंभ प्रभृति लोकांचें व्याख्यान स्वत च श्रुति करते (या लोकच्या मनुष्यांना अम्भ प्रभृति लोक कोणते तें माहीत नसल्यामुळें श्रुति सांगत आहे द्युलोकाच्या ह्मणजे स्वर्ग लोकाच्या पलीकडे जे 'महर्' इत्यादि लोक आहेत व जो त्या अम्भ लोकाचा आश्रय द्युलोक आहे त्या सर्वांचा या श्रुतींत 'अंभ' या शब्दानें निर्देश केला आहे कारण वृष्टीच्या द्वारा आह्मांला प्राप्त होणारें जल तेथें बीजरूपानें असतें, असें भाष्यकार सांगतात -) "अदस्तदम्भ शब्द वाच्यो लोक परेण दिव-द्युलोकात्परेण परस्तात्सोऽम्भ शब्दवाच्यो-ऽम्भोभरणात् द्यौ प्रतिष्ठाऽऽश्रयस्तस्याम्भसो लोकस्य।" अर्थ-'अदः अम्भ -' हा तो अम्भ शब्दवाच्य लोक 'परेण दिव-' द्युलोकाच्या पलीकडे आहे त्यांत जल मेघरूपानें भरत असल्यामुळें तो जलवाचक अंभ-शब्दाचा वाच्य होतो त्या अंभलोकाची प्रतिष्ठा (आधार) द्युलोक आहे. द्युलोक ह्मणजे स्वर्लोक-स्वर्ग (आतां 'अंतरिक्ष मरीचय') या श्रुति-वाक्याचा अर्थ सांगतात-) "द्युलोकादधस्तादन्तरिक्ष यत्तन्मरीचय । एकोऽप्यनेकस्थानभेदत्वाद्बहुवचनभाङ्मरीचय इति।" अर्थ-'यत् द्युलोकात् अधस्तात् अन्तरिक्ष-' जें द्युलोकाच्या खालीं अंतरिक्ष आहे 'तन्मरीचय -' तो मरीचि लोक होय तो जरी एक असला तरी त्यांत अनेक स्थानभेद असल्यामुळें 'मरीचय' अशा बहुवचनाला पात्र होतो (मरीचिशब्दानें अंतरिक्षलोक लक्षित होतो कारण त्याच्याशीं सूर्यकिरणांचा संबंध असतो पण तो लोक तर एक आहे मग त्याला उद्देशून 'मरीचय' असें बहुवचन कसें घातलें आहे ? ह्मणून कोणी विचारतील तर भाष्यांत त्याचें उत्तर दोन प्रकारांनीं दिलेलें आहे एक निरनिराळ्या अनेक प्रदेशांस उद्देशून बहुवचन घातलें आहे व दुसरें, अंतरिक्ष या एका लोकाचे लक्षक मरीची अनेक आहेत ह्मणून 'मरीचय' हें बहुवचन त्या लक्षक किरणांचें आहे लक्ष्य लोकाचें नव्हे 'गङ्गायां घोष' ह्मणजे गंगेच्या

तीरावर घोष आहे. या लक्षणेच्या उदाहरणांत गंगा लक्षक असून घोष ( गवळी-वाडा ) लक्ष्य आहे. पण लक्षक 'गङ्गा' हें पद स्त्रीलिंगी असल्यामुळें त्याचें 'गङ्गायां' असें स्त्रीलिंगच योजलें आहे. 'घोष' या पुंलिंगी लक्ष्याच्या अनुरोधानें पुंलिंग योजलेलें नाहीं. तसेंच येथेंही तें बहुत्व मरीची या लक्षकाचें आहे, असें समजावें, असें भाष्यकार सांगतात-) "मरीचिभिर्वा रश्मिभिः संबन्धात् ( मरीचय इति )।" अर्थ-किंवा त्या अंतरिक्ष लोकाचा संबंध किरणांशीं आहे ( व किरण बहु असल्यामुळें 'मरीचयः' असें बहुवचन योजलें आहे. भाष्यकारांनीं या भाष्यानें मरीचिशब्दानें अंतरिक्षलोकाचेंच ग्रहण करण्याचें दुसरें निमित्त सांगितलें आहे, असें त्यांतील नुसत्या वाशब्दाकडे लक्ष्य देऊन ह्मणूं नये. कारण येथें सांगितलेल्या निमित्तावांचून दुसरें निमित्त पूर्वी सांगितलेलें नाहीं. यास्तव या भाष्यांतील 'वा' हा शब्द विकल्पार्थी आहे, असें भ्रमानें समजूं नये.)

"पृथिवी मरो म्रियन्तेऽस्मिन्भूतानीति। या अधस्तात्पृथिव्यास्ता आप उच्यन्ते आप्नोतेर्लोकाः।" अर्थ-पृथिवी हा 'मर' लोक होय. कारण त्यांत लोक मरतात. ( ह्मणूनच त्याला मर्त्य असेंही ह्मणतात.) 'या पृथिव्याः अधस्तात् ता आपः लोकाः उच्यन्ते' ज्या आप ( जल ) पृथिवीच्या खालीं आहेत त्यांना आप-लोक ह्मणतात. कारण अधोलोकीं निवास करणाऱ्या प्राण्यांकडून ते लोक प्राप्त केले जातात. ( ह्मणजे 'आप' या नावांत 'आप्' ह्मणजे प्राप्त करणें या धातूच्या अर्थाचा संबंध आहे.)

( अहो पण-या सांगितलेल्या लोकांशीं पांच भूतांचा एकसारखाच संबंध आहे. यास्तव जलावांचून पृथिव्यादि दुसऱ्या कोणत्या तरी भूताच्या नांवानेंही वरील लोकांचा निर्देश करितां आला असता. अंतरिक्षाचा नुसत्या किरणांशींच संबंध आहे, असें कांहीं नाहीं. तर मेघादि दुसऱ्या पदार्थांशींही त्याचा संबंध आहे. यास्तव त्यांच्या नांवांनींही त्या लोकाचा निर्देश करतां येणें शक्य आहे. त्याचप्रमाणें पृथ्वी व तिच्या खालचे लोक यांचा क्रमानें मरण व प्राप्ति या क्रियांवांचून गमनादि दुसऱ्या क्रियांशींही संबंध आहे. यास्तव त्या क्रियांवरूनही ते लक्षित होऊं शकतील,-या शंकेचा आचार्य अनुवाद करितात-) "यद्यपि पञ्चभूतात्मकत्वं लोकानां-" अर्थ-जरी लोकांना पंचभूतात्मकत्व आहे, ( भूतात्मकत्व ह्मणजे, भूतसंबं-

रविल, भाष्यातील हा शब्द उदाहरणार्थ आहे त्यामुळें त्यांतील कांहीं लोकांशीं मेघादि दुसऱ्याही कांहीं पदार्थांचा संबंध आहे, असें समजावें. )

( येथें सांगितलेल्या अभ, मरीचि, मरण व प्राप्ति यांचें क्रमानें ऊर्ध्व-लोक, अंतरिक्षलोक, पृथिवी व अधोलोक यांमध्यें आधिक्य असल्यामुळें त्यावरूनच ते लोक लक्षित होणें योग्य आहे. कारण त्या त्या वस्तूंच्या आधिक्यामुळें त्याच्या त्याच्या अधिष्ठानाना त्यांचीं त्यांचीं नांवें प्राप्त होत असतात जसें-गुजराथी लोकाच्या आधिक्यामुळें गुजराथ, महाराष्ट्रियाच्या आधिक्यामुळें महाराष्ट्र, इत्यादि, असें समाधान करितात-) "तथाप्यब्बाहुल्यादब्नामभिरेवाम्भो मरीचीर्मरमाप इत्युच्यन्ते।" अर्थ-तथापि त्या चारी लोकांमध्यें जलानें बाहुल्य (अधिकता) असल्यामुळें जलाच्या अम्भ, मरीची, मर व आप या नावांनींच त्याचा उल्लेख केलेला आहे. (भाष्यातील 'अब्बाहुल्यात्' हें पद उपलक्षणार्थ आहे त्यामुळें, अंतरिक्षांत किरणाचें बाहुल्य असल्यामुळें त्याचा किरणाच्या नावानें, पृथ्वींत मरणाचें बाहुल्य असल्यामुळें त्या लोकाचा 'मर' या नावानें व पाताळांत प्राप्तीचें प्राचुर्य असल्यामुळें त्याचा 'आप' या नावानें उल्लेख केला आहे, असें समजावें कारण तसें न समजता भाष्यांत जसा उल्लेख केला आहे तसेंच केवळ जलाचें बाहुल्य घेतल्यास त्याच्या योगानें वरील शंकेचें समाधान होत नाहीं कारण द्युप्रभृति वरचे लोक जरी कदाचित् जलबहुल असले, तरी अन्तरिक्ष, पृथ्वी व पाताळ हे अधोलोक जलप्रचुर नाहींत. शिवाय मरीची, मर व आप, हीं जलाचीं नावें नाहींत. शेवटचा 'आप' हा शब्दही प्राप्ति या क्रियेच्या अर्थी आहे. यास्तव 'अब्बाहुल्यात्' हें भाष्यकारांचें पद उपलक्षणार्थ आहे, असेंच समजावें

ऊर्ध्वलोकातून वृष्टिद्वारा आलेलें जलच आम्हांला साक्षात् दिसतें. दुसरें भूत साक्षात् दिसत नाहीं यास्तव आमच्या दृष्टीनें वरील लोकाचें जलबाहुल्य आहे, असें म्हणतो येथें त्याचप्रमाणें ऊर्ध्वलोकीं गमन करणाऱ्या प्राण्यांहून अधोलोकीं गमन करणारे प्राणी अतिशय अधिक असतात, असें पुराणांत सांगितलें आहे. यास्तव 'बहुभिः आप्यन्ते अधोलोकाः' म्हणजे अधोलोक पुष्कळ जीवांकडून प्राप्त केले जातात, अशा व्युत्पत्तीनें आप्ति म्हणजे प्राप्ति या क्रियेमुळें अधोलोकांना 'आप' हें नांव प्राप्त झालें आहे.

अधोलोकांस प्राप्त करून घेणाऱ्या जीवांचें तेथें प्राचुर्य आहे. पृथिवींतील प्राणी शीघ्र मरत असतात व अशा प्राण्यांचेंच तेथें बाहुल्य असतें. ह्मणून पृथ्वीला 'मर' ह्मटलें आहे. अंतरिक्षांत किरणांचें बाहुल्य तर प्रसिद्धच आहे.

३६ 'स ईक्षतेमे नु' या वाक्याचें व्याख्यान.

(या उपनिषदांत 'आत्मा वा०' या पहिल्या वाक्यामध्यें ज्याचा निर्देश केला आहे त्या आत्म्याच्या ज्ञानानें संसारी जीव मुक्त केला जाण्यास योग्य आहे, असें सांगावयाचें आहे. कारण असंसारी चेतनाला मोक्षाची मुळीं उपपत्तिच नाहीं. (बद्ध नसलेल्याला मुक्त होण्याचेंही कारण नसतें.) पण तो संसार–ज्यांत तो करावयाचा ते आधारभूत लोक, संसाराच्या उपाधिभूत लिङ्गशरीर, त्याचे अभिमानी देव, लिंगशरीरादिकांचें अधिष्ठान स्थूलशरीर, संसाररूप अशनाया–पिपासा (क्षुधा–तृषा) इत्यादि ऊर्मी, व त्या ऊर्मी हा माझा धर्म आहे, असा अभिमान बाळगणारा भोक्ता–यांवांचून होऊं शकत नाहीं. ह्मणजे निरनिराळ्या शरीरांत प्रवेश करून सुखदुःखानुभवरूप संसार या इतक्या सामग्रीवांचून होऊं शकत नाहीं. यास्तव त्या सर्वांची उत्पत्ति क्रमानें 'अयमावसथः' येथपर्यंत सांगण्याची इच्छा करणारा भगवान् वेद संसाराधिष्ठानभूत (आधारभूत) लोकांची उत्पत्ति सांगून आतां त्या लोकांच्या पालक देवांची सृष्टि सांगण्याच्या मिषानें समष्टि स्थूलशरीर, समष्टि लिंगशरीर व त्यांचे अभिमानी देव यांची सृष्टि सांगण्यास 'स ईक्षतेमे नु लोका लोकपालान्नु सृजा इति' या वाक्यानें आरंभ करितो व भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात–)

"सर्वप्राणिकर्मफलोपादानाधिष्ठानभूतांश्चतुरो लोकान्सृष्ट्वा स ईश्वरः पुनरेवेक्षत।" अर्थ—सर्व प्राण्यांच्या अनुष्ठित कर्मांचें फल, व त्यांचें उपादान–त्याचें साधन यांच्या अधिष्ठानभूत (आधाररूप) अंभःप्रभृति चार लोकांस उत्पन्न करून तो ईश्वर पुनरपि असें ईक्षण करता झाला. "इमे न्वम्भःप्रभृतयो मया सृष्टा लोकाः परिपालयितृवर्जिता विनश्येयुः। तस्मादेषां रक्षणार्थं लोकपालाँल्लोकानां पालयितॄन्नु सृजै सृजेऽहमिति।" अर्थ—'मया सृष्टाः इमे अम्भःप्रभृतयः लोकाः'–मीं उत्पन्न केलेले हे अम्भःप्रभृति लोक परिपालकांवांचून राहिल्यास नाश पावतील.

यास्तव यांच्या रक्षणासाठीं लोकपालांस—लोकांच्या पालकांस 'अहं सृजे—' मी उत्पन्न करतों. 'इति' असें (त्यानें ईक्षण केलें, असा संबंध.)

३७ 'सोऽद्भ्य एव०' या वाक्याचें व्याख्यान.

(समष्टि लिंगशरीर व त्यावर अभिमान ठेवणाऱ्या देवता याची उत्पत्ति विराटाच्या अवयवापासून होणारी असल्यामुळें तिच्या करितां विराट्सृष्टि सांगतात—) "एवमीक्षित्वा—" अर्थ—याप्रमाणें ईक्षण करून ('सोऽद्भ्य एव पुरुषं समुद्धृत्यामूर्छयत्' या वाक्याचें व्याख्यान करितात—) "सोऽद्भ्य एवाप्प्रधानेभ्य एव पञ्चभूतेभ्यो येभ्योऽम्भःप्रभृतीन्सृष्टवांस्तेभ्य एवेत्यर्थः । पुरुषं पुरुषाकारं शिरःपाण्यादिमन्तं समुद्धृत्याद्भ्यः समुपादाय मृत्पिण्डमिव कुलालः पृथिव्या अमूर्छयन्मूर्छितवान्संपिण्डितवान्स्वावयवसंयोजनेनेत्यर्थः । अर्थ—तो जळापासूनच, ज्यामध्यें जळ प्रधान आहे अशा पंचभूतांपासूनच ह्मणजे ज्याच्यापासून अंभःप्रभृति लोकाना त्यानें उत्पन्न केलें त्याच्याचपासून, असा भावार्थ; पुरुषास, मस्तक, हात इत्यादिकानीं युक्त असलेल्या पुरुषाकारास 'समुद्धृत्य—' वर काढून— 'कुलालः पृथिव्याः मृत्पिण्डं इव अद्भ्यः समुपादाय—' ह्मणजे कुंभार पृथ्वीपासून मातीचा गोळा जसा काढून घेतो त्याप्रमाणें जळापासून पुरुषास काढून घेऊन 'अमूर्छयत्—' साकार—सावयव करता झाला. त्याच्या अवयवांची चांगली योजना करून घट्ट करता झाला. (भाष्यकारानीं वर (पृष्ठ ८८) 'अण्डमुत्पाद्याम्भःप्रभृतींल्लोकानसृजत' या भाष्यानें लोकाच्या उत्पत्तीच्या पूर्वींच ब्रह्माण्डाची उत्पत्ति जरी सांगितली आहे, तरी येथें लोकपाळाची उत्पत्ति सांगण्यासाठीं त्या पूर्वोक्त उत्पत्तीचाच अनुवाद केला आहे. यास्तव भाष्यावर पूर्वोत्तर विरोध हा दोष येत नाहीं.)

३८ 'तमभ्यतपत्०' या वाक्याचें व्याख्यान.

(याप्रमाणें विराटाची उत्पत्ति सांगून त्याच्या अवयवापासून लोकपाळांची उत्पत्ति 'तमभ्यतपत्तस्याभितप्तस्य मुखं निरभिद्यत यथाण्डम् ।' या श्रुतिवचनाच्या व्याख्यानानें सांगतात—) "तं पिण्डं पुरुषविधमुद्दिश्याभ्यतपत्—तदभिध्यानं संकल्पं कृतवानित्यर्थः ।" अर्थ— 'तं पुरुषविधं पिण्डं उद्दिश्य—' त्या पुरुषाकार पिंडाला उद्देशून

तीराधर घोष आहे. या लक्षणेच्या उदाहरणांत गंगा लक्षक असून घोष (गवळी-वाडा) लक्ष्य आहे. पण लक्षक 'गङ्गा' हें पद स्त्रीलिंगी असल्यामुळें त्याचें 'गङ्गायां' असें स्त्रीलिंगच योजलें आहे. 'घोष' या पुंलिंगी लक्ष्याच्या अनुरोधानें पुंलिंग योजलेलें नाहीं. तसेंच येथेंही तें बहुत्व मरीचीः या लक्षकाचें आहे, असें समजावें, असें भाष्यकार सांगतात–) "मरीचिभिर्वा रश्मिभिः संबन्धात् (मरीचय इति)।" अर्थ–किंवा त्या अंतरिक्ष लोकाचा संबंध किरणांशीं आहे (व किरण बहु असल्यामुळें 'मरीचयः' असें बहुवचन योजलें आहे. भाष्यकारांनीं या भाष्यानें मरीचिशब्दानें अंतरिक्षलोकाचेंच ग्रहण करण्याचें दुसरें निमित्त सांगितलें आहे, असें त्यांतील नुसत्या वाशब्दाकडे लक्ष्य देऊन ह्मणूं नये. कारण येथें सांगितलेल्या निमित्तावांचून दुसरें निमित्त पूर्वी सांगितलेलें नाहीं. यास्तव या भाष्यांतील 'वा' हा शब्द विकल्पार्थी आहे, असें भ्रमानें समजूं नये.)

"पृथिवी मरो म्रियन्तेऽस्मिन्भूतानीति। या अधस्तात्पृथिव्यास्ता आप उच्यन्ते आप्नोतेर्लोकाः।" अर्थ–पृथिवी हा 'मर' लोक होय. कारण त्यांत लोक मरतात. (ह्मणूनच त्याला मर्त्य असेंही ह्मणतात.) 'या पृथिव्याः अधस्तात् ता आपः लोकाः उच्यन्ते' ज्या आप (जल) पृथिवीच्या खालीं आहेत त्यांना आप–लोक ह्मणतात. कारण अधोलोकीं निवास करणाऱ्या प्राण्यांकडून ते लोक प्राप्त केले जातात. (ह्मणजे 'आप' या नावांत 'आप्' ह्मणजे प्राप्त करणें या धातूच्या अर्थाचा संबंध आहे.)

(अहो पण–या सांगितलेल्या लोकांशीं पांच भूतांचा एकसारखाच संबंध आहे. यास्तव जलावांचून पृथिव्यादि दुसऱ्या कोणत्या तरी भूताच्या नांवानेंही वरील लोकांचा निर्देश करितां आला असता. अंतरिक्षाचा नुसत्या किरणांशींच संबंध आहे, असें कांहीं नाहीं. तर मेघादि दुसऱ्या पदार्थांशींही त्याचा संबंध आहे. यास्तव त्यांच्या नांवांनींही त्या लोकाचा निर्देश करतां येणें शक्य आहे. त्याचप्रमाणें पृथ्वी व तिच्या खालचे लोक यांचा क्रमानें मरण व प्राप्ति या क्रियांवांचून गमनादि दुसऱ्या क्रियांशींही संबंध आहे. यास्तव त्या क्रियांवरूनही ते लक्षित होऊं शकतील,–या शंकेचा आचार्य अनुवाद करितात–) "यद्यपि पञ्चभूतात्मकत्वं लोकानां–" अर्थ–जरी लोकांना पंचभूतात्मकत्व आहे, (भूतात्मकत्व ह्मणजे भूतसंबं-

धित्व, भाष्यातील हा शब्द उदाहरणार्थ आहे त्यामुळें त्यातील काहीं लोकाशीं मेघादि दुसऱ्याही कांहीं पदार्थांचा संबंध आहे, असें समजावें )

( येथें सांगितलेल्या अंभ, मरीचि, मरण व प्राप्ति याचें क्रमानें ऊर्ध्व-लोक, अंतरिक्षलोक, पृथिवी व अधोलोक यांमध्यें आधिक्य असल्यामुळें त्यावरूनच ते लोक लक्षित होणें योग्य आहे कारण त्या त्या वस्तूंच्या आधिक्यामुळें त्याच्या त्याच्या अधिष्ठानाना त्याचीं त्याचीं नावें प्राप्त होत असतात जसें-गुजराथी लोकांच्या आधिक्यामुळें गुजराथ, महाराष्ट्रियांच्या आधिक्यामुळें महाराष्ट्र, इत्यादि, असें समाधान करितात-) "तथाप्य ब्बाहुल्यादन्नामभिरेवाम्भो मरीचीर्मरमाप इत्युच्यन्ते।" अर्थ-तथापि त्या चारी लोकामध्यें जलाचें बाहुल्य ( अधिकता ) असल्यामुळें जलाच्या अम्भ, मरीची, मर व आप या नांवानींच त्याचा उल्लेख केलेला आहे ( भाष्यातील 'अब्बाहुल्यात्' हें पद उपलक्षणार्थ आहे त्यामुळें, अंतरिक्षांत किरणाचें बाहुल्य असल्यामुळें त्याचा किरणाच्या नावानें, पृथ्वींत मरणाचें बाहुल्य असल्यामुळें त्या लोकाचा 'मर' या नावानें व पाताळांत प्राप्तीचें प्राचुर्य असल्यामुळें त्याचा 'आप' या नावानें उल्लेख केला आहे, असें समजावें कारण तसें न समजता भाष्यात जसा उल्लेख केला आहे तसेंच केवळ जलाचें बाहुल्य घेतल्यास त्याच्या योगानें वरील शंकेचें समाधान होत नाहीं कारण द्युप्रभृति वरचे लोक जरी कदाचित् जलबहुल असले, तरी अंतरिक्ष, पृथ्वी व पाताळ हे अधोलोक जलप्रचुर नाहींत शिवाय मरीची, मर व आप, हीं जलाचीं नावें नाहींत शेवटचा 'आप' हा शब्दही प्राप्ति या क्रियेच्या अर्थीं आहे यास्तव 'अब्बाहुल्यात्' हें भाष्याकाराचें पद उपलक्षणार्थ आहे, असेंच समजावें

ऊर्ध्वलोकातून वृष्टिद्वारा आलेलें जलच आम्हाला साक्षात् दिसतें दुसरें भूत साक्षात् दिसत नाहीं यास्तव आमच्या दृष्टीनें वरील लोकाचें जलबाहुल्य आहे, असें म्हणतां येतें त्याचप्रमाणें ऊर्ध्वलोकीं गमन करणाऱ्या प्राण्यांहून अधोलोकीं गमन करणारे प्राणी अतिशय अधिक असतात, असें पुराणांत सांगितलें आहे. यास्तव 'बहुभि आप्यन्ते अधोलोका' म्हणजे अधोलोक पुष्कळ जीवाकडून प्राप्त केले जातात, अशा व्युत्पत्तीनें आप्ति म्हणजे प्राप्ति या क्रियेमुळें अधोलोकाना 'आप' हें नांव प्राप्त झालें आहे

अधोलोकास प्राप्त करून घेणाऱ्या जीवांचें तेथें प्राचुर्य आहे पृथिवींतील प्राणी शीघ्र मरत असतात व अशा प्राण्यांचेंच तेथें बाहुल्य असतें ह्मणून पृथ्वीला 'मर' ह्मटलें आहे अंतरिक्षात किरणांचें बाहुल्य तर प्रसिद्धच आहे

३६ 'स ईक्षतेमे नु' या वाक्याचें व्याख्यान

(या उपनिषदात 'आत्मा वा०' या पहिल्या वाक्यामध्यें ज्याचा निर्देश केला आहे त्या आत्म्याच्या ज्ञानानें संसारी जीव मुक्त केला जाण्यास योग्य आहे, असें सांगावयाचें आहे कारण असंसारी चेतनाला मोक्षाची मुळीं उपपत्तिच नाहीं (बद्ध नसलेल्याला मुक्त होण्याचेंही कारण नसतें) पण तो संसार–ज्यात तो करावयाचा ते आधारभूत लोक, संसाराच्या उपाधिभूत लिङ्गशरीर, त्याचे अभिमानी देव, लिंगशरीरादिकांचें अधिष्ठान स्थूलशरीर संसाररूप अशनाया–पिपासा (क्षुधा–तृषा) इत्यादि ऊर्मी, व त्या ऊर्मी हा माझा धर्म आहे, असा अभिमान बाळगणारा भोक्ता–यांवाचून होऊं शकत नाहीं ह्मणजे निरनिराळ्या शरीरात प्रवेश करून सुखदुःखानुभवरूप संसार या इतक्या सामग्रीवाचून होऊं शकत नहीं यास्तव त्या सर्वांची उत्पत्ति क्रमानें 'अयमात्मसथ' येथपर्यंत सांगण्याची इच्छा करणारा भगवान् वेद संसाराधिष्ठानभूत (आधारभूत) लोकाची उत्पत्ति सांगून आता त्या लोकाच्या पालक देवाची सृष्टि सांगण्याच्या मिषानें समष्टि स्थूलशरीर, समष्टि लिंगशरीर व त्याचे अभिमानी देव याची सृष्टि सांगण्यास 'स ईक्षतेमे नु लोका लोकपालान्नु सृजा इति' या वाक्यानें आरंभ करितो व भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात–)

"सर्वप्राणिकर्मफलोपादानाधिष्ठानभूतांश्चतुरो लोकान्सृष्ट्वा स ईश्वर पुनरेवेक्षत।" अर्थ—सर्व प्राण्याच्या अनुष्ठित कर्मांचें फल, व त्याचें उपादान–त्याचें साधन याच्या अधिष्ठानभूत (आधाररूप) अंभ प्रभृति चार लोकास उत्पन्न करून तो ईश्वर पुनरपि असें ईक्षण करता झाला "इमे ... ऽम्भ प्रभृतयो मया सृष्टा लोका परिपालयितृवर्जिता विनश्येयु। तस्मादेषा रक्षणार्थं लोकपालाँल्लोकाना पालयितॄन्नु सृजे सृजेऽहमिति।" अर्थ—'मया सृष्टा इमे अम्भ प्रभृतय लोका'–मीं उत्पन्न केलेले हे अम्भ प्रभृति लोक परिपालकावाचून राहिल्यास नाश पावतील.

यास्तव यांच्या रक्षणासाठीं लोकपालांस–लोकांच्या पालकांस 'अहं सृजे–' मी उत्पन्न करतों. 'इति' असें (त्यानें ईक्षण केलें, असा संबंध.)

३७ 'सोऽद्भ्य एव०' या वाक्याचें व्याख्यान.

(समष्टि लिंगशरीर व त्यावर अभिमान ठेवणाऱ्या देवता यांची उत्पत्ति विराटाच्या अवयवांपासून होणारी असल्यामुळें तिच्या करितां विराट्सृष्टि सांगतात–) "एवमीक्षित्वा–" अर्थ—याप्रमाणें ईक्षण करून ('सोऽद्भ्य एव पुरुषं समुद्धृत्यामूर्छयत्' या वाक्याचें व्याख्यान करितात–) "सोऽद्भ्य एवाप्प्रधानेभ्य एव पञ्चभूतेभ्यो येभ्योऽम्भःप्रभृतीन्सृष्टवांस्तेभ्य एवेत्यर्थः। पुरुषं पुरुषाकारं शिरःपाण्यादिमन्तं समुद्धृत्याद्भ्यः समुपादाय मृत्पिण्डमिव कुलालः पृथिव्या अमूर्छयन्मूर्छितवान्संपिण्डितवान्स्वावयवसंयोजनेनेत्यर्थः।" अर्थ—तो जलापासूनच, ज्यामध्यें जल प्रधान आहे अशा पंचभूतांपासूनच ह्मणजे ज्यांच्यापासून अंभःप्रभृति लोकांना त्यानें उत्पन्न केलें त्यांच्याचपासून, असा भावार्थ; पुरुषास, मस्तक, हात इत्यादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषाकारास 'समुद्धृत्य–' वर काढून– 'कुलाल· पृथिव्याः मृत्पिण्डं इव अद्भ्यः समुपादाय–' ह्मणजे कुंभार पृथ्वीपासून मातीचा गोळा जसा काढून घेतो त्याप्रमाणें जलापासून पुरुषास काढून घेऊन 'अमूर्छयत्–' साकार–सावयव करता झाला. त्याच्या अवयवांची चांगली योजना करून पक्का करता झाला. (भाष्यकारांनीं वर (पृष्ठ ८८) 'अण्डमुत्पाद्याम्भःप्रभृतींल्लोकानसृजत' या भाष्यानें लोकाच्या उत्पत्तीच्या पूर्वींच ब्रह्मांडाची उत्पत्ति जरी सांगितली आहे, तरी येथें लोकपालाची उत्पत्ति सांगण्यासाठीं त्या पूर्वोक्त उत्पत्तीचाच अनुवाद केला आहे. यास्तव भाष्यावर पूर्वोत्तर विरोध हा दोष येत नाहीं.)

३८ 'तमभ्यतपत्०' या वाक्याचें व्याख्यान.

(याप्रमाणें विराटाची उत्पत्ति सांगून त्याच्या अवयवापासून लोकपाळांची उत्पत्ति 'तमभ्यतपत्तस्याभितप्तस्य मुखं निरभिद्यत यथाण्डम्।' या श्रुतिवचनाच्या व्याख्यानानें सांगतात–) "तं पिण्डं पुरुषविधमुद्दिश्याभ्यतपत्–तदभिध्यानं संकल्पं कृतवानित्यर्थः।" अर्थ— 'तं पुरुषविधं पिण्डं उद्दिश्य–' त्या पुरुषाकार पिंडाला उद्देशून

'अभ्यतपत्– तदभिध्यानं संकल्पं कृतवानित्यर्थः'– अभ्यतप, त्याविषयीं चिंतन, संकल्प करता झाला, असा भावार्थ ( अभ्यतपत्– यांतील तपः– शब्दानें अभिध्यान– चिंतन या नावाचें ज्ञान सांगितलें आहे. कृच्छ्र– चांद्रायणादि शरीरसंतापक तप नव्हे. याविषयीं श्रुतीचें प्रमाण देतात– ) "यस्य ज्ञानमयंतप, इत्यादि श्रुतेः। तस्याभिततस्येश्वरसंकल्पेन तपसाऽभिततस्य पिण्डस्य मुखं निरभिद्यत मुखाकारं सुषिरमजायत। यथा पक्षिणोऽण्डं निरभिद्यतैवम्।" अर्थ–– ज्याचें तप ज्ञानमय आहे ( ज्ञानच आहे, कृच्छ्रादि नव्हे ) अशा अर्थाची श्रुति आहे. त्या अभितप्त ह्मणजे ईश्वराच्या संकल्परूप तपानें संकल्पिलेल्या पिंडाला तोंड फुटलें, मुखाच्या आकाराचें छिद्र झालें ह्मणजे ज्याप्रमाणें पक्ष्याचें अंडें आपोआप उकलतें त्याप्रमाणें ( त्या पुरुषाकार पिंडाला तोंड झालें )

## २९ 'मुखाद्वाक्०' इत्यादि वाक्याचें व्याख्यान

( 'मुखाद्वाग्वाचोऽग्निर्नासिके निरभिद्येतां, नासिकाभ्यां प्राणः प्राणाद्वायुरक्षिणी निरभिद्येतामक्षीभ्यां चक्षुश्चक्षुष आदित्यः कर्णौ निरभिद्येतां कर्णाभ्यां श्रोत्रं श्रोत्राद्दिशस्त्वङ्निरभिद्यत त्वचो लोमानि लोमभ्य ओषधिवनस्पतयो हृदयं निरभिद्यत हृदयान्मनो मनसश्चन्द्रमा नाभिर्निरभिद्यत नाभ्या अपानोऽपानान्मृत्युः शिश्नं निरभिद्यत शिश्नाद्रेतो रेतस आपः' या दीर्घ उपनिषद्वाक्याचें व्याख्यान भाष्यकार संक्षेपतः करितात. याचा शब्दशः अर्थ समजून घेण्याची ज्याची इच्छा असेल त्यानीं प्रथमरत्नाच्या अ परिशिष्टाचें १५ वें पृष्ठ पहावें ) "तस्मान्निर्भिन्नान्मुखाद्वाक्करणमिन्द्रियं निरवर्तत। तदधिष्ठाताऽग्निस्ततो वाचो लोकपालः। तथा नासिके निरभिद्येताम्। नासिकाभ्यां प्राणः प्राणाद्वायुरिति सर्वत्राधिष्ठानं करणं देवता च त्रयं क्रमेण निर्भिन्नमिति।" अर्थ— त्या फुटलेल्या मुखापासून वाक्–इंद्रिय झालें. 'ततः वाचः लोकपालः अग्निः तदधिष्ठाता निरवर्तत।' त्या वाक् इंद्रियापासून लोकपाल अग्नि वाणीचा अधिष्ठाता झाला. ( वागादि सर्व इंद्रियें अपंचीकृत भूतांचीं कार्यें जरी असलीं व मुखादि गोलकाचीं तीं कार्यें नसलीं तरी मुखादि आश्रयामध्यें, ( मुखादि स्थानामध्यें ) त्यांचीं अभिव्यक्ति होत असल्यामुळें, तीं

त्यांविषयींची तृष्णा हाच वायु, त्याच्या योगानें होणारा जो विक्षेप त्या विक्षेपापासून उद्भवळेले शेकडों अनर्थ, विषयसंपादनादिकांच्या योगानें होणारे क्लेश, ह्याच ज्यांत महा ऊर्मी आहेत; ज्यांत महा रौरवादि अनेक नरक असून त्यांतील जीवांचें 'हाय हाय' इत्यादि कूजित व आक्रोश यांच्या योगानें ज्यांत मोठे ध्वनि होत आहेत; (गर्भवास, गर्भाशयांतून बाहेर येणें, बाल्य, तारुण्य, जरा, मरण इत्यादि अवस्था दुःखद आहेत, त्यामुळें तेच अनेक निरय असून त्यांतील प्राण्याचे 'हाय हाय' असे सूक्ष्म व मोठे ध्वनी, यांच्या योगानें ज्या संसारार्णवात मोठा शब्द होत असतो अशा महासागरांत देवता पडल्या.)

(अहो पण संसारसागर जर अशा प्रकारचा आहे तर त्याचें उल्लंघन कोणालाही केव्हाही करता येणें शक्य नाहीं. यास्तव मोक्षशास्त्र व्यर्थ होतें, अशी आशंका घेऊन 'अविवेक्याविषयीं जरी हें खरें असलें तरी विवेकी पुरुषांना त्यांतुन तरून जाण्यास उपाय आहे,' असें 'सत्यार्जवदान०' इत्यादि विशेषणानें सांगितलें आहे). सत्य, सरळपणा, दान, दया, अहिंसा, शम, दम, धृति, इत्यादि आत्मगुण, याच पाथेयानें भरलेली ज्ञानरूपी नौका ज्यांत आहे, सत्संग व सर्वत्याग हेच दोन ज्ञाननौकेचे मार्ग ज्यांत आहेत, व मोक्ष हेंच ज्याचें तीर आहे अशा या महासागरांत त्या देवता पडल्या. (पाथेय ह्मणजे प्रवासांत असतांना मार्गांत खाण्याकरितां घेतलेले पदार्थ. सत्संग ह्मणजे गुरुप्राप्ति, व सर्वत्याग ह्मणजे संन्यास. मोक्ष झाला असतां पुनः संसारसागराचा स्पर्श होत नाहीं, ह्मणून तोच ज्यांत तीरासारखा आहे, अशा या प्रत्यक्षसिद्ध महासागरात त्या देवता पडल्या. ह्मणजे आत्मस्वरूपास विसरून संसारात 'हा मी' अशा अभिमानानें आसक्त झाल्या.)

### २ देवतांच्या संसारपतनाविषयीं शंका-समाधान.

(अहो पण संसारसागरांत पडणे, पुढें सांगितलेल्या अशनाया, पिपासा यांनीं युक्त होणें, इत्यादि सर्व बंध त्यावर अभिमान ठेवणाऱ्या ह्मणजे मी संसारी, अश-

नाया पिपासावान् आहे, इत्यादि अभिमान बाळगणाऱ्या जीवाचा आहे, असें ह्मणणेंच योग्य आहे तो बंध देवतांचा आहे असें ह्मणणें योग्य नव्हे. पण देवतांचाही त्यावर अभिमान असतो, ह्मणून तसें—त्या मोठ्या सागरांत पडल्या-असें ह्मटलें आहे, ह्मणून ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण मुख्यत्वेकरून अभिमान ठेवणाऱ्या जीवाला सोडून सामान्यतः (अमुख्यत.) त्यावर अभिमान ठेवणाऱ्या देवताविषयीं तसें ह्मणणें, यात कोणता मोठा अभिप्राय आहे तें सांगितलें पाहिजे, असें कोणी ह्मणेल ह्मणून श्रीशंकराचार्य ह्मणतात— )
" तस्मादग्न्यादिदेवताप्ययलक्षणापि या गतिर्व्याख्याता ज्ञानकर्मसमुच्चयानुष्ठानफलभूता सापि नाल संसारदुःखोपशमायेत्ययं विवक्षितोऽर्थोऽत्र । " अर्थ— ( ज्याअर्थी संसारसागरात पडणें हा त्यांचा धर्म आहे, ) त्याअर्थी ' अग्न्यादिदेवताप्ययलक्षणा अपि ज्ञानकर्मसमुच्चयानुष्ठानफलभूता या गतिः व्याख्याता— ' अग्नि, वायु, इत्यादि देवतांच्या स्वरूपांत लय पावणें, हें जिचें लक्षण आहे अशीही जी उपासना व कर्म यांचे समुच्चयानें अनुष्ठान केल्यामुळें फलरूपानें प्राप्त होणारी गति पूर्वी सांगितली आहे ' सा अपि संसारदुःखोपशमाय न अलं— ' तीही संसारदुःखाच्या उपशमास ( त्याचें शमन—शांति—नाश करण्यास ) समर्थ नाहीं ' इति अयं अत्र विवक्षित. अर्थ. अस्ति— ' हा येथें विवक्षित ( सांगावयास इच्छिलेला ) अर्थ आहे ( पण अशाप्रकारची विवक्षा असण्याचें तरी प्रयोजन काय ? तें सांगतात— ) " यत एवं तस्मादेवं विदित्वा परं महात्मानमात्मनः सर्वभूतानां च यो यस्यमाणविशेषणः सर्वस्य जगदुत्पत्ति-स्थितिसंहारहेतुत्वेन सर्वसंसारदुःखोपशमनाय वेदितव्यः । " अर्थ— ' यत एव तस्मात्— ' ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी ' एवं विदित्वा— ' असें जाणून ( देवतांमध्ये लय पावणें, ही गति संसारदुःखाची शांति करण्यास समर्थ नाहीं, असें जाणून ) ' आत्मनः सर्वभूतानां च आत्मा च ( आत्मा वा ह्रदयस्थ चैतन्य ) जगदुत्पत्तिस्थितिसंहारहेतुत्वेन ब्रह्म ... सर्वसंसारदुःखोपशमनाय यो ...

वेदितव्यः– ' आपला व इतर सर्वभूतांचा आत्मा कीं जो ( आत्मा वा इदमग्र आसीत् ' येथून ) जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांचा हेतु या रूपानें प्रकृत आहे व ज्याला आणखीं दुसरीं विशेषणें पुढें दिलीं आहेत तो आत्मा पर ब्रह्म आहे ( सर्व व्यापी आहे ) असें जाणण्यास योग्य आहे.

### ६ मोक्षसाधनाविषयीं पुनः शंका-समाधान.

( अहो पण ' एष पन्था एतत्कर्मैतद्ब्रह्मैतत्सत्यं ' ह्मणजे हाच मार्ग आहे, हेंच कर्म आहे, हेंच ब्रह्म आहे व हेंच सत्य आहे, इत्यादि वर्णन करावयास आरंभ करून 'उक्थमुक्थं०' इत्यादि वाक्यानें कर्मसंबंधि सगुण ब्रह्मात्मज्ञानाचेंच विधान केलेलें असल्यामुळें त्यालाच मोक्षसाधनत्व आहे. ' आत्मा वा इदं० ' या वाक्यानें येथें सांगितलेल्या केवळ ( निरुपाधिक ) आत्म्याच्या नुसत्या ज्ञानाला ( साक्षात्काराला ) मोक्षसाधनत्व नाहीं. ( ह्मणजे निर्विशेष आत्म्याचें नुसतें ज्ञान हेंच कांहीं मोक्षाचें साधन नव्हे, तर कर्मसंबंधी सगुण ब्रह्माचें ज्ञान हें मोक्षाचें साधन आहे, अशी शंका घेऊन भाष्यकार- ' एष पन्थाः०' इत्यादि वाक्यानें ब्रह्मात्मसाक्षात्कारच सांगितलेला आहे, कर्मसमुच्चित ज्ञान कांहीं सांगितलेलें नाहीं, कारण त्या कर्मसमुच्चित ज्ञानाला संसारहेतुत्व आहे, असा वर सांगितलेल्या फलविषयक वाक्यावरून निश्चय होतो आणि त्यामुळेंच त्याला सत्यत्व नाहीं,–असें सांगतात–) " तस्मात् ' एष पन्था एतत्कर्मैतद्ब्रह्मैतत्सत्यं ' यद्देतत्परब्रह्मात्मज्ञानं।" अर्थ— ( ज्या अर्थीं कर्मसहित प्राणोपासनेला संसारफलत्व आहे ) त्या अर्थीं ' यत् एतत् परब्रह्मात्मज्ञानं (सः) एष. पन्था., एतत्कर्म, एतत् ब्रह्म, एतत् सत्यं–' जें हें परब्रह्मच आत्मा आहे, अशा प्रकारचें ज्ञान तोच हा मार्ग, तेंच कर्म, तेंच ब्रह्म, व तेंच सत्य आहे. ( प्राणोपासनेचें संसार हेंच फळ मिळणारें असल्यामुळें ' एष पन्थाः० ' इत्यादि वाक्यानें हें जें पर ब्रह्मात्मविज्ञान तेंच सांगितलें आहे. ' तमेव विदित्वातिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय । ' ह्मणजे त्यालाच जाणून पुरुष अतिमृत्यूस प्राप्त होतो, ह्मणजे मृत्यूचें उल्लंघन

करून जातो. त्या गतीस प्राप्त होण्याकरितां अन्य मार्ग नाहीं. या वाक्यानेंही केवल आत्मविज्ञानावांचून इतर मार्गाचा निषेध केलेला आहे; त्यामुळेंही वर सांगितलेलें ज्ञानच ब्रह्म होण्याचा मार्ग आहे, असें सांगतात- ) "**नान्यः पन्था विद्यतेऽयनाय, इति मन्त्रवर्णात् ।**" अर्थ— 'नान्यः पन्था विद्यते अयनाय' ह्मणजे ब्रह्मरूप होण्यास अन्य मार्ग नाहीं, असा मंत्रवर्ण आहे. ( अशीं मंत्राक्षरें आहेत. येथें 'एष पन्थाः०' असा ब्रह्मज्ञानाचा उपक्रम करून मध्यें प्राणाची उपासना सांगितली आहे. यास्तव प्राणाच्या उपासनेनें चित्तानें ऐकाग्र्य प्राप्त झालें असतां व त्याच्या फलाविषयीं वैराग्य झालें असतां 'एष पन्थाः०' इत्यादि वाक्यानें आरंभिलेलें मुख्य ज्ञान सांगतां येणें शक्य आहे. श्रुतीनेंही याच अभिप्रायानें मध्यें प्राणोपासना सांगितली आहे. या वाक्याच्या व्याख्यानाचे वेळीं कर्ममार्गही जरी 'पन्थाः' या शब्दाचा अर्थ ह्मणून सांगितलेला आहे, तरी तो ज्ञानमार्गाचा उपाय ह्मणून सांगितला आहे. प्रधानतः ( मुख्यतः ) तो सांगितलेला नाहीं. तो ब्रह्मात्मभावाचा मुख्य उपाय आहे, अशा दृष्टीनें त्याचा उपदेश केलेला नाहीं, असा याचा भाव. )

### ४ 'तमशनापिपासाभ्यां०' या वाक्याचें व्याख्यान.

( 'तमशनापिपासाभ्यामन्ववार्जत्ता एनमब्रुवन्नायतनं नः प्रजानीहि यस्मिन्प्रतिष्ठिता अन्नमदामेति ।' या श्रुतिवाक्याचें भाष्य- ) "**तं स्थानकरणदेवतोत्पत्तिबीजभूतं पुरुषं प्रथमोत्पादितं पिण्डमात्मानमशनाया-पिपासाभ्यामन्ववार्जदनुगमितवान्संयोजितवानित्यर्थः ।**" अर्थ—स्थान ( अधिष्ठान, गोलक ), करण, व देवता यांच्या उत्पत्तीचें बीज असलेल्या त्या पुरुषाकार प्रथम उत्पन्न केलेल्या पिंडास ह्मणजे आपल्यालाच अशनाया व पिपासा यांनीं 'अन्ववार्जत्-' अनुगत करता झाला, संयुक्त करता झाला, असा याचा अर्थ. ( अहो पण अशनायादिकांचा योग जर पिंडाशीं आहे तर देवतांना तद्वत्त्व ह्मणजे अशनायादिकांनीं युक्तत्व कसें? कीं

ज्यामुळें त्यांनीं अन्नभक्षणार्थ आयतनाविषयीं केलेला प्रश्न उपपन्न होईल? अशी शंका कोणी घेईल ह्मणून सांगतात- ) " तस्य कारणभूतस्याशनायादिदोषवत्त्वात्तत्कार्यभूतानामपि देवतानामशनायादिमत्त्वम् । " अर्थ— त्या कारणभूत पिंडाला अशनायादि दोषवत्त्व असल्यामुळें त्याच्या कार्यभूत देवतांनाही अशनायादिमत्व आहे ( कारण पिंड अशनायादिमान् असल्यामुळें कार्यभूत देवताही तशाच होतात ) ३।१२।१७

"तास्ततोऽशनायापिपासाभ्यां पीड्यमाना एव पितामह स्रष्टारमब्रुवन्नुक्तवत्यः । आयतनमधिष्ठानं नोऽस्मभ्यं प्रजानीहि-विधत्स्व । " अर्थ-' तत.-' त्यानंतर ' अशनायापिपासाभ्यां पीड्यमाना ता -' क्षुधा व तृषा यांच्या योगानें पीडल्या जाणाऱ्या त्या देवता ' एव स्रष्टार पितामह -' या उत्पादक पितामहाला (आपण ह्मणजे देवतांचा जो पिंड त्याच्या जनकाला) 'अब्रुवन्-उक्तवत्य -' ह्मणाल्या 'न -अस्मभ्य आयतन-अधिष्ठान प्रजानीहि-विधत्स्व-' आह्मासाठीं शरीरें निर्माण कर ( अहो पण विराडदेहामध्यें त्याचें आयतन-स्थान आहे मग त्याकरिता पुन प्रार्थना करण्याचें कारण काय? अशी आशंका घेऊन त अतिशय प्रौढ असल्यामुळें त्या सर्वांला व्यापून त्यात राहण्यास आह्मी असमर्थ आहों त्याचप्रमाणें त्या देहाला पुरेल इतकें अन्न निर्माण करण्यासही आह्मी असमर्थ आहों यास्तव आह्मांला योग्य अशा व्यष्टिदेहास निर्माण कर, असें त्या ह्मणाल्या, असें सांगतात-) " यस्मिन्नायतने प्रतिष्ठिता समर्था सन्त्योऽन्नमदाम भक्षयाम इति । " अर्थ-ज्या आयतनात प्रतिष्ठित-समर्थ होत्सात्या आह्मी अन्न भक्षण करू ( यद्यपि आमच्या व्यष्टिशरीरावाचूनही देवता चरु-पुरोडाशादि हवींचें भक्षण करितात तरी तेंही हविर्भक्षण व्यष्टि देवतादेहावाचून होत नाहीं, असा याचा अभिप्राय आहे )

५ 'ताभ्यो गामानयत्० इत्यादि श्रुति व्यष्टि देहाची उत्पत्ति सांगत

('ताभ्यो गामानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति । ताभ्योऽश्वमान, यत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति । ताभ्य पुरुषमानयत्ता, अब्रुवन्सुकृत

बतेति पुरुषो वाव सुकृतं ता अब्रवीद्यथायतनं प्रविशतेति।' या श्रुतीचें व्याख्यान करितात- ) "एवमुक्त ईश्वरस्ताभ्यो देवताभ्यो गां-गवाकृतिविशिष्टं पिण्डं ताभ्य एवाद्भ्यः पूर्ववत्पिण्डं समुद्धृत्य मूर्च्छयित्वाऽऽनयद्दर्शितवान्। ताः पुनर्गवाकृतिं दृष्ट्वाब्रुवन्। न वै नोऽस्मदर्थमधिष्ठानायान्नमत्तुमयं पिण्डोऽलं न वै। अलं-पर्याप्तोऽत्तुं न योग्य इत्यर्थः।" अर्थ-त्या देवतांकडून असें बोलला गेलेला ईश्वर त्या देवतांस पूर्वीप्रमाणें त्याच आप्-तत्त्वापासून (जलप्रधान पंचभूतांपासून) गायीच्या आकृतीनें विशिष्ट असलेल्या पिंडास (देहास) चांगल्या रीतीनें उद्धृत करून मूर्च्छित करून (परस्परांच्या अवयवांच्या संयोजनेनें, त्या देहाच्या सर्व अवयवांचा परस्पर घट्ट संयोग करून) 'आनयत्-' आणून दाखविता झाला. पण त्या देवता त्या गाईच्या आकृतीस पाहून ह्मणाल्या 'अयं पिण्डः नः-अस्मदर्थं-अधिष्ठानाय अन्नं अत्तुं अलं न वै।" हा पिंड आमच्यासाठीं अधिष्ठान होण्यास, अन्न खाण्याचें स्थान होण्यास पुरेसा नाहीं. अलं ह्मणजे पर्याप्त. (गाईच्या शरीराला वरचे दांत नसल्यामुळें त्या शरीरानें दूर्वादि भूक्ष्यांना उपटतां येणार नाहीं, हें वैगुण्य देवतांनीं त्यांत पाहिलें. मनुष्यशरीरांत खालचे व वरचे असे दोन्ही बाजूचे दांत असून शिवाय हात हें एक भूक्ष्यादिकांना उपटावयाचें अधिक साधन आहे.) यास्तव गाईचा देह सर्व अन्न खाण्यास योग्य नाहीं, असा भावार्थ.

(तेव्हां ईश्वरानें त्यांना पूर्वीप्रमाणेंच कृति करून घोड्याचें शरीर आणून दाखविलें. त्याला दोन्ही बाजूंचे दांत असल्यामुळें त्यांत पूर्वोक्त दोष नव्हता, पण त्यालाही विवेकज्ञान नसल्यामुळें तें शरीरहि अयोग्य आहे, असें जाणून देवतांनीं त्याचाही निषेध केला, असें सांगतात-) "गवि प्रत्याख्याते ताभ्योऽश्वमानयत्ता अब्रुवन्न वै नोऽयमलमिति पूर्ववत्।" अर्थ-गाईचा निषेध केला असतां त्यांना घोडा आणून दाखविला. पण देवतांनीं पूर्वीप्रमाणेंच हेंही स्थान योग्य नाहीं, असें ह्मटलें. (वरील गाय व घोडा यांचें ग्रहण इतर सर्व तिर्यग् देहांचें उपलक्षक आहे, असें समजून

ह्मणतात–) "सर्वप्रत्याख्याने ताभ्यः पुरुषमानयत्स्वयोनिभूतम्। ताः स्वयोनिं पुरुषं दृष्ट्वाऽखिन्नाः सत्यः सुकृतं शोभनं कृतमिदमधिष्ठानं बतेत्यब्रुवन्।" अर्थ–पशु–पक्ष्यादि सर्व तिर्यक्शरीराचा निषेध केला असतां ईश्वर त्यांना स्वयोनिभून पुरुषास आणून दाखविता झाला. ('स्वयोनिभूतं' देवतांची योनि, अशा विराट्पुरुषाच्या देहाच्या जातीच्या मनुष्य शरीरास) तेव्हां त्या देवता स्वयोनिभून (विराड्देहसजातीय) पुरुषास पाहून अखिन्न झाल्या; खेदरहित झाल्या; (संतुष्ट झाल्या) व 'बत इदं अधिष्ठानं सुकृतं–शोभनं कृतं–' अहहा! हें अधिष्ठान चांगलें–सुंदर केलें आहे, असें ह्मणाल्या. (ज्याअर्थी त्या देवता 'सुकृतं बत' या स्वसंतोषद्योतक शब्दानें पुरुषदेहास बोलत्या झाल्या, त्याअर्थी त्याचें आतांही सुकृतत्व आहे, असें सांगतात–) "तस्मात्पुरुषो वाव पुरुष एव सुकृतं सर्वपुण्यकर्महेतुत्वात्। स्वयं वा स्वेनैवात्मना स्वमायाभिः कृतत्वात्सुकृतमुच्यते।" अर्थ–वास्तव 'पुरुषः वाव–पुरुष एव–' पुरुषच 'सर्व पुण्यकर्महेतुत्वात् सुकृतं–' सर्व पुण्यकर्मांचें निमित्त असल्यामुळें सुकृत आहे. (अथवा ईश्वरानें स्वतःच केलेलें तें पुरुषशरीर भृत्यादि इतरांनीं केलेल्या कर्माहून चांगलें केलेलें असणें साहजिक आहे, असें सांगतात–) किंवा ईश्वरानें स्वतः (जातीनें) आपल्या मायांच्या योगानें केलेलें असल्यामुळें त्या पुरुषाला 'सुकृत' ह्मटलें जातें. (सुकृत ह्मणजे स्वयंकृत. पाणिनीच्या 'पृषोदरादीनि यथोपदिष्टम्' (अष्टा. अ. ६ पा. ३ सू. १०९) या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें 'स्वयं कृत' यांतील 'स्वयं'च्या जागीं 'सु' हा शब्द होऊन 'सुकृत' असें झालें आहे. असो; येणेंप्रमाणें व्यष्टिदेहांची सृष्टि सांगून त्यांत इंद्रियें व देवता यांचा व्यष्टिरूपानें प्रवेश सांगतात–) "ता देवता ईश्वरोऽब्रवीदिष्टमासामिदमधिष्ठानमिति मत्वा।" अर्थ–'आसां इदं अधिष्ठानं इष्टं इति मत्वा–' या देवतांना हें अधिष्ठान इष्ट आहे, असें समजून 'ईश्वरः ताः देवताः अब्रवीत्–' ईश्वर त्या देवतांस ह्मणाला, (त्या देवतांना तें पुरुषशरीरच इष्ट वाटण्याचें कारण काय तें सांगतात–)

" सर्वे हि स्वयोनिषु रमन्ते " अर्थ—कारण सर्व प्राणी आपल्या योनीमध्यें रममाण होतात, ( असा नियम आहे असो, तें अधिष्ठान तुह्माला इष्ट आहे.) 'अतो यथायतन यस्य यद्वचनादिक्रियायोग्यमायतन तत्प्रविश तेति।" अर्थ—यास्तव 'यथायतन' ज्याचें जें भाषण करणें इत्यादि क्रियेला उचित असें 'आयतन–' गोलकरूप स्थान असेल त्यात तो प्रवेश करो, 'इति' असें ईश्वर त्या देवतास ह्मणाला

६ 'अग्निर्वाग्भूत्वा०' इत्यादि श्रुति 'देवता इंद्रिय होऊन प्रविष्ट झाल्या,' असं सांगते

('अग्निर्वाग्भूत्वा मुखं प्राविशद्वायु प्राणो भूत्वा नासिके प्राविशदा दित्यश्चक्षुर्भूत्वाऽक्षिणी प्राविशद्दिश श्रोत्रं भूत्वा कर्णौ प्राविशन्नोषधिवनस्प तयो लोमानि भूत्वा त्वच प्राविशश्चन्द्रमा मनो भूत्वा हृदय प्राविशन्मृत्युरपानो भूत्वा नाभि प्राविशदापो रेतो भूत्वा शिश्न प्राविशन्।' या दीर्घ श्रुतिवाक्याचें सक्षेपतः व्याख्यान करितात–) " तथास्त्वित्यनुज्ञा प्रतिलभ्येश्वरस्य नगर्यामिव बलाधिकृतादयोऽग्निर्वागभिमानी वागेव भूत्वा स्वां योनिं मुखं प्राविशत्। अन्वय –ईश्वरस्य अनुज्ञां प्रतिलभ्य बलाधिकृतादय नगर्यां इव ईश्वरस्य अनुज्ञा प्रतिलभ्य तथा अस्तु इति ( उक्त्वा ) वागभि मानी अग्नि वाक् एव भूत्वा स्वां योनिं मुखं प्राविशत्। अर्थ–राजाची अनुज्ञा मिळवून सेनाध्यक्षादिक नगरीमध्यें जसे, त्याप्रमाणें या सृष्ट्या ईश्व राची अनुज्ञा प्राप्त करून घेऊन व 'बरें आहे,' असें ह्मणून वाक्–इंद्रियाचा अभिमानी देवता अग्नि वाक्–इंद्रियच होऊन आपल्या यानींत ह्मणजे मुखांत प्रवेश करती झाली (यद्यपि अग्नि वागभिमानीच आहे, वाक् नव्हे तथापि वागिंद्रियावाचून त्याची प्रत्यक्ष उपलब्धि ( ज्ञान ) होत नाहीं व वागिंद्रियाला देवतेच्या अनुग्रहावांचून आपल्या विषयाचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य नसतें यास्तव त्या दोघांची परस्पर इतकी आसक्ति असल्यामुळें 'वागेव' असा अभेदानं उद्देश केला आहे )" तथोत्तरार्थमन्यत्। वायुर्नासिके

आदित्योऽक्षिणी दिशः कर्णावोषधिवनस्पतयस्त्वचं चन्द्रमा हृदयं मृत्युर्नाभिमापः शिश्नं प्राविशन्।" अर्थ–श्रुतीचा बाकीचा भाग उत्कार्थ आहे. ह्मणजे त्याचा अर्थ वर सांगितला आहे. वायु नासिकेंत, आदित्य दोन्ही नेत्रांत, दिशा कानांत, ओषधि व वनस्पति त्वचेंत, चंद्रमा हृदयांत, मृत्यु नाभींत व आप-देवता शिश्नांत प्रवेश करत्या झाल्या. (ईश्वरानें देवतांनाच आपापल्या आयतनांत प्रवेश करण्याविषयीं जरी सांगितलें आहे तरी इंद्रियांवाचून त्यांना साक्षात् भक्षणादि भोग घेतां येत नाहीं. ह्मणून ईश्वरानें त्यांच्याही (इंद्रियांच्याही) प्रवेशाविषयीं प्रेरणा केलीच, असें समजणें भाग आहे.)

७ 'तमशनापिपासे०' इत्यादि वाक्यानें व्यष्टिदेहांतही अशनायापिपासांचा योग सांगतात.

('तमशनापिपासे अब्रूतामावाभ्यामभिप्रजानीहीति। ते अब्रवींदेताभ्वेव वा देवतास्वाभजाम्येतासु भागिन्यौ करोमीति॥ तस्माद्यस्यै कस्यै च देवतायै हविर्गृह्यते भागिन्यावेवास्यामशनापिपासे भवतः॥' या वाक्याचें व्याख्यान करण्याकरिता भाष्यकार अशनाया व पिपासा याचा प्रश्न अगोदर पुढे ठेवितात-)"एवं लब्धाधिष्ठानासु देवतासु निरधिष्ठाने सत्यावशनायापिपासे तमीश्वरमब्रूतामुक्तवत्यावावाभ्यामाधिष्ठानमभिप्रजानीहि चिन्तय विधत्स्वेत्यर्थः।" अर्थ— येणेंप्रमाणें देवताना अधिष्ठानाची प्राप्ति झाली असतां ज्यांना अधिष्ठान राहिलेलें नाहीं अशा अशनाया–पिपासा त्या ईश्वरास ह्मणाल्या, "आमच्याकरितां अधिष्ठानाचें चिंतन कर." आमच्यासाठीं अधिष्ठान कर, असा याचा भावार्थ. (अशनाया व पिपासा यांचाही व्यष्टि-देहांत सुद्धां इंद्रियांच्या अधिष्ठातृ–देवतांशीं संबंध आहे, हें सागण्याकरिता हा येथील प्रश्न आहे. 'निरधिष्ठाने सत्यौ–' कारणभूत विराड्देहांत अग्न्यादि देवतांच्या मुखादि–स्थानांप्रमाणें अशनाया व पिपासा याचेंही विशेष अधिष्ठान जर असतें तर तेंच व्यष्टि–देहांतही झालें असतें. पण विराड्देहांतच

त्याचें स्वतंत्र स्थान नाहीं ह्मणून त्या निराधिष्ठान होत भाष्यातील 'विषत्व' या पदाच्या पुढे ' यस्मिन्प्रतिष्ठिते अन्नमदाव ' हा ज्यात सामर्थ्यसंपन्न होऊन आह्मी दोघीजणी अन्न भक्षण करूं, असा शेष लावावा ( अशीं पदें जोडावीं ) —पण त्यावर ईश्वर ह्मणतो—कारण-समष्टिदेहात तुमचें स्वतंत्र अधिष्ठान नसल्यामुळें तें येथेंही नाहीं. कारण कार्यातील अधिष्ठान कारण-पूर्वक असतें आता, तुमचें भक्षण हा धर्म आहे. कोणत्याही धर्माला स्वातंत्र्य नसतें. तर तो आपल्या धर्मीचा ( धर्मवानाचा ) आश्रय करूनच राहतो यास्तव चेतनावान् व धर्मी अशा देवताच्या ठिकाणचें जें अन्नभक्षण तेंच तुमचें अन्नभक्षण आहे, असें समजा, असें भाष्यकार सांगतात- ) " स ईश्वर एवमुक्तस्ते अशनायापिपासे अब्रवीत् । न हि युवयोर्भावरूपत्वाच्चेतनावद्वस्त्वनाश्रित्याऽऽत्तृत्वं संभवति । तस्मादेतास्वेव वामग्न्याद्यासु वा युवां देवतास्वध्यात्माधिदैवतास्वाभजामि । वृत्तिसंविभागेनानुगृह्णामि । " अर्थ— ' एवं उक्त स ईश्वर ' याप्रमाणें बोलला गेलेला तो ईश्वर ' ते अशनायापिपासे-' त्या अशनाया ( क्षुधा ) व पिपासा ( तृषा ) यांस 'अब्रवीत्' ह्मणाला, ' युवयो भावरूपत्वात् चेतनावत् वस्तु अनाश्रित्य अत्तृत्वं न संभवति हि-' तुह्मा दोघींना भावरूपत्व आहे ह्मणजे तुह्मी दोघीजणी धर्मरूप आहां धर्म आहां यास्तव चेतनावान् वस्तूचा आश्रय केल्यावाचून तुह्मांला अन्नाचें अत्तृत्व संभवत नाहीं ( कारण धर्मी-धर्मवान् पदार्थाशीं अनेकत्व असल्यास त्याला भोक्तृत्व असतें, असें आढळत नाहीं ह्मणून तुह्मांला अत्तृत्व ह्मणजे भोक्तृत्व हवें असेल तर चेतनावान् पदार्थांचा आश्रय केला पाहिजे ) ' तस्मात् वा-युवां एतासु एव अग्न्याद्यासु अध्यात्माधिदैवतासु आभजामि-वृत्तिसंविभागेन अनुगृह्णामि-' यास्तव मी तुह्मां दोघीजणींना यांत अग्न्यादिक अध्यात्म व अधिदैव देवतांमध्यें ' आभजामि-' विभागून देतो ह्मणजे 'वृत्तिसंविभागेन अनुगृह्णामि-' त्यांच्या भागांतील हिस्सा भागून देऊन अनुग्रह करतो. ह्मणजे ' एतासु भागिन्यौ " अर्थ-त्यांच्या सह भागिनी ( भागीदार ) करतो. ( साक्षात् देवता-

मध्यें भागवत्त्वाचा असंभव असल्यामुळें देवताच्या भागानेंच यांचें भागवत्त्व सांगितलें आहे. आता त्याचेंच व्याख्यान करितात-) "**यद्देवत्यो यो भागो हविरादिलक्षणः स्यात्तस्यास्तेनैव भागेन भागिन्यौ भागवत्यौ वां करोमीति सृष्ट्यादावीश्वर एवं व्यदधाद्यस्मात्।**" अर्थ- ज्या देवतेचा जो हवि इत्यादिलक्षण भाग असेल त्या देवतेच्या त्याच भागानें तुह्माला मी भागवाल्या करितों, असें ह्मणून सृष्टीच्या आरंभीं ईश्वर ज्या अर्थी तसें करता झाला, ('हविरादिलक्षणः' यांतील आदिशब्दानें त्या त्या इंद्रियाचा विषयही घ्यावा. ह्मणजे ज्या देवतेचा जो हवि, प्रत्येक इंद्रियाचा विषय इत्यादि, त्या देवतेच्या त्याच भागानें, असा अन्वय अर्थ निष्पन्न होईल.) "**तस्मादिदानीमपि यस्यै कस्यै च देवताया अर्थाय हविर्गृह्यते चरुपुरोडाशादिलक्षणं भागिन्यावेव भागवत्यावेवास्यां देवतायामशनापिपासे भवतः।**" अर्थ-त्या अर्थी आताही ज्या कोणत्याही देवतेकरिता चरु पुरोडाशादिरूप हवि ग्रहण केला जातो, त्या देवतेच्या त्या भागामध्यें अशनाया व पिपासा भागिनीच (भागवाल्याच) होतात. (ज्याअर्थी ईश्वरानें सृष्टीच्या आरंभीं असें केलें त्याअर्थी, असा भाव. वर सांगितल्याप्रमाणें येथील हवि शब्दही उपलक्षणार्थ आहे, असें समजून अधिदैवत हवीचें ग्रहण केलें जातें व अध्यात्मदेवतेसाठीं शब्दादि विषयाचें ग्रहण केलें जातें अशी वाक्ययोजना करावी आता शब्दादिविषय व हवि याच्या योगानें अग्न्यादि देवताची तृप्ति झाली असता अशनाया व पिपासा याचा नाशच झालेला दिसतो, देवताच्या भागामध्यें त्या भागीदार होतात असें दिसत नाहीं, हें खरें पण त्याचा नाश होतो, असें जें वाटतें तेंसुद्धा भ्रमच आहे कारण त्याचा जर सर्वथा नाश झाला असता तर पुनः कालातरीं त्या उद्भवल्या नसत्या. यास्तव स्वरूपानें सर्वदा स्थिर असलेल्या त्या केव्हा केव्हा कार्योन्मुख होतात, ह्मणजे इंद्रियदेवताना विषयाकडे प्रवृत्त करितात व केव्हा केव्हा त्याची (कार्योन्मुखतेचा अभाव, ही) उपशांति अनुभवास येते, असें समजावें आणि त्यामुळेंच हवीच्या योगानें देवताची तृप्ति

झाली असता अशनाया व पिपासा याचीही तृप्ति ह्मणजे उपशांति झालेली दिसते. ह्मणून येथें देवताच्या भागानें अशनाया-पिपासाचें भागवत्त्व सांगितलें आहे. क्षुधा व तृषा यांनीं व्याकुळ झालेल्या पुरुषाला अन्न-जल इत्यादिकांना पाहणें, त्याच्या विषयीं ऐकणें इत्यादिकांच्या योगानेंही आतल्याआत संतोष होऊन त्याविषयींची तृषा शांतशी होते, यास्तव रूपादि विषयांचें ग्रहण करणें, या अवस्थेंत अशनाया व पिपासा यांची शांति दिसत नाहीं, असें ह्मणणें अयोग्य होय, असें सायणाचार्यांच्या दीपिकेंत ह्मटलें आहे. (पहा रत्न १ लें, पृष्ठ ३७-३८).

पण वस्तुत (हें ह्मणणें आनंदगिरीचें आहे) अशनाया व पिपासा या शब्दांनीं इंद्रियांची आपापल्या विषयाविषयींची तृष्णा व कामना सांगितलेली आहे 'अन्नमदाम' ह्मणजे 'आह्मी अन्न खाऊ' या वाक्यांतील अन्नभक्षणही आपल्या विषयाचें ग्रहणच होय. कारण चक्षुरादि इंद्रियांच्या देवताचें मुख्य भक्षण संभवत नाहीं. त्या खरोखरीच भक्षण करू शकत नाहींत ह्मणूनच रूपादि विषयांच्या ग्रहणानें त्या त्या विषयाविषयींच्या अशनाया-पिपासाची शांति होते आणि त्या कारणानेंच सर्व इंद्रियांमध्यें त्या दोषांचें भागवत्त्व आहे, असें समजणें अयोग्य नाहीं आता यावर कोणी ह्मणेल कीं, इंद्रियदेवताच्या तृप्तीवाचून अशनाया व पिपासा यांची स्वतंत्र तृप्ति दिसते, तर तें बरोबर नाहीं कारण इंद्रियांच्या देवतांना स्वस्वविषयोन्मुख करून त्यांकडे प्रेरणा करणें, या कार्योन्मुखतेची निवृत्ति, कार्योन्मुखतेची उपशांति हीच अशनाया-पिपासाची प्रयक्त तृप्ति होय, असें मुक्तेंत वर सांगितलें आहे. ह्मणजे त्या दोन ऊर्मींनीं देवतांना विषयांकडे प्रेरित करणें, व आपलें कार्य सोडलें, बंद केलें ह्मणजे तीच त्यांची तृप्ति आहे, असें आह्मीं सांगितलें आहे

यद्यपि समुद्रप्रवेश, अशनायादिमत्त्व, त्यामुळें अवश्य असलेलें अन्न भक्षण इत्यादि हे सर्व दर्शेंद्रियमधानांच्या अध्यक्षाचे, भोक्त्या जीवाचे धर्म

आहेत, इंद्रियांच्या देवतांचे नव्हेत, तथापि तो भोक्ता-शरीरेंद्रियाध्यक्ष जीव वस्तुतः अभोक्त ब्रह्म आहे. यास्तव भोक्तृत्व हा धर्म वस्तुत. त्याचा नव्हे. तर तो इंद्रियदेवता इत्यादि उपाधीमुळेंच झालेला आहे आणि हा परम सिद्धांत सांगण्यासाठींच श्रुतीनें वरील सर्व संसार देवतांच्या ठिकाणीं आरोपित करून दाखविला आहे. )

येथें ऐतरेयोपनिषदाच्या द्वितीयखंडाच्या श्रीशंकराचार्यकृत भाष्याचा सविवरण भाष्यार्थ समाप्त झाला.

---

१ 'स ईक्षतेमे०' या वाक्यानें विषयांची सृष्टि सांगावयास आरंभ करितात.

(येणेंप्रमाणें भोगांच्या साधनांची सृष्टि सांगून आतां या खंडांत प्रथम भोग्य विषयांची सृष्टि सांगण्यास श्रुति आरंभ करते. 'स ईक्षतेमे नु लोकाश्च लोकपालाश्चान्नमेभ्यः सृजा इति,' या वाक्याचें व्याख्यान भगवान् भाष्यकार करितात–) "स एवमीश्वर ईक्षत। कथं। इमे नु लोकाश्च लोकपालाश्च मया सृष्टा अशनायापिपासाभ्यां च संयोजिताः। अतो नैषां स्थितिरन्नमन्तरेण तस्मादन्नमेभ्यो लोकपालेभ्यः सृजै सृज इति।" अर्थ-याप्रमाणें तो ईश्वर ईक्षण करता झाला. तें कसें–'इमे नु' हे तर ( आतां 'नु' या शब्दानें सांगितलेला वितर्क स्वतः श्रुतिच स्पष्ट करते– ) मीं लोक व लोकपाळ निर्माण केले व त्यांना अशनाया व पिपासा यानीं संयुक्त केलें आहे. यास्तव अन्नावांचून यांची आतां स्थिति होणार नाहीं. ह्मणून या लोकपालांसाठीं मी अन्न उत्पन्न करतों. ( पूर्वीप्रमाणें लोक व लोकपाल यांच्या प्रार्थनेवांचून ईश्वरानें आपण होऊनच अन्न उत्पन्न करण्याचा विचार केला, असें सांगण्याचें प्रयोजन काय ह्मणून कोणी विचारील तर त्याचें ईश्वरत्वज्ञापन ह्मणजे तो ईश्वर आहे, हें सुचविणें हेंच त्याचें प्रयोजन आहे, असें भाष्यकार सांगतात– ) "एवं हि लोक ईश्वराणामनुग्रहे निग्रहे च स्वातन्त्र्यं दृष्टं स्वेषु, तद्वन्महेश्वरस्यापि सर्वेश्वर-

त्वात्सर्वान्प्रति निग्रहानुग्रहेऽपि स्वातन्त्र्यमेव ।" अर्थ-' लोके ईश्वराणां स्वेषु अनुग्रहे निग्रहे च एव हि स्वातन्त्र्य दृष्टम्- ' व्यवहारात धनी पुरुषाचें स्वकीय भृत्यादिकावर अनुग्रह व त्याचा निग्रह करणें, या कामामध्यें असेंच स्वातंत्र्य दिसतें त्याचप्रमाण महेश्वरालाही सर्वेश्वरत्व असल्यामुळें (तो सर्वांचा धनी, स्वामी असल्यामुळें ) सर्वांचा निग्रह किंवा सर्वांवर अनुग्रह करण्यासही स्वतंत्रच आहे, त्याला त्याविषयींचें स्वातंत्र्यच आहे

२ ' सोऽपोऽभ्यतपत्० ' या वाक्याचें व्याख्यान.

( ' सोऽपोऽभ्यतपत्ताभ्योऽभितप्ताभ्यो मूर्तिरजायत या वै सा मूर्तिरजायतान्नं वै तत् । ' असें या खंडाचें दुसरें वाक्य आहे भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात- ) " स ईश्वरोऽन्न सिसृक्षुस्ता एव पूर्वोक्ता अप उद्दिश्याभ्यतपत् । ताभ्योऽभितप्ताभ्य उपादानभूताभ्यो मूर्तिर्घनरूपं धारणसमर्थं चराचरलक्षणमजायतोत्पन्नमन्नं वै तन्मूर्तिरूपं या वै सा मूर्तिरजायत ।" अर्थ— ' अन्नं सिसृक्षुः सः ईश्वर- ' अन्नाला उत्पन्न करण्याची इच्छा करणारा तो ईश्वर त्याच पूर्वोक्त अपांना ( जल प्रधान पंच भूतांना ) उद्देशून अभ्यतप चिंतन करिता झाला ' अभितप्ताभ्य उपादानभूताभ्य ताभ्य - चिंतन केलेल्या व उपादानकारणरूप अशा त्या अपापासून ' मूर्ति - धारणसमर्थ चराचरलक्षण घनरूप अजायत-उत्पन्न-' मूर्ति म्हणजे शरीरधारण करण्यास समर्थ व चराचररूप असें कठिन रूप झालें ' या वै सा मूर्तिरजायत अन्नं वै तत् मूर्तिरूप- ' आणि ती जी मूर्ति झाली तेंच मूर्तिरूप अन्न होय ( अभ्यतपत्— या भूतांपासून मनुष्याचें अन्न व्रीहियवादि व मार्जारादिकांचें अन्न मूषकादि उत्पन्न होतो, असें पर्यालोचन त्यानें केलें श्रुतींतील मूर्ति या शब्दानें हस्तपादादिकांनीं युक्त असलेलें शरीरच घेतल्यास व्रीहियवादि दुसऱ्या सर्व प्रसिद्ध अन्नाचें ग्रहण होईल, असें समजून भाष्यकारांनीं मूर्ति म्हणजे घनरूप ( कठिन ) असें व्याख्यान केलें आहे पण कठिण नसलेल्या वायुवर व चंद्र

किरणादिकांवर सर्पादि प्राणी आपला निर्वाह करितात, असें आढळतें. यास्तव त्यानाही अन्न ह्मणणें भाग आहे. ह्मणून त्याचा संग्रह करण्याकरितां ' धारणसमर्थं ' ह्मणजे शरीराचें धारण करण्यास समर्थ, असें भाष्यकारांनीं ह्मटलें आहे. मूषकादि हें चर अन्न असून व्रीहि-यवादि हें अचर अन्न आहे.)

३ ' तदेनत्सृष्टं ' या तिसऱ्या वाक्याचें व्याख्यान

( ' तदेनत्सृष्ट पराङत्यजिघांसत्तद्वाचाऽजिघृक्षत्तन्नाशक्नोद्वाचा ग्रहीतुं स यद्धैनद्वाचाऽग्रहैष्यदभिव्याहृत्य हैवान्नमत्रप्स्यत् । ' असें तिसरें वाक्य आहे. आत्म्याचें विषयभोक्तृत्व स्वाभाविक नसून इंद्रियांच्या देवता, या उपाधीमुळें आहे, अशा अभिप्रायानें शब्दादिविषयाचा भोग देवता घेतात असें सांगुन आतां अन्नपानभोक्तृत्वही अपानवृत्तियुक्त प्राणाचें आहे, स्वतः आत्म्याचें नव्हे, ह्मणजे आत्म्याचें अन्नपानभोक्तृत्वही प्राणोपाधिक आहे, स्वाभाविक नव्हे, या अभिप्रायानें आत्म्याच्या अभोक्तृत्वाचा निश्चय करण्यासाठीं भाष्यकार ह्मणतात-) " तदेनदन्नं लोकलोकपालानामर्थेऽभिमुखे सृष्टं तद्यथा मूषकादिर्मार्जारादिगोचरे सन्मम मृत्युरन्नाद इति मत्वा परागञ्चतीति पराङ् सदत्यतीत्याजिघांसदतिगन्तुमैच्छत्पलायितुं प्रारभतेत्यर्थः । " अर्थ— ' यथा मूषकादिः मार्जारादिगोचरे सत् मम मृत्युः अन्नादः इति मत्वा पराङ् अञ्चति तद्वत्– ' ज्याप्रमाणें मूषक इत्यादि अन्न मार्जारादिकाच्या पुढें आलें असतां हा माझा मृत्यु, मज अन्नाला खाणारा आहे, असें समजून त्याच्यापासून दूर जाऊं लागतें, त्याप्रमाणें ' तत् एनत् अन्नं लोकलोकपालाना अर्थे अभिमुखे सृष्टं तत् पराङ् सत् अतन् अतीत्य अजिघांसत्-' तें हें अन्न, लोक व लोकपाल याच्याकरितां त्याच्या सन्मुख उत्पन्न केलेलें तें अन्न पराङ्मुख होऊन, भोक्त्याचें उल्लंघन करून जाण्याची इच्छा करूं लागलें. ह्मणजे तें पळण्यास प्रारंभ करतें झालें, असा याचा भावार्थ " तदस्याभिप्रायं मत्वा स लोकलोकपालसंघातः कार्यकरणलक्षणः पिण्डः प्रथमजत्वादन्यांश्चान्नादानपश्यंस्तदन्नं

प्यद्गृहीतवान्स्यात्सर्वोऽपि लोकस्तत्कार्यभूतत्वादन्नमभिव्याहृत्य हैवा- न्नमत्रप्स्यत्सृतोऽभविष्यत्। न चैतदस्त्यतो नाशक्नोद्वाचा ग्रहीतुमि- त्यवगच्छाम· पूर्वजोऽपि। समानमुत्तरम्।" अर्थ— तो प्रथम उत्पन्न झालेला शरीरी 'यत्–यदि ह एनत् वाचा अग्रहैष्यत्– गृहीतवान् स्यात्–' जर त्या अन्नाचें वाचेनें ग्रहण करू शकला असता तर सर्व लोक (प्राणिदेह) त्याच्या कार्यभूत ह्मणजे त्याच्या मागून झालेले असल्यामुळें 'अन्न' असें नुस्तें बोलूनच तृप्त झाले असते, पण तसें होत नाहीं यास्तव तो पूर्वजही (समष्टि पिंडही) वाचेनें अन्नग्रहण करण्यास समर्थ झाला नाहीं, असें आह्मी जाणतों. 'तत्प्राणेनाजिघृक्षत्–' इत्यादि पुढच्या सर्व पर्यायाचा असाच अर्थ समजावा (११२ व्या पानावरील शेवटच्या शब्द 'हैनद्वाचाग्रहै–' असा वाचावा)

४ 'तत्प्राणेनाजिघृक्षत्०' इत्यादि श्रुतीच व्याख्यान

('तत्प्राणेनाजिघृक्षत् तन्नाशक्नोत्प्राणेन ग्रहीतुम्। स यद्धैनत्प्राणेनाग्रहै- ष्यदभिप्राण्य हैवान्नमत्रप्स्यत्। तच्चक्षुषाऽजिघृक्षत् तन्नाशक्नोच्चक्षुषा ग्रहीतुम्। स यद्धैनच्चक्षुषाऽग्रहैष्यद्दृष्ट्वा हैवान्नमत्रप्स्यत्। तच्छ्रोत्रेणाजिघृक्षत् तन्नाशक्नोच्छ्रो त्रेण ग्रहीतुम्। स यद्धैनच्छ्रोत्रेणाग्रहैष्यच्छ्रुत्वा हैवान्नमत्रप्स्यत्। तत्त्वचाऽजिघृक्षत् तन्नाशक्नोत्त्वचा ग्रहीतुम्। स यद्धैनत्त्वचाऽग्रहैष्यत्स्पृष्ट्वा हैवान्नमत्रप्स्यत्। तन्म- नसाऽजिघृक्षत् तन्नाशक्नोन्मनसा ग्रहीतुम्। स यद्धैनन्मनसाऽग्रहैष्यद्ध्यात्वा हैवान्नमत्रप्स्यत्। तच्छिश्नेनाजिघृक्षत्तन्नाशक्नोच्छिश्नेन ग्रहीतुम्। स यद्धैनच्छिश्ने नाग्रहैष्यद्विसृज्य हैवान्नमत्रप्स्यत्। तदपानेनाजिघृक्षत् तदावयत्। सैषोऽन्नस्य ग्रहो यद्वायुरन्नायुर्वा एष यद्वायु॥' या श्रुतिवाक्याचें साक्षीत भाष्य लिहितात–) "तत्प्राणेन तच्चक्षुषा तच्छ्रोत्रेण तत्त्वचा तन्म नसा तच्छिश्नेन तेन तेन करणव्यापारेणान्नं ग्रहीतुमशक्नुवन्पश्चादपा- नेन वायुना मुखच्छिद्रेण तदन्नमजिघृक्षत्तदावयत्तदन्नमेव जग्राहाशि- तवान्।" अर्थ— प्राणानें (ह्म घ्राणानें हुंगून), चक्षूनें, श्रोत्रानें,

त्वचेनें, मनानें, शिश्नानें ह्मणजे त्या त्या इंद्रियाच्या व्यापारानें अन्नाचें ग्रहण करण्यास असमर्थ झालेल्या त्यानें शेवटीं अपानाने ( ह्मणजे मुख-च्छिद्रातून आत जाणाऱ्या वायूनें ) तें अन्न ग्रहण करण्याची इच्छा केली तेव्हा तो ' तत्- ' तें अन्न अशा रीतिनें ' आवयत् जग्राह–अशितवान्- ' ग्रहण करता झाला, खाता झाला ( अन्न भक्षण करणें हा स्वतः आत्म्याचा धर्म नव्हे तर अंतर्वृत्ति प्राणाचा धर्म आहे, असें जें ' तद्वेनत्सृष्ट ' येथपासून ' तदावयत् ' येथपर्यंतच्या श्रुत्यंशानें सांगितलें आहे, त्याच्याच प्रयोजनाचा उपसंहार ' सैषोऽन्नस्य ग्रहो यद्वायुरन्नायुर्वा एष यद्वायुः ।' या वाक्याच्या व्याख्यानानें करितात- ) " तेन स एषोऽपानवायुरन्नस्य ग्रहोऽन्नग्राहक इत्येतत्। यद्वायुर्यो वायुरन्नबन्धनोऽन्नजीवनो वै प्रसिद्धं स एष यो वायु ।" अर्थ— ज्यास्तव तो पूर्वज पिंड अपानाच्या योगानें अन्न खाता झाला, त्यास्तव तो हा अपानवायु अन्नाचा ग्रह– अन्नग्राहक आहे ( अपान या वृत्तीनें युक्त असलेल्या प्राणाचें अन्नग्राहकत्व लोकप्रसिद्धीनें दृढ करण्यासाठीं ' अन्नायु ' या शब्दाचें व्याख्यान करितात- ) जो वायु अन्नायु, अन्नबंधन, अन्नजीवन ह्मणून प्रसिद्ध आहे, तो हा वायु आहे. ('अन्नमदाम॰' इत्यादि दुसऱ्या श्रुतींत अन्नच प्राणाचें आयुष्य आहे, हें प्रसिद्ध आहे व्यवहारातही अन्नावाचून प्राण कसे कासावीस होतात तें प्रसिद्ध आहे. )

### ५ ' स ईक्षत कथं न्विद॰' या वाक्यानें वेद संसारी भोक्त्याचें प्रदर्शन करतो

( ' स ईक्षत कथं न्विदं मदृते स्यादिति । स ईक्षत कतरेण प्रपद्या इति । स ईक्षत यदि वाचाऽभिव्याहृतं यदि प्राणेनाभिप्राणितं यदि चक्षुषा दृष्टं यदि श्रोत्रेण श्रुतं यदि त्वचा स्पृष्टं यदि मनसा ध्यातं यद्यपानेनाभ्यपानितं यदि शिश्नेन विसृष्टमथ कोऽहमिति ' असें तें सर्व श्रुतिवचन आहे. येथवर भोगाचें अधिकरण, असे लोक, भोगाचें स्थान, असें समष्टि–व्यष्टिशरीर, भोगांचीं उपकरणें, अशीं वागादि इंद्रियें, समष्टिशरीरात लोकपाळ या

रूपानें व व्यष्टिशरीरात इंद्रियाधिष्ठातृ–देवता या रूपानें स्थित असलेल्या देवता, त्याना भोगामध्यें प्रवृत्त करणाऱ्या अशनाया व पिपासा या ऊर्मी, त्याच्यामुळें होणारा इंद्रियनिष्ठ शब्दादि विषयरूप भोग व अपानवृत्तियुक्त प्राणाच्या ठिकाणीं असलेला अन्न–पानग्रहणरूप भोग, या सर्वांची सृष्टि आत्म्याच्या ससारित्वाची सिद्धि होण्याकरिता ( तो ससारी आहे, असें सिद्ध व्हावें, म्हणून ) सागून आता ससारी भोक्ता कोण, हें सागण्यासाठीं स्रष्ट्या ईश्वरानें विचार कसा केला, तें सागणाऱ्या ' स ईक्षत० ' इत्यादि वाक्याचें व्याख्यान करितात– ) " स एवं लोकं–लोकपालसङ्घातस्थिति-**मन्ननिमित्तां कृत्वा पुरपौरतत्पालयितृस्थितिसमां स्वामीवेक्षत । कथं नु केन प्रकारेणेति वितर्कयन्निदं मद्दते मामन्तरेण पुरस्वामिनम् ।**" अर्थ— ' स. एव *पुरपौरतत्पालयितृस्थितिसमा लोकलोकपालसङ्घातस्थिति* अन्ननिमित्ता कृत्वा स्वामी इव ईक्षत– ' तो ईश्वर अशा प्रकारें ( वर वर्णन केल्याप्रमाणें ) नगर, त्या नगरात राहणारे लोक व राजानें नेमलेले अधि॰ कारी–त्याचे पालक याच्या स्थितीप्रमाणें लोक व लोकपाल याच्या संघाताची स्थिति अन्ननिमित्तक– अन्नाधीन करून ( व त्याना उत्पन्न करून ) नगरस्वामीप्रमाणेंच विचार करता झाला ' कथं नु– केन प्रकारण– ' कसें बरें– कोणत्या प्रकारें ' इति वितर्कयन्– ' असा वितर्क करीत ' इद मद्दते मा अन्तरेण पुरस्वामिनम्– ' हें ( उत्पन्न केलेलें शरीरेंद्रियसघातरूप कार्य ) मजवाचून–मी जो पुराचा स्वामी त्या मजवाचून ( ह्याप्रमाणें श्रुतींतील ' कथ नु इद ' व ' मद्दते ' या चार पदाचा अर्थ सागून आता वाक्यार्थ सागतात– ) " यदिदं कार्यकरणसङ्घातकार्यं वक्ष्यमाणं **कथं नु खलु मामन्तरेण स्यात्, परार्थं सत् ।**" अर्थ–जें हें पुढें सागितलेलें कार्यकरणसघाताचें–शरीरेंद्रियसमूहाचें (भाषणादि) कार्य तें ' परार्थं सत्–' दुसऱ्या भोक्त्याकरिताच असताना, ' मामन्तरेण कथं नु खलु स्यात्– ' मजवाचून कसें बरें होईल ? ( आनदाश्रमात छापलेल्या भाष्याच्या पुस्तकात ' कार्यकरणसघात कार्यं ' असा पाठ आहे पण त्याचा अन्वय

वाक्यार्थाशीं लागत नाहीं यास्तव 'कार्यकरणसंघातकार्यं' असा पाठ असावा, असें वाटतें याचा वाक्यार्थाशीं अन्वय चांगला होतो. ह्मणून आह्मीं येथें त्याचाच स्वीकार केला आहे. 'परार्थं सत्' हें 'कार्यकरण-संघातकार्यं' या इदंशब्दार्थाचें सहेतुक विशेषण आहे. ह्मणजे तें कार्य दुसऱ्या साठीं असताना मी पर जो अर्थी (त्या भाषणादिकाची इच्छा करणारा) त्या मजवाचून कसें होईल? आता याच अर्थाचा कथंशब्दानें सुचविलेला व्यतिरेक सागतात. व्यतिरेक ह्मणजे अभाव, मजवाचून भाषणादिकांचा अभाव) "यदि वाचाभिव्याहृतमित्यादि केवलमेव वाग्व्यवहरणादि तन्निरर्थकं न कथंचन भवेद्बलिस्तुत्यादिवत्।" अर्थ—'यदि वाचा अभिव्याहृतं' इत्यादि यत् केवलं एव निरर्थकं (भोक्तृरहितं) वाग्व्यवहरणादि तत्र कथचन भवेत्–' ह्मणजे जरी 'वाणीनें भाषण केलें,' इत्यादि श्रुतीनें सांगितलेलें जें नुस्तेंच पुरुषरहित वागिंद्रियाचें व्यवहरण (भाषण) इत्यादि तें कोणत्याही प्रकारें बलिस्तुति, इत्यादिकाप्रमाणें होऊं शकत नाहीं ('निरर्थकं' या भाष्यस्थ पदानें वाग्व्यवहरणादि का संभवत नाहीं, तें सांगितलें आहे. कारण येथें अर्थ ह्मणजे इच्छा करणारा पुरुष. त्यावाचून असलेलें भाषणादि संभवत नाहीं कारण इच्छावान् पुरुष आपल्या प्रयोजनसिद्धीकरिता वागादि इंद्रियांना त्याच्या त्याच्या व्यवहारांत प्रेरणा करीत असतो पण तो इच्छावान् पुरुषच नसल्यास प्रेरकाचाच अभाव होतो आणि त्याच्या अभावीं वाग्व्यवहारादिक संभवत नाहीं. किंवा 'निरर्थक' या शब्दांतील अर्थ ह्मणजे प्रयोजन–फल. पण त्याची इच्छा करणारा पुरुषच नसल्यास अर्थाला–फलाला अर्थत्वच उरत नाहीं. यास्तव पुरुषरहित वाग्व्यवहरणादि निष्प्रयोजन होऊन त्याची सिद्धि होत नाहीं. कारण कोणतीही प्रवृत्ति प्रयोजनपूर्वक होत असते. प्रयोजनावाचून प्रवृत्ति होत नाहीं. वरील भाष्यांत 'बलिस्तुत्यादिवत्' असा दृष्टान्त दिला आहे. त्याचाच विस्तार करितात–) "पौरबन्द्यादिभिः प्रयुज्यमानं स्वाम्यर्थं सस्तत्स्वामिनमन्तरेणामत्येर स्वामिनि सद्वत्।" अन्वयः–

( यथा ) पौरबन्यादिभि प्रयुज्यमानं ( बलिस्तुत्यादिक ) स्वाम्यर्थं सत् स्वामिनमन्तरेण– असति एव स्वामिनि ( न भवेत् ) तद्वत् । अर्थ— ज्याप्रमाणें नगरातील लोक, भाट इत्यादिकाकडून केली जाणारी पूजा, स्तुति इत्यादि स्वामीकरिता असल्यामुळें स्वामीवाचून– स्वामीचाच अभाव झाला असता होत नाहीं, त्याप्रमाणें ( मजवाचून वाग्व्यवहरणादि होणार नाहीं )

( आता या विचाराचें फळ सागतात– ) "तस्मान्मया परेण स्वामिनाऽधिष्ठात्रा कृताकृतफलसाक्षिभूतेन भोक्त्रा भवितव्य पुरस्येव राज्ञा ।" अर्थ–यास्तव या वागादि इंद्रियाहून निराळा, स्वामी ( अर्थी, वागादिकाच्या भाषणादि व्यवहारामुळें होणाऱ्या उपकारास पात्र होणारा ) अधिष्ठाता, केलेलें व न केलेलें कर्म आणि त्याचें फळ याचा साक्षिभूत, व भोक्ता, अशा प्रकारच्या त्या पुराच्या ( नगराच्या ) स्वामी–राजा–प्रमाणें असलें पाहिजे ( भाष्यातील 'पर' या शब्दाचा अर्थ निराळा, अन्य असा करावा वागादि इंद्रियाच्या प्रेरकत्वामुळें त्याला अधिष्ठातृत्व आहे झणजे तो ईश्वर वागादिकाना आपापल्या कार्यांत नियुक्त करतो, झणून अधिष्ठाता अर्थात् अधिष्ठाता झणजे प्रेरक, पण त्या चेतनाचें तें अधिष्ठातृत्व लोहचुंबकाप्रमाणें केवळ साक्षिरूपानें आहे कोणत्याही प्रकारच्या व्यापार रूपानें नव्हे, असें 'कृताकृतफलसाक्षिभूतेन' या पदानें सुचविलें आहे. तसेंच 'भोक्त्रा' या पदानें त्याचें फलसाक्षित्व हेंच भोक्तृत्व आहे, असें सागितलें आहे असो, तात्पर्य वाग्व्यवहारादि कार्यसिद्ध्यर्थ मला यात प्रवेश केला पाहिजे असें बोलून, आत्मस्वरूपाच्या बोधाकरिताही मला प्रवेश केला पाहिजे, असें सागण्यासाठीं 'कतरेण प्रपद्या इति' हें मधलें वाक्य सोडून प्रवेशाचें दुसरें प्रयोजन सागणारें 'स ईक्षत यदि वाचा०' येथपासून 'अथ कोहमिति' येथपर्यंतचें शेवटचें वाक्य व्याख्यानासाठीं अगोदर घेतात कारण तें 'कथ न्विद मदृते स्यात्' या वरच्या, प्रवेशाचें प्रयोजन सागणाऱ्या वाक्याच्या जातीचें, तत्तुल्य आहे ) "यदि नामितस्संहतकार्यस्य परार्थत्व परार्थिना चेतनमन्तरेण भवेत्पुरपौरकार्यमिव तत्स्वामिनम् । अथ कोऽह

किंस्वरूप कस्य स्वामी।" अन्वय–पुरपौरकार्यं तत्स्वामिन अन्तरेण इव यदि नाम एतत्संहतकार्यस्य परार्थत्व परार्थिनं मा चेतनमन्तरेण भवेत् अथ अहं कः किंस्वरूप कस्य वा स्वामी। अर्थ–नगर व नगरातील लोक यांचें कार्य जसें त्याच्या स्वामीवाचून व्हावें, त्याप्रमाणें संघात पाव लेल्या वागादि इंद्रियांचें परार्थत्व ( दुसऱ्या भोक्त्यावर उपकार करण्यासाठीं भाषणादि करणें, हा धर्म ) उपकारास पात्र असलेला जो दुसरा अर्थी त्यावाचून जर होऊं लागेल तर मग मी कोण, कोणत्या स्वरूपाचा, अथवा कोणाचा स्वामी ? ( ह्मणजे केवळ ( भोक्त्यावाचून ) वाणीनेंच जर भाषणादि केलें, तर मग माझें महत्त्व तें काय राहिलें ! तसेंच नुसत्या प्राणानें जर अभिप्राणन केलें, ह्मणजे वास घेतला, चक्षूनेंच पाहिलें, श्रोत्रानेंच ऐकलें, त्वचेनेंच स्पर्शाचें ग्रहण केलें, मनानेंच ध्यान केलें, अपानानेंच आत आलेल्या अन्नाचें भक्षण केलें व शिश्नानेंच रेताचा विसर्ग केला तर मग मी कोण ? इत्यादि योजना करावी )

( आता पूर्वोक्त वाक्यार्थच स्पष्ट करितात– ) " **यद्यहं कार्यकरणसङ्घातमनुप्रविश्य वागाद्यभिव्याहृतादिफलं नोपलभेय राजेव पुरमाविश्याधिकृतपुरुषकृताकृतावेक्षणं न कश्चिन्मामयं सन्नेवंरूपश्चेत्यधिगच्छेद्विचारयेद्।** " अन्वय –राजा पुरं आविश्य अधिकृतपुरुषकृताकृतावेक्षणं इव यदि अहं कार्यकरणसंघातं अनुप्रविश्य वागाद्यभिव्याहृतादिफलं नोपलभेय कश्चित् मा 'अयं सन् एवंरूपः च' इति न अधिगच्छेत् न विचारयेत्। अर्थ–राजा पुरांत प्रवेश करून आपल्या अधिकारी पुरुषांनीं केलेलें व न केलेलें रक्षणादि कार्य जसें पाहतो, त्याप्रमाणें मी या शरीरेंद्रियसमूहांत प्रवेश करून वागादिइंद्रियांचें संभाषणादि फल जर जाणलें नाहीं, तर कोणीही मला 'हा आत्मा आहे व तो अशा अशा स्वरूपाचा आहे,' असें जाणणार नाहीं, असा मजविषयीं विचार करणार नाहीं (प्रवेश न केल्यास आपलें ज्ञान कोणाला होणार नाहीं पण तेंच, तो केल्यास

अवश्य होईल, असें प्रवेशाचें फल सागतात- ) " विपर्यये तु योऽयं वागाद्यभिव्याहृतादीदमिति वेद स सन्वेदनरूपश्चेत्यधिगन्तव्योऽहं स्याम्।" अर्थ-पण त्याच्या विपरीत झाल्यास ह्मणजे मी प्रवेश केल्यास जो हा हें वागादि इंद्रियांचें भाषणादि कर्म आहे, असें जाणतो तो हा विद्यमान व ज्ञानस्वरूप आहे, अशा प्रकारें लोकाकडून जाणला जाण्यास मी योग्य होईन (जो वागादिकाचें सभाषणादि जाणतो, तो वेदनरूप आहे, अशा रीतीनें मी जाणण्यास योग्य होईन. पण वेत्याला वेदनरूपत्व कसें ? अशी शका घेऊं नये कारण ज्ञात्याला ज्ञानरूपत्व नाहीं, असें ह्मटल्यास तो ज्ञाता दुसऱ्या ज्ञानाचा विषय होतो, ह्मणजे तो त्याच्या स्वरूपाहून निराळ्या असलेल्या ज्ञानाचें कर्म होतो, असें ह्मणावें लागतें पण मग त्या ज्ञानक्रियेचा कर्ता कोण ? ज्ञाताच आपल्या ज्ञानक्रियेचा कर्ता आहे, ह्मणून ह्मटलें तर एकाच वेत्याच्या ठिकाणीं कर्तृत्व व कर्मत्व हे दोन्ही परस्पर विरुद्ध धर्म असणें, हा दोष येतो. बरें, एका वेत्याला जाणणारा दुसरा वेत्ता असतो असें ह्मटलें तर प्रत्येक वेत्याला त्याहून निराळ्या वेत्याची आवश्यकता असल्यामुळें अनवस्था दोष येतो पण वेत्ता-ज्ञाता-वेदनरूप, ज्ञानरूप आहे, असें समजलें ह्मणजे यातील कोणताही दोष येत नाहीं व ज्ञाता ज्ञानरूप आहे, असा विचारवानाना अनुभवही येत असतो यास्तव इंद्रियाच्या व्यापाराना जाणणारा आत्मा ज्ञानरूप आहे, हा सिद्धान्त होय एवढ्यासाठींच दुसऱ्या एका श्रुतींत 'हें मी हुंगतों, असें जो जाणतो तो आत्मा' असें ह्मणून वास घेणारा, सुवासिक पदार्थ व वास घेण्याचें साधन ( घ्राण ), याचें ज्ञान हाच आत्मा आहे, असें सांगितलें आहे असो, त्याच्या ज्ञानरूपत्वाविषयीं प्रमाण सागून आता अस्तित्वाविषयीं प्रमाण सागतात- ) " यदर्थमिद सहताना वागादीनामभिव्याहृतादि यथा स्तम्भकुड्यादीना प्रासादादिसहताना स्वावयवैरसहतपरार्थत्व तद्वदिति।" अर्थ-' सहताना वागादीना-' एकत्र सघात पावलेल्या वागादि इंद्रियाचें ' इद अभिव्याहृतादि-' हें सभाषणादि ' यदर्थ (सः अन्य वागादिभि असहत सन् च इति अधिगन्तव्य. स्याम्)'

ज्याच्याकरितां आहे ( तो त्याहून निराळा, त्या वागादिकांशीं संघात न पावलेला व विद्यमान आहे, अशा प्रकारें मी जाणण्यास योग्य होईन. (या-विषयीं, म्हणजे कोणताही संघात, संघात न पावलेल्या दुसऱ्यासाठीं असतो याविषयीं दृष्टांत देतात-) ज्याप्रमाणें संघात पावलेले खांब, भिंत, मोठा राज-वाडा, देवालय इत्यादि पदार्थ आपल्या अवयवांनीं त्यांच्याशीं संघात न पावलेल्या अशा दुसऱ्याकरितांच असतात, त्याप्रमाणें ( शरीरेंद्रियसंघात त्यांच्याशीं संघात न पावलेल्या अशा दुसऱ्या भोक्त्याकरितांच असणार, हें उघड आहे. असा प्रकार असल्यामुळें त्यानें ईक्षण केलें याविषयीं अनुमान असें करावें.–वागादि इंद्रियांचें संभाषणादिक ( पक्ष ), त्यांच्याशीं संहत न झालेल्या दुसऱ्या कोणाकरितां असणेंच योग्य आहे. ( साध्य ), कारण वागादिक संहत आहेत. जसें–राजाकरिता सैनिक परस्पर मिळून एकमतानें शत्रूंशीं लढण्यास तयार होतात त्याप्रमाणें ( हेतु ). भिंत, खांब इत्यादि-कांप्रमाणें किंवा मोठा राजवाडा, देवालय इत्यादिकांप्रमाणें ( दृष्टान्त ). ‘ तद्दिति ’ या भाष्यापुढें ‘ स ईक्षत ’ हें श्रुतींतील तिसरें वाक्य घ्यावें. तें स्पष्ट असल्यामुळें भाष्यकारांनीं सोडलें आहे. )

( असो; अशा दोन प्रयोजनांकरितां चेतनाला प्रवेश करणें भाग झालें असतां कोणत्या द्वारानें प्रवेश करावा, हा विचार करण्याचा प्रसंग येतो. म्हणून आतां ( मागून, पुढच्या श्रुतिवाक्याचें व्याख्यान केल्यावर ) ‘ स ईक्षत कतरेण प्रपद्या इति ’ या मधल्यास राहिलेल्या वाक्याचें व्याख्यान करितात–) “ एवमीक्षित्वातः कतरेण प्रपद्या इति प्रपदं च मूर्धा चास्य पुरुषस्य प्रवेशमार्गौ । अनयोः कतरेण मार्गेणेदं कार्यकरण-संघातलक्षणं पुरं प्रपद्ये-प्रविशेयमिति । ” अर्थ–असें ईक्षण करून ( ज्या-अर्थी वागादि इंद्रियांच्या व्यवहाराची सिद्धि व आत्म्याच्या स्वरूपाचा बोध ही दोन प्रयोजनें सिद्ध व्हावी, म्हणून प्रवेश करणें अवश्य आहे ) त्याअर्थी या दोन मार्गांपैकीं कोणत्या एका मार्गानें शरीरांत प्रवेश करूं ? असें त्यानें ईक्षण केलें. प्रपद म्हणजे पायाचा चवडा व मूर्धा म्ह. मस्तक असे या संघा-

ताचे दोन प्रवेशमार्ग आहेत त्यांतील कोणत्या मार्गानें या शरीरेंद्रिय संघातरूप पुरात मीं प्रवेश करावा (येथेंही 'इति' या भाष्यानंतर श्रुतींतील दुसरें 'स ईक्षत' हें वाक्य घ्यावें या श्रुतिवाक्यांत 'स ईक्षत' हें वाक्य तीनदा आलें आहे त्यांतील पहिलें 'मद्दते स्यादिति' येथील इतिशब्दाच्या पुढें योजावें तिसरें 'तद्ददिति' या भाष्याच्या पुढें घ्यावें व दुसरें 'प्रपद्येयेति' येथील इतिशब्दाच्या पुढें योजावें)

६ 'स एतमेव०' या वाक्याचें व्याख्यान

('स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत' या वाक्याचें व्याख्यान करण्यासाठीं त्याला अपेक्षित असलेला अर्थ सांगतात—) "एवं ईक्षित्वा" अर्थ—असें ईक्षण (पर्यालोचन) करून (भृत्याच्या—सेवकाच्या मार्गानें स्वामीनें प्रवेश करणें अनुचित आहे, हें सुचविण्यासाठीं याच मार्गानें त्यानें प्रवेश करण्याचा निश्चय केला, असें सांगतात—) "**न तावन्मद्भृत्यस्य प्राणस्य मम सर्वार्थाधिकृतस्य प्रवेशमार्गेण प्रपदाभ्यामध प्रपद्ये। किं तर्हि पारिशेष्यादस्य मूर्धानं विदार्य प्रपद्येयमिति लोक इवेक्षितकारी स स्रष्टेश्वर एतमेव मूर्धसीमानं केशविभागावसानं विदार्य छिद्रं कृत्वैतया द्वारा मार्गेणेमं लोकं कार्यकरणसंघातं प्रापद्यत प्रविवेश।**" अन्वय—अहं तावत् मद्भृत्यस्य प्राणस्य—मम सर्वार्थाधिकृतस्य प्रवेशमार्गेण—प्रपदाभ्यां अध न प्रपद्ये। अर्थ—मी तर माझा भृत्य जो प्राण—माझ्या सर्व प्रयोजनाचा अधिकारी—त्याच्या प्रवेशमार्गानें म्हणजे दोन्ही पावलांच्या अग्रांनीं खालून प्रवेश करणार नाहीं तर काय, तो जाऊन राहिलेला असल्यामुळे (कोणी भृत्य न जाता अगदीं शुद्ध राहिलेला असल्यामुळें) या संघाताच्या मस्तकाला विदीर्ण करून यांत मी जातों, असें एकाद्या विचारी पुरुषाप्रमाणें चांगला विचार करूनच एकादें कार्य करणारा तो स्रष्टा ईश्वर याच 'मूर्धसीमान—' केंसाच्या विभागाच्या अवसानास (केंसाचा विभाग (भांग) जेथें संपतो, त्या भागास, व्यवहारांत ज्या

भागाला तालू ह्मणतात त्याला ) विदीर्ण करून–छिद्र करून त्या द्वारानें ( मार्गानें ) या लोकास–शरीरेंद्रियसंघातास प्राप्त झाला. त्यांत प्रवेश करता झाला.

७ 'सैषा विदृतिः०' या श्रुतीचें व्याख्यान.

( 'सैषा विदृतिर्नाम द्वास्तदेतन्नान्दनम्।' असें तें सर्व वाक्य आहे. शंका–अहो पण 'पुरुषाच्या शरीरांत नऊ प्राण (इंद्रियगोलक, द्वारें) आहेत. सात मस्तकांत व दोन खालीं' त्याचप्रमाणें 'नवद्वारे पुरे देही०' इत्यादि श्रुति–स्मृतिवचनांत नऊ द्वारें प्रसिद्ध आहेत. त्यांहून निराळें मस्तकावर आणखी एक दहावें द्वार आहे, असें श्रुति–स्मृतींत कोठेंच सांगितलेलें नाहीं. समाधान–मस्तकावरील द्वार प्रत्यक्ष स्पर्शानें कळतें. लहान मुलांची टाळू कशी विलविलित असते हें सर्वांना ठाऊक आहे. तसेंच 'तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति' या उपनिषद्वाक्यांत हृदयाच्या एकशें एक नाड्यांतील एक नाडी मस्तकांतून वर गेली आहे. तिच्या द्वारा वर जाणारा अमृतत्वास प्राप्त होतो, असें सांगितलें आहे. यास्तव तें द्वार अप्रसिद्ध आहे, असें ह्मणतां येत नाहीं. असो; आतां हेंच सांगण्यासाठीं वरील वाक्याचें व्याख्यान आरंभितात–) "सेयं हि प्रसिद्धा द्वाः।" अर्थ–ती ही प्रसिद्ध द्वाः (द्वार) आहे. (संस्कृतांत 'द्वार' हा शब्द स्त्रीलिंगी आहे. त्याची प्रत्यक्ष प्रसिद्धि 'सा' व 'एषा' या दोन पदांनीं सुचवितात–) "मूर्ध्नि तैलादिधारणकाले तद्रसादिसंविदनात्।" अर्थ–कारण मस्तकावर तेल, तूप इत्यादि धारण करण्याचे वेळीं त्याच्या रसादिकांचें ज्ञान होतें. (डोक्यावर पुष्कळ वेळ कडू तेल वगैरे ठेवल्यास त्याच्या रसादिकांचें ज्ञान होतें, असा अनुभव आहे. त्यामुळें तें द्वार प्रत्यक्षप्रमाणानें सिद्ध आहे. त्याची अशी केवळ प्रत्यक्ष प्रसिद्धि आहे, इतकेंच नव्हे तर 'विदृति' या नांवानेंही तें प्रसिद्ध आहे, असें सांगतात–) "सैषा विदृतिर्विदारितत्वाद्विदृतिर्नाम प्रसिद्धा द्वाः।" अर्थ–ती ही विदृति–विदारित केलेली असल्यामुळें विदृति–या नांवाची प्रसिद्ध 'द्वाः' आहे. (या ईश्वरानें स्वतःच्या प्रवेशाकरितां भग-

धारणपणें, दुसऱ्या कोणालाही साधारण न होईल अशा रीतीनें, केवळ आपल्याच उपयोगीं पडेल, या योजनेनें तें द्वार केलेलें असल्यामुळें 'शरीराला नऊ द्वारें असतात' या पूर्वोक्त श्रुति-स्मृतिवचनांशीं विरोध येत नाहीं. कारण त्या श्रुति-स्मृतिवचनांत सेवकांप्रमाणें असलेल्या चक्षुरादिकांच्या प्रवेशाच्या द्वारांचीच गणना केलेली आहे. आतां या दहाव्या द्वाराचीही श्रुतीमध्यें प्रसिद्धि आहे, हें सांगण्यासाठीं 'तदेतन्नान्दनं' हा श्रुतीचा अंश आहे. त्यांत हेंच नान्दन आहे, आणखीं कोणी नाहीं, असें सांगितलें आहे, अशा अभिप्रायानें भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात-) "इतराणि तु श्रोत्रादिद्वाराणि भृत्यादिस्थानीयसाधारणमार्गत्वान्न समृद्धीनि नानन्दहेतूनि। इदं तु द्वारं परमेश्वरस्यैव केवलस्येति तदेतन्नान्दनं नन्दनमेव नान्दनमिति दैर्घ्यं छान्दसम्। नन्दत्यनेन द्वारेण गत्वा परस्मिन्ब्रह्मणीति।" अर्थ-पण त्याहून इतर श्रोत्रादि द्वारें हे भृत्यादिकांच्या स्थानीं असलेल्या श्रोत्रादि सर्व इंद्रियांचे साधारण मार्ग असल्यामुळें समृद्ध नाहींत. तीं आनंदाला कारण होणारीं नाहींत. (समृद्ध या पदाचा-ज्यांत चांगली ऋद्धि ह्मणजे आनंद आहे, तीं समृद्ध,-असा विग्रह करावा.) पण हें द्वार केवळ परमेश्वराचेंच आहे, (ह्मणजे असाधारण आहे.) ह्मणून तें हें 'नन्दन' होय. वस्तुतः 'टुनदि समृद्धौ' या धातुपासून 'नन्दन' असें भाववाचक नाम होतें. त्यालाच येथें 'नान्दन' असें ह्मटलें आहे. येथील नकाराचें दीर्घत्व छांदस (वैदिक) आहे. 'अनेन द्वारेण गत्वा परस्मिन् ब्रह्मणि नन्दति इति (नन्दनं)-' या द्वारानें जाऊन परब्रह्मामध्यें पुरुष आनंदित होतो, ह्मणून तें 'नन्दन' (अशी त्याची व्युत्पत्ति सांगितली आहे. तिच्या योगानें 'तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति' या पूर्वोक्त श्रुतींतील त्या द्वाराची प्रसिद्धि दाखविली आहे.)

८ 'तस्य त्रय आवसथाः०' या श्रुत्यंशाचें व्याख्यान.

('तस्य त्रय आवसथास्त्रयः स्वप्नाः। अयमावसथोऽयमावसथोऽयमावसथ इति' या एवढ्या श्रुत्यंशाचें व्याख्यान आरंभितात. याप्रमाणें ईश्वराचा

शरीरप्रवेश सांगून त्याला वर सांगितलेल्या शरीरेंद्रियसंघात, या उपाधीमुळें प्राप्त होणारा संसार सांगतात-) "तस्यैवं सृष्ट्वा प्रविष्टस्य जीवेनात्मना राज्ञ इव पुरं त्रय आवसथाः।" अन्वय.-एवं पुरं सृष्ट्वा जीवेन आत्मना प्रविष्टस्य तस्य राज्ञ. इव त्रयः आवसथाः। अर्थ— अशरीरीनें (पूर्वोक्त प्रकारें) शरीररूप पुर निर्माण करून त्यांत जीवात्म्याच्या रूपानें प्रवेश केलेल्या त्याचीं राजाच्या क्रीडास्थानाप्रमाणें तीन आवसथ म्हणजे क्रीडास्थानें आहेत. (त्याचेंच वर्णन करितात-) "जागरितकाल इन्द्रियस्थान दक्षिण चक्षु.। स्वप्नकाले अन्तर्मनः। सुषुप्तिकाले हृदयाकाश इत्येतत्। वक्ष्यमाणा वा त्रय आवसथा.।" अर्थ— जागरितसमयीं इंद्रियाचें स्थान- उजवा नेत्र, (हें क्रिडास्थान,) स्वप्नसमयीं आंतील मन (म्हणजे मनाचें अधिकरण कंठस्थान, कारण 'कण्ठे स्वप्नं समादिशेत्' अशी श्रुति आहे.) व सुषुप्तिसमयीं हृदयाकाश (हृदयानें मर्यादित झालेलें अवकाशरूप आकाश) असा याचा इत्यर्थ ('सुषुप्तींत जीव सद्रूप होतो' अशा अर्थाची श्रुति असल्यामुळें सुषुप्तींत जीव ब्रह्माचे ठिकाणींच असतो, हें जरी खरें आहे तरी ब्रह्मही हृदयातील अवकाशांत असतें. यास्तव ब्रह्माशीं मिळालेलाही तो हृदयाकाशांतच राहतो. म्हणून हृदयाकाश हें त्याचें स्थान आहे, असें म्हटलें आहे. नाहींतर उत्तरमीमांसेंतील दहराधिकरणन्यायानें हृदयाकाशशब्दानें ब्रह्म समजल्यास 'त्याचे

१ उत्तर मीमांसेच्या पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाचें तेरावें सूत्र व पांचवें अधिकरण, यांत हा दहराकाशन्याय सांगितला आहे त्याचें संक्षिप्त दिग्दर्शन असें- मागच्या अधिकरणांत 'परपुरुष' हा शब्द ब्रह्मामध्यें रूढ असल्यामुळें ब्रह्माची उपासना करावी, असें सांगितलें आतां या अधिकरणांतही आकाशशब्द पांचवें भूत, या अर्थी रूढ असल्यामुळें त्याचीच उपासना करणें उचित होय, असा पूर्वपक्ष झाला असतां भगवान् व्यास 'दहर उत्तरेभ्य.' या सूत्रानें उत्तर पक्ष सांगतात — 'यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाश' या श्रुतींतील 'दहर आकाश' या शब्दानें परमात्माच घ्यावा कारण त्या वाक्याच्या पुढील वाक्यांत 'अपहतपाप्मा' इत्यादि जीं विशेषणें दिलीं आहेत त्यावरून तसा निश्चय होतो

तीन स्वप्न आहेत, ' या वाक्यानें पुढें सांगितलेलें त्याचें स्वप्नतुल्यत्व अनुपपन्न ( अयोग्य ) होतें. एवढ्याकरिताच भाष्यकार ' वक्ष्यमाणा वा त्रय आवसथा । ' हा दुसरा पक्ष सांगतात– ) अथवा पुढें सांगितलेले हे तीन आवसथ समजावे ( त्याचाच निर्देश करितात– ) " पितृशरीरं मातृगर्भाशय॰ स्वं च शरीरमिति । " अर्थ— पित्याचें शरीर, मातेचा गर्भाशय व आपलें शरीर ( हे तीन आवसथ आहेत )

( अहो पण ' आत्मा वा इद एक एव ' या आरंभींच्या वाक्यानें अद्वितीयरूपानें सांगितलेल्या आत्म्याचा तीन क्रीडास्थानाशीं योग ( संबंध ) कसा होतो ? अशी आशंका घेऊन ' ते आवसथ मिथ्या असल्यामुळें आत्म्याच्या पारमार्थिक ( त्रिकालाबाधित ) अद्वितीयत्वाचा बाध होत नाहीं ' असें समाधान सांगण्यासाठींच श्रुतीनें ' त्रय स्वप्नाः ' असें ह्मटलें आहे. भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात– ) " त्रय स्वप्ना जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्या । " अर्थ— जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या नावाचे तीन स्वप्न ( स्वप्नतुल्य ) आहेत ( येथील ' जाग्रत्स्वप्न॰ ' इत्यादि पद उपलक्षणार्थ आहे वास्तव त्यावरून पूर्वोक्त पितृशरीर, मातृगर्भाशय व स्वशरीर, यांचेंही ग्रहण करावें. पण त्याना स्वप्नतुल्यत्व नाहीं, अशी शंका घेतात– ) " ननु जागरितं प्रबोधरूपत्वान्न स्वप्न॰ । " अर्थ— अहो पण जागरित प्रबोधरूप ( यथार्थ ज्ञानरूप, विषय व इंद्रियें यांच्या संयोगामुळें होणाऱ्या प्रमाणसिद्ध ज्ञानरूप ) असल्यामुळें स्वप्न नव्हे. ( येथेंही पूर्वोक्त तीन शरीरें उपलक्षित होतात. असो, जागरितादि प्रबोधरूप जरी असले तरी त्यांचे प्रबोध स्वप्नप्रबोधासारखेच आहेत. त्यामुळें त्याना स्वप्न ह्मणण्यांत कांहीं दोष नाहीं, असें उत्तर देतात– ) " नैवम् । स्वप्न एव । " अर्थ— असें नाहीं. ते आवसथ स्वप्नच आहेत. ( पण त्याना स्वप्न, असें कोणी ह्मणत नाहींत, अशा अभिप्रायानें वादी ह्मणतो– ) " कथं " अर्थ— ते स्वप्नच कसे ? ( अविवेकी जरी त्याना स्वप्न ह्मणत नसले तरी विवेकी स्वप्नाचें लक्षण जाणतात व

त्यामुळें जागरितादि किंवा पितृशरीरादि तीन आवसथ हीं तीन स्वप्नेंच आहेत, असें ते म्हणतात, असें भाष्यकार सांगतात- ) " परमार्थस्वात्मप्रबोधाभावात् स्वप्नवदसद्वस्तुदर्शनाच्च । " अर्थ— कारण परमार्थ ( परम सत्य ) असा जो आत्मा त्याचा प्रबोध त्याविषयीं नसतो व त्या सर्व अवस्थांमध्यें स्वप्नाप्रमाणेंच असद्वस्तूंचें दर्शन होतें. (त्रिकालाबाधित वस्तुतत्त्व आच्छादित होऊन असत् ( अविद्यमान ) वस्तूचा भास होणें, हें स्वप्न आहे, असें स्वप्नाचें लक्षण केलेलें आहे व जागरितही तसेंच आहे. कारण त्या अवस्थेंतही ब्रह्मस्वरूप आच्छादित होऊन असत् जगाची प्रतीति येते, असा याचा भावार्थ. ) " अयमेवावसथश्चक्षुर्दक्षिणं प्रथमः । मनोऽन्तरं द्वितीयः । हृदयाकाशस्तृतीयः । ' अयमावसथ ' इत्युक्तानुकीर्तनमेव । " अर्थ— ' दक्षिणं चक्षुः अयं एव प्रथमः आवसथः- ' उजवा नेत्र हाच पहिला आवसथ आहे. ' अन्तरं यत् मनः तत् द्वितीयः आवसथः' आंत असलेलें जें मन तेंच दुसरा आवसथ आहे. हृदयाकाश हा तिसरा आवसथ होय. श्रुतीनें ' हा आवसथ, हा आवसथ ' असें म्हणून ' त्रय आवसथा ' या शब्दांनीं सांगितलेल्या तीन आवसथांचेंच अनुकीर्तन ( अनुवाद ) केलें आहे. ( म्हणजे 'अयमावसथः ' इत्यादि वाक्यानें कांहीं निराळीच गोष्ट सांगितली आहे, असें नाहीं. तर एखाद्या मोठ्या वाड्याचे मजले जसे त्याहीं व घर असतात, म्हणजे एखाद्या घराला जसे एकावर एक असे अनेक मजले असतात, त्याप्रमाणें त्याहीं-घर असलेल्या नेत्रादिकांचाच येथें निर्देश करून ते शरीरापासून कांहीं दूर दिसत नाहीत, असें दाखविलें आहे.)

( असो तर, आवसथ हा शब्द एका प्रकारच्या घराचा वाचक [illegible]. [illegible] नेत्रादिकांच्या ठिकाणी कसा घडेल? [illegible] [illegible] प्रकारचा [illegible] या तीन स्थानांस [illegible] [illegible] हा [illegible] विशेष [illegible] दिली. [illegible] [illegible] [illegible]

पुरुषाप्रमाणें या स्थानांत असणारा जीवही लवकर जागा (ज्ञानवान्) होत नाहीं. यास्तव नेत्रादिस्थानांना गौणवृत्तीनें आवसथ ( गृह ) ह्मटलें आहे, असें समाधान सांगतात– ) " तेषु ह्ययमावसथेषु पर्यायेणात्मभावेन वर्तमानोऽविद्यया दीर्घकालं गाढं प्रसुप्तः स्वाभाविक्या न प्रबुद्ध्यतेऽनेकशतसहस्रानर्थसंनिपातजदुःखमुद्गराभिघातानुभवैरपि । " अर्थ— त्याच आवसथांमध्यें क्रमानें आत्मभावानें ( हाच मी, अशा भावनेनें ) असणारा व स्वाभाविक अविद्येमुळें दीर्घ काल झोंपीं गेलेला जीव अनेक शत व सहस्र ( ह्म. शेकडों व हजारों ) अनर्थांच्या संनिपाता–( संबंधा– ) पासून उद्भवलेल्या दुःखरूपी मुद्गरांचे प्रहार सोशीत असूनही ( त्या प्रहारांच्या अनुभवांनींही ) जागा ( सावध ) होत नाहीं. ( ह्मणून नेत्रादि स्थानांना गौणवृत्तीनें आवसथ ह्मटलें आहे. )

९ ' स जातो भूतान्य० ' या वाक्याचें व्याख्यान.

(जागरितादिक हा, भूतांचीं कार्यें, असा जो शरीरेंद्रियसंघात त्याचा धर्म आहे, आत्म्याचा नव्हे; पण त्याहून भिन्न असलेल्याही आत्म्याचा त्या धर्मांचे ठिकाणीं तादात्म्य अभिमान होत असल्यामुळें ( ह्मणजे हें शरीरच मी असून त्याचे धर्म हे माझेच धर्म असा अभिमान त्याला वाटत असल्यामुळें ) जागरादि आत्म्याचे धर्म होऊं शकतात, असें सांगण्यासाठीं ' स जातो भूतान्यभिव्यैख्यत्किमिहान्यं वावदिषदिति । ' हें श्रुतिवचन आहे. भाष्यकार त्याचें आतां व्याख्यान करितात– ) " स जातः शरीरे प्रविष्टो जीवात्मना भूतान्यभिव्यैख्यद्व्याकरोत् । (किमिहान्यं वावदिषदिति) " अर्थ— ' स जातः– जीवात्मना शरीरे प्रविष्टः– ' तो झालेला ह्मणजे जीवरूपानें शरीरांत प्रविष्ट झालेला ( ईश्वर ) ' भूतानि ( एव ) अभिव्यैख्यत् ' भूतांनाच ( अभि– आभिमुख्येन–तादात्म्येन ) अभिमुख्यत्वानें– तादात्म्यानें ( व्यैख्यत्–व्याकरोत् ) व्यक्त जाणता झाला ( व भूतांनाच

१. स्वस्थ झोंप घेणें व लवकर जागा न होणें, या आवसथांतील गुणाचें साम्य नेत्रादि स्थानांशीं आहे. म्हणून त्यांना गौणवृत्तीनें आवसथ म्हटलें आहे.

तादात्म्यानें बोलला. ह्मणजे मी मनुष्य आहें, काणा आहें, सुखी आहें, इत्यादि प्रकारें देह, इंद्रियें व अंतःकरण याच्या मनुष्यत्व, काणत्व व सुखित्व या धर्मांचा आपल्यावर तादात्म्याध्यास करून बोलला, याविषयीं ' या जीवात्मरूपानें प्रवेश करून मी नाम व रूप यांस व्यक्त करतों ' अशी छान्दोग्य श्रुतिही आहे )

( अहो पण आत्मा शरीरेंद्रियसमूहाहून पृथक् आहे, असें ज्ञान झाल्यावर, वर सांगितलेल्या प्रकारचा तादात्म्यभ्रम कोठून होणार? अशी आशंका घेऊन श्रुति ह्मणते– ) ' इह– ' या शरीरात ' अन्यं- ' व्यतिरिक्त-पृथक् आत्म्याला ' वावदिषत् किम्– ' बोलला काय? ( नाहीं तो जीव तसें बोलला नाहीं. इतकेंच नव्हे तर आत्मा शरीराहून अन्य आहे, व्यतिरिक्त आहे, हें त्याला कळलेंही नाहीं. ' वावदिषदिति ' येथील इतिशब्द 'यस्मात्' याअर्थी ह्मणजे हेत्वर्थी आहे. वास्तव त्याची योजना अशी करावी " ज्याअर्थी त्याला तें समजलें नाहीं त्याअर्थी तो भूतांना तादात्म्यानें स्पष्ट जाणता व बोलता झाला किंवा तो इतिशब्द येथें अध्यारोपप्रकरण संपलें, असें दाखविण्यासाठीं आहे आचार्यांच्या उपलब्ध भाष्यामध्यें श्रुतीचें शेवटचें वाक्य घेतलेलें नाहीं. ह्मणून आनंदगिरि ह्मणतात– "किमिहान्यं वावदिषदिति, हें वाक्य स्पष्टार्थ असल्यामुळें भाष्यकारानीं त्याची उपेक्षा केली. किंवा पुस्तकलेखकाच्या प्रमादामुळें तें राहून गेलें असावें. " यावरून आनंदगिरींच्या वेळींच तें भाष्यात नव्हतें असें होतें. )

१० ' स एतमेव० ' या वाक्याचं भाष्य.

( येणेंप्रमाणें अध्यारोप दाखवून त्याचा अपवाद करण्याकरितां ' स एतमेव पुरुषं ब्रह्मततममपश्यदिदमदर्शमितीइँ ' हें वाक्य आहे. वास्तव

१ किंवा मागच्या ' स जातो भूतान्यभि० ' या वाक्यापासूनच अपवादाला आरंभ झाला आहे, असें समजावें. याशीं वाक्ययोजना अशी करावी.– 'भूतानि व्याकरोत्– ' भूतांचें विवेचन करून त्यांना स्वतःची सत्ता आहे कीं नाहीं, असा विचार केला, आणि विचार केल्यावर आत्म्याव्यतिरिक्त स्वतःसत्ताक दुसरें कांहीं आहे, असें मी म्हणू तरी कसें? कारण आत्म्यावांचून दुसरें कांहीं आहे, असें मला दिसतच नाहीं, असा त्यानें निश्चय केला

भाष्यकार आतां त्याचें व्याख्यान करितात– ) " स कदाचित्परमकारुणिकेनाचार्येणात्मज्ञानप्रबोधकृच्छब्दिकायां वेदान्तमहावाक्यभेर्यां तत्कर्णमूले ताड्यमानायामेतमेव सृष्ट्यादिकर्तृत्वेन प्रकृतं पुरुषं–पुरिशयानं आत्मनं ब्रह्म–बृहत्, ततमं– तकारेणैकेन लुप्तेन तततमं व्याप्ततमं परिपूर्णमाकाशवत्प्रत्यबुध्यतापश्यत् । " अर्थ— ( वर सांगितल्याप्रमाणें शरीरांत प्रवेश करून संसारी जीव झालेला ) तो एकादे-वेळीं अतिदयाळु आचार्यांनें आत्मज्ञानाचा उत्तम बोध करणारा उत्तम शब्द जिला आहे अशी वेदान्तमहावाक्यरूप दुंदुभि त्याच्या कर्णमूलाशीं ( कानांशीं ) वाजविली असतां याच ह्म० सृष्ट्यादिकांचा कर्ता ह्मणून ज्याचें वर्णन आरंभिलें आहे, त्याच पुरुषास–शरीररूप पुरींत राहणाऱ्या आत्म्याला ' ब्रह्म– ' बृहत् ( मोठें ) ' ततमं– ' या शब्दांतील एक तकार लुप्त झाला आहे. वास्तव त्यास ' तततमं– ' अतिशय व्याप्त आकाशाप्रमाणें परिपूर्ण जाणता झाला, पहाता झाला. ( तो आत्मा सर्वव्यापी आकाशासारखा पूर्ण आहे, असें जाणता झाला. ' आचार्यवान् पुरुषो वेद ' ह्मणजे ज्याला विद्येचा बोध करणारा आचार्य असतो तोच पुरुष आत्म्याला जाणतो, अशी श्रुति असल्यामुळें विद्योपदेशक आचार्यांवांचून आपोआप वाक्यार्थ-बोध होत नाहीं. हें सुचविण्यासाठीं ' परम दयाळु आचार्यानें ' असें ह्मटलें आहे. सर्व उपनिषत्कांड ह्मणजे सर्व उपनिषदांचा समुदाय दुंदुभीच्या स्थानीं असून त्यांतील ' तत्त्वमसि ' इत्यादि महावाक्यें हा त्यांचा प्रबोध करणारा शब्द आहे. मस्तकसंबंधी नाडीनें प्रवेश करून शरीररूप पुरांत राहणाऱ्या आत्म्याला ' हा आत्मा ब्रह्म आहे, ' असें जें त्यानें जाणलें तें परोक्ष जाणलें कीं काय, असा प्रश्न करून कृतार्थता व्यक्त करणाऱ्या त्याच्याच वाक्यानें त्या ज्ञानाचें अपरोक्षत्व सांगतात– ) " कथं, इदं ब्रह्म ममात्मनः स्वरूपमदर्शं दृष्टवानस्मि । अहो इति विचारणार्था प्लुतिः पूर्वम् । " अर्थ— तो आत्म्याला परिपूर्ण कसें जाणतां झाला ? ( परोक्ष कीं अपरोक्ष ? ) हें ब्रह्म–बृहत् तत्त्व माझ्या आत्म्याचें स्वरूप आहे, असें मीं पाहिलें आहे.–

' इतीँ३ ' हा प्लुत स्वरान्त शब्द 'अहो' याअर्थी आहे. ' विचारणार्थी प्लुतिः पूर्वं ' या वाक्यानें विचार करणें या अर्थी प्लुत स्वराचें विधान केलें आहे ( त्या प्लुतीनें ब्रह्म यथार्थत जाणलें, कीं नाहीं, असा विचार करून व चागल्याप्रकारें जाणलें, असा निश्चय करून ' इति– ' अहो, या शब्दानें स्वत चें कृतार्थत्व प्रकट केलें आहे )

११ तस्मादिदन्द्रो० या श्रुतिवाक्याच व्याख्यान

(' इदद्र ' या नावावरूनही त्याला अपरोक्षज्ञान झालें, असें ठरतें, असें सागण्यासाठीं ' तस्मादिदन्द्रो नामेदन्द्रो ह वै नाम तमिदन्द्र सन्तमिन्द्र इत्याचक्षते परोक्षेण । ' हें श्रुतीचें वाक्य आहे. आचार्य त्याचें व्याख्यान करितात– ) "यस्मादिदमित्येव यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म सर्वान्तरमपश्यदपरोक्षेण तस्मादिद पश्यतीतीदन्द्रो नाम परमात्मा ।" अन्वय– यस्मात् यत् साक्षात् अपरोक्षात् सर्वान्तर ब्रह्म तत् इद इत्येव अपरोक्षेण अपश्यत्, तस्मात् इद पश्यति इति इदन्द्र. नाम परमात्मा । अर्थ–ज्याअर्थी, जें साक्षात् अपरोक्ष व सर्वांच्या अत करणात असणारें ब्रह्म तें ' हें ' अशा प्रकारें अपरोक्षपणें पाहता झाला, त्याअर्थी ' इद पश्यति ' म्हणून ' इद द्र ' या नावाचा परमात्मा. ( म्हणजे साक्षात् ज्ञानाचा विषय होतो म्हणून तो इदंद्र सर्वांतर ब्रह्म ' इद–हें ' अशा रीतीनें नित्य अपरोक्ष असलेला प्रत्यगात्मा आहे, असें तो जीव विचारानतर पाहता झाला, असा भावार्थ. ) " इदन्द्रो ह वै नाम प्रसिद्धो लोक ईश्वर ।" अर्थ–तो इदन्द्रच लोकांमध्यें ईश्वर या नावानें प्रसिद्ध आहे. ( अहो ' इन्द्रो मायाभि पुरुरूप० ' इत्यादि श्रुतींत ईश्वर ' इद ' या नावानें प्रसिद्ध आहे. ' इदद्र ' या नावानें तो कोठेंच प्रसिद्ध नाहीं, असें कोणी विचारील म्हणून सांगतात– ) " तमेव मिदन्द्र सन्तमिन्द्र इति परोक्षेण परोक्षाभिधानेनाचक्षते ब्रह्मविदः सव्यवहारार्थ । " अर्थ–' एवं इदन्द्र सन्त तं ' याप्रमाणें इदद्र असलेल्या

[illegible] 'ब्रह्मविद परोक्षेण–परोक्षाभिधानेन इन्द्र इति सव्यवहारार्थ आ[illegible]

क्षते–' ब्रह्मवेत्ते परोक्षानें–परोक्ष नांवानें इंद्र असें चांगल्या व्यवहारासाठीं ह्मणतात. ( वस्तुतः इदन्द्रच. पण त्याच्या परोक्षत्वाकरितां त्यांतील 'द्' या अक्षराचा लोप करून ' इन्द्र ' असें ह्मणतात, असा मावार्थ. आतां तसें करण्याचें प्रयोजन सांगतात.– ) " पूज्यतमत्वात्प्रत्यक्षनामग्रहणभयात् ।" अर्थ–तो पूज्यतम–अतिशय पूज्य असल्यामुळें त्याचें प्रत्यक्ष नाम घेतल्याचा दोष घडेल, या भयानें ( ते परोक्ष नांव घेतात. )

## १२ ' परोक्षप्रिया० ' इत्यादि वाक्याचें भाष्य.

( ' परोक्षप्रिया इव हि देवाः परोक्षप्रिया इव हि देवाः । ' असें या खंडाचें व अध्यायाचें शेवटचें वाक्य आहे. त्याचें व्याख्यान करितात. पूज्यांचें नांव परोक्षच घ्यावें, याविषयीं येथें प्रमाण सांगितलें आहे.– ) " तथा हि परोक्षप्रियाः परोक्षनामग्रहणप्रिया इव ह्येव हि यस्माद्देवाः। किमु सर्वदेवानामपि देवो महेश्वरः । द्विर्वचनं प्रकृताध्यायपरिसमाप्त्यर्थम् । " अर्थ–कारण देव( पूज्य ) परोक्षप्रिय आहेत. ह्मणजे परोक्ष नांव घेणें त्यांना आवडतें; ( पूजकांनीं आपलें प्रत्यक्ष नांव न घेतां परोक्ष घ्यावें, असें पूज्यांना वाटतें. त्यांना ही गोष्ट प्रिय असते. ह्मणूनच आचार्य, उपाध्याय इत्यादि नांवें लोकांना आवडतात. देवदत्त, विष्णुमित्र इत्यादि त्यांचीं त्यांचीं लौकिक नांवें आवडत नाहींत आणि सामान्य पूज्यांचीही जर अशी स्थिति आहे, तर ) मग सर्व देवांचाही देव जो महेश्वर त्याविषयीं काय सांगावें ! ( नांवाचें परोक्षत्व ह्मणजे यथार्थ नांवामध्यें कांहीं बदल करून मूळ नांवाचें स्वरूप झांकून टाकणेंच आहे. असो येथें ' परोक्षप्रिया इव हि देवाः ' या वाक्याची द्विरुक्ति, या अध्यायाची समाप्ति झाली, हें सुचविण्यासाठीं आहे.

येथें ऐतरेयोपनिषद्भाष्यार्थाचा तिसरा खंड व दुसऱ्या आरण्यकाचा चवथा अध्याय समाप्त झाला.

---

१ चवथ्या आध्ययाचा प्रतिपाद्य विषय.

( आता भाष्यकार पाचव्या अध्यायाच्या व्याख्यानाला आरंभ करण्यापूर्वी चवथ्या अध्यायांत येऊन गेलेल्या अनेक विषयातील मुख्य प्रतिपाद्य विषय कोणता तें अगोदर सागतात. १ आत्म्याचें एकत्व, २ लोक व लोकपाल यांची सृष्टि, ३ अशनाया व पिपासा याची योजना, ४ शरीराची व अन्नाची उत्पत्ति, ५ देवताचा शरीरप्रवेश, ६ अशनाया व पिपासा याना देवताचें भागीदार करणें, हे विषय वर आले आहेत. पण ते सर्वच या उपनिषदाचे किंवा या अध्यायाचे प्रतिपाद्य आहेत, असें ह्मणता येत नाहीं. ह्मणून आचार्य त्याविषयीं सविस्तर विचार आरभितात-) "अस्मिश्चतुर्थाध्याय एष वाक्यार्थो (विवक्षितः)" अर्थ-या चवथ्या अध्यायांत हा वाक्यार्थ ( विवक्षित ) आहे. ( यावरून हा सर्व भाष्यभाग चवथ्या अध्यायाच्या समाप्तीपूर्वीच उपसहाररूपानें असावयास पाहिजे होता, असें वाटतें. पण अनेक प्रतींवरून शुद्ध करून छापलेल्या आनदाश्रमातील पुस्तकांत तो पाचव्या अध्यायाच्या आरंभीं घातला आहे. ह्मणून आह्मींही येथें तशीच योजना केली आहे. असो, हा ह्मणजे 'सर्व शरीरात एकच आत्मा आहे व तोच परमेश्वर आहे,' असा पुढें निश्चित केलेला सिद्धान्त. या वाक्यात 'विवक्षितः' ह्मणजे सागावयास इच्छिलेला, प्रतिपाद्य, हा शब्द अधिक घालावा पण हाच अर्थ विवक्षित आहे, ह्मणून कशावरून? अशी शंका घेऊन 'पूर्व संदर्भ पाहिला असता तोच विवक्षित अर्थ आहे, असा निश्चय होतो, ह्मणून' असें उत्तर सांगतात-) "जगदुत्पत्तिस्थितिप्रलयकृदसंसारी सर्वज्ञः सर्वशक्तिः सर्ववित्सर्वमिदं जगत्स्वतोऽन्यद्वस्त्वन्तरमनुपादायैवाकाशादिक्रमेण सृष्ट्वा स्वात्मप्रबोधनार्थं सर्वाणि च प्राणादिमच्छरीराणि स्वयं प्रविवेश।" अर्थ-जगाची उत्पत्ति, स्थिति व प्रलय करणारा असंसारी, सर्वज्ञ, सर्वशक्ति, सर्ववेत्ता, 'स्वतः अन्यत् वस्त्वन्तरं अनुपादाय एव आकाशादिक्रमेण इदं सर्वं जगत् सृष्ट्वा-' आपल्याहून निराळी दुसरी वस्तु न घेतांच आकाश, वायु इत्यादि क्रमानें हें सर्व

जगत् निर्माण करून स्वात्म्याचाही प्रबोध व्हावा, ह्मणून प्राणादिकांनीं युक्त असलेल्या सर्व शरीरांत तो स्वतः शिरला. ( मूळ उपनिषदांत लोक, लोकपाल व अन्न यांची उत्पत्तिच सांगितली आहे. पण 'माझ्यावांचून हें कसें राहूं शकेल ?' असा विचार करून त्यानें त्यांत प्रवेश केला, असें मुळांत वर्णन असल्यामुळें स्थितीचीही कल्पना होते आणि उत्पत्ति व स्थिति यांचा बोध झाला कीं, अर्थात् प्रलयाचीही कल्पना होते. ह्मणून भाष्यांत 'उत्पत्ति-स्थिति-प्रलयकृत्' असें ह्मटलें आहे. वर लोकपालादिकानाच भोक्तृत्व सांगितलेलें असल्यामुळें येथें भाष्यांत 'असंसारी' असें ह्मटलें आहे. सामान्यतः ( साक्षिरूपानें ) सर्व जाणतो ह्मणून 'सर्वज्ञ' व विशेषतः सर्वप्रकारें ( प्राण्यांच्या अंतःकरणवृत्तींच्या द्वारा ) सर्व जाणतो ह्मणून 'सर्ववित्'. 'सृष्ट्वा' शब्दापर्यंत 'जगत् हें आत्म्याचें कार्य असल्यामुळें त्याहून प्रथक् नाहीं,' असें सांगून तो स्रष्टा आत्मा प्रत्यगात्म्याहूनही अभिन्न ( अपृथक्, एकरूप) कसा, तें 'स्वात्मप्रबोधनार्थं०' इत्यादि पुढील शब्दांनीं सांगितलें आहे.)

( सर्व प्राणादिमान् शरीरांत त्यानें स्वतः प्रवेश केला, या एवढ्याच सांगण्यानें त्यांचा अभेद सिद्ध होतो, असें नाहीं. तर अभेदज्ञानाविषयीं मुळांतच वर्णन असल्यामुळें त्याची सिद्धि होते, असें ह्मणतात-) "प्रविश्य च स्वमात्मानं यथाभूतमिदं ब्रह्मास्मीति साक्षात्प्रत्यबुध्यत।" अर्थ—आणि त्यांत प्रवेश करून यथार्थ स्वात्म्याला हें ब्रह्म मी आहें, असें साक्षात् जाणता झाला. "तस्मात्स एव सर्व शरीरेष्वेक एवात्मा नान्य इति।" अर्थ—तस्मात् तोच सर्व शरीरांत एकच आत्मा आहे, दुसरा नाहीं, असा ( वाक्यार्थ येथें विवक्षित आहे. अर्थात् ज्यापेक्षां सर्व शरीरांत एकाचाच प्रवेश सांगितला आहे, आणि ज्यापेक्षां प्रविष्ट झालेल्या त्याचें ब्रह्मत्वानें ज्ञान होतें, असें सांगितलें आहे, त्यापेक्षां सर्व शरीरांत एकच आत्मा आहे व तो सर्वज्ञ ईश्वर आहे, त्याहून अन्य नव्हे, हा वाक्यार्थ या अध्यायांत विवक्षित आहे, असा या वाक्याचा पूर्व वाक्याशीं संबंध. )

('सम आत्मेति विद्यात्' हा संहितोपनिषद्दातील वाक्याशहीं हाच अर्थ सांगत आहे, असें सांगतात–) "अन्योऽपि सम आत्मा ब्रह्मास्मीत्येव विद्यादिति।" अर्थ—दुसराही संहितामंत्र 'सम म्हणजे सर्वभूतांमध्यें एक आत्मा ब्रह्म मी आहें, असें जाणावें,' असें सांगतो (सर्व प्राण्यांत असणारा एक सर्वव्यापी आत्माच मी आहे, शरीरादि मर्यादित वस्तु नव्हे, असें जाणावें)

(असो, 'स ईक्षत०' इत्यादि वाक्यसंदर्भावरून असा अर्थ प्रतीत होतो, असें येथवर सांगितलें आता उपक्रम व उपसंहार, यावरूनही हाच अर्थ कसा प्रतीत होतो, त सांगतात–) "आत्मा वा इदमेक एवाग्र आसीदिति 'ब्रह्म ततममपश्यत्' इति चोक्तम्।" अर्थ– 'उत्पत्तीच्या पूर्वी हें जगत् एक आत्माच होता,' असें व 'ब्रह्म अतिशय व्यापून राहिलेलें पाहता झाला,' असें म्हटलें आहे. (तसेंच छान्दोग्यात 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' 'तदेतद्ब्रह्मापूर्वं' इत्यादि वाक्यामध्यें अद्वितीयत्व सांगितलें आहे, असें सांगतात–) "अन्यत्र च।" तसेंच दुसऱ्या उपनिषदांतही सांगितलें आहे.

## २ प्रवेशवाक्यावरून आत्म्याच्या एकत्वाची सिद्धि होते, याविषयीं आक्षेप

('स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत' (पृष्ठ १२१ पहा) या वाक्यांत स्रष्ट्यानेंच शरीरांत प्रवेश केला, असें सांगितलें आहे आणि त्यावरून जीव व ईश्वर यांचें ऐक्य आहे, असें ठरतें, असा तुमच्या म्हणण्याचा अभिप्राय दिसतो पण तो अयथार्थ असल्यामुळें अयोग्य आहे, अशी शंका घेतात–) "सर्वगतस्य सर्वात्मनो बालाग्रमात्रमप्यप्रविष्टं नास्तीति कथं सीमानं विदार्य प्रापद्यत पिपीलिकेव सुषिरम्।" अर्थ—सर्वगत सर्वात्म्याचें अप्रविष्ट असें केसाच्या अग्रा एवढेंही कांहीं नाहीं (म्हणजे सर्ववस्तूंमध्यें ओतप्रोत भरलेल्या सर्वात्म्यानें ज्यांत प्रवेश केलेला नाहीं, असें या जगांत कांहीं नाहीं, अणुरेणू एवढाही भाग त्याच्यावांचून नाहीं) 'इति–' यास्तव तो आत्मा (स्रष्टा) 'पिपीलिका सुषिरं

इव सीमानं विदार्य कथं प्रापद्यत–' एखादी मुंगी जशी बिळात शिरते, त्याप्रमाणें मस्तकावरील केंसांच्या विभागाचा शेवट जेथें होतो त्या स्थानास छिद्र पाडून आत कसा शिरला ? (अर्थात् शरीररहित असलेल्या त्याला विदारण कसें करितां आलें ? त्याचप्रमाणें सर्वगत–सर्वव्यापी आत्म्याचा शरीरांत प्रवेश होणेंही संभवत नाहीं.)

३ पण असे असंगत अर्थ, या अध्यायांत अनेक आहेत, असें सिद्धान्त्यांचें ह्मणणें

(अहो पण नुसत्या शब्दावरून प्रतीत होणारा अर्थ असंगत आहे, असें ह्मणता की विचारपूर्वक निश्चित केलेला विवक्षितार्थही असंगत आहे, असें तुमचें ह्मणणें आहे ? यातील पहिला पक्ष घेतल्यास चवथ्या अध्यायातील शब्दावरून प्रतीत होणारे सर्वच अर्थ असंगत आहेत, असें होतें व त्यामुळें ते सर्वच अप्रमाण ठरतात पण वेदार्थ अप्रमाण आहे, असें ठरणें युक्त नव्हे, अशा अभिप्रायानें सिद्धान्ती ह्मणतात– ) "नन्वत्यल्पमिदं चोद्यं बहु चात्र चोदितव्यम् । अकरण सन्नीक्षतानुपादाय किंचिल्लोकान-सृजताद्भ्य पुरुषं समुद्धृत्यामूर्च्छयत् । तस्याभिध्यानान्मुखादि निर्भिन्न मुखादिभ्यश्चाग्न्यादयो लोकपालास्तेषां चाशनायापिपासा-दिसंयोजनं तदायतनप्रार्थनं तदर्थं गवादिप्रदर्शनं तेषां यथायतनप्रवेशनं सृष्टस्यान्नस्य पलायनं वागादिभिस्तज्जिघृक्षा, एतत्सर्वं सीमाविदारणप्रवेशसममेव ।" अर्थ– अहो पण हा आक्षेप अगदींच अल्प आहे या अध्यायात तसें आक्षेपार्ह पुष्कळच आहे. ( कसें तें पहा– ईक्षण ह्मणजे पाहणें, ते चक्षुःप्रभृति इंद्रियानींच होतें, हे प्रसिद्ध आहे पण ) तो 'अकरण सन् ईक्षत–' इंद्रियरहित असूनही पाहता झाला, ( असें येथें ह्मटलें आहे. त्याचप्रमाणें ज्याच्या पाशीं मृत्तिका, काष्ठ इत्यादि उपादान कारण असतें तोच घट, स्तंभ इत्यादिकांचा स्रष्टा होतो, असेंही आपण पाहतों, पण येथें तर ) 'अनुपादाय किंचित् लोकान् असृजत– ' कोणत्याही प्रकारचें उपादान ( द्रव्य ) न घेतां लोकांना उत्पन्न करता झाला, ( असें

ह्मटलें आहे. आपण आपल्या हातांनींच पदार्थांना वर उचलतों, वर काढतों व हातांनींच त्याला चापून–चोपून इष्ट आकार देतों. पण शरीररहित असलेला तो ) ' अद्भ्यः पुरुषं समुद्धृत्य अमूर्च्छयत्– ' जलांपासून पुरुषाकार पिंडाला वर काढून अवयवयुक्त करता झाला, ( असें जें येथें ह्मटलें आहे तेंही असंगत आहे. शस्त्रादि मूर्त पदार्थांच्या योगानेंच छिद्रें पाडतां येतात, अमूर्त चिंतनानें तीं कोठें कधीं पडत नाहींत, यास्तव ) ' तस्य अभिध्यानात् मुखादि निर्भिन्नं– ' त्याच्या चिंतनामुळें त्या पुरुषाकार पिंडाला मुखादि गोलकछिद्रें झालीं, ( हें ह्मणणें अयोग्य आहे. ) ' मुखादिभ्यश्चाग्न्यादयो लोकपालाः ' मुखादिकांपासून अग्निप्रभृति लोकपाल ( झाले, हें जर खरें आहे, तर त्यांनीं मुखादिकांना जाळलें कसें नाहीं ) ' तेषां चाशनायापिपासादिसंयोजनं– ' त्या देवतांचें अशनाया व पिपासा यांच्याशीं संयोजन, ( संयोग करतां येणें शक्य नाहीं. कारण मूर्त–साकार पदार्थाचाच दुसऱ्या साकार पदार्थाशीं संयोग करतां येतो. पण अशनाया–पिपासा अमूर्त आहेत. ) ' तदायतनप्रार्थनं– ' त्या देवतांनीं भोगाचें आयतन–स्थान–शरीर, याविषयीं प्रार्थना करणें, ( शक्य नाहीं. कारण शरीर उत्पन्न होण्यापूर्वी प्रार्थना कशी करतां येईल ? त्यावेळीं गाय, घोडा, इत्यादिकांचीं शरीरें नव्हतीं. त्याचप्रमाणें स्वतः स्रष्टा सशरीर नव्हता. त्यामुळें त्याला ) ' तदर्थं गवादिप्रदर्शनं– ' आयतनाकरितां गाय इत्यादिकांचीं शरीरें आणून दाखविणें ( संभवत नाहीं. ) ' तेषां यथायतनप्रवेशनं– ' त्यांचा त्यांच्या त्यांच्या स्थानीं प्रवेश करविणें, ( हें मुद्दां अशक्य आहे. कारण शरीररहित असलेल्या व त्यामुळेंच अमूर्त, अशा देवतांचा प्रवेश करविणें अयोग्य आहे. ) ' सृष्टस्य अन्नस्य पलायनं ' उत्पन्न केलेल्या अन्नाचें पलायन ( सर्वथा अशक्य. कारण अन्न अचेतन आहे. ) 'वागादिभिः तज्जिघृक्षा–' वागादि इंद्रियांनीं त्याचें ग्रहण करण्याची इच्छा सुद्धां सुसंगत नाहीं. कारण वागादिकांना हस्तादिकांप्रमाणें वस्तूंचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य नसतें. यास्तव ) ' एतत् सर्वं सीमविदारणप्रवेश-

सर्म एव– ' हें सर्व सीमाभागास छिद्र पाडणें व त्यात प्रवेश करणें, यासारखेंच आहे

## ४ सर्वच अप्रमाण आहे, असें एकदेशी मत व त्याचें निरसन

( असें जर असेल तर हें सर्व उपनिषद्च अप्रमाण आहे, असेंच समजलें पाहिजे, अशी कोणी शंका घेतो– ) " अस्तु तर्हि सर्वमेवेदमनुपपन्नं । " अर्थ–– तर मग हें सर्वच अयुक्त असो, ( हें सर्वच वर्णन अशक्य व असंभवनीय आहे, असें समजावें, असा पूर्वपक्ष झाला असता आचार्य ह्मणतात– ) " न । अत्रात्मावबोधार्थमात्रस्य विवक्षितत्वात्सर्वोऽयमर्थवाद इत्यदोषः । " अर्थ–– असें नाहीं. या अध्यायात केवळ *आत्म्याचा अवबोध ( ज्ञान ) विवक्षित असल्यामुळें वरील सर्व वर्णन हा* अर्थवाद आहे यास्तव त्यात काहीं एक दोष नाहीं ( एकाद्या खऱ्या ब्राह्मण पित्यानें बाजरातील अशुद्ध ( मदिरा, सुरा इत्यादि ) पेय पिणाऱ्या पुत्राला ' ते करण्यापेक्षा विष पी, ' असें ह्मणणें किंवा ' स प्रजापतिरात्मनो वपामुदक्खिदत्– ' तो प्रजापति आपली वपा बाहेर काढता झाला इत्यादि, या लौकिक व वैदिक वाक्याचे वाच्य अर्थी प्रामाण्य जरी नसलें तरी पुत्रानें अशुद्ध पेय पिऊ नये, इत्यादि विवक्षित अर्थी प्रामाण्य नाहीं, असें कधीं होत *नाहीं त्याचप्रमाणें विवक्षित अर्थ असंगत आहे, असेंही नाहीं, अशा अभि-* प्रायानें भाष्यकारानीं वरील विकल्पातील दुसऱ्या ह्मणजे ' विवक्षित अर्थी असंगति ' या कोटीला दूषित केलें आहे

व्यवहारात स्वत च द्वार करून अनेक गृहामध्यें प्रवेश करणाऱ्या एकाद्या पुरुषाचें एकत्व अनुभवास येतें, ह्मणजे एकच पुरुष अनेक गृहात शिरू शकतो त्याप्रमाणेंच आत्म्याचें एकत्व आहे, असा बोध करण्यासाठीं विदारण व प्रवेश सांगितला आहे पण तो अर्थ विवक्षित नाहीं. ह्मणजे तोच या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय नाहीं त्या अर्थामध्यें या प्रकरणाचें तात्पर्य नाहीं तर या अध्यायाचा विवक्षित अर्थ असा जो आत्मैकत्वबोध

त्याचें द्वार, (उपाय) ह्मणून सीमविदारण, प्रवेश इत्यादि अर्थ सांगितलेले आहेत. यास्तव प्राशस्त्य या अर्थाचें द्वार ह्मणून सांगितलेल्या प्रजापतीच्या वपोत्खननाप्रमाणें तो अर्थवाद आहे.

अर्थवादाचें लक्षण नैयायिक 'विधिभिन्न शब्दः अर्थवादः' किंवा 'विधिनिषेधभिन्न शब्द अर्थवाद' असें करितात– पण मीमांसक 'प्राशस्त्यनिन्दान्यतरपर वाक्य अर्थवादः' असें ह्मणतात प्रशंसा किंवा निंदा यातील एकादें करणारें जें वाक्य, तो अर्थवाद त्यांत विहिताची प्रशंसा व निषिद्धाची निंदा केलेली असते अशा प्रकारचा अर्थवाद तीन प्रकारचा असतो १ गुणार्थवाद २ अनुवाद व ३ भूतार्थवाद ज्या स्तुतिवाक्याचा किंवा निंदावाक्याचा अर्थ प्रत्यक्षप्रमाणानीं सिद्ध होणाऱ्या अर्थाच्या विरुद्ध असतो, त्यातील विवक्षित गुणाचाच तेवढा अंगीकार करावयाचा असल्यामुळे तो गुणार्थवाद होय जसें–' आदित्यो यूप ' हा सूर्य यूप (स्तंभ) आहे प्रत्यक्षादि प्रमाणानीं निश्चित झालेल्या अर्थाचाच ज्या अर्थवादांत उल्लेख केलेला असतो त्याला अनुवाद ह्मणावें जसें–' अग्निर्हिमस्य भेषज–' अग्नि हा थंडीचें औषध आहे प्रत्यक्षाशीं विरुद्ध नसलेल्या व अनुवादरूपही नसलेल्या अर्थाला भूतार्थवाद ह्मणतात जसें–' इन्द्रो वृत्राय वज्रमुदयच्छत्–' इंद्र वृत्राकरिता (त्याला मारण्यासाठीं) वज्र वर उचलता झाला यातील पहिल्या दोन अर्थवादांना स्वतःप्रामाण्य नसतें. ह्मणजे त्यावरून व्यक्त होणाऱ्या अर्थामध्ये त्यांचं तात्पर्य नसतें कारण तें असतें, असें ह्मटल्यास प्रत्यक्षविरोध व सिद्धसाधनता किंवा पुनरुक्ति हा दोष येतो पण तिसऱ्या प्रकारच्या अर्थवादाला स्वतःप्रामाण्य असतें कारण त्यांतील अर्थ प्रत्यक्ष किंवा इतर प्रमाण यांनीं सिद्ध नसल्यामुळें त्याचा त्याच्याशीं विरोध येत नाहीं इंद्रानें वृत्राला मारण्यासाठीं वज्र उचलले, ही गोष्ट श्रुती वाचून दुसऱ्या कोणत्याही प्रमाणानें ज्ञात होत नाहीं त्यानें तें उचललें नाहीं, असें सिद्ध करणारें दुसरें प्रमाणही नाहीं यास्तव असले भूतार्थवाद स्वार्थी प्रमाण असून शिवाय विधींशीं एकवाक्यता पावतात

असो; या न्यायानें असत् प्रवेशादिकांचेंच कथन केलें आहे, असें मानून तो वपोत्खननाप्रमाणें गुणार्थवाद आहे, असें वरच्या भाष्य, वाक्यांत सांगून ' अग्निर्हिमस्य भेषजं ' इत्यादि वाक्याप्रमाणें या येथील वर्णनालाही अनुवादत्व आहे असें मानून भाष्यकारें ह्मणतात– ) " मायाविवच्चा महामायावी देव सर्वज्ञः सर्वशक्तिः सर्वमेत्त्वकार । ' अर्थ—अथवा लौकिक मायाव्या ( गारुड्या- )प्रमाणें महामायावी, सर्वज्ञ' सर्वशक्ति देव हें सर्व करता झाला. ( मायेच्या योगानें सर्व अघटितही होऊं शक्तें कारण अघटित घटना करणें, हेंच मायेचें लक्षण आहे. असो, साराश ' सृष्ट्यादिकाना अघटितार्थत्व असल्यामुळें गंधर्वनगरादिकांप्रमाणें मृषात्वच आहे, ' हें स्पष्ट करण्यासाठीं श्रुतीनें अघटित सृष्ट्यादिकांचेंही वर्णन केलें आहे. )

( अहो पण आत्म्याचा अवबोधच जर येथें विवक्षित असेल तर त्याचेंच साक्षात् वर्णन करणें उचित आहे हा बाकीचा वृथा प्रपञ्च कशाला हवा, असें कोणी ह्मणेल ह्मणून आचार्य ह्मणतात– ) " सुखावबोधन प्रतिपत्त्यर्थ लोकवदाख्यायिकादिप्रपञ्च इति युक्ततर' पक्ष । " अर्थ– सुखानें– अनायासानें अवबोधन व सुखानें प्रतिपादन ( ह्मणजे श्रोत्याला अनायासानें बोध व्हावा व वक्त्याला अनायासानें आत्म्याचें प्रतिपादन) करिता यावें, ह्मणून लोकाप्रमाणें ( व्यवहारज्ञ लोकांप्रमाणें ) आख्यायिकादिप्रपंच केला आहे, हा अतिशय युक्त पक्ष आहे.

( 'अहो पण लोकाची सृष्टि, लोकपालांची उत्पत्ति इत्यादि गोष्टी दुसऱ्या कोणत्याही प्रमाणानें सिद्ध नाहींत. त्यामुळें त्या अपूर्व होत. यास्तव येथील कथेचें तात्पर्य त्या सृष्ट्यादिकाच्या प्रतिपादनातच आहे,' असें कोणी ह्मणेल ह्मणून आचार्य,- ' न हि ' इत्यादि भाष्यानें 'तें वर्णन जरी अपूर्व असलें तरी त्याच्या ज्ञानानें कोणत्याहि प्रकारच्या फलाचा लाभ होत नाहीं व जो अर्थ अज्ञात व फलवान् असेल त्यांतच श्रुतीचें तात्पर्य असतें, असा नियम आहे कारण तसा नियम जर न मानला तर रुद्रो-

दनही ( एका अर्थवादात सांगितलेले रुद्राचें रडणेंही ) अपूर्व असल्यामुळें त्यातही श्रुतीचें तात्पर्य आहे, असें, ह्मणण्याचा प्रसंग येईल. यास्तव सृष्ट्या दिकामध्यें श्रुतीचें तात्पर्य नाहीं,' असें सांगतात- ) "न हि सृष्ट्याख्यायिकादिपरिज्ञानात्किंचित्फलमिष्यते। " अर्थ-सृष्टीविषयींची आख्यायिका इत्यादिकाचें सर्व प्रकारें ज्ञान झाल्यामुळें काहीं फळ मिळेल ही काहीं आशा नसते. (पण तेंच आत्मज्ञान झालें असतां फळ अनुभवास येतें. यास्तव आत्मपरच शास्त्र आहे, असें ह्मणणें युक्त होय, असें आता सांगतात- ) "ऐकात्म्यस्वरूपपरिज्ञानात्त्वमृतत्वं फलं सर्वोपनिषत्प्रसिद्धम्।" अर्थ-पण ऐकात्म्यस्वरूपाचें परिज्ञान झालें असतां त्यामुळें अमृतत्व हें फळ सर्व उपनिषदामध्यें प्रसिद्ध आहे. (ऐकात्म्य ह्मणजे एकात्मपणा, अमृतत्व ह्मणजे अमरत्व, मुक्ति, व 'सर्वोपनिषत्प्रसिद्धं' ह्मणजे सर्व उपनिषदादरून उत्तम प्रकारें सिद्ध झालेलें आहे. 'एतावदरे खल्वमृतत्वं,' 'तमेवं विद्वानमृत इह भवति' 'विद्वानमृतः समभवत्' इत्यादि श्रुतिवचनांवरून ज्ञानानें अमृतत्वप्राप्ति होते, ही गोष्ट उत्तम प्रकारें सिद्ध झाली आहे, असा भावार्थ. 'सम सर्वेषु भूतेषु-' या वाक्यानें ऐकात्म्य सांगून 'समं पश्यन्हि सर्वत्र' 'न हिनस्त्यात्मनात्मानं-' या श्लोकार्धांत ज्ञानानें अमृतत्व सांगितलें आहे, असें ह्मणतात- ) "स्मृतिषु च गीतायासु 'समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरं' इत्यादिना।" अर्थ—आणि तसेंच गीता व दुसऱ्याही स्मृती, यामध्यें 'समं सर्वेषु भूतेषु०' ह्मणजे सर्व भूतांमध्यें सम स्थित असलेल्या व विनाश पावणाऱ्या भूतामध्यें विनाश न पावणाऱ्या परमेश्वराला जो पहातो, इत्यादि वाक्यानीं अमृतत्व सांगितलें आहे. 'इत्यादिना' येथील आदिशब्दानें 'यज्ज्ञात्वामृतमश्नुते' या सारखीं गीतेंतील वचनें घ्यावीं व 'गीतासु' येथील आदरशब्दानें 'सोऽहं स च त्वं स च सर्वमेतदात्मस्वरूपं त्यज भेदमोहम्। इतीरितस्तेन स राजवर्यस्तत्याज भेदं परमार्थदृष्टिः' या वाक्यानें ऐकात्म्य सांगून 'स चापि जातिस्मरणाप्तबोधस्तत्रैव जन्मन्यपवर्गमाप' इत्यादि अमृतत्व सांगणारीं विष्णुपुराणांतील वचनें घ्यावीं यांचा अर्थ

असा-'तो परमात्माच मी, तोच तू व तोच हे सर्व आत्मरूप आहे यास्तव भेदाचा मोह सोड,' असें सांगितला गेलेला तो परमार्थदृष्टि राजश्रेष्ठ भेदाचा त्याग करता झाला तोही पूर्वजन्माच्या स्मरणानें ज्ञानवान् होऊन त्याच जन्मीं मोक्षास प्राप्त झाला )

### ५ आत्मैक्य हाच या अध्यायाचा अर्थ आहे, हा सिद्धान्त स्थिर करण्याकरिता आक्षेपपूर्वक विचार

( शंका- ) " ननु त्रय आत्मानो भोक्ता कर्ता संसारी जीव एकः सर्वलोकशास्त्रप्रसिद्धः । " अर्थ-- अहो पण आत्मे तीन आहेत भोक्ता, कर्ता, संसारी, जीव हा एक, तो सर्वलोक व शास्त्रें यांत प्रसिद्ध आहे ( जीव, ईश्वर व निर्विशेष ब्रह्म असे तीन आत्मे त्यांतील मी जीव आहें कर्ता आहें, अशाप्रकारें लौकिकांत व 'एष हि द्रष्टा स्रष्टा,' 'यजेत स्वर्गकाम' इत्यादि वेदवाक्यांत (शास्त्रांत) जो प्रसिद्ध आहे तो त्या तिघांतील एक तसाच स्वर्गादि लोक, देह इत्यादिकांना निर्माण करणें, या लिंगावरून जो सर्वज्ञ ईश्वर ज्ञात होतो तो दुसरा, असें आता सांगतात- ) " अनेक प्राणिकर्मफलोपभोगयोग्यानेकाधिष्ठानवल्लोकदेहनिर्माणेन लिङ्गेन यथाशास्त्रप्रदर्शितेन पुरप्रासादादिनिर्माणलिङ्गेन तद्विषयकौशलज्ञानवांस्तत्कर्ता तक्षादिरिवेश्वरः सर्वज्ञो जगतः कर्ता द्वितीयश्चेतन आत्मावगम्यते । " अर्थ--' पुरप्रासादादिनिर्माणलिङ्गेन तद्विषयकौशलज्ञानवान् तत्कर्ता तक्षादि इव- ' एकादें उत्तम पुर किंवा प्रासाद ( राजवाडा किंवा देवमंदिर ) इत्यादिकांस निर्माण करणें या लिंगावरून ( लिंग ह्मणजे अनुमानास कारण होणारा हेतु ) त्याविषयींच्या कौशलज्ञानानें संपन्न असणारा त्याचा तक्षा इत्यादि ( सुतार वगैरे ) कर्ता ज्ञात होतो त्याप्रमाणें अनेक-विचित्र प्राण्यांच्या विचित्र कर्मांच्या विचित्र फलाचा उपभोग घेण्यास योग्य, अशा अनेक अधिष्ठानांनीं ( विशेष स्थानांनीं ) युक्त असलेले लोक व देह यांस निर्माण करणें या शास्त्रांत जसें दाखविलें आहे तशा

लिंगावरून सर्वज्ञ ईश्वर जगाचा कर्ता ज्ञात होतो; तो दुसरा चेतन आत्मा होय ( जगाचा कर्ता सर्वज्ञ आहे, हें सुचविण्यासाठीं 'अनेक प्राणिकर्म०' इत्यादि विशेषण योजलें आहे 'यथाशास्त्रप्रदर्शितेन' ह्मणजे 'स इमाँल्लोकानसृजत' इत्यादि शास्त्रानें जसें दाखविलें आहे तशाप्रकारच्या लिंगानें. 'पुरप्रासादादि०' हा ईश्वरविषयक प्रस्तुत अनुमानातील दृष्टान्त आहे अचेतन प्रधान आपोआपच विचित्र जगाच्या आकारानें परिणाम पावतें, त्याचा दुसरा कोणी सर्वज्ञ अधिष्ठाता नाहीं, असें सांख्य ह्मणतात. यास्तव त्याचें निरसन करण्यासाठीं भाष्यात 'चेतन' असें ह्मटलें आहे. चेतन ज्याचा अधिष्ठाता नाहीं, अशा अचेतनाची स्वत प्रवृत्ति होते, असें कोठेंही दिसत नाहीं गाडीला घोडे किंवा बैल जोडावे तेव्हाच ती चालू लागते, आपोआप कधींही चालत नाहीं. यास्तव अचेतन प्रकृतीचा सर्वज्ञ चेतन अधिष्ठाता अवश्य मानावा लागतो असो, आता तिसरा आत्मा कोणता तें सांगतात—)

"यतो वाचो निवर्तन्ते नेति नेतीत्यादिशास्त्रप्रसिद्ध औपनिषदः पुरुषस्तृतीय.।" अर्थ— वाणी ज्याच्यापासून निवृत्त होतात ( ज्याला प्रकाशित करू शकत नाहींत ), हा मूर्त भूतप्रपंच आत्मा नव्हे, अमूर्त भूतवर्गही आत्मा नव्हे इत्यादि शास्त्रवचन उत्तम प्रकारें सिद्ध झालेला औपनिषद ( केवळ उपनिषद या प्रमाणावरूनच ज्ञात होणारा पुरुष हा तिसरा आत्मा आहे अशारीतीनें एका आत्म्याचेच रूपभेदामुळें भेद झाले आहेत, असें वादी सांगतो— ) "एवमेते त्रय आत्मानोऽन्योन्यविलक्षणा ।" अर्थ— याप्रमाणें हे तीन आत्मे परस्परविलक्षण आहेत (त्यांचे धर्म परस्परविरुद्ध असल्यामुळें ते अग्नि व हिम ( बर्फ ) याप्रमाणें भिन्न आहेत ' तत्र कथमेक एवात्माद्वितीयोऽसंसारीति ज्ञातुं शक्यते।' अर्थ— 'तत्र' मग असे असताना 'एक एव आत्मा अद्वितीयः असंसारी इति कथं ज्ञातुं शक्यते—' एकच आत्मा अद्वितीय व असंसारी आहे, हें कसें जाणता येणें शक्य आहे?

( सिद्धान्त— वर सांगितलेल्या तीन आत्म्यांतील जीवाचें कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादिकांमुळें तुह्मी जें विलक्षणत्व समजत आहां, ह्म जीव कर्ता, भोक्ता, इत्यादि असल्यामुळें तो ईश्वर व ब्रह्म याहून विलक्षण आहे, असें जें समजता तें असिद्ध आहे. कारण जीव प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, इत्यादि प्रमाणाचा विषय होत नसल्यामुळें तो भोक्तृत्वादि धर्मांचा आश्रय आहे, अशारीतीनें त्याचें ज्ञान होणें शक्य नाहीं. यास्तव इतराहून तो भिन्न आहे, असें ह्मणता येत नाहीं, अशा अभिप्रायानें भाष्यकार शंका करणाराला उलट विचारतात– ) " तत्र जीव एव तावत्कथं ज्ञायते । " अर्थ– पण त्या तीन प्रकारच्या आत्म्यांतील जीवच कसा आणला जातो ( तें अगोदर सांगा कारण त्याला ज्ञेयत्व नसल्यामुळें, तो ज्ञानाचा विषयच होणारा नसल्यामुळें ( निरवयव जीव इंद्रियजन्य ज्ञानाचा विषय होत नाहीं ) तो कर्तृत्वादि धर्मांनीं विशिष्ट आहे, अशा प्रकारचेंही त्याचें ज्ञान समजत नाहीं कारण जे सावयव पदार्थ इंद्रियजन्य ज्ञानाचे विषय होतात त्याच्याच धर्मांचा बोध होतो व त्यामुळें तो ज्ञेय पदार्थ अमुक अमुक धर्मांनीं विशिष्ट आहे, असें समजणें सुशक्य असतें पण जीव ज्ञेय नसल्यामुळें तो कर्तृत्वादिधर्मविशिष्ट आहे, असें कळणेंही अशक्य आहे )

( पण सिद्धान्त्याचा हा अभिप्राय न जाणल्यामुळें त्यानीं हा आपल्याला प्रश्नच केला आहे, असें समजून वादी ह्मणतो– ) " नन्वेव ज्ञायते श्रोता मन्ता द्रष्टाऽऽदेष्टा घोष्टा विज्ञाता प्रज्ञातेति । " अर्थ–अहो पण तो श्रोता ( श्रवण करणारा ), मन्ता ( मनन करणारा ), द्रष्टा (पाहणारा), आदेष्टा ( आज्ञा करणारा, वर्णात्मक शब्दोच्चार करणारा ), आघोष्टा ( मोठा घोष–ध्वनिरूप शब्द करणारा ), विज्ञाता ( विशेषत जाणणारा ), व प्रज्ञाता ( सर्वांहून अधिक जाणणारा ) आहे, असें श्रुतीवरून कळतें. ( ह्मणजे तो जीव ऐकणें, मनन करणें, इत्यादि क्रियांचा कर्ता आहे, असें श्रुति सांगते अर्थात् तो ज्ञेय नाहीं, असें ह्मणता येत नाहीं. )

(सिद्धान्ती— पण पूर्व वाक्यामध्यें 'स एषोऽश्रुतोऽमतोऽविज्ञान०' ह्मणजे तो हा अश्रुत ( कधीं न ऐकला गेलेला ), अमत ( कधीं न मनन केला गेलेला ), अविज्ञात ( कधीं न जाणला गेलेला ) इत्यादि प्रकारें त्याच्या विज्ञेयत्वाचा निषेध केला आहे. यास्तव श्रोता, मन्ता, इत्यादि पुढच्या वाक्यानें पूर्ववाक्याच्या विरुद्ध तो ज्ञेय आहे, असें ह्मणणें अयोग्य आहे, असें सागतात- ) " ननु विप्रतिषिद्धं ज्ञायते य श्रवणादिकर्तृत्वेनामतो मन्ताविज्ञातो विज्ञातेति च । " अर्थ— अहो पण 'यः श्रवणादिकर्तृत्वेन ज्ञायते स एव अमन, अविज्ञात. च इति (एतत्) विप्रतिषिद्धम्–' जो श्रवणादिकाचा कर्ता ह्मणून सांगितला जातो, तोच 'अमत व अविज्ञात' असें ह्मणणें हें अगदींच विरुद्ध आहे ( याप्रमाणें पूर्वोत्तरविरोध दाखवून आता दुसऱ्या श्रुतीशींही कसा विरोध येतो, तें दाखवितात– ) " तथा न मतेर्मन्तारं मन्वीथा न विज्ञातेर्विज्ञातारं विजानीया इत्यादि च । " अर्थ— त्याचप्रमाणें 'मते· मन्तार–' मनोवृत्तीच्या साक्षीचें मनन करू नये 'विज्ञाते विज्ञातार–' बुद्धिवृत्तीच्या विज्ञात्याला जाणण्याचा यत्न करूं नये, इत्यादि दुसऱ्या श्रुती आहेत ( इत्यादि येथील आदिपदानें 'अमतो मन्ता, अविज्ञातो विज्ञाता,' इत्यादि श्रुतिवचनांचा संग्रह करावा )

(पूर्ववादी–असा विरुद्ध अर्थ सागणाऱ्या दोन्ही प्रकारच्या श्रुतींना एकसारखेंच प्रामाण्य असल्यामुळें ह्मणजे त्या दोन्ही प्रकारच्या श्रुती आह्माला एकसारख्याच प्रमाण असल्याकारणानें त्याच्यामध्यें विरोध आहे, अशी कल्पना करणें, अयोग्य आहे यास्तव जीव प्रत्यक्षप्रमाणानें अविज्ञेय व लिंगावरून ज्ञेय आहे, असें तीं वाक्यें सागतात, अशी कल्पना करावी– असें ह्मणतो–) " सत्य विप्रतिषिद्ध यदि प्रत्यक्षेण ज्ञायेत सुखादिवत् । प्रत्यक्षज्ञान च निवार्यते न मतेर्मन्तारमित्यादिना । ज्ञायते तु श्रवणादिना तत्र कुतो विप्रतिषेध । " अर्थ—खरें आहे, 'यदि सुखादिवत् प्रत्यक्षेण ज्ञायेत तर्हि विप्रतिषिद्धम्–' जर सुखादि अत करणधर्मा-

प्रमाणें जीव प्रत्यक्षप्रमाणानें ज्ञात झाला असता तर श्रुतीचें वर्णन विरुद्ध झालें असतें. पण 'न मतेर्मन्तारं०' इत्यादि वाक्यानें त्याच्या प्रत्यक्ष ज्ञानाचें निवारण केलें जातें व श्रवणादि (ऐकणें इत्यादि) लिंगांवरून तो ज्ञात होतो, तेव्हां विरोध कोठचा?

(सिद्धान्ती–आत्म्याविषयीं एकदाच असें दोन प्रकारचें ज्ञान होणें अयोग्य आहे. कारण श्रवणादिकांचे वेळीं मनन, विज्ञान इत्यादिकांचा असंभव असल्यामुळें ऐकणें, बोलणें इत्यादि लिंगावरून आत्मसंबंधी किंवा अन्यविषयसंबंधी मननरूप अथवा विज्ञानरूप अनुमिति- ज्ञान संभवत नाहीं. आपण ज्या वेळीं ऐकत किंवा बोलत वगैरे असतों, तेव्हा मनन, निश्चय इत्यादि करीत नाहीं. कारण मन एकाक्षणीं एकच क्रिया करूं शकतें. एक-दाच अनेक क्रिया करण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें नसतें. त्यामुळें एका क्रिये-वरून दुसऱ्या एकाद्या वस्तूचें मननादिरूप अनुमान–ज्ञान संभवत नाहीं,–असें ह्मणतात–) "ननु श्रवणादिलिङ्गेनापि कथं ज्ञायते यावता यदा शृणोत्यात्मा श्रोतव्यं शब्दं तदा तस्य श्रवणक्रिययैव वर्तमानत्वा-न्मननविज्ञानक्रिये न संभवत आत्मनि परत्र वा।" अर्थ—अहो पण ऐकणें, इत्यादि लिंगांवरूनही आत्मा कसा जाणला जातो? कारण जेव्हां 'आत्मा श्रोतव्यं शब्दं शृणोति–' आत्मा ऐकण्यास योग्य असलेला शब्द ऐकतो, तेव्हां तो ऐकणें, या क्रियेनें युक्त होऊनच रहात असल्यामुळें (ऐकणें या क्रियेचाच आधार होत असल्यामुळें) 'आत्मनि परत्र वा–' आत्म्या-विषयीं किंवा आत्मभिन्न–अनात्मवस्तुविषयीं 'मननविज्ञानक्रिये न संभवतः–' मनन व विज्ञान या क्रिया संभवत नाहींत. (येथें मनन व विज्ञान या शब्दांवरून अनुमिति (अनुमानगम्य ज्ञान) घ्यावी. कारण शंकावा-द्यानें वर आत्मा अनुमान प्रमाणाचा विषय होतो, असें ह्मटलें आहे. बरें, ऐकणें इत्यादि प्रत्यक्ष क्रिया व मनन हें अनुमान, हीं दोन्हीं एकाच वेळीं संभवत नाहींत, हें जरी खरें असलें, तरी दुसऱ्या विषयाविषयींच्या मनन-क्रियेनें आत्म्याचें अनुमान करावें, ह्मणजे श्रवण या लिंगावरून जरी तें संभ-

वत नसलें, तरी मनन या क्रियेवरून (लिंगावरून) त्याच्याच जातीचें-मननरूप अनुमान करावें, म्हणून म्हणशील तर दोन विजातीय क्रिया जशा एका वेळीं संभवत नाहींत त्याप्रमाणें दोन सजातीय क्रियाही संभवत नाहींत, असें आचार्य सांगतात-) " तथाऽन्यत्रापि मननादिक्रियासु।" अर्थ-त्याप्रमाणें ' अन्यत्र मननादिक्रियासु अपि ( मननादिक्रियान्तरमपि न संभवति )-' इतर मननादि क्रियामध्येंही ( मननादि दुसरी क्रिया सुद्धा संभवत नाहीं )

( 'अहो पण मननादि क्रिया हें नुसतें लिंग आहे पण लिंग हेंच अनुमितिज्ञानाचें करण ( साधन, अनुमान ) नव्हे कारण अतीत म्हणजे भूत, पूर्वी पाहिलेलें, अशा लिंगावरूनही अनुमिति ज्ञान होतें, असा अनुभव आहे यास्तव लिंगज्ञान हें अनुमितिज्ञानाचें करण आहे त्याचप्रमाणें तें लिंगज्ञान अनुमितीच्या वेळीं असलें पाहिजे, असाही नियम करता येत नाहीं कारण पूर्वक्षणीं असणें, एवढ्यावरूनही तें अनुमितीचें करण होऊं शकतें तस्मात् लिंग व अनुमितिज्ञान, हीं दोन्ही जरी एकाच काळीं नसलीं तरी काहीं दोष नाहीं, असें वादी म्हणेल तर तें बरोबर नाहीं कारण श्रवण-मनन इत्यादि लिंगाचें विज्ञान साक्षिरूप असतें कोणतेंही ज्ञान हे साक्षीचेंच रूप आहे त्यामुळें त्यामध्यें स्वत (स्वाभाविकपणें) कोणत्याही प्रकारचा विशेष असत नाहीं श्रवणादिकानीं रूपित (परिच्छिन्न) झाल्यामुळेंच तें तें ज्ञान अनुमापक (अनुमान करविणारें, अनुमानाचें निमित्त) होतें, असें पुढें सांगावयाचें आहे यास्तव अनुमितिज्ञानाचे वेळीं लिंगज्ञानही असतें, असेंच सांगणें उचित होय लिंगज्ञानाच्या अभावीं अनुमितिज्ञान होणें शक्य नाहीं )

(' बाह्यविषयाचें श्रवण करणें, इत्यादि क्रियाच्या योगानें मनन करणाराचें अनुमान होत नाहीं, हें तुमचें म्हणणें जरी क्षणभर कबूल केलें, तरी बाह्यविषयाचें श्रवणादि करणें, ही प्रत्यक्ष क्रियाच आत्म्याराही विषय करील,

असें ह्मणण्यांत कोणता दोष आहे ?' असें वादी विचारील ह्मणून आचार्य सांगतात- ) "श्रवणादिक्रियाश्च स्वविषयेष्वेव।" अर्थ—व ऐकणें, इत्यादि क्रिया आपल्या विषयांविषयींच होतात (आपला आश्रय जो आत्मा त्याविषयीं कधीं होत नाहींत. ऐकणें ही क्रिया श्रवणाचा विषय जो शब्द त्याच्या ठिकाणींच प्रवृत्त होते. ऐकणाऱ्या श्रोत्याचे ठिकाणीं प्रवृत्त होऊं शकत नाहीं, असा भावार्थ. शिवाय 'न मतेर्मन्तारं मन्वीथाः' या वाक्यानें आत्म्याच्या मन्तव्यत्वाचा निषेध केलेला असल्यामुळें त्याच्याविषयीं मननक्रिया संभवत नाहीं, असें सांगतात- ) "न हि मन्तव्याद-न्यत्र मन्तुर्मननक्रिया संभवति।" अर्थ—मन्तव्य विषयाहून पृथक् जो आत्मा त्याच्याविषयीं मनन करणाराची मननक्रिया संभवत नाहीं. (कारण कुऱ्हादिकांच्या क्रियेचा व्यापार छेद्य काष्ठाला सोडून इतरत्र ह्मणजे छेद करणाऱ्या पुरुषाच्या शरीरावर होत नाहीं. )

(अहो पण 'मनसो वशे सर्वमिदं बभूव' असें श्रुतिवचन आहे. त्यावरून सर्व मनाचा विषय आहे, असें ठरतें. सर्वामध्यें आत्माही अंतर्भूत होतो. ह्मणून तोही मन्तव्य-मननाचा विषय -होय, अशी वादी शंका घेतो-) "ननु मनसा सर्वमेव मन्तव्यं।" अर्थ-अहो पण मनानें सर्वच मनन करितां येतें. (असें जरी असलें तरी मन हें करण (क्रियेचें साधन) आहे व कोणतीही क्रिया कर्त्यावांचून होणें शक्य नाहीं. यास्तव मनन करणाराचा अंगीकार अवश्य केला पाहिजे, असें सिद्धान्ती ह्मणतात- ) "सत्यमेवं तथापि सर्वमपि मन्तव्यं मन्तारमन्तरेण न मन्तुं शक्यम्।" अर्थ—खरें आहे. (सर्वाचें मनन करतां येतें हें खरें) तथापि 'मन्तारं अन्तरेण सर्वं अपि मन्तव्यं न मन्तुं शक्यम्—' मनन करणारावांचून कोणत्याही मन्तव्याचें मनन करतां येणें शक्य नाहीं. (तथापि येथील अपिशब्द 'न मन्तारं मन्वीथाः' अशा विशेष श्रुतीनें आत्म्याच्या मन्तव्यत्वाचा निषेध केलेला असल्यामुळें आह्मी हें क्षणभर मान्य करून, ह्मणजे आत्मा सर्वामध्यें अंतर्भूत होतो, यास्तव तोही मननाचा विषय होणें

शक्य आहे, हें तुमचें ह्मणणें क्षणभर कबूल करून असें सांगत आहों,-हें सुचवितो. 'बरें पण मननाला मनन करणाराची आवश्यकता असली ह्मणून काय झालें?' असें वादी विचारतो-) "यद्येवं किं स्यात्।" अर्थ—असें जरी असलें तरी काय झालें? (मन्ता प्रत्येक मननाला अवश्य आहे, असें ठरलें कीं आत्मा मन्तव्य-मननविषय नाहीं, असें सिद्ध झालें, असें सिद्धान्ती सांगतात-) "इदमत्र स्यात्।" अर्थ—हें त्यांत होईल. (आत्मा मननाचा विषय नाहीं, हें त्यावरून ठरेल. तें कसें ह्मणून विचारशील तर पहा-आत्म्याचें मनन करावयाचें झाल्यास मनन करणारा कोण? तो स्वतःच कीं दुसरा कोणी? तो स्वतःच ह्मणून ह्मटलें तर कर्तृकर्म-भावविरोध हा दोष येतो, असें सांगतात-) "सर्वस्य योऽयं मन्ता स मन्तैवेति न स मन्तव्यः स्यात्।" अर्थ—सर्व विषयांचा जो हा मन्ता (मनन करणारा) तो मन्ताच आहे. यास्तव तो मन्तव्य (मननाचा विषय) होत नाहीं. (मन्त्यानेंच मन्तव्य होणें ह्मणजे आपल्याच खांद्यावर बसून जाण्यासारखें अयुक्त आहे. क्रियेचा जो कर्ता त्यानेंच कर्म होणें, अनुपपन्न होय. यास्तव मन्त्याचा मन्ता दुसराच कोणी असतो, ह्मणून ह्मणावें तर तो मन्त्याचा मन्ता अनात्मा आहे कीं आत्मा? अनात्मा आहे हा पक्ष घेतल्यास सिद्धान्ती ह्मणतात-) "न च द्वितीयो (अनात्मा) मन्ताऽस्ति।" अर्थ—पण आत्म्याचा मन्ता दुसरा कोणी अनात्मा नाहीं. (कारण अनात्मा अचेतन असल्यामुळें तो मन्ता होणें अशक्य आहे. मनन हा चेतनधर्म आहे. बरें एका मननकर्त्या आत्म्याचें मनन करणारा दुसरा आत्माच आहे, हा पक्ष घेतल्यास 'एका शरीरांत दोन आत्मे असतात,' असें होईल, असें सिद्धान्ती सांगतात-) "यदा स आत्मनैव मन्तव्यस्तदा येन च मन्तव्य आत्मात्मना यश्च मन्तव्य आत्मा तौ द्वौ प्रसज्जेयाताम्।" अर्थ-जेव्हां तो आत्म्याच्या योगानेंच मन्तव्य होतो, ह्मणजे आत्म्याचाच विषय होतो तेव्हां आत्मा ज्या आत्म्याच्या योगानें, ज्या आत्म्याकडून, ज्या आत्म्याचा मन्तव्य होतो तो एक व जो मन्तव्य होतो तो दुसरा

असे दोन आत्मे असतात, असें ह्मणण्याचा प्रसंग येईल या दोषाचा परिहार करावयाचा असल्यास एकाच आत्म्याला एकांशानें मन्तृत्व (मननकर्तृत्व) व दुसऱ्या अंशानें मन्तव्यत्व असतें, असें ह्मणावें लागेल. पण तसें ह्मटल्यास आत्मा सावयव होईल, असें सांगतात–) "एक एव आत्मा द्विधा मन्तृमन्तव्यत्वेन द्विशकलीभवेद्वशादिवत्।" अर्थ–एकच आत्मा वेळू किंवा असेच दुसरे पदार्थ, याप्रमाणें मन्ता व मन्तव्य या रूपानें द्विधा, दोन शकलाचा होईल.

(एका शरीरात दोन आत्मे आहेत असें झालें, किंवा आत्मा दोन शकलांनीं युक्त झाला तर होईना, त्यांत काय बिघडलें, असें वादी ह्मणेल, असें वाटल्यामुळें आचार्य– *एका शरीरात दोन आत्मे असल्यास त्यांचें सर्वदा ऐकमत्यच* (एकच अभिप्राय) असेल, असा कांहीं विश्वास नसल्यामुळें एकादे वेळीं त्यांतील एकाला पूर्वेकडे जावेसें व दुसऱ्याला पश्चिमेकडे जावेसें वाटल्यास किंवा एकाला बसावेसें वाटून दुसऱ्याला पळावेसें वाटल्यास शरीराचा विनाश होण्याचाच प्रसंग ओढवेल बरें, वेळूप्रमाणें त्याचीं दोन शकलें आहेत अशी कल्पना केली तर तो सावयव आहे असें होईल पण कोणतीही सावयव वस्तु अनित्य असते, या न्यायानें तोही अनित्य होऊन कृतहानादि दोष उत्पन्न होतील, असें ह्मणतात–) "उभयथाप्यनुपपत्तिरेव।" अर्थ— कसेंही मानलें तरी अनुपपत्ति हा दोष येतोच (दोन दीप जरी परस्पर भिन्न असले तरी त्याचा स्वभाव एकसारखाच असल्यामुळें त्याच्यामध्यें कर्तृ–कर्मभाव नसतो ह्मणजे त्यांतील एक दीप दुसऱ्या दीपाला प्रकाशित करणारा व दुसरा दीप त्याचा प्रकाश्य, असा भाव, असा संबंध त्याच्यामध्यें नसतो, असा अनुभव आहे यास्तव एका शरीरात दोन आत्मे असतात, या किंवा आत्म्याचीं दोन शकलें आहेत, या पक्षांतील कोणताही पक्ष जरी घेतला, तरी ते दोन्ही आत्मे किंवा दोन्ही शकलें समानस्वभावाचीं असल्यामुळें आत्मा एक आहे, यापक्षीं जसा, तसाच त्या दोन्ही पक्षीं कर्तृ–कर्मभाव संभवत नाहीं, अशी दुसरी अनुपपत्ति

सांगतात– ) " यथा प्रदीपयोः प्रकाश्यप्रकाशकत्वानुपपत्तिः समत्वात्तद्वत् । " अर्थ— ज्याप्रमाणें दोन प्रदीपांच्या प्रकाश्य-प्रकाशकत्वाची समस्वभावत्वामुळें अनुपपत्ति असते ( त्याप्रमाणें दोन आत्मे किंवा दोन आत्मशकलें यांच्यामध्येंही समस्वभावत्वामुळेंच प्रकाश्य-प्रकाशकत्वाची अनुपपत्ति आहे. शिवाय काठकोपनिषदामध्यें 'पराञ्चि खानि॰ ' (अ. २ व. १ मं. १) या मंत्रांत ' स्वयंभूनें इंद्रियांना बहिर्मुख मारून ठेवलें आहे. (त्यांना बहिर्मुख करणें ह्मणजेच त्यांना मारणें आहे. ) त्यामुळें तीं बाह्य विषयांनाच पाहतात; अन्तरात्म्याला पहात नाहींत. ' असें ह्मटलें आहे. यांत इंद्रियें नियमानें बहिर्मुखच प्रवृत्त होतात. अन्तर्मुख प्रवृत्त होत नाहींत. ह्मणजे आत्मा हा त्यांचा विषय नव्हे तर अनात्मा विषय आहे, असें सांगितलें आहे. ' यन्मनसा न मनुते ' हें केनोपनिषदांतील वाक्यही तेंच सांगतें. अर्थात् मनाचा व्यापार बाह्य मन्तव्य विषयाचे ठिकाणींच होतो; अन्तरात्म्याचे ठिकाणीं होत नाहीं; असें सांगतात– ) " न च मन्तुर्मन्तव्ये मननव्यापारशून्यः कालोऽस्त्यात्ममननाय । " अर्थ—मनन करणाराला मन्तव्य विषयाविषयींच्या मनन व्यापारावांचून आत्ममनन करावयास अवकाशच नसतो ( ह्मणजे मनन करणारा पुरुष जागर व स्वप्न या अवस्थांमध्यें एकसारखा विषयचिंतनच करीत असतो. त्याच्या चित्ताचे सर्व व्यापार विषयांविषयीं होत असतात. त्यामुळें त्या अवस्थांत त्याला आत्म्याचें चिंतन करावयास अवकाशच उरत नाहीं. पण असें जर ह्मटलें तर ' कोणी एकादाच बुद्धिमान् प्रत्यगात्माला जाणतो; व मनानेंच त्याला पहावें ' इत्यादि उपनिषद्वाक्यांची वाट काय ! ह्मणून विचाराल तर सांगतों– बहिर्विक्षेपाचा अभाव होऊन मनाची एकाग्रता झाली असतां आत्मा आपोआप प्रकाश पावतो, असा त्याचा अर्थ आहे. कारण तसा अर्थ न मानल्यास पूर्वोक्त न्यायानें परिपुष्ट असलेल्या ' अमतः अविज्ञातः ' इत्यादि अनेक श्रुती बाधित होतील. )

( असो, याप्रमाणें आत्मा साक्षात् मनानें चिंतन करता येण्याजोगा आहे, या पक्षीं एका शरीरात दोन आत्मे किंवा त्याचा शकलीभाव हे दोष येतात असें सागून तो अनुमितिज्ञानाचा विषय होतो, यापक्षींही तेच दोष येतात, असें सागतात– ) " यद्यपि लिङ्गेनात्मानं मनुते मन्ता तथापि पूर्ववदेव लिङ्गेन मन्तव्य आत्मा यश्च तस्य मन्ता तौ द्वौ प्रसज्जे याताम् । एक एव वा द्विधेति पूर्वोक्तो दोष । " अर्थ— ज्यावेळीं ' मन्ता लिङ्गेन आत्मान मनुते– ' मनन करणारा लिंगाच्या योगानें आत्म्याला मानतो ( त्याचें मनन–अनुमान करतो ) त्यावळींही पूर्वी प्रमाणेंच लिंगाच्या योगानें मन्तव्य आत्मा व त्याचा मन्ता, असे दोन आत्मे प्रसक्त होतील, किंवा एकच आत्मा द्विधा होतो, असा पूर्वोक्त दोष येईल ( तात्पर्य ' अमत अविज्ञात ' इत्यादि न्यायपूर्ण श्रुतीनें आत्म्याला कोणत्याच प्रकारें ज्ञेयत्व नाहीं, असेच सागितलें आहे, ही गोष्ट सिद्ध झाली )

(यावर पूर्ववादी पुन शका घेतो–) न प्रत्यक्षेण नाप्यनुमानेन ज्ञायते चेत्कथमुच्यते ' सम आत्मेति विद्यात् ' इति। कथ वा श्रोता, मन्तेत्यादि ।" अर्थ–आत्मा प्रत्यक्ष प्रमाणानें जाणला जात नाहीं व अनुमानप्रमाणानेंही जर जाणला जात नाहीं तर ' सम आत्मा इति विद्यात् इति कथ उच्यते– ' आत्मा सर्वत्र सम आहे ( कोठेंही विषम नाहीं ), असें जाणावें, असें कसें सागितलें जातें? तसेंच तो श्रोता, मन्ता विज्ञाता, इत्यादि आहे, असें कसें ह्मटलें आहे? ह्मणजे आत्मा ज्ञेय आहे, असें व तो श्रोतृत्वादि धर्मांनीं युक्त आहे, असें ( प्रतिपादन करणाऱ्या श्रुती अनुपपन्न आहेत, असा याचा भाव )

' सम आत्मा० ' या श्रुतींत इतरनिषेध झाला असता स्वप्रकाशत्वामुळें स्वत स्फुरणच सागितलें आहे आत्मा इतर पदार्थांप्रमाणें ज्ञान या क्रियेचें कर्म आहे, अशा अभिप्रायानें येथें ' विद्यात् ' असें ह्मटलेलें नाहीं, असा परिहार पुढें सागावयाचा आहे यास्तव श्रोता, मन्ता इत्यादि श्रुती

विषयीं घेतलेल्या शंकेचा परिहार अगोदर सांगतात- ) " ननु " अर्थ— अहो पण ( श्रुतीनें आत्मा श्रोतृत्वादि–धर्मवान् आहे, असें जें सांगितलें आहे, त्याची बाट काय ह्मणून विचारतां कीं श्रोतृत्वादिकांचें प्रतिपादन केलेलें असल्यामुळें अश्रोतृत्वादि असिद्ध आहे, असें ह्मणतां? पहिला पक्ष मानीत असाल तर तो बरोबर नाहीं कारण श्रोतृत्वादि धर्म नित्य आहेत, असें तुह्मी मानीत असता, असें सांगतात- ) "श्रोतृत्वादिधर्मवानात्मा ।" अर्थ— आत्मा श्रोतृत्वादि धर्मवान् आहे ( त्याचप्रमाणें ' न श्रोता न मन्ता ' इत्यादि सांगणारी श्रुति असल्यामुळें त्याच्या नित्य अश्रोतृत्वादिकाविषयीं प्रमाण नाहीं, असेंही नाहीं. तर तें नित्य अश्रोतृत्वादिकही प्रमाणसिद्ध आहे. यास्तव तें ' असिद्ध आहे ' असें ह्मणता येत नाहीं, असें सांगतात- ) " अश्रोतृत्वादि च प्रसिद्ध आत्मनः । " अर्थ— त्याचप्रमाणें आत्म्याचें अश्रोतृत्वादिक प्रसिद्ध आहे ( या श्रुतींचा विरोध कसा नाहीं, तें आह्मी पुढें सांगू पण तूर्त याप्रमाणें श्रोता, मन्ता व न श्रोता न मन्ता, असें दोनप्रकारचें विधान ऐकलें असता त्यांतील एकच पक्ष घेऊन आत्मा श्रोताच आहे, असें ह्मणणें सर्वथा युक्त नव्हे, असें आचार्य ह्मणतात- ) " किमत्र विषमं पश्यसि । " अर्थ— ( मग असें असताना ) त्यात विषम का पाहतोस? (' अहो पण अश्रोतृत्वश्रुति अन्यपर असल्यामुळें ह्मणजे तिचा प्रसिद्ध ( वाच्य ) अर्थ न घेतां लाक्षणिक अर्थ घ्यावयाचा असल्यामुळें ' श्रोता मन्ता ' व ' अश्रोता अमन्ता ' या वचनांत कांहीं वैषम्य नाहीं,' असें पूर्ववादी ह्मणेल ह्मणून आचार्य सांगतात- " यद्यपि तव न विषमं तथापि मम तु विषमं प्रतिभाति ।" अर्थ— जरी तुला त्यांत कांहीं विषम वाटत नसलें तरी मला तें भासतें. ( निरनिराळ्या वेळीं तीं दोन्हीं संभवतात. यास्तव त्या दोन प्रकारच्या वाक्यांतील एकाच प्रकारचें वाक्य अन्यपर आहे, असें समजून आत्मा श्रोताच आहे, असें ह्मणण्यास कांहीं विशेष कारण नाहीं. )

 

('अश्रोतृत्वादि च प्रसिद्धमात्मनः' या पाठाच्या अनुरोधानें वरील भाष्य लाविलें. आतां 'अश्रोतृत्वादि-प्रसिद्धमनात्मनः।' असा दुसरा पाठ आहे. त्याच्या अनुरोधानें 'ननु श्रोतृत्वादिधर्मवान् आत्मा। अश्रोतृत्वादि च प्रसिद्धमनात्मनः।' हें, सर्व वाक्य वरील शंकावाद्याचेंच आहे, असें समजावें. त्याचा अर्थ–अहो पण आत्मा श्रोतृत्वादिधर्मवान् आहे व अश्रोतृत्वादिक अनात्म्याचे धर्म आहेत, हें प्रसिद्ध आहे. (श्रुतीनें आत्मा श्रोतृत्वादि धर्मवान् आहे, असें सांगितलें आहे. तेव्हां तो अश्रोता कसा होईल? 'न श्रोता' इत्यादि वाक्यावरून तो श्रोता नाहीं, असेंही वाटतें, पण अश्रोतृत्व हा धर्म अनात्म्याचा आहे, हें प्रसिद्ध आहे. यास्तव आह्मी तें वाक्य अन्यपर आहे, असें ह्मणतों.)

(पण दोन्ही आत्मधर्म आहेत असें श्रुति एकसारखेंच सांगत असतांना त्यांतील एक अनात्म्याचा धर्म आहे, असें ह्मणणें अयुक्त होय, असें सिद्धान्ती ह्मणतात–) 'किमत्र विषमं पश्यसि' अर्थ–यांत असें विषम कां पाहतोस? (अहो पण आह्मी लोकांच्या प्रसिद्धीच्या बळावर अनात्मधर्मत्वाचा निश्चय केलेला असल्यामुळें आह्मी यांत विषम मुळींच पहात नाहीं, असें पूर्ववादी ह्मणेल, असें समजून आचार्य त्याचें निराकरण करितात–) 'यद्यपि तव न विषमं तथापि मम तु विषमं प्रतिभाति।' अर्थ–जरी तुला त्यांत कांहीं विषम वाटलें नाहीं तरी मला विषम भासतें. (बाकीचें सर्व भाष्य पूर्वीप्रमाणें जाणावें.)

(अश्रोतृत्वादि आत्म्याचा धर्म आहे, अशीही प्रसिद्धि असल्यामुळें श्रुतीच्या अनुसार ते दोन्ही आत्मधर्म आहेत, असें प्रश्नपूर्वक सांगतात–) "**कथं। यदासौ श्रोता तदा न मन्ता यदा मन्ता तदा न श्रोता। तत्रैवं सति पक्षे श्रोता मन्ता पक्षे न श्रोता न मन्ता।**" अर्थ—तें कसें? (तूं केव्हां केव्हां होणाऱ्या ज्ञानाच्या योगानें आत्म्याचें नित्यश्रोतृत्वादिक मानतोस. पण तें युक्त नव्हे. कारण) जेव्हां तो श्रवण करणारा (ऐकणारा) तेव्हां मन्ता (मनन करणारा) नव्हे व जेव्हां मनन

करणारा तेव्हा श्रवण करणारा नव्हे आणि असा प्रकार असल्यामुळें एका-पक्षीं आत्मा श्रोता व मन्ता आणि दुसऱ्या पक्षीं तो श्रोता नव्हे व मन्ताही नव्हे. ( भाष्यांत 'न मन्ता' या शेवटच्या शब्दापुढें 'न तु नित्यमेव श्रोता मन्ता वा' असा शेष लावावा. म्ह. तो नित्य श्रोताच किंवा नित्य मन्ता नव्हे. ) "तथान्यत्रापि च।" अर्थ–त्याचप्रमाणें द्रष्टृत्व, विज्ञातृत्व इत्यादिकामध्येंही ( असेंच 'काद्राचित्कत्व' म्हणजे केव्हा केव्हा असणें, हा धर्म आहे. )" यद्येवं तदा श्रोतृत्वादिधर्मवानात्माऽश्रोतृत्वादिधर्मवान्वेति संशयस्थाने कथं तव न वैषम्यम्।" अर्थ—अशी जेव्हां स्थिति आहे तेव्हा आत्मा श्रोतृत्वादि धर्मवान् आहे कीं अश्रोतृत्वादि धर्मवान् आहे, असा संशय आला असता त्यांतील एकाच पक्षाला प्रमाण समजून दुसऱ्याला अप्रमाण समजणाऱ्या तुझ्या ठिकाणीं वैषम्य कसें नाहीं? ( श्रोतृत्वादिकाला पाक्षिकत्व कसें आहे तें दृष्टान्त देऊन सागतात– ) "यदा देवदत्तो गच्छति तदा न स्थाता गन्तैव। यदा तिष्ठति तदा न गन्ता स्थातैव तदास्य पक्ष एव गन्तृत्वं स्थातृत्वं च, न नित्यं गन्तृत्व स्थातृत्व वा तद्वत्।" अर्थ–जेव्हा देवदत्त जातो तेव्हा तो स्थाता ( उभा राहणारा ) नसतो तर गमन करणाराच असतो व तो जेव्हा उभा असतो तेव्हा जाणारा नव्हे तर उभा राहणाराच आहे. आणि जेव्हां अशी व्यवस्था आहे तेव्हां याचें गन्तृत्व किंवा स्थातृत्व एका पक्षीं असणारेंच आहे. ( गन्तृत्व म्हणजे गमन करणारा हा धर्म व स्थातृत्व म्हणजे उभा असणारा, हा धर्म यातील एक असतो तेव्हां दुसरा नसतो व दुसरा असतो तेव्हां पहिला नसतो यास्तव त्यांतील प्रत्येक धर्म दुसऱ्याच्या अभावींच असणार हें उघड आहे ) त्याचें गतृत्व व स्थातृत्व नित्य नाहीं त्याचप्रमाणें ( श्रोतृत्वादि-कही नित्य नव्हे. )

( असा वाद चालला असतां सिद्धान्त्याचा गूढ अभिप्राय न समजल्यामुळें काणादादिक तार्किक दोन्हीही म्हणजे श्रोतृत्वादि व अश्रोतृत्वादि काद्राचित्क्य ( कदाचित् असणारींच ) कां असेनात. त्यांत काय बिघडलें,

असें ह्मणतात, असें आचार्य सांगतात-) "अत्र काणादादयः पश्यन्ति। पक्षप्राप्तेनैव श्रोतृत्वादिनात्मोच्यते श्रोता मन्तेत्यादि संयोगजत्वमयौगपद्यं च ज्ञानस्य ह्याचक्षते। दर्शयन्ति चान्यत्रमना अभूवं नादर्शमित्यादि युगपज्ज्ञानानुत्पत्तिर्मनसो लिङ्गमिति च न्याय्यम्।"
अर्थ—याविषयीं काणादादिक ( वैशेषिक व नैयायिक ) असें समजतात. श्रोता, मन्ता इत्यादि श्रुतिवचनांत एकपक्षीं प्राप्त जें श्रोतृत्वादिक त्याच्या योगानेंच आत्मा सांगितला जातो. (काणादादिकही जर असेंच ह्मणतात तर सिद्धांताहून तें त्यांचें ह्मणणें भिन्न कसें ? कारण सिद्धांत्यांनींही श्रोतृत्व-अश्रोतृत्व इत्यादिकांचा अंगीकार केला आहे. ह्मणून कोणी ह्मणेल तर तें बरोबर नाहीं. कारण सिद्धान्त्याच्या मतीं नित्य साक्षीचें श्रोतृत्व नित्यच आहे. आणि कादाचित्क ( केव्हां केव्हा होणारें ) ज्ञान मिथ्या असल्यामुळें वस्तुतः त्याचा अभाव आहे. ह्मणून अश्रोतृत्वही नित्यच. पण आह्मां काणादांच्या मतीं कादाचित्क ज्ञानानेंच श्रोतृत्वादिक; असा विशेष आहे, असें 'संयोगजत्वं०' इत्यादि भाष्यानें सांगतात-) ते ज्ञानाला संयोगजत्व व अयौगपद्य आहे, असें ह्मणतात. ( आत्मा व मन यांच्या संयोगापासून ज्ञानाचा उद्भव होतो व तें एकाच वेळीं होत नाहीं, असा वैशेषिकांचा सिद्धांत आहे. असो; आतां ज्ञान केव्हां केव्हां होणारें व सर्व ज्ञान एकाच वेळीं न होता क्रमानें होणारें आहे याविषयीं 'दर्शयन्ति' इत्यादि भाष्यानें प्रमाण दाखवितात-) अन्यत्रमना अभूवं न अदर्श इत्यादि दर्शयन्ति। युगपज्ज्ञानानुत्पत्तिः मनसो लिङ्गं इति च न्याय्यं (पश्यन्ति)-' मी 'अन्यत्रमना' होतों. ह्मणजे ज्याचें मन दुसरीकडे लागलें आहे, असा होतों. त्यामुळें मीं पाहिलें नाहीं, इत्यादि दाखवितात व एकाच वेळीं सर्व ज्ञानाची उत्पत्ति न होणें, हें मनाच्या अस्तित्वाचें चिह्न आहे, असें आपलें ह्मणणें न्याय्य आहे, असें पाहतात. ( समजतात. मन जर नसतें तर चक्षुरादि इंद्रियाचा एकाच वेळीं रूपादि विषयाशीं संबंध झाला असता. एकाच वेळीं सर्व इंद्रियाच्या योगानें सर्व विषयाविषयींचीं ज्ञानें झालीं असतीं.

कारण इंद्रियें व विषय याचा संबंध, ही ज्ञानाची सामग्री त्या वेळीं असते पण तसें होत नाहीं. यास्तव क्रमानें प्रत्येक इंद्रियाशीं संयोग पावणारें मन अणुपरिमाणाचें आहे, असें मानलें पाहिजे आणि त्याचा अंगीकार केला असता एकाच वेळीं मनाचा सर्व इंद्रियाशीं संयोग होत नसल्यामुळें सर्व विषयज्ञानाची सामग्री नसते ह्मणून एकाच वेळीं सर्व विषयक ज्ञान होत नाहीं एका वेळीं सर्वविषयाचें ज्ञान न होणें, याच लिंगावरून मन आहे, असें ह्मणणारे काणाद एकाच वेळीं सर्व ज्ञानाची उत्पत्ति होत नाहीं, असें ह्मणतात आणि हा आपला अर्थ न्याय्य आहे, असेंही समजतात )

( असो, सिद्धान्त्यनीं याप्रमाणें काणादादिकाचें मत प्रदर्शित केलें असता ' तर मग काणादादिकाच्या ह्मणण्याप्रमाणें दोन्ही प्रकारच्या श्रुतींची उपपत्ति लागत असल्यामुळें व आत्म्याच्या ठिकाणीं श्रोतृत्वादि धर्मवत्त्वाची सिद्धि होत असल्यामुळें तोच सिद्धान्त आहे, असा निश्चय करा, ' असें पूर्वपक्षी किंवा कोणी मध्यस्थ सिद्धान्त्यास ह्मणतो– ) " भवत्वेव किं तव नष्टं यद्येव स्यात् । " अर्थ— मग असेंच असो असें जर झालें तर त्यात तुझें काय गेलें ? ( ह्मणजे काणादादिकाचें हें दर्शन जर न्याय्य असेल तर तच असू दे त्यांत तुझें काय नष्ट झाले ? असा भाव आत्मा कादाचित्क ज्ञानानें श्रोतृत्वादि धर्मवान् होतो हें श्रुतीला संमत नाहीं यास्तव त्याचें तें ह्मणणें न्याय्य नव्हे, असें सांगून सिद्धान्ती त्या पक्षास दूषित करितात– ) ' अस्त्येव तवेष्ट चेत् । श्रुत्यर्थस्तु न संभवति । " अर्थ— तुला जर तें इष्ट वाटत असेल तर तसें असो, पण श्रुतीचा अर्थ मात्र असा संभवत नाहीं ( अहो पण श्रोता मन्ता इत्यादि श्रुतीनें ते त्याचे धर्म आहेत असें प्रतिपादन केलें आहे तेव्हा तुह्मी श्रुतीला हें संमत नाहीं, असें कसें ह्मणता ' अशी शंका घेतात– ) " किं न श्रोता मन्ता इत्यादि श्रुत्यर्थं । " अर्थ— श्रोता, मन्ता इत्यादि श्रुतीचा अर्थ नव्हे का ? ( तो काणादादिकांच्या न्याय्य समजुतीला संमतच आहे असो पण ' न श्रोता ' इत्यादि श्रुतीनें कोणत्याही प्रकारचा विशेष न ठेविता आत्मा त्रिकाली

श्रोतृत्वादि सर्व धर्मांनीं रहित आहे, असें प्रतिपादन केलेलें असल्यामुळें तो श्रोता, मन्ता इत्यादि आहे, ह्मणजे श्रोतृत्वादि धर्मांनीं युक्त आहे, हें ह्मणणें श्रुतिसमत नाहीं, असें सिद्धान्ती उत्तर सागतात- ) " **न । न श्रोता न मन्तेत्यादिवचनात् ।** " अर्थ— नाहीं. ' न श्रोता न मन्ता ' ह्मणजे तो श्रोता नाहीं, मन्ता नाहीं, इत्यादि वचन असल्यामुळें ( ' श्रोता, मन्ता ' हा श्रुत्यर्थ नव्हे )

( पण ' यदासौ श्रोता० ' (पृष्ठ १५३) इत्यादि वचनानें श्रोतृत्वादिकाला पाक्षिकत्व आहे, ह्मणजे श्रोतृत्वादिक एक पक्षीं असून दुसऱ्या पक्षीं अश्रोतृत्वादिक आहे, असें तुह्मींच वर ह्मटलेलें असून काणादाचा पक्ष दाखवीत असताना कादाचित्क ज्ञानानें त्याचें उपपादान केलें आहे यास्तव तुमच्या सागण्यावरूनही पाक्षिक श्रोतृत्वादिक व अश्रोतृत्वादिक याना विषय करणारीं तीं दोन प्रकारचीं वचनें आहेत, अशी उपपत्ति लागते, असें वादी ह्मणतो-) " **ननु पाक्षिकत्वेन मत्युक्त त्वया ।** " अर्थ— अहो पण पाक्षिकत्वानें तुह्मी त्याचा निर्णय केला आहे ( परतु आत्म्याचें श्रोतृत्व व त्याचा अभाव हीं दोन्हीं दोन प्रकारच्या श्रुतींवरून स्वाभाविकपणें प्रतीत होतात यास्तव त्याना पाक्षिक समजून त्याचा सकोच करणें युक्त नव्हे, असा आपला अभिप्राय व्यक्त करीत सिद्धान्ती ह्मणतात- ) " **न । नित्यमेव श्रोतृत्वाद्यभ्युपगमात् ।** " अर्थ— श्रोतृत्वादि नित्यच आहे, असा स्वीकार केलेला असल्यामुळें आह्मी वर त्याचा पाक्षिकत्वानें निर्णय केलेला नाहीं ( अहो पण स्वत श्रुति- श्रवणशक्ति अनित्य आहे, असें ठरलें असता त्यावरून सिद्ध होणारें श्रोतृत्वही अनित्य आहे, असा सकोच होणें अवश्य आहे, अस कोणी ह्मणेल ह्मणून आचार्य सांगतात-) " **न हि श्रोतु श्रुतेर्विपरिलोपो विद्यते इत्यादि श्रुते ।** " अर्थ— कारण श्रोत्याच्या श्रुतीचा ( श्रवणशक्तीचा ) सर्वथा लोप कधींही होत नाहीं, इत्यादि अर्थाची श्रुति आहे ( यास्तव श्रुति व श्रोतृत्व याना अनित्य ह्मणणें श्रुति विरुद्ध आहे )

कारण इंद्रियें व विषय यांचा संबंध, ही ज्ञानाची सामग्री त्या वेळीं असते. पण तसें होत नाहीं. यास्तव क्रमानें प्रत्येक इंद्रियाशीं संयोग पावणारें मन अणुपरिमाणाचें आहे, असें मानलें पाहिजे आणि त्याचा अंगीकार केला असतां एकाच वेळीं मनाचा सर्व इंद्रियाशीं संयोग होत नसल्यामुळें सर्व विषयज्ञानांची सामग्री नसते. ह्मणून एकाच वेळीं सर्व विषयक ज्ञान होत नाहीं. एका वेळीं सर्वविषयाचें ज्ञान न होणें, याच लिंगावरून मन आहे, असें ह्मणणारे काणाद एकाच वेळीं सर्व ज्ञानांची उत्पत्ति होत नाहीं, असें ह्मणतात आणि हा आपला अर्थ न्याय्य आहे, असेंही समजतात )

( असो, सिद्धान्त्यानीं याप्रमाणें काणादादिकाचें मन प्रदर्शित केलें असता ' तर मग काणादादिकाच्या ह्मणण्याप्रमाणें दोन्ही प्रकारच्या श्रुतींची उपपत्ति लागत असल्यामुळें व आत्म्याच्या ठिकाणीं श्रोतृत्वादि धर्मवत्त्वाची सिद्धि होत असल्यामुळें तोच सिद्धान्त आहे, असा निश्चय करा, ' असें पूर्वपक्षी किंवा कोणी मध्यस्थ सिद्धान्त्यास ह्मणतो-) " भव-त्वेव किं तव नष्टं यद्येवं स्यात् । " अर्थ— मग असेंच असो. असें जर झालें तर त्यात तुझें काय गेलें ? ( ह्मणजे काणादादिकाचें हें दर्शन जर न्याय्य असेल तर तेंच असू दे. त्यात तुझें काय नष्ट झालें ? असा भाव आत्मा कादाचित्क ज्ञानानें श्रोतृत्वादि धर्मवान् होतो हें श्रुतीला संमत नाहीं. यास्तव त्याचें तें ह्मणणें न्याय्य नव्हे, असें सांगून सिद्धान्ती त्या पक्षास दूषित करितात- ) " अस्त्येव तवेष्टं चेत् । श्रुत्यर्थस्तु न संभवति । " अर्थ— तुला जर तें इष्ट वाटत असेल तर तसें असो, पण श्रुतीचा अर्थ मात्र असा संभवत नाहीं. ( अहो पण श्रोता मन्ता इत्यादि श्रुतीनें ते त्याचे धर्म आहेत असें प्रतिपादन केलें आहे. तेव्हा तुह्मी श्रुतीला हें संमत नाहीं, असें कसें ह्मणतां ? अशी शंका घेतात- ) " किं न श्रोता मन्ता इत्यादि श्रुत्यर्थः । " अर्थ— श्रोता, मन्ता इत्यादि श्रुतीचा अर्थ नव्हे का ? ( तो काणादादिकांच्या न्याय्य समजुतीला संमतच आहे. अहो पण ' न श्रोता ' इत्यादि श्रुतीनें कोणत्याही प्रकारचा विशेष न ठेवितां आत्मा त्रिकालीं

श्रोतृत्वादि सर्व धर्मांनीं रहित आहे, असें प्रतिपादन केलेलें असल्यामुळें तो श्रोता, मन्ता इत्यादि आहे, ह्मणजे श्रोतृत्वादि धर्मांनीं युक्त आहे, हें ह्मणणें श्रुतिसंमत नाहीं, असें सिद्धान्ती उत्तर सांगतात– ) " **न । न श्रोता न मन्तेत्यादिवचनात् ।** " अर्थ— नाहीं. ' न श्रोता न मन्ता ' ह्मणजे तो श्रोता नाहीं, मन्ता नाहीं, इत्यादि वचन असल्यामुळें ( ' श्रोता, मन्ता ' हा श्रुत्यर्थ नव्हे. )

( पण ' यदासौ श्रोता० ' ( पृष्ठ १५३ ) इत्यादि वचनानें श्रोतृत्वादिकाला पाक्षिकत्व आहे, ह्मणजे श्रोतृत्वादिक एक पक्षीं असून दुसऱ्या पक्षीं अश्रोतृत्वादिक आहे, असें तुह्मींच वर ह्मटलेलें असून काणादांचा पक्ष दाखवीत असतांना कादाचित्क ज्ञानानें त्याचें उपपादान केलें आहे. यास्तव तुमच्या सांगण्यावरूनही पाक्षिक श्रोतृत्वादिक व अश्रोतृत्वादिक यांना विषय करणारीं तीं दोन प्रकारचीं वचनें आहेत, अशी उपपत्ति लागते, असें वादी ह्मणतो-) " **ननु पाक्षिकत्वेन प्रत्युक्तं त्वया ।** " अर्थ— अहो पण पाक्षिकत्वानें तुह्मी त्याचा निर्णय केला आहे. ( परंतु आत्म्याचें श्रोतृत्व व त्याचा अभाव हीं दोन्हीं दोन प्रकारच्या श्रुतींवरून स्वाभाविकपणें प्रतीत होतात. यास्तव त्यांना पाक्षिक समजून त्यांचा संकोच करणें युक्त नव्हे, असा आपला अभिप्राय व्यक्त करीत सिद्धान्ती ह्मणतात– ) " **न । नित्यमेव श्रोतृत्वाद्यभ्युपगमात् ।** " अर्थ— श्रोतृत्वादि नित्यच आहे, असा स्वीकार केलेला असल्यामुळें आह्मी वर त्याचा पाक्षिकत्वानें निर्णय केलेला नाहीं. ( अहो पण स्वत: श्रुति– श्रवणशक्ति अनित्य आहे, असें ठरलें असता त्यावरून सिद्ध होणारें श्रोतृत्वही अनित्य आहे, असा संकोच होणें अवश्य आहे, असें कोणी ह्मणेल ह्मणून आचार्य सांगतात–) " **न हि श्रोतुः श्रुतेर्विपरिलोपो विद्यते इत्यादि श्रुतेः ।** " अर्थ— कारण श्रोत्याच्या श्रुतीचा ( श्रवणशक्तीचा ) सर्वथा लोप कधींही होत नाहीं, इत्यादि अर्थाची श्रुति आहे. ( यास्तव श्रुति व श्रोतृत्व यांना अनित्य ह्मणणें श्रुतिविरुद्ध आहे. )

( अहो पण श्रवणशक्ति, मननशक्ति इत्यादिकाना जर नित्यत्व असतें, तर एकाच वेळीं अनेक विषयाचें ज्ञान झालें असतें ह्मणजे केव्हाही कोणत्याही ज्ञानाचा अभाव झाला नसता कारण श्रुति, मति, इत्यादि नावांच्या सर्व ज्ञानाना नित्यत्व आहे ' मग तसें झालें तर इष्टच आहे,' ह्मणून ह्मणाल तर प्रत्यक्ष अनुभवाशीं विरोध येतो. यास्तव ' न हि श्रोतु श्रुतेर्विपरिलोपो विद्यते ' या श्रुतीचा वाच्य अर्थाहून निराळा अर्थ सागितला पाहिजे, अशी वादी शका घेतो- ) " एवं तर्हि नित्यमेव श्रोतृत्वाद्यभ्युपगमे प्रत्यक्षविरुद्धा युगपज्ज्ञानोत्पत्तिरज्ञानाभावश्चात्मन कल्पित स्यात्। तच्चानिष्टमिति । " अर्थ— असें जर मानलें तर ह्मणजे श्रोतृत्वादिक नित्यच आहे, असा अगीकार केल्यास अनुभवाच्या विरुद्ध एकाच वेळीं सर्व ज्ञानाची उत्पत्ति व आत्म्याच्या अज्ञानाचा अभाव याची कल्पना केल्यासारखें होईल पण तसें होणें अनिष्ट आहे ( येथें शका सपली, असें इतिशब्दानें सुचविलें आहे )

( आता या शकेचा परिहार सागतात-) " नोभयदोषोपपत्ति ।" अर्थ— ( एकाच वेळीं सर्व ज्ञानाची उत्पत्ति व अज्ञानाचा अभाव या ) दोन्ही दोषाची उपपत्ति सभवत नाहीं त्याचे श्रोतृत्वादिधर्म धर्म जर नित्य आहेत तर वरील दो-ही दोष येत नाहींत, असें कसें ह्मणता, अशी आशका घेउन आत्मस्वरूपभूत श्रुति, मति इत्यादिकांना नित्यत्व असलें तरी वृत्तिरूप कादाचित्क श्रुति, मति इत्यादिकाचा अगीकार केलेला असल्यामुळें पूर्वोक्त दोष येत नाहीं, असा परिहार करणारे सिद्धान्ती नित्य श्रोतृत्वादिक दाखवितात- ) " आत्मन श्रुत्यादिश्रोतृत्वादिधर्मवत्त्वश्रुते । " अर्थ— कारण आत्म्याच्या श्रुत्यादिकामुळें त्याला श्रोतृत्वादिधर्मवत्त्व आहे, अशी श्रुति आहे ( आत्म्याच्या स्वरूपभूत असें जें श्रुत्यादि ह्मणजे श्रोत्रेंद्रियजन्य वृत्तीचें साक्षिरूप, त्याच्या योगानें त्याला श्रोतृत्वादि धर्मवत्त्व येत ह्मणजे श्रोत्रजन्य वृत्तीच्या साक्षित्वामुळे आत्मा श्रोता, मन्ता इत्यादि होतो ' श्रोता, मन्ता,' इत्यादि श्रुतीनेंही तेंच सांगितलें आहे )

( तर मग अनित्य श्रुत्यादि कसें? अशी आशंका घेऊन तेंच दाखवितात– ) " अनित्यानां मूर्तानां च चक्षुरादीनां दृष्ट्याद्यनित्यमेव संयोगवियोगधर्मिणाम्। यथाऽग्नेर्ज्वलनं तृणादिसंयोगजत्वात्तद्वत्।" **अन्वयः**— यथा अग्नेः ज्वलनं तृणादिसंयोगजत्वात् अनित्यं तद्वत् संयोगवियोगधर्मिणां अनित्यानां च चक्षुरादीनां दृष्ट्यादि अनित्यं एव॥ **अर्थ**— ज्याप्रमाणें अग्नीचें पटणें तृणादिकाच्या संयोगामुळें उद्भवणारें असल्यामुळें अनित्य, त्याप्रमाणें संयोगविभागधर्मवान्, अनित्य व मूर्त अशा चक्षुरादि इंद्रियाचें दृष्ट्यादि अनित्यच आहे ' संयोगवियोगधर्मिणां– ' हें चक्षुरादिकाना सहेतुक विशेषण दिलें आहे ह्मणजे चक्षुरादिकाची दृष्टि, मति इत्यादि संयोगजन्य असल्यामुळें अनित्य आहे. अहो पण अनित्य दृष्ट्यादि जर आहे असें ह्मणता, तर तोच आत्म्याचाही धर्म आहे, असें ह्मणण्यास कोणती हरकत आहे? नित्य दृष्ट्यादि हाच त्याचा धर्म आहे, असा आग्रह कशाला पाहिजे? असें कोणी ह्मणेल ह्मणून सागतात– ) " न तु नित्यस्यामूर्तस्यासंयोगविभागधर्मिण संयोगजदृष्ट्याद्यनित्यधर्मवत्त्व संभवति। " अर्थ—नित्य, अमूर्त, संयोग–विभाग धर्मरहित, अशा आत्म्याचें संयोगजन्यदृष्ट्यादि अनित्य धर्मवत्त्व संभवत नाहीं ( आत्मा नित्य असल्यामुळेंच अमूर्त आहे. कारण कोणताही मूर्त पदार्थ सावयव असतो व अवयवांचा परस्पर संयोग व वियोग होणें हाच उपचय व अपचय ह्मणजे वृद्धि व क्षय आहे आणि वृद्धि–क्षयवान् ह्मणजेच परिणाम पावणारा पदार्थ अनित्य असतो आत्मा नित्य आहे, त्याअर्थी तो मूर्त नसला पाहिजे आणि मूर्त नसल्यामुळेंच संयोगादिधर्मरहित आहे तो असा असल्याकारणानें त्याच्या ठिकाणीं संयोगजन्य दृष्टि श्रुति, मति इत्यादिकांचा असंभव आहे त्यामुळें आत्म्याच्या नित्य दृष्ट्यादिकांचाच अंगीकार केला पाहिजे )

( श्रुतीवरूनही त्याच्या नित्यदृष्ट्यादिकाची सिद्धि होते, असें सांगतात– ) "तथा च श्रुतिः–' न हि द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो विद्यते।' इत्याद्या।" अन्वय –तथा च ' द्रष्टुः दृष्टेः विपरिलोपः न हि विद्यते '

इत्याद्या, श्रुतिः । अर्थ–तशीच ' द्रष्ट्याच्या दर्शनशक्तीचा सर्वथा लोप होत नाहीं, इत्यादि श्रुति आहे. ( अहो पण नित्य व अनित्य अशा दोन दृष्टींचा अंगीकार केल्यास गौरव हा दोष नाहीं कां येत ? अशी शंका घेतात– ) " एवं तर्हि द्वे दृष्टी चक्षुषोऽनित्या दृष्टिर्नित्या चात्मनः । तथा च द्वे श्रुती श्रोत्रस्यानित्या नित्यात्मस्वरूपस्य । तथा द्वे मती विज्ञाती बाह्याबाह्ये । " अर्थ–असें जर ह्मटलें तर दोन दृष्टी झाल्या. एक चक्षूची अनित्य व आत्म्याची नित्य. तशाच दोन श्रुती. श्रोत्रेंद्रियाची अनित्य व आत्मरूपाची नित्य. तशाच दोन मती, दोन विज्ञाती ह्मणजे एक बाह्य व दुसरी अबाह्य ( खरें, पण श्रुतीला प्रामाण्य असल्यामुळें द्विविधत्वाचा अंगीकार केल्याकारणानें होणारें गौरवही प्रामाणिक आहे, असें सिद्धांती सांगतात– ) " एवं ह्येव । तथा चेयं श्रुतिरुपपन्ना भवति दृष्टेर्द्रष्टा श्रुतेः श्रोतेत्याद्या । " अर्थ–असेंच आहे आणि तसेंच मानल्यानें दृष्टीचा द्रष्टा, श्रुतीचा श्रोता, इत्यादि श्रुति उपपन्न होते. ( दृष्टेर्द्रष्टा ह्मणजे दृष्टिविषयक दृष्टिमान्; दर्शनशक्तीला विषय करण्याचें सामर्थ्य ज्याच्यामध्यें आहे तो, असा त्याचा अर्थ आहे. एकाच पदार्थामध्यें विषय–विषयिभाव संभवत नसल्यामुळें ह्मणजे एकाच पदार्थानें स्वतः विषय होऊन त्याविषयाचा ग्राहकही होणें, असंभाव्य असल्याकारणानें एक विषय होणारी व दुसरी तिला विषय करणारी अशा दोन दृष्टी प्रतीत होतात आणि अशा रीतीनें दोन प्रकारची दृष्टि असली तरच वरील श्रुति उपपन्न होते, नाहीं तर होत नाहीं. तिमिररोग झाला असतां दृष्टि नष्ट झाली व औषधोपचारानें रोगाचें निवारण झालें असतां दृष्टि पुनः आली, अशी प्रतीति ज्या दृष्टीविषयीं येते ती जन्मनाशयुक्त अनित्य दृष्टि एक व तिच्या जन्मनाशांचीही साक्षिभूत, तिच्या जन्मनाशांस जाणणारी नित्य दृष्टि दुसरी, अशा दोन प्रकारच्या दृष्टींचा अनुभव लौकिकांतही येतो असें सांगतात– ) " लोकेऽपि प्रसिद्धं चक्षुषस्तिमिरागमापाययोर्नष्टा दृष्टिर्जाता दृष्टिरिति चक्षुर्दृष्टेरनित्यत्वम् । "

अर्थ–' लोके अपि–' व्यवहारातही ' चक्षुष तिमिरागमापाययो दृष्टि नष्टा दृष्टिः जाता इति चक्षुर्दृष्टेः अनित्यत्व प्रसिद्धम्–' नेत्राला तिमिर रोग झाला असता व त्याचा क्षय झाला असता 'दृष्टि नष्ट झाली व दृष्टि उत्पन्न झाली,' अशा प्रकारें चक्षु.संबंधी दृष्टीचें अनित्यत्व प्रसिद्ध आहे ( ' चक्षुर्दृष्टेः' हे पद उपलक्षणार्थ समजून ' आत्मदृष्टेर्नित्यत्व च प्रसिद्ध ' ह्मणजे ' आणि आत्म-दृष्टीचें नित्यत्वही प्रसिद्ध आहे,' असेंही जाणावें. ) " तथा च श्रुतिमत्या-दीनामात्मदृष्ट्यादीना च नित्यत्वं प्रसिद्धमेव लोके। वदति ह्युद्‌धृ-तचक्षुः स्वप्नेऽद्य मया भ्राता दृष्ट इति। तथाऽवगतबाधिर्य स्वप्ने श्रुतो मन्त्रोऽद्येत्यादि। " अर्थ—त्याचप्रमाणें श्रुति, मति, इत्यादिकांचें व आत्मदृष्टि, मति, इत्यादिकाचें ( अनित्यत्व व ) नित्यत्व लोकामध्यें प्रसि-द्धच आहे आत्मदृष्ट्यादिकाना नित्यत्व आहे, याविषयीं आणखीं एक कारण 'आत्मदृष्ट्यादीना च' या पदानीं सांगितलें आहे स्वप्नात चक्षु नसतानाही दृष्टि असते. ती नेत्रजन्यही पण नव्हे. यास्तव नित्य होय. ' हि उद्धृतचक्षुः ( पुरुष. ) मया अद्य स्वप्ने भ्राता दृष्टः इति वदति–' कारण ज्याचे डोळे काढले आहेत असा पुरुष मीं आज स्वप्नात आपल्या भावाला पाहिलें, असें बोलतो ( स्वप्नातही चक्षुरिंद्रिय लय पावलेलें नसल्यास दृष्टीची प्रतीति येऊ शकेल, असें कोणी ह्मणेल ह्मणून भाष्यात ' उद्धृतचक्षु ' हें पद घातलें आहे. कारण ज्याचे डोळे काढले आहेत त्याचे ते स्वप्नात असतात, अशी शंकाही येणें शक्य नाहीं. ) ' तथा अवगतबाधिर्यः मया अद्य स्वप्ने मन्त्र श्रुत इत्यादि वदति–' त्याच प्रमाणें ज्याची बधिरता ( बहिरेपणा ) निश्चित झाली आहे, ( ह्मणजे जो बहिरा आहे, अशी सर्वांची खातरी झाली आहे ) तो पुरुष ' मीं आज स्वप्नात मन्त्र ऐकला ' असें बोलतो ( स्वप्नातील दृष्टि, श्रुति, ह्मणजे पाहणें, ऐकणें इत्यादि चक्षुरादि इंद्रियामुळें होत नाहीं तेव्हा त्यांना दृष्टि, श्रुति इत्यादि कसें ह्मणता ? ह्मणून कोणी विचारील तर तें बरोबर नाहीं. कारण रूपादि विषयाच्या अपरोक्ष ज्ञानाचींच दृष्टि, श्रुति इत्यादि नावें आहेत. )

( आतां असें न मानल्यास कोणता बाध येतो तें सांगून पूर्वोक्त सिद्धान्तच दृढ करितात- ) " यदि चक्षु.संयोगजैवात्मनो नित्या दृष्टिस्तन्नाशे नश्येत्तदोद्धृतचक्षुः स्वप्ने नीलपीतादि न पश्येत् ।" अर्थ— जर चक्षुःसंयोगामुळें होणारीच आत्म्याची नित्य दृष्टि असती व ती चक्षूचा नाश झाला असता नाश पावली असती, तर ज्याचे नेत्रगोलक उपटून काढले आहेत तो पुरुष स्वप्नांत काळें, पिवळें इत्यादि रूप पहावयास समर्थ झाला नसता. ( कारण त्याच्यापाशीं पाहण्याचें साधन–चक्षु नसतें. बरें, स्वप्नांतील दर्शन–पाहणें, ही स्मृति आहे, असें ह्मणावें तर तेंही सयुक्तिक नाहीं. कारण स्वप्नातील रूपदर्शन जर स्मरण असतें तर त्याचा विषय अगदीं समीप असल्याप्रमाणें साक्षात् भासला नसता. स्वप्नातील तो अपरोक्ष भास भ्रमात्मक आहे, ह्मणून ह्मणावें तर त्याचा बाध होत नाहीं आणि बाध झाल्यावाचून कोणताही अनुभव भ्रमात्मक आहे, असें ठरत नाहीं. शिवाय स्वप्नातील दर्शन जर स्मरणरूप असतें तर कधीं न पाहिलेल्या भ्रात्याचेंही जें दर्शन होतें तें झालें नसतें. हें स्वप्नाचें उदाहरण उपलक्षणार्थ आहे. त्यामुळें निजून उठलेल्या पुरुषाला 'मी एवढा वेळ सुखानें निजलों होतों,' असें सांगण्यास कारण होणारा सुषुप्तींतील अनुभवही नित्य आहे, असेंच मानलें पाहिजे. कारण त्या वेळीं सर्व अंतर्बाह्य इंद्रियाचा अभाव झालेला असल्यामुळें अनित्य अनुभवाचा अभावच असतो.)

( याप्रमाणें साक्षिस्वरूप दृष्टि व इंद्रियजन्य दृष्टि अशा दोन दृष्टी न मानल्यास केवळ प्रत्यक्षविरोध हाच दोष येऊन रहात नाहीं, तर श्रुतिविरोध हा दुसरा दोषही येतो, असें सांगतात– ) " न हि द्रष्टुर्दृष्टेरित्याद्या च श्रुतिरनुपपन्ना स्यात् ।" अर्थ—तशीच द्रष्ट्याच्या दृष्टीचा लोप होत नाहीं, इत्यादि अर्थाची श्रुति अनुपपन्न होईल. ( 'इत्याद्या' येथील आद्य शब्दानें 'न हि श्रोतुः श्रुतेर्विपरिलोपो विद्यते०' इत्यादि दुसऱ्या श्रुती घ्याव्या. ) " तच्चक्षुः पुरुषे येन स्वप्ने पश्यति, इत्याद्या च श्रुतिः ।" अर्थ—' पश्यते इति चक्षुः' ह्मणजे द्रष्टा, साक्षी 'पुरुषे' ह्मणजे आत्म्यामध्यें

किंवा शरीरात. जीव ज्याच्या योगानें स्वप्नांत रूप पाहतो तो चक्षु, साक्षी होय इत्यादि श्रुतिही अनुपपन्न होईल. ( 'स्वप्नान्तं जागरितान्तं चोभौ येनानुपश्यति' ह्मणजे स्वप्नान्त–स्वप्नातील विषय व जागरितान्त–जागरितांतील विषय पुरुष ज्याच्या योगानें पहातो, इत्यादि दुसऱ्या श्रुती वरील आत्मशब्दानें घ्याव्या. )

( आत्मदृष्टि जर अशी नित्य आहे तर ती अनित्य असल्याची प्रतीति कशी येते ? व सर्वही दृष्टि अनित्यच आहे, असा या सर्व लोकाचा निश्चय कसा झाला आहे ? अशी आशंका घेऊन 'ग्राह्य अनित्य दृष्टींतील अनित्यत्वादि सर्व ग्राहिका जी नित्यदृष्टि तिच्यामध्यें भासतें. ह्मणजे विषयाच्या ठिकाणचें अनित्यत्वादिक ग्राहक जो विषयी ( आत्मा ) त्याचे ठिकाणीं भासतें तापवून लाल केलेल्या लोखंडादिकाच्या गोळ्यातील वर्तुळाकारादि धर्म अग्नीच्या ठिकाणीं भासतात, हें सर्वांना माहीत आहे या दृष्टान्तातील लोखंडाचा गोळा ग्राह्य–अग्नीचा विषय असून स्वत अग्नि त्याचा ग्राहक–विषयी आहे यास्तव या अनुभवसिद्ध प्रतीतीप्रमाणें नित्यदृष्टीमध्यें अनित्य दृष्टीचा भास होणें अनुपपन्न नाहीं, असें सांगतात– ) "नित्यात्मनो दृष्टिर्बाह्यानित्यदृष्टेर्ग्राहिका । बाह्यदृष्टेश्चोपजनापायाद्यनित्यधर्मवत्त्वात्तद्ग्राहिकाया आत्मदृष्टेस्तद्वद्वभासत्वमनित्यत्वादिभ्रान्तिनिमित्त लोकस्येति युक्तम्।" अर्थ– आत्म्याची नित्य दृष्टि बाह्य अनित्य दृष्टीची ग्राहिका ( ग्रहण करणारी ) आहे आणि बाह्यदृष्टि उत्पत्ति–विनाशादि अनित्य धर्मांनीं युक्त असल्यामुळें तिचें ग्रहण करणाऱ्या आत्मदृष्टीचें 'तद्वद्वभासत्वं–' तिच्याप्रमाणें भासणें, ग्राह्याप्रमाणें, विषयाप्रमाणें भासणें हें 'लोकस्य अनित्यत्वादिभ्रान्तिनिमित्तं–' लोकाच्या–आत्मदृष्टि अनित्य आहे,– इत्यादि भ्रांतीचें निमित्त आहे, 'इति युक्तम्–' अशी कल्पना करणें युक्त आहे ( आता ग्राह्य विषयाचे धर्म ग्राहक विषयीच्या ठिकाणीं कसे भासतात तें दृष्टान्तानें स्पष्ट करितात– ) "यथा भ्रमणादिधर्मवदलातादिवस्तुविषयदृष्टिरपि भ्रमतीव

तद्वत्। तथा च श्रुतिः-ध्यायतीव लेलायतीवेति।" अर्थ-त्याप्रमाणें भ्रमण, (गमन,) इत्यादि धर्मांनीं युक्त असलेल्या-अलातचक्र, (धावणारा पक्षी,) इत्यादि वस्तूंना विषय करणारी दृष्टिही जणु काय भ्रमण करतेसें वाटतें त्याप्रमाणें (ग्राह्यधर्म ग्राहकाचे ठिकाणीं आहेत, असा भास होतो.) तसेंच सांगणारी 'ध्यायतीव लेलायतीव' ह्मणजे आत्मा जणु काय ध्यान करतो; जणु काय चंचल होतो, अशी श्रुति आहे. (ग्राह्यबुद्धीमध्यें असलेलें ध्यानादिक ग्राहक साक्षीच्या ठिकाणीं भासतें, असा वरील श्रुतिवचनाचा भावार्थ आहे.)

(सारांश, येणेंप्रमाणें-पूर्ववाद्यानें 'एकाच वेळीं अनेक ज्ञानाची उत्पत्ति होते,' असें जें ह्मटलें होतें त्याचें निरसन केलें, असें आता सांगतात-) "तस्मादात्मदृष्टेर्नित्यत्वान्न यौगपद्यमयौगपद्यं वाऽस्ति।" अर्थ— तस्मात् ह्मणजे आत्मदृष्टि नित्य असल्यामुळें तिला यौगपद्य किंवा अयौगपद्य नाहीं. (यौगपद्य ह्मणजे एकाच वेळीं अनेक ज्ञानानीं उत्पन्न होणें, हा धर्म. यौगपद्य नेहमीं अनेक पदार्थांवरूनच सूचित होणारें असतें आणि अयौगपद्य नेहमीं त्याच्या उलट, त्याच्या अभावरूप असतें. यास्तव एका आत्मदृष्टीमध्यें त्या दोघाचाही असंभव आहे.)

('अहो पण आत्मदृष्टि जर नित्य आहे तर परीक्षा करण्यात कुशल, अशा नैयायिकाना व दुसऱ्याही सर्व लोकाना भ्रम कसा होतो?' अशी आशंका घेऊन- 'न नरेणावरेण प्रोक्त एष सुविज्ञेयो बहुधा चिन्त्यमानः। नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ' ह्मणजे हीन-प्राकृतबुद्धि पुरुषानें सांगितलेला हा आत्मा पुष्कळ प्रकारें चिंतन केला जात असला तरी सुविज्ञेय (चांगल्या प्रकारें जाणण्यास योग्य) होत नाहीं. ही आगमप्रतिपाद्य आत्म्याविषयींची मति केवळ तर्कानें प्राप्त होण्यासारखी नाहीं, अथवा या आत्ममतीचा स्वबुद्धिजन्य तर्कानें निरास करू नये, इत्यादि काठकोपनिषदात सांगितलेलें असल्यामुळें स्वतःच्या बुद्धीनें आत्मा जाणता येणें अशक्य आहे, संप्रदायपरम्परेनेंच त्याला जाणलें पाहिजे, असें निश्चित होतें. नैयायिक व इतर लोक संप्रदायरहित असतात. ते संप्रदायपरंपरेनें

विचार करीत नाहींत. वास्तव त्यांना भ्रम होणें योग्यच आहे,– असें सांगतात–) "बाह्यानित्यदृष्ट्युपाधिवशात्तु लोकस्य तार्किकाणां चागमसंप्रदायविवर्जितत्वादनित्याऽऽत्मनो दृष्टिरिति भ्रान्तिरुपपन्नैव।" अन्वय.—तु लोकस्य बाह्यानित्यदृष्ट्युपाधिवशात् च तार्किकाणां आगमसंप्रदायविवर्जितत्वात् ( अथवा तु लोकस्य तार्किकाणा च बाह्यानित्यदृष्ट्युपाधिवशात् आगमसंप्रदायविवर्जितत्वात् च ) आत्मन. दृष्टिः अनित्या इति भ्रान्तिः उपपन्ना एव। अर्थ—परंतु लोकांना बाह्य अनित्य दृष्टि या उपाधीमुळें व तार्किकाना आगमसंप्रदायशून्यत्वामुळें ( किंवा लोकांना व तार्किकानाही बाह्य अनित्यदृष्टि, ही उपाधि व वैदिकसंप्रदायरहितत्व, या दोन कारणामुळें ) आत्म्याची दृष्टि ( ज्ञान ) अनित्य आहे, अशी भ्रांति होणें साहजिकच आहे ( आणि प्रत्येक ज्ञान भिन्न भिन्न आहे, असें समजणें हा एवढाच त्याना भ्रम होतो, असें नाहीं, तर प्रत्येक शरीरांत निरनिराळा आत्मा आहे, हाही या समजुतीमुळें होणारा भ्रमच आहे, असें सांगतात– ) "जीवेश्वरपरमात्मभेदकल्पना चैतन्निमित्तैव।" अर्थ–जीव, ईश्वर व परमात्मा असा तीन प्रकारचा आत्मा आहे, ही आत्मभेदकल्पनाही या निमित्तानेंच होणारी आहे. ( ह्मणजे ज्ञान अनित्य आहे, व प्रत्येक ज्ञान भिन्न भिन्न आहे, या कल्पनेमुळेंच आत्मा त्रिविध आहे ही कल्पना होते. जीवाचें ज्ञान अनित्य आहे, ईश्वराचें नित्य आहे, त्याचप्रमाणें प्रत्येक जीवाचें ज्ञान विचित्र असतें, पृथक् प्रथक् प्रकारचें असतें. वास्तव जीव व परमात्मा यांचें ऐक्य संभवत नाहीं, अशा प्रकारच्या युक्त्याभासानें ( असत् युक्तीनें ) त्यांनीं भेदाची कल्पना केली आहे. )

( शिवाय दुसरें, 'आत्मनैवाऽयं ज्योतिषाऽऽस्ते।' 'अयमात्मा सर्वानुभूः' 'प्रज्ञानघन एव' ह्मणजे त्या वेळीं ( सुषुप्तींत ) हा पुरुष आत्मज्योतीनेंच असतो, हा आत्मा ब्रह्म ( व्यापक ) आहे, तो सर्वांचा अनुभव घेणारा आहे. प्रज्ञानानें घन ( एकाकार ) आहे, इत्यादि श्रुतींवरून आत्म्यालाच नित्यदृष्टिरूपत्व आहे, असें सिद्ध होतें व 'सर्वाः प्रजा यत्रैकं भवन्ति'

ह्मणजे सर्व प्रजा ज्याच्यामध्यें ऐक्य पावतात, या वचनानें सर्व कल्पना आत्ममात्र आहेत, अर्थात् त्या आत्म्याहून पृथक् नाहींत, असें सांगितलेलें असल्यामुळें तो निर्विशेष आहे, असें सिद्ध होतें त्यामुळें आत्मरूप नित्य दृष्टिही सर्व विशेषरहित आहे, असें ठरतें यास्तव तिच्याविषयीं ती आहे, नाहीं, ' इत्यादि सर्व कल्पना भ्रांतिनिमित्तक आहेत, असें आता सागतात )

" तथाऽस्ति नास्तीत्याद्याश्च यावन्तो वाङ्मनसयोर्भेदा यत्रैक भवन्ति तद्विषयाया नित्याया दृष्टेर्निर्विशेषाया । "अर्थ— त्याचप्रमाणें ' आहे, नाहीं,' इत्यादि जेवढे ह्मणून वाक व मन याचे भेद आहेत, ते सर्व जेथें एक होतात, त्याविषयींच्या नित्य व निर्विशेष दृष्टीची ( ' आहे, नाहीं,' इत्यादि सर्व कल्पना भ्रातिनिमित्तक आहे शब्दाचे प्रकार ( नामप्रकार ) हे वाणीचे भेद व रूपाचे प्रकार ( आकार ) ह मनाचे भेद ज्या आत्म्यामध्यें एकरूप होतात, कारण ' सर्व वेद जेथें एक होतात, सर्व प्रजा जेथें एक होतात, ' अशा अर्थाची श्रुति आहे, तद्विषय ह्मणजे तत्स्वरूप ह्मणूनच नित्य, निर्विशेष अशा दृष्टीविषयीं ' ती आहे ' अशी आस्तिकाची कल्पना, ' नाहीं ' अशी शून्यवादी माध्यमिकाची कल्पना, ' आहे व नाहीं ' अशी दिगबर जैनाची कल्पना, त्याचप्रमाणें दुसऱ्याही वाद्याची यथासभव सावयवत्वादि कल्पना, इत्यादि सर्व कल्पना भ्रांतिमूलक आहेत, असा पूर्वीच्या वाक्यातील ' एतन्निमित्तैव ' या पदाशीं अन्वय )

( ' अहो पण निरनिराळे तार्किक आत्म्याचें अस्तित्वादिक तर्कानें सिद्ध करितात यास्तव त्या कल्पनाना भ्रान्तिनिमित्तक ह्मणता येत नाहीं, ' असें कोणी ह्मणेल ह्मणून,—त्याच्या कल्पना श्रुतिविरुद्ध आहेत, त्या असग आत्म्याच्या ठिकाणीं उपपन्न होत नाहींत व त्याच्या त्या कल्पना असल्यास मोक्षाची उपपत्ति लागत नाहीं, यास्तव तार्किकाचे तर्क प्रमाणमार्गांत आरूढ होऊ शकत नाहींत,—असें सागतात— ) " अस्ति नास्तीत्येक नानागुण वद्गुण जानाति न जानाति क्रियावदक्रिय फलवदफल सबीज निर्बीज सुख दुःख मध्यममध्य शून्यमशून्य परोऽहमन्य इति वा

सर्ववाक्प्रत्ययागोचरे स्वरूपे यो विकल्पयितुमिच्छति स नूनं खमपि चर्मवद्वेष्टयितुमिच्छति सोपानमिव च पद्भ्यामारोढुं । जले खे च मीनानां वयसां च पदं दिदृक्षते । " अर्थ— आहे, नाहीं, एक, नानागुणयुक्त, गुणरहित, जाणतें, व जाणत नाही, क्रियायुक्त व अक्रिय, फलयुक्त व अफल, सबीज व निर्बीज, सुख व दुःख, मध्य, अमध्य, शून्य, अशून्य, मी याहून निराळा, हा मजहून निराळा, इत्यादि प्रकारें वाणी व मन यांचा विषय न होणाऱ्या स्वरूपाविषयीं जो विशेष कल्पना करण्याची इच्छा करतो, तो सरोखर आकाशालाही चामड्याचें वेष्टन घालण्याची इच्छा करतो. पाय‍ऱ्यावर जसें चढावें त्याप्रमाणें दोन्ही पायांनीं आकाशात चढून जाण्याची इच्छा करतो जळांत माशांची व आकाशात पक्ष्यांचीं पावलें पाहण्याची इच्छा करतो व ( आत्मा सुषुप्तींत जाणत नाहीं व इतर अवस्थांमध्यें जाणतो. यास्तव त्याला कादाचित्क ज्ञानवत्त्व आहे. ह्मणजे त्याला ज्ञान सर्वदा नसतें, तर तें केव्हा केव्हां असतें, अशी वैशेषिकादिकांची कल्पना; आत्मा परलोकास जातो, ह्मणजे त्याला क्रियावत्त्व-सक्रियत्त्व आहे, अशी कित्येकाची कल्पना, येथेंच राहून तो दुसऱ्या शरीराचें ग्रहण करतो, अशी इतरांची कल्पना, देहच आत्मा आहे, या वादात अथवा क्षणिकविज्ञानवादात परलोकीं जाऊन फळ भोगणारा स्थायी आत्मा नसल्यामुळें तो अफल आहे; इतराच्या मतीं तो परलोकीं जाऊन फळ भोगतो, ह्मणून फलवान् आहे, वरील दोन पक्षींच कर्म व त्याच्या वासना, यांच्या आश्रयाचा अभाव असल्यामुळें तो परलोकीं निर्बीज, पण आत्मा नित्य आहे, त्यामुळें कर्म व वासना याचा तो आश्रय होतो, यापक्षीं तो सबीज, वैशेषिकादिकांच्या वादांत तो असुखरूप आहे. ह्मणजे आत्मा सुखस्वरूप आहे, असें ते मानीत नाहींत, ह्मणून तो दुःखरूप किंवा विज्ञानवादी बौद्धांच्या मतीं उपद्रवयुक्त चित्ताची संतति, हाच संसारी जीव असल्यामुळें त्याला हेयत्व–त्याज्यत्व मानलेंऽ आहे ह्मणून तो दुःखरूप; शरीरामध्येंच तो राहतो, या दिगंबर जैनांच्या मतीं तो मध्य; व इतराच्या मतीं तो शरी-

राच्या बाहेरही असतो ह्मणून अमध्य; मी श्रेष्ठ आहें, यास्तव हा मजहून निराळा व मी त्याहून अगदीं निराळा, इत्यादि प्रकारच्या आंतर, व बाह्य अशा सर्व कल्पना अवाङ्मनसगोचर आत्म्याच्या ठिकाणीं संभवत नाहींत, असा याचा भावार्थ. )

( आता वाङ्मनसभेद आत्म्याचे ठिकाणीं नाहींत व तो त्याचा विषयही नाहीं, या दोन्हीविषयीं क्रमानें दोन श्रुती सांगतात– ) " नेति नेति, यतो वाचो निवर्तन्ते, इत्यादिश्रुतिभ्यः । " अर्थ— ' हीं स्थूल मूर्तेंही आत्मा नव्हे, व सूक्ष्म मूर्तेंही आत्मा नव्हे. ' ' ज्याच्यापासून वाणी मनासह, त्याला विषय न करितां परत फिरतात ' इत्यादि अर्थाच्या श्रुती आहेत, त्यांवरून ( आह्मी ह्मणतों तें सिद्ध होतें. आत्मा वाक् व मन यांचा विषय होणारा नाहीं, याविषयीं आणखीं एक श्रुति सांगतात– ) " को अद्धा वेदेत्यादि मन्त्रवर्णात् । " अर्थ— साक्षात् कोण जाणतो, इत्यादि अर्थाचीं मंत्राक्षरें आहेत. त्यावरूनही ( आमचें ह्मणणें सिद्ध होतें. या मंत्रानें, साक्षात् कोण जाणतो, या वाक्यानें आत्मा मनाचा विषय होत नाहीं, हें सांगितलें व ' क इह प्रवोचत् ' ह्मणजे या लोकीं त्याच्याविषयीं कोण बोलला आहे ( कोणी नाहीं, ) या दुसऱ्या वाक्यानें ' तो वाणीचा विषय होत नाहीं, ' असें ह्मटलें आहे. )

( ' अहो पण तो आत्मा वाणी व मन याचा विषय होणारा जर नसेल तर श्रवण व मनन याचाही असंभव होऊन त्याचें ज्ञान मुळींच संभवणार नाहीं,' अशी शंका घेतात–) " कथं तर्हि तस्य मम आत्मेति वेदनं । " अर्थ— आत्मा, वाणी व मन याचा जर अविषय आहे, तर मग आत्मा मम आहे, असें त्याचें ज्ञान कसें होणार ? ( 'अशी जर अडचण येत असली तर त्याचें ज्ञान न का होईना,' ह्मणून ह्मणाल तर 'श्रुतीविषयीं अतिशंका घेणें योग्य नसल्यामुळें आत्मज्ञानाचा निषेध करणें योग्य नव्हे. यास्तव मी त्याचा निषेध करीत नाहीं, तर आत्मज्ञान कसें होईल, तें विचारतों, आत्मज्ञानाचा उपाय विचारतों, ' असें वरील शंकावादीच ह्मणतो– )

" ब्रूहि केन प्रकारेण तमहं मम आत्मेति विद्याम् । " अन्वय — अहं केन प्रकारेण ' मम आत्मा ' इति विद्यां तं प्रकारं ब्रूहि । अर्थ— मी कोणत्या प्रकारानें–कोणत्या उपायानें–' मम आत्मा ' असें जाणावें तो प्रकार सांग.

( ' नेति नेति ' या श्रुतीच्या निर्देशानेंच, इतर म्हणजे आत्मेतर– अनात्म वस्तूंचा निषेध करूनच स्वप्रकाश आत्म्याचा बोध करावा, असा ज्ञानाचा प्रकार सांगितला आहे आत्मज्ञानाचा याहून निराळा प्रकार संभवत नाहीं यास्तव पूर्वोक्त प्रकारानेंच आत्मा जाणावा, तो निर्विषयत्वानेंच म्हणजे घटादि अनात्मपदार्थाप्रमाणें वृत्तिज्ञानाचा विषय न होताच, जाणता येतो, असें समजून भाष्यकार यास उपहासपूर्वक उत्तर देतात– ) " अत्राख्यायिकामाचक्षते । कश्चित्किल मनुष्यो मुग्धः कैश्चिदुक्तः कस्मिंश्चिदपराधे सति ' धिक्त्वा नासि मनुष्य ' इति । स मुग्धः तयाऽऽत्मनो मनुष्यत्वं प्रत्याययितुं कंचिदुपेत्याह । ब्रवीतु भवान्कोऽहमस्मीति । स तस्य मुग्धतां ज्ञात्वाह । क्रमेण बोधयिष्यामीति स्थावरात्मभावमपोह्य न त्वममनुष्य इत्युक्त्वोपरराम । स तं मुग्धः प्रत्याह । भवान्मां बोधयितुं प्रवृत्तस्तूष्णीं बभूव किं न बोधयतीति । तादृगेव तद्भवतो वचनम् । " अर्थ–याविषयीं अशी आख्यायिका ( गोष्ट ) सांगतात ' कश्चित्किल मुग्धः मनुष्यः कस्मिंश्चित् अपराधे सति ' धिक्त्वा मनुष्य न असि ' इति कैश्चित् उक्तः –' कोणी एक मूढ मनुष्य, त्याच्या हातून कांहीं अपराध झाला असता ' अरे, तुला धिकार असो, तू मनुष्य नाहींस ' असें कोणाकडून बोलला गेला असता ' स मुग्धतया०–' तो मूढ त्यामुळें आपलें मनुष्यत्व निश्चित करवून घेण्यासाठीं कोणा एका जवळ जाऊन म्हणतो–' अहं कः अस्मि इति भवान् ब्रवीतु–' मी कोण आहें हें आपण सांगा ' ( तदा ) तस्य मुग्धतां ज्ञात्वा स आह–' त्या वेळीं त्याचें मूढत्व ओळखून तो म्हणतो ' क्रमेण बोधयिष्यामि इति– ' मी आता

याला क्रमानें बोध करवितो. नंतर 'स्थावराद्यात्मभावं अपोह्य न त्वं अमनुष्य' इति उक्त्वा उपरराम–' त्याच्या स्थावराद्यात्मभावाचा–स्थावरादिस्वरूपतेचा अपवाद–निषेध करून ह्मणजे (तूं स्थावर, कीट, पक्षी, पशु इत्यादि नाहींस, असें सांगून व) तूं अमनुष्य नव्हेस, असें बोलून तो मुकाट्यानें बसला. तेव्हा 'सः मुग्धः तं प्रति आह–' तो मूढ त्याला उलट ह्मणतो– 'भवान्मा०–' आपण मला बोध करण्यास प्रवृत्त झाला होतां, पण असे गप का बसला? बोध का करीत नाहीं 'तादृगेव०–' तशा प्रकारचेंच तुमचें तें वचन आहे.

('अहो पण ज्याचें ज्ञान करून द्यावयाचें त्याहून इतर वस्तूचा निषेध केला असता तो त्याहून निराळा आहे, असें जरी कळत असलें तरी तू अशा अशा प्रकारचा आहेस, असें न सांगितल्यास मी अशा प्रकारचा आहें, असें ज्ञान होत नाहीं यास्तव त्यासाठीं विधिमुखानें बोध करणें उचित आहे,' असें कोणी ह्मणेल ह्मणून आचार्य सांगतात–) "नास्यमनुष्य इत्युक्तेऽपि मनुष्यत्वमात्मनो न प्रतिपद्यते य. स कथं मनुष्योऽसीत्युक्तोऽपि मनुष्यत्वमात्मनः प्रतिपद्येत।" अर्थ– 'त्वं अमनुष्य. न असि इति उक्ते अपि य. आत्मन मनुष्यत्व न प्रतिपद्यते–' तूं अमनुष्य (मनुष्येतर) नाहींस, असें सांगितलें असताही जो आपलें मनुष्यत्व जाणत नाहीं (मी मनुष्य आहें, असें समजत नाहीं) 'स: मनुष्यः असि इति उक्तः अपि आत्मनः मनुष्यत्वं कथं प्रतिपद्येत–' तो 'तूं मनुष्य आहेस,' असें सांगितला गेला तरी (तूं मनुष्य आहेस असें जरी कोणीं त्याला सांगितलें तरी) आपलें मनुष्यत्व (मी मनुष्य आहें हें) कसें जाणेल! (साक्षात् प्रतीत होणाऱ्या वस्तूचें जर एकादा विपरीतपणें ग्रहण करीत असला तर त्याच्या विपर्ययाचा–विपरीत ग्रहणाचा निरास करण्याविषयींच यत्न करणें उचित आहे वस्तूच्या स्वरूपाचा बोध करण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण ज्याच्यामुळें वस्तु विपरीत भासते, तें कारणच नाहींसें केलें ह्मणजे तिचें स्वरूप आपोआपच प्रतीत होणें साहजिक आहे. पण त्या

कारणाचें निरसन केल्यावरही जो वस्तूचें स्वरूप जाणत नाहीं तो अति मूढच असला पाहिजे. अर्थात् तो उपदेशाला अयोग्यच होय )

( यास्तव दार्ष्टान्तिकातही नित्य अपरोक्ष–साक्षात् भासणाऱ्या–प्रतीत होणाऱ्या आत्म्याचा ' मी मनुष्य आहें, ' असा आरोपितरूपानें अनुभव येत असल्यामुळें त्या आत्मेतर आरोपितरूपाचा ' नेति नेति ' ' यतो वाचो निवर्तन्ते ' इत्यादि वाक्यानीं निरास केला असता स्वप्रकाश आत्म्याची स्वत च प्रतीति येण्याचा संभव आहे यास्तव हाच एक ( निषेध-मुखानें, इतरव्यावृत्ति करून ) उपदेश करण्याचा प्रकार आहे. आत्मोपदेशाचा अन्य प्रकार संभवत नाहीं, असें सांगून उपसंहार करितात– )
" तस्माद्यथाशास्त्रोपदेश एवात्मावबोधविधिर्नान्य । न ह्यग्नेर्दाह्य तृणाद्यन्येन केनचिद्दग्धु शक्यम् । " अर्थ— यास्तव असा शास्त्रानें उपदेश केलेला आहे, तसाच आत्मसाक्षात्काराचा विधि आहे त्याहून निराळा नाहीं. ( शास्त्रावाचूनही विधिमुखानें आत्मबोध का करिता येऊ नये? ह्मणून ह्मणाल तर सांगतों– ) ' अग्ने दाह्यं–तृणादि अन्येन केनचित् दग्धु, न शक्यम्– ' अग्नीचें दाह्य तृणादिक दुसऱ्या कोणालाही जाळता येणें शक्य नाहीं, ( आत्मा केवळ शास्त्रावरूनच जाणता येण्याजोगा असल्यामुळें त्याचा बोध दुसऱ्या कोणत्याही उपायानें होणें शक्य नाहीं, अता याचा भावार्थ आणि शास्त्रीय अवबोधप्रकारही, ( आत्म्याचा बोध करण्याचा शास्त्रीय प्रकारही ) हाच एक आहे, दुसरा नाहीं, असा निश्चय शास्त्र केवळ इतराचा निषेध करूनच उपरम पावलें आहे, त्यावरून होतो, असें आता सांगतात– ) अत एव शास्त्रमात्मस्वरूप बोधयितु प्रवृत्तं सदमनुष्यत्वप्रतिषेधेनैव नेति नेतीत्युक्त्वोपरराम । " अर्थ— ह्मणूनच शास्त्र आत्मस्वरूपाचा बोध करण्यास प्रवृत्त होऊन वरील दृष्टान्तातील अमनुष्यत्वाच्या प्रतिषेधाप्रमाणें ' नेति नेति ' ह्मणजे हा स्थूल भूतवर्गही आत्मा नव्हे व सूक्ष्मभूतवर्गही आत्मा नव्हे, असें सांगून उपरम ( शात ) झालें आहे, ( मुकाट्यानें बसलें आहे. ) " तथाऽन्तरमबाह्यमयमात्मा

ब्रह्म सर्वानुभूरित्यनुशासन । तत्त्वमसि । ' यत्र त्वस्य सर्वमात्मैवा भूत्तत्केन क पश्येत् ' इत्येवमाद्यपि च वेद्यत्व निषेधति । " अर्थ— त्याचप्रमाण ' तें आत्मतत्त्व केवळ आतच किंवा बाहेरच नाहीं (तर अतर्व हिर्व्याप्त आहे ) हा आत्मा ब्रह्म ( व्यापक ) व सर्वांचा अनुभव घेणारा आहे ' असें अनुशासन आहे ' तें व्यापक व सर्वकारण सत्त्व तू आहेस, ' ' जेव्हा या अधिकारी पुरुषाला सर्व आत्माच आहे, असें साक्षात् कळतें ( अथवा त्याला वस्तुमात्र आत्मरूप होतें ) तेव्हा कोण कोणाला कोणत्या साधनानें पाहणार ? ' ( पाहणारा, ज्याला पहावयाचें तो व ज्यानें पहावयाचें तें, हे सर्वच आत्मा आहे, असा अनुभव आल्यावर किंवा असा निश्चय झाल्यावर त्या त्रिपुटीची प्रतीति कशी येणार ? ) इत्यादि दुसरीं शास्त्रवचनेंहा ( आत्म्याच्या वेद्यत्वाचें, विषयत्वाचें, तो विषय आहे, या भावनेचें निरसन करितात, एवढे शब्द येथें अधिक जोडावे अनुशासन ह्मणज अनुभवानतर अधिकारपूर्वक सागणे या पदानें अर्थातच दुसऱ्या अनुशासनाचा निषेध केलेला असल्यामुळेंही पूर्वोक्त शास्त्रीय प्रकार हाच एक आत्मबोधाचा प्रकार आहे ' तत्त्वमसि ' या महावाक्यातही तत् व त्व याचें सामानाधिकरण्य ( पहा रत्न १ लें परिशिष्ट अ पृष्ठ ६ ) असल्यामुळें त्वपदार्थ जो जीव त्याच्या कर्तृत्वादिकाचा निषेध करूनच तो ब्रह्म आहे, असा बोध केला आहे ' तत्केन क पश्येत् ' या वचनात आत्मा दर्शनक्रियेचें कर्म, दर्शनाचा विषय होत नाहीं, असा निषेध केलेला असल्यामुळेंही आत्म्याचें ज्ञान अविषयत्वानेंच होतें, असा निश्चय होतो )

( तस्मात् आत्मा कर्तृत्वादि धर्मांनीं युक्त आहे, असें प्रमाणानें जाणणें अशक्य असल्यामुळें तो त्यानीं युक्त आहे, अशी प्राणिमात्राला येणारी प्रतीति अज्ञानमूलक व त्यामुळेंच भ्रामक आहे अर्थात् संसारी या रूपान प्रतीत होणाऱ्या वस्तुला केवळ ब्रह्मत्व आहे ह्मणजे ती वस्तु व्यापक आहे परिच्छिन्न नाहीं याच न्यायानें ईश्वराच्या ठिकाणींही सर्वज्ञ त्यादि उपाधींची कल्पना करणें, हा भ्रम आहे त्यामुळें ईश्वर आत्म्याहून

भिन्न आहे, असें समजण्यास काहीं प्रमाण नाहीं. अर्थात् तोही ब्रह्ममात्र आहे. यास्तव शंकावाद्यानें शकेच्या आरंभींच ह्मटल्याप्रमाणें तीन आत्मे नाहींत. तर आत्मा एकच अखंड एकरस आहे. )

( असो; आता हा सर्व अर्थ मनात घेऊन व 'तर मग अशा प्रकारच्या आत्म्याच्या संसाराची प्रतीति कशी येते ?' अशी शंका घेऊन आत्म्याचा संसार अज्ञानतः प्रतीत होतो ह्मणजे तो स्वाभाविक नसून औपाधिक आहे,' असें उत्तर सांगतात– हें उत्तर पुढच्या ह्मणजे पाचव्या अध्यायाशीं या मागच्या अध्यायाची संगति दाखविण्याच्या उपयोगीं आहे.) "यावदयमेवं यथोक्तमिममात्मानं न वेत्ति तावदयं बाह्यानित्यदृष्टिलक्षणमुपाधिमात्मत्वेनोपेत्याविद्योपाधिधर्मानात्मनो मन्यमानो ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तेषु देवतिर्यङ्नरस्थानेषु पुनः पुनरावर्तमानोऽविद्याकामकर्मवशात्संसरति।" अर्थ–जोवर हा जीव अशा रीतीनें वर सांगितलेल्या या आत्म्याला जाणत नाहीं, तोंवर बाह्य, अनित्य दृष्टिलक्षण उपाधीस (म्ह० प्रत्यगात्म्याहून बाह्य असलेल्या अंतःकरणास) आत्मत्वानें जाणून (अंतःकरणच आत्मा आहे असें समजून) आत्म्याच्या यथार्थस्वरूपाच्या अज्ञानामुळें त्या उपाधीचे जे धर्म ते आत्म्याचेच आहेत, असें समजणारा तो ब्रह्मदेवापासून स्थावर स्तंबापर्यंत देव, पश्वादि तिर्यक् प्राणी व नर याच्या स्थानात ह्मणजे शरीरात पुनः पुनः आवर्तन करीत अविद्या, कामना व कर्म याच्या अधीन झाल्यामुळें संसार करतो. )

( येणेंप्रमाणें अध्यारोप व अपवाद याच्यायोगानें आत्मतत्त्वाचें निरूपण करून वैराग्य हें त्याच्या साक्षात्काराचें निमित्त असल्यामुळें त्याकरिता जीवाच्या अवस्थांचें सविस्तर वर्णन करणारे भगवान् आचार्य 'तस्य त्रय आवसथाः' या वाक्यात (पृष्ठ १२३) ज्याचा उल्लेख केला आहे, अशा तीन शरीरांचाही प्रपंच करण्यासाठीं पंचमाध्यायास आरंभ करीत असतांना प्रथम भूमिका रचितात– ) "स एवं संसरन्नुपात्तदेहेन्द्रियसंघातं त्यजति। त्यक्त्वान्यमुपादत्ते। पुनः पुनरेवमेव नदीस्रोतोवज्जन्ममरणप्रबन्धा-

विच्छेदेन वर्तमान. कामिरवस्थाभिर्वर्तत इत्येतमर्थं दर्शयन्त्याह श्रुतिर्वैराग्यहेतोः। ” अर्थ-तो अशा रीतीनें ससार करणारा ( जीवरूप ईश्वर ) ग्रहण केलेल्या देहेंद्रियसघातास सोडतो व पूर्वीच्या सघाताला सोडून दुसऱ्या सघाताचा स्वीकार करतो. वारवार अशाच प्रकारें नदीच्या प्रवाहाप्रमाणें जन्ममरणप्रबधाचा विच्छेद न होऊ देता ( जन्ममरणपरपरा तुटू न देता, सतत ) राहणारा तो जीव कोणत्या अवस्थानीं ससार करीत राहतो तो अर्थ ( प्रकार ) दाखविणारी श्रुति त्याला त्याविषयीं वैराग्य व्हावें, ह्मणून ' पुरुषे ह वा अयमादितो गर्भो भवति यदेतद्रेत ।' असें ह्मणते

अथवा ' यावदयमेव० ' इत्यादि वरील भाष्यापासूनच पांचव्या अध्यायाच्या भूमिकेस आरभ केला आहे, असें समजून ' स एव ससरन्० ' येथ पासून पाचव्या अध्यायाच्या व्याख्यानास आरभ केला आहे, असें समजावें, ' वैराग्यहेतोः– ' ह्मणजे वैराग्यार्थ जीवाच्या अवस्था, असे जे तीन जन्म या अध्यायात सागितले आहेत ते अत्यत बीभत्सरूप ( किळस आणणारे ) आहेत यास्तव त्याचा विचार केला असता वैराग्य उत्पन्न होतें, असा भावार्थ. )

### ६ या वादाचा सारभूत अर्थ

( पण पाचव्या अध्यायाच्या भाष्यार्थास आरभ करण्यापूर्वी वाचकाना वरील सर्व वादरूप भाष्याचें रहस्य अनायासानें कळावें ह्मणून आह्मी त्याचा तात्पर्यार्थ सागतों. ऐतरेयोपनिषदाच्या पहिल्या तीन खडाचा ह्मणजेच दुसऱ्या आरण्यकाच्या चवथ्या अध्यायाचा विवक्षितार्थ काय आहे, त्या अध्यात कोणत्या विशेष अर्थाचें प्राधान्यत प्रतिपादन केलें आहे, तें सागण्यासाठीं भाष्यकार ह्मणतात–' सर्व शरीरामध्यें एकच आत्मा आहे व तोच परमेश्वर आहे, ' हा या सर्व अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे तोच जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारा, सर्वज्ञ, सर्वशक्ति, आहे त्यानेंच आपल्याहून निराळ्या दुसऱ्या कोणत्याही वस्तूचें साह्य न घेता आकाश, वायु, इत्यादि क्रमानें हें सर्व जग निर्माण केलें स्वात्म्याचा बोध व्हावा,

ह्मणून सर्व प्राणादिमान् शरीरें उत्पन्न केलीं व त्यांत प्रवेश केला आणि विचार करून आपल्या आत्म्यालाच साक्षात् सर्वव्यापक पाहिलें ह्मणून तोच सर्व शरीरातील एक आत्मा आहे.

परंतु 'हा प्रतिपाद्य विषय आहे,' असें ऐकून वादी ह्मणतो–अहो पण आत्मा जर सर्वव्यापी आहे, तोच जर सर्वांचा आत्मा ( स्वरूप ) आहे, तर तो ज्यामध्यें नाहीं, असें या सृष्टींत अणुरेणू एवढेंही कांहीं असता कामा नये. कारण ज्यात त्यानें प्रवेश केलेला नाहीं, ज्यात तो नाहीं, असें कांहीं खरोखरच असल्यास तो सर्वव्यापी आहे, सर्वात्मा आहे, या ह्मणण्यात कांहीं अर्थ नाहीं, असें होतें तेव्हा तो सर्वव्यापी आत्मा एकादी मुंगी जशी एकाद्या पदार्थांत त्याला छिद्र पाडून शिरते, त्याप्रमाणें सीमाविदारण करून मस्तकात कसा शिरला ? त्यावर भाष्यकार ह्मणतात–या अध्यायात सीमाविदारण व प्रवेश या दोनच अयोग्य गोष्टी सांगितल्या आहेत असें नाहीं, तर इंद्रियादिकांच्या अभावीं आलोचन करणें, कोणत्याही द्रव्याचें साह्य न घेता सर्व लोकाना उत्पन्न करणें, जलापासून पुरुषाकार पिंड निर्माण करणें, नुसता संकल्प करताच त्याला मुखादि छिद्रें होणें, त्या छिद्रापासून अग्नि, वायु इत्यादि लोकपाळ उत्पन्न होणें, त्याच्याशीं क्षुधा व तृषा याचा संयोग करणें, त्यानीं आपल्याला राहण्यासाठीं शरीर मागणें, त्याकरिता ईश्वरानें त्याना गाय, घोडा इत्यादिकांचीं शरीरें दाखविणें, देवतानीं त्यातील आपापल्या स्थानीं प्रवेश करणें, उत्पन्न केलेल्या जड अन्नानें पळणें, तेव्हा वागादि इंद्रियांच्या योगानें त्या अन्नाचें ग्रहण करण्याची इच्छा करणे इत्यादि सर्व निर्देश सीमाविदारण व प्रवेश यासारखेच अयोग्य–अनुपपन्न आहेत.

वादी— तुह्मालाही जर असेंच वाटत असेल तर या अध्यायात सांगितलेलें हे सर्वच अनुपपन्न आहे, असें समजणेंच उचित होय.

सिद्धान्ती— तात्त्विक दृष्ट्या तें सर्व जरी अनुपपन्न असलें, तरी केवळ आत्मज्ञानाचा उपाय, या दृष्टीनें त्याचा उल्लेख केला आहे. वास्तव

तो सर्व अर्थवाद आहे. त्यामुळें तें सर्व सर्वथा अनुपपन्न आहे, असें ह्मणतां येत नाहीं. अथवा एकाद्या लौकिक मायाव्याप्रमाणें त्या महामायावी सर्वज्ञ देवानें आपल्या मायेनें हें सर्व केलें व श्रोत्यांना त्याचाच अनायासानें बोध व्हावा ह्मणून चतुर व्यवहारी लोकांप्रमाणें आख्यायिकादि प्रपंच केला, असें समजावें. हा पहिल्यापेक्षांही अधिक योग्य पक्ष आहे. ह्मणजे वरील वर्णन हा अर्थवाद, स्तुतिवाद आहे, असें समजण्यापेक्षां तें सर्व ईश्वराच्या मायेनें होतें, असें समजणें, अधिक चांगलें. कारण लोकांना उत्पन्न केलें, त्यांत तो शिरला, इत्यादि कथाभाग जाणल्यापासून कांहीं मोठें फळ मिळतें, असें मुळींच नाहीं. पण तेंच, सर्व शरीरांत एक आत्मा आहे, हें यथार्थ स्वरूप कळलें असतां अमृतत्व ह्मणजे मोक्ष, स्वरूपावस्थान, हें फळ सर्व उपनिषदांवरून उत्तम प्रकारें सिद्ध होत आहे. गीतादि स्मृतींतही तेंच सांगितलें आहे.

वादी— अहो पण आत्मे तीन आहेत. एक जीव; तो कर्ता, भोक्ता, इत्यादि रूपानें सर्व लोक व शास्त्रें यांत प्रसिद्ध आहे. दुसरा ईश्वर; तो अनेक प्राण्यांच्या कर्मांचें फळ भोगण्यास योग्य असे लोक व देह, यांस निर्माण करणें, या शास्त्रप्रसिद्ध चिह्नावरून ज्ञात होतो. ह्मणजे जीवाची सिद्धि लोक व शास्त्रें ह्मणजे प्रत्यक्ष व शब्द या प्रमाणांवरून होते. ईश्वराची सिद्धि शास्त्रोक्त चिह्नावरून—अनुमानप्रमाणानें होते. या लोकच्या एकाद्या विचित्र कार्याचा जसा एकादा चतुर पुरुष कर्ता असतो, तसाच या विचित्र जगाचाही कोणी कर्ता असला पाहिजे, असें अनुमान होतें आणि औपनिषद् पुरुष हा तिसरा आत्मा आहे. 'ज्याच्या ठिकाणीं वाणी व मन प्रवृत्त होत नाहीं,' अशा रीतीनें उपनिषदांत त्याचें वर्णन केलें आहे. ह्मणजे त्याच्या विषयीं केवळ शब्द हेंच एक प्रमाण आहे. सारांश, असे परस्पर विलक्षण तीन आत्मे आहेत. तेव्हां आत्मा एकच, अद्वितीय व असंसारी आहे, असें जाणणें, शक्य कसें आहे?

**सिद्धान्ती**— पण तुह्मीं सांगितलेल्या तीन आत्म्यांतील पहिल जीवात्माच कसा जाणला जातो, त्याचें ज्ञान तुह्माला कसें होतें?

**वादी**— श्रवण करणारा, मनन करणारा, पाहणारा, वर्णात्मक शब्द उच्चारणारा, ध्वनि करणारा, विशेष प्रकार जाणणारा, उत्तमप्रकारें जाणणारा, इत्यादि अर्थांच्या 'श्रोता, मन्ता, द्रष्टा, आदेष्टा, घोष्टा, विज्ञाता, प्रज्ञाता' या श्रुतीवरून तो या सर्व क्रियांचा कर्ता, ह्मणून जाणला जातो

**सिद्धान्ती**— अहो पण, जो श्रवणादि क्रियांचा कर्ता ह्मणून जाणला जातो असें ह्मटलें आहे तोच '*अश्रुत, अमतः, अविज्ञातः,*' इत्यादि वाक्यावरून ज्ञानाचा विषय होत नाहीं, असाही बोध होतो. ह्मणजे जो ज्ञेय होणारा नव्हे, तोच ज्ञेय होतो, हें ह्मणणें अगदींच विरुद्ध आहे तसेंच '*मनोवृत्तीच्या साक्षीला जाणण्याचा यत्न करू नका,*' इत्यादि सांगणारीं दुसरींही अनेक वाक्यें आहेत

**वादी**— खरें आहे सुख, दुःख इत्यादि मनोविकाराप्रमाणें आत्मा जर प्रत्यक्ष ज्ञेय झाला असता तर तुह्मी ह्मणतां तसा विरोध आला असता पण तो *प्रत्यक्षप्रमाणानें ज्ञेय होत नाहीं* ह्मणूनच '*मनोवृत्तीच्या साक्षीला जाणू नका,*' असें ह्मणून श्रुतीनें त्याच्या प्रत्यक्ष ज्ञानाचा निषेध केला आहे. पण त्यावरून तो सर्वथा अज्ञेय आहे, असें मुळींच होत नाहीं तर *श्रवणादि लिंगावरून ह्मणजे ऐकणें, बोलणें, इत्यादि क्रियांवरून त्याच्या* कर्त्याचें ज्ञान अनुमानानें होतें व 'श्रोता, मन्ता॰' इत्यादि वचन तेंच सांगत आहे. ह्मणजे आत्मा प्रत्यक्ष ज्ञानाचा विषय जरी न झाला, तरी अनुमानाचा विषय होतो तेव्हां श्रुतींवर विरोध हा दोष कसा येणार?

**सिद्धान्ती**— अहो पण श्रवण करणें, इत्यादि चिह्नावरून तरी तो ज्ञात कसा होणार? कारण आत्मा जेव्हां श्रोतव्य शब्दाला ऐकतो, तेव्हां *तो ऐकणें या क्रियेनें युक्त होऊनच रहात असल्यामुळें त्यावेळीं त्याला आपल्याविषयीं किंवा दुसऱ्या कोणाविषयीं मनन किंवा निश्चय करता येत*

नाहीं. त्याचप्रमाणें मननादि दुसऱ्या क्रिया करीत असतांना श्रवणादि क्रिया संभवत नाहींत. तसेंच, मनन करणाराची मनन ही क्रिया मन्तव्य विषयावांचून दुसऱ्या कोणाविषयींही संभवत नाहीं. कुऱ्हाडीची क्रिया तिच्या विषयावरच ह्मणजे लांकडावरच होते. तिचा विषय नसलेल्या तोडणाऱ्याच्या हातावर बुद्धिपुरःसर होत नाहीं. त्याचप्रमाणें मनन करणाराची क्रिया स्वतःवरच होत नाहीं.

**वादी**— अहो पण मनाला सर्वांचें मनन करतां येतें. यास्तव सर्वांमध्यें अंतर्भूत होणाऱ्या आत्म्याचेंही मनन तें करूं शकेल.

**सिद्धान्ती**— होय, मन सर्व विषयाचें मनन करूं शकतें, हें खरें. पण अविषय आत्म्याचें, ह्मणजे मनन करणाराचें मनन करण्याचें सामर्थ्य मनामध्यें नाहीं. कारण मनालाही मनन करणाऱ्या आत्म्यावाचून विषयाचें मनन करता येत नाहीं आणि जो मनन करणारा–मन्ता तो नेहमीं मन्ताच असणार, मन्तव्य कधींही होणार नाहीं, हें उघड आहे. तो मन्ता आपणाच आपल्याला जाणतो, असें ह्मटल्यास एकतर प्रत्येक शरीरात दोन आत्मे आहेत असें होणार, किंवा एकाच आत्म्याचे दोन भाग आहेत, असें तरी ह्मणावें लागणार. कारण एक मनन करणारा व दुसरा त्याला विषय–मन्तव्य करणारा असे दोन आत्मे आहेत किंवा एका अंशानें मनन करणारा व दुसऱ्या अंशानें त्याला विषय करणारा असा एकच आत्मा द्विधा आहे, असें होऊं लागेल. पण ते दोन्ही प्रकार अनुपपन्न आहेत. कारण दोन दिव्यांतील एक प्रकाश्य व दुसरा त्याचा प्रकाशक, असें कधीं होत नाहीं. त्याचप्रमाणें मनन करणारा आत्मा जोंवर मन्तव्याचें मनन करीत असतो, तोंवर त्याला आपलें मनन करावयास अवकाशच नसतो. मनन या चिह्नावरून तो आपलें अनुमान करतो ह्मणून ह्मणावें, तर वर ह्मटल्याप्रमाणेंच एक मन्तव्य आत्मा व दुसरा त्याचें मनन करणारा असे दोन आत्मे एका शरीरांत आहेत, असें किंवा एकच आत्मा द्विधा आहे, असें प्राप्त होतें. तस्मात् आत्मा सर्वथा बुद्धिज्ञानाचा विषय–ज्ञेय न होणारा आहे.

वादी— अहो पण आत्मा प्रत्यक्ष किंवा अनुमान यांतील कोणत्याही प्रमाणानें जर ज्ञात होत नाहीं, तर 'आत्मा सर्वत्र सम आहे, असें जाणावें' असें श्रुतीनें कसें ह्मटलें आहे? किंवा त्याला श्रोता, मन्ता इत्यादि कसें ह्मटलें आहे?

सिद्धान्ती— पण श्रुतींत आत्मा श्रोतृत्वादि धर्मवान् आहे, इत्यादि जसें सांगितलें आहे, तसेंच तो अश्रोता, अमन्ता इत्यादिकही आहे, असें ह्मटलें आहे. मग असे दोन्ही प्रकारचे उल्लेख असतांना विषम दृष्टि कां ठेवतोस? आतां 'असे दोन्ही उल्लेख असतांना त्यांतील एकाच प्रकारच्या श्रुतीला प्राधान्य देऊन आत्मा श्रोतृत्वादि धर्मवान् आहे, असें ह्मणणें, ही विषम दृष्टि आहे, असें तुला जरी न भासलें तरी मला तें वाटतें. कसें ह्मणून ह्मणशील तर सांगतों. जेव्हां आत्मा श्रोता असतो तेव्हां मन्ता नसतो व जेव्हां मन्ता असतो तेव्हा श्रोता नसतो. ह्मणजे तो एकावेळीं एकच क्रिया करतो. अर्थात् त्याचें श्रोतृत्व व मन्तृत्व पाक्षिक आहे, एकपक्षी आहे, सार्वत्रिक नव्हे. येथें श्रवण करणें व मनन करणें, या दोन क्रियाचेंच उदाहरण दिलें आहे. पण तोच न्याय सर्वत्र लागू करावा आणि जेव्हां अशी स्थिति आहे तेव्हां आत्मा श्रोतृत्वादि धर्मवान् आहे कीं अश्रोतृत्वादि धर्मवान्? असा संशय आला असतां तो श्रोतृत्वादि धर्मवान्च आहे, असा तुझा पक्षपात, असें वैषम्य कां? कारण एकादा मनुष्य जेव्हां जात असतो तेव्हां तो उभा राहिलेला नसतो व जेव्हां उभा असतो तेव्हां जात नसतो; उभाच असतो. त्यामुळें त्याचें गन्तृत्व व स्थातृत्व पाक्षिक आहे, एकपक्षी आहे, नित्य नव्हे, असें ह्मणावें लागतें.

पण सिद्धान्त्याच्या या भाषणाचा अभिप्राय लक्ष्यांत न आल्यामुळें काणादादिक तार्किक श्रोतृत्व व अश्रोतृत्व इत्यादि दोन्ही प्रकारचे परस्पर विरुद्ध धर्म कादाचित्क आहेत, ( कदाचित्, कांहीं काल राहणारे आहेत, ) असें ह्मणतात. परंतु सिद्धान्त्याला तें ह्मणणें मान्य नाहीं. ह्मणून आचार्य सांग-

तात–याविषयीं काणादादिक असे समजतात– असल्या पक्षप्राप्त (एकपक्षीय) श्रोतृत्वादिकावरूनच आत्म्याला 'श्रोता, मन्ता' इत्यादि ह्मणता येतें. आत्मा व मन यांच्या संयोगापासून ज्ञान होतें एकाच वेळीं अनेक ज्ञानें होऊं शकत नाहींत 'माझें मन दुसरीकडे लागलें होतें, ह्मणून मीं पाहिलें नाहीं' इत्यादि प्रकारचें लोकाचें भाषणच, एका वेळीं अनेक ज्ञानें होत नाहींत, याविषयीं प्रमाण आहे आणि त्यावरूनच मनाच्या अस्तित्वाचीही सिद्धि होते कारण मन जर नसतें, तर चक्षु, श्रोत्र, घ्राण, इत्यादि इंद्रियांचा एकाच वेळीं रूपादिकांशीं संबध झाला असता एकाच क्षणीं रूपादि अनेक विषयांचा अनुभव आला असता कारण इंद्रियें व विषय यांचा संबंध होणें, ही सामग्री एकाच वेळीं तयार असते त्यामुळें सामग्री असताना कार्य न होण्यास काहींच कारण नाहीं पण नुसत्या विषयेंद्रियसंयोगानेंच विषयज्ञान होत, असा अनुभव येत नाहीं यास्तव क्रमानें प्रत्येक इंद्रियाशीं संयोग पावणारें व त्यामुळें ज्ञानोत्पत्तीचें कारण होणारें अणुपरिमाणाचें मन आहे, असेच समजणें सयुक्तिक होय

वादी–मग हे त्यांचें ह्मणणं जर न्याय्य आहे तर तेच सिद्धान्तरूप आहे, असें ह्मणण्यास कोणती हरकत आहे?

सिद्धान्ती–तुला तें न्याय्य वाटत असलें तर तूं त्याला सिद्धान्त समज, पण तो श्रुत्यर्थ आहे, असें ह्मणता येत नाहीं

वादी–का बरं? 'श्रोता, मन्ता' इत्यादि श्रुतानें सांगितलेलाच तो अर्थ नव्हे का?

सिद्धान्ती–नव्हे कारण 'न श्रोता, न मन्ता,' इत्यादिकही श्रुतीनें सांगितलेलें आहे.

वादी–असो पण तें श्रोतृत्वादिक पाक्षिक आहे, असें तुह्मीं आपलं मत सांगून पुनः काणादादिकानें मत सांगताना 'कादाचित्क ज्ञान' असें ह्मणून त्यांचेंच उपपादन केलं आहे तेव्हा त्यांचीच प्रकारच्या श्रुती पाक्षिक

श्रोतृत्व व पाक्षिक अश्रोतृत्व याना उद्देशून प्रवृत्त झाल्या आहेत, असें ह्मण ण्यात कोणता दोष आहे ?

सिद्धान्ती–श्रोतृत्वादिक पाक्षिक आहे, असें दाखविण्यात आमचा कोणता अभिप्राय होता तें तुमच्या लक्ष्यात आलें नाहीं. यास्तव तोच अगोदर सांगितला पाहिजे श्रोतृत्वादिक नित्यच आहे, असा आमचा सिद्धान्त आहे कारण आत्मा 'श्रोता, मन्ता' आहे व तो 'अश्रोता, अमन्ता' आहे, इत्यादि श्रुतींच्या शब्दावरून श्रोतृत्व, अश्रोतृत्व इत्यादि आत्मधर्म नित्य आहेत, असें स्वाभाविकपणेंच प्रतीत होतें यास्तव त्याचा पाक्षिकत्वानें संकोच करणें युक्त नव्हे शिवाय 'श्रोत्याच्या श्रुतीचा–श्रवणशक्तीचा लोप होत नाहीं,' अशा अर्थाची श्रुतिही आहे

वादी–अहो पण श्रोतृत्वादि धर्म नित्य आहेत असें मानल्यास प्रत्यक्ष अनुभवाच्या विरुद्ध एकाच वेळीं अनेक ज्ञानाचा उदय होणें हा दोष येईल शिवाय नित्य विज्ञानवान् आत्म्याचे ठिकाणीं अज्ञानाचा अभाव आहे, असें ह्मटल्यासारखें होईल पण तें तर अनिष्ट आहे

सिद्धान्ती–आत्मा श्रुति (श्रवणशक्ति), मति, (मननशक्ति) इत्यादि व श्रोतृत्व मन्तृत्व इत्यादि धर्मवान् आहे, असें उपनिषदात ह्मटलें आहे त्यामुळें तुह्मी ह्मणता तशा प्रकारच्या दोन्ही दोषाची प्राप्ति होत नाहीं ह्मणजे आत्म्याचे ठिकाणीं एकाच वेळीं अनेक ज्ञानें उत्पन्न होणें व त्याच्या ठिकाणीं अज्ञानाचा सर्वथा अभाव होणें, हे दोन्ही दोष येत नाहींत अनित्य, मूर्त व संयोगवियोगधर्मवान् अशा चक्षुरादि इंद्रियांची दृष्टि, मति इत्यादि अनित्यच आहे ह्मणजे ज्याप्रमाणें अग्नीचें ज्वलन तृणादिसंयोगामुळें होणारें असल्यामुळें अनित्य, नित्य नव्हे, त्याप्रमाणेंच विषयेंद्रियसंयोग व वियोग यामुळें होणारें रूपादिज्ञान व त्याचा अभाव हीं दोन्हीं अनित्य आहेत पण नित्य, अमूर्त व संयोगवियोगधर्मरहित अशा आत्म्याची दृष्टि, मति इत्यादि अनित्य नाहीं कारण त्या शक्ती त्याच्यामध्यें संयोगादिकामुळें येत नसतात ह्मणूनच 'न हि द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो वर्तते। ' असें श्रुतीनें ह्मटलें आहे

वादी–असें जर ह्मटलें तर दृष्टि, श्रुति इत्यादि शक्ती दोन दोन झाल्या चक्षूची दृष्टि अनित्य व आत्म्याची नित्य त्याचप्रमाणें श्रोत्रेंद्रियाची श्रुति अनित्य व आत्म्याची नित्य इत्यादि !

सिद्धान्ती–होय, असें तर आहेच आणि त्यामुळेंच 'दृष्टेर्द्रष्टा, श्रुतेः श्रोता' इत्यादि श्रुति उपपन्न होते व्यवहारातही नेत्राना तिमिरादि-रोगामुळें दिसेनासें झालें असता दृष्टि गेली, असें ह्मणतात व औषधादि-काच्या योगानें तिमिर रोग नाहींसा झाला असता दृष्टि आली, असें ह्मण-तात त्याचप्रमाणें आत्म्याची दृष्टि, श्रुति, इत्यादि नित्य आहे, हेंही लौकिक प्रमाणानेंच सिद्ध होतें कारण ज्याचे डोळे उपटून काढले आहेत, असाही पुरुष, मीं आज स्वप्नात माझा भ्राता पाहिला, असें ह्मणत असतो त्याचप्रमाणें ज्याचें बाधिर्य निश्चित झालें आहे, ह्मणजे जो बहिरा आहे, हें ठरलें आहे तोहि, मीं आज स्वप्नात सुदर गायन ऐकलें, असें ह्मणतो इंद्रिय-संयोगजन्य अनित्य दृष्टि हीच जर आत्मदृष्टि असती तर नेत्र उपटताच व कान फुटताच दृष्टि, श्रुति इत्यादिकाचा लोप झाला असता आणि त्या मुळें स्वप्नात त्याला रूप, शब्द इत्यादिकाचें ज्ञान झालें नसतें त्याचप्रमाणें 'न हि द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो वर्तते' 'तच्चक्षु पुरुषे येन स्वप्न पश्यति' इत्यादि श्रुती उपपन्न झाल्या नसत्या.

आत्म्याची नित्य दृष्टि बाह्य अनित्य दृष्टींचें ग्रहण करणारी आहे बाह्य दृष्टि उत्पत्ति–विनाशशील असल्यामुळें तिचें ग्रहण करणारी आत्म-दृष्टिही तशीच आहे, अशी कल्पना होते पण आत्मदृष्टि बाह्य दृष्टी-प्रमाणें आहे, असें भासणें हा भ्रम, आहे साराश, येणेंप्रमाणें आत्मदृष्टि नित्य असल्यामुळें तिला यौगपद्य किंवा अयौगपद्य नाहीं. यौगपद्य ह्मणजे एकाच वेळीं सर्व ज्ञानें होणें हा धर्म. लोक व तार्किक आगमसंप्रदायरहित असल्यामुळें त्यांना बाह्य अनित्य दृष्टि या उपाधीच्या योगानें आत्म्याचीच दृष्टि अनित्य आहे, असा भ्रम होणें अशक्य नाहीं. जीव, ईश्वर व परमात्मा असे आत्मभेदही या भ्रांतीमुळेंच संभवतात, ते वास्तविक नाहींत त्याच-

प्रमाणें नित्य, निर्विशेष 'आत्मवृष्टि आहे, ती नाहीं,' इत्यादि निरनिराळ्या श्रुतिशास्त्र वाक्यांच्या कल्पनाही भ्रांतिमूलकच आहेत. पण वाणी व मन यांचा विषय न होणाऱ्या आत्म्याचे ठिकाणीं, आहे, नाहीं, तो एक आहे, अनेक गुणवान् आहे, निर्गुण आहे, जाणतो व जाणत नाहीं इत्यादि विकल्प करण्याची इच्छा जो करतो तो आकाशाला चामड्यानें मढविण्याची, त्यावर जिन्यावरून जसें, तसें पायांनीं चढून जाण्याची, आणि जलांत माशांचीं व आकाशांत पक्ष्यांचीं पावलें पाहण्याचीही इच्छा करील! आत्मा वाणी व मन यांचा विषय होत नाहीं, याविषयीं 'नेति नेति,' 'यतो वाचो निवर्तन्ते' 'को अद्धा वेद' इत्यादि श्रुतिवचनें प्रमाण आहेत.

वादी—असें जर आहे तर 'स्व आत्मेति विद्यात्' या श्रुतिवचनानें त्याचें ज्ञान करून घ्यावें, असें कसें सांगितलें आहे? आत्मा जर वाणी व मन यांचा सर्वथा विषयच होत नाहीं, तर मीं त्याला कसें जाणावें, तें सांगा.

सिद्धान्ती—याविषयीं एक कथा सांगत असतात. कोणी एक खुळा मनुष्य, त्याच्या हातून कांहीं अपराध घडला असतां 'तुला धिक्कार असो; तूं मनुष्य नव्हेस,' असें कोणीं ह्मटलेलें ऐकून मूर्खत्वामुळेंच आपल्या मनुष्यपणाविषयीं निश्चय करून घेण्यासाठीं कोणा एकापाशीं जाऊन 'मी कोण आहें तें सांगा' असें विचारूं लागला. तेव्हां त्याचें तें मूर्खत्व ओळखून व याला आतां तूं मनुष्य आहेस, असें एकाएकीं न सांगतां क्रमानेंच बोध केला पाहिजे, असा निश्चय करून 'तूं वृक्ष नव्हेस, पाषाण नव्हेस, कीट, पक्षी, पशु नव्हेस इत्यादि प्रकारें स्थावरादिभावाचा निषेध केल्यावर तूं अमनुष्य नव्हेस, असें सांगून तो गप बसला. तें पाहून तो मुग्ध ह्मणतो—'आपण मला मी कोण, तें सांगावयास प्रवृत्त झालां. पण तें न सांगतांच मुकाट्यानें कां बसलां?' त्या मूढाच्या या भाषणाप्रमाणेंच तुमचा हा प्रश्न दिसतो. कारण 'तूं अमनुष्य नाहींस,' असें सांगितलेलें असतांनाही जो 'मी मनुष्य आहें' असें

जाणत नाहीं तो 'तू मनुष्य आहेस' असें सांगून तरी आपलें मनुष्यत्व जाणेल म्हणून कशावरून? यास्तव शास्त्रानें जसा उपदेश केला आहे तसाच आत्म्याला जाणण्याचा प्रकार आहे त्याहून निराळा प्रकार नाहीं कारण ज्याच्यामध्यें जें करण्याचें सामर्थ्य असतें त्यानेंच तें केलें पाहिजे अग्नीच्या तृणादि दाह्याला दुसरा कोणी जाळू शकत नाहीं. शास्त्र आत्म्याचा बोध करावयास प्रवृत्त होऊन वरील दृष्टान्तातील अमनुष्यत्वाच्या निषेधा प्रमाणें 'नेति नेति' असें म्हणून उपरम पावलें त्याचप्रमाणें 'अनन्तरम बाह्य' 'अयमात्मा सर्वानुभू' इत्यादि दुसऱ्या श्रुतीही निर्विषय आत्म्याचा बोध निषेधमुखानेंच करीत असतात आणि कोणत्याही निर्विषय वस्तूचा बोध अशाच प्रकारें करता येणें शक्य आहे विधिमुखानें तो करता येत नाहीं आणि जोंवर हा जीव तशा प्रकारच्या आत्म्याला जाणत नाहीं, तोंवर तो बाह्य अनित्यदृष्टिरूप उपाधीलाच आत्मा समजून अज्ञानामुळें उपाधीचे धर्म हे आत्म्याचेच धर्म आहेत, असें जाणतो. त्यामुळें तो ब्रह्मादि स्तम्बपर्यंत देव, नर व तिर्यक् योनींमध्यें पुन पुन जन्म घेत व मरत राहतो आत्म्याचें अज्ञान, त्यामुळें होणाऱ्या अनात्म पदार्थांविषयींच्या कामना व कामनामुळें होणारें प्रवृत्तिलक्षण कर्म यांच्या योगानें तो सतत संसार करीत राहतो )

७ पुरुष ह वा अय० या श्रुतिवाक्याचें व्याख्यान

('पुरुषे ह वा अयमादितो गर्भो भवति यदेतद्रेत ।' या श्रुतिवाक्यांतील 'अयं' या शब्दानें मन्त्रप्रतिपादिक 'इद' असें आहे त्याचा अर्थ भाष्यकार सांगतात–)

"अयमेवाविद्याकामकर्माभिमानवान् यज्ञादि कर्म कृत्वाऽस्माल्लोकाद् धूमादिक्रमेण चन्द्रमसं प्राप्य क्षीणकर्मा वृष्ट्यादिक्रमेण इमं लोकं प्राप्यान्नभूत पुरुषाग्नौ हुत ।" अर्थ–(या वर्णन केल्याप्रमाणें सृष्टि उत्पन्न करून व त्यांत प्रवेश करून स्थित असलेला हा) हाच अविद्या काम, कर्म व हें शरीर मी आहें असा अभिमान, यांनी युक्त असलेला जीव यज्ञादि कर्म

करून या लोकांतून धूम, रात्रि, कृष्णपक्ष इत्यादि चिह्नांनीं चिह्नित झालेल्या दक्षिणायन मार्गानें क्रमानें चंद्रमस्-लोकास प्राप्त होऊन तेथील सुखाचा उपभोग घेतल्यामुळें ) ज्याचें कर्म क्षीण झालें आहे, असा तो भोक्ता जीव पुनः मेघ, वृष्टि, पृथ्वी इत्यादिकाच्या द्वारा या भूलोकास प्राप्त होऊन अन्नरूप होत्साता पुरुषाग्नीमध्यें होम केला जातो ( आता जे गृहस्थ ग्रामात राहून इष्ट ह्मणजे अग्निहोत्रादि वैदिक कर्म, पूर्त ह्म० वापी-कूप-तडागादि लोकोपकारक स्मार्त कर्म व दत्त ह्मणजे वेदीच्या बाहेर योग्य पात्राला द्रव्य देणें इत्यादि कर्म करितात ते मरणोत्तर धूमाभिमानिनी देवतेस प्राप्त होतात, इत्यादि प्रकारें छान्दोग्याच्या पाचव्या अध्यायाच्या दहाव्या खंडात पचाग्निविद्या सागितली आहे त्यात धूमादि मार्ग प्रसिद्ध आहे पुण्य क्षय होईतों चद्रमस लोकीं राहून जीव गेलेल्या मार्गानेंच परत फिरतात ते आकाशापासून निघून वायूशीं येऊन मिळतात वायूरूप झाल्यानतर धूम होतात धूमसश्लेषानतर अभ्र होतात अभ्रानतर मेघाकार होतात मेघ वृष्टि करितात वृष्टीबरोबर खालीं येऊन व्रीहि, यव, ओषधि, वनस्पति इत्यादि अन्न होतात या अन्नभावापासून सुटून पुरुषाच्या शरीरात जाणें मात्र फार कठिण आहे ' इत्यादि वर्णन केलें आहे त्यांत 'अतरिक्ष, पर्जन्य, पृथिवी, पुरुष व स्त्री हे पाच अग्नी आहेत,' असें सागितलें आहे. त्या न्यायानें व्रीहि, यव इत्यादि अन्नाशीं सश्लिष्ट झालेला जीव ( याला अनुशयवान् ह्मणतात) पुरुषरूप चवथ्या अग्नींत होम केला जातो ह्मणजे पुरुष त्याला खातो )

" तस्मिन्पुरुषे ह वा अय ससारी रसादिक्रमेणादित' प्रथमतो रेतोरूपेण गर्भो भवतीत्येतदाह । यदेतत्पुरुषे रेतस्तेन रूपेणेति । "

अर्थ— ( ज्या पुरुषानें त्या अन्नसश्लिष्ट अनुशयवानाचें भक्षण केलेलें असतें ) ' तस्मिन्पुरुषे ह वा अय ससारी आदित -प्रथमत' गर्भो भवति- ' त्याच्यामध्यें हा ससारी ' आदित - ' स्त्रीगर्भाशयात प्रवेश करण्याच्या पूर्वी गर्भ होतो ( पण स्त्रियामध्यें जसा, तसा पुरुषामध्यें तो गर्भ कोठें दिसत नाहीं, असें कोणी ह्मणेल, ह्मणून आचार्य 'भक्षण केलेल्या अन्नाचा

रसादिक्रमानें रेतोरूपानें परिणाम झाला असता व अन्नसंश्लिष्ट जीवाचाही तसाच रेत-सश्लेषानें, रेत सबधानें रेतोभाव झाला असता त्या रूपानें पुरुषाच्या शरीरात असणारा तोच त्या पुरुषाचा गर्भ होय' असें सागतात-) 'रसादिक्रमेण रेतोरूपेण- यदेतत्पुरुषे रेत तेन रूपेण गर्भो भवति इति एतत् आह-' रस रक्त मास इत्यादि क्रमानें रेतोरूपानें ह्मणजे पुरुषामध्यें जें हें रेत असतें, त्याच्या रूपानें गर्भ होतो असें हें श्रुतिवाक्य सागतें

८ तदेतत्सर्वेभ्या० या वाक्याचें व्याख्यान

('अहो पण त्याला गर्भ असें कोणी ह्मणत नाहींत,' अशी आशका घेऊन 'स्त्रीप्रमाणेंच पुरुष त्याला आपल्या शरीरात धारण करीत असल्यामुळें गौणवृत्तीनें गर्भत्व आहे, असें सागण्यासाठीं 'तदेतत्सर्वेभ्योऽङ्गेभ्यस्तेज सभूतमात्मन्येवात्मान बिभर्ति । या श्रुतींतील 'बिभर्ति' येथपर्यंतचें हें वाक्य आहे यास्तव त्याचें आता अगोदर व्याख्यान करितात-) "तच्चैतद्रेतोऽन्नमयस्य पिण्डस्य सर्वेभ्योऽङ्गेभ्योऽवयवेभ्यो रसादिलक्षणेभ्य स्तेज सारभूत शरीरस्य सभूत परिनिष्पन्न तत्पुरुषस्यात्मभूतत्वादात्मा । तमात्मान रेतोरूपेण गर्भीभूतमात्मन्येव स्वशरीर एवात्मान बिभर्ति- धारयति ।' अर्थ— आणि तें हें रेत 'अन्नमयस्य पिण्डस्य रसादिलक्षणेभ्य सर्वेभ्य अङ्गेभ्य -अवयवेभ्य तेज शरीरस्य साररूप सभूत परिनिष्पन्न-' अन्नमय-अन्नाचा विकार अशा या पिंडाच्या रसादिरूप सर्व अगापासून-अवयवापासून तेज शरीराचें साररूप उत्पन्न झालें, सर्वत निष्पन्न झालें आहे (शरीर रसादि धातूच्या समुदायरूप आहे ह्मणून रसादिक हे त्याचे अवयव आहेत आणि रेत हा चरम शेवटचा धातु असल्यामुळें तें शरीराचें सार आहे) 'तत् पुरुषस्य आत्मभूतत्वात् आत्मा-' तें रेत पुरुषाच्या आत्मभूत असल्यामुळें आत्मा होय (रेत पुरुषाच्या 'हा मी' अशा अभिमानाचा विषय होणारें जें शरीर तद्रूप असतें, ह्मणून त्याला आत्मा असें ह्मटलें आहे) 'रेतोरूपेण गर्भीभूत त आत्मानं आत्मनि एव-स्वशरीरे एव आत्मान बिभर्ति-धारयति-' रेतोरूपानें गर्भ

झालेल्या त्या आम्याला ( पुरुष ) आत्म्यामध्येंच ह्मणजे स्वशरीरामध्येंच धारण करतो ( भाष्यात 'तं आत्मान रेतोरूपेण गर्भीभूत' असें अगोदर व्याख्यान करून नतर ' आत्मनि एव स्वशरीरे एव आत्मानं ' असा श्रुति-वाक्यातील अक्षराचा सबध दाखविला आहे. त्यामुळें ' आत्मान ' या दोनदा उच्चारलेल्या शब्दावर पुनरुक्ति दोष येत नाहीं )

१. ' तद्यदा स्त्रियां० ' इत्यादि वाक्याचें भाष्य

( याप्रमाणें पितृशरीररूप प्रथम आवसथ व त्यात रेतोरूपानें राहणें, याचें कथन करून मातृदेहरूप द्वितीय आवसथ व त्यात गर्भरूपाने राहणें याचें कथन करण्यासाठीं पितृशरीरातून निर्गमनरूप ( ह्म बाहेर निघणें, हा ) प्रथम जन्म तद्यदा स्त्रिया सिश्चत्यथैनज्जनयति तदस्य प्रथम जन्म ' या श्रुत्यशाच्या व्याख्यानानें सागतात- ) " तद्रेतो यदा-यस्मिन्काले भार्यर्तुमती तस्या योषाग्नौ स्त्रिया सिश्चत्युपगच्छन् अथ तदैनद्रेत द्रेत आत्मनो गर्भभूत जनयति पिता । तदस्य पुरुषस्य स्थानान्निर्ग-मन रेतःसेककाले रेतोरूपेणास्य ससारिण प्रथम जन्म प्रथमाव स्थाभिव्यक्ति.। सदेतदुक्त पुरस्तादसावात्माऽमुमात्मानमित्यादिना। " अर्थ--- तें रेत जेव्हा-ज्यावेळीं भार्या ऋतुमती असते तेव्हा-तिच्यामध्यें ह्मणजे स्त्रीरूप याचव्या अग्नींत- स्त्रीमध्यें ' उपगच्छन्- ' तिच्याशीं सयोग करून शिंपितो ( त्याचा सेक करितो ) तेव्हा ' एनत्-एतत् रेत - ' हें रेत, आपलें गर्भभूत रेत पिता उत्पन्न करतो ( त्या रेताला जन्म देतो ) ' तत्- अस्य पुरुषस्य रेतोरूपेण रेत सेककाले स्थानान्निर्गमन अस्य-संसारिण. प्रथम जन्म-' तें- या पुरुषाच्या रेतोरूपानें रेत सेकसमयीं त्याच्या स्थानापासून बाहेर पडणें ( हेंच ) या ससारी जीवाचें प्रथम जन्म आहे. ह्मणजे प्रथमावस्थेची अभिव्यक्ति आहे हेंच पुढें ' असौ आत्मा अमु आत्मान' या शब्दांनीं सागितलेलें आहे (वर पृष्ठ १८५ जिचा उल्लेख केला आहे त्या पचाग्निविद्येमध्यें ' योषा वाव गोतमाग्नि ' इत्यादि वाक्यानें हा सर्व अर्थ सविस्तर सागितलेला आहे, असें सागण्यासाठीं भाष्यात ' योषाग्नौ '

असें ह्मटलें आहे ' रेत भार्येच्या ठिकाणीं सिंचितो ' या वाक्याला दुसरेंही वाक्य अनुकूल आहे, असें वरील ' तदेतदुक्तं ' इत्यादि भाष्यानें सांगितलेलें आहे. ' हा आत्मा ह्मणजे पुरुष या आपल्या आत्म्याला ह्मणजे स्वत च्या रेतोरूप आत्म्याला या भार्यारूप आत्म्यापाशीं देतो० ' असा त्या वाक्याचा अर्थ आहे )

१० ' तत्स्त्रिया आत्मभूयं० ' या वाक्याचे व्याख्यान

( ' अहो पण स्त्रीशरीरात शिरलेलें तें पुरुषाचें रेत, शरीरात शिरलेल्या बाणादिकाच्या शल्याप्रमाणें स्त्रीला उपद्रव करील, ' अशी आशंका घेऊन ' तत्स्त्रिया आत्मभूयं गच्छति । यथा स्वमङ्गं तथा, तस्मादेनां न हिनस्ति । साऽस्यैतमात्मानमत्रगतं भावयति ' हें वाक्य तिचें समाधान करीत आहे. भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात- ) " **तद्रेतो यस्यां स्त्रियां सिक्तं सत्तस्या आत्मभूयमात्माव्यतिरेकतां यथा पितुरेव गच्छति प्राप्नोति यथा स्वमङ्गं स्तनादि तथा तद्वदेव । तस्माद्धेतोरेनां मातरं स गर्भो न हिनस्ति पिटकादिवत् ।** " अर्थ— तें रेत ज्या स्त्रीच्या ठायीं शिंपलेलें होत्सातें तिच्या आत्मरूप-आत्म्याहून अव्यतिरेकतेस, स्वत-हून अभिन्नतेस प्राप्त होतें, ह्मणजे तें पित्याच्या शरीररूपतेस जसें प्राप्त झालें होतें, त्याचप्रमाणें तिच्या शरीररूपतेस प्राप्त होतें. ह्मणजे जसें तिचें स्तनादि अंग त्याप्रमाणेंच तें होतें. यास्तव त्या मातेला तो गर्भ गुल्मादि ग्रंथीप्रमाणें मारीत नाहीं. ( पिटका ह्मणजे एक प्रकारची व्रणरूप गाठ. ती जिच्या उदरांत होते तिला जशी मारते, त्याप्रमाणें तो गर्भ तिला मारीत नाहीं; असा हा व्यतिरेकी दृष्टान्त आहे. याप्रमाणें श्रुतीचा अक्षरार्थ सांगून आतां पिण्डितार्थ- ह्मणजे साररूप गोळाबेरीज अर्थ सांगतात- ) " **यस्मात्स्तनादिस्वाङ्गवदात्मभूयं गतं तस्मान्न हिनस्ति न बाधत इत्यर्थः ।** " अर्थ— ज्याअर्थी स्तनादि स्वांगाप्रमाणेंच तें आत्मरूप झालेलें असतें, त्याअर्थी तें तिची हिंसा करीत नाहीं. तिला पीडा देत नाहीं, असा भावार्थ. ( आतां येथें प्रसगच आलेला असल्यामुळें त्या स्त्रीनें मोठ्या सावधानपणें

गर्भाचें रक्षण करावें, असें श्रुति विधान करते- ) " साऽन्तर्वर्त्न्येतमस्य भर्तुरात्मानमत्रात्मन उदरे गतं प्रविष्टं बुद्ध्वा भावयति-वर्धयति-पालयति गर्भं विरुद्धाशनादिपरिहारमनुकूलाशनाद्युपयोगं च कुर्वती।" अर्थ— ती गर्भवती ' अस्य-भर्तुः एतं-आत्मानं- ' या भर्त्याच्या या आत्म्याला ' अत्र-आत्मनः उदरे गतं-प्रविष्टं बुद्ध्वा भावयति-वर्धयति पालयति- ' या आपल्या उदरात प्रविष्ट झालेला जाणून ( त्याचा रेतोरूप आत्मा माझ्या उदरांत प्रविष्ट झाला आहे असें समजून ) त्याला वाढविते, त्याचें परिपालन करते. ( येथें ' भावयति ' असा जरी वर्तमानकाळ आहे, तरी ' भावयेत् ' असा विध्यर्थ समजून तिनें त्याला वाढवावें, असा अर्थ करावा आता कोणत्या उपायानें, तें सांगतात गर्भाला विरुद्ध ( अनिष्ट, अहितकर ) असलेल्या भोजनादिकाचा परिहार व अनुकूल असलेल्या भोजनादिकाचा उपयोग करणारी ती त्याचें परिपालन करते

११ ' सा भावयित्री० ' इत्यादि वाक्याचें व्याख्यान

( आता पुरुषानेंही गर्भिणी भार्येचें परिपालन करावें, असें ' सा भावयित्री भावयितव्या भवति । तं स्त्री गर्भं बिभर्ति । सोऽग्र एव कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयति । ' हें श्रुतिवचन सांगतें. भाष्यकार त्याचें व्याख्यान करितात- ) " सा भावयित्री वर्धयित्री भर्तुरात्मनो गर्भभूतस्य भावयितव्या च भर्त्रा भवति । " अर्थ-- आणि ती ' आत्मनः गर्भभूतस्य भर्तुः भावयित्री-वर्धयित्री भर्त्रा भावयितव्या-रक्षयितव्या भवति-' आपल्या गर्भभूत भर्त्याची वर्धयित्री- वाढविणारी स्त्री भर्त्याकडून रक्षणीय होते. ( भर्त्याकडून रक्षण केलें जाण्यास योग्य होते. कारण- ) " न ह्युपकारप्रत्युपकारमन्तरेण लोके कस्यचित्केनचित्संबन्ध उपपद्यते। " अर्थ- कारण यालोकीं उपकार व प्रत्युपकार यावाचून कोणाचा कोणाशींही संबंध होणें योग्य नाहीं. ( स्त्री व पुरुष यांचें परस्पर उपकारकत्व सांगून पुत्राच्या हातून पुढें होणाऱ्या पुण्यकर्माच्या प्रतिनिधित्वरूप प्रत्युपकाराची सिद्धि

व्हावी, ह्मणजे पुत्रानें पुढें त्याचीं कर्मे करणें, हा प्रत्युपकार करावा, ह्मणून तीं दोघें त्यावर उपकार कसे करितात तें सांगतात-) "त गर्भं स्त्री यथोक्तेन गर्भधारणविधानेन बिभर्ति धारयति अग्रे प्राग्जन्मन। स पिताऽग्र एव-पूर्वमेव- जातमात्र जन्मनोऽध्यूर्ध्व जन्मनो जात कुमार जातकर्मादिना पिता भावयति।" अर्थ— त्या गर्भाला ती स्त्री 'अग्रे-प्राक जन्मन.-' जन्माच्या पूर्वी वर सांगितलेल्या प्रकारच्या गर्भधारणाविधानानें धारण करते 'स पिता अग्रे एव-पूर्वे एव- जातमात्र जन्मन अधि-ऊर्ध्वं जन्मन, जात कुमार जातकर्मादिना पिता भावयति' तो पिता पूर्वीच ह्मणजे केवळ उत्पन्न झालेल्या, जन्मानतर त्या झालेल्या कुमारास जातकर्मादि सस्कारांच्या योगानें पिता वाढवितो. (श्रुतिवचनात 'अग्रे' हा शब्द दोनदा आला आहे यांतील पहिला जन्माच्या पूर्वीचा काळ सांगतो व दुसरा प्रत्यक्ष जन्मकाळ सांगतो आणि 'अधि' हा शब्द जन्माच्या नतरचा काळ सांगतो 'अग्रे एव' याचें व्याख्यान 'पूर्वे एव' हें आहे व 'पूर्वे एव' ह्याचें विवरण 'जातमात्र' हें आहे जातमात्र ह्मणजे जायमान- उत्पन्न होणारा, तत्क्षणीं 'जातकर्मादिना' ह्मणजे जन्माच्या पुर्वी सीमन्तोन्नयनादि सस्काराच्या योगानें, जननसमयीं सुखप्रसवार्थ मत्रजलप्रोक्षणादिकाच्या योगानें आणि जन्मानतर जातकर्मादिकाच्या योगानें पिता त्याचें वर्धन करतो, असा भाव)

### १२ स यत्कुमार०' या वाक्याचं व्याख्यान

(पित्यानें जातकर्मादि करावें, असें सांगून आता स यत्कुमार जन्मनोऽग्रेऽधिभावयत्यात्मानमेव तद्भावयत्येषा लोकाना सतत्या एव सतता हीमे लोकास्तदस्य द्वितीय जन्म' हे श्रुतिवाक्य त्याचीच स्तुति करतें भाष्यकारही त्याचें व्याख्यान आरभितात-) "स पिता यद्यस्मात्कुमार जन्मनोऽधि-ऊर्ध्वमग्रे जातमात्रमेव जातकर्मादिना यद्भावयति तदात्मानमेव भावयति। पितुरात्मैव हि पुत्ररूपेण जायते। तथा युक्त पतिर्जायां प्रविशतीत्यादि।" अर्थ-जो पिता ज्याअर्थी कुमाराला

जन्माच्यानंतर व उत्पन्न होतांच जातकर्मादिकांच्या योगानें वाढवितो त्यासव तें तो आपल्यालाच वाढवितो. 'हि पितुः आत्मा एव पुत्ररूपेण जायते–' कारण पित्याचा आत्माच पुत्ररूपानें उत्पन्न होतो. 'पतिर्जायां प्रविशति॰' इत्यादि मन्त्रांत तसेंच सांगितलें आहे. ('पतिर्जायां प्रविशति गर्भो भूत्वा स मातरं। तस्यां पुनर्नवो भूत्वा दशमे मासि जायते।' असा तो सर्व मंत्र असून त्याचा अर्थ असा–पति गर्भ होऊन जायेच्या ह्मणजे उत्पन्न होणाऱ्या आपल्या बालकाच्या मातेच्या उदरांत प्रवेश करतो. तिच्या ठिकाणीं तो पुनरपि नवा होऊन दहाव्या महिन्यांत उत्पन्न होतो.)

(मोक्षप्रकरणांत पुत्रोत्पादनाचें विधान केलेलें असल्यामुळें तें मोक्षाचें साधन आहे, अशा अभिप्रायानें, असें समजून वादी विचारतो–) "**तत्किमर्थमात्मानं पुत्ररूपेण जनयित्वा भावयतीति।**" अर्थ–पण आपल्याला पुत्ररूपानें उत्पन्न करून तो कशाकरितां वाढवितो ?

('कर्माच्या योगानें, पुत्रादि संततीच्या योगानें, व धनानें मोक्ष मिळत नाहीं, तर केवळ संन्यासानेंच तो मिळतो' असें सांगणारी 'न कर्मणा न प्रजया॰' इत्यादि श्रुति असल्यामुळें मोक्षप्रकरणांत पुत्रोत्पादनाचें जें वर्णन केलें आहे, तें वैराग्यासाठीं आहे, अशा अभिप्रायानें येथील श्रुतीनेंच वरील प्रश्नाचें उत्तर देतात–) "**उच्यते। एषां लोकानां संतत्या अविच्छेदायेत्यर्थः। विच्छिद्येरन्हीमे लोकाः पुत्रोत्पादनादि यदि न कुर्युः केचन।**" अर्थ–श्रुतीकडून तेंच सांगितलें जात आहे. या लोकांच्या संततीकरितां, अविच्छेदाकरितां असा भावार्थ. 'यदि केचन पुत्रोत्पादनादि न कुर्युः तदा इमे लोकाः विच्छिद्येरन् हि–' जर कोणींच पुत्रोत्पादनादि केलें नाहीं, तर हे लोक विच्छेदच पावतील. (त्यांची परंपरा तुटेल. येथें लोकशब्दानें मनुष्यलोकाच्या प्राप्तीच्या साधनभूत पुत्रपौत्रादिकांचें ग्रहण करावें. त्यांच्या ह्मणजे पुत्रपौत्रादिकांच्या अविच्छेदाकरितां. कारण पुत्रोत्पादनानेंच त्या पुत्रपौत्रादि लोकांचें संततत्व प्रसिद्ध आहे, हें सांगण्यासाठीं 'एवं संतता

हि०' इत्यादि वाक्य आहे. भाष्यकार आतां त्याचें व्याख्यान करितात-) "एवं पुत्रोत्पादनादिकर्माविच्छेदेनैव संतताः प्रबन्धरूपेण वर्तन्ते हि यस्मादिमे लोकास्तस्मात्तदविच्छेदाय तत्कर्तव्यं न मोक्षायेत्यर्थः।" अन्वयः—'हि-यस्मात् इमे लोकाः एवं पुत्रोत्पादनादिकर्माविच्छेदेन एव संतताः-प्रवन्धरूपेण वर्तन्ते तस्मात्०-' अर्थ—ज्याअर्थी हे लोक अशा-रीतीनें पुत्रोत्पादनादि कर्माच्या अविच्छेदानेंच (त्यांची परंपरा न तुटूं दिल्यानेंच) संतत-प्रबन्धरूपानें (सतत प्रवाहरूपानें) राहतात, त्याअर्थी त्यांच्या अविच्छेदाकरितां तें करावें, मोक्षाकरितां नव्हे; असा याचा अर्थ. (स्वतः एकानें यथाविधि पुत्रोत्पादन केलें असतां त्याचा पुत्रही तसेंच करितो, त्याचाही पुत्र पुढें तसेंच करतो, आणि अशारीतीनें लोकसंतति राहते. लोकांची परंपरा टिकते. (पहा रत्न १ लें पृष्ठ १९२) अर्थात् पुत्रोत्पादनाचें प्रयोजन लोकसंतति हेंच आहे, असें सांगणाऱ्या श्रुतीनें तें मोक्षाचें साधन आहे कीं काय, या शंकेचें निरसन केलें आहे. असो; या-प्रमाणें प्रसंगोपात गर्भधारणादि विधि सांगून प्रकृत वैराग्याकरितां श्रुति 'तदस्य द्वितीयं जन्म' या अंशानें दुसरा जन्म दाखविते. भाष्यकार त्याचेंच व्याख्यान करितात-) "तदस्य संसारिणः कुमाररूपेण मातुरुदराद्यन्निर्गमनं तद्रेतोरूपापेक्षया द्वितीयं जन्म द्वितीयावस्थाभिव्यक्तिः।" अर्थ—तें-या संसारी जीवाचें, कुमाररूपानें मातेच्या उदरांतून जें निघणें तें, रेतोरूपानें पितृशरीरांतून निघणें, याच्या अपेक्षेनें दुसरें जन्म, दुसऱ्या अवस्थेची अभिव्यक्ति आहे

१३ 'सोऽस्यायमात्मा०' इत्यादि वाक्याचें व्याख्यान.

(अशा रीतीनें अत्यंत अशुद्ध पितृशरीरांत अत्यंत अशुद्ध रेतोरूपानें राहणें, तेथून बाहेर निघणें, मलमूत्रानें व्यापलेल्या मातेच्या उदरांत विष्ठाकृमी-प्रमाणें (जंताप्रमाणें) निवास करणें, त्यांतूनही योनिद्वारा बाहेर पडणें, इत्यादि हें दुष्कर आहे, असें सांगून आतां जन्मानंतरही स्वातन्त्र्य नाहीं, तर पित्यानें नियुक्त केल्यामुळें (नेमल्यामुळें) परतंत्र होऊन त्यानें सर्वदा कर्माचें अनुष्ठान

करावें, असें सांगणारें ' सोऽस्यायमात्मा पुण्येभ्यः कर्मभ्यः प्रतिधीयते। ' हें श्रुतीचें वाक्य पुत्रानें पित्यावर करावयाचा उपकार दाखवीत आहे. भाष्यकार त्याचें व्याख्यान करावयास आरंभ करितात– ) " अस्य पितुः सोऽयं पुत्रात्मा पुण्येभ्यः–शास्त्रोक्तेभ्यः कर्मभ्यः–कर्मनिष्पादनार्थं प्रतिधीयते पितुः स्थाने–पित्रा यत्कर्तव्यं तत्करणाय प्रतिनिधीयत इत्यर्थः। " अर्थ—( पित्याचे दोन देह–एक स्वदेह व दुसरा पुत्रदेह. त्यांतील पुत्ररूप देहाचा उपयोग सांगतात– ) या पित्याचा तो हा पुत्रदेह पुण्यांकरितां ह्मणजे शास्त्रोक्त कर्मांकरितां ह्मणजे कर्मनिष्पादनार्थ, कर्मानुष्ठानार्थ प्रतिनिधि ( बदली ) नेमला जातो. ( पित्याच्या स्थानीं ह्मणजे पित्यानें जें करावयाचें तें करण्यासाठीं ठेविला जातो, असा याचा इत्यर्थ ).

( हें पुत्राचें प्रतिनिधित्व दुसऱ्या स्थानींही सांगितलेलें आहे, असें भाष्यकार सांगतात– ) " तथा च संप्रत्तिविद्यायां वाजसनेयके पित्राऽनुशिष्टोऽहं ब्रह्माहं यज्ञ इत्यादि प्रतिपद्यत इति। " अर्थ–त्याचप्रमाणें वाजसनेय ब्राह्मणोपनिषदांत ह्मणजे बृहदारण्यकांत संप्रत्तिविद्येमध्यें पित्यानें ज्याला शास्त्रानुसार उपदेश केला आहे असा पुत्र ' मी ब्रह्म ( वेद ) आहें, मी यज्ञ आहें, ' इत्यादि स्वीकार करतो, असें सांगितलें आहे. ( संप्रत्ति ह्मणजे संप्रदान, आपलें कर्तव्य पुत्राचे ठिकाणीं स्थापणें. तें ज्या विद्येंत–ज्या उपासनेंत सांगितलें जातें ती संप्रत्तिविद्या. तिच्यामध्यें ( बृहदारण्य॰ अ. १ ब्राह्मण ५ कंडिका १७ )–' यदा तु प्रैष्यन्मन्यते। ' जेव्हां गृहस्थ मी आतां मरणार–स्वर्गाला जाणार असें निश्चयानें जाणतो, तेव्हां ' त्वं ब्रह्म त्वं यज्ञस्त्वं सर्वलोकः– ' ह्मणजे मला अध्ययन करावयास उचित असलेला वेद ( ब्रह्म ) तूं आहेस. ह्मणजे यापुढें तूं त्याचें अध्ययन करावेंस. मला कर्तव्य असलेला यज्ञ तूं करावास. मला संपादन करावयास योग्य असलेला लोक तूं संपादन करावास; असें तो पुत्राला सांगतो. त्याला आज्ञा करतो. पित्यानें असें अनुशासन केलें असतां पुत्र ' अहं ब्रह्म अहं यज्ञः अहं लोकः इति प्रतिपद्यते ' ह्मणजे मी ब्रह्म आहें, मी

यज्ञ आहें, मी लोक आहें, असें ह्मणून पित्याच्या अनुशासनाचा स्वीकार करतो अर्थात् मी वेदाध्ययन करीन, यज्ञ करीन व लोक संपादन करीन, असें मरणोन्मुख पित्याला वचन देतो –असें सांगितलें आहे या वाक्यानें येथें स्वशरीराची तिसरी अवस्था सांगितली आहे )

## १४ अथास्यायमितर० इत्यादि वाक्याचें व्याख्यान

( 'अहो पण तो पिता आपल्या पुत्राला प्रतिनिधि का करतो, स्वत च धर्माचरण का करीत नाहीं ' अशी आशंका घेऊन तो स्वत मरत असल्यामुळें तें करावयास असमर्थ होतो, अशा अभिप्रायानें ' अथास्यायमितर आत्मा कृतकृत्यो वयोगत प्रैति । स इत प्रयन्नेव पुनर्जायते तदस्य तृतीय जन्म । ' हें श्रुतिवचन प्रवृत्त झालें आहे यास्तव त्याचें व्याख्यान करितात – ) " अथानन्तर पुत्रे निवेश्यात्मनो भारमस्य पुत्रस्येतरोऽय य पित्रात्मा कृतकृत्य कर्तव्यादृणत्रयाद्विमुक्त कृतकर्तव्य इत्यर्थ । वयोगतो गतवया जीर्ण सन्प्रैति म्रियते। स इतोऽस्मात्प्रयन्नेव शरीर परित्यजन्नेव तृणजलूकावद्देहान्तरमुपाददान कर्मचित पुनर्जायते।" अर्थ—' अथ–' ह्मणजे त्यानतर–पुनावर आपला भार टाकून ' अस्य–' या पुत्राचा ' इतर अय आत्मा ' दुसरा हा आत्मा ह्मणजे जो पित्याचा आत्मा तो ' कृतकृत्य –' ह्मणजे अवश्य कर्तव्य असें जें तीन प्रकारचें ऋण त्यापासून मुक्त होतो तो कृतकर्तव्य होतो, असा याचा इत्यर्थ ' वयोगत –' ह्मणजे 'गतवया –' ज्याचें वय गेलें आहे असा, जीर्ण होऊन 'प्रैति– ' मरतो ' स इत प्रयन्एव–' तो येथून जात असतानाच, शरीराचा त्याग करीत असतानाच तृणजलूप्रमाणेंच कर्मचित देहान्तर– ' कर्मप्राप्त दुसऱ्या देहाचा स्वीकार करून पुनरपि जन्म घेतो ( श्रुतींतील ' प्रयन्नेव ' येथील 'एव' या शब्दाचा अर्थ–एक शरीर सोडून दुसरें घेणें, यात विलब मुळींच नसतो,– असा आहे व तोच भाष्यकार तृणजलूच्या दृष्टान्तानें व्यक्त करीत आहेत तृणावर राहणारी जलू जशी तृणाच्या टोकावर जाऊन आणि दुसरें तृण तोंडानें

व पुढच्या पायानीं धरून नंतर मागचें तृण सोडते—त्यावरून आपला देह काढून घेते—त्याप्रमाणेंच हा आत्मा दुसरा देह घेऊन हा पूर्व देह टाकतो, असा दृष्टान्त देणाऱ्या दुसऱ्या एका श्रुतींत एक शरीर सोडून दुसरें शरीर घेणें; यामध्यें विलंब मुळींच नसतो, असें सांगितलें आहे आता—'देवयान' व 'पितृयाण' या दोन मार्गांनीं जाणारे जीव दुसऱ्या लोकीं गेल्यावर त्या लोकांतील व्यवहारास योग्य असें स्थूल शरीर धारण करतात, असें उत्तर-मीमांसेच्या 'उभयव्यामोहात्तत्सिद्धेः' (अ ४ पा ३ सूत्र ५) या सूत्रांत सुचविलें आहे त्यामुळें जीव पूर्व शरीर जेव्हां टाकतो, तेव्हांच उत्तरशरीराचें ग्रहण करतो, असें ह्मणता येत नाहीं—असें कोणी ह्मणेल तर तें खरें आहे, पण 'सविज्ञानो भवति। सविज्ञानमेवान्ववक्रामति' अशी बृहदारण्यक श्रुति आहे. तिचा अर्थ—'मरणाऱ्या जीवाचीं इंद्रियें व प्राण लीन होताच तो सविज्ञान होतो ह्मणजे कर्मानुसार त्याला अंत्य मति होते व त्या वासनामय भावी शरीरसंबंधीं अंत्य मतीसह तो शरीराला सोडून त्या मतीच्या अनुरोधानेंच गमन करतो.' या श्रुतीवरून जीव पूर्वशरीराला सोडतांनाच पुढच्या वासनामय शरीरांचा स्वीकार करतो, असें होतें व त्याच अभिप्रायानें तृणजलूकेचा दृष्टान्त दिला आहे, असें समजावें.)

"*तदस्य मृत्वा प्रतिपत्तव्यं यत्तृतीयं जन्म।*" अन्वय—मृत्वा यत् प्रतिपत्तव्यं तत् अस्य तृतीयं जन्म अर्थ— मरून जें शरीर घ्यावयाचें तें याचें तिसरें जन्म होय ('अशो पण पूर्वीं ज्याचे दोन जन्म सांगितले, त्याचाच तिसरा जन्म सांगणें उचित आहे. नाहींतर पूर्वीं पित्याचे

---

१ टीप—त्या सूत्राचा अर्थ असा—अर्चिरादि मार्ग व त्यानें जाणारे जीव या दोघांनाही व्यामोह झालेला असल्यामुळें ह्मणजे तीं दोन्हीं जड-अज्ञ असल्यामुळें त्यांची ऊर्ध्वगति संभवत नाहीं वास्तव स्वत प्रयत्नशून्य असलेल्या जीवाला दुसऱ्या चेतन देवतांनीच परलोकीं वाहून नेणें उचित आहे कारण कोणताही जड पदार्थ चेतनानें उचलून नेल्यावाचून एका जागेवरून दुसऱ्या जागीं जात नाहीं या लौकिक न्यायावरून मूढ जीवाला वाहून नेणाऱ्या देवताची सिद्धि होते

दोन जन्म सांगितलेले नसल्यामुळें हा त्याचा तिसरा जन्म आहे, असें एका-एकीं ह्मटल्यास अनन्वय हा दोष येईल,' अशी शंका घेतात–) " **ननु संसरत. पितु सकाशाद्रेतोरूपेण प्रथमं जन्म। तस्यैव कुमाररूपेण मातुर्द्वितीयं जन्मोक्तम्। तस्यैव तृतीये जन्मनि वक्तव्ये प्रेतस्य पितुर्यज्जन्म तत्तृतीयमिति कथमुच्यते।** " अर्थ— अहो पण संसार करणाऱ्या जीवाचें पित्यापासून रेतोरूपानें पहिलें जन्म झालें त्याचेंच मातेपासुन कुमाररूपानें दुसरें जन्म सांगितलें आता त्याचेंच तिसरें जन्म सांगावयाचें असताना मरणाऱ्या पित्याचें वासनामय उत्तरशरीरग्रहण हें तिसरें जन्म कसें सांगता? ('तो जें कुमाराचें संस्काराच्या द्वारा परिपाळन करतो, तें आपलेंच परिपाळन करतो' असें नुकेंच वर (पृष्ठ १९०) ह्मटलेलें असल्यामुळें पिता व पुत्र यांचा अभेद (ऐक्य) प्रतीत होतो वास्तव पुत्राचे जे दोन जन्म सांगितले आहेत ते पित्याचेच आहेत आणि हा तिसरा जन्मही त्याचाच आहे दुसऱ्या कोणाचा नव्हे. यास्तव 'हें त्याचें तिसरें जन्म आहे' असें ह्मणण्यात कांहीं विरोध नाहीं, असें सांगतात–) " **नैष दोष । पितापुत्रयोरैकात्म्यस्य विवक्षितत्वात्।** " अर्थ— हा कांहीं दोष नव्हे कारण पिता व पुत्र यांचें ऐकात्म्य विवक्षित आहे (अथवा पित्याच्या मरणानंतर त्याचा पुनर्जन्म होतो असें सांगितल्यामुळें पुत्राचाही तसाच तिसरा जन्म जाणता येणें शक्य आहे, अशा आशयानें 'पितुर्यज्जन्म तत्तृतीयं' असें वर ह्मटलें आहे, असें सांगतात–) "**सोऽपि पुत्र स्वपुत्रे भारं निधायेतः प्रयन्नेव पुनर्जायते यथा पिता।**" अर्थ– (त्याच न्यायानें) तोही पुत्र आपल्या पुत्रावर भार टाकून शरीर सोडून जातांनाच पुन जन्म घेतो, जसा पिता. (यास्तव पुत्राचेंच तिसरें जन्म सांगितलें आहे ह्मणजे 'तदस्य तृतीयं जन्म' या श्रुतिवाक्यांतील 'तत्' या शब्दानें त्याप्रकारचें व 'अस्य' यानें पुत्राचें, असें सांगितलें आहे. अर्थात या पुत्राचा त्याप्रकारचाच तिसरा जन्म होतो, असा त्या सर्व वाक्याचा अर्थ आहे )

( ' अहो पण पहिल्या दोन पर्यायात सांगितलेले जन्म जसे पुत्राचेच होते, तसा ह्या तिसऱ्या पर्यायात सांगितलेला जन्मही पुत्राचाच असावयास पाहिजे होता पण तसें न सांगता ' पितापुत्राच्या एकत्वाच्या विवक्षेनें, असें वर झटलें आहे, पण तसें ह्मणण्यात काय अर्थ आहे ?' अशी पहिल्या परिहाराविषयीं दोषाची आशंका घेऊन सांगतात--) " तदन्यत्रोक्तमितरत्राप्युक्तमेव भवतीति मन्यते श्रुतिः । पितापुत्रयोरेकात्मत्वात् । " अर्थ-एकाविषयीं सांगितलेलें इतराविषयींही सांगितलें आहे असें होतें, असें श्रुति समजते कारण पिता व पुत्र यांचें एकात्मत्व आहे ( त्यामुळें पित्याला मरणानंतर प्राप्त होणारा जन्म सांगितला ह्मणजे पुत्रालाही तो अवश्य होणारच असें निश्चित होतें याचा भावार्थ असा-पुत्राचे पित्याला उद्देशून होणारे प्रत्युपकार सांगण्यासाठीं तो त्याचा प्रतिनिधि होतो, असें झटल्यावर पिता स्वतःच कर्म का करीत नाहीं, तो पुत्राला प्रतिनिधि का करतो, अशी शंका येते तिचें निरसन करण्यासाठीं ' त्यानंतर पिता मरतो, ' असें सांगणें प्राप्त होतें. वास्तव मरणानंतर सांगावयाचें जें तिसरें जन्म तें लाघवासाठीं पित्याच्या ठिकाणींच सांगितलें आहे. शिवाय हे तीन जन्म पूर्वीच्या सर्वांनाही प्राप्त झालेले आहेत, असें दाखविण्यासाठीं पुत्राच्या ठिकाणीं सांगावयास उचित असलेलेंही जन्म पित्याच्या ठिकाणीं सांगितलें आहे )

१५ ' तदुक्तमृषिणा० ' इत्यादि श्रुतिभागाचें व्याख्यान

( मागच्या ह्मणजे चवथ्या अध्यायातील अध्यारोपप्रकरणात तीन आवसथ सांगितले होते. वैराग्याकरिता त्याचाच येथें विस्तार करून आतां त्याच अध्यायांत या निवृत्त करण्यास उचित असलेल्या संसाराचा अपवाद करण्यासाठीं ' स एतमेव० ' इत्यादि वाक्यानें ( पृष्ठ १२८ ) जें तत्त्वज्ञान सांगितलें होतें त्याचेंच फल सांगून अधिक प्रपंच करण्यासाठीं ' तदुक्तमृषिणा – " गर्भे नु सन्नन्वेषामवेदमहं देवाना जनिमानि विश्वा । शतं मा पुर आयसीररक्षन्नध श्येनो जवसा निरदीयमिति । " गर्भ एवैतच्छयानो

वामदेव एवमुवाच ।' असा श्रुतिभाग आहे भाष्यकार त्यातील 'तत्' या पहिल्या शब्दाचा अर्थ सांगतात- ) " एवं संसरन्नवस्थाभिव्यक्तित्रयेण जन्ममरणप्रबन्धारूढः सर्वो लोकः संसारसमुद्रे निपतितः कथंचिद्यथाश्रुत्युक्तमात्मानं विजानाति यस्यां कस्यांश्चिदवस्थायां तदैव मुक्तसर्वसंसारबन्धनः कृत्यकृत्यो भवतीत्येतद्वस्तु तत् ऋषिणा-मन्त्रेणाप्युक्तमित्याह । " अर्थ— अशा प्रकारें तीन अवस्थांच्या अभिव्यक्तीनें संसार करणारा, व जन्म-मरणपरंपरेवर आरूढ झालेला (परंपरेत-प्रवाहांत पडलेला ) सर्व लोक ( प्राणिमात्र ) संसारसमुद्रांत पडला आहे पण तो कसा तरी मोठ्या कष्टानें श्रुतींत जसें वर्णन केलें आहे, तशा प्रकारच्या आत्म्याला कोणत्याही एकाद्या अवस्थेंत जेव्हां जाणतो, तेव्हां तो लागलाच सर्व संसारबंधनापासून मुक्त होऊनतात कृतकृत्य होतो, ही प्रतिपाद्य वस्तु ऋषीनें ह्मणजे एका मंत्रानेंही सांगितली आहे, असें श्रुति ह्मणते ( ह्मणजे संसारसागरांत पडणें व नंतर तत्त्वज्ञानानें संसाराची निवृत्ति होणें, ही वस्तु हा 'तत्' या शब्दाचा अर्थ आहे. )

" गर्भे नु-' मातुर्गर्भाशय एव 'सन्' 'नु' इति वितर्के । अनेकजन्मान्तरभावनापरिपाकवशात् 'एषां' देवानां- वागग्न्यादीनां 'जनिमानि-' जन्मानि 'विश्वा-' विश्वानि सर्वाण्यन्ववेदमहमहो अनुबुद्धवानस्मीत्यर्थः । 'शत-' अनेकं बह्व्यो 'मा-' मां 'पुर आयसी' आयस्यो लोहमय्य इवाभेद्यानि शरीराणीत्यभिप्राय । 'अरक्षन्-' रक्षितवत्यः संसारपाशनिर्गमनाद् । 'अधोऽथ' 'श्येन' इव जालं भित्त्वा 'जवसा' आत्मज्ञानकृतसामर्थ्येन 'निरदीय-' निर्गतोऽस्मि । " अर्थ-' गर्भे नु-' मातेच्या गर्भाशयांतच 'नु' असतांना, येथील 'नु' हा निपात वितर्क या अर्थी आहे अनेक जन्मान्तरीं केलेल्या आत्मानात्मविवेकभावनेचा परिपाक झाल्यामुळें 'एषां देवानां-' वाग, अग्नि इत्यादि देवांचीं 'विश्वा जनिमानि-' सर्व जन्म 'अहं अन्ववेद-' मीं जाणलें 'अहो' काय हो आश्चर्य सांगावें. मी

त्याच्या जन्माना जाणता झालों, असा याचा इत्यर्थ. 'शत–' अनेक, बहुत 'आयसीः पुर – ' लोखंडी पुरें–लोखडानें केलेल्याप्रमाणें अभेद्य असलेलीं शरीरे, असा याचा अभिप्राय 'मा–' मला मी संसारपाशातून निघून जाऊं नये ह्मणून 'अरक्षन्–' रक्षण करीत होतीं 'अध ' पण आता 'श्येन (इव )–' श्येन पक्ष्याप्रमाणें जाळ्याला तोडून 'जवसा– ' आत्मज्ञानामुळें प्राप्त झालेल्या सामर्थ्यानें 'निरदीय–' मी त्यातून निघालों आहें (येथें सांगितलेले शरीरग्रहणरूप जन्म व त्यानीं उपलक्षित होणारा सर्व संसार, वागादिइंद्रियें व त्याच्या अधिष्ठातृ देवता यांच्या संघाताचा ह्मणजे लिंग शरीराचाच आहे, असंग व सर्वव्यापक अशा माझा नव्हे, असा 'देवाचे सर्व जन्म ' या वाक्याचा अर्थ आहे या उक्तीनें पदार्थविवेकपूर्वक आत्मज्ञान सांगितलें आहे अथवा सर्वज्ञ आत्म्यापासून याचे जन्म झाले आहेत, असें मीं जाणलें ह्मणजे याच्या जन्माच्या मूलभूत, मूलकारण अशा आत्म्याला मीं जाणलें, असा इत्यर्थ गर्भामध्यें जरी ज्ञानाची श्रवणादि सामग्री नसली तरी पूर्व जन्मीं केलेल्या श्रवणादि सामग्रीमुळेंच प्रतिबंध निवृत्त झाला असता गर्भामध्येंही ज्ञानोत्पत्ति होऊं शकते, असा अभिप्राय त्याच्यापूर्वीं बंध कोणता होता तें 'शत पुर०' इत्यादि वाक्यानें सांगितलें आहे तत्त्वज्ञानावाचून त्या शरीररूपी पुराचा प्रवाह विच्छिन्न होत नाहीं, ह्मणून भाष्यकारानीं त्याना अभेद्य ह्मटलें आहे 'अधोऽध ' ह्मणजे अधो लोकातच, निकृष्ट लोकातच तीं नगरें माझें रक्षण करीत होतीं, असा याचा अर्थ किंवा 'अध ' हें श्रुतींतील पद 'अथ ' या अर्थीं आहे त्यामुळें 'अध ' ह्मणजे अनन्तर, आता )

(आता मन्त्रद्रष्ट्या ऋषीचा अभिप्राय सांगतात– ) "अहो गर्भ एव शयानो वामदेव ऋषिरेवमुवाचैतत् ।" अर्थ–'अहो ' खरो खर हें मजविषयीं मोठें आश्चर्य घडलें, अशा अभिप्रायानें गर्भांतच शयन करणारा वामदेव ऋषि हें असें बोलला, हा मंत्र बोलला, असा याचा भावार्थ (मंत्रद्रष्ट्याचा नामनिर्देश करून मंत्राचें तात्पर्य सांगण्याकरिता

' गर्भ एव० ' इत्यादि ब्राह्मण आहे. ' गर्भे एव शयानो० ' इत्यादि भाष्यांत त्याचाच निर्देश केला आहे. ' एतत्– ' पूर्व ब्राह्मणांत सांगितलेला अर्थ ' एव–' ह्मणजे मंत्रात सांगितल्याप्रमाणें ' उवाच ' सांगता झाला असा अन्वय.)

१६ ' स एवं विद्वान्० ' इत्यादि वाक्याचें भाष्य.

( ज्ञानाचें कधींही व्यभिचार न पावणारें, निश्चित फळ आहे, हें सांगण्यासाठीं वामदेवाला ज्ञानाचें फल कसें मिळालें तें सांगणें उचित आहे, आणि त्याकरिताच ' स एवं विद्वानस्माच्छरीरभेदादूर्ध्व उत्क्रम्यामुष्मिन्स्वर्गे लोके सर्वान्कामानाप्त्वाऽमृतः समभवत् समभवत् । 'हें या अध्यायाचें शेवटचें वाक्य आहे. त्याचें व्याख्यान करितात–) "स वामदेव ऋषिर्यथोक्तमात्मानमेवं विद्वानस्माच्छरीरभेदाच्छरीरस्याविद्यापरिकल्पितस्यायसवदनिर्भेद्यस्य जननमरणाद्यनेकानर्थशताविष्टशरीरप्रबन्धनस्य परमात्मज्ञानामृतोपयोगजनितवीर्यकृतभेदात्-शरीरोत्पत्तिबीजाविद्यादिनिमित्तोपमर्दहेतोः शरीरविनाशादित्यर्थः । ऊर्ध्वः परमात्मभूतः सन्नधोभावात्संसारादुत्क्रम्य ज्ञानावद्योतितामलसर्वात्मभावमापन्नः सन्नमुष्मिन्यथोक्तेऽजरेऽमरेऽमृतेऽभये सर्वज्ञेऽपूर्वेऽनपरेऽनन्तेऽबाह्ये प्रज्ञानामृतैकरसे प्रदीपवन्निर्वाणमत्यगमत्स्वर्गे लोके स्वस्मिन्नात्मनि स्वे स्वरूपेऽमृतः समभवदात्मज्ञानेन । पूर्वमाप्तकामतया जीवन्नेव सर्वान्कामानाप्त्वेत्यर्थः । द्विर्वचनं सफलस्य सोदाहरणस्यात्मज्ञानस्य परिसमाप्तिप्रदर्शनार्थम् । " अर्थ— वर दर्शन केलेल्या प्रकारच्या आत्म्याला जाणणारा तो वामदेव ऋषि या शरीराचा भेद झाल्यामुळें, ह्मणजे अविद्येमुळें परिकल्पित व लोखंडाप्रमाणें भेद न पावणाऱ्या या जननमरणादि अनेक शत अनर्थांनीं भरलेल्या शरीरसंज्ञक उत्कृष्टबंधनाचा परमात्मज्ञानरूपी अमृताचा उपयोग केल्यामुळें उत्पन्न झालेल्या वीर्यानें शरीराच्या उत्पत्तीचें बीज, अशा अविद्यादि निमित्ताचा उपमर्द ( क्षय ) झाल्यामुळें, नाश झाल्यामुळें, शरीराचा विनाश झाल्याकारणानें, असा याचा इत्यर्थ. ( ह्मणजे अविद्येनें कल्पिलेल्या, लोखंडाप्रमाणें दृढ असलेल्या व अनेक

अनर्थांनीं भरलेल्या या शरीराचा तत्त्वज्ञानानें शरीरोत्पत्तीच्या अविद्याख्य बीजाचा नाश झाल्यामुळें विनाश झाला असतां, असा भाव. ) ऊर्ध्व ह्मणजे परमात्मभूत होत्साता अधोभाव जो संसार, त्यापासून वर निघून, ज्ञानाच्या योगानें प्रकाशित झालेल्या शुद्ध सर्वात्मभावास प्राप्त होऊन 'अमुष्मिन्–' ह्मणजे वर सांगितलेल्या प्रकारच्या अजर, अमर, अमृत, अभय, सर्वज्ञ, अपूर्व, अनपर, अनन्त, अबाह्य, केवळ प्रज्ञानामृतस्वरूप अशा स्वर्ग लोकांत ह्मणजे स्वात्म्यामध्यें–स्वरूपांत प्रदीपाप्रमाणें निर्वाण पावला. 'आत्मज्ञानेन अमृतः समभवत्–' आत्मज्ञानानें अमृत झाला. पण अमृत होण्यापूर्वीच सर्व कामना, सर्व इष्ट भोग, ज्याला प्राप्त झाले आहेत, असा झाल्यामुळें जिवंत असतानांच सर्व उपभोगांस प्राप्त होऊन, असा याचा अर्थ. मूळ श्रुतींत शेवटीं 'समभवत् समभवत्' असें जें दोनदां ह्मटलें आहे तें सफल व सोदाहरण आत्मज्ञानाची परिसमाप्ति झाली, हें दाखविण्यासाठीं आहे. (ह्मणजे ज्या आत्मज्ञानाचें अमृतत्व हें फल व वामदेव हें उदाहरण येथें सांगितलें आहे, त्याची समाप्ति सुचविण्यासाठीं शेवटचें पद दोनदां उच्चारलें आहे. 'ऊर्ध्व' हा शब्द वरचा, वर, या अर्थाचा वाचक आहे, आणि परमात्मवस्तूला केव्हांही अधोभावरूप निकर्ष नाहीं. यास्तव त्याला निरतिशय उपरिभाव आहे. त्यामुळें तो परमात्मा ऊर्ध्वभावाचा वाच्य होतो. 'अमुष्मिन् स्वर्गे लोके–' ह्मणजे परोक्ष स्वर्गलोकीं असें कोणी समजेल. ह्मणून भाष्यकारांनीं त्याचा अर्थ 'स्वस्मिन् आत्मनि स्वे स्वरूपे' असा केला आहे. स्वात्माही इंद्रियांचा विषय होत नाहीं. यास्तव त्याला 'अमुष्मिन्' ह्मणजे परोक्ष असलेल्या, असें ह्मणतां येतें. स्वर्गशब्द निरतिशय सामान्य सुखाचा वाचक आहे, आणि ब्रह्मानन्दच निरतिशय सुखरूप आहे. यास्तव त्यालाच मुख्य स्वर्गत्व आहे. विषयजन्य सुखाला स्वर्ग ह्मणून जें ह्मणतात तें आपेक्षिक होय. (आपेक्षिक ह्मणजे एकाच्या अपेक्षेनें दुसरें अधिक सुख. ब्रह्मरूप स्वर्ग स्वात्म्याहून भिन्न आहे, अशी शंका कोणाला येऊं नये, ह्मणून भाष्यांत 'स्वस्मिन्' असें ह्मटलें

आहे. आत्मशब्दाचे अन्तःकरण, देह, इत्यादि दुसरेही अर्थ आहेत. पण येथील हा आत्मशब्द त्या अर्थी नाहीं, हें सुचविण्यासाठीं भाष्यात 'स्वे स्वरूपे' असें ह्मटलें आहे. इंद्रियादिकांचा विषय न होणाऱ्या आनंदरूप आत्म्यामध्यें मनुष्यदेहादिकांचा भाव सोडून स्वात्मभावानेंच तो स्थित झाला, असें 'अमृतः समभवत्' या शब्दांनीं सांगितलें आहे. येथें सांगितलेल्या या स्वर्गलोकात सर्व कामनाची प्राप्ति होते, असा भ्रम कोणाला होऊं नये ह्मणून 'पूर्वं आप्तकामतया' असें ह्मटलें आहे, व 'पूर्वं' ह्मणजे जीवन्मुक्तिदशेंत व 'आप्तकामतया–' प्राप्तकामत्वामुळें, सर्वात्मत्वामुळें असा त्याचा अर्थ आहे. सर्व भूतांचा व सर्व भौतिक पदार्थांचा आत्मा–स्वरूप मी आहें, माझ्या व त्याच्या स्वरूपात भेद काहीं नाहीं, असें समजल्यावर त्या तत्त्वज्ञाला इच्छा कशाची राहणार? कारण कोणत्याही अप्राप्त वस्तूचीच इच्छा होणें शक्य आहे. प्राप्त वस्तूची इच्छा कोणालाही कधीं होत नाहीं. आत्मज्ञाला सर्व वस्तूचें स्वरूप व माझें स्वरूप एकच आहे, असें निश्चयानें कळलेलें असल्यामुळें त्याला अप्राप्त काहीं नसतें. ह्मणून तो जिवंतपणींच प्राप्तकाम होतो, सर्वात्मा होतो आणि असा सर्वात्मा झाल्यामुळें मर्त्य देहादिभाव सोडून, मी मरणधर्मवान् देह आहें, हा दुरभिमान सोडून, अमृत ह्मणजे आत्मभावानें स्थिर होतो. असें होणें हेंच आत्मज्ञानाचें फळ व वामदेव हें त्याचें उदाहरण आहे.)

येथें ऐतरेयोपनिषद्भाष्यार्थाचा चवथा खंड व दुसऱ्या आरण्यकाचा पाचवा अध्याय सामाप्त झाला (या अध्यायाचा खंड एकच आहे.)

---

## १ 'कोऽयमात्मा०' इत्यादि पांचव्या खंडाच्या पहिल्या वाक्याचें व्याख्यान.

(पूर्व अध्यायात आत्मज्ञानाच्या उत्पत्तीकरिता तीन जन्मांचें निरूपण करून त्याविषयीं वैराग्य निरूपिलें. ह्मणजे असल्या जन्माविषयीं विरक्त होणेंच सर्वथा उचित आहे, असें सुचविलें. पण पदार्थशोधनावांचून नुसत्या

वैराग्यानें ज्ञानोत्पत्ति होत नाहीं; यास्तव पदार्थशोधनपूर्वक वाक्यार्थ सांगण्यासाठीं हा सहावा अध्याय प्रवृत्त झाला आहे, असा अभिप्राय मनांत धरून भाष्यकार पदार्थशोधनाविषयीं अधिकारी कोण तें दाखवीत 'कोऽयमात्मेति वयमुपास्महे कतरः स आत्मा।' हें पहिलें वाक्य व्याख्यानासाठीं पुढें आणतात– ) "**ब्रह्मविद्यासाधनकृतसर्वात्मभावफलावाप्तिं वामदेवाद्याचार्यपरम्परया श्रुत्याऽवद्योत्यमानां ब्रह्मवित्परिषद्यत्यन्तप्रसिद्धामुपलभमाना मुमुक्षवो ब्राह्मणा अधुनातना ब्रह्मजिज्ञासवोऽनित्यात्साध्यसाधनलक्षणात्संसारादाजीवभावाद्व्यावृत्तवो विचारयन्तोऽन्योन्यं पृच्छन्ति कोऽयमात्मेति।**" अन्वयः—श्रुत्या वामदेवाद्याचार्यपरम्परया अवद्योत्यमानां ब्रह्मवित्परिषदि अत्यन्तप्रसिद्धां ब्रह्मविद्यासाधनकृतसर्वात्मभावफलावाप्तिं उपलभमानाः अधुनातनाः मुमुक्षवः ब्रह्मजिज्ञासवः ब्राह्मणाः अनित्यात् साध्यसाधनलक्षणात् संसारात् आजीवभावात् व्याविवृत्सवः सन्तः विचारयन्तः अन्योन्यं 'कः अयं आत्मा' इति पृच्छन्ति। अर्थ—श्रुतीनें वामदेवादि आचार्यांच्या परंपरेनें जिचें प्रकाशन केलें आहे व जी ब्रह्मवेत्त्यांच्या सभेंत अत्यन्त प्रसिद्ध आहे अशा ब्रह्मविद्यारूप साधानानें प्राप्त होणाऱ्या सर्वात्मभावरूप फलाच्या प्राप्तीस पाहणारे ( त्या फलप्राप्तीची ज्यांना उपलब्धि–ज्ञान झालें आहे, असे ) आधुनिक मुक्त होण्याची इच्छा करणारे, ब्रह्माला जाणण्याची इच्छा करणारे ब्राह्मण अनित्य, आणि साध्य व साधन हें ज्याचें लक्षण–स्वरूप आहे, अशा जीवभावापर्यंत सर्व संसारापासून निवृत्त होण्याची इच्छा करणारे व त्याकरितां विचार करणारे होत्साते एकमेकांस 'हा आत्मा कोण?' असें विचारतात. ('वामदेवादि' येथील आदिशब्दानें '*देवांतील जो जो त्या ब्रह्माला साक्षात् जाणता झाला तो तो तेंच झाला*' इत्यादि अर्थाच्या 'यो यो देवानां प्रत्यबुध्यत स एव तद्भवत्' या श्रुतिवाक्यानें सांगितलेले देवादिक घ्यावे. 'अधुनातनाः' ह्मणजे आधुनिक. आधुनिक ह्मणजे वर सांगितल्याप्रमाणें वैराग्याची उत्पत्ति झाल्यानंतर. '*आजीवभावात्*' ह्मणजे जीवभावापर्यंत; संसाराला कारण होणारी

अविद्या व तिचें कार्य यांच्या ठिकाणीं असलेला जो आत्मभाव, ह्मणजे 'हेंच मी' अशा प्रकारचा अभिमान, तोच जीवभाव. तेथपर्यंत पसरलेल्या संसारापासून परत फिरण्याची, त्या संसारास सोडण्याची इच्छा करणारे).

(आतां वाक्याचा संबंध दाखवून विचाराचा प्रकारच स्पष्ट करण्यासाठीं श्रोता प्रश्न करितो-) "कथं।" अर्थ—तें कसें विचारतात? "यमात्मानमयमात्मेति साक्षाद्वयमुपास्महे कः स आत्मेति।" अर्थ-'वयं-' आह्मी 'यं आत्मानं अयं आत्मा, इति साक्षात् उपास्महे-' ज्या आत्म्याची 'हा आत्मा' अशी साक्षात् उपासना करण्यास प्रवृत्त झालो आहों. 'सः कः आत्मा इति (पृच्छन्ति)' तो कोण आत्मा, असें परस्पर विचारूं लागले. 'अहो पण 'हा आत्मा' असा त्याचा विशेषतः निश्चय झाला असतां 'सः कः' ह्मणजे तो कोण? असा प्रश्न उपपन्न होत नाहीं. तसेंच, त्याच्या विचाराचें कांहीं फळही नाहीं,' अशी आशंका घेऊन आत्म्याला अधिक स्पष्ट करितात-) "यं चात्मानमयमात्मेति साक्षादुपासीनो वामदेवोऽमृतः समभवत्तमेव वयमप्युपास्महे को नु खलु स आत्मेति।" अर्थ—आणि ज्या आत्म्याची 'हा आत्मा' अशा रीतीनें साक्षात् उपासना करणारा वामदेव अमृत झाला, त्याच आत्म्याची आह्मीही उपासना करण्यास प्रवृत्त झालों आहों. पण कोण बरें खरोखर तो आत्मा आहे? (वामदेव ज्या आत्म्याची उपासना करून अमृत झाला त्याच आत्म्याची उपासना करण्यास आह्मीही प्रवृत्त झालों आहों. तो कोण? असा या प्रश्नाचा अर्थ आहे. उपासन ह्मणजे उप-सामीप्यानें, ऐक्यानें. कारण ऐक्यालाच मुख्य सामीप्य असतें. यास्तव उप ह्मणजे ऐक्यानें अपरोक्ष जाणून 'आसनं' ह्मणजे राहणें. अर्थात् तद्रूप होऊन राहणें. अथवा 'मी सुखी, मी दुःखी,' इत्यादि व्यवहारांत आह्मी त्याचीच उपासना करतों. ह्मणजे सुखी, दुःखी होणारालाच आत्मा समजून राहतों. पण आत्मभिन्न असलेला अनात्मा जड असतो, त्यामुळें त्याला 'मी' अशी प्रतीति येण्याचा संभव नाहीं. यास्तव 'तो

आत्मा कोण ' हा विचाराचा विषय आहे ' अहो पण ' हा आत्मा ' असा निश्चय झाल्यावर त्याचा विचार संभवत नाहीं, ' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण तोच शरीर व इंद्रियें यानीं व्यापलेला असल्यामुळें त्याचें शोधन करण्यासाठीं ह्मणजे त्याला उपाधिरहित करण्यासाठीं विचार करणें योग्य आहे )

( ' अहो पण, भूताना व्यक्त करण्यासाठीं जो शरीरात शिरला तो आत्मा, असा निश्चय संभवत असल्यामुळें विचार करण्याची आवश्यकता नाहीं, ' अशी शंका घेऊन शरीरात दोघानीं प्रवेश केला असें ह्मटलेलें असल्यामुळ त्यातील ' आत्मा कोण ' हें निश्चयानें ठरलेलें नाहीं, असें साांगण्यासाठीं आचार्य पण श्रुतीनें दोघानीं प्रवेश केला, असें सांगितले आहे,' असें सांगतात- ) " **एवं जिज्ञासापूर्वमन्योन्यं पृच्छतामतिक्रान्तविशेषविषयश्रुतिसंस्कारजनिता स्मृतिरजायत ।** ' अर्थ—याप्रमाणें जिज्ञासापूर्वक एकमेकास विचारणाऱ्या त्याना पूर्वी सांगितलेल्या विशेषविषयकश्रुतींच्या संस्कारापासून उत्पन्न झालेली स्मृति झाली ( अतिक्रान्त ह्म पूर्वी सांगितलेले जे विशेष ह्मणजे देहात प्रविष्ट झालला आत्मा व प्राण, त्याविषयींच्या श्रुतीपासून उद्भवलल्या अनुभवजन्य संस्काराच्या योगानें स्मरण झालें, असा याचा इ यर्थ आता ती स्मृतिच स्वरूपत दाखवितात- ) "**त प्रपदाभ्या प्रापद्यत ब्रह्मेम पुरुषम् ।**" अन्वय —स इम पुरुष-शरीरं प्रपदाभ्या-पादाग्राभ्या ब्रह्म-अपरब्रह्मरूप प्राण प्रापद्यत-प्रविष्ट । अर्थ—त्या या पुरुषात-शरीरात पादाग्राच्या द्वारा ब्रह्म ह्मणजे अपर ब्रह्मरूप प्राण प्रवेश करता झाला ( आता दुसऱ्या ब्रह्माच्या प्रवेशाविषयींची श्रुति सांगतात- ) " **स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत ।** " अर्थ- तो परमात्मा याच पिंडाच्या केशविभागस्थानास विदीर्ण करून-भोंक पाडून त्या द्वारानें शिरला ( आता या दोन श्रुतींच्या योगानं कोणत्या अर्थाची प्राप्ति झाली तें सांगतात- ) " **एतमेव पुरुषं अत्र द्वे ब्रह्मणी इतरे**

तरप्रातिकूल्येन प्रतिपन्ने इति। " अर्थ– 'अत्र-' या दोन श्रुतींच्या योगानें ' इतरेतरप्रातिकूल्येन–' एकमेकाच्या समोरासमोर ' एत एव पुरुष–शरीर–' याच पुरुषशरीरात ' द्वे ब्रह्मणी प्रतिपन्ने– ' दोन ब्रह्में प्रविष्ट झालीं ' इति ' अशी स्मृति झाली. ( येथील ' एतमेव ' या शब्दावरून ' स एतमेव पुरुष ब्रह्मततममपश्यत् ' हें वाक्य व ' द्वे ब्रह्मणी– ' या शब्दावरून ' द्वे ब्रह्मणी वेदितव्ये' हें वाक्य, अशीं हीं दोन वाक्यें त्या दोघाच्या प्रवेशाविषयीं प्रमाण ह्मणून येथें दिलीं आहेत, असें समजू नये कारण पहिल्या वाक्यात दोघाच्या प्रवेशाची प्रतीति होत नाहीं, आणि दुसऱ्या वाक्यात शब्दब्रह्म व परब्रह्म याचें कथन केलेलें असल्यामुळें तेंही दोन आत्म्याच्या प्रवेशाविषयीं प्रमाण होऊ शकत नाहीं )

( पण दोन्हीकडून प्रवेश केलेल्या त्या दोघाना आत्मत्व आहे, अशी शकाच कशी येते, असें कोणीं विचारील ह्मणून सागतात– ) " ते चास्य पिण्डस्यात्मभूते। " अर्थ— ते दोघे या शरीराचे आत्मभूत आहेत (त्यातील एकाच्याही अभावीं शरीराची स्थिति सभवत नाहीं यास्तव लोक त्या दोघानाही आत्मा समजतात त्यामुळें त्याविषयीं सशय येतो असो, याप्रमाणें विचाराला अतिशय अपेक्षित असलेल्या दोन आत्म्यांचें स्मरण झालें असें मागून आता विचारच सागतात–) "तयोरन्यतर आत्मोपास्यो भवितुमर्हति। योऽत्रोपास्य क स आत्मेति विशेषनिर्धारणार्थं पुनरन्योन्य प्रपच्छुर्विचारयन्त। " अर्थ— त्या दोघातील कोणता तरी एक आत्मा उपास्य होण्यास योग्य आहे ( कारण ' आत्मा वा इदमेक एव ' या पहिल्याच वाक्यानें एकालाच ज्ञेयत्व सागितलेलें आहे दोघां आत्म्याना उपास्यत्व आहे, दोन्ही आत्मे उपासनेचे विषय आहेत, असें सागितलें नाहीं ) यास्तव ' य अत्र उपास्य आत्मा स क– ' जो येथें उपास्य आत्मा आहे, तो कोण? असा विशेषप्रकारें निश्चय करण्यासाठीं विचार करणारे ते कतर स आत्मा ' ह्मणजे त्या दोघातील तो आत्मा कोणता? असें पुनरपि परस्परांना विचारू लागले

## २ पुढील वाक्याचा संक्षिप्त अर्थ.

( याप्रमाणें विचार करूं लागताच त्या ब्राह्मणाचें अंतःकरण अतिशय शुद्ध असल्यामुळें पादाग्रातुन शिरलेल्या ब्रह्माला करणत्व आहे व मस्तकातून शिरलेल्या ब्रह्माला आत्मत्व आहे, असा त्याचा निश्चय झाला, असें सागतात- ) " **पुनस्तेषां विचारयतां विशेषविचारणास्पदविषया मतिरभूत्** । " अर्थ— पुनः विचार करणाऱ्या त्याची विशेष विचाराच्या आधाराविषयीं मति झाली. ( त्याच्या विचाराचें आस्पद्- आधार प्राण व आत्मा होता. यास्तव त्या दोघाविषयीं एक करण व दुसरा ज्ञाता, याप्रकारें विशेषरूप मति झाली. अहो पण त्या दोघानाही जर सत्ता असती तर विशेष मति झाली असती. पण दोघाना सत्ताच नाहीं, अशी शका घेतात–) " **कथ** " अर्थ— प्राण व आत्मा या दोघानाही सत्ता नसते तेव्हा त्याविषयीं विशेष मति कशी होते ? (असा याचा भावार्थ. मी चक्षूनें पाहतों, इत्यादि प्रकारें दोघाची प्रतीति येत असल्यामुळें 'दोघांना सत्ता नाहीं, करण व ज्ञाता असे दोन पदार्थच नाहींत,' असें ह्मणणें योग्य नव्हे, असे सागतात ) " **द्वे वस्तुनी अस्मिन्पिण्ड उपलभ्येते** । " अर्थ— या पिंडात दोन वस्तू उपलब्ध होतात. ( ज्याच्या योगानें वस्तु उपलब्ध होते ती एक व ज्याला उपलब्ध होते ती दुसरी, ह्मणजे एक ज्ञानकर्ता, ज्ञाता व दुसरें ज्ञान, साधन, अशा दोन वस्तू शरीरात आढळतात. त्यातील करण कोण, तें स्वतः भाष्यकार सागतात– ) " **अनेकभेदभिन्नेन करणेन येनोपलभते यश्चैक उपलभते** । " अर्थ— चक्षु., श्रोत्र इत्यादि अनेक भेदानीं भिन्न, अशा ज्या साधनानें पुरुष विषयाला जाणतो व जो एक जाणतो ( अशा दोन वस्तू अनुभवाला येतात. या कथनानें अनेकरूप– चक्षुरादिइंद्रियसघातरूप, असें जें प्राणस्वरूप तें समुदायरूप असल्यामुळें परार्थ ( दुसऱ्याच्या उपयोगार्थ ) असणेंच योग्य आहे. अर्थात् तें दुसऱ्याचें उपकरण असल्यामुळें साधन आहे, असें ठरतें, पण उपलब्धा ह्मणजे ज्ञाता–आत्मा अनेकात्मक आहे, असें समजण्यास कांहींच कारण नाहीं, त्यामुळेंच तो

संघातरूप नव्हे संघातरूप नसल्यामुळेंच तो परार्थ व त्यामुळेंच शेषही नव्हे. अर्थात् त्याला शेषित्व आहे, असे सांगण्यासाठीं भाष्यांत 'तद्' असें म्हटलें आहे. यावरून– साधनाचें परार्थत्व (म्हणजे दुसऱ्या कोणाकरितां असणें,) दुसरा शेषी असल्यावांचून उपपन्न होत नाहीं त्यामुळें तें साधनच-करणच-आपल्याहून अगदीं निराळ्या असलेल्या ज्ञात्याचें सूचक होतें अर्थात् तें करणच ज्ञात्याचेंही प्रमाण होतें, असें ठरतें.)

(आतां इंद्रियच जाणणारीं आहेत, त्याहून वेगळा ज्ञाता नाहीं, असें म्हणणाऱ्या नास्तिकाला उद्देशून ज्ञात्याच्या अस्तित्वाविषयीं दुसरें प्रमाण देतात–) करणान्तरोपलब्धविषयस्मृतिप्रतिसंधानात् ।"

**अर्थ**— दुसऱ्या इंद्रियाच्या योगानें ज्ञात झालेल्या विषयाच्या स्मृतीचें अनुसंधान होतें (पूर्वी एकाद्यानें रूप पाहिलेलें असून मागाहून त्याचे डोळे कोणी उपटून काढल्यास त्याला त्या पूर्वानुभूत रूपाचें स्मरण होत नाहीं, असें नाहीं, तर 'मी असें असें रूप पाहिलें होतें,' असें त्याला आठवतें त्याचप्रमाणें ज्या मीं पूर्वी अमुक रूप पाहिलें, तोच मी आतां स्पर्श जाणत आहें असें प्रत्येक पुरुषाला पाहणाराचें व स्पर्श करणाराचें एकत्व आतल्या आत भासत असतें इंद्रियाहून निराळा ज्ञाता जर नसता तर तें भासलें नसतें. कारण एकानें अनुभविलेल्या विषयाचें स्मरण व मींच तें पाहिलें, असें प्रतिसंधान दुसऱ्याला होणें शक्य नाहीं सारांश, येणेंप्रमाणें अनेकात्मक प्राणाला करणत्व आहे, असें सांगून त्यामुळेंच त्याला आत्मत्व नाहीं असें सांगतात–) "तत्र न तावद्येनोपलभते स आत्मा भवितुमर्हति।"

**अन्वय** — तत्र यन उपलभते स आत्मा इति तावत् न भवितुं अर्हति।

**अर्थ**— त्या दोघांतील ज्याच्या योगानें विषयज्ञान होतें तो आत्मा असें तर होणें योग्यच नाहीं (अर्थात् त्याहून पृथक् असलेला आत्माच ज्ञाता असणें योग्य आहे, असा संबंध जाणावा. अशारीतीनें संक्षिप्त वाक्यार्थ सांगून आतां तोच श्रुतीच्या अक्षरांतून काढून दाखविण्यासाठीं पुढील वाक्याचें व्याख्यान प्रश्नपूर्वक आरंभितात–)

३ 'येन वा पश्यति०' इत्यादि वाक्याचें व्याख्यान.

('येन वा पश्यति येन वा शृणोति येन वा गन्धानाजिघ्रति येन वा वाचं व्याकरोति येन वा स्वादु चास्वादु च विजानाति। यदेतद् हृदयं मनश्चैतत्। संज्ञानमाज्ञानं विज्ञानं प्रज्ञानं मेधा दृष्टिर्धृतिर्मतिर्मनीषा जूतिः स्मृतिः संकल्पः क्रतुरसुः कामो वश इति। सर्वाण्येवैतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवन्ति' या वाक्याचें व्याख्यान करण्यासाठीं प्रतिज्ञा करितात-) "केन पुनरुपलभत इति। उच्यते।" अर्थ— तर मग कोणत्या साधनानें आत्मा जाणतो, असा प्रश्न विचाराल तर सांगतों-" येन वा चक्षुर्भूतेन रूपं पश्यति येन वा शृणोति श्रोत्रभूतेन शब्दं येन वा घ्राणभूतेन गन्धानाजिघ्रति येन वा वाक्करणभूतेन वाचं नामात्मिकां व्याकरोति गौरश्व इत्येवमाद्यां साध्वसाध्विति च। येन वा जिह्वाभूतेन स्वादु चास्वादु च विजानातीति।" अर्थ—ज्या चक्षुर्भूत करणानें रूपाला पाहतो, ज्या श्रोत्रभूत इंद्रियानें शब्द ऐकतो, ज्या वाक्-इंद्रियरूप साधनानें नामात्मक (शब्दरूप) वाणीला ह्मणजे गाय, घोडा इत्यादिरूप व हें चांगलें आहे, हें वाईट आहे इत्यादि प्रकारच्या वाणीला व्यक्त करतो त्याचप्रमाणें ज्या जिह्वारूप इंद्रियानें गोड व कडू जाणतो, (या सर्व वाक्यांत तृतीया विभक्तीचा उपयोग करून चक्षुरादिकांचें करणत्व सांगितलें आहे. वरील 'वाच' या शब्दानें वक्तव्य शब्द सांगितला आहे. 'गौः' हें नाम शुद्ध आहे व 'गावी' हें अशुद्ध (असाधु) आहे असें व्याकरणानें व्यक्त करतो.)

(अहो पण चक्षुरादि इंद्रियांना करणत्व जरी असलें तरी त्यावरून पारमार्थ्यतः अप्रतून शरीरांत प्रविष्ट झालेल्या प्राणाला करणत्व आहे, हें कसें ठरणार? अशी शंका घेतात- ) "किं पुनस्तदेवैकमनेकधा भिन्नं करणमिति।" अन्वयः— यत् अनेकधा भिन्नं करणं तत् एव एकं किं पुनः इति। अर्थ—जें अनेकप्रकारें भेद पावून करण झालें

आहे तेंच एक काय वरें आहे? ( प्राणालाच करणत्व कसें आहे, तें साग ण्यासाठीं अगोदर हृदय व मन या नावानीं ज्याचा उल्लेख करितात तेंच चक्षुरादि इंद्रियाच्या योगानें भेद् पावलें आहे, असें सागतात- ) " उच्यते । अर्थ- सागतो ( 'यदेतद्धृदय०' ह्म० जें ह हृदय आहे तेंच हें मन होय यातील 'यत्' या शब्दाचा अर्थ सागतात ) 'यदुक्त पुरस्तात्प्रजाना रेतो हृदय, हृदयस्य रेतो मनो मनसा सृष्टा आपश्च वरुणश्च हृदयान्मनो मनसश्चन्द्रमास्तदेवैतद्धृदय मनश्चैकमेतदने कधा । " अन्वय — प्रजाना रेत हृदय हृदयस्य रेत मन मनसा आप च सृष्टा वरुण च सृष्ट हृदयात् मन मनस चन्द्रमा इति अत्र हृदय च मन इति यत् उक्त तदेव एक अनेकधा भिन्न करण । अर्थ-- प्रजाचें रेत ह्मणजे सारभुत कार्य, हृदय आहे, हृदयाचें रेत मन आहे मनाकडून आप उत्पन्न केलें गेलें व वरुण उत्पन्न केला गेला हृदयापासून मन व मनापासून चद्रमा इत्यादि अर्थाच्या श्रुतींत सागितलेलें जें हृदय व मन तेंच तू आरंभीं विचारलेलें करण आहे तेंच एक असताना चक्षुरादि भेदानीं अनेकधा झालें आहे, ( असा श्रुतींतील दुसऱ्या एतत्- शब्दाचा अर्थ 'एकमेतदनेकधा' या भाष्यातील पदानीं सागितला आहे या वाक्यात सघातात्मक पुरुष ज्या चक्षुरादिकाच्या योगानें दर्शनादि क्रिया करतो, तें चक्षुरादिक हृदय व मन या नावाचें करण आहे 'प्रजाना रेतो हृदय' येथपासून मनसश्चद्रमा' येथपर्यंतच्या श्रुतींत तेंच हृदय व मन सागितलें आहे तू ज्याविषयीं प्रश्न केला आहस तें तेंच हाय 'तें एकच असताना अनेक प्रकारचें झालें आहे, असें ह्मणून श्रुतींतील येन ' इत्यादि तृतीयान्त व 'यत्' इत्यादि प्रथमान्त यत्-शब्दाचा आणि 'एतत्' अशा प्रथमान्त एतत्-शब्दाचा अन्वय दाखविला आहे )

( आता एकाचेंच अनेकात्मकत्व अधिक स्पष्ट करितात- ) " एते नान्तःकरणेनैकेन चक्षुर्भूतेन रूप पश्यति श्रोत्रभूतेन शृणोति घ्राण

**भूतेन जिघ्रति वाग्भूतेन वदति जिह्वाभूतेन रसयति स्वेनैव विकल्पनारूपेण मनसा विकल्पयति हृदयरूपेणाध्यवस्यति। तस्मात्सर्वकरणविषयव्यापारकमेकमिदं करणं सर्वोपलब्ध्यर्थमुपलब्धुः।"** *अर्थ–ज्ञाता या एका चक्षुर्भूत अंतःकरणानें रूप पाहतो, श्रोत्रभूत हृदयानें ऐकतो, घ्राणरूप अंतःकरणानें वास घेतो, वाक्–रूप अंतःकरणानें बोलतो, जिह्वारूप अंतःकरणानें रस चाखतो, आपल्या विकल्पनारूप मनानें विकल्प* करतो, व हृदयरूपानें निश्चय करतो तस्मात् सर्व करणें व विषय हे ज्याचे व्यापार आहेत असें हें हृदय ज्ञात्याच्या सर्व ज्ञानाकरिता एक करण–साधन आहे

( सर्व इंद्रियें व विषय हे हृदयसंज्ञक बुद्धीचे व्यापार आहेत, या विषयीं श्रुतीचें प्रमाण देतात–) " **तथा च कौषीतकीनां–प्रज्ञया वाचं समारुह्य वाचा सर्वाणि नामान्याप्नोति प्रज्ञया चक्षुः समारुह्य चक्षुषा सर्वाणि रूपाण्याप्नोति–इत्यादि। वाजसनेयके च–मनसा ह्येव पश्यति मनसा शृणोति हृदयेन हि रूपाणि जानाति–इत्यादि। तस्माद्धृदयमनोवाच्यस्य सर्वोपलब्धिकरणत्वं प्रसिद्धम्।" अर्थ**– कौषीतकींच्या उपनिषदांत त्याविषयीं–चिदाभासयुक्त बुद्धीनें वागिंद्रियावर आरूढ होऊन ( म्हणजे बुद्धीचा वाक्–इंद्रियरूपानें परिणाम झाला असता बुद्धीच्या द्वारा स्वतः आत्माही वागिंद्रियाचा अभिमानी होऊन त्यानंतर बुद्धिव्यापाररूप वाणीचा नामसंज्ञक वक्तव्य शब्दरूपानें परिणाम झाला असता) वागिंद्रियाच्या द्वारा सर्व नामांना ( वक्तव्य शब्दांना ) व्यापतो. ( म्हणजे शब्दस्फुरणरूपानें स्वतः राहतो ) त्याचप्रमाणें आभासयुक्त बुद्धीनें चक्षुरिंद्रियावर आरूढ होऊन चक्षूनें सर्व रूपास व्यापतो,–इत्यादि सांगितलं आहे ( या दुसऱ्या वाक्याचाही पूर्वीप्रमाणेच अर्थ जाणावा या उपनिषदांत बुद्धीचा वागिंद्रियादिरूपानें व वाक्–इंद्रियादिकांचा शब्दरूपानें परिणाम सांगितला आहे ) बृहदारण्यकांत–मनानेंच पहातो, मनानेंच ऐकतो,

हृदयानेच सर्व रूप जाणतो, असे झालें आहे (येथेंही मनाला साक्षात् दर्शनादि क्रियांचें करणत्व संभवत नसल्यामुळें चक्षुरादिभावास प्राप्त झालेल्या मनाला दर्शनादिकांचें करणत्व आहे, असेंच समजावें हृदयानें रूपांना जाणतो, इत्यादि स्थळींही असेंच जाणावें 'इत्यादि' येथील आदिशब्दानें 'हृदये ह्येव रूपाणि प्रतिष्ठितानि भवन्ति' इत्यादि वाक्यांनीं रूपादिकांना बुद्धिरूपत्व आहे, असें जें सांगितलें आहे, त्याचा संग्रह करावा)

(असो, याप्रमाणें हृदयाला सर्व इंद्रियरूपत्व आहे, असें सांगून प्राणरूपत्वही आहे म्हणजे तें प्राणरूप आहे, असें सांगतात-) "तदात्म कश्च प्राणो 'यो वै प्राणः सा प्रज्ञा या वै प्रज्ञा स प्राणः' इति ब्राह्मणम्।" अर्थ—आणि प्राण हृदयात्मक आहे. कारण 'जो प्राण ती प्रज्ञा-बुद्धि व जी बुद्धि तो प्राण' असें ब्राह्मणवाक्य आहे (याप्रमाणें हृदय व मन यांच्या द्वारा प्राणाला सर्व इंद्रियरूपत्व आहे, असें सांगून आता साक्षात् प्राणाला इंद्रियरूपता सांगतात-) "करणसंहतिरूपश्च प्राण इत्यवोचाम प्राणसंवादादौ।" अर्थ—प्राण इंद्रियसमुदायरूप आहे, हें आम्ही प्राणसंवादादि प्रसंगीं सांगितलेंच आहे ('त्वं वयं स्मो न शक्ष्यामस्त्वदृते जीवितुम्। इतर चक्षुरादय प्राणा इत्यवोचयन्त' म्हणजे आम्ही तुझे आहों, तुजवाचून जिवंत राहण्यास समर्थ नाहीं चक्षुरादि इतर प्राण असें बोलले, इत्यादि प्राणसंवादांतील वचनाच्या बळानें प्राण इंद्रिय समूहरूप आहे, असें कळलें आहे 'प्राणसंवादादौ' येथील आदिशब्दानें छान्दोग्यांतील 'संवर्गविद्या,' या नावाच्या उपासनाप्रकरणांत सांगितलेलें 'प्राणमेव वागप्येति प्राणं चक्षुः प्राणं श्रोत्र०' इत्यादि वचन घ्यावें)

(आतां एवढा वेळ प्रतिपादिलेल्या करणाच्या अनात्मत्वाचा, म्हणजे करण आत्मा नव्हे, असें जें वर प्रतिपादन केलें त्याचा उपसंहार करितात) "तस्मादात्मनश्चा मापचत तद्ब्रह्म तदुपलब्धुरुपलब्धिकरणत्वेन गुण भूतत्वाच्च तद्वस्तु प्रज्ञोपास्यात्मा भवितुमर्हति।" अर्थ— तस्मात्

जें ब्रह्म दोन्ही पायांच्या अग्रातून शरीरांत शिरलें, तें त्याला जाणणाऱ्या ज्ञात्याच्या ज्ञानाचें साधन असल्यामुळें गुणभूत ( गौण, अमुख्य ) आहे. यास्तव तें वस्तुभूत ब्रह्म, उपास्य आत्मा होण्यास योग्य नाहीं ( ह्मणजे तोच व्यापक आत्मा आहे, असें जाणण्यास योग्य नाहीं तर मग तसें जाणण्यास योग्य कोण आहे, तेंच सांगतात- ) " पारिशेष्याद्यस्योपलब्धुरुपलब्ध्यर्था एतस्य हृदयस्य मनोरूपस्य करणस्य वृत्तयो वक्ष्यमाणाः स उपलब्धोपास्य आत्मा नोऽस्माकं भवितुमर्हतीति निश्चय कृतवन्त. । " अर्थ— तर त्याहून अगदीं निराळा राहिलेला व ज्या उपलब्ध्याच्या उपलब्धीकरिता या हृदयाच्या ह्मणजे मनोरूप करणाच्या पुढें सांगितलेल्या वृत्ती आहेत तो उपलब्धा ( ज्ञाता ) आमचा आत्मा, आह्माला उपासना करण्यास योग्य आहे, असा निश्चय ते ब्राह्मण करते झाले ('संज्ञानमाज्ञानं०' इत्यादि याच्या पुढेंच मनाच्या वृत्ती सांगितलेल्या आहेत )

( पूर्वोक्त वाक्यातील ' येन वा पश्यति० ' येथपासून ' मनश्चैतत् ' येथपर्यंतचा श्रुत्यंश 'प्राण करण असल्यामुळें अनात्मा आहे,' असें सांगण्यासाठीं आहे, असें सांगून आता 'संज्ञानं०' येथपासून ' वश इति ' येथपर्यंत सांगितलेल्या अन करणाच्या वृत्तींच्या द्वारा त्याहून निराळा असलेला उपलब्धा दाखविण्यासाठीं आचार्य सांगतात- ) " तदन्त करणोपाधिस्थस्योपलब्धुः प्रज्ञानरूपस्य ब्रह्मण उपलब्ध्यर्था या अन्त करणवृत्तयो बाह्यान्तर्वर्तिविषयविषयास्ता इमा उच्यन्ते । " अर्थ-त्या अन्त करणरूप उपाधींत असलेल्या उपलब्ध्या प्रज्ञानरूप ब्रह्माच्या उपलब्धीकरिता ज्या बाह्य व आत राहणाऱ्या विषयाविषयींच्या अन्त करणवृत्ती त्या ह्या आता सांगितल्या जातात- ( 'अहो पण कोणत्याही करणाचा विषय न होणाऱ्या अ त्याला वृत्तिविषयत्व तरी कोठचें ? आणि वृत्तींचा विषय झाल्यावाचून वृत्ती त्याच्या उपलब्धीकरितां आहेत, असें तरी कसें ह्मणता येईल,' अशी शंका मनात घेऊन भाष्यकारानीं ' बाह्यान्तर्वर्ति० ' इत्यादि ह्मटलें आहे. त्या वृत्ती आत्म-

भिन्न बाह्यान्तर–वस्तुविषयक आहेत, एवढेंच जर ह्मटलें तर त्याच्या योगानें बाह्य व आन्तर विषयाचाच अनुभव येईल, स्वतः आत्म्याचा कांहीं अनुभव येणार नाहीं, अशी शंका कोणीं घेईल ह्मणून भाष्यात ' उपल ब्धयर्थः ' असें ह्मटलें आहे. ह्मणजे आत्मा सर्व विशेषशून्य असल्यामुळें व तो कोणाचाही विषय होणारा नसल्यामुळें 'हा तो' असा त्याचा साक्षात् प्रत्यय जरी न आला तरी येथे आताच सागत असलेल्या सज्ञानादि वृत्तींचा साक्षी, या रूपानें त्याची उपलब्धि सभवते. साक्षिरूपानें उपलब्ध होणारा तो वृत्तींचा विषयही होत नाहीं. त्याचें अविषयत्व व्यक्त करण्यासाठींच ' प्रज्ञानरूपस्य ' असें विशेषण वर दिलें आहे प्र ह्मणजे प्रकृष्ट–अतिशय, उत्तम व ज्ञान ह्मणजे ज्ञप्ति. स्वप्रकाश चैतन्य. तें जर कोणाचें विषय झालें तर त्याच्या स्वप्रका शत्वाचीच हानि होणार आत्मा सर्वविशेषशून्य आहे, असें सुचविण्यासाठीं वरील भाष्यात ' ब्रह्मण ' असें विशेषण दिलें आहे तें जर विशेषरहित नसतें तर त्याचा परिच्छेद झाला असता कांहीं विशेष असणें, हेंच परि च्छेदाचें बीज आहे आणि परिच्छेद झाल्यावर ब्रह्माचें ब्रह्मत्वच नाहींसें होणें अवश्य आहे पण असग आत्म्याचा अन करणाच्या वृत्तींशीं सबध कसा होतो? असें कोणी ह्मणेल ह्मणून ' अन्त करणोपाधिभ्यस्य ' असें भाष्यात ह्मटलें आहे असग असलेल्याही त्याचा अत करणातील प्रतिबिं बाच्या द्वारा अत करणाच्या वृत्तींशीं सबध होतो, असा त्याचा भावार्थ )

( आता ' संज्ञानमाज्ञानं० ' इत्यादि प्रत्येक पदाचा अर्थ सांगतात–)

' सज्ञान सज्ञप्तिश्चेतनाभावः । आज्ञानमाज्ञप्तिरीश्वरभाव । विज्ञानं कलादिपरिज्ञान । प्रज्ञानं प्रज्ञप्ति. प्रज्ञता । मेधा ग्रन्थधारणसामर्थ्य। दृष्टिरिन्द्रियद्वारा सर्वविषयोपलब्धि । धृतिर्धारणमवसन्नानां शरी रेन्द्रियाणां ययोत्तम्भन भवति । धृत्या शरीरमुद्वहन्तीति हि वदन्ति। मतिर्मननम् । मनीषा तत्र स्वातन्त्र्यम् । जूतिश्चेतसो रुजादिदुःखि त्वभाव । स्मृति–स्मरणम् । सकल्प शुक्लकृष्णादिभावेन संकल्पन

रूपादीनाम् । क्रतुरध्यवसायः । असु प्राणनादिजीवनक्रियानिमित्ता वृत्तिः । कामोऽसंनिहितविषयाकाङ्क्षा तृष्णा । वशः–स्त्रीव्यतिकराद्यभिलाषः । " अर्थ– ' संज्ञानं– ' संज्ञप्ति–चेतनाभाव ( ज्या वृत्तीच्या योगानें प्राणी 'चेतन' म्हटला जातो ती सर्वदा सर्व शरीराला व्यापणारी वृत्ति ); ' आज्ञानं– ' आज्ञप्ति, ईश्वरभाव; ' विज्ञानं– ' कलादिकांचें परिज्ञान ( सर्वप्रकारचें ज्ञान, चवसष्ट कलादिकांचें लौकिक ज्ञान ); ' प्रज्ञानं–' प्रज्ञप्ति, प्रज्ञता, तात्कालिक प्रतिभा, ' मेधा–' ग्रन्थधारणसामर्थ्य, ' दृष्टिः- ' इंद्रियांच्या द्वारा सर्व विषयाची उपलब्धि, ' धृतिः– ' धारण, ( जिच्या योगानें थकलेल्या, निर्बल झालेल्या शरीरेंद्रियाचें उत्तम्भन होतें, तीं सोत्साह व सबल होतात ती वृत्ति धृति. शरीरादिकांच्या उत्तम्भक विशेष वृत्तीला धृतित्व आहे, म्हणजे ती वृत्तिच धृति आहे, याविषयीं लौकिक प्रमाण सांगतात– ) धृतीच्या योगानें शरीर वाहतात, व्यवहारास योग्य होईल अशा रीतीनें त्याला धारण करितात, असें म्हणतात. ' मतिः– ' मनन; ' मनीषा' मननाविषयीं स्वातंत्र्य; ' जूतिः– ' रोगादिकांमुळें उद्भवणाऱ्या दुःखित्वाची प्राप्ति, ' संकल्पः–रूपादीनां शुक्लकृष्णादिभावेन संकल्पनं–' संकल्प म्हणजे सामान्यतः ज्ञात झालेल्या रूपादिकांचा शुभ्र, काळें, इत्यादि प्रकारें संकल्प करणें; ' क्रतुः– ' निश्चय; ' असुः– ' प्राणनादि जीवनप्रयत्नाला निमित्त होणारी वृत्ति, ' काम.– ' समीप नसलेल्या विषयांविषयींची आकाङ्क्षा, तृष्णा व 'वशः–' स्त्रीसंपर्कादिकाविषयींचा अभिलाष. ( श्रुतिवाक्याच्या शेवटीं 'इति' असा जो शब्द आहे तो दिग्दर्शनार्थ आहे, असें सांगतात–) " इत्येवमाद्या अन्तःकरणवृत्तयः प्रज्ञप्तिमात्रस्योपलब्धुरुपलब्ध्यर्थत्वाच्छुद्धप्रज्ञानरूपस्य ब्रह्मण उपाधिभूतास्तदुपाधिजनितगुणनामधेयानि भवन्ति संज्ञानादीनि । " अर्थ– या व अशाच दुसऱ्याही अन्तःकरणाच्या वृत्ती केवळ प्रज्ञप्तिरूप जो उपलब्धा ( ज्ञाता, साक्षी ) त्याच्या उपलब्धीकरितां ( ज्ञानाकरितां, अनुभवाकरितां ) असल्याकारणानें त्या शुद्ध प्रज्ञानरूप ब्रह्माच्या उपाधिभूत आहेत. त्यामुळें ' संज्ञानादीनि तदुपा-

धिजनितगुणनामधेयानि भवन्ति–' संज्ञान, आज्ञान इत्यादि त्या वृत्तिरूप उपाधीमुळें उत्पन्न झालेला जो त्या वृत्तीच्या योगानें उपलक्षित होणें, हा गुण त्याचीं नावें आहेत. ( या अंतःकरण वृत्ती हीं प्रज्ञानाचीं नावें आहेत, असा पुढच्या वाक्याशीं संबंध. पण येथील प्रज्ञानशब्दाचा अर्थ वरील प्रज्ञानशब्दाच्या अर्थाप्रमाणें प्रतिभावृत्तिरूप नाहीं. कारण वृत्तिरूप प्रज्ञानाचीं तीं सर्व नांवें होऊं शकत नाहींत. वास्तव तीं सर्व शुद्ध चैतन्याचींच नांवें आहेत, असें ' प्रज्ञतिमात्रस्य ' या भाष्यस्थपदानें सांगितलें आहे. ' अहो पण अन्तःकरणाच्या वृत्ती शब्दरूप नाहींत. तेव्हां तीं प्रज्ञानाचीं नांवें कशीं असतील. कारण कोणतेंही नांव शब्दरूप असतें, पण अन्तःकरण वृत्ती शब्दरूप नसतात, हें प्रसिद्ध आहे, ' असें कोणी ह्मणेल तर त्याचें उत्तर– कोणतेंही नांव त्या त्या वस्तूच्या ज्ञानाचें निमित्त असतें. ह्मणजे 'घट' या नावावरून आपल्याला 'घट' या वस्तूचा बोध होतो. वास्तव ' घट ' हें नांव ' घट ' या बोधाचें निमित्त झालें. त्याचप्रमाणें अंतःकरणाच्या संज्ञानादि वृत्तीही प्रज्ञानाच्या बोधाचें निमित्त होतात. यास्तव बोधहेतुत्व हा गुण घटादि प्रसिद्ध नांवाप्रमाणेंच संज्ञानादि वृत्तींमध्येंही असल्यामुळें संज्ञानादि हीं प्रज्ञानाचीं नांवें आहेत, असें गौणवृत्तीनें ह्मटलें आहे. मुख्यवृत्तीनें तीं त्याचीं नांवें होऊं शकत नाहींत, असें ' उपलब्धुरुपलब्ध्यर्थत्वात् ' ह्म० ' त्या वृत्ती उपलब्ध्याच्या–ज्ञात्याच्या उपलब्धीकरितां असल्याकारणानें ' या भाष्यानें सांगितलें आहे त्या वृत्ती उपलब्ध्याच्या उपलब्ध्यर्थ तरी कशा होतात? असा आक्षेप मनांत आणून ' कारण त्या त्याच्या उपाधी आहेत, ' असें भाष्याच्या उद्देशानें ' शुद्धप्रज्ञानरूपस्य प्रज्ञाग उपाधिभूताः ' असें ह्मटलें आहे. त्याअर्थी त्या उपाधिभूत व उपलब्ध्यर्थ आहे[illegible] त्याअर्थी त्या गौण वृत्तीनें त्याचीं नांवें होऊं शकतात. अथवा या [illegible] संज्ञानादि [illegible] दिसत नाहीं. या [illegible] संज्ञानादि [illegible] आहे. त्यामुळें संज्ञानादिशब्द संज्ञानादिवृत्ति[illegible] ( [illegible] ) प्रज्ञानाचीं नांवें आहेत. [illegible] वृत्ति[illegible] प्रज्ञानाच्या [illegible]

लक्षणेनें शुद्ध प्रज्ञानाचींही नावें होतात. वरील भाष्यातील 'तदुपाधिजनितगुणनामधेयानि भवन्ति' या शेवटच्या वाक्यानें तेंच सांगितलें आहे.)

**४ 'सर्वाण्येवैतानि०' या वाक्याचे विशेष व्याख्यान.**

(आता 'सर्वाण्येवैतानि प्रज्ञानस्य०' या मागच्याच वाक्याच्या अंशाचें विशेष व्याख्यान– ) **" सर्वाण्येवैतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवन्ति न स्वतः साक्षात्। तथा चोक्तं 'प्राणन्नेव प्राणो नाम भवति' इत्यादि।"** अर्थ—' एतानि सर्वाणि एव–' हीं सर्वच प्रज्ञानाचीं नावें आहेत. पण तीं त्याचीं स्वतः–स्वाभाविक, साक्षात्–प्रत्यक्ष नावें नव्हेत ( तर औपाधिक व लाक्षणिक नावें आहेत. ) 'तथा च 'प्राणन् एव प्राण'नाम भवति' इत्यादि उक्तम्–' त्याचप्रमाणें प्राणन–शरीरजीवन ही क्रिया करणारा तो प्राण या नावाचा होतो, प्राण हें नाव त्याला प्राप्त होतें, इत्यादि सांगितलें आहे. ( 'प्राणनवृत्ति' या उपाधीमुळें आत्म्याला 'प्राण' हें नाव प्राप्त झालें आहे, असें या वाक्यात सांगितलें आहे कोणी ह्मणेल कीं, प्राणाविषयीं जरी असें सांगितलें असलें तरी येथें तसें संज्ञानादि नावाना औपाधिकत्व सांगितलेलें आढळत नाहीं, तर तें खरें आहे पण प्राणाविषयीं जो न्याय सांगितला आहे तोच या संज्ञानादिकानाही तसाच लागू होत असल्यामुळे त्यानाही औपाधिकत्व आहे, असें सांगितल्यासारखेंच आहे या सर्व वर्णनाचें तात्पर्य असें–संज्ञानादि शब्द प्रकाशात्मक वस्तूचे वाचक आहेत. पण अंतःकरणाच्या वृत्ती जड असतात यास्तव त्याना साक्षात् प्रकाशरूपत्व संभवत नाहीं ह्मणून प्रकाशात्मक वस्तूच्या ठिकाणीं त्याचा आरोप झाल्यामुळेंच त्याना प्रकाशात्मकत्व आहे, अशी कल्पना करविणारे व त्याच्या प्रकाशाचा अधिष्ठानभूत प्रकाश निराळाच आहे, असें सुचविणारे ते संज्ञानादि शब्द शेवटीं प्रकाशात्मक प्रज्ञानाचींच नावें होतात येथें–संज्ञानादि अनित्य असल्यामुळें व प्रकाशात्मकवस्तुवाचक संज्ञानादि, हीं जड वृत्तींचीं नावें असणें अयोग्य असल्यामुळें त्याहून अगदीं निराळा असा कोणी प्रकाशरूप आहे,– असें सांगितलें. त्याचप्रमाणें ते प्रज्ञान संज्ञानादिशब्दाचें

वाच्य आहे, असें म्हटल्यानें 'विज्ञान प्रज्ञान मेधा०' येथील वृत्तिरूप प्रज्ञान तें नव्हे, हेंही सांगितलें. कारण वृत्तिरूप प्रज्ञान संज्ञानादि इतरशब्दांचें वाच्य होऊ शकत नाहीं. कारण प्रज्ञानही वृत्ति व संज्ञानादिकही वृत्तिच त्याचप्रमाणें संज्ञानादिक सर्व एका प्रज्ञानाचीं नावें आहेत, असें सांगितलें असल्यामुळें तें प्रज्ञान एक व सर्व वृत्तींमध्यें अनुगत आहे, असेंही सिद्ध झालें. कारण तें जर एक नसून अनेक असतें तर प्रत्येक वृत्तींतील प्रज्ञानाचें संज्ञान, आज्ञान इत्यादि निरनिराळें नाव झालें असतें; व त्यामुळें तीं सर्व एकाचीं नावें आहेत, हें म्हणणें अयोग्य झालें असतें. शिवाय 'एतानि प्रज्ञानस्य नामधेयानि' येथील प्रज्ञानस्य हें एकवचनही अनुपपन्न झालें असतें यास्तव 'येन वा पश्यति०' येथपासून 'नामधेयानि भवन्ति' येथवर जें एक वाक्य आहे त्यानें सर्व इंद्रियें व त्यांच्या वृत्ती याहून निराळा स्वप्रकाशात्मक, सर्वसाक्षी, सर्व वृत्त्यनुगत एक आत्मा आहे, असें शोधन केलें ).

५ 'एष ब्रह्म०' इत्यादि वाक्याचें व्याख्यान.

( आता वर सांगितल्याप्रमाणें ज्याचें शोधन केलें आहे म्हणजे ज्याला उपाधींपासून पृथक् करून जाणलें आहे तो आत्मा प्रत्येक शरीरात निरनिराळा आहे, या समजुतीचें निरसन करण्यासाठीं 'एष ब्रह्मैष इन्द्र एष प्रजापतिरेते सर्वे देवा इमानि च पंच महाभूतानि पृथिवी वायुराकाश आपो ज्योतींषीत्येतानीमानि च क्षुद्रमिश्राणीव बीजानीतराणि चेतराणि चाण्डजानि च जारुजानि च स्वेदजानि चोद्भिज्जानि चाश्वा गावः पुरुषा हस्तिनो यत्किंचेद् प्राणि जङ्गमं च पतत्रि च यच्च स्थावरं सर्वं तत्प्रज्ञानेत्रं प्रज्ञाने प्रतिष्ठितं प्रज्ञानेत्रो लोकः प्रज्ञा प्रतिष्ठा प्रज्ञानं ब्रह्म' हें वाक्य आहे भाष्यकार त्याचें आता व्याख्यान करितात- ) "स एष प्रज्ञानरूप आत्मा ब्रह्म।" अर्थ—तो हा प्रज्ञानरूप आत्मा ब्रह्म आहे. ( 'प्रज्ञानं ब्रह्म' असें म्हणून याच वाक्याच्या शेवटीं मुख्य ब्रह्म पुढें सांगितलें आहे यास्तव येथें मूर्धद्वारानें शरीरात प्रविष्ट झालेल्या अपर ब्रह्माचा 'ब्रह्म' या शब्दानें उल्लेख केला आहे, असें सांगतात- ) "अपरं सर्वशरीरस्थप्राणः

प्रज्ञात्माऽन्तःकरणोपाधिष्वनुप्रविष्टो जलभेदगतसूर्यप्रतिबिम्बवद्धिरण्यगर्भः प्राणः प्रज्ञात्मा।" अर्थ–ब्रह्म ह्मणजे अपर ब्रह्म (मुख्य ब्रह्म नव्हे.) ह्मणजे सर्व शरीरांत असणारा प्राण–प्रज्ञात्मा–अंतःकरण उपाधींत 'जलभेदगतसूर्यप्रतिबिम्बवत् अनुप्रविष्टः' निरनिराळ्या पात्रांतील जलांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबाप्रमाणें मागाहून प्रविष्ट झालेला, हिरण्यगर्भ प्राण प्रज्ञात्मा आहे. (संज्ञानादिक, हीं ज्याचीं नांवे आहेत तो हा प्रज्ञारूप आत्मा हिरण्यगर्भ आहे, असा याचा सारांश. भाष्यांत 'सर्वशरीरस्थप्राणः' असें ह्मटलें आहे, त्यांतील 'सर्व शरीर' या पदानें समष्टि स्थूल शरीर सांगितलें आहे. 'अन्तःकरणोपाधिषु' या पदानेंही समष्टिलिंगशरीर घ्यावें. वरील भाष्यांतील पहिल्या 'प्राणः' व 'प्रज्ञात्मा' या शब्दांनीं तें अपर ब्रह्म क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति यांनीं युक्त आहे, असें सांगितलें व शेवटीं उच्चारलेल्या त्याच शब्दांनीं वेदांत जागजागीं 'समष्टिलिंगशरीराभिमानी हिरण्यगर्भ प्राण प्रज्ञात्मा' असा ज्याचा निर्देश केलेला आहे त्याचाच अनुवाद केला आहे. त्यामुळें भाष्यावर पुनरुक्ति हा दोष येतो, असें समजूं नये.)

('अहो पण वर सांगितलेला प्रज्ञानात्माच अपर ब्रह्म आहे, याविषयीं प्रमाण काय,' अशी शंका घेऊन प्रवेशवाक्यच (पृष्ठ १२१) त्याविषयीं प्रमाण आहे, असें सांगण्यासाठीं 'एष इंद्रः' हें वाक्य आहे. यास्तव त्याचें व्याख्यान करितात–) "एष एवेन्द्रो गुणात्।" हाच इंद्र आहे. कारण 'इदमदर्शं' या श्रुतींत सांगितलेल्या गुणाचा योग याचे ठिकाणीं आहे. (वर सांगितलेल्या प्रवेशवाक्यांत प्रवेश केलेल्या आत्म्याला इंद्रत्व सांगितलेलें आहे. यास्तव हिरण्यगर्भालाही इंद्रत्व आहे, असें सांगितलें असतां 'प्रवेश केलेला असणें' ह्या धर्माची ओळख पटते. त्यामुळें प्रवेश करणाराच, ज्यांत त्यानें प्रवेश केला त्या सर्वांचें स्वरूप आहे, असें सिद्ध होऊन अभेदही निश्चित होतो. आतां–भाष्यांतील 'गुणात्' या पदावरून 'पारमैश्वर्य' या गुणाचा योग असल्याचा भास होतो. त्यामुळें हा प्रज्ञानात्मा इंद्र म्हणजे परमेश्वर आहे, असा अर्थ निष्पन्न होतो,–ह्मणून

ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण प्रज्ञानात्म्याहून परमेश्वर निराळा नाहीं, ह्मणजे प्रज्ञानात्माच परमेश्वर आहे, असें ' प्रज्ञान ब्रह्म ' या शेवटच्या वाक्यात सागावयाचें आहे शिवाय परमेश्वरत्व हा गुण त्याच्या ठिकाणीं आहे, असें येथें सागू लागल्यास त्या प्रतिपादनावर प्रकरणविरोध हा दोष येईल. वरे, ' प्रज्ञान ' हें हिरण्यगर्भादिकाचें जसें स्वरूप आहे तसेंच तें माया विशिष्ट परमेश्वराचेंही आहे, असें येथें सागितलें आहे, ह्मणून ह्मणावें तर भाष्यातील ' गुणात् ' या हेत्वर्थी पदाचा अन्वय लागत नाहीं. त्यामुळें ' हा ब्रह्मा, हा प्रजापति ' या मागच्या व पुढच्या पर्यायात जशी तशीच ' एष इद्र ' या मधल्या पर्यायातही गुणयोगाचा अभाव असला तरी अर्थाची उपपत्ति लागू शकते व त्यामुळें तें पद व्यर्थ होतें असो, येणेंप्रमाणें हें व्याख्यान क्लिष्ट झालें, असे समजून भाष्यकार ' देवराजो वा ' या पदानीं ' एष इन्द्र ' याचा निराळा अर्थ सागतात– ) " देवराजो वा । " किंवा ' एष इन्द्र ' ह्मणजे हा देवराजा आहे.

" **एष प्रजापतिर्य प्रथमज शरीरी यतो मुखादिनिर्भेदद्वारे णाग्न्यादयो लोकपाला जाता स प्रजापतिरेष एव ।** " अर्थ—हा प्रजापति प्रथम उत्पन्न झालेला शरीरी ( शरीरवान् ) ज्याच्यापासून मुखादि द्वारें होऊन त्यातून अग्न्यादि लोकपाल उत्पन्न झाले तो प्रजापति हाच ( येथें ' प्रथमज ' असें ह्मणून हा प्रजापति हिरण्यगर्भाहून निराळा आहे, असें सागितलें आहे. हिरण्यगर्भ लिगशरीराचा अभिमानी असतो व हा स्थूलशरीराचा अभिमानी आहे, हा त्या दोघात विशेष आहे याविषयीं ' अद्भ्य एव० ' इत्यादि वाक्य ( पहा पृष्ठ ९२ ) प्रमाण आहे, असें ' यत मुखादि० ' इत्यादि भाष्यानें सागितलें आहे ) " येप्येतेऽग्न्यादय सर्व देवा एष एव । " अर्थ—तसेच जे हे अग्न्यादिक सर्व देव तेही हा प्रज्ञा- नात्माच आहे ( येथील ' देव ' हा शब्द मनुष्यादिकाच्या उपलक्षणार्थ आहे तस्मात् सर्व जीवात्मे हाच आहे, असा याचा अर्थ )

( याप्रमाणें ' एष ब्रह्म, एष इन्द्र ' इत्यादि सर्व वाक्यामध्यें 'एष' व 'ब्रह्म, इंद्र,' इत्यादि, याचें 'ऐक्य' या अर्थी सामानाधिकरण्य करून व सर्व भूतस्थ आत्मा एक आहे, असें सागून, सजातीय भेदाचें निराकरण केलें आता ' इमानि च पच महाभूतानि ' या वाक्यानें त्याच्या उपाधी अशा या सर्व भूतभौतिकाच्या बाधसामानाधिकरण्याचा आश्रय करून त्याच्या विजातीय भेदाचें निराकरण करण्यास्तव तीं आत्म्याहून भिन्न नाहींत, असें सागण्यासाठीं आरभ केला आहे भाष्यकार त्याचेंच व्याख्यान करितात– )
" इमानि च सर्वशरीरोपादानभूतानि पञ्च पृथिव्यादीनि महाभूतानि अन्नान्नादत्वलक्षणान्येतानि । किंचेमानि च क्षुद्रमिश्राणि क्षुद्रैरल्पकैर्मिश्राणि । इवशब्दोऽनर्थकः । " अर्थ— आणि हीं सर्व शरीराच्या उपादान कारणभूत पाच पृथिव्यादि महाभूतें, अन्न व अन्नादत्व हें ज्याचें लक्षण आहे, अशीं हीं आहेत शिवाय हीं क्षुद्राशीं अल्पाशीं मिश्र झालेलीं आहेत. येथील इवशब्द निरर्थक आहे (पृथिव्यादि पाच भूताचाच अन्न व अन्नादत्व या नावानीं पूर्वीं उल्लेख केला आहे, असें सुचविण्यासाठीं ' अन्नान्नादत्व० ' इत्यादि ह्मटलें आहे )

" सर्पादीनि बीजानि कारणानीतराणि चेतराणि च द्वैराश्येन निर्दिश्यमानानि । " अर्थ–सर्पादि दुसरीं बीजें–कारणें, तशींच दुसरीं स्थावर व जगम अशा दोन राशींनीं निर्देश केलीं जाणारीं ( सर्पादिकाना केवल क्षुद्रमिश्रत्वच आहे, असें नाहीं तर दुसऱ्या सर्पाचें बीजत्वही आहे, असें ' कारणानि ' या पदानें सागितलें आहे असो, पण तीं कोणतीं ? असा प्रश्न करून प्रतिज्ञापूर्वक सागतात– ) " कानि तानि । उच्यन्ते । अण्डजानि पक्ष्यादीनि, जारुजानि जरायुजानि मनुष्यादीनि । स्वेदजादीनि यूकादीनि । उद्भिज्जानि च वृक्षादीनि । अश्वा गाव पुरुषा हस्तिनोऽन्यच्च यत्किंचेद प्राणिजातम् । किं तत् । जङ्गम यच्चलति पद्भ्या गच्छति यच्च पतत्रि आकाशेन पतनशीलम् । यच्च स्थावरमचल

सर्वं तदेष एव । ” अर्थ— तीं कोणतीं? सांगतों. पक्ष्यादि अंडज, मनुष्यादि जरायुज, उवा, पिसा इत्यादि स्वेदज, वृक्षादिक उद्भिज्ज, घोडे, गायी, पुरुष, हत्ती, तसेंच हें जें सर्व प्राणिजात आहे. तें कोणतें ? जङ्गम ह्मणजे जें चालतें, दोन पायांनीं जातें, तसेंच जें पतत्रि ह्मणजे आकाशमार्गानें उडण्याचें ज्याचें शील आहे तें, आणि जें स्थावर ह्मणजे अचल (तें सर्व हा प्रज्ञानरूप आत्माच आहे.)

(तें सर्व हाच आहे, या ह्मणण्याचें कारण सांगण्यासाठीं ‘सर्वं तत्प्रज्ञानेत्रं’ येथून ‘प्रज्ञा प्रतिष्ठा’ येथवरचें वाक्य आहे. भाष्यकार आतां त्याचें व्याख्यान करितात- ) “ **सर्वं तदशेषतः प्रज्ञानेत्रं प्रज्ञप्तिः प्रज्ञा तच्च ब्रह्मैव नीयतेऽनेनेति नेत्रं, प्रज्ञा नेत्रं यस्य तदिदं प्रज्ञानेत्रम् ।** ” अर्थ— तें सर्व प्रज्ञानेत्र आहे. प्रज्ञप्ति ह्मणजे प्रज्ञा, तेंच ब्रह्म होय आणि ब्रह्मच नेणारें, ज्याच्या योगानें नेलें जातें तें. अर्थात् प्रज्ञा-ब्रह्म ज्याचें नेत्र-नेणारें आहे तें हें प्रज्ञानेत्र होय. (या प्रज्ञानाच्या योगानें सत्तेला पोचविलें जातें, सर्व सत्तायुक्त केलें जातें. ह्मणून सर्व प्रज्ञानेत्र आहे. किंवा सर्व प्रज्ञानेत्र आहे ह्मणजे प्रज्ञान सर्वांला आपापल्या कार्यांत प्रवृत्त करतें. ‘अहो पण अशाप्रकारचें तत्त्व उपनिषदांत ‘ब्रह्म’ या शब्दानेंच प्रसिद्ध आहे. ‘प्रज्ञान’ या नावानें त्याची कोठेंच प्रसिद्धि नाहीं,’ अशी कोणी आशंका घेईल, असें समजून ‘वस्तुतः प्रज्ञानाचाच ठिकठिकाणीं ब्रह्मशब्दानें उल्लेख केलेला आहे. त्यामुळें प्रज्ञानच सर्वांचें प्रवर्तक आहे, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. या अभिप्रायानेंच येथेंही पुढें ‘प्रज्ञान ब्रह्म आहे,’ असें ह्मटलें आहे, ’ असें सांगितलें आहे. किंवा ‘ कोऽयमात्मा० ’ येथपासून ‘एते सर्वे देवाः’ येथवर जो श्रुतिभाग आहे तो त्वंपदार्थाच्या शोधनाकरितां आहे व ‘इमानि च पंच०’ येथून ‘प्रज्ञा प्रतिष्ठा’ येथवरचा श्रुत्यंश तत्पदार्थाच्या शोधनाकरितां आहे, असें समजावें. (शोधन ह्मणजे चेतनाला जीवाच्या व ईश्वराच्या उपाधीपासून विवेकानें पृथक् करणें.) यापक्षीं प्रकृष्ट ज्ञान, उत्कृष्ट ज्ञान

ह्मणजे प्रज्ञान, अशा व्युत्पत्तीनें प्रज्ञानशब्दानें तत्पदार्थ ब्रह्मच सांगितलें आहे. अर्थात् पंच भूतांपासून स्थावरापर्यंत सर्व प्रज्ञानेत्र ह्मणजे ब्रह्मनेत्र आहे. प्रज्ञेच्या सत्तेनेंच सर्वांना सत्तावत्त्व आहे, हें सुचविण्यासाठीं तें सर्व प्रज्ञानांत प्रतिष्ठित आहे, असें ह्मटलें आहे. यास्तव भाष्यकार आतां त्याचेंच व्याख्यान करितात–) "प्रज्ञाने ब्रह्मण्युत्पत्ति-स्थिति–लयकालेषु प्रतिष्ठितं प्रज्ञाश्रयमित्यर्थः।" अर्थ— प्रज्ञानामध्यें ब्रह्मामध्यें उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही काळीं प्रतिष्ठित आहे. तें सर्व प्रज्ञाश्रय आहे, असा याचा अर्थ. केवळ प्रज्ञेच्या सत्तेनेंच त्या सर्वाला सत्तावत्त्व आहे, असें नाहीं तर सर्वांची प्रवृत्तिही तिच्या अधीन आहे, असें सांगतात–) "प्रज्ञानेत्रो लोकः पूर्ववत्।" अर्थ— लोक (सर्व जगत्) प्रज्ञानेत्र आहे. प्रज्ञानेत्र याची व्युत्पत्ति पूर्वीप्रमाणेंच (ह्मणजे 'नीयते प्रवर्त्यते अनेन–' ज्याच्या योगानें नेलें, प्रवृत्त केलें जातें तें नेत्र– प्रवर्तक, अशी जाणावी. किंवा पहिल्या 'नेत्र' या शब्दानें सर्वांच्या सत्तेचें व व्यापाराचें-प्रवृत्तीचें निमित्त हा प्रज्ञात्मा आहे, असें सांगितलें आणि आतां सर्वांचा स्फुरणहेतुही हाच आहे, असें सांगण्याच्या उद्देशानें आचार्य ह्मणतात– ) " प्रज्ञाचक्षुर्वा सर्व एव लोकः। " अर्थ— किंवा सर्वही जगत् प्रज्ञाचक्षु आहे. ( येथें प्रज्ञा ह्मणजे स्फुरण. )

( ज्याप्रमाणें जगाचे स्फुरण व प्रतिष्ठा हीं दोन्ही प्रज्ञानाच्या अधीन असतात त्याप्रमाणें प्रज्ञानाचें स्फुरण–भान व प्रतिष्ठा–आधार दुसऱ्या कोणाच्या अधीन असेल असें कोणाला वाटेल ह्मणून ' तें स्वप्रकाश असून स्वतःच्या माहात्म्यामध्यें प्रतिष्ठित असल्याकारणानें व त्याचा दुसरा आश्रयही नसल्यामुळें त्याचें स्फुरण व प्रतिष्ठा अन्याधीन नाहीं, ' असें सांगतात– ) " प्रज्ञा प्रतिष्ठा सर्वस्य जगतः। " अर्थ—प्रज्ञा सर्व जगाची प्रतिष्ठा आहे. ( किंवा सर्व जगाची सत्ता व स्फुर्ति प्रज्ञानाच्या अधीन आहे. त्यामुळें तें उत्पत्ति–स्थिति इत्यादि अवस्थांमध्यें प्रज्ञानांत प्रतिष्ठित असतें. ह्मणून प्रज्ञान हें त्याचें उपादान कारण आहे. कोणताही विकार केवळ शब्दमात्र असून त्याचें उपादानच सत्य असतें, असा वाचारंभणन्याय

आहे त्याच्या अनुरोधानें विकाररूप जगत् प्रज्ञानाहून पृथक् नाहीं, असें ठरतें. यास्तव सर्पादिकाची पर्यवसानभूमि ( सीमा ) जशी रज्जु, त्याप्रमाणें जगाची पर्यवसानभूमि प्रज्ञान आहे, असें 'प्रज्ञा प्रतिष्ठा' या शब्दांनीं सांगितलें आहे, असें समजावें. यापक्षीं प्रतिष्ठा ह्मणजे ध्रुव–निश्चित–अव्यभिचारी पर्यवसानभूमि–आरोपिताचा बाध झाल्यावर अवशिष्ट राहणारी वस्तु. तात्पर्य, वस्तुस्थिति अशी असल्यामुळें प्रत्यगात्मरूप प्रज्ञानाचें निर्विशेषत्वादिक सर्व सिद्ध झालें, असें सांगतात–) "तस्मात्प्रज्ञानं ब्रह्म।"
अर्थ—तस्मात् ( प्रज्ञानच अवशिष्ट रहात असल्यामुळें परमार्थ सत्य आहे, यास्तव ) प्रज्ञानच ब्रह्म आहे, (आता ब्रह्मशब्दाचाच अर्थ सांगतात–) "तदेतत्प्रत्यस्तमितसर्वोपाधिविशेषं सन्निरञ्जनं निर्मलं निष्क्रियं शान्तमेकमद्वयं नेति नेतीति सर्वविशेषापोहसंवेद्यं सर्वशब्दप्रत्ययागोचरं। तदत्यन्तविशुद्धप्रज्ञोपाधिसंबन्धेन सर्वज्ञमीश्वरं सर्वसाधारणाव्याकृतजगद्बीजप्रवर्तकं नियन्तृत्वादन्तर्यामिसंज्ञं भवति। तदेव व्याकृतजगद्बीजभूतबुद्ध्यात्माभिमानलक्षणहिरण्यगर्भसंज्ञं भवति। तदेवान्तरण्डोद्भूतप्रथमशरीरोपाधिमद्विराट्प्रजापतिसंज्ञं भवति। तदुद्भूताग्न्याद्युपाधिमद्देवतासंज्ञं भवति। तथा विशेषशरीरोपाधिष्वपि (तत्तत्संज्ञं भवति। एवं ) ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तेषु तत्तन्नामरूपलाभो ब्रह्मणः।"
अर्थ—तें हें ब्रह्म ज्याचे सर्व उपाधिभेद, उपाधीमुळें प्राप्त झालेले कर्तृत्व, भोक्तृत्व, दुःखित्व इत्यादि विशेष, अगदीं अस्त पावले आहेत असें, सत्, निरंजन, निर्मळ, निष्क्रिय, शान्त ह्मणजे परितृप्त, परमानन्दरूप ( या विशेषणानें त्याचें पुरुषार्थत्व सांगितलें आहे ) एक, अद्वय, 'नेति नेति' इत्यादि सर्वविशेषाच्या निरासानेंच साक्षात् ज्ञात होणारें, ('यतो वाचो निवर्तन्ते, आनन्दं ब्रह्मणो विद्वान्' इत्यादि श्रुती त्याच्या निर्विशेष आनन्दत्वाविषयीं प्रमाण आहेत, असा याचा भाव ) व सर्व शब्द–प्रत्ययाचा विषय न होणारें आहे.

( 'तर मग अशा प्रकारच्या प्रज्ञानाचा सर्वज्ञ ब्रह्मापासून स्थावरापर्यंत नानाविध भेद कसा प्रतित होतो,' अशी आशंका घेऊन 'नानाप्रकारच्या उपाधिसंबंधामुळें,' असें समाधान 'तदुत्पन्त०' या पदानें सांगितलें आहे. ) तें अत्यंत विशुद्ध प्रज्ञा, या उपाधिसंबंधामुळें सर्वज्ञ, ईश्वर आहे. (पण अन्तर्यामी, हिरण्यगर्भ व प्रजापति यांच्याशीं अत्यंत विशुद्ध प्रज्ञेचा संबंध जरी एकसारखाच असला, तरी ते त्या सर्वज्ञाहून अगदीं भिन्न आहेत, असें 'सर्वसाधारण०' इत्यादि भाष्यानें सांगतात–) सर्वसाधारण व अव्यक्त अशा मायासंज्ञक जगद्बीजाचें प्रवर्तक असें तेंच नियन्तृत्व या धर्मामुळें, या उपाधीमुळें अन्तर्यामिसंज्ञक होतें. सर्व जगाचें कारण अशी जी व्याकृत समष्टिबुद्धि तिच्या ठिकाणीं 'हीच मी' असा आत्मत्वाभिमान हेंच ज्याचें लक्षण–उपाधि आहे, असें तेंच हिरण्यगर्भसंज्ञक होतें. तेंच अंड्यांत उत्पन्न झालेलें पहिलें शरीर याच उपाधीनें युक्त होत्सातें विराट् व प्रजापति होतें ( म्हणजे ब्रह्मांड ही ज्याची उपाधि आहे तें विराट् व त्या अंड्यांत उत्पन्न झालेलें प्रथम शरीर ही ज्याची उपाधि आहे तें प्रजापति या नावाचें होतें. ) तसेंच त्या अंड्यापासून उत्पन्न झालेल्या ज्या ह्या अग्न्यादिकाच्या समष्टि–वागादिक उपाधी त्यांनीं युक्त असलेलें प्रज्ञान अग्न्यादि देवतासंज्ञक होतें. ( 'अग्न्यादि' येथील आदिशब्दानें व्यष्टिवागादिकांचे अभिमानी देव व असुरादिक इतर प्राणी घ्यावे. तेंच प्रज्ञान व्यष्टिमनुष्यादि–शरीरामध्यें मनुष्यादि संज्ञास प्राप्त होतें, असें 'तथा विशेष०' इत्यादि भाष्यानें सांगतात– ) त्याचप्रमाणें विशेषशरीरोपाधींमध्येंही तें त्या त्या नावाचें होतें. याप्रमाणें ब्रह्मादिस्तंबपर्यंत जेवढ्या उपाधी आहेत त्या सर्वांमध्यें ब्रह्माला त्या त्या नावारूपाचा लाभ होतो.

( 'अहो पण सांख्यादिक 'जीव ( पुरुष ) अनेक आहेत,' असें म्हणतात; दुसरे कित्येक ( नैयायिकादिक ) जीव व ईश्वर अनेक आहेत ( जीव परस्पर भिन्न व ईश्वर त्या सर्वांहून पृथक् असें म्हणतात. ) त्याचप्रमाणें ते सर्व जगाचें कारणही निरनिराळें सांगतात. तेव्हा एका ब्रह्माचीच

तीं नावें व रूपें आहेत, असें कसें ह्मणतां ?' असें कोणी विचारील ह्मणून आचार्य सांगतात- ) " तदवैकं सर्वोपाधिभेदभिन्नं सर्वं. प्राणिभिस्तार्किकैश्च सर्वप्रकारेण ज्ञायते विकल्प्यते चानेकधा।" अर्थ— तेंच एक सर्व उपाधिभेदांनीं भिन्न झालेलें प्रज्ञान सर्व प्राण्याकडून व तार्किकाकडून सर्व प्रकारें जाणलें जातें व अनेक प्रकारें विकल्पिलें जातें. (आतां याचविषयीं स्मृतिप्रमाण देतात- ) " एतमेके वदन्त्यग्निं मनुमन्ये प्रजापतिं। इन्द्रमेकेऽपरे प्राणमपरे ब्रह्म शाश्वतम्॥ इत्याद्या स्मृतिः।" अर्थ—' या परमात्म्यालाच कोणी अग्नि ह्मणतात, दुसरे मनु व प्रजापति ह्मणतात. आणखीं कांहीं त्याला इंद्र ह्मणतात. दुसरे कित्येक प्राण ह्मणतात व कांहीं शाश्वत ब्रह्म ह्मणतात.' इत्यादि अर्थाची स्मृति याविषयीं प्रमाण आहे.

( आतां वर ( पृष्ठ २२२ ) जे दोन पक्ष सांगितले आहेत, ह्मणजे 'प्रज्ञानच उपनिषदांत ठिकठिकाणीं ब्रह्म या शब्दानें सांगितलें आहे' हा एक पक्ष व ' कोऽयम्० ' पासून ' सर्वे देवाः ' येथपर्यंत त्वंपदार्थशोधन व ' इमानि० ' पासून ' प्रतिष्ठा० ' पर्यंत तत्पदार्थशोधन केलें आहे हा दुसरा पक्ष, त्यांतील पहिल्या पक्षीं ' प्रज्ञानं ब्रह्म ' येथें सामानाधिकरण्यानें ब्रह्मशब्दानें प्रत्यगात्म्याचें निर्विशेषत्वादिकच सांगितलें आहे. कारण ब्रह्मशब्दाचाही निर्विशेषत्वादिकच अर्थ आहे. कारण श्रीशंकराचार्यांनीं शारीरक भाष्यात ' ब्रह्मशब्दाची व्युत्पत्ति पाहूं लागलें असता नित्यशुद्धत्वादिक अर्थ प्रतीत होतात. कारण ' बृह बृहि वृद्धौ ' या धातुपाठांत सांगितल्याप्रमाणें ' बृह्-' धातूचा अनुगम त्या अर्थांत होतो, असें ह्मटलें आहे अर्थात् प्रत्यगात्मा व ब्रह्म यांचें ऐक्य या वाक्यानें सांगितलें आहे, असें समजूं नये. कारण ' आत्मा वा इदमेक एवाग्रे० ' या पहिल्या वाक्यांत आत्म्याचा अद्वितीयत्वानेंच उपक्रम केला आहे. त्यांत ब्रह्मपदाच्या अर्थानें उपक्रम केलेला नाहीं. तात्पर्य, अशा रीतीनें या उपनिषदांत आत्माच आपल्या स्वरूपाविषयींच्या अज्ञानानें संसार करतो व स्वरूपज्ञान झालें असतां मुक्त होतो, हा

पक्ष स्पष्ट केला आहे. पण वर सांगितलेल्या पक्षांतील दुसरा पक्ष जेव्हां घ्यावयाचा असेल तेव्हां तत्पदार्थाच्या शोधनानंतर महावाक्यार्थ सांगण्यासाठीं ' प्रज्ञानं ब्रह्म ' हें वाक्य आहे, असें समजावें. या पक्षीं येथील प्रज्ञानशब्द व ' प्रज्ञानस्य नामधेयानि ' येथील प्रज्ञानशब्द यांचा अर्थ प्रत्यगात्मा-प्रत्येक शरीरांतील कूटस्थ-असा समजावा आणि ब्रह्मशब्दानें जगत्कारणत्व या उपाधीनें उपलक्षित होणारें चैतन्य सांगितलें आहे, असें जाणावें आणि याप्रमाणें दोघांच्याही ठिकाणीं निर्विशेष चिद्रूपत्व एकसारखेंच असल्यामुळें ' त्यांचें ऐक्य ' हाच महावाक्यार्थ आहे. यापक्षीं ' प्रत्यस्तमितसर्वोपाधिविशेषं ' हें भाष्य-' प्रज्ञान ब्रह्म आहे,' असा उपदेश केल्यानें काय सिद्ध होतें, अशी आशंका घेऊन ' त्याचें निर्विशेषत्वादिक सिद्ध होतें,' असा फलितार्थ सांगणारें आहे,-अशा रीतीनें त्याचें व्याख्यान करावें. बाकीचीं सर्व विशेषणें दोन्ही पक्षीं सारखींच लागू पडतात. )

### ६ ' स एतेन० ' या शेवटच्या वाक्याचें व्याख्यान.

( येणेंप्रमाणें या खंडांत ' कोऽयमात्मा० ' येथपासून ' प्रज्ञानं ब्रह्म ' येथपर्यंत विचारपुरःसर आत्मतत्त्वाचा निर्धार (निश्चय) केला. आत्मा इंद्रियसमूहरूप प्राणाहून अगदीं निराळा, संज्ञानादि सर्व अन्तःकरणवृत्तींहूनही निराळा, पण त्या सर्वांत अनुगत, अनुवृत्त-व्याप्त असलेला, स्वप्रकाश, सर्वशरीरांत एक, सर्वप्रपंचाधिष्ठानभूत, अद्वितीय, प्रज्ञान, ब्रह्म (व्यापक), व नित्य शुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभाव आहे, असा निश्चय केला. आतां अशा प्रकारच्या ब्रह्मात्म्याला जाणणाऱ्या विद्वानाला फल कोणतें मिळतें तें सांगण्यासाठीं ' स एतेन प्रज्ञेनात्मनाऽस्माल्लोकादुत्क्रम्यामुष्मिन्स्वर्गे लोके सर्वान्कामानाप्त्वाऽमृतः समभवत्समभवत् ' हें वाक्य आहे. त्यांतील ' एतेन ' या पदांतील ' एतत् ' हा शब्द प्रकृतवाची आहे. पण येथें ' कोऽयमात्मा० ' असें ह्मणून विचार करणारे अनेक आहेत. यास्तव त्या प्रकृत अशाही पुरुषांचा 'एतेन' असा एकवचनानें परामर्श करणें उचित नाहीं. त्याचप्रमाणें वर्तमान काळच्या विद्वा-

नाचा 'स' या भूतकालवाचक सर्वनामानें परामर्श करणे योग्य नाहीं. यास्तव 'स' या शब्दानें मागच्या अध्यायांतील वामदेवाचा परामर्श केला आहे, असें सांगतात- ) " स वामदेव ।" अर्थ— तो वामदेव ( पण ब्रह्मवेत्त्याचें फल सांगण्यामध्यें या वाक्याचें तात्पर्य असल्यामुळें वामदेवादि विशेष पुरुषामध्यें त असणें युक्त नव्हे असें वाटून 'किंवा 'स' यानें दुसरा कोणी विद्वान् घ्यावा ' असें सांगतात- ) " अन्यो वैव यथोक्त ब्रह्म वेद । अर्थ— किंवा जा दुसरा कोणी वर सांगितलल्या प्रकारचें ब्रह्म जाणतो (म्हणजे या खडांत सांगितलेल्या प्रकारें जो या प्रज्ञानरूप ब्रह्माला प्रज्ञानात्म्यानें जाणतो असा याचा भावार्थ ) तो प्रज्ञेनात्मना येनैव प्रज्ञनात्मना पूर्व विद्वांसोऽमृता अभवंस्तथायमपि विद्वानेतेनैव प्रज्ञे नात्मना अस्माल्लोकादुत्क्रम्येत्यादि व्याख्यातम् । अस्माल्लोकादुत्क्र म्यामुष्मिन्स्वर्गे लोके सर्वान्कामानाप्त्वाऽमृत समभवदित्योमिति ।" अन्वय — येन एव प्रज्ञेन आत्मना ब्रह्मविद्वास पूर्वे अमृता अभूवन् तेन एतेन एव प्रज्ञन आत्मना यथोक्त ब्रह्म वामदेव अन्य वा वेद स अमृत अभवत् । तथा अय अपि इदानींतन अपि विद्वान् एतेन एव प्रज्ञेन आत्मना अस्मात् लोकात् उत्क्रम्य अमृत समभवत् । अर्थ— ज्या प्रज्ञानात्म्यानेंच ब्रह्माला जाणणारे पूर्वीचे विद्वान् अमृत झाले त्या याच प्रज्ञानात्म्यानें पूर्वोक्त ब्रह्माला जा वामदेव किंवा दुसरा कोणी जाणता झाला तो अमृत झाला ( असा 'स वामदेव ' इत्यादि मागचीं पदेंही घेऊन अन्वय लावावा ) त्याचप्रमाणें हा वर्तमानकाळचा विद्वान्ही याच प्रज्ञानात्म्यानें या लोकांतून उत्क्रमण करून अमृत झाला (' अस्मात् लोकात्० ' इत्यादि वाक्याचें व्याख्यान मागच्या खडाच्या शेवटीं केलें आहे (पहा पृष्ठ २००) या लोकांहून उत्क्रान्त होऊन इंद्रियगोचर न होणा या स्वात्मरूप लोकांत सर्व भोगास प्राप्त होऊन अमृत झाला ' ॐ " । ( एखादा पक्षी जसा आपल्या घरट्यांतून वर उडून जातो, त्याप्रमाणें येथें उत्क्रमण संभवत नाहीं यास्तव 'देहात्मभाव सोडून प्रज्ञानात्मभाव धारण करणें, हेच उत्क्रमण आहे,' असा

अभिप्रायानें भाष्यात ' प्रज्ञानात्मनोत्क्रम्य ' असें ह्मटलें आहे अथवा ' प्रज्ञानात्मना विद्वान् ' ह्मणजे 'प्रज्ञानात्मरूपानें जाणणारा या लोकातून निघून' इत्यादि अन्वय लावावा असो, येणेंप्रमाणें आपला अनुभव प्रकट करीत, येथवर सांगितलेलें आत्मतत्त्व अंगीकारवाची ओंकारानें दृढ करण्यासाठीं भाष्यकार शेवटीं ' ॐ ' असें ह्मणतात. ' पूर्वी ' ॐ ' व ' अथ ' असे हे दोन शब्द ब्रह्मदेवाच्या कंठाचा भेद करून निघाले यास्तव ते दोन्ही मंगलिक आहेत ' अशा अर्थाची ' ओंकारश्चाथशब्दश्च० ' अशी स्मृति असल्यामुळें ओंकारानें शेवटीं ब्रह्मात्मानुसंधानलक्षण मंगल करण्यासाठींही ' ओं ' असें ह्मटलें आहे

येथें श्रीशंकराचार्यकृत ऐतरेयोपनिषद्भाष्याच्या आचार्यभक्त विष्णुकृत भाष्यार्थाचा[1] सहावा अध्याय समाप्त झाला

येथें हें उपनिषद्ही समाप्त झालें

श्रीकृष्णार्पणमस्तु

---

१ या अध्यायाचाही खंड एकच आहे केवल या उपनिषदाच्या क्रमानें मागला अध्याय हा चवथा खंड व हा अध्याय हा पांचवा खंड आहे पुढचा सहावा खंड किंवा या आरण्यकाचा शेवटचा सातवा अध्याय ' वाङ्मे मनसि० ' ही शांति आहे. पण तिचा अर्थ पहिल्या रत्नांत परिशिष्टच्या आरंभींच केला आहे



## प्रस्तावना.

परमात्म्याच्या कृपेनें आमच्या हातून ऐतरेयोपनिषदावरील तीन प्रसिद्ध विद्वानांच्या व्याख्यानांचें विवरण संपल्यावर आतां आह्मी या दुसऱ्या तैत्तिरीयोपनिषदाच्या व्याख्यानांस आरंभ केला आहे. पहिल्या रत्नांत मूळ उपनिषद् शेवटीं शब्दशः अर्थासह परिशिष्टरूपानें दिलें होतें. पण त्यापेक्षां स्वतंत्र उपनिषद्-च शब्दशः अर्थासह प्रथम देऊन नंतर त्यावरील व्याख्यानांच्या मराठी विवरणाला आरंभ केल्यास प्रिय वाचकांची अधिक सोय होईल, असें वाटल्यावरून आह्मीं प्रथम हें उपनिषद्-च शब्दशः अर्थासह आजच्या अंकांत दिलें आहे. तें मननपूर्वक दोन तीन वेळ वाचून होत आहे तों बाराव्या अंकांत अनुभूतिप्रकाशाचा दुसरा अध्याय ( समग्र ) वाचकांस मिळेल. यापुढें ग्रन्थ खंडशः न देतां प्रत्येक अंकांत प्रत्येक प्रकरण संपवून देण्याचाच विचार केला आहे. या योजनेनें अंकांची पृष्ठसंख्या कमी-अधिक होईल. पण प्रत्येक अंकांत प्रत्येक प्रकरण संपलेलें मिळाल्यामुळें वाचकांची मोठी सोय होईल, असें वाटतें. नवीन वर्षापासून दर्शनांचाही मासिकांतच अन्तर्भाव करून एक अंक दर्शनाचा व दुसरा रत्नाचा, असे आळीपाळीनें अंक काढण्याचा संकेत करीत आहों. कोणीकडून दरसाल ठरलेलीं पृष्ठें वाचकांना मिळतील. पण या सर्व योजनेला ग्राहकांचें भरपूर साह्य पाहिजे. तें आह्मांला अद्यापि मिळालेलें नाहीं. तथापि आणखी एक वर्ष आह्मी नेटानें हाच उद्यम चालविल्यास तेवढ्या अवधींत मासिकाचा खर्च भागण्याइतके तरी ग्राहक आह्मांस मिळतील अशी पूर्ण उमेद आहे.

यजुर्वेदाची तैत्तिरीय ह्मणून एक शाखा आहे. त्या नांवाविषयीं पुराणांत अशी आख्यायिका आढळते. कृष्णद्वैपायन व्यासांच्या चार शिष्यांतील वैशंपायनानें, यजुर्वेदाचें अध्ययन केलें होतें. पुढें त्यानेंही पुष्कळ विद्यार्थ्यांना तो वेद शिकविला. त्यांत पलिंगु, तित्तिरि, याज्ञवल्क्य इत्यादि अनेक शिष्य होते. एकदा वैशंपायन पाठ सांगत असतांना याज्ञवल्क्यानें त्यांचा अपमान

केला. तेव्हा शिष्याला शासन करण्यासाठीं त्या आचार्यानें ' मजपासून घेतलेला वेद परत देऊन तूं येथून निघून जा,' असें त्याला सांगितलें. याज्ञवल्क्य शिष्यही स्वतंत्रप्रज्ञ होता. त्यामुळें त्याला ते आचार्याचें वचनही असह्य झालें. त्यानें लागलाच तो वेद ओकून टाकिला, आणि गुरुजींची आज्ञा घेऊन तेथून प्रयाण केलें. घोर तपोवनात शिरून त्यानें दीर्घकाल निरंतर सूर्योपासना केली. त्यामुळें भगवान् आदित्य प्रसन्न झाला. त्यानें वर मागावयास सांगितला असता याज्ञवल्क्यानीं नवा वेद मागितला. तेव्हा सूर्यानें त्याला शुक्ल यजुर्वेद दिला. इकडे वैशंपायनाच्या तित्तिरि-शिष्यानें तित्तिरपक्षी होऊन याज्ञवल्क्यानें ओकून टाकलेल्या वेदास आपल्या पोटात साठविलें व आपली शाखा चालविली त्या वेदाचें स्वतंत्र प्रवचनादि करून अनुष्ठानपद्धति सुरू केली. ह्मणून या शाखेला 'तैत्तिरीय शाखा' ह्मणतात त्याचप्रमाणें वैदिकानीं तैत्तिरीयाच्या मन्त्रब्राह्मणात्मक वेदाला याज्ञवल्क्यानें सूर्यापासून संपादन केलेल्या यजुर्वेदापासून व्यावृत करण्यासाठीं ' कृष्ण यजुर्वेद ' ( ह्म० कृष्ण द्वैपायनापासून प्राप्त झालेला वेद ) असें नाव दिलें.

या आख्यायिकेंत वैदिकपरंपरा व श्रद्धा याचें गूढ रहस्य साठविलेलें असल्यामुळें ती आह्मी येथें मुद्दाम दिली आहे याज्ञवल्क्यानें वेद ओकला कसा व तित्तिरींनें तो अमंगल वान्त वेद आपल्या पोटात साठविला कसा ?असा कुतर्क काढण्यापेक्षा वैदिक लोक याज्ञवल्क्याच्या स्वतंत्रप्रज्ञत्वाकडे व तित्तिरीच्या आदरातिशयाकडेच अधिक लक्ष देतात त्यामुळें त्याना या आख्यायिकेचें मोठेसें आश्चर्य वाटत नाहीं. याज्ञवल्क्यानीं सूर्यापासून संपादन केलेल्या वेदाचें ईशावास्य० इत्यादि मन्त्रोपनिषद व बृहदारण्यक हें ब्राह्मणोपनिषद् आहे त्याचें व्याख्यान ईश्वराची इच्छा असल्यास लवकरच या मालेच्या द्वारा प्रसिद्ध होईल. पण तूर्त कृष्ण यजुर्वेदान्तर्गत तैत्तिरीयोपनिषदाचें तात्पर्य सागणें, हें प्रकृत आहे.

कृष्ण यजुर्वेदीय तैत्तिरीय आरण्यकाचे दहा प्रपाठक आहेत. त्यातील पहिल्या सहा प्रपाठकांत नित्य व काम्य कर्मांचें व कर्मसंबंधी उपासनांचें विधान असून पुढच्या तीन प्रपाठकांत ज्ञानोपयोगी उपासना व ज्ञान यांचें प्रतिपादन केलें आहे त्यांतही सातव्या प्रपाठकांत ज्ञानोपयोगी शिक्षा

सांगितलेली असून आठव्यांत साक्षात् विद्या व नवव्यांत तिचें अन्तरंग साधन सांगितलें आहे. दहावा प्रपाठक, हेंच प्रसिद्ध महानारायणोपनिषद् असून त्यांत कर्म व ज्ञान या दोन्ही विषयांचें प्रतिपादन केलें आहे. ह्मणूनच त्याला ' खिलकांड ' ह्मणतात. श्रीशंकराचार्यांनीं त्यांतील सात, आठ व नऊ, या प्रपाठकांवर भाष्य लिहिलें आहे. वेदभाष्यकार सायणाचार्यांनीं सर्व आरण्यकावर विस्तृत भाष्य लिहिलेलें असल्यामुळें अर्थात्-चर्तें या तीन उपनिषद्रूप अध्यायांवरही ( प्रपाठकांवर ) आहे. श्रीशंकरानन्दांनीं या तीन अध्यायांवरच दीपिका लिहिली आहे. विद्यारण्यांनीं अनुभूतिप्रकाशाच्या दुसऱ्या अध्यायांत या उपनिषदाच्या दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायाचेंच ह्म० आरण्यकाच्या आठव्या व नवव्या प्रपाठकाचेंच व्याख्यान केलें आहे. शंकरानन्दांनीं आत्मपुराणाच्या दहाव्या अध्यायांत मात्र ह्या तीन अध्यायांबरोबर नारायणोपनिषदही घतलें आहे. आह्मीं या ग्रंथांतील व्याख्यान मुख्यत. सायणाचार्यांच्या भाष्याच्या अनुरोधानें. श्रीशंकरानन्द व आचार्य यांच्या दीपिका व भाष्य यांचें अवलोकन करून लिहिलें आहे. भाष्यार्थ लवकरच प्रसिद्ध होणार असल्यामुळें त्यांतील भिन्न व्याख्यानाचा फारसा उल्लेख न करितां शंकरानन्दाच्या दीपिकेंतील पृथक् अर्थाचा मात्र जागजागीं निर्देश केला आहे. कांहीं ठिकाणीं सायणाचार्यांनीं केलेला भिन्न अर्थही त्यांच्या नांवासह दाखविला आहे. पण अशा जागीं प्रथम शंकरानन्दाच्या दीपिकेच्या अनुसार अर्थ करून नंतर त्यांचा अर्थ दिला आहे, असें जाणावें. *अर्थामध्यें प्रसिद्ध अथवा पूर्वी एकदां ज्याचा अर्थ सांगितला आहे, अशा पदाचा अर्थ मूळ पद जाड अक्षरांत न देतां नुसताच दिला आहे.* सारख्याच वाक्याच्या पर्यायांतील प्रत्येक वाक्याचा अर्थ सरळ दिला आहे. ठिकठिकाणीं वाक्यार्थांचें स्पष्टीकरणही केलें आहे.

आतां या उपनिषदाच्या प्रत्येक अध्यायांतील प्रतिपाद्य विषयाचें दिग्दर्शन करून आह्मी ही प्रस्तावना संपवितों-पहिल्या शीक्षाध्यायांत आरंभीं विघ्ननिवारणार्थ देवतांची प्रार्थना व वायुरूप ब्रह्माला नमस्कार करून ब्राह्मणाच्या अध्ययन व अध्यापन या दोन अति पवित्र कर्तव्यास आध्यात्मिकादि त्रिविध प्रतिबंध होऊं नये ह्मणून शांतिपाठ केला आहे. दुसऱ्या अनुवाकांत उपनिषदें अर्थप्रधान आहेत ह्मणून त्यांच्या पाठाविषयीं अनादर होऊं नये,

या हेतूनें वर्ण, स्वर, मात्रा इत्यादिकांचा बरोबर उच्चार केला पाहिजे, असें विधान केलें आहे. तिसऱ्या अनुवाकांत लोक, ज्योति, विद्या, प्रजा व शरीरेंद्रियसमूह यांच्या आधारानें संहितेची उपासना सांगितली आहे. उपासना ह्मणजे ध्यान, चिंतन, एकाच वस्तूचें सतत ध्यान केल्यानें चित्ताचें ऐकाग्र्य होतें; व ऐकाग्र्यच आनन्दात्म्याच्या साक्षात्काराचें मुख्य साधन आहे. वेदानें सर्व कर्मे व उपासना त्यासाठीं सांगितल्या आहेत. चवथ्या अनुवाकांत धारणाशक्ति वाढण्यासाठीं जप करावयास योग्य असलेला (जप्य) मन्त्र सांगून आरोग्य, संपत्ति व उत्तम शिष्य यांचें संपादन करून देणाऱ्या मंत्राचाही निर्देश केला आहे. पांचव्या अनुवाकांत ' भूः, भुवः व सुवः ' या प्रतीकांचे ठिकाणीं अंगभूत देवतांच्या उपासनाचें विधान करावयासाठीं प्रथम त्या तीन व्याहृती सांगून नंतर ' महः ' ही चवथी व्याहृति ध्यानाचें प्रतीक ह्मणूनच सांगितली आहे. त्यानंतर त्यांच्या ठिकाणीं भूरादि लोक, अग्न्यादि देव, ऋगादि वेद व प्राणादि वायू यांची दृष्टि करून उपासना करण्याचें विधान केलें आहे. शेवटीं त्यांची उपासना ही ब्रह्मोपासनाच आहे, असें सांगून उपासक इंद्रादि देवाना पूज्य होतो, असें सांगितलें आहे. सहाव्या अनुवाकांत अंगी ब्रह्माची उपासना सांगण्यासाठीं उपास्याचें स्वरूप, उपासकाचा शरीर सोडून जाण्याचा मार्ग व उपासनेच्या अनुसार फळ सांगितल्यावर शेवटीं उपासनेचें विधान केलें आहे. या अनुवाकांत सांगितलेली उपासना अतींद्रिय मनोमयत्वादि गुणविशिष्ट ब्रह्मासंबंधीं असल्यामुळें मध्यम अधिकाऱ्यासाठीं आहे. सातव्या अनुवाकात मन्द अधिकाऱ्यासाठीं पृथिव्यादि स्थूल भूतांचे ठिकाणीं ब्रह्मोपासना सांगितली आहे. आठव्या अनुवाकांत उत्तम अधिकाऱ्यासाठीं वेदान्तप्रतिपाद्य प्रणववाच्य शुद्ध ब्रह्माच्या उपासनेचें विधान करण्याकरितां श्रुतीनें प्रथम प्रणवामध्यें ब्रह्माचें गुणसाम्य असल्यामुळें प्रणव, हें त्याचें नांव होऊं शकतें, असें अनेक वैदिक व्यवहारांच्या उदाहरणांनीं व्यक्त केलें आहे; शेवटीं फल सांगण्याच्या मिषानें उपासनेचें विधान केलें आहे. नवव्या अनुवाकांत पूर्वोक्त उपासनेसह अवश्य अनुष्ठेय कर्मांचें विधान आहे. मानसिक सत्य, वाचिक सत्य, तप, दम, शम इत्यादि अनेक कर्मांतील प्रत्येकाबरोबर स्वाध्याय व प्रवचन यांचा उल्लेख करून व त्यांतील उत्तम साधनाविषयीं ऋषींचा मतभेद दाखवून

स्वाध्याय व प्रवचन हेंच उत्तमोत्तम तप आहे; असें सांगितलें आहे. दहाव्या अनुवाकांत बुद्धिमांद्यादि दोषांमुळें एकाद्या श्रद्धालु ब्राह्मणामध्यें स्वाध्याय-प्रवचनरूप ब्रह्मयज्ञ करण्याचें सामर्थ्य नसल्यास त्यानें 'अहं वृक्षस्य०' या मंत्राचा जप करावा; ह्मणजे त्याला ब्रह्मयज्ञाचें फळ मिळतें, असें सुचविण्या-साठीं वरील मंत्रच सांगितला आहे. शेवटच्या अकराव्या अध्यायांत आचार्यांनें उपनीत शिष्याला वेदाध्यापनानंतर कोणत्या कर्तव्यांचा उपदेश करावा, तें सांगितलें आहे. हीं कर्तव्यें निदान प्रत्येक ब्राह्मणानें तरी आपल्या हृदयांत स्थिर करून तदनुसार आचरणानें आपल्या ब्राह्मण्याचें संरक्षण करावें. शेवटीं देवाप्रमाणें कोणा-कोणाला पूज्य मानावें तें सांगून व आचार्यांच्या आणखीं कांहीं उदार उपदेशांचा उल्लेख करून दान, अनुप्रेयादिकांचा निर्णय इत्यादि कसा करावा, तें सांगितलें आहे. बाराव्या अनुवाकांत पहिल्या अनुवाकांतील प्रार्थनामंत्र व शांतिच असून त्यांत देवांकरितां कृतज्ञताबुद्धि व्यक्त करण्या-साठीं पूर्वीप्रमाणें भविष्यत्काळीं प्रयोग न करतां भूतकाळीं प्रयोग केला आहे.



या उपनिषदाचा दुसरा ब्रह्मवल्लयध्याय हीच मुख्य ब्रह्मविद्या आहे. त्या अध्यायाच्या आरंभीं शिष्य व आचार्य यांचें ऐक्यमत्य व्हावें, ह्मणून शांतीचा पाठ केला आहे. नंतर 'ब्रह्मसाक्षात्कारवान् परब्रह्म प्राप्त होतो' अशा अर्थाचें सूत्रभूत वाक्य उच्चारून तिचें व्याख्यान करणारी 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म–' इत्यादि ऋचा उदाहरणार्थ घेतली आहे. त्या ब्रह्मालाच आत्मा ह्मणून त्याच्यापासून क्रमानें आकाश, वायु, अग्नि, आप, पृथ्वी, ओषधि, अन्न व शेवटीं अन्नापासून पुरुष झाला, असें ह्मटलें आहे. येथील पुरुष ह्म० देह अन्नाचें सार, असें जें वीर्य त्याचा विकार आहे, त्याला पक्षि-रूप मानून त्याच्या मस्तकादिकांच्या ठिकाणीं त्या पक्ष्याच्या–शिर, उजवा पंख, डावा पंख, मध्यभाग व पुच्छ–या पांच अवयवांची कल्पना केली आहे. त्यानंतर दुसऱ्या अनुवाकांत अन्नाची प्रशंसा करून, तें देहाच्या उत्पत्ति-स्थिति–लयाचें कारण आहे, असें सांगून अन्नमय कोशाचें सविस्तर वर्णन केल्यावर 'अन्नं ब्रह्म' अशी उपासना करावयास सांगून सर्वान्न-प्राप्ति हें त्या उपासनेचें दृष्ट फळही सांगितलें आहे.

अन्नमयाच्या उपासनेनें पुरुषाची बाह्य दृष्टि संकुचित होऊन ती किंचित् अन्तर्मुख झाली असतां तिला त्या देहाच्याही आतील प्राणमयाकडे वळविण्यासाठीं अन्नमयाच्या आतील प्राणमय कोशाचा उपदेश केला आहे. तिसऱ्या अनुवाकात प्राणमयाची प्रशंसा वगैरे केल्यावर त्याच्या आतील मनोमयाचा, चवथ्या अनुवाकात मनोमयाची प्रशंसा वगैरे केल्यावर विज्ञानमयाचा व पांचव्यांत विज्ञानमयाची प्रशंसा वगैरे केल्यावर आनंदमयाचा उपदेश केला आहे. आनंदमयाचा आत्मा म्हणजे मध्यप्रदेश आनंद असून ब्रह्म पुच्छ प्रतिष्ठा-आधार आहे, असें सांगितलें आहे. सहाव्या अनुवाकात-सर्वाधार ब्रह्म आहे कीं नाहीं, असा प्राय: प्रत्येकाला येणाऱ्या संशयाचा अनुवाद करून 'तें आहे' असें म्हणणारा साधु व 'नाहीं' असें म्हणणारा असाधु कसा ठरतो तें सांगितल्यावर हा आनंदमय विज्ञानमयाचा शरीर आत्मा आहे, असें म्हणून विज्ञानमयाच्याही पलीकडे असलेल्या आनंदमयाला व त्या आनंदमयाच्या पुच्छाला जाणणाऱ्या विद्वानाला कोणतें फळ मिळतें तें सांगण्यासाठीं त्याविषयीं कांहीं प्रश्न उपस्थित केले आहेत. त्यांच्या उत्तरांत अगोदर ब्रह्म आहे, असें सिद्ध करण्यासाठीं-त्यानें बहु होण्याची कामना केली, त्याने आलोचनरूप तप केलें. म्ह० जगाच्या रचनेविषयीं विचार केला, या सर्व चराचर जगाला निर्माण केलें. त्यांत प्रवेश करून तें स्वतः ब्रह्मच सूक्ष्म व स्थूल भूत भौतिक झालें,-असें वर्णन केलें आहे.

सातव्या अनुवाकात-हें सर्व नामरूपात्मक व्यक्त जगत् पूर्वी अव्यक्त होतें. त्या अव्यक्त बीजापासून सत्-व्यक्त झालें स्वतः आत्मा-ब्रह्मच तें झालें, म्हणून त्याला 'स्वयं कर्तृ' असें म्हणतात तें स्वयं कर्तृ ब्रह्मच रस आहे. रस म्हणजे आनंदाला कारण होणारा पदार्थ. तत्त्ववेत्ता त्या रसाला प्राप्त होऊनच आनंदी होतो. हा हृदयस्थ आनन्द जर नसता तर इंद्रियांच्या व प्राणाच्या चेष्टा कोणी केल्या असत्या ? दुसरा कर्ताच नसल्यामुळे त्या झाल्या नसत्या. हा आनन्दच प्रत्येक प्राण्याला आनंद देत असतो.-इत्यादि सांगून त्याचें अस्तित्व सिद्ध केल्यावर सर्वकारण ब्रह्मच मी आहें, असें साक्षात् जाणणाऱ्या विद्वानाला अभय प्राप्ति होते, असें सांगितलें आहे. म्हणजे वरील प्रश्नांतील शेवटच्या प्रश्नाचें उत्तर विद्वान् त्या पर ब्रह्माला प्राप्त होतो, असें सांगितलें. नंतर अविद्वान् त्याला प्राप्त होत नाहीं असें सांगण्यासाठीं तो उपा-

सक जेव्हा त्या परम तत्त्वामध्यें थोडीशीही भेददृष्टि ठेवतो तेव्हा तो जन्म-मरणादि संसारभयास प्राप्त होतो, असें सांगितलें आहे आठव्या अनुवाकात-पूर्व जन्मीं भेददृष्टीनें उपासना केल्यामुळेंच उत्तर जन्मीं वायु, सूर्य, अग्नि, इंद्र व मृत्यु झालले काहीं जीव आपापल्या नियत कार्यात परमात्म्याच्या भयानें एकसारखे कसे प्रवृत्त होतात त्याचा उदाहरणार्थ उल्लेख केल्यावर ब्रह्माच्या आनंदरूपाचा व ब्रह्मवेत्त्याला सर्व उपभोग एकाच वेळीं भोगावयास सापडतात, या पूर्वोक्त ऋचेंतील उल्लेखाचा निर्णय करण्यासाठीं आनंदाची मीमासा केली आहे तरुण, नीरोगी, विद्वान्, रुचिमान् (अग्निमांद्यादि दोषानें तोंडाला रुचि नसल्यामुळें जो प्राप्त अन्नादिक खाऊं शकत नाहीं, असा रोगी नव्हे ), धैर्यवान्, बलाढ्य व ही सर्व विविध द्रव्यानें भरलेली पृथ्वी ज्याच्या स्वाधीन आहे अशा सार्वभौम राजाची जी तृप्ति तोच एक मानुष आनन्द आहे असे शभर आनंद एकत्र केले असता होणारें जें आनदाचें प्रमाण तो मनुष्यगंधर्वांचा एक आनंद आहे पण निष्काम श्रोत्रियालाही तो आनन्द प्राप्त झालेला असतो गंधर्व ही एक देवयोनि आहे. काहीं जीव पूर्व कल्पातील उपासनेमुळें या कल्पाच्या आरंभींच त्या योनींत उत्पन्न होतात त्याना देवगंधर्व ह्मणतात पण जो या कल्पात मनुष्य होऊन गंधर्वयोनीस प्राप्त होण्याची साधनें संपादन करतो ह्मणजे तदनुकूल कर्मादिक करतो तो त्यामुळें मरणोत्तर गंधर्व लोकात गंधर्व होतो अशा गंधर्वांना मनुष्यगंधर्व ह्मणतात त्याचे शभर आनंद ह्मणजे देवगंधर्वाचा एक आनन्द देवगंधर्वांच्या शभर आनन्दाबरोबर चिरलोकवासी पितराचा एक आनन्द असतो पितृलोकावर आजान ह्मणून एक देवलोक आहे त्यातील देवाचा आनन्द पितराच्या आनन्दाहून शतपट अधिक आहे यज्ञ-यागादि पुण्य कर्में करून देव झालेल्या जीवाना कर्मदेव ह्मणतात त्याचा आनन्द अजानज देवाहून शतपट अधिक असतो इंद्राचा आनन्द देवाच्या आनन्दाहून शतपट अधिक असतो देवगुरु बृहस्पतीचा आनन्द त्याहून शतपट अधिक असतो. प्रजापतीचा आनन्द बृहस्पतीच्या आनन्दाच्या शतपट व ब्रह्मानन्द प्रजापतीच्याही शतपट अधिक असतो परंतु निष्काम श्रोत्रियाला त्या सर्व आनन्दाचा अनुभव येतो कारण आनंद ह्मणजे तृप्ति व इष्ट विषय संपादन करण्यासाठीं

यत्न करून तो मिळाल्यावर होणाऱ्या इच्छानिवृत्तिरूप तृप्तीपेक्षां स्वाभाविक अनिच्छारूप तृप्ति अधिक प्रशस्त असते. कोणत्याही विषयाविषयीं इच्छा होणें ह्मणजेच तृप्तीचा भंग होणें आहे. तो झाल्यावर पुरुष दुःखी होऊन आपल्या इष्ट विषयाच्या प्राप्तीसाठीं यत्न करूं लागतो. यत्नही चित्तविक्षेपावाचून घडत नाहीं. ह्मणजे यत्नही दुःखरूप आहे. यत्न करूनही इष्ट पदार्थ जर न मिळाला तर फारच दुःख होतें आणि दैववशात् तो मिळाल्यास सुख होतें. पण पुनः त्याचा व आपला वियोग होऊं नये ह्मणून चिंतारूप दुःख आलेंच. अर्थात् विषयाच्या प्राप्तीमुळें होणारें सुख हें खरें सुख नव्हे. ते सप्रतिबंध असतें ह्मणजे त्याला अनेक प्रतिबंध असतात. त्यामुळें अगोदर अंगाला चिखल लावून नंतर तो धुवून स्वत. स्वच्छ होणें व अंगाला चिखल न लावता मूळचेंच स्वच्छ असणें यात जितकें अंतर, तितकेंच अंतर विषयसंपादनामुळें होणारी तृप्ति व निस्पृहाची स्वाभाविक तृप्ति, यात आहे. ह्मणूनच या अनुवाकात प्रजापतीच्या आनंदाहून शतपट अधिक असलेला ब्रह्मानन्द निष्काम श्रोत्रियाचे ठिकाणीं असतो, असें सांगितलें आहे. ब्रह्मानन्दात मानुष आनंदापासून प्रजापतीच्या आनंदापर्यंत उत्तरोत्तर शतपट अधिक असलेले सर्व आनंद अंतर्भूत होतात, अशी वस्तुस्थिति असल्यामुळेंच मनुष्यगंधर्वापासून प्रत्येक पर्यायात ' आणि निष्काम श्रोत्रियाचा तो एक आनंद ' असें ह्मटलें आहे. नवव्या अनुवाकात ब्रह्मवेत्त्याला ब्रह्मप्राप्ति—अभयप्राप्ति—हें फळ मिळतें, असें सांगून—त्याला मरणसमयीं " मीं आपल्या सर्व आयुष्यात पुण्यकर्म का केलें नाहीं," पाप का केलें, आता मला या पापाचरणामुळें प्राप्त झालेल्या संकटातून कोण सोडविणार? असा सामान्यतः सर्व मूढाना होणारा संताप होत नाहीं. कारण तो विवेकानें आपल्याला बलाढ्य बनवितो. मीं पुण्य—पापाचा नुसता साक्षी आहे, कर्ता नव्हे, असें निश्चयानें जाणून तो संतापरहित व संतुष्ट होतो. पुण्य—पापच संतापाचें निमित्त आहे व आत्मज्ञान त्याचें निवारक आहे, असें जाणणारा सर्व आत्मरूप पाहतो,—असें ह्मटलें आहे. शेवटीं ' सह नाववतु ' याच शांतीचा पाठ करून आठव्या प्रपाठकाची व ब्रह्मवल्ल्यध्यायाची समाप्ति केली आहे.

---

नवव्या प्रपाठकात ह्म० तैत्तिरीय आरण्यकाच्या व उपनिषदाच्या तिसऱ्या भृगुवल्ल्यध्यायात ब्रह्मविद्येचें विचाररूप अन्तरंग साधन सांगितलें आहे. या

अध्यायाच्या आरंभीं 'सह नाववतु' हीच शांति ह्मणून ब्रह्मविद्येच्या स्तुतीकरितां एक पूर्व इतिहास सांगितला आहे. तो असा:—वरुणपुत्र भृगु 'वरुण' या नांवाच्या आपल्या पित्यापाशीं 'भगवन्, ब्रह्माचें चिंतन करून, मला त्याचा उपदेश करा,' अशा अर्थाचा 'अधीहि भगवो ब्रह्म' हा मंत्र ह्मणत गेला. तेव्हां वरुणानें ब्रह्माचें साक्षात् शब्दांनीं वर्णन करतां येणें शक्य नसल्यामुळें शाखाचंद्रन्यायानें अन्न, प्राण इत्यादि ब्रह्मलक्षक द्वारें सांगून 'ज्याच्यापासून हीं आकाशादि भूतें व त्यांची कार्यें-भौतिक शरीरें-होतात, उत्पन्न झालेलीं तीं ज्याच्या योगानें स्थित होतात व लीन होतांना तीं ज्याच्यामध्यें प्रवेश करितात तें ब्रह्म' असें त्याचें लक्षण सांगितलें. तेव्हां भृगूनेंही ब्रह्मविचाराचीं द्वारें व ब्रह्माचें लक्षण ऐकून एकान्तांत जाऊन विचार केला. प्रथम त्यानें आपली बाह्यदृष्टि निवृत्त करून अन्नच देहाच्या उत्पत्ति-स्थिति लयाचें निमित्त आहे, असें जाणलें. तथापि तें विकार पावणारें असल्यामुळें ब्रह्म कसें असेल, असा त्याला संशय आला; ह्मणून तो पुन: पूर्वीचाच मंत्र ह्मणत वरुणापाशीं गेला. तेव्हां वरुणानें त्याला तप ह्म० विचारच करावयास सांगितलें. अशा रीतीनें त्यानें वारंवार विचार केला आणि तो क्रमानें प्राण, मन व विज्ञान यांना ब्रह्म समजला. पण कोणत्याही यथार्थ ज्ञानाचें संशय-रहित समाधान हें इष्ट फल आहे. तें न मिळाल्यामुळें व प्राण जड आहे, मन अनिश्चित आहे, विज्ञान क्लेशाचें निमित्त आहे, इत्यादि प्रत्येकांत दोष दिसल्यामुळें त्यानें शेवटीं आनंद ब्रह्म आहे, असा निश्चय केला. जेथें साशंकवृत्ति तेथें आनंदाचा अभाव, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें विज्ञानमयापर्यंत प्रत्येक पर्यायात त्याला समाधान वाटलें नाहीं. ह्मणूनच आनंदाच्या अभावीं तो प्रत्येक वेळीं पित्याकडे जात असे. शेवटीं आनंद ब्रह्म आहे, कारण त्याच्यापासून भूतांची उत्पत्ति, त्याच्याकरिताच त्यांची स्थिति व त्यांतच त्यांचा लय होतो, असें ठरवून तो आनंदात्मा झाला. त्यामुळें त्याला संशय आला नाहीं; व तो पुन: पित्याकडे गेला नाहीं. तर स्वत:च्या दीर्घ सतत चिंतनानें कृतार्थ झाला. या अध्यायाच्या सहाव्या अनुवाकात 'ही वरुणप्रोक्त व भृगूनें संपादिलेली ब्रह्मविद्या आहे, व ती परब्रह्मामध्यें परिसमाप्त झाली आहे,' असें ह्मणून श्रुतीनें या आख्यायिकेचा उपसंहार केला आहे. नंतर सांसारिक

फलाच्या इच्छेनें ज्याचें चित्त चचल झालें आहे त्यास प्रस्तुत उपासना हेंच त्या फलप्राप्तीचें साधन आहे, असें सागण्याच्या मिषानें तिनें चित्तैकाग्र्याला कारण होणाऱ्या अन्न, प्राण इत्यादिकाचें विधान केलें आहे. सातव्या अनुवाकात ' अन्नाची निंदा करू नये, ' आठव्यात ' अन्नदात्याचें निवारण करूं नये, नवव्यात 'अतिथींकरिता पुष्कळ अन्न सपादन करून ठेवावें,' व दहाव्यात कोणी वस्तीस आला असता त्याला ' आमच्या घरीं वस्तीला जागा नाहीं, ' असें ह्मणू नये, अशीं व्रतें सागितलीं आहेत. त्याच अनुवाकात क्रमानें प्राण, आप व पृथ्वी, याना अन्न आणि शरीर, ज्योति व आकाश याना अन्नाद् ह्मणून तीं परस्पराना आधार होतात, असें सागितलें आहे. याप्रमाणें अन्नाची उपासना करणारा अन्नसपन्न, अन्न खाण्यास समर्थ, प्रजा, पशु व ब्रह्मवर्चस यानीं मोठा व कीर्तियुक्त होतो, असें उपासनेचें फळ सागितलें आहे शेवटच्या दहाव्या अनुवाकात घरीं आलेल्या अतिथींना अन्न देता यावें ह्मणून शुद्ध उपायानें पुष्कळ अन्नाचा सग्रह करून ठेवण्याविषयीं सागून मुख्य सात्विकवृत्तीनें दान केल्यास मुख्य सात्विक फळ मिळतें, मध्यम राजसवृत्तीनें तें केल्यास फळही मध्यम मिळतें आणि अधम तामसवृत्तीनें दान दिल्यास फळही तसेंच मिळतें असें सागितलें आहे. त्यानतर वाणी, प्राण, अपान, हात, पाय, व उपस्थ या अध्यात्म वस्तूच्या ठिकाणीं क्षेम, योग ( अप्राप्त वस्तूची प्राप्ति ), क्षेम ( प्राप्त वस्तूचें रक्षण ), कर्म, गति व त्याग या रूपानं ब्रह्माची उपासना करावी, अशा मानुष उपासना आणि वृष्टि, विद्युत्, पशु, नक्षत्र, उपस्थ व आकाश याच्या देवतामध्यें क्रमानें तृप्ति, बल, यश, ज्योति, पुत्रोत्पत्ति–रति–आनद, व सर्व जगत् या रूपानें ब्रह्मोपासना करावी, असें सागितलें आहे पुन त्या ब्रह्माची प्रतिष्ठा, तेज, मनन करणार मन, नमन, वेद, व आकाश या रूपानें उपासना करणाऱ्याला तदनुसार फळ मिळतें, असें सागून व पूर्वोक्त अन्नमयादिकाशीं तादात्म्य पावून ब्रह्मरूप झालेला आत्मज्ञ तृप्त होऊन मीच भोक्तृ–भोग्यरूप सर्व आहें, अशा अर्थाचें साम गात राहतो, असें ह्मणून उपनिषदाचा उपसहार केला आहे.

वेदान्त ग्रंथ कठीण असतात, अशी सबब वेदान्त हें एक तात्त्विकशास्त्र आहे, ही गोष्ट विसरून त्याचा इतर शास्त्रांप्रमाणें अभ्यास न करणारे पुष्कळ सामान्य वाचक नेहमीं सांगतात. पण थोडेसे श्रम करणाराला तशी तक्रार करण्यास फारशी जागा राहूं नये, ह्मणून आह्मी प्रत्येक उपनिषदाचा शब्दार्थ, तात्पर्यार्थ, त्यावरील तीन विद्वान् आचार्यांच्या व्याख्यानांचें विवरण, दर्शनमाला इत्यादिकांच्या योगानें शक्य तो यत्न करीत आहों. त्याचा उपयोग महाराष्ट्रांतील कांहीं थोड्या लोकांनीं जरी करून घेतला तरी आमचे श्रम सफळ झाले, असें आह्मी समजूं. शेवटीं नियन्त्याचें अनुस्मरण करून पुढील कर्तव्यास आरंभ करण्यासाठीं ही प्रस्तावना संपवितों.

कार्तिक कृष्ण ६ बुधवार<br>शके १८३५.

वि. वा. बापट,<br>संपादक.

---

# विषयानुक्रमणिका.

## १ शीक्षाध्याय.

| अनुवाक | विषय | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | विघ्नांच्या उपशमनार्थ शांति व ब्रह्माचें नमन .... | २ |
| २ | पाठाविषयीं विशेष यत्न करावा, म्हणून शीक्षा .... | ५ |
| ३ | प्रार्थनापूर्वक विद्याव्याख्यानाची प्रतिज्ञा, पांच उपास्यें, उपासना व फळ .... .... .... .... | ७ |
| ४ | मेधावृद्धीकरितां जप्य मंत्र, आरोग्य, धन, शिष्यप्राप्ति, यश इत्यादिकांकरितां जप्य मंत्र .... .... .... | ११ |
| ५ | उपासनेकरितां व्याहृतींचें कथन, उपासना व फळ | १६ |
| ६ | मध्यम अधिकाऱ्यासाठीं अंगी ब्रह्माची उपासना, उपासकाचा मार्ग व फळ .. .... .... .... | २० |
| ७ | मंद अधिकाऱ्यासाठीं सगुण ब्रह्माची उपासना .... | २५ |
| ८ | उत्तम अधिकाऱ्यासाठीं प्रणववाच्य शुद्ध ब्रह्माची उपासना | २७ |
| ९ | उपासनेसह नित्य कर्मांच्या समुच्चयाचें विधान .... | ३१ |
| ,, | स्वाध्याय व प्रवचन हेंच मुख्य तप .... .... | ३३ |
| १० | ब्रह्मयज्ञाचा प्रतिनिधिरूप जप्य मंत्र.... .... .... | ३४ |
| ११ | विविदिषोत्पादक कर्मांचें विधान .... .... .... | ३६ |
| ,, | माता-पिता-इत्यादिकांना देव मानणें, गुरूंच्या शुद्ध कर्मांचेंच अनुकरण करणें. .... .... .... | ३८ |
| ,, | श्रेष्ठांना मान देणें, दानाविषयीं विशेष .... .... | ४० |
| ,, | संदिग्ध अनुष्ठेयाचा निर्णय, व्यवहार्यत्वाचा निर्णय व उपसंहार | ४२ |
| १२ | शांति व कृतज्ञतेची आवश्यकता .... .... .... | ४३ |

## २ ब्रह्मवल्ल्यध्याय.


| अनुवाक | विषय | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | शांति .... .... .... .... .... | ४४ |
| ,, | या सर्व उपनिषदाचें संक्षेपतः सूत्ररूपानें सारकथन .... | ४६ |
| ,, | वरील सूत्राच्या संक्षिप्त व्याख्यानरूप ऋचा.... .... | ४७ |
| ,, | अन्नमयकोश व त्याचा उपासनेकरितां पक्ष्याकार .... | ५१ |
| २ | त्याची उपासना, फळ व प्राणमयकोश .... .... | ५६ |
| ३ | प्राणमयोपासना, फळ व मनोमयकोश .... .... | ५८ |
| ४ | मनोमयोपासना, फळ व विज्ञानमयकोश .... .... | ६२ |
| ५ | विज्ञानमयोपासना, तिचें फळ व आनन्दमयकोश .... | ६४ |
| ६ | आनन्दमयोपासना, तिचें फळ व त्याविषयीं प्रश्न .... | ६८ |
| ,, | त्याचें ब्रह्म आहे, असें उत्तर .... .. . .... | ७० |
| ७ | त्याविषयीं मंत्राचें प्रमाण .... .... .... | ७२ |
| ,, | ब्रह्माची आनंदरूपता–तो आनन्दच सर्वांच्या चेष्टांचें व | |
| ,, | आनन्दाचें निमित्त आहे .... .... .... | ७४ |
| ,, | विद्वान्‌च त्याला प्राप्त होतो अविद्वान् होत नाहीं .... | ७६ |
| ८ | अविद्वानाला भय प्राप्त होतें याविषयीं देवांचीं उदाहरणें .... | ७७ |
| ,, | आनन्दाची मीमांसा, मनुष्यापासून प्रजापतीपर्यंत उत्त- ... रोत्तर शतपट आनन्द व श्रोत्रियाला त्या सर्वांची प्राप्ति | ७८–८४ |
| ,, | तो सर्व आनंद एक आहे व तें जाणणारा उत्तरोत्तर अन्त-र्मुख होतो .... .... .... .... | ८५ |
| ९ | आनंदाशीं तादात्म्य पावलेल्या विद्वानाला अभय हें फळ मिळतें .... .... .... .... .... | ८७ |
| ,, | त्याला इतरांप्रमाणें मरणसमयीं पुण्य न केल्याबद्दल व पाप केल्याबद्दल दुःख होत नाहीं.... .... .... | ८८ |

## भृगुवल्ल्यध्याय ३.

| अनुवाक | विषय | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | विद्यास्तुत्यर्थ आख्यायिका .. ... | ८९ |
| २ | अन्नच ब्रह्म, असें ज्ञान, त्याविषयीं संशय, पुन. गुरूपसदन व तप . .. | ९३ |
| ३ | प्राणच ब्रह्म इत्यादि वरच्याप्रमाणेंच सर्व | ९४ |
| ४ | मन ब्रह्म ,, ,, ,, ,, | ९६ |
| ५ | विज्ञान ब्रह्म ,, ,, ,, ,, | ९७ |
| ६ | आनन्द ब्रह्म असें ज्ञान, त्याचें फळ .... | ९८ |
| ७ | अन्नाची निंदा न करणें, हें व्रत, प्राण व शरीर यांचें परस्पर अन्नत्व, आधार आधेयत्व व अशा ज्ञानाचें फळ . | १०१ |
| ८ | अन्नदात्याचें निवारण करूं नये, हें व्रत, आप व ज्योति यांचें परस्पर अन्नत्वादि . .. | १०२ |
| ९ | अन्न पुष्कळ साठवावें, हें व्रत, पृथ्वी व आकाश यांचें अन्नत्वादि | १०३ |
| १० | कोणाला वस्तीस जागा नाहीं असें ह्मणूं नये, हें व्रत, शुद्ध उपायानें पुष्कळ अन्नाचा संग्रह, सात्त्विकादि दानाचें सात्त्विकादि फळ, मानुषी व दैवी उपासना, प्रतिष्ठा इत्यादिरूप ब्रह्माची उपासना व त्याचें प्रतिष्ठात्वादि फळ, आनंद एक आहे, असें जाणून तद्रूप होणारास फळ, तृप्ति व उपसंहार | १०४-११२ |

---

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला, रत्न ४ थें.

( मासिकाचें वर्ष १ लें, अंक ११ वा. )

सार्थ

# तैत्तिरीयोपनिषद्

( शीक्षाध्याय १ )

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीसद्गुरवे नमः । सर्व वेदान्त-संप्रदायप्रवर्तक आचार्यांचें स्मरण करून मी स्वबोधशुद्ध्यर्थ व लोकोपकारार्थ कृष्णयजुर्वेदीय **तैत्तिरीयोपनिषदाचा** शब्दार्थ **श्रीशंकरानन्द** व **विद्यारण्य** याच्या दीपिका व आचार्यांचें भाष्य यांच्या अनुरोधानें लिहितों—

ही तैत्तिरीयोपनिषद् तीन प्रकारची आहे. साहिती, वारुणी व याज्ञिकी. तैत्तिरीय आरण्यकाच्या शेवटच्या सात, आठ, नऊ व दहा अशा चार प्रपाठकाना तैत्तिरीय उपनिषद् ह्मणतात. त्यांतील सातवा प्रपाठक ही साहिती उपनिषद् आहे. कारण त्यांत संहिताध्याय सांगितलेला आहे. आठ व नऊ या दोन प्रपाठकांत ब्रह्मविद्या सांगितलेली आहे. तिचा प्रवर्तक वरुण असल्यामुळें तिला 'वारुणी उपनिषद्' ह्मणतात आणि शेवटच्या प्रपाठकात यज्ञोपयुक्त मंत्रही ठिकठिकाणीं सांगितले आहेत. यास्तव तिला 'याज्ञिकी उपनिषद्' ह्मणतात. त्यांतील वारुणी मुख्य आहे. कारण तिच्यामध्यें ब्रह्मप्राप्तिरूप परम पुरुषार्थाचें साधन, अशी जी ब्रह्मविद्या तिचें प्रतिपादन केलें आहे. पण तिचा अधिकार प्राप्त व्हावा ह्मणून साहिती उपनिषदाचा पाठ करावा लागतो. कर्मांच्या योगानें विविदिषा ह्मणजे जाणण्याची इच्छा उत्पन्न होते,

पण चित्ताचें ऐकाग्र्य होत नाहीं. उलट कर्में प्रवृत्तिप्रचुर असल्यामुळें विक्षेप वासनाच वाढते पण ऐकाग्र्याभावामुळें ब्रह्मसाक्षात्कार होत नाहीं. ध्यानाचा अभ्यास केल्यानेंच ऐकाग्र्य होतें. वारंवार ध्यान करणें हाच ध्यानाभ्यास आहे. त्यासाठींच संहिती उपनिषद् प्रथम सांगितली आहे. ' शम कर्मांत विघ्नें फार ' असी लौकिक म्हण आहे आणि ब्रह्मविद्येला तर साक्षात् देव विघ्नें करीत असतात यास्तव त्याचा परिहार करावयासाठीं अगोदर यत्न केला पाहिजे. परम पुरुषार्थासाठीं यत्न करणाराला देवांकडून विघ्नें होण्याचा कसा संभव आहे, तें बृहदारण्यकादि उपनिषदांत ' योऽन्या देवतामुपास्ते० ' इत्यादि वाक्यांत सांगितलें आहे.

यास्तव त्या विघ्नाच्या शांतीकरितां संहिती उपनिषदाच्या आद्य अनुवाकांत जप करावयाचा मंत्र सांगितला आहे कर्मकांडानुष्ठानांत देवकृत विघ्नाचा संभव नसल्यामुळें कर्मानुष्ठानाच्या आरंभीं या मंत्राचा पाठ केलेला नाहीं ब्रह्मविद्येची अरुचि, हेंच मुख्य विघ्न आहे. संचित महापापामुळें तें उद्भवतें यज्ञ दानादिकांच्या योगानें त्याची निवृत्ति होऊन ब्रह्मज्ञानाविषयीं रुचि उत्पन्न होते तिलाच 'विविदिषा' ह्मणतात. विषय वैराग्य हें पापक्षयाचें चिह्न आहे. विरक्त विविदिषूचें चित्त उपासनेनेंच स्थिर होतें. पण व्याधि, चित्ताचें आलस्य इत्यादि विघ्नें उपासनेला प्रतिबंध करितात. यास्तव त्याचें शमन होण्यासाठीं कोणत्या मंत्राचा जप करावा, तेंच अगोदर येथें सांगितलें आहे

हरि: ॐ. शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा ।
शं न इन्द्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः ॥

अर्थ—' मित्र ' प्राणवृत्ति व दिवस यांची अभिमानिनी देवता ' नः- ' आह्मास ' शं- ' सुखरूप ( भवतु—होवो. ) प्राणवृत्ति व दिवस यांची अभिमानिनी देवता, असा जो मित्र तो आह्माला सुखकर

होवो. ' **वरुण** –' अपानवृत्तीची व रात्रीची अभिमानिनी देवता, असा वरुण ' न शं भवतु– ' आह्माला सुखकर होवो. ' **अर्यमा**– ' चक्षु व सूर्य याची अभिमानिनी देवता–अर्यमा ' न श भवतु– ' आह्माला सुखावह होवो. ' **इन्द्रः बृहस्पतिः च नः शं भवतु**– ' दोन्ही बाहू व बल याचा अभिमानी देव इंद्र आणि वाणी व बुद्धि याचा अभिमानी देव बृहस्पति आह्माला सुखकर होवो. ' **उरुक्रमः विष्णुः नः शं**– ' ज्याचा सचार पुष्कळ आहे, ह्मणजे जो सर्वव्यापी आहे, असा विष्णु–पादाभिमानिनी देवता-आह्मांला सुखावह होवो. ( भाष्यकारानीं ' उरुक्रम ' याचा अर्थ 'विस्तीर्णक्रम ' असा केला आहे. ह्मणजे वामनावतारातील दीर्घ व विस्तृत पावलाना उद्देशून तो अर्थ आहे. किंवा प्राणादि अवयवाचे ठिकाणीं अभिमान ठेवणाऱ्या मित्रादि देवताचें वर्णन वर झालेलें असल्यामुळें अवयवी जो सपूर्ण देह त्यावर अभिमान ठेवणारा विराट् पुरुषच राहतो. त्याचा 'उरुक्रम' या शब्दानें येथें उल्लेख केला आहे ब्रह्माडदेहानें युक्त असल्यामुळें सर्वव्यापी असणें हेंच त्याचें उरुक्रमत्व आहे )

वराल मत्रात प्रत्येक अवयव व अवयवी याच्या अभिमानिनी देवताची वि नपरिहारपूर्वक सुखावह होण्याविषयीं प्रार्थना केली आता त्या देवताचें अ तर्यामिरूपाने प्रेरक जें ब्रह्म त्याला नमस्कार करितात—

नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं
ब्रह्मासि । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ।
ऋतं वदिष्यामि । सत्यं वदिष्यामि । तन्मामवतु ।
तद्वक्तारमवतु । अवतु माम् । अवतु वक्तारं ॥

अर्थ–' **ब्रह्मणे नमः**–' वायुरूप ब्रह्माला नमस्कार असो. ' **नमस्ते वायो**–' हे वायो, तुला नमस्कार असो. ( अन्तर्यामी ब्रह्माचें ज्ञान शास्त्र व अनुमान, यावरूनच होतें. त्यामुळें तें परोक्ष असतें ह्मणून

येथें ' हे ब्रह्म ' असें त्याला उद्देशून संबोधन नाहीं. पण तेंच सूत्रात्मा जो वायु त्याच्या रूपानें स्पर्शनेंद्रियगम्य होतें. ह्मणून त्याला उद्देशून ' हे वायो' असें संबोधिलें आहे. आता हाच अभिप्राय व्यक्त करतात-) **'त्वं एव प्रत्यक्षं ब्रह्म असि-'** तूच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस. ( वायूपाधि ब्रह्म प्रत्यक्षयोग्य आहे. यास्तव हे वायो, ) **' त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि-'** मी तुलाच प्रत्यक्ष ब्रह्म ह्मणेन ( ह्म० तूच साक्षात्काराला योग्य असें ब्रह्म आहेस. कारण सोपाधिक ब्रह्माची उपासना ज्या ज्या प्रकारें करावी त्या त्या प्रकारें दीर्घ अभ्यास झाला असता त्याचा साक्षात्कार होऊ शकतो. यास्तव तूच ब्रह्म आहेस. हें माझें ह्मणणें औपचारिक आहे, असें मुळींच नाहीं, असें श्रुति सांगते-) **' ऋतं वदिष्यामि-'** मी खरें सांगेन, **'सत्यं वदिष्यामि'** सत्य सांगेन. ( ऋत ह्मणजे यथार्थ विद्यमान अर्थाचें प्रथम मनानें पर्यालोचन करणें व सत्य ह्म० मागून शब्दानीं त्याचेंच उच्चारण करणें. ) **' तत् मां अवतु-'** तें पुढें सांगितलेलें ब्रह्म मज विद्यार्थ्याचें-शिष्याचें-रक्षण करो **' तत् वक्तारं अवतु-'** तें वक्त्याचें रक्षण करो. **' मां अवतु-'** माझें रक्षण करो. **' वक्तारं अवतु-'** वक्त्याचें रक्षण करो. ( तें ब्रह्म शिष्याला विद्याग्रहणाचें व गुरूला विद्याप्रदानाचें सामर्थ्य देऊन दोघाचेंही रक्षण करो येथें पुनरपि माझें व वक्त्याचें रक्षण करो, असें ह्मटलें आहे. )

असो, याप्रमाणें वायुरूप प्रत्यक्ष ब्रह्माची प्रार्थना केली. आता अन्तर्यामिरूप परोक्ष ब्रह्माचें तद्वाचक प्रणवानें स्मरण करून विघ्नशांति असो, अशी प्रार्थना केली जाते.—

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ( इति तैत्तिरीये प्रथमे शीक्षाध्याये प्रथमानुवाकः )

येथें गुरु व शिष्य असे दोघेही प्रमादरहित असल्यामुळें त्यांच्या हातून बुद्धिपूर्वक दोष जरी न संभवले तरी दैवकृत सूक्ष्म दोष सम-

वतात, अशा अभिप्रायानें ' ॐ ' या परोक्ष ब्रह्मवाचक पदाचा उच्चार करून तीनदां ह्मटलेल्या ' शान्तिः ' या पदानें आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक विघ्नांचा उपशम व्हावा, अशी प्रार्थना केली आहे. ज्वर, मस्तकशूळ इत्यादि आध्यात्मिक विघ्नें, व्याघ्र, सिंह, यक्ष, राक्षस इत्यादिकांच्या योगानें होणारी पीडा, हें आधिभौतिक विघ्न व अतिवृष्टि, अनावृष्टि इत्यादि आधिदैविक विघ्नें होत. त्यांच्या योगानें अध्ययन व अध्यापन या दोन्ही कार्यांना प्रतिबंध होतो, हें प्रसिद्ध आहे. १.

---

उपनिषदें अर्थप्रधान आहेत. तेव्हां त्यांचा पाठ यथाशास्त्र केलाच पाहिजे, असें कांहीं नाहीं; ह्मणून कोणी ह्मणेल. यास्तव प्रथम पाठाविषयींही विशेष यत्न करावा, असें श्रुति विधान करते.

**ॐ शीक्षां व्याख्यास्यामः वर्णः, स्वरः, मात्रा, बलं, साम, संतानः इत्युक्तः शीक्षाध्यायः ॥**

इति शीक्षाध्याये द्वितीयोऽनुवाकः ।

**अर्थ**—वर्ण, स्वर इत्यादिकांचा वेदनीयत्वानें ( जाणण्यास योग्य अशा रूपानें ) जिच्यामध्यें उपदेश केला जातो ती शिक्षा. तिचाच येथें ' **शीक्षा** ' असा छांदस दीर्घ पाठ आहे. तिनें अगदीं स्पष्टपणें व सर्व प्रकारें व्याख्यान करतों. अकारादि ' **वर्ण,** ' उदात्तादि ' **स्वर,** ' ऱ्हस्व-दीर्घादि ' **मात्रा,** ' स्पृष्ट, ईषत्स्पृष्ट इत्यादि प्रयत्न हेंच ' **बल,** ' घाईनें किंवा अगदीं सावकाश न ह्मणतां ज्याला जितका उचित काळ आहे तितक्या काळांतच त्याचें उच्चारण करणें, हें साम्य होय. त्याचाच येथें ' **साम**–' शब्दानें उल्लेख केला आहे. पूर्वोत्तर वर्णांच्या संहितेला ' **संतान** ' असें ह्मणतात. ( संहिता ह्मणजे अतिशय सांनिध्य ) या सहा वर्णादिकांचें पठण करावें. ' **इति शीक्षाध्यायः**

उक्तः-' याप्रकारें शीक्षाध्यायाचें कथन केलें. ( पठनीय ग्रथाला अध्याय ह्मणतात व्याकरणोक्त शुद्धपदादिकांचाही अनादर करून येथें जसा पाठ आहे, तसाच त्याचा उच्चार करावा व्याकरणशास्त्राप्रमाणें ' शिक्षा ' असें जरी शुद्धपद असलें तरी तिकडे लक्ष न देता 'शीक्षा' असाच उच्चार करावा वर्णादिकाविषयींही असेंच समजावें कारण येथें सांगितल्याप्रमाणें उच्चारादि केल्यास एक प्रकारचें अदृष्ट उत्पन्न होऊन त्याच्या योगानें विद्याप्रतिबंधाचा परिहार होतो ) २.

---

वरील अनुवाकात ग्रथपाठाविषयींचा नियम सांगितला. आतां या तिस या अनुवाकात ऐहिक व पारलौकिक फलसिद्धीकरिता उपासनेचें विधान करावयाचें आहे. पण त्यापूर्वीं मगलाचरणाकरिता हा पुढील मत्र उच्चारतात पहिल्या अध्यायातील शांतिमत्रानें विघ्नाच्या उप शमाची प्रार्थना केली आता या मत्रानें विद्या व विद्याफल यांच्या उत्कर्षाची प्रार्थना केली जात आहे वेद अपौरुषेय आहे त्यामुळे त्यात वस्तुत प्रार्थना करणारा कोणी पुरुष सभवत नाही पण वेदाला पुरुषाच्या धर्मानुष्ठानादिकांचे प्रकार सांगावयाचे असल्यामुळें त्यानें शिष्य रूप, गुरुरूप इत्यादि होऊन तसे तसे प्रकार वर्णिले आहेत

**सह नौ यशः । सह नौ ब्रह्मवर्चसम् ॥**

अर्थ-' **नौ**-' आह्मा दोघा गुरुशिष्याचें विद्यानिमित्त '**यश**' '**सह**-' एकाच वेळीं '**अस्तु**' असो. ( हा शिष्य चागली उपासना करीत आहे, असें शिष्याचें यश व या आचार्यानें त्याला चागला मार्ग दाखविला, असें आचार्याचें यश एकाच वेळीं होऊ दे ) ब्राह्मणाला उचित असलेल्या श्रुताध्ययनरूप तेजाला ' ब्रह्मवर्चस ' ह्मणतात ' **नौ ब्रह्मवर्चस सह भवतु**--' आह्मा उभयताना ब्रह्मवर्चसरूप तेज एकाच वेळीं प्राप्त होवो. ही शिष्याची शुभ आशा आहे. वास्तव त्यानेंच या मत्राचा जप करावा आचार्य अगोदरच कृतकृत्य अस-

त्यामुळें त्याला याच्या जपाचा काहीं उपयोग नाहीं. असो; आतां जिच्या करितां हें मंगलाचरण केलें त्या विद्येच्या व्याख्यानाची प्रतिज्ञा करितात.—

**अथातः संहिताया उपनिषदं व्याख्यास्यामः । पञ्चस्वधिकरणेषु । अधिलोकमधिज्यौतिषमधि-विद्यमधिप्रजमध्यात्मम् । ता महासंहिता इत्याचक्षते ॥**

**अर्थ**–'अथ–' नंतर (पूर्वे अनुवाकांत ज्याचें विधान केलें आहे, अशा वर्णादिकांच्या उच्चाराचा अभ्यास केल्यानंतर ) ' अतः ' ज्या अर्थी उपासनेंत प्रवृत्त होणाऱ्या पुरुषाचें चित्त वेदपाठाच्या दीर्घ वासनेमुळें वेदपाठरहित उपासनेमध्यें एकाएकीं प्रविष्ट होऊं शकत नाहीं त्या अर्थीं ' **संहितायाः उपनिषदं व्याख्यास्यामः**– ' उपासना संबंधी संहितेच्या उपनिषदाचें ह्मणजे उपासनेचें स्पष्ट व्याख्यान करतों. ती उपासनीय संहिता ' **पञ्चसु अधिकरणेषु** ( व्याख्यास्यते । )– ' पांच प्रकारच्या आश्रयामध्यें व्याख्यान केलीं जाणार आहे ह्मणजे आश्रय जरी पांच असले तरी उपासना एकत्र आहे. **अधिलोकं, अधिज्यौतिषं, अधिविद्यं, अधिप्रजं, अध्यात्मं**– ' पृथिव्यादि लोकांना उद्देशून, अग्नि–सूर्यादि ज्योतींना उद्देशून, आचार्यप्रभृति विद्येला उद्देशून, माता, पिता इत्यादि प्रजेला उद्देशून, व अधरा हनु इत्यादि शरीरसंबंधीं अवयवांस उद्देशून, अशी पांच प्रकारची ती संहिता सांगितली जाते. लोक, ज्योति, विद्या, प्रजा व शरीर–आत्मा–या पांच आश्रयामुळें पांच प्रकारच्या झालेल्या त्या संहितांना उपासक ' **ताः महासंहिताः इति आचक्षते**–' त्या महासंहिता आहेत, असें ह्मणतात. ( लोक, ज्योति इत्यादिकांविषयींच्या उत्कृष्ट दृष्टीनें उपासना केल्यामुळें त्या संहितांना महत्त्व आहे. )

वर जिची प्रतिज्ञा केली आहे त्या उपासनेंतील पहिला उपास्य अवयव सांगतात—

अथाधिलोकम् । पृथिवी पूर्वरूपम् । द्यौरुत्तररूपम् ।
आकाशः संधिः । वायुः संधानं । इत्यधिलोकम् ॥

अर्थ—'अथ—' वरील उपासनेच्या प्रतिज्ञेनंतर 'अधिलोकं—' लोकसंबंधी उपासनेचा अवयव सांगितला आहे. ( व्याकरणाच्या नियमाप्रमाणें संहिता दोन वर्णांमध्यें होते. त्यांतील ) 'पृथिवी पूर्वरूप—' पूर्व वर्णाचें जें स्वरूप तें पृथिवी–देवतेचें रूप आहे, असें चिंतन करावें. 'द्यौः उत्तररूपं— ' उत्तर वर्णाचें जें स्वरूप तें द्युलोकाभिमानिनी देवतेचें स्वरूप आहे, असें चिंतन करावें. 'संधिः आकाशः—' त्या दोन वर्णांचा जो मध्यदेश तो द्युलोक व पृथ्वीलोक यांच्या मधील आकाशाच्या अभिमानी–देवतारूप आहे असें जाणावें 'संधानं वायुः—' त्या दोन वर्णांच्या मध्यप्रदेशीं असलेलें जें संधान–संहितेचें स्वरूप तें वायुदेवतेचें स्वरूप आहे, अशी भावना ठेवावी 'इति अधिलोकं—' अशा प्रकारें लोकविषयक संहिताध्यान सांगितलें. (ह्मणजे संहितेच्या ठिकाणीं लोकदृष्टि कशी ठेवावी, तें सांगितलें. वाचकांना या उपासनेचें अधिक स्पष्ट ज्ञान व्हावें ह्मणून उदाहरण देऊन सांगतों—'इषे त्वा' ही संहिता आहे. त्यांतील 'षे' मधील 'ए' या पूर्व वर्णाचे ठायीं पृथिवीदेवतेची भावना ठेवावी. त्यापुढील 'त्' हा वर्ण द्यो-देवतारूप जाणावा. त्या दोन वर्णांमधील जो अवकाश तोच आकाशदेवतारूप आहे, असें जाणावें त्या अवकाशांत संधिनियमानें तकाराचें द्वित्व होऊन अधिक आलेला जो दुसरा तकार तो वायुरूप आहे, अशा भावना ठेवून त्या संहितेची उपासना–ध्यान–करावें त्याचप्रमाणें पुढील चार अवयवांचे ठिकाणीं जाणावें. )

आतां दुसरा अवयव सांगतात—

अथाधिज्यौतिषम् । अग्निः पूर्वरूपम् । आदित्य उत्तररूपम् । आपः संधिः । वैद्युतः संधानम् । इत्यधिज्यौतिषम् ॥

अर्थ-' अथ-' आता-वरील लोकसंबंधी उपासनेच्या विधानानंतर ' आधिज्यौतिपं-' ज्योतीसंबंधी उपासनेचें व्याख्यान करतों-' पूर्वरूपं अग्नि -' त्या संहितेंतील पूर्ववर्णाच्या ठिकाणीं अग्निदृष्टि; ' उत्तररूपं आदित्य -' उत्तरवर्णाचे ठायीं आदित्यदृष्टि; ' संधिः आप -' त्याच्या मध्यप्रदेशीं आप-जलदेवता -दृष्टि; ' संधानं वैद्युतः-' व संधानामध्यें -संहितास्वरूपामध्यें या विद्युद्देवतेची दृष्टि ठेवावी. हें ज्योतिविषयक संहिताध्यान आहे.

आता उपासनेचा तिसरा अवयव सांगतात—

अथाधिविद्यम् । आचार्यः पूर्वरूपम् । अन्तेवास्युत्तररूपम् । विद्या संधिः । प्रवचनं संधानम् । इत्यधिविद्यम् ॥

पौत्रादिरूप प्रजादृष्टि व संहितेच्या ठायीं उत्पत्तिदृष्टि ठेवावी. हें प्रजेसंबंधी संहिताध्यान आहे.

अथाध्यात्मम् । अधरा हनुः पूर्वरूपम् । उत्तरा-
हनुरुत्तररूपम् । वाक्संधिः । जिह्वा संधानम् ।
इत्यध्यात्मम् ॥

अर्थ -आतां आत्मसंबंधी उपासनेचा अवयव सांगतात. येथें देह, इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार व साक्षी चैतन्य यांच्या संघातास 'आत्मा' असें ह्मटलें आहे. कारण तो संघातच ' अहं ' ह्मणजे मी या अनुभवाचा विषय होत असतो. त्या आत्म्याला उद्देशून प्रवृत्त झालेल्या उपासनेस अध्यात्म उपासना ह्मणतात. त्या उपासनेंत पूर्ववर्णाचे ठिकाणीं खालच्या हनुवटीची दृष्टि ठेवावी, उत्तरवर्णाच्या ठिकाणीं वरच्या हनुवटीची दृष्टि ठेवावी त्याचा मध्यभाग वाक् आहे. संहितारूप संधानाचे ठिकाणीं जिह्वादृष्टि ठेवावी. अशा प्रकारची ही अध्यात्म उपासना आहे.

इतीमा महासंहिताः । य एवमेता महासंहिता
व्याख्याता वेद । संधीयते प्रजया पशुभिः। ब्रह्म-
वर्चसेनान्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन ॥

( इति शीक्षाध्याये तृतीयोऽनुवाकः । )

अर्थ-'इति इमाः महासंहिताः' अशा ह्या महासंहिता आहेत. ('य एवं ' इत्यादि वाक्यानें प्रस्तुत उपासना फळाचें साधन आहे, असें विधान श्रुति करते-) ' यः-' जो पुरुष ' एवं एताः व्याख्याताः महासंहिताः वेद-' याप्रमाणें पूर्वोत्तररूपानें ह्या अधिलोकादिक नानाप्रकारें स्पष्टपणें सांगितलेल्या महासंहितांची उपासना करतो ' सः प्रजया पशुभिः ब्रह्मवर्चसेन अन्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन संधीयते-' तो पुत्रादिरूप प्रजा; गायी, घोडे इत्यादिरूप पशु; ब्राह्मणजातीला उचित असें तेज; व्रीहि-यवादि अन्नाद्य स्वर्ग व कर्मफळ यांच्याशीं संबद्ध

केला जातो. ( तो या सर्वांनीं सपन्न होतो. मुख्य ज्ञान पुरुषाच्या अधीन नसतें, तर तें वस्तूच्या अधीन असतें. त्यामुळें त्याचें विधान होऊं शकत नाहीं. पण उपासना ह्मणजे ध्यान मानस क्रियात्मक असल्यामुळें तें करणें किंवा न करणें, हे पुरुषाच्या इच्छेवर अवलंबून असतें. ह्मणून तें करावेंच असें विधान होऊ शकतें. यास्तव येथें ' वेद ' ह्मणजे जाणतो, असें जरी ह्मटलेलें असलें तरी त्याचा अर्थ उपासना करतो, असाच जाणावा. ) २

---

ज्याची मेधा ह्मणजे धारणाशक्ति चांगली नसते त्याला उपासनेच्या योगानें ती संपादन करावी लागते. यास्तव तिच्या करिता जप करावयास योग्य असलेले मंत्र वेद सांगतो —

यश्छन्दसामृषभो विश्वरूपः । छन्दोभ्योऽध्यमृतात्संबभूव । स मेन्द्रो मेधया स्पृणोतु । अमृतस्य देव धारणो भूयासम् ॥

अर्थ–' यः–' जो प्रणव ' छन्दसां–' गायत्र्यादि छन्दोयुक्त ऋगादि वेदामध्यें ' ऋषभः–' श्रेष्ठ व ' विश्वरूपः–' सर्व जगद्रूप ( पानामध्ये जसा देंठ त्याप्रमाणें सर्व जगात व्यापून राहिलेला ) आहे, आणि जो पूर्वोक्त ' छन्दोभ्यः–' ऋगादि छंदाहून सर्वव्यापक असल्यामुळें ' अधि–' अधिक असून ' अमृतात्–' स्वयप्रकाश आत्म्यापासून ' संबभूव–' प्रादुर्भूत झाला ' सः इन्द्रः–' तो अमृतज व छन्द सारभूत इन्द्र ( ह्म० परमात्म्याचा वाचक शब्द ) ' मा–' मला ' मेधया–' श्रुतधारणशक्तीनें ' स्पृणोतु–' संतुष्ट करो. ( मेधासंपन्न करो ) ' हे देव–' हे स्वयप्रकाश आत्म्याच्या प्रकाशक देवा प्रणवा, ' अमृतस्य धारणः भूयासम्–' मी ( तुझ्या प्रसादानें ) मोक्षाला कारण होणाऱ्या ब्रह्मादिकाचें धारण करणारा व्हावें.

पण शरीरारोग्यादिकावाचून प्रस्तुत मेधा प्राप्त होत नाहीं. यास्तव शिष्यरूप श्रुति त्या आरोग्यादिविषयींही प्रार्थना करते–

**शरीरं मे विचर्षणम् । जिह्वा मे मधुमत्तमा ।**
**कर्णाभ्यां भूरि विश्रुवम् । ब्रह्मणः कोशोऽसि ।**
**मेधया पिहितः । श्रुतं मे गोपाय ॥**

अर्थ–' **मे शरीरं विचर्षणं**–' मज विद्याधिकाऱ्याचें शरीर–स्थूल विनाशी देह विचक्षण–रोगादिरहित होऊन विद्याभ्यासास योग्य होवो. ' **मे जिह्वा मधुमत्तमा**–' माझी जिह्वा अतिशय मधुर–प्रिय, हित व सत्य भाषण करणारी होवो ( ग्रंथाभ्यास करावयास अतिशय पटु होवो. ) ' **कर्णाभ्यां भूरि विश्रुवं**–' दोन्ही श्रवणेंद्रियाच्या योगानें मीं पुष्कळ ऐकावें ( ह्मणजे माझ्यामध्यें बाधिर्य हा दोष न येवो ) हे प्रणवा, तू ' **ब्रह्मणः कोशः असि**–' ब्रह्माचा–जगत्कारणभूत परवस्तूचा कोश ह्मणजे ध्यानाचा आधार आहेस. ( तुझ्या ठिकाणीं ब्रह्मबुद्धि ठेवून ध्यान करता येतें चामड्याचा कोश–म्यान–खड्गरक्षणाचा जसा आधार असतो त्याप्रमाणें प्रणव ब्रह्मध्यानाच्या रक्षणाचा आधार आहे. पण तू ' **मेधया पिहितः**–' लौकिक प्रज्ञेनें आच्छादित झालेला आहेस ( त्यामुळें अविद्यादृष्टी जन तुला जाणू शकत नाहींत. ) ज्या अर्थी तू असा प्रकारचा आहेस त्याअर्थी ' **मे श्रुतं गोपाय**–' माझें कानानीं ऐकलेलें वेदार्थाचें रहस्य राख ( विस्मरणादि दोषाचें निवारण करून ऐकलेल्या वेदरहस्याचें पालन कर. )

मेधावान् पुरुषही दारिद्र्यानें पीडलेला असल्यास अन्न-पानादिकाकरिता त्याला वारंवार बहिर्मुख व्हावें लागतें. त्यामुळें त्याला सतत प्रत्यक्प्रवण–आत्मोन्मुख–होऊन राहता येत नाहीं यास्तव विरक्तालाही अत्यंत अवश्य असलेल्या अन्न, जल व वस्त्र या वस्तूंच्या प्राप्तीकरिता जप्य मंत्र सांगतात. त्यात होमाचेंही चिह्न आहे. यास्तव ते

होमार्थ आहेत, अशी कल्पना होते त्याच्या योगाने होम केला असतां संपत्तीची इच्छा करणाराला संपत्ति प्राप्त होते –

आवहन्ती वितन्वाना । कुर्वाणा चीरमात्मन ।
वासांसि मम गावश्च । अन्नपाने च सर्वदा । ततो
मे श्रियमावह । लोमशां पशुभिः सह स्वाहा ॥

अर्थ—हे प्रणवप्रतिपाद्य परमेश्वरा, ज्या अर्थी श्री '**मम वासांसि गावः च अन्नपाने च सर्वदा आवहन्ती, वितन्वाना, आत्मनः चीरं ( चिरं ) कुर्वाणा ( अस्ति )–**' माझ्या भोगाकरिता वस्त्रें, गायी, अन्न, पान इत्यादि सर्व सर्वदा संपादन करून देणारी, त्याला वाढविणारी, तें सर्व मजपाशीं चिरकाल राहील असें करणारी ( ह्म. त्याचा नाश न होईल, असें करणारी आहे )' **ततः–**' या अर्थी '**मे श्रियं आवह–**' मला श्री आणून दे तशीच ती '**पशुभिः सह लोमशाम्–**' बकऱ्या, मेंढया, घोडे इत्यादि पशूंसह असल्यामुळें अनेकप्रकारच्या लोमानीं युक्त आहे, असो, अशा प्रकारच्या श्रीला देणाऱ्या देवाला उद्देशून दिल्लेलें हें आज्यादि होमद्रव्य '**स्वाहा** -' चागलें हुत असो

वस्त्र, अन्न व जल यानीं समृद्ध असलेल्या, संपत्तानें युक्त असलेल्या पुरुषाला विद्येचा संप्रदाय प्रवृत्त व्हावा ह्मणून ज्या मंत्राचा जप करणें उचित आहे ते शिष्यसंपादक पाच मंत्र सांगतात.—

आ मा यन्तु ब्रह्मचारिण स्वाहा । वि माऽऽयन्तु
ब्रह्मचारिणः स्वाहा । प्र माऽऽयन्तु ब्रह्मचारिणः
स्वाहा । दमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा । शमा
यन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥

अर्थ—'**ब्रह्मचारिणः मा आयन्तु–**' वेदिक विद्याभ्यासपरायण शिष्य मज संप्रदायप्रवर्तक आचार्याकडे येवोत ( मला असले

शिष्य मिळोत. यांतील स्वाहाशब्द होमसूचक आहेत. यास्तव मागचा मंत्र ह्मणून स्वाहा या शब्दानें अग्नींत घृताची आहुति द्यावी.) '**ब्रह्मचारिणः मा वि-आ यन्तु**-' ब्रह्मचारी-शिष्य मजपाशीं विविध फलाकरिता येवोत. ( पशु, स्वर्ग, ब्रह्मलोक व मोक्ष याची कामना करणारे विद्यार्थी येवोत, असा भावार्थ. )'**मा प्र-आ यन्तु**-' विद्याग्रहणाची उत्कृष्ट प्रज्ञा ज्यांना आहे असे शिष्य येवोत. '**दं आयन्तु**-' 'द' हें अव्यय दमन या अर्थी आहे, बाह्येंद्रियचेष्टारूप बाललीलेपासून निवृत्त झालेले शिष्य येवोत. '**शं आयन्तु**-' श ह्मणजे शांति. क्रोधादि चित्तदोषराहित्य. त्यानें युक्त असलेले उत्तम शिष्य येवोत ( विमायन्तु इत्यादि चार मंत्र अन्यशाखेंतील आहेत, अशा अभिप्रायानें **शंकरानन्दांनीं** आपल्या दीपिकेंत त्याचें व्याख्यान केलें नाहीं. आतां संप्रदाय चालविल्यामुळें कीर्ति व्हावी, यासाठीं दोन जप्य मंत्र सांगतात )—

**यशो जनेऽसानि स्वाहा । श्रेयान्वस्यसोऽसानि स्वाहा ॥**

अर्थ—हे परमेश्वरा, तुझ्या प्रसादानें मी '**जने**-' सर्व लोकांत '**यशः असानि**-' हा आचार्य आहे, अशा यशानें संपन्न व्हावें. '**वस्यसः श्रेयान् असानि**-' ज्याच्यापाशीं पुष्कळ धन असतें तो वसुमान्. जो अतिशय वसुमान् असतो तो वसीयान्, त्याहून मी अधिक प्रशंसनीय असावें. ( आतां यशस्वित्व व श्रेयस्त्व याच्या हेतूचें प्रतिपादन करणारे तीन मंत्र सांगतात— )

**तं त्वा भग प्रविशानि स्वाहा । स मा भग प्रविश स्वाहा । तस्मिन्त्सहस्रशाखे । नि भगाहं त्वयि मृजे स्वाहा**

अर्थ—हे ' भग-' भगवन् ' तं त्वा प्रविशानि-' त्या तुज भगवानामध्यें मी प्रवेश करावा. तुजमध्यें प्रवेश केल्याप्रमाणें सर्वदा तुझें तादात्म्यानें भजन करावें. ' स. मा प्रविश-' हे भग, तो तूंही मजमध्यें प्रवेश केल्याप्रमाणें आदरानें मजवर अनुग्रह कर. ' अहं तस्मिन् सहस्रशाखे त्वयि निमृजे-' मी त्या सहस्रभेदानीं युक्त असलेल्या तुझ्या ठिकाणीं आपल्याला अतिशय शुद्ध करितों. ( सारांश तुझें भजन श्रेयस्कर आहे. आता दृष्टान्तपूर्वक बहुशिष्यसंपादक मंत्र सांगतात—)

यथाऽऽपः प्रवताऽऽयन्ति । यथा मासा अहर्जरम् ।
एवं मां ब्रह्मचारिणः । धातरायन्तु सर्वतः स्वाहा ॥

अर्थ—' यथा आपः प्रवता आयन्ति-' ज्याप्रमाणें जल सखल प्रदेशावरून त्वरेनें येतें, ' यथा च मासाः अहर्जरं-' अथवा ज्याप्रमाणें चैत्रादि मास संवत्सराकडे येतात ( तीनशें साठ दिवस ज्यात जीर्ण-अंतर्भूत होतात तो संवत्सर होय. एकादाही मास संवत्सराला सोडून जात नाहीं ) ' धातः एवं ब्रह्मचारिणः मां सर्वतः आयन्तु-' हे सर्व जगाच्या विधात्या, त्याच न्यायानें ( ह्मणजे मास जसे वर्षाचें उल्लंघन करून दुसऱ्या कोठें जात नाहींत व जल जसें सखल प्रदेशातून वेगानें धावत येतें त्याप्रमाणें ) विद्यार्थी मजपाशीं सर्व बाजूनीं येवोत. ( असो; याप्रमाणें होममंत्र सांगून उपस्थान-मंत्र पढतात—)

प्रतिवेशोऽसि प्र मा भा हि प्र मा पद्यस्व ॥

( इति शीक्षाध्याये चतुर्थोऽनुवाकः )

अर्थ—श्रम घालविण्यासाठीं केलेल्या गृहादिस्थानाला प्रतिवेश ह्मणतात. हे धात्या, तूं माझा ' प्रतिवेशः असि-' प्रतिवेश आहेस. ( विश्रांतीचें स्थान आहेस. यास्तव ) ' मा प्रभाहि-' मला प्रकाशित

कर. ब्रह्मविद्येचा आचार्य, म्हणून प्रख्यात कर. ( आणि त्याकरिता ) '**मा प्रपद्यस्व**–' मला प्राप्त हो ( मजवर अनुग्रह कर ) ४

---

चवथ्या अनुवाकात मेधादिकाच्या सिद्धीकरिता मन्त्र सांगितले. आता या पुढील दोन अनुवाकात ब्रह्मोपासना सांगावयाची आहे त्यातही पाचव्या अनुवाकात अगभूत देवताची उपासना व सहाव्या अनुवाकात अंगी ब्रह्माची उपासना वक्तव्य आहे. यास्तव येथें अगोदर अगभूत देवताच्या ध्यानाचें प्रतीक, यारूपाचें तीन व्याहृती दाखवितात–

**भूर्भुवः सुवरिति वा एतास्तिस्रो व्याहृतयः ॥**

अर्थ–' **भू** ' ही एक, ' **भूवर्** ' ही दुसरी व ' **सुवर्** ' ही तिसरी '**इति वै एताः तिस्रः व्याहृतयः**–' अशा या तीन व्याहृती आहेत ( व्याहरण म्हणजे उच्चारण मत्र उच्चारणाचा विषय अस ल्यामुळें त्याना ' व्याहृति ' अशी सज्ञा आहे किंवा ' विविध कर्मांमध्ये ज्याचा प्रयोग केला जातो त्या व्याहृती' याप्रमाणें कर्मकाण्ड-प्रसिद्ध तीन व्याहृती सागून प्रतीक रूपानें चवथी व्याहृति सागतात–)

**तासामु ह स्मैतां चतुर्थी । माहाचमस्यः प्रवेदयते । मह इति ॥**

अर्थ–' **माहाचमस्यः**– ' ज्याचा सोमपान करावयाचा चमस (चमचा) मोठा आहे तो महाचमस मुनि अनेक सोमयागात त्याचा तोच एक चमस होता हेंच त्याचें महत्त्व होय त्या महा-चमसाच्या पुत्राला माहाचमस्य म्हणतात तो माहाचमस्य ऋषि ' **तासां**– ' त्या ' भू ' इत्यादि तीन व्याहृतींच्या अपेक्षेनें ' **एतां चतुर्थी**–' या चवथ्या ' **महः इति**– ' मह अशा व्याहृतीस ' **प्रवेदयते**– ' मुख्य उपासनेकरिता उपदेशितो. ह्म० त्या व्याहृतीचा उपदेश करतो ' उ ह स्म ' हे तीन निपात ' मह ' या व्याहृतीचीं

प्रसिद्धि दाखवितात. उपासनेमध्यें ऋषीच्या नांवाचें स्मरण करावें, या अभिप्रायानें तें येथें सांगितलें आहे. ( त्या चार व्याहृतींचे ठिकाणीं कोणती विशेष दृष्टि ठेवावी तें सांगतात. त्या विशेष दृष्टींचें विधान करितात.— )

**. तद्ब्रह्म । स आत्मा । अङ्गान्यन्या देवताः ॥**

अर्थ–' मह ' या प्रकारचें जें हें चवथें व्याहृतिरूप आहे ' **तद् ब्रह्म–** ' तें ब्रह्म, तीच वस्तु–तत्त्व–आहे असें चिंतन करावें. ' **सः आत्मा–** ' ब्रह्मत्वामुळेंच चतुर्थ व्याहृतिरूप **तो** हा शरीरस्थ **आत्मा** आहे. ( ह्म० ' *महः* ' *याचे ठिकाणीं ब्रह्मदृष्टि व आत्मदृष्टि ठेवावी.* ) ' **अन्याः** व्याहृति–**देवताः अङ्गानि–** ' इतर व्याहृति-देवता त्या आत्मरूप ब्रह्माचीं आपल्या हस्तपादादिकांसारखीं अंगें आहेत, असें चिंतन करावें. किंवा या मंत्रांत ' महः ' या चवथ्या व्याहृतीचीच प्रशंसा केली आहे, असें जाणावें. कारण ' महः ' हा शब्द पूजा या अर्थी रूढ असलेल्या ' मह् ' धातुपासून झाला आहे. ( पाणिनीय धातुपाठांत ' मह् पूजायां ' असा पाठ आहे. ' महः ' ही व्याहृति पूज्य ब्रह्मवस्तुरूप असल्यामुळें तिची स्तुति करणें योग्यच आहे. ज्याप्रमाणें शरीरगत अवयवांच्या अपेक्षेनें चेतन आत्मा उत्कृष्ट त्याप्रमाणेंच त्या तीन व्याहृतींच्या अपेक्षेनें मह ही चवथी व्याहृति उत्कृष्ट आहे. आतां याच चार व्याहृतींचे ठिकाणीं भूः, भुवः, इत्यादि लोकांच्या दृष्टींचें विधान करितात— )

**भूरिति वा अयं लोकः। भुव इत्यन्तरिक्षम्। सुव-**
**रित्यसौ लोकः। मह इत्यादित्यः । आदित्येन**
**वाव सर्वे लोका महीयन्ते ॥**

अर्थ–' भूः ' ही व्याहृति हा आपला प्रसिद्ध भूलोकच आहे,' असें चिंतन करावें. ' भुवः ' हें अन्तरिक्ष आहे; ' सुवर् ' हा तो

( परोक्ष ) स्वर्गलोक आहे व ' महः ' हा आदित्य आहे कारण ' आदित्येन सर्वे लोकाः महीयन्ते-' आदित्याकडून प्रकाशित होत्साते सर्व लोक पूज्य-व्यवहार करण्यास समर्थ-होतात. ( यास्तव ' मह. ' या व्याहृतीला आदित्यरूपत्व असणें योग्यच आहे. आतां व्याहृतींचे ठिकाणीं विशेष देवाच्या दृष्टीचें विधान करितात— )

**भूरिति वा अग्निः । भुव इति वायुः । सुवरित्यादित्यः । मह इति चन्द्रमाः । चन्द्रमसा वाव सर्वाणि ज्योतींषि महीयन्ते ॥**

अर्थ-' भूः ' हा प्रसिद्ध अग्नि आहे, ' भुवः ' हा वायु आहे; ' सुवर् ' हा आदित्य आहे व ' मह ' हा चन्द्रमा आहे, अशी दृष्टि ठेवून व्याहृतींची उपासना करावी. चद्रमाच्या योगानें सर्व ज्योती पूज्य होतात. ( निरभ्र आकाशात चद्राच्या सभोंवार असलेल्या-रोहिणी, शुक्र, गुरु, मगळ इत्यादि-ज्योतींना चंद्रामुळेंच कशी शोभा येते तें प्रसिद्ध आहे. आता त्याच व्याहृतींचे ठिकाणीं वेददृष्टीचें विधान करितात-)

**भूरिति वा ऋचः । भुव इति सामानि । सुवरिति यजूंषि । मह इति ब्रह्म । ब्रह्मणा वाव सर्वे वेदा महीयन्ते ॥**

अर्थ—' भू ' हे ऋक्-मत्र आहेत, ' भुवः ' हे साममत्र आहेत. ' सुवर् ' यजुर्मंत्र आहेत, व ' मह ' हें ब्रह्म आहे, अशी दृष्टि ठेवून व्याहृतींची उपासना करावी. येथें ब्रह्म म्हणजे ओंकार. ब्रह्मणा सर्वे वेदाः महीयन्ते-' त्याच्या योगानें सर्व वेद पूजले जातात ( कारण वेदाचें उच्चारण प्रणवपूर्वक होतें. आतां त्याच्याच ठिकाणीं प्राणादिदृष्टीचें विधान करितात— )

**इत्यपानः । सुवरिति**

व्यानः । मह इत्यन्नम् । अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते ॥

अर्थ—' भू ' हा प्राण आहे. ' भुवः ' हा अपान आहे. ' सुवर् ' हा व्यान आहे व ' महः ' हें अन्न आहे. ' अन्नेन सर्वे प्राणाः महीयन्ते–' अन्नाच्या योगानें सर्व प्राण पूजले जातात. खाल्लेल्या अन्नाच्या योगानें प्राण तृप्त होतात. ( आतां लोकादिकांची दृष्टि करावयास सांगितलेल्या व्याहृतींचा उपसंहार करितात—)

ता वा एताश्चतस्रश्चतुर्धा । चतस्रश्चतस्रो व्याहृतयः ॥

अर्थ—वर सांगितलेल्या ' ताः एताः चतस्रः–' त्या ह्या ' भूः ' इत्यादि चार व्याहृती ' चतुर्धा ' लोक, देव, वेद व प्राण याच्या दृष्टींनीं चार प्रकारच्या होतात. ह्मणजे ' भूः ' ही एकच व्याहृति पृथिवी, अग्नि, ऋग्वेद व प्राण या दृष्टींमुळें चार प्रकारची होते. त्यामुळें ' चतस्रः चतस्रः व्याहृतयः भवन्ति–' चारी व्याहृती प्रत्येकीं चार, याप्रमाणें एकंदर सोळा होतात.

आता त्यांच्या उपासनेचें विधान करितात—

ता यो वेद । स वेद ब्रह्म । सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति ॥

( इति सप्तमे पंचमोऽनुवाकः )

अर्थ—' ताः–' पृथिव्यादि दृष्टींनीं युक्त असलेल्या त्या व्याहृती ' यः वेद–' जो जाणतो ह्मणजे त्याची जो उपासना करतो ' सः ब्रह्म वेद–' तो ब्रह्माचीच उपासना करतो. ' अस्मै सर्वे देवाः बलिं आवहन्ति–' त्या उपासकाला इंद्रादि सर्व देव पूजा पोचवितात ( देव त्याची पूजा करितात. याठिकाणीं अशी एक शंका येते–येथें सांगितलेल्या व्याहृतिरूप प्रतीकाची उपासना करणाऱ्या उपासकाला ब्रह्मलोकाची प्राप्ति होणें शक्य नाहीं. कारण ' अप्रतीकालम्बनान्नतीति

बादरायण ' ( ब्रह्म. सू. अ. ४ पा. ३ सू. १५ ) या सूत्रात प्रतीकावाचून ब्रह्मोपासना करणाऱ्या उपासकानाच ब्रह्मप्राप्ति होते, असा निर्णय केला आहे. त्यामुळें—येथील प्रतीकोपासकाला ब्रह्मप्राप्ति संभवत नाहीं, आणि तिच्या अभावीं यानें सर्व देवास पूज्य होणेंही युक्त नव्हे. पण विचार केल्यावर ती ( शंका ) टिकत नाहीं कारण जो पुरुष व्याहृतींची उपासना करतो तो पुढील अनुवाकात सांगितलेल्या ब्रह्माचीच उपासना करतो. कारण ब्रह्मोपासनाच येथें प्रधान असून व्याहृत्युपासना अंग आहे. यास्तव ब्रह्मप्राप्ति झाली असता उपासकानें देवाना पूज्य होणें, युक्तच आहे. ) ५.

---

पाचव्या अनुवाकात अंगोपासना सांगितली. आता या सहाव्यात अंगी ब्रह्माची उपासना सांगतात—

स य एषोऽन्तर्हृदय आकाशः । तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः । अमृतो हिरण्मयः ॥

अर्थ—हृदयकमळात त्याच्या त्याच्या आंगठ्याच्या परिमाणाचें आकाश आहे. त्याचा ' सः यः एषः अन्तर्हृदये आकाशः-' तो जो हा हृदयांत आकाश आहे, या वाक्यानें उल्लेख केला आहे. त्यातील तो व हा या परोक्ष व प्रत्यक्षवाची शब्दानीं क्रमानें श्रुतीला दूर असलेल्या योगशास्त्रात व समीप असलेल्या दुसऱ्या श्रुतींत सांगितलेल्या आकाशाचा निर्देश केला आहे. ' तस्मिन् अयं मनोमयः पुरुषः-' त्यात हा मन प्रधान संपूर्ण परमात्मा आहे. ( वस्तुत पूर्ण परमात्मा सर्वत्र आहे. तथापि त्याच्या अनुभवासाठीं व उपासनेसाठीं हृदय हें स्थान सांगितलें जातें कारण समाधीच्या योगानें निरुद्ध केल्यामुळें एकाग्र झालेलें मन परमात्म्याला साक्षात् जाणावयास समर्थ होतें. ' अयं ' या अपरोक्षवाचकशब्दानें आत्म्यामध्यें साक्षात् अनुभवाचा

विषय होण्याची योग्यता आहे, असें सांगितलें आहे. त्या या पुरुषाची हृदयामध्यें उपासना केली असता तो प्रसन्न होतो. जिज्ञासू त्या पुरुषाला मनानेंच साक्षात् जाणतात व उपासक त्याचें मनानेंच ध्यान करितात. ह्मणून त्याला वर मनोमय, असें ह्मटलें आहे. तसाच तो ' अमृतः–' विनाशरहित व ' हिरण्मयः–' ज्योतिर्मय, स्वप्रकाश आहे. ( याप्रमाणें उपास्याचें स्वरूप सांगून श्रुति उपासकाचा विशेष मार्ग दाखविते—)

अन्तरेण तालुके । य एष स्तन इवावलम्बते । सेन्द्रयोनिः । यत्रासौ केशान्तो विवर्तते । व्यपोह्य शीर्षकपाले ॥

अर्थ—' तालुके अन्तरेण–' दोन तालूच्या मध्यें ( मुखछिद्राच्या आत व जिह्वामूळाच्या वर असलेला उजवीकडील एक व डावीकडील दुसरा, अशा दोन भागाना 'तालु' ह्मणतात. त्या दोन 'तालुकां'मध्यें ' यः एषः स्तनः इव अवलम्बते–' काळवडीच्या ( मोठ्या पाडीच्या ) स्तनाप्रमाणें जो हा मांसाचा गोळा लोंबत आहे. ' सः इन्द्रयोनिः–' तो इंद्राची परमेश्वराची योनि–स्थान आहे. ( 'यः' व ' एषः ' या परोक्ष व प्रत्यक्षवाची शब्दानीं क्रमानें त्या स्तनाची योगशास्त्रप्रसिद्धि व लौकिकप्रसिद्धि सांगितली आहे. लम्बिकामुद्रा करावयाचा ज्याला पुष्कळ अभ्यास झाला आहे त्या योग्याला तो स्तनासारखा मांसखंड ( मांसाचा तुकडा ) जिह्वाग्राच्या स्पर्शानें प्रत्यक्ष कळतो व दुसऱ्यानें तोंड उघडलें असतां त्यांत दिसणारा तो अयोग्यालाही लौकिक प्रत्यक्षप्रमाणानेंच ज्ञात होतो. शाखाचंद्रन्यायानें तो मांसाचा तुकडा आपल्या समीप असलेल्या योगशास्त्रोक्त सुषुम्ना नांवाच्या नाडीला सूचित करतो. त्या नाडींत शिरलेलें मन एकाग्र होऊन परमात्म्याला साक्षात् जाणण्यास समर्थ होतें. असो;

ती ही इंद्राची योनि-सुषुम्नानाडी 'शीर्षकपाले व्यपोह्य-' मस्तक-संबंधी कपालाचा भेद करून 'यत्र असौ केशान्तः (तत्र) विवर्तते-' जेथें ह्या केंसाचा अन्त ह्मणजे मूळ असतें तेथें विशेषेंकरून राहते. (याप्रमाणे उपासकाला फलप्राप्तीकरिता शरीरातून बाहेर पडायाचें स्थान सांगून आता फल सांगतात—)

भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति। भुव इति वायौ। सुवरित्यादित्ये। मह इति ब्रह्मणि। आप्नोति स्वाराज्यम्। आप्नोति मनसस्पतिम्। वाक्पतिश्चक्षुष्पतिः। श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः। एतत्ततो भवति। आकाशशरीरं ब्रह्म। सत्यात्म प्राणारामं मनआनन्दम्। शान्तिसमृद्धममृतम्॥

अर्थ-उपासक 'भूः' या व्याहृतीचें ध्यान केल्याने अग्नीमध्यें; 'भुवः' या व्याहृतीच्या ध्यानानें वायूमध्यें व 'सुवः' या व्याहृतीच्या ध्यानानें आदित्यामध्यें प्रतिष्ठित होतो. ह्मणजे अग्नि, वायु व आदित्य याच्या ऐश्वर्यास प्राप्त होतो. 'महः इति ब्रह्मणि-' 'मह' या चवथ्या व्याहृतीच्या ध्यानानें उपासक सत्यलोकीं असणाऱ्या ब्रह्मामध्यें प्रतिष्ठित होतो. ह्मणजे सगुण हिरण्यगर्भाख्य ब्रह्माचें जें ऐश्वर्य तें याला प्राप्त होतें. (आता या पुढील वाक्यानीं याचाच विस्तार करितात-) 'स्वाराज्यं आप्नोति-' स्वाराज्यास प्राप्त होतो. अग्न्यादि अङ्गदेवतांचा तो स्वत राजा होतो आणि तो राजा झाल्यामुळेंच वर ह्मटल्याप्रमाणें सर्व देव त्याला पूजा समर्पण करितात. केवल स्वाराज्यच नव्हे तर 'मनसस्पतिं आप्नोति-' सर्व प्राण्यांचें जें मन त्याच्या पतित्वास प्राप्त होतो. तो 'वाक्पति' होतो, 'चक्षुष्पति' होतो; 'श्रोत्रपति' होतो व 'विज्ञानपति' होतो (ह्म. सर्व प्राणिरूप होऊन सर्वांच्या वागादि-देवतांचा अधिपति होतो.

(एकाच अन्तःकरणाला दोन पृथक् शक्तींमुळें मन व विज्ञान ( बुद्धि ) अशीं दोन नांवें प्राप्त होतात. करणशक्तीमुळें त्याला मन ह्मणतात व कर्तृशक्तीमुळें विज्ञान ह्मणतात. उपासना करावयाच्या पूर्वी हा केवळ एका देहांतील मन व वागादि इंद्रियें होता. पण आतां उपासनासामर्थ्यानें सर्वात्मक विराड् हीच त्याची उपाधि झाल्यामुळें सर्व देहांतील मनांचा व इंद्रियांचा तो अधिपति होतो. ) 'ततः–' समष्टिरूप विराटाची प्राप्ति झाली असतां त्यानंतर ज्याला ब्रह्मतत्त्वाचा बोध झाला आहे, असा तो अविद्यारहित होऊन 'एतत्–' हें पुढील रूप होतो. अर्थात् '**आकाशशरीरं ब्रह्म–**' ज्याचें शरीर–स्वरूप आकाशाप्रमाणें मूर्तिरहित–घनाकाररहित आहे त्या ब्रह्माला आकाशशरीर ह्मणतात. तो उपासक तें आकाशस्वरूप ब्रह्म होतो. '**सत्यात्म प्राणारामं मनआनन्दं–**' तें ब्रह्म सत्यात्म आहे. त्याचें स्वरूप ( आत्मा ) सत्य–सर्व जगत्कल्पनेचें अधिष्ठान असल्यामुळें अबाध्य–आहे. त्याचप्रमाणें प्राणाचा आराम आहे. ह्मणजे प्राणाचा–उत्पत्ति-स्थिति-लय इत्यादि–सर्व क्रीडारूप व्यापार त्या ब्रह्मामध्यें होतो. त्याचप्रमाणें मनाच्या आनन्दाचेंही स्थान तें ब्रह्म आहे. कारण मन जेव्हां जेव्हां विषयचिन्तनाचा त्याग करून अन्तर्मुख होतें, विषयप्रवणता सोडून आत्मप्रवण होतें, तेव्हां तेव्हां त्याला मोठें सुख होतें. त्याचप्रमाणें तें ब्रह्म '**शान्तिसमृद्धं–**' शांतीनें समृद्ध–परिपूर्ण–आहे. मनामध्यें विक्षेप नसणें, त्यानें विक्षेपरहित होणें हीच शांति आहे. ब्रह्म त्या शांतीनें समृद्ध असतें. ह्मणूनच तें पूर्ण होय. ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां आनंदैकरस ब्रह्मामध्यें निमग्न झालेल्या मनामध्यें विक्षेप मुळींच संभवत नाहीं. यास्तव ब्रह्म मनांतील शांतीनें समृद्ध आहे. किंवा शांति ब्रह्मामध्येंच असते. कारण माया जशी जगाच्या आकारानें परिणाम पावते त्याप्रमाणें तें ब्रह्म कधींही विकार पावत नाहीं. त्यामुळें तें शांतीनें समृद्ध असतें. अथवा तें शांतीनें समृद्ध असल्याप्रमाणें त्याचा अनु-

भव येतो तसेंच ते ब्रह्म ' अमृतं-' अमरण धर्मवान् आहे. ( कारण मरण म्हणजे प्राणानें देहातून बाहेर पडणें. मरण या शब्दात ' मृ ' असा ' प्राणत्याग ' या अर्थी धातु आहे. त्यामुळें प्राणधारण करणाऱ्या जीवाचाच प्राणत्याग संभवतो. प्राणरहित परमात्म्याचा प्राणत्याग संभवत नाहीं. याप्रमाणें उपास्याचें स्वरूप, मार्ग व फल, हीं सांगून श्रुति उपासनेचें विधान करते—

इति प्राचीनयोग्योपास्स्व ।

( इति प्रथमे शीक्षाध्याये षष्ठोऽनुवाक )

अर्थ–' हे प्राचीनयोग्य, इति उपास्स्व–' प्राचीन म्ह० पूर्व काळात सांगितलेलीं नित्यनैमित्तिक कर्में. त्याच्या योगानें पापाचा क्षय झाला असता पुरुष उपासना करावयास योग्य होतो. तशा प्रकारच्या शिष्याला ' हे प्राचीनयोग्य ' असें संबोधून माहात्म्यस्य गुरु ' इति उपास्स्व–' वर सांगितल्याप्रमाणें उपासना कर, असा उपदेश करतो. ( वरील पांचव्या व या सहाव्या अनुवाकात सांगितलेली उपासना भिन्न भिन्न आहे, कीं एकच अशी शंका येते. कारण पांचव्या अनुवाकात लोकादिकाच्या दृष्टीनें व्याहृतिरूप प्रतीकाची उपासना करावी, असें सांगितलें आहे व या सहाव्यात मनोमयत्वादि गुणानीं युक्त, अशा ब्रह्माची उपासना करण्याविषयीं विधान केलें आहे. या उपास्यभेदाप्रमाणेंच पांचव्यात तो उपासक सर्व देवाना पूज्य होतो, असें व सहाव्यात तो स्वाराज्यास प्राप्त होतो, असें भिन्न भिन्न फल सांगितलें आहे. त्यामुळें या दोन अनुवाकातील उपासना भिन्न आहेत, असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण विचार केला असता दोन्ही अनुवाकांतील उपासना एकच आहे, असा निर्णय होतो. कारण पांचव्यात ' त्या व्याहृतींची जो उपासना करतो तो ब्रह्माची उपासना करतो ' असें ( पृष्ठ १९ ) सांगितलें आहे. त्यावरून व्याहृतींची उपासना करणा-

राळाच ब्रह्मोपासनेचा अधिकार आहे, असे ठरतें, आणि सहाव्या अनुवाकात त्या दोन्ही उपासनाचे फळ ' भू. ' या व्याहृतीचें ध्यान केल्यानें उपासक अग्नीमध्यें प्रतिष्ठित होतो, असें एकदमच सागितलें आहे. आता त्या दोन अनुवाकातील उपास्याचा भेद आहे, हें खरें; पण तो अंग व अगी, या भेदामुळे आहे. ' तो देवाना पूज्य होतो, ' असें ह्मणून पाचव्या अनुवाकात जें फळ सागितलें आहे, तें अंगफळ आहे. मुख्य नव्हे. याविषयीं शारीरक मीमासेच्या तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादात सविस्तर विचार केला आहे. ) ६

---

सहाव्या अनुवाकात मनोमयत्वादि-गुणविशिष्ट ब्रह्माची उपासना सागितली. पण तें मनोमय ब्रह्म चक्षूचा विषय होत नाहीं. त्यामुळें त्याची उपासना केवळ मध्यम अधिकाऱ्याकडूनच होऊ शकते मन्द् अधिकाऱ्याना त्याची उपासना करता येत नाहीं. ह्मणून आता या सातव्या अनुवाकात श्रुति मद अधिकाऱ्यासाठीं चक्षूचा विषय होणाऱ्या गुणानीं युक्त अशा ब्रह्माची उपासना सागते. पण अगोदर आधिभौतिक गुणाचीं तीन पचकें दाखवितें.—

पृथिव्यन्तरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरादिशाः । अग्निर्वा-
युरादित्यश्चन्द्रमा नक्षत्राणि । आप ओषधयो
वनस्पतय आकाश आत्मा । इत्यधिभूतम् ॥

अर्थ—पृथिवी, अन्तरिक्ष, स्वर्ग, दिशा व अवान्तर दिशा हें लोकपचक; अग्नि, वायु, आदित्य, चन्द्रमा व नक्षत्रें हें देवतापचक; आणि आप, ओषधि, वनस्पति, आकाश व आत्मा हें द्रव्यपचक. अशीं तीन पंचकें हें ' अधिभूत ' आहे. ह्मणजे ' मी ' या प्रत्ययानें ग्रहण केल्या जाणाऱ्या प्राणादिकांहून पृथक् असलेल्या व ' हें ' अशा अनहं-प्रत्ययानें ग्रहण करता येण्याजोग्या पृथिव्यादि भूतांचा

आश्रय करून जें राहतें तें अधिभूत अर्थात् भूतविषयक उपासना सांगितली, असा याचा भावार्थ पुढच्या विधानाशीं मागच्या विधानाचा संकर होऊं नये, ह्मणून विभाग करून श्रुति प्रतिज्ञापूर्वक दुसरें पंचकत्रय दाखविते —

अथाध्यात्मम् । प्राणो व्यानोऽपान उदान समानः। चक्षु श्रोत्रं मनो वाक् त्वक् । चर्म मांसं स्नावास्थि मज्जा ॥

अर्थ-'अथ-' भूतविषयक पंचकत्रय सांगितल्यानंतर 'अध्यात्मम्-' आत्मविषयक पंचकत्रय सांगितलें आहे ज्या देह, इंद्रियें इत्यादिकांच्या संघातावर शास्त्रसंस्काररहित मनुष्याचा 'हा मी' असा अभिमान असतो तो लोकप्रसिद्ध आत्मा होय. त्याविषयींच्या उपासनेला अध्यात्म उपासना ह्मणतात. देहांतील एकाच वायूच प्राणादि पांच वृत्तिभेद आहेत ते 'प्राण, व्यान, अपान, उदान व समान' होत हें वायुपंचक आहे 'चक्षु, श्रोत्र, मन, वाक् व त्वक्' हें इंद्रियपंचक आहे 'चर्म (चामडें), मांस, स्नावा (शिरा, श्रीविद्यारण्य ह्मणतात स्नावशब्दानें 'वसा' घ्यावी) अस्थि व मज्जा' हें धातुपंचक (या अधिभूत व अध्यात्म पंचकत्रयानें ब्रह्माचें उपाधिभूत सर्व जगत् सांगितलें आहे. जगदुपाधिविशिष्ट ब्रह्मस्वरूपाची उपासना करावी. हें सर्व जगत् ब्रह्म आहे, असें ध्यान करावें )

आतां श्रुति अर्थवादानें उपासनेविषयीं विधि सांगते—

एतदधिविधाय ऋषिरवोचत् । पाङ्क्तं वा इदं सर्वं । पाङ्क्तेनैव पाङ्क्तं स्पृणोतीति ॥

अर्थ-'ऋषिः एतत् अधिविधाय अवोचत्-' अतीन्द्रिय शास्त्रार्थाचा द्रष्टा कोणी मुनि पृथिवी, अंतरिक्ष इत्यादि उपास्य रूपाचें हें अधिक उपासन करून ह्म० साक्षात्कार होईतों उपासना करून

व स्वानुभवानेंच सर्वात्मक विराड्रूपास प्राप्त होऊन स्वानुभवसिद्ध अर्थ शिष्यांस सांगता झाला. ( त्यानें काय सांगितलें तेंच श्रुति सांगते–) '**इदं सर्वं पाङ्क्तं वै–**' हें प्रतीत होणारें **सर्व** विराड्रूप जगत् पांक्त–पंक्ति-छन्द:संबंधी–आहे, हें प्रसिद्ध आहे. कारण पंक्ति हा छन्द पांच या संख्येनें युक्त आहे, तसेंच जगत्-ही पंचसंख्यायुक्त आहे. कारण पंचीकृत पंच महाभूतें व त्यांचें कार्य–भौतिक हें सर्व विराड् होय, असें संप्रदायवेत्ते सांगतात. याप्रमाणें जगाचा पंक्तिछन्दाशीं सादृश्यरूप संबंध आहे. ह्मणून जगत् पांक्त होय. त्याचप्रमाणें पृथिव्यादिकाची उपासनाही पंचकानीं युक्त असल्यामुळें तिला पांक्तत्व आहे. '**पाङ्क्तेन एव पाङ्क्तं स्पृणोति इति–**' त्या पांक्त उपासनेनेंच उपासक पांक्त विराड्रूपाला प्राप्त होतो. ( या अर्थवादानें–स्तुतिरूप वाक्यानें–पांक्तरूप विराटास प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें अशारीतीनें उपासना करावी, असा विधि सूचित होतो; आणि या उपासनेनें विराटाची प्राप्ति झाली असतां तत्त्वज्ञानाच्या उत्पत्तीच्या द्वारा क्रममुक्ति प्राप्त होते, असें समजावें. क्रममुक्तीकरिता रत्न ३ रें पृष्ठ १४९ पहा. ) ७.

---

सहाव्या अनुवाकांत किंचित् सूक्ष्मदृष्टि मध्यम अधिकाऱ्यांसाठीं मनआदिसूक्ष्मरूप उपाधीनें युक्त असलेल्या ब्रह्माची उपासना सांगितली. सातव्या अनुवाकात स्थूलदृष्टि मंद अधिकाऱ्यांसाठीं पृथिव्यादि स्थूलरूपोपाधिकब्रह्माची उपासना सांगितली व आतां या आठव्या अनुवाकात उत्तम अधिकाऱ्यांसाठीं वेदान्तप्रतिपाद्य प्रणववाच्य शुद्ध ब्रह्माची उपासना श्रुति सांगते. पण अगोदर उपास्याचें स्वरूप दाखविते—

**ओमिति ब्रह्म ॥**

अर्थ-' ओम् ' हें ब्रह्म आहे. ओंकार परमात्म्याचा वाचक आहे. पतञ्जलिमुनींनीं ' तस्य वाचकः प्रणव ' या योगसूत्रात प्रणव परमेश्वराचा वाचक आहे, परमात्म्याचें नाव आहे, असें सांगितलें आहे. इति-शब्द ओं-वाचून इतर पदार्थांची व्यावृत्ति करतो. ' ओं ' यान शब्दानें प्रतिपाद्य जें ब्रह्म तेंच येथें उपास्य आहे. ( अर्थात् वर सांगितल्याप्रमाणें मनआदि-उपाधिक अथवा पृथिव्याद्युपाधिक ब्रह्माचें चिंतन करू नये. तर उत्तम अधिकाऱ्यानें वाचक ओंकाराचा उच्चार करून वाच्य ब्रह्माची उपासना करावी. आता ओंकारामध्यें ब्रह्माचा वाचक शब्द-नाम-होण्याची योग्यता आहे, असें श्रुति दाखविते—

ओमितीदं सर्व ।

अर्थ-'ओं इति इदं सर्व-' ओं हेंच हें सर्व आहे. ' ओं ' याच अक्षरात शब्दरूप व अर्थरूप असें हें सर्व जगत् अन्तर्भूत होतें. ( पहा अनु. ४ मंत्र १, पृष्ठ १२ ) अर्थात् प्रणव सर्वात्मक असल्यामुळें त्याच्यामध्यें सर्वात्मक ब्रह्माचा वाचक होण्याची योग्यता संभवते. ओंकाराचा सर्वांशी संबंध कसा आहे, तें कांहीं वैदिकव्यवहाराच्या उदाहरणानें श्रुति दाखविते.—

ओमित्येतदनुकृति ह स्म वा अप्यो श्रावयेत्याश्रावयन्ति । ओमिति सामानि गायन्ति । ओं शोमिति शस्त्राणि शंसन्ति । ओमित्यध्वर्युः प्रतिगरं प्रतिगृणाति । ओमिति ब्रह्मा प्रसौति । ओमित्यग्निहोत्रमनुजानाति । ओमिति ब्राह्मणः प्रवक्ष्यन्नाह ॥

अर्थ-दर्श पूर्णमासादि यागांत यजुर्वेदोक्त कर्माचें अनुष्ठान करणारे अध्वर्यू जेव्हां आग्नीध्राला उद्देशून ' आश्रावय ' असा प्रैषमंत्राचा प्रयोग करितात तेव्हां ' ओं श्रावय ' असा मंत्र पढतात. म्हणूनच

आपस्तंबानें ' आ श्रावय, ओ श्रावय व ओं श्रावय ' असे तीन प्रकारचे ह्म० आकार, ओकार व ओंकार ज्याच्या आरंभीं आहेत असे तीन मंत्र विकल्पानें सांगितले आहेत त्यांतील दुसरा ओकारादि पक्ष श्रुतीनें येथें घेतला आहे मंत्रांतील ओकार आग्नीध्र, या नांवाच्या ऋत्विजाच्या संबोधनार्थ आहे. ' हे आग्नीध्रा, हवि देण्याचा काल झाला आहे, असें देवांना सांग, ' असा त्याचा अर्थ आहे. त्यांत जें हें ओंकारोच्चारण तें ' ओं इति एतद्‌अनुकृतिः- ' ' ओं ' याची अनुकृति आहे. ह्मणजे ओंकारांतील मकाराच्या पूर्वी ' ओ ' असें जें अक्षर आहे त्याचें ' ओ श्रावय ' या मंत्रोच्चारांत अनुकरण केलें आहे ' ह स्म वा-' हे तीन निपात प्रसिद्धि दाखविण्यासाठीं आहेत. ' अपि ' हा शब्द पुढील उदाहरणाचा या उदाहरणाशीं समुच्चय करण्यासाठीं आहे ' ओं श्रावय इति आश्रावयन्ति-' अध्वर्यूही ' ओंकार ' या प्रणवाच्या मागानेंच ऐकवितात. त्याचप्रमाणें सामवेदी उद्गातेही ' ओं इति सामानि गायन्ति-' ओं असें ह्मणूनच सामगायन करितात ऋग्वेदी-बह्वृच-होतेही ' ओं शों इति शस्त्राणि शंसन्ति-' ओं या प्रणवपूर्वक ' शों ' या शब्दाचा उच्चार करून 'निष्केवल्य प्रउगा' इत्यादि शस्त्रें ह्मणतात. 'ओं इति अध्वर्युः प्रतिगरं प्रतिगृणाति-' ओं, असें ह्मणून अध्वर्यु प्रतिगरशब्दाचा उच्चार करतो. होता शस्त्रें ह्मणू लागला असतां अध्वर्यु जो प्रोत्साहन-द्योतक शब्द उच्चारतो त्याला ' प्रतिगर ' असें ह्मणतात. ( शस्त्रांतील एका ऋचेचा पूर्वार्ध संपला असतां अध्वर्यु ' ओऽथा मोद इव ' हा प्रतिगर ह्मणतो, हे होत , अर्ध ऋचेच्या शंसनानंतर आह्मांला हर्षसा झाला, असा त्याचा अर्थ आहे शस्त्रांतील एक ऋचा संपली असतां प्रतिगर उच्चारावयाचे वेळीं अगोदर प्रणवाचा प्रयोग करावा, असें विधान आहे तस्मात् प्रतिगरामध्येंही प्रणवाची अनुवृत्ति होते. ' ब्रह्मा ओं इति प्रसौति-' तीन्ही वेदांत सांगितलेल्या प्रयोगाला

जाणणाऱ्या ऋत्विजाला ब्रह्मा ह्मणतात. तो जेव्हां इतर ऋत्विजांना प्रोक्षणादि क्रिया करण्याची प्रेरणा करतो तेव्हां ' ओं प्रोक्ष ' असें ह्मणून प्रणवपूर्वकच प्रेरणा करतो. **' ओं इति अग्निहोत्रं अनुजानाति-'** अग्निहोत्र होमामध्यें अध्वर्यु अग्निहोत्रद्रव्य क्षीर क्षीरपात्रांतून अग्निहोत्र-हवणीनामक पात्रांत जेव्हां स्रुवेनें घालतो तेव्हां ' ओं उन्नेष्यामि हव्यं देवेभ्यः-' ह्म० मी देवांसाठीं हव्य काढून नेतों, अशा अर्थाच्या मंत्रानें यजमानाची आज्ञा मागतो व यजमान ' ओं ' इतकेंच ह्मणून त्याला अनुज्ञा देतो. **' प्रवक्ष्यन् ब्राह्मणः ओं इति आह-'** ब्रह्मयज्ञ करण्याची इच्छा करणारा ब्राह्मण ब्रह्मयज्ञनामक प्रवचनाच्या आरंभीं प्रणवाचा प्रयोग करतो. असो; याप्रमाणें वैदिक उदाहरणांनीं ओंकाराची व्याप्ति कशी आहे तें दाखविलें. आतां फल सांगण्याच्या मिषानें श्रुति उपासनाविधि सुचविते.—

**ब्रह्मोपाप्नवानीति । ब्रह्मैवोपाप्नोति ॥**

( इति शीक्षाध्यायेऽष्टमोऽनुवाकः । )

अर्थ—जो पुरुष **'ब्रह्म उपाप्नवानि इति-'** मी ब्रह्माशीं तादात्म्य पावावें, अशी कामना करतो त्यानें ' ओं ' या शब्दाचें वाच्य-अर्थ अशा ब्रह्माची उपासना करावी. ह्मणजे त्या उपासनेनें तो **ब्रह्म उपाप्नोति एव-'**ब्रह्माला प्राप्त होतोच. ( या उपासनेविषयीं उत्तरमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांत मीमांसा करून-येथील ओंकार हें ब्रह्मदृष्टीचें प्रतीक नसून ब्रह्माचें विशेषण आहे. मनोमयत्वादि गुणविशिष्ट, पृथिव्यादि गुणविशिष्ट व शुद्ध अशा त्रिविध ब्रह्माची प्राप्ति झाली असतां या उपासनेंतील ब्रह्म शुद्ध आहे, असें निश्चित करण्यासाठीं 'ओं' हें विशेषण योजलें आहे. ह्मणजे 'ओं' या वाचकशब्दाचें वाच्य जें पर ब्रह्म त्याची उपासना करावी, असा त्याचा अर्थ सिद्ध होतो-असा निर्णय केला आहे. ) ८.

---

आठव्या अनुवाकात शुद्ध ब्रह्मतत्त्वाची प्रणवानें ब्रह्माची उपासना सांगितली. तिच्या योगानेंच क्रममुक्तिरूप पुरुषार्थ सिद्ध होत असल्यामुळें उपासकाला श्रुत्युक्त व स्मृत्युक्त नित्य कर्में करण्याचें कांहीं कारण नाहीं, असें कोणाला वाटेल म्हणून श्रुति या नवव्या अनुवाकांत उपासनेसह नित्य कर्मांच्या समुच्चयाचें विधान करते.—

**ऋतं च स्वाध्यायप्रवचने च । सत्यं च स्वाध्यायप्रवचने च । तपश्च स्वाध्यायप्रवचने च । दमश्च स्वाध्यायप्रवचने च । शमश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च । अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च । मानुषं च स्वाध्यायप्रवचने च । प्रजा च स्वाध्यायप्रवचने च । प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च । प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च ॥**

अर्थ–'**ऋत**' म्हणजे मानसिक यथार्थ पर्यालोचन '**स्वाध्याय**–' नित्य अध्ययन, व '**प्रवचन**' अध्यापन किंवा ब्रह्मयज्ञ. मुक्तीची इच्छा करणारानें केवळ उपासनाच करून राहू नये. तर येथें सांगितलेलें ऋत, स्वाध्याय व प्रवचन, याचेंही अनुष्ठान करावें. या श्रुतींतील प्रत्येक वाक्यात जे दोन चकार आहेत ते ऋतादिकांचा उपासनेशीं समुच्चय करण्यासाठीं आहेत. वाणीनें यथार्थ-भाषण करणें, याला '**सत्य**' म्हणतात. भोजनत्यागरूप कृच्छ्र-चांद्रायणादि व्रतें हेंच '**तप**' आहे. कारण उपवासाहून निराळें तप नाहीं, अशा अर्थाची श्रुति आहे. पण 'यज्ञ, दान, तप व उपवास यांच्या योगानें आत्म्याला जाणण्याची इच्छा कर' अशा अर्थाचें दुसरें श्रुतिवाक्य असल्यामुळें उपवासाहून तप निराळें आहे, असें वाटतें, म्हणून कोणी म्हणेल तर उपवास करावयास असमर्थ असलेल्या अशक्त पुरुषानें धनदानरूप तप करावें, असें येथें विवक्षित

आहे, असें समजावें. कारण 'धनदान हेंच तप आहे, असें ह्मणतात,' अशी श्रुति आहे. चक्षुरादि बाह्य इंद्रियाना निषिद्ध विषयापासून परतविणें, हाच 'दम' आहे. मनाला निषिद्ध विषयाच्या अनुचिंतनापासून परतविणें, हाच ' शम ' होय. आधानादि संस्कारानें संपादन केलेले आहवनीयादिक हे ' अग्नी ;' आहिताग्नींत सायप्रातर्होम करणें, हेंच ' अग्निहोत्र ;' व अमावास्यादि विशेष तिथींची अपेक्षा न करिता केव्हाही याचना करण्यासाठीं दुसऱ्याच्या घरीं आलेल्या पुरुषानाच ' अतिथि ' ह्मणतात. मनुष्याकडून विवाहादि उत्सवप्रसंगीं केलें जाणारें वस्त्रादिपूजन हेच ' मानुष ' होय. तेंही शिष्टाचारप्राप्त कर्म असल्यामुळें श्रौत-स्मार्त कर्मांप्रमाणेंच अनुष्ठेय आहे. ' प्रजा-' शब्दानें पुत्रोत्पत्तीला कारण होणारे गर्भाधानादि संस्कार येथें विवक्षित आहेत. ' प्रजन-' शब्दानें पुत्रोत्पत्तीकरिता ऋतुकालीं भार्यासमागम विवक्षित आहे. ' प्रजाति-' पौत्राच्या उत्पत्तीकरितां पुत्राला गृहस्थाश्रमात नियुक्त करणें, वेदभाष्यकार सायणाचार्य ह्मणतात- प्रजातिशब्दानें श्रुति स्मृतिप्रोक्त सर्व कर्म विवक्षित आहे. उपासकानेंही आपल्या वर्णाश्रमाच्या अनुसार त्याचें अनुष्ठान करावें. कारण तें न केल्यास वेदविहित कर्माचा त्याग करणें, या प्रत्यवायामुळें उपासन प्रतिबद्ध होऊन आपलें फल देऊं शकणार नाहीं. मग याच न्यायानें ब्रह्मतत्त्वज्ञानाचाही कर्माशीं समुच्चय होईल; ह्म० ब्रह्मतत्त्वज्ञानेंही प्रत्यवायपरिहारार्थ कर्मानुष्ठान करावें, असें होईल, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तत्त्वज्ञ आपल्या आत्म्याच्या ठिकाणीं कर्तृत्व, वर्ण, आश्रम इत्यादिकाचा अध्यारोप करीत नाहीं. त्यामुळें तो कर्माचा अधिकारीच नसतो. पण उपासकाच्या कर्तृत्वादि अध्यासाची निवृत्ति झालेली नसते. ह्मणून त्याचा कर्माधिकार लुप्त होत नाहीं. त्यामुळें त्याला उपासना करीत असतांनाही कर्में करावीं लागतात. पण यावर कोणी ह्मणेल कीं निरंतर उपासना करणाऱ्या उपासकाचीं चित्तविक्षे-

पाला कारण होणाऱ्या व पुष्कळ प्रयासानेंच सिद्ध होणाऱ्या अग्नि होत्रादि कर्मांत प्रवृत्ति होऊं शकणार नाहीं, तर तें बरोबर आहे सतत उपासना करणाऱ्या उपासकाला अग्निहोत्रादि कष्टप्रद कर्में करण्यास अवकाशच रहात नसल्यामुळें तो तीं करणार नाहीं, हे खरें, पण त्यानें उपासनेच्या प्रतिकूल नसलेल्या शम दमादिकांचें तरी अनुष्ठान अवश्य करावें.. कारण यम नियमादिकांचें प्रतिपादन करणारें योगशास्त्र तसल्या सतत उपासकाकरिताच प्रवृत्त झालें आहे पण अग्निहोत्रादिक व शमादिक याची जरी उपासनेच्या अनुसार विकल्पानें प्राप्ति होत असली तरी स्वाध्याय व प्रवचन याचें अनुष्ठान सर्व उपासकास अत्यंत अवश्य आहे ह्मणूनच या श्रुतिभागांत ऋत, सत्य, तप, दम, शम, अग्नि, अग्निहोत्र, अतिथि, मानुष, प्रजा, प्रजन व प्रजाति, यातील प्रत्येकाबरोबर त्याचा ( स्वाध्याय व प्रवचन याचा ) अभ्यास केला आहे फार काय, पण चतुर्थाश्रमी यतींनाही अत्यंत उपयुक्त असलेल्या स्वाध्यायाचा व प्रवचनाचा त्याग सांगितलेला नाहीं. ह्मणूनच त्याचा येथें वारंवार उच्चार केला आहे

आता या पुढील श्रुतिभागात पूर्वोक्त ऋतादि कर्मांतील सत्य, तप इत्यादि विशेष कर्मांच्या प्राशस्त्यानिषयीं ( ह्म० सत्यच सर्वांत अधिक प्रशस्त आहे, तप सर्वांत श्रेष्ठ आहे, इत्यादि प्रकारचा ) ऋषींचा मत भेद श्रुति दाखविते —

सत्यमिति सत्यवचा राथीतरः । तप इति तपोनित्यः पौरुशिष्टिः । स्वाध्यायप्रवचने एवेति नाको मौद्गल्यः । तद्धि तपस्तद्धि तपः ॥

अर्थ—' राथीतरः–' रथीतर नावाच्या मुनीचा पुत्र सर्वदा सत्यच भाषण करीत असे ह्मणून त्याला ' सत्यवचा ' असें ह्मणत. तो ' सत्यं इति–' सत्य हेंच उत्तम कर्म आहे, असें सांगत असे ' पौरुशिष्टिः–' पुरुशिष्टि या नावाच्या मुनीचा पुत्र तपामध्यें सतत

नियत असे. ह्मणून त्याला तपोनित्य, असें ह्मणत. तो उपवास, धनदान इत्यादि तप, हेंच उत्तम कर्म आहे, असें ह्मणे. 'नाकः मौद्गल्यः–' नाक या नावाचा मुद्गलमुनीचा पुत्र स्वाध्याय व प्रवचन हींच उत्तम कर्में आहेत, असें सांगे. ( 'अहो पण ' पूर्वीचे देव तपाच्या योगानेंच देवत्वास प्राप्त झाले; ऋषीही तपानेंच स्वर्गास गेले' इत्यादि श्रुतिवचनें तपाचेंच माहात्म्य वर्णितात. यास्तव तप हेंच उत्तम कर्म आहे, असें ह्मटलें पाहिजे; ' असें ह्मणाल तर स्वाध्याय-प्रवचनही तपोरूप असल्यामुळें मौद्गल्याच्या मताचा बाध होत नाहीं. यास्तव विशेषतः ब्राह्मणाचें स्वाध्याय–प्रवचन हेंच उत्तम कर्म आहे.) ( ' तद् हि तपः तद् हि तपः–' कारण तेंच स्वाध्याय व प्रवचनच तप आहे. ' तत् हि तपः ' या पदांचा अभ्यास ( पुनरुच्चार ) करून तेंच मुख्य तप आहे, असें सुचविलें आहे. दुसऱ्या श्रुतिस्मृतिवचनांतूनही स्वाध्याय-प्रवचनांची प्रशंसा केलेली आढळते. यास्तव उपवास, धनदान इत्यादिकांहून तें श्रेष्ठ तप आहे. ९.

---

नवव्या अनुवाकांत ब्रह्मोपासनेसह श्रौत-स्मार्त कर्मांचें अनुष्ठान करावें, असें सांगितलें; त्याच प्रसंगानें ब्रह्मयज्ञ हें उत्तम तप आहे, असेंही व्यक्त केलें. पण एकादा श्रद्धालु शिष्यही बुद्धिमान्द्यादि दोषामुळें वेदपाठ करावयास समर्थ होत नाहीं; आणि वेदपाठाच्या अभावीं तो ब्रह्मयज्ञही करू शकत नाहीं. यास्तव त्यालाही ब्रह्मयज्ञाचें फळ मिळावें, ह्मणून या दहाव्या अनुवाकांत श्रुति एक जप्य मंत्र सांगते. ( जप्य ह्म० जप करावयास योग्य असा मंत्र. )

अहं वृक्षस्य रेरिवा । कीर्तिः पृष्ठं गिरेरिव । ऊर्ध्वपवित्रो वाजिनीव स्वमृतमस्मि । द्रविणं सवर्चसम् । सुमेधा अमृतोक्षितः । इति त्रिशङ्कोर्वेदानुवचनम् ॥

( इति शीक्षाध्याये दशमोऽनुवाकः )

अर्थ–' अहं–' मी मुमुक्षु ' वृक्षस्य–' तत्त्वज्ञानानें उच्छिन्न होणाऱ्या संसाररूप वृक्षाचा ' रेरिवा–' छेत्ता ( विषयवैराग्यरूप शस्त्रानें छेद करणारा )'व्हावें. कारण माझ्या विषयवैराग्यरूप शस्त्रानें संसारवृक्ष तुटला असतां माझी ' कीर्तिः गिरेः पृष्ठं इव–' कीर्ति पर्वताच्या पृष्ठाप्रमाणें होवो. ( ह्म० पर्वताचा उपरिभाग–ऊर्ध्वभाग जसा अत्यंत उन्नत असतो त्याप्रमाणें माझी मोक्षाविषयींची कीर्ति अत्यंत उन्नत होत्साती देवलोकींही पसरो. कारण असें झालें असता; देवही माझ्या पुरुषार्थाला विघात करूं शकणार नाहींत. ) ' वाजिनि स्वमृतं इव अहं ऊर्ध्वपवित्रः अस्मि–' वाज ह्म० गति; आणि वाजी ह्म० गतिमान्–आदित्य ( कारण तो सर्वदा गमन करीत असतो. ) त्या आदित्यात सुंदर अमृत आहे. ( त्याच्यावर वस्वादिदेव आपली उपजीविका करितात, असें छान्दोग्यात सांगितलें आहे. ) तें आदित्यांतील अमृत जसें अतिशय शुद्ध आहे, तसा मी ऊर्ध्वपवित्र ह्म० उत्कृष्ट शुद्धीनें युक्त आहें. तशा प्रकारच्या माझें ' सवर्चसं द्रविणं–' दैववित्त सिद्ध होवो. ( वित्त मानुष व दैव असें दोन प्रकारचें आहे. डोळ्यांनीं दिसणारें सुवर्ण-रौप्यादि हें मानुष व कानांनीं 'ऐकलें जाणारें व वेदांत प्रतीत होणारें ब्रह्मज्ञानादिक हें दैव वित्त होय. यांतील दैववित्तालाच येथें ' सवर्चस द्रविण ' ह्मटलें आहे. वर्चस् ह्म० बल. त्यासह असणारें जें वित्त तें सवर्चस वित्त. ब्रह्मज्ञानरूप दैववित्त सर्व संसाराचें निवर्तन करणारें आहे. यास्तव तें बलयुक्त आहे, असें ह्मणतां येतें. द्रविणसंज्ञक दैववित्तानें संपन्न झालेलों मी ' सुमेधाः अमृतोक्षितः च ( भूयासं )–' ज्याची मेधा–ब्रह्मज्ञानप्रतिपादक ग्रंथ व त्याचा अर्थ यांचा निश्चय करणारी शक्ति–सुंदर आहे, असें मीं व्हावें आणि त्यामुळेंच ब्रह्मानन्दरसाचा सेक केल्याप्रमाणें व्हावें. ' इति त्रिशङ्कोः वेदानुवचनम्–' हें ( ह्म० अहं वृक्षस्य रेरिवा इत्यादि ), त्रिशंकुनामक मुनीचें गुरुमुखानें वेदाध्ययन केल्यानंतर वचन आहे. १०.

---

दहाव्या अनुवाकांत ब्रह्मयज्ञाकरितां जपावयाचा मंत्र सांगितला. त्याच्या योगानें मतिमंद ब्राह्मणाला ब्रह्मयज्ञ सुकर झाला आहे. त्यामुळें ब्रह्ममुक्तीला कारण होणारा—ब्रह्मोपासना व श्रौतस्मार्त कर्मे यांचा—समुच्चयही सुस्थित झाला. म्हणजे उपासकाला ऋत, सत्य इत्यादिकांतील एकाद्या कर्माबरोबर मुख्य ब्रह्मयज्ञ करण्याचें सामर्थ्य जरी नसलें तरी ब्रह्मयज्ञप्रतिनिधिरूप वरील मंत्राचा जप केल्यानेंही उपासनेसह कर्मानुष्ठान होऊं शकतें, असें सिद्ध झालें. आतां या अकराव्या अनुवाकांत केवळ कर्मेंही विविदिषा ( म्ह० ब्रह्मज्ञानाविषयीं रुचि ) उत्पन्न करून मोक्षाचीं निमित्तें होऊं शकतात, अशा अभिप्रायानें श्रुति त्या कर्मांच्या अनुशासनाचें विधान करीत आहे—

वेदमनूच्याऽऽचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति ।

अर्थ—'आचार्यः—' शिष्याला आपल्यापाशीं आणून—ठेवून घेऊन—जो द्विज अनुष्ठान व तत्त्वज्ञान यासह वेद शिकवितो त्याला आचार्य म्हणतात. तसला आचार्य 'अन्तेवासिनं—' सदा आपल्यापाशीं असणाऱ्या शिष्याला 'वेदं अनूच्य—' उपनयनानंतर वेद शिकवून त्यानंतर अनुशासन करतो. ( म्ह० ग्रंथाचें ग्रहण करविल्यावर अनुष्ठेय अर्थ शिकवितो. यावरून वेदाध्ययनानंतर धर्मजिज्ञासा केल्यावाचून ब्रह्मचाऱ्यानें गुरुकुलांतून समावृत्त होऊं नये, असें ठरतें. ) असो; आतां तो अनुशासनाचा प्रकारच श्रुति संक्षेपतः दाखविते—

सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः ।
आचार्याय प्रियं धनं आहृत्य प्रजातन्तुं मा व्यव-
च्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदि-
तव्यम् । कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदित-
व्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ।
देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् ॥

**अर्थ-सत्य भाषण** कर ( यथार्थप्रमाणानें जसें ज्ञान झालें असेल तसेंच भाषण कर आणि तें सत्यही प्रिय व हितकर असेल, तरच बोल. अप्रिय व अहितकर असेल तर तें तसलें सत्यही बोलू नको. ( **सायणाचार्य** ह्मणतात सत्यशब्दानें स्मृतींतील अहिंसा, अस्तेय इत्यादि इतर नियमही घ्यावे ) त्याचप्रमाणें **धर्माचें** अनुष्ठान कर. ( येथील धर्मशब्दानें श्रुतिविहित अग्निहोत्रादि धर्म घ्यावे. साराश सर्व श्रौत-स्मार्तकर्म करावें, हा या दोन संक्षिप्त वाक्याचा अर्थ आहे.

'सकृत्कृते कृतः शास्त्रार्थः' ह्मणजे एकदा एकादें शास्त्रोक्त कर्म केलें, ह्मणजे शास्त्रार्थ केला असें होतें. या न्यायानें श्रौतस्मार्त कर्मांचें एकेकदा अनुष्ठान करून त्याचा त्याग करावा, असें कोणी समजेल, ह्मणून 'असला प्रमाद करू नये,' असें पुढील वाक्य सांगतें-) '**स्वाध्यायात् मा प्रमदः**-' अध्ययन विधीनें ग्रहण केलेल्या स्वाध्यायापासून प्रमाद पावू नको. स्वाध्यायाचें विस्मरण हाच मोठा प्रमाद आहे तो करू नको. ह्म० स्वाध्याय विसरू नको. ( कारण अधीत वेदाला किंवा शास्त्राला विसरून त्याचा नाश करणें हा प्रमाद ब्रह्महत्येसारखा आहे, असें जाणावें. ) '**आचार्यस्य प्रियं धनं आहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः**-' आचार्याला आवडणारें गाय, सुवर्ण, वस्त्र इत्यादि-रूप धन विद्यानिष्क्रयार्थ आणून देऊन नंतर विवाह कर, आणि पुत्र-पौत्रादिरूप प्रजातन्तूचा-प्रजेच्या विस्ताराचा-विच्छेद करू नको. '**सत्यात् न प्रमदितव्यं धर्मात् न प्रमदितव्यं**-' वर सांगितलेल्या सत्यापासून ( आलस्यादिकारणानें केव्हाही ) च्युत होऊं नये. धर्मापासूनही प्रमाद पावू नये. ( त्याचें अनुष्ठान न करणें, हाच प्रमाद आहे. ) '**कुशल**' ह्म० क्षेम त्यावरून त्याचें कारण क्षेमकर कर्म सुचविलें जातें तें वैदिक व लौकिक असें दोन प्रकारचें आहे. आयुष्य, आरोग्य इत्यादि देणारें होम हवनादि, हें वैदिक क्षेमकर कर्म व औषधोपचारादिक, हें लौकिक क्षेमकर कर्म आहे. '**भूति**' ह्म०

ऐश्वर्य. त्यावरून त्याचें कारण उपलक्षित होतें. ' वायव्यं श्वेतमालभेत ' इत्यादि वाक्यानें सांगितलेलें, हें वैदिक भूत्यर्थ कर्म व दान घेणें, इत्यादि हें लौकिक भूत्यर्थ कर्म आहे. या **क्षेमकर** व **ऐश्वर्यकर** कर्मांचें अनुष्ठान करून क्षेम व ऐश्वर्य यास संपादन न केल्यास मुक्तीला कारण होणाऱ्या कर्मांचें अनुष्ठान घडणार नाहीं. यास्तव याच्या अनुष्ठानाकडे दुर्लक्ष करूं नये. ' **स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यं**–' स्वाध्याय व प्रवचन यापासून प्रमाद पावूं नये. ( वर गुरूपासून ग्रहण केलेल्या स्वाध्यायास विसरणें, एतद्रूप प्रमादाचें निवारण केलें. आता येथें शिष्याना स्वाध्याय सांगणें व ब्रह्मयज्ञ याचें अनुष्ठान न करणें, एतद्रूप प्रमादाचें निवारण केलें जात आहे. ) ' **देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यं**–' पुराणोक्त विनायकव्रत, अनन्तव्रत इत्यादि देवकार्य व प्रतिसांवत्सरिक श्राद्धादिक हें पितृकार्य, याचा त्याग करूं नये.

आता श्रुति माता, पिता, आचार्य व अतिथि याच्या विषयींची मनुष्यत्वबुद्धि सोडून देवताबुद्धीनें त्याची पूजा करावी, असें विधान करते—

**मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव ॥**

अर्थ—माता हाच ज्याचा रुद्र, विष्णु, विनायक इत्यादिरूप पूज्य देव आहे, असा तूं हो. तसाच तूं पितृदेव, आचार्यदेव व अतिथिदेव हो. (आता ' कुशलान्न प्रमदितव्य भूत्यै न प्रमदितव्य ' इत्यादि वर जें सांगितलें आहे त्या विषयींच श्रुति कांहीं विशेष सांगते—)

**यान्यनवद्यानि कर्माणि । तानि सेवितव्यानि । नो इतराणि ॥**

अर्थ—क्षेमकर व ऐश्वर्यकर कर्में निंद्य व अनिंद्य अशीं दोन प्रकारचीं आहेत. त्यांतील ' **यानि अनवद्यानि कर्माणि तानि सेवि-**

**तव्यानि इतराणि नो–'** जीं इष्टि, प्रतिग्रह, याजन इत्यादि अनिंद्य कर्में त्यांचेंच सेवन करावें. इतरांचें ह्म० शत्रुवधादिकांस कारण होणारीं अभिचारादि निंद्य कर्में करूं नयेत. ( कारण तीं जरी ऐहिक क्षेम करीत असलीं तरी परलोकीं नरक देत असतात. यास्तव त्यांचें सेवन करूं नये. आतां शिष्टाचार श्रुतिस्मृतीप्रमाणेंच प्रमाण असल्यामुळें तुह्मां आचार्यांच्या सर्व आचरणांचें आह्मीं अनुष्ठान करावें, असें शिष्य ह्मणेल, ह्मणून गुरुरूप श्रुति सांगते— )

यान्यस्माकं सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि ।
नो इतराणि ॥

अर्थ—' अस्माकं यानि सुचरितानि–' श्रीगीतेंत सांगित-लेल्या दैव व आसुर कर्मांतील आमचीं जीं अभयादि सुचरितें अस-तील त्यांचेंच तूं सेवन करावेंस. आमच्या दंभादि इतर आसुर आचर-णांचें तूं सेवन करूं नयेस. ( हाच न्याय सर्व शिष्टाचाराला लावावा. परशुरामानें आपल्या पित्याच्या आज्ञेनें आपल्या आईला मारलें. तो वेदवेत्ता शिष्टही होता. पण त्यांतील पित्याची आज्ञा पाळणें, या सुचरिताचा आदर करून मातेला मारणें, या दुश्चरिताचा अनादर करावा. आतां श्रुति महापुरुषांच्या सेवेविषयीं कांहीं विशेष सांगते— )

ये के चास्मच्छ्रेयांसो ब्राह्मणाः । तेषां त्वयाऽऽस-
नेन प्रश्वसितव्यम् ॥

अर्थ—' ये के च अस्मच्छ्रेयांसः ब्राह्मणाः–' जे कोणी आह्मांहून वय, विद्या इत्यादि गुणांनीं श्रेष्ठ ( अधिक धार्मिक ) ब्राह्मण असतील ' तेषां आसनेन त्वया प्रश्वसितव्यं–' त्यांना बसावयास आसन देणें, पादप्रक्षालन करणें इत्यादि शुश्रूषेनें शांत करावें. त्यांच्या श्रमांचा परिहार करावा किंवा त्यांच्या आसनाचे वेळीं

ते समोर बसलेले असताना तू शांति धरावीस पंडितमन्यतेनें त्याच्याशीं निर्भयपणें वादादि करावयास प्रवृत्त होऊं नयेस ( आतां दानाविषयीं कांहीं विशेष सांगतात-)

**श्रद्धया देयम् । अश्रद्धयाऽदेयम् । श्रिया देयम् ।**
**ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् ॥**

अर्थ—जेव्हां ब्राह्मणाला दान द्यावयाचें असेल तेव्हां तें तूं **श्रद्धेनेंच द्यावेंस अश्रद्धेनें केव्हांही देऊं नयेस.** ( कारण श्रद्धेविरहित दिलेलें दान दोन्ही लोकीं व्यर्थ होतें श्रीगीतेंत भगवानांनीं ' अश्रद्धेनें केलेला होम, दान, तप इत्यादि सर्व असत् आहे तें या लोकीं किंवा परलोकीं ही फलदायक होत नाहीं, ' असें सांगितलें आहे. ' अश्रद्धया अदेयं ' असा पाठ घेऊन वरील अर्थ केला पण ' अश्रद्धया देयं-' असा पाठ घेतल्यास ' जसा एकादा श्रद्धावान् पुरुष देतो त्याप्रमाणें श्रद्धा नसली तरी द्यावें अर्थात् या पक्षीं सात्त्विक दानाचें उत्तर जन्माला कारण होणारें फळ नाहीं, असें सूचित होतें तामस व राजस दानाचें फळ असतें ह्मणूनच श्रीगीतेंत त्रिविध दान सांगितलें आहे. ) ' श्री –' वैभव ' ह्रीः–' लज्जा, ' भीः–' शास्त्रभीति, व ' संविद्–' विशेष देशकाळ व पात्र यांचें ज्ञान 'श्रिया देय–' इत्यादि वाक्यांनीं त्रिविध दानाचा प्रपंच केला आहे ( मजपाशीं पुष्कळ धन आहे यास्तव दासी व दास ज्याप्रमाणें त्याचा अपहार करितात त्याप्रमाणें ब्राह्मणही तें घेतील, असें ह्मणून श्री असल्यामुळें अनवधानपूर्वक धन देणें, हें तामस दान माझ्या बरोबरच दुसरे देतात, तेव्हां मीच न दिल्यास माझी मोठी अपकीर्ति होईल, असें ह्मणून लज्जेनें दान देणें, हें राजस दान, आणि ऋत्विजादिकांना जें धन देण्याविषयीं शास्त्रानें सांगितलें आहे तें ( तितकें ) न दिल्यास मला प्रत्यवाय लागेल, असें समजून भीतीनें जें दान देणें तें सात्त्विक दान होय.

अध्वर्युप्रमृति चार मुख्य ऋत्विज संपूर्ण दक्षिणेस योग्य आहेत, प्रतिप्रस्थात्रादिक अर्ध्या दक्षिणेस पात्र आहेत; नेष्ट्रादिक तृतीयांशास योग्य आहेत व उन्नेत्रादिक चतुर्थांशास योग्य आहेत, अशाप्रकारच्या ' संविदा ' विवेकज्ञानानें युक्त होऊन दान देणें हें सात्त्विक दान होय. किंवा ' श्रिया देयं, ह्रिया देयं, ' इत्यादि हीं सर्व वाक्यें सात्त्विक दानाविषयींच आहेत. ' वित्तशाठ्य करू नये, ' शास्त्राच्या अनुसार आपल्या शक्तीप्रमाणें द्यावें, स्वल्पदान केल्यास माझी मोठी अपकीर्ति होईल, अशा लज्जेनें तें द्यावें, इत्यादि त्याचा भावार्थ समजावा.)

याप्रमाणें अज्ञात अनुष्ठेय अर्थाचा उपदेश करून आता संदिग्ध अनुष्ठेयाचा निर्णय कसा करावा, तें श्रुति सांगते--

अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात्।ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः।युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा ते तत्र वर्तेरन्। तथा तत्र वर्तेथाः ॥

अर्थ--' अथ-' आता ' यदि ते-' जर तुला ' कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात्-' कर्माविषयीं अथवा आचरणाविषयीं संशय आला, म्हणजे ' सूर्योदय झाल्यावर होम करावा, ' व ' सूर्य उगवण्यापूर्वींच होम करावा ' अशीं विरोधी श्रुतिवचनें ऐकून श्रौत कर्माविषयीं, ' सन्ध्येची देवता पुरुषमूर्ति ( पुरुषाकार ) समजावी, ' व 'ती स्त्रीमूर्ति समजावी ' अशीं विरोधी स्मृतिवचनें ऐकून स्मार्त कर्माविषयीं किंवा मातुलकन्याविवाह, मांसभक्षण इत्यादिकांविषयीं मतभेद आढळत असल्यामुळें त्या लौकिक कुलपरंपराप्राप्त आचाराविषयीं जर संशय आला तर ज्या देशांत, ज्या काळांत व ज्या कुळांत तू असशील ( शिष्य असेल ) ' तत्र ये संमर्शिनः युक्ताः आयुक्ताः अलूक्षाः धर्मकामाः ब्राह्मणा स्युः ते तत्र यथा वर्तेरन् तथा

**तत्र वर्तेथाः**–' त्या देशादिकांत जे विचारी, युक्त व आयुक्त, क्रोधादि-रहित व धार्मिक ब्राह्मण असतील ते त्याविषयीं जसें वर्तन करीत असतील तसें त्याविषयीं तू आपलें वर्तन ठेव राग-द्वेष-औत्सुक्यादि दोषरहित होऊन शास्त्रार्थाचा चांगल्याप्रकारें निर्णय करावयास समर्थ असलेल्या लोकास **समर्शी;** नित्य नैमित्तिक कर्में स्वत करणाऱ्या लोकास **युक्त;** त्यातच सर्व प्रकारें गढून गेलेल्या लोकास **आयुक्त;** क्रोध, आग्रह इत्यादिकांनीं रहित असलेल्या पुरुषास **अलूक्ष** व लाभ, सत्कार इत्यादिकाची इच्छा न करिता केवळ धर्माचीच इच्छा करणारास **धर्मकाम** ह्मणतात

याप्रमाणें संदिग्ध धर्माच्या निर्णयाचा उपाय सागून पातकादिका-विषयींच्या शंकेनें निंद्य झालेल्या लोकाशीं व्यवहार न करण्याचा प्रसंग आला असता निर्णय कसा करावा तें श्रुति सांगते—

> अथाभ्याख्यातेषु । ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः ।
> युक्ता आयुक्ताः । अलूक्षा धर्मकामाः स्युः । यथा
> ते तेषु वर्तेरन् । तथा तेषु वर्तेथाः ॥

**अर्थ**–आता अभ्याख्याताशीं ह्मणजे कोणी कोणा एकावर महा पातकादिकाचा आरोप केला असता तसल्या त्या आरोपिताशीं अन्न जलादिकाचा व्यवहार करावा कीं न करावा, असा संशय आला असता त्या देशादिकातील ' समर्शी, युक्त, आयुक्त, अलूक्ष, ( शंकराचार्यांनीं अलूक्ष ह्मणजे अरूक्ष, अक्रूरमति, असें भाष्यात ह्मटलें आहे ) व धर्मकाम ब्राह्मण जसें त्याच्याशीं वर्तन करतील तसें तूही कर (आता या अनुशासनाचा उपसंहार करितात )—

> एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषद् ।
> एतदनुशासनम् । एवमुपासितव्यम् । एवमु चैवमु
> पास्यम् ॥ ( इति प्रथम शीक्षाध्याये एकादशोऽनुवाकः )

अर्थ–' सत्यं वद ' येथून ' तथा तेषु वर्तेथाः ' येथवर जो हा ग्रंथसंदर्भ आहे, तो ' **एषः आदेशः**–' हा आदेश आहे. आदेश ह० श्रौत–श्रुतिप्रोक्त–विधि. ज्याप्रमाणें राजा आपल्या भृत्याला आज्ञा करतो त्याप्रमाणें वैदिक विधि अनुष्ठात्याला आज्ञा करतो. ' **एषः उपदेशः**–' हा उपदेश आहे; स्मार्तविधि आहे. कारण स्मृती वेदमूलक असतात. त्यामुळें त्या वैदिक विधींना अगदीं समीप आहेत. स्मृतींतही ' सत्य भाषण कर ' इत्यादि असाच विधि आढळतो. ' **एषा वेदोपनिषद्**–' ही वेदांतील रहस्य विद्या आहे. **एतद् अनुशासनं**–' हें अनुशासन ह० ईश्वराची आज्ञा आहे; आणि ज्या अर्थी असें आहे त्या अर्थी ' **एवं उपासितव्यं**–' वर सांगितल्याप्रमाणें अनुष्ठान करावें. ' **एवं उ च एव उपास्यं**–' आणि निःसंशय असेंच अनुष्ठान करणें उचित आहे. ही पुनरुक्ति आदरार्थ आहे. ११.

---

अकराव्या अनुवाकांत आचार्यांचे अनुशासन सांगितलें. त्यावरून ब्रह्मतत्त्वविद्येचीं बहिरंगसाधनें अर्थात् उपासना व सत्कर्में, यांचें ज्ञान झालें. आतां ग्रंथाचें पठण, त्याचें अर्थ-ज्ञान व अनुष्ठान, याच्या शेवटीं जप करावयास योग्य असलेला शांतिमंत्र श्रुति दाखविते—

**शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा । शं न इन्द्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः । नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मावादिषम् । ऋतमवादिषम् । सत्यमवादिषम् । तन्मामावीत् । तद्वक्तारमावीत् । आवीन्माम् । आवीद्वक्तारम् । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥** ( इति शीक्षाध्याये द्वादशोऽनुवाक इति शीक्षाध्याय )

अर्थ—या अनुवाकाचा अर्थ शीक्षाध्यायाच्या आरंभीं सांगितला आहे. पण तेथें पूर्वीं ब्रह्म सांगितलेलें नसल्यामुळें ' ब्रह्म वदिष्यामि '

इत्यादि भविष्यत्काळीं प्रयोग केले होते आणि आतां येथें ' ब्रह्म अवादिषम् ' इ० तुलाच मीं प्रत्यक्ष ब्रह्म ह्मटलें, ( ऋत ह्मटलें, सत्य ह्मटलें. ) इत्यादि भूतकाळीं प्रयोग केले आहेत. तसेंच तेथें विघ्नांच्या परिहाराविषयीं प्रार्थना करावयाची असल्यामुळें ' अवतु– ' रक्षण करो, असा प्रयोग केला होता. पण येथें ' तन्मां आवीत्– ' तें माझें रक्षण करतें झालें, असें ह्मटलें आहे. कृतघ्नतादोष येऊं नये ह्मणून झालेल्या विघ्नपरिहाराचें स्मरण केलें आहे. नाहीं तर मित्र, वरुण इत्यादि देवतांनीं केलेल्या उपकारांस न आठवणाऱ्या मुमुक्षूकडे कृतघ्नता आली असती. पण ती येणें उचित नव्हे. कारण ' ब्रह्मघ्ने निष्कृतिर्दृष्टा कृतघ्ने नास्ति निष्कृतिः । ' इ० ब्रह्मघातक्याच्या पातकालाही प्रायश्चित्त आहे. पण कृतघ्नाला प्रायश्चित्त नाहीं, असें स्मृतिशास्त्रांत सांगितलें आहे. यास्तव कृतघ्न पुरुषानें साधनांचें अनुष्ठान जरी केलें तरी त्या दोषामुळें त्याच्या फलास प्रतिबंध होतो. तो होऊं नये, ह्मणून ' आध्यात्मिकादि विघ्नांचा परिहार झाला ' असें ह्मणून देवतांचे उपकार आठवले आहेत. १२ ( आरण्यकाच्या क्रमानें सातवा प्रपाठक समाप्त झाला. येथें तैत्तिरीयोपनिषदाचा पहिला शीक्षाध्याय समाप्त झाला. )

---

## अथ द्वितीयो ब्रह्मवल्ल्यध्यायः ।

हरिः ॐ या दुसऱ्या अध्यायाच्या आरंभीं शिष्य व आचार्य यांचें परस्पर आनुकूल्य सिद्ध व्हावें, प्रातिकूल्याचा परिहार व्हावा ह्मणून श्रुति जप्य मंत्र सांगते—

> सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ।
> ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

अर्थ—'नौ सह अवतु–' आचार्यांच्या प्रसादानंतर मी आता या पुढें ज्या ब्रह्माला प्राप्त होणार आहें तें ब्रह्म आह्मां गुरुशिष्याना एकाच वेळीं राखो 'नौ सह भुनक्तु' आह्मां दोघाचें एकदांच पालन करो ( या जन्मीं अथवा पूर्व जन्मीं अनुष्ठिलेल्या कर्मकांडोक्त नित्य नैमित्तिक कर्मांमुळें ज्याच्या चित्तांत विविदिषा उत्पन्न झाली आहे, मागच्या साहितीं उपनिषदात सांगितलेल्या उपासनाच्या अनुष्ठानामुळें जो अन्तर्मुख व एकाग्रचित्त झाला आहे, काम्यकर्मादिकाच्या योगानें संपादन केलेल्या फळामध्यें काहीं अर्थ नाहीं, तीं सर्व असार आहेत, असें जाणून त्याविषयीं जो विरक्त झाला आहे आणि कर्मांच्या अनुष्ठानानें मोक्ष मिळणें शक्य नाहीं असा निश्चय करून मुक्तीला कारण होणाऱ्या ब्रह्मतत्त्वाच्या ज्ञानाकरिता ज्यानें गुरूपाशीं हातात समिधा, कुश इत्यादि शुश्रूषासाधन घेऊन गमन केलें आहे असा शिष्य व–वेदाध्यायी, वेदशास्त्रपारगत असल्यामुळें बोध करण्यास समर्थ, कुशल आणि ब्रह्मनिष्ठत्वामुळें केव्हाही बहिर्मुख न होणारा, –असा आचार्य येथें विवक्षित आहे. या मंत्रातील पहिल्या वाक्यानें–गुरु आळस न करिता उपदेश करील व मी उपदिष्ट अर्थ बरोबर समजेन असें कर, हेंच आमचें रक्षण आहे, अशी प्रार्थना केली आहे आणि दुसऱ्या वाक्यानें मी उपदिष्ट अर्थाचें बरोबर ग्रहण केलेलें असून त्यामुळें माझ्या अविद्येची निवृत्ति झाली आहे, असें पाहून आचार्य संतुष्ट होईल, असें कर अशी प्रार्थना करून पुढच्या पालनाचा पूर्वीच उल्लेख केला आहे 'सह वीर्यं करवावहै–' वरील प्रयोजनाच्या सिद्धीकरिता आह्मीं दोघानीं एकाच वेळीं परस्पराच्या विद्याविषयक वीर्यास ( स्वप्रयोजन–सामर्थ्यास ) वाढवावें 'नौ अधीत तेजस्वि अस्तु–' आमचें अधीत प्रथजात तेजस्वी–स्वार्थप्रकाशक–असो. 'मा विद्विषावहै–' आह्मीं उभयतानीं परस्पराचा द्वेष न करावा. गुरूनें चागल्या रीतीनें व्याख्यान करून सांगितलें नाहीं, असा शिष्याचा

असंतोष व या शिष्यानें माझी चांगली शुश्रूषा केली नाहीं, असा गुरूचा असंतोष हाच परस्पर द्वेष. तो आह्मामध्यें नसावा. प्रणव व तीन शान्ति–शब्द यांचें व्याख्यान पूर्वीप्रमाणें करावें.

वारुणी उपनिषदाच्या वरील पहिल्या अनुवाकांत द्वेषादिक संभवनीय विघ्नाच्या परिहाराकरितां जप्य मंत्र सांगून आतां या दुसऱ्या अनुवाकाच्या आरंभीं या सर्व उपनिषदाचें सार संक्षेपतः सूत्ररूपानें श्रुति सांगते—

ॐ ब्रह्मविदाप्नोति परम् ।

अर्थ—ब्रह्म ह्म० वाढलेली वस्तु. येथें निरतिशय वृद्धि विवक्षित आहे. कारण त्या वृद्धीचा संकोच करणारें उपपद–विशेषण–येथें नाहीं व हें प्रकरणही सातिशय वृद्धियुक्त वस्तूचें प्रतिपादन करणारें नव्हे. यास्तव ब्रह्म ह्म० निरतिशय वृद्धि पावलेली वस्तु, असेंच समजावें. नित्यशुद्ध, नित्यज्ञान, नित्यमुक्त हा स्वभाव, हीच निरतिशय वृद्धि आहे असो, 'ब्रह्मवित्–' अशा प्रकारच्या ब्रह्माला मनानें साक्षात् जाणणारा पुरुष 'परं आप्नोति–' ब्रह्मालाच प्राप्त होतो. ( कंठांतील आभरणाचें विस्मरण झालें असतां तें नाहींसें झालें, ह्मणून मनुष्य शोक करतो. पण दुसऱ्या कोणीं त्याचें स्मरण करून दिलें असतां अथवा आपोआप स्मरण झालें असतां तें जसें पुनरपि मिळाल्यासारखेंच वाटतें त्याप्रमाणें विस्मृत स्वरूपाचें स्मरण झालें असतां अविद्यारहित पुरुष स्वत. तें ब्रह्मच होतो. त्याचें अविद्याप्रयुक्त अब्रह्मत्व निवृत्त होतें. या सूत्रभूत वाक्याच्या अर्थाविषयीं सायणाचार्यादिकांनीं विस्तृत विचार केलेला आहे. पण त्याचा संग्रह आह्मी पुढील रत्नांत करूं. )

आतां त्या सूत्राचें जणुं काय संक्षिप्त व्याख्यानच अशी एक ऋचा श्रुति येथें उदाहरणार्थ देते—

तदेषाऽभ्युक्ता । सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । यो वेद
निहितं गुहायां परमे व्योमन् । सोऽश्नुते सर्वा-
न्कामान्त्सह । ब्रह्मणा विपश्चितेति ॥

अर्थ–' तत् ' त्या पूर्व सूत्रोक्त अर्थाविषयीं ( ह्म० त्याचा अभिप्राय कळावा ह्मणून ) 'एषा–' ही पुढचीच ऋचा 'अभ्युक्ता–' सर्व प्रकारें–सर्वार्थ प्रकाशक या रूपानें–वेदपुरुषानें सांगितली आहे. वरील सूत्राचा सर्व अभिप्राय या ऋचेंत अगदीं स्पष्ट केला आहे. ) 'ब्रह्म विद् ' असें ह्मणताच ' ब्रह्म कशा प्रकारचें ' अशी जिज्ञासा उत्पन्न होते. यास्तव ' सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म–' या चार पदानीं ब्रह्माचें स्वरूप सांगितलें आहे. त्यांतील शेवटचें ब्रह्म हें पद मुख्य असून सत्यादि तीन पदें अब्रह्मापासून ब्रह्माची व्यावृत्ति करविणारीं आहेत. सत्य ह्म० अव्यभिचरितरूप, अनृतविलक्षण. ज्या वस्तूचा ज्या रूपानें निश्चय केला जातो त्याचें तें रूप जर कधींही बदलें नाहीं तर त्याला सत्य ह्मणतात. जशी भासलेल्या सर्पाचें अधिष्ठान-रज्जु. ज्याच्या निश्चित स्वरूपात बदल होतो तें अनृत. जसा भासलेला सर्प. सर्व जगाचें अधिष्ठानभूत ब्रह्म मुक्तिसमयींही असत् होत नाहीं. यास्तव त्याला ' सत्य ' ह्मणतात. पण करणादिकाचा निरोध झाला असतां जगाचें भान होत नाहीं; ह्मणून तें असत्, मिथ्या आहे. 'ब्रह्म जरी सत्य असलें तरी रज्ज्वादि इतर अधिष्ठानाप्रमाणें जड असेल, ' असें कोणास वाटूं नये ह्मणून त्याला ' ज्ञानं ' असें विशेषण दिलें आहे. व्यावहारिक सत्य पदार्थ जड असतात. तें पारमार्थिक सत्य जड नसतें, तर चित्-ज्ञान असतें. तथापि तें घटज्ञानाप्रमाणें परिच्छिन्न असेल, असें कोणी समजेल ह्मणून त्याला ' अनन्तं ' असें ह्मटलें आहे. जिच्याकडून घट व्यक्त केला जातो त्या घट व चित् याचा संबंध करविणाऱ्या अन्तःकरणाच्या वृत्तीला व्यवहारात ज्ञान ह्मणतात.

पण तो ज्ञानशब्दाचा अर्थ भौतिक आहे. त्यामुळें तें भौतिक ज्ञान परिछिन्न असणें साहजिकच आहे. पण येथें साक्षात् स्फुरणालाच ज्ञान म्हटलें आहे. तें भौतिक नाहीं. म्हणूनच 'अनन्त–' अपरिच्छिन्न आहे. अन्त म्ह० परिच्छेद तो ज्याला नाहीं तें अपरिच्छिन्न. तत्त्वतः निर्विशेष ब्रह्म. येथें सत्य-ज्ञानादि वाक्यानें अखंड व एकरस ब्रह्म सुचविलें आहे.

याप्रमाणें 'ब्रह्मविदाप्नोति परं' या सूत्राच्या व्याख्यानरूप ऋचेच्या या पहिल्या पादानें ब्रह्मशब्दाचा अर्थ सांगून आता '**यो वेद०**' इत्यादि अवशिष्ट तीन पादांनीं श्रुति वेदन व परप्राप्ति या सूत्रस्थ पदाचें व्याख्यान, करते. '**यः पुमान्–**' जो पुरुष '**गुहायां परमे व्योमन् ( तत् ) निहितं वेद–**' अन्नमयादि पंच कोशरूप गुहेंतील (किंवा बुद्धींतील) परम आकाशांत म्ह० पंचकोशाच्या उपादान कारणरूप अव्याकृतांत[1] तें ब्रह्म आहे, असें जाणतो ( तो व्यापतो. तो त्या ब्रह्माशीं तादात्म्य पावतो. ) अथवा '**सः विपश्चिता ब्रह्मणा सर्वान् कामान् सह अश्नुते–**' तो स्वप्रकाश ज्ञानरूप ब्रह्मतादात्म्यानें सर्व काम्य विषयास एकाच वेळीं ( क्रमावाचून ) भोगतो. ( सर्वज्ञ ब्रह्मरूपानें सर्व भोगास एकाच वेळीं अनुभवितो अज्ञानी स्वकर्मफलभूत अनेक शरीरें क्रमानें घेऊन चक्षु-श्रोत्रादि करणांच्या साह्यानें सोपाधिक जीवरूपानें प्रत्येक भोगाचा अनुभव घेतो. पण ज्ञानी ब्रह्मरूपानें एकाच वेळीं सर्वांचा अनुभव घेतो. )

याप्रमाणें ब्रह्माचें 'सत्य, ज्ञान व अनन्त' हें स्वरूपलक्षण सांगून आता तटस्थ लक्षण सांगण्याची इच्छा करणारी श्रुति वरील सर्व ब्रह्मवल्लीच्या संक्षिप्त अर्थाचा विस्तार करते पण आता अगोदर ब्रह्माचें अनन्तत्व सिद्ध करण्यासाठीं जगाची उत्पत्ति कशी झाली तें सांगते. तत्प-

---

१ 'शरीरद्वयकारणमात्माज्ञानं साभासमव्याकृतं–' म्ह० स्थूल व सूक्ष्म या दोन शरीरांचें कारण, अशा चित्प्रतिबिंबयुक्त आत्म्याच्या अज्ञानाला अव्याकृत म्हणतात.

दार्थ ईश व त्वंपदार्थ जीव याचें ऐक्य मानून आत्म्यापासूनच सृष्टि झाली असें ती येथें सांगत आहे –

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः ।
आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः
पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नम् ।
अन्नात्पुरुषः ॥

अर्थ–' **तस्मात्–**' पहिल्या सूत्र वाक्यात ' ब्रह्म ' व ' पर ' अशा दोन शब्दांनीं ज्याचा निर्देश केला आहे ती वस्तु येथील ' तत् ' या परोक्षवाची शब्दाचा अर्थ आहे अर्थात् **तस्मात्** ह्मणजे त्या पूर्व–सूत्रोक्त ब्रह्मापासून ' **वै–**' निश्चय या अर्थी ' **एतस्मात्–**' ' सत्य ज्ञान०' इत्यादि ऋचेंतील सत्यादिशब्दांनी व ' निहित ' या शब्दानें सांगितलेलें ब्रह्म समीप वाचक ' एतत् ' शब्दाचा अर्थ आहे. अर्थात् सूत्रोक्त ब्रह्म व गुहास्थित प्रत्यक्ष ब्रह्म यापासूनच ( ' तस्मात् ' व ' एतस्मात् ' असे दोन शब्द योजून या वाक्यानें सूत्र व ऋचा यांतील तत्त्व एकच आहे, असें सुचविलें आहे **शंकरानन्द** ह्मणतात– त्या सत्यज्ञानानन्तलक्षण, आत्मरूपानें प्रसिद्ध व या स्वप्रकाश बुद्धि साक्षी ) ' **आत्मनः–**' आत्म्यापासून ( ' अहं–मी ' या शब्दाच्या व अनुभवाच्या आधारापासून ) ' **आकाशः संभूतः–**' शब्दगुणाचा आश्रय जो अवकाश तो उत्पन्न झाला ( उत्पन्न होणारें आकाश हा उत्पत्तिक्रियेचा कर्ता व आत्मा त्याची प्रकृति–उपादान, कारण–असें सुचविण्यासाठीं ' आत्मन ' हा पंचमी योजिली आहे मातीच्या गोळ्यापासून घट झाला, असें व्यवहारांतही ह्मणतात इतर श्रुतींत परमात्मा, मायी, महेश्वर असें ज्याला ह्मटलें आहे त्याचाच येथें ' आत्मन ' या पञ्चम्यन्तपदानें निर्देश केला आहे. वास्तव या मायी परमात्म्यापासून आकाश झालें परमात्माच आकाशादि भूत–

भौतिक पदार्थांच्या रूपानें भासतो, असा याचा इत्यर्थ ) ' आकाशात् वायुः-' आकाशापासून ह्मणजे आकाशोपहित-आकाश ही ज्याची उपाधि आहे अशा-ब्रह्मापासून ( मायाविशिष्ट ब्रह्मापासून ) वायु झाला. ( माया व ब्रह्म हीं दोन्ही सर्व कार्यांचीं साधारण कारणें आहेत, आणि त्याची उपाधि, असें आकाश वायूचें असाधारण कारण आहे. त्यामुळें वायूला ब्रह्म व माया यापेक्षा आकाश समीप आहे. ह्मणून आकाशापासून वायु झाला, असें येथें ह्मटलें आहे. वायूमध्यें शब्द व स्पर्श असे दोन गुण आढळतात त्यांतील पहिला आकाशाचा असून दुसरा स्वतः वायूचा आहे. वायूचा स्पर्श शीतही नाहीं व उष्णही नाहीं. ह्मणूनच थंडीच्या दिवसात तो थंड व उन्हाळ्यात ऊन लागतो. आकाशादि सर्व कार्यांमध्यें ब्रह्माचा सत्व हा धर्म व मायेचा मिथ्यात्व हा धर्म अनुवृत्त होतो. ह्मणूनच प्रत्येक कार्य ' आहे, आहे,' असें भासतें. पण ' आहे, ' हा ब्रह्माचा सत्वधर्म विवेकानें त्या त्या कार्यापासून पृथक् करून पाहिलें असता, त्याच्यामध्यें मायेचें मिथ्यात्व अवशिष्ट राहतें. ह्मणूनच भाष्यकारानीं शारीरक भाष्यात-' सत्यानृते मिथूनीकृत्य ' ह्म० सत्य व अनृत याना एकत्र करून सर्व कार्यांचे ' मी ' व ' माझें ' अशा प्रकारचे अनुभव येतात—असें ह्मटलें आहे. ) ' वायोः अग्निः-' पूर्वोक्त ब्रह्मोपहित वायूपासून अग्नि झाला ( अवकाश देणें, हें आकाशाचें कार्य, वाहणें, हें वायूचें कार्य व प्रकाशन, हें अग्नीचें कार्य आहे. ) भास्वररूप हा अग्नीचा गुण आहे. ( भास्वर ह्मणजे प्रकाशमान ) ' अग्नेः आपः-' पूर्वोक्त अग्नीपासून जलतत्त्व झालें मधुररस हा त्याचा विशेष गुण आहे ' अद्भ्यः पृथिवी-' जलापासून पृथ्वी झाली गंध हा तिचा विशेष गुण आहे. ( वगैरे उत्तरोत्तर कार्यांमध्यें पूर्व पूर्व कारणाचे गुण अनुवृत्त होतात. त्यामुळें आकाशाचा शब्द जसा वायूमध्यें येतो त्याचप्रमाणें वायूचे शब्द व स्पर्श हे गुण अग्नीत येतात. पेटणाऱ्या अग्नीमध्यें 'भुक्भुक्' असा ध्वनि

व उष्ण स्पर्श अनुभवास येतात. ते कारणधर्म आहेत. ते दोन कारणगुण व भास्वररूप हा त्याचा स्वाभाविक गुण, मिळून तीन गुण अग्नींत आढळतात. जलांत खळखळ शब्द, शीत स्पर्श व शुभ्र रूप हे तीन आकाशादि तीन कारणाचे गुण असून मधुररस, या स्वाभाविक गुणामुळें तें चार गुणांनीं युक्त झालें आहे. पृथ्वींत 'कडकड् खट् खट्' इत्यादि शब्द, कठिण स्पर्श; शुभ्र, लाल इत्यादि रूप; मधुर, अम्ल इत्यादि रस हे चार कारणगुण व गंध हा स्वाभाविक गुण, मिळून पृथ्वी पंचगुणा झाली आहे. या सर्वांतील 'आहे आहे,' अशा रूपानें भासणारें सत्व हा आत्मधर्म आहे. आकाशादि प्रत्येकाचें–अवकाश देणें, वाहणें, प्रकाशणें इत्यादि क्रियांना योग्य असें जें परस्पर विलक्षण व त्यामुळेंच आश्चर्यकारक स्वरूप तोच मायाधर्म आहे. -जलांतील द्रवत्व व पृथ्वींतील काठिन्य हेही असाधारण धर्म असल्यामुळें आश्चर्यकारक आहेत. ह्मणून त्यांतील तेच मायाधर्म आहेत. ) 'पृथिव्याः ओषधयः–' पृथ्वीपासून ओषधी होतात. ( फळें पिकताच जीं झाडें मरतात त्यांना ओषधी ह्मणतात. आपलीं सर्व शेतें, हा ओषधींच आहेत. त्यामुळें त्यांचीं कणसें पिकताच तीं पडतात. ) 'ओषधीभ्योऽन्नं–' ओषधींपासून अन्न ( खावयाचें धान्यादिक ) होतें. 'अन्नात् पुरुषः– ' अन्नापासून हस्तपादादियुक्त पुरुष–स्थूल देह–होतो.

आतां सत्य, ज्ञान व अनन्त ब्रह्म–आत्मा या सर्व कोशमय कार्यांहून विलक्षण व ह्मणूनच पृथक् आहे, असें सांगण्याची इच्छा करणारा वेद प्रथम ते पांच कोशच सांगतो—

**स वा एष पुरुषोऽन्नरसमयः। तस्येदमेव शिरः। अयं दक्षिणः पक्षः। अयमुत्तरः पक्षः। अयमात्मा। इदं पुच्छं प्रतिष्ठा ॥**

अर्थ–' सः ' पूर्वोक्त हस्तपादादिमान् व ' वै ' प्रसिद्ध असलेला ' एषः–' हा प्रत्यक्ष ' पुरुष–' स्थूल देह, ' अन्नरसमयः–'

अन्नरसमय आहे, खाल्लेल्या अन्नाच्या रसमय-सारमय-आहे. आईबापानीं खाल्लेल्या अन्नाचा रसादिक्रमानें शोणित व शुक्ररूप परिणाम होऊन त्यापासून तो देह होतो म्हणून त्याला अन्नरसमय-अन्नाच्या सारभूत रसाचा विकार-असें म्हटलें आहे. ( शाखाचंद्रदर्शनन्यायानें ब्रह्मतत्त्वाचा बोध करावयासाठीं या अन्नमय कोशाचा उपन्यास केला आहे. आता मुमुक्षूनें त्या कोशाची पक्ष्याच्या आकारानें उपासना करावी, म्हणून श्रुति त्याचे पाच अवयव सागते.) 'तस्य-' त्या पक्ष्याकार पुरुषाचें-अन्नमयकोशाचें-' इदं एव-' हें मानेवरील प्रत्यक्ष दिसणारें मस्तक, हेंच शिर आहे (म्हणजे येथें खऱ्या शिराच शिर समजावें, असें म्हटलेलें असल्यामुळें येथे कोणत्याही प्रकारचा उपचार नाहीं.) ' अयं दक्षिण पक्षः-' हा उजवा हातच त्याचा उजवीकडील पंख आहे, ' अयं उत्तरः पक्षः-' हा डावा हात, हाच डावीकडील पख आहे. ' अयं-' गळ्यापासून कंबरेपर्यंतचा प्रदेश हाच ' आत्मा-' अवयवाचा आत्मा, मध्यदेश, जीवाचें राहण्याचें स्थान. ' इदं पुच्छं प्रतिष्ठा-' कंबरेच्या खालचा पादद्वयात्मक भाग हेंच पक्ष्याकार शरीराचें पुच्छ व प्रतिष्ठा-शरीराधार-आहे. ( मनुष्याच्या शरीरात कंबरेच्या वरील भागाचा खालील भाग आधार आहे, असें प्रत्यक्ष दिसतें. पुच्छयुक्त पशूच्या शरीरात माशा, डास इत्यादिकाचें निवारण करून पुच्छ त्याचा आधार होतें, असें दिसतें व पक्ष्यादिकाच्या शरीरातील पुच्छ प्रत्यक्ष शरीराधार जरी नसलें तरी उडताना वगैरे तें त्यांच्या गतीला सुकाणूप्रमाणें साह्य करीत असल्यामुळें त्याचा आधार आहे, असें समजावें. पुच्छ आधार आहे, हें कथन उपासनेकरिता आहे )

याप्रमाणें अन्नमय कोशाचा-उपासना करण्यास योग्य असलेला-आकार सांगितला. ब्राह्मणवाक्यानें सांगितलेल्या या कोशाचें व उपा-

सत्वेचें त्याच अर्थी असलेल्या दुसऱ्या मंत्राच्या आधारानें दार्ढ्य करण्यासाठीं श्रुति एका मंत्राचा उल्लेख करिते.—

तदप्येष श्लोको भवति ॥

( इति द्वितीये ब्रह्मवल्ल्यध्याये प्रथमोनुवाकः )

अर्थ-' तद् अपि-' त्या उक्त अर्थाविषयीं-अन्नमय कोशाविषयींही ' एषः श्लोकः भवति-' हा श्लोक आहे. श्लोक म्ह० पादबद्ध मंत्र. ( पूर्वीच्या सूत्रोक्त अर्थाविषयीं जशी ' सत्यं ज्ञानं० ' इत्यादि ऋचा होती तशीच या अन्नमयकोशाविषयींही हा असा मंत्र आहे, असें सुचविण्यासाठीं येथें ' अपि ' असा शब्द योजला आहे. एका प्रमाणानें झालेलें ज्ञान दुसऱ्या प्रमाणानें बाधित न होणें याला 'संवाद' म्हणतात व बाधित होणें, याला ' विसंवाद ' म्हणतात. येथील ब्राह्मणोक्त अर्थाच्या संवादाकरितां मंत्राचें उदाहरण दिलें आहे. वेदभाष्यकार सायणाचार्यांच्या मतीं या ब्रह्मवल्लीचे दोनच अनुवाक आहेत. एक वरील शांतिरूप व दुसरा ' ब्रह्मविदाप्नोति परं ' येथून ' इत्युपनिषद् ' येथवर. म्हणजे हा सर्व प्रपाठक हाच दुसरा अनुवाक. पण वैदिक श्रोत्रिय, श्रीशंकराचार्य व शंकरानन्दादि यांच्या मतीं येथें पहिला अनुवाक संपून पुढेही ठिकठिकाणीं दुसरे अनुवाक संपलेले आहेत. ते या अध्यायाचे नऊ अनुवाक मानतात. आम्हीं त्यांच्याच अनुरोधानें येथें अनुवाक संपविले आहेत. ) १.

---

अन्नाद्वै प्रजाः प्रजायन्ते । याः काश्च पृथिवीं श्रिताः । अथो अन्नेनैव जीवन्ति । अथैनदपियन्त्यन्ततः । अन्नं हि भूतानां ज्येष्ठम् । तस्मात्सर्वौषधमुच्यते । सर्वं वै तेऽन्नमाप्नुवन्ति । येऽन्नं ब्रह्मोपासते । अन्नं हि भूतानां ज्येष्ठम् । तस्मात्सर्वौ-

षधमुच्यते । अन्नाद्भूतानि जायन्ते । जातान्यन्नेन वर्धन्ते । अद्यतेऽत्ति च भूतानि । तस्मादन्नं तदुच्यत इति ॥

अर्थ—' याः काः च पृथिवीं श्रिताः प्रजाः (ताः सर्वाः)–' ज्या कांहीं पृथ्वीचा आश्रय करून असलेल्या प्रजा दिसत आहेत त्या सर्व ' अन्नात् वै–' त्या प्रसिद्ध अन्नापासून ' प्रजायन्ते–' उत्पन्न होतात. ( येथें प्रजा म्ह० जरायुजादि चतुर्विध देह, असें समजावें. कारण ब्रह्मरूप जीव नित्य व अज असल्यामुळें उत्पन्न होत नाहीं. शिवाय उत्पत्ति–प्रादुर्भाव व नाश–तिरोभाव विकारी–देहाचाच संभवतो. ) ' अथो अन्नेन एव जीवन्ति–' त्याचप्रमाणें त्या प्रजा अन्नाच्या योगानेंच प्राणधारण करितात. ( ही गोष्ट लोकांत प्रसिद्ध आहे. ) ' अथ अन्ततः एनत् अपियन्ति–' जीवनानंतर आयुष्याच्या शेवटीं त्या प्रजा या अन्नांत प्रवेश करितात. अन्नांत लीन होतात. ( अग्नींत जळून राख होणें, मातींत मिळून जाणें, हिंस्र पशूंच्या उदरांत जाऊन त्यांच्या विष्ठारूपानें पृथ्वींत मिळणें किंवा जलचर प्राण्यांचें भक्ष्य होऊन जलमय होणें हीच देहरूप प्रजेची अन्त्य गति आहे. यास्तव–अग्नि, भूमि, मत्स्य, कीट इत्यादिरूप अन्न येथें घ्यावें. ) ' हि अन्नं भूतानां ज्येष्ठं–' कारण अन्न जरायुजादि भूतांचें ज्येष्ठ–कारण आहे. ( कारण कार्याच्या पूर्वी असावें लागतें. यास्तव तें त्याहून कालतः मोठें असतें. अन्न सर्व देहांचें वट दाखविल्याप्रमाणें कारण आहे. म्हणून तें त्या सर्वांहून ज्येष्ठ–कारण आहे.) ' तस्मात् सर्वौषधं उच्यते–' त्यामुळेंच तें अन्न सर्व प्रजेचें औषध–क्षुधारूपी रोगाचें निवारण करणारें–असें म्हटलें जातें. ( क्षुद्रोगाचें निवारण झालें असतां तें जीवनरूप स्थितीचें निमित्त होतें. यास्तव तें स्थितीचें निमित्त आहे, ही गोष्ट सिद्ध होण्यासाठीं त्यानें क्षुधेचें निवा-

रकाशसणें योग्यच आहे. याप्रमाणें अन्न हें देहाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचें कारण आहे, असें प्रतिपादन करून अन्नमय कोशाचें सविस्तर वर्णन केलें. आतां ' सर्वं वै० ' इत्यादि पुढील मंत्रभागानें फलासह त्याच्या उपासनेचें विधान करितात— ) **' ये अन्नं ब्रह्म उपासते ते सर्वं अन्नं आप्नुवन्ति–'** जे उपासक अन्न ब्रह्म आहे, अशी उपासना करितात (अन्न या प्रतीकाच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करितात—ब्रह्मदृष्टीनें संस्कृत केलेलें अन्नच देहाकार परिणाम पावून शिरःप्रभृति-पुच्छपर्यन्त अवयवांनीं युक्त झालें आहे, असें ध्यान करितात ) ते सर्व (भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य अशा चार प्रकारच्या) अन्नास प्राप्त होतात. (पूर्वीं अन्न सर्व भूतांचें कारण आहे, असें सांगण्यासाठीं 'अन्नं.... ज्येष्ठं 'इत्यादि म्हटलें होतें. आतां ब्रह्मच्या तादात्म्यानें उपासनेच्या उपपत्यर्थ म्हणजे अन्नाची ब्रह्मतादात्म्यानें उपासना करणें युक्त आहे, असें सुचविण्यासाठीं, अन्नाचें ब्रह्माशीं साधर्म्य दाखविण्यासाठीं वेद पुनरपि त्याचाच पाठ करतो–) अन्न भूतांचें कारण आहे ( भूतांहून अतिशय मोठें आहे ). म्हणून त्याला सर्व संसारव्याधींचें औषध म्हणतात. ( तें संसारपीडेचें निवर्तक आहे. ज्याप्रमाणें ब्रह्म सर्व भूतांहून ज्येष्ठ आहे, असें ज्ञान झालें असतां तें भवरोगाचें औषध-निवर्तक-होतें त्याप्रमाणें अन्नही प्राणिदेहरूप भूतांचें ज्येष्ठ असल्यामुळें त्यालाही सर्वौषध म्हणतात. शब्दशः अर्थ वर सांगितल्याप्रमाणेंच जाणावा. तसेंच ज्याप्रमाणें ब्रह्म जगाच्या उत्पत्त्यादिकाचें कारण आहे त्याप्रमाणेंच ' अन्नात् भूतानि जायन्ते–' अन्नापासून अंडजादि-भूतें उत्पन्न होतात. 'जातानि अन्नेन वर्धन्ते–' उत्पन्न झालेलीं तीं अन्नानेंच वाढतात. ( यास्तव तें उपास्य अन्न प्रशस्त आहे. अन्नाच्या व्युत्पत्तीकडे जरी दृष्टि दिली तरी तें उपास्य आहे असें ज्ञान होतें, असें आतां श्रुति सांगते–) ' अद्यते, भूतानि अत्ति च–' सर्व प्राण्यांकडून जीवनाकरितां जें भक्षण केलें जातें (तें अन्न) अथवा जें सर्व भूतांना खातें, सर्व प्राणिदेहांचा आपल्या स्वरूपांत

उपसंहार करणें ( तें अन्न ). 'तस्मात् तत् अन्नं उच्यते-' ह्मणून तें अन्न ह्मटलें जातें. 'इति' हा शब्द शेवटीं मंत्राची समाप्ति सुचविण्यासाठीं योजला आहे. शंकरानन्द ह्मणतात—प्रथम कोशाचें व्याख्यान संपलें, हें सुचविण्यासाठीं येथें इति-शब्द घातला आहे. या मंत्राचे पाद चवदा आहेत. इतक्या पादांचा लौकिक छंद जरी आढळत नसला तरी तो एक वैदिक अतिछंद आहे, असें समजावें. )

असो; याप्रमाणें मनुष्याच्या स्वाभाविक विषयोन्मुखतेची निवृत्ति करण्यासाठीं अन्नमयकोशाचा उपदेश करून त्याच प्रसंगानें त्याची उपासना व फळ सांगितलें. आता त्या उपासनेनें विषयांपासून निवृत्त झालेल्या पुरुषाला अन्नमय कोशाच्याही आंत नेण्याकरितां, त्याचें लक्ष स्थूल देहांतील सूक्ष्म शक्तीकडे लावण्याकरितां वेद प्राणमय कोशाचा उपदेश करितो.—

झालेली असते. त्यामुळें केवळ प्राणमय-आत्म्याच्या उपदेशानेंच पुरुष देहाच्या ठिकाणची आत्मबुद्धि सोडण्यास समर्थ होत नाहीं. यास्तव त्याच्यासाठीं दुसऱ्या उपासनेचें विधान करण्याच्या उद्देशानें वेद उपास्याचें स्वरूप सांगतो—

स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् ।
अन्वयं पुरुषविधः । तस्य प्राण एव शिरः ।
व्यानो दक्षिणः पक्षः । अपान उत्तरः पक्षः ।
आकाश आत्मा । पृथ्वी पुच्छं प्रतिष्ठा ॥

अर्थ–' सः वै एषः पुरुषविधः एव–' देहाच्या आंतील ह्मणून सांगितलेला तो हा प्रसिद्ध प्राणमय पुरुषाकारच आहे. ( ह्म० मुशींत ओतलेला तांब्याचा पातळ रस जसा मुशींत खोदलेल्या आकाराचाच होतो, अन्याकार होत नाहीं त्याप्रमाणें देहांतील प्राणमय देहाकारच आहे. पण असें ह्मटल्यामुळें ते दोन्ही स्वतंत्र आहेत, असें कोणाला वाटेल ह्मणून सांगतात– ) ' तस्य पुरुषविधतां अनु अयं पुरुषविधः–' त्या पूर्व स्थूलदेहाच्या पुरुषाकारतेच्या मागून–त्याच्या अनुसार–हा प्राणमय पुरुषाकार झालेला आहे. ( ह्मणजे हा प्राणमय स्वतंत्र नाहीं. तर पुरुषासारखा आहे. प्राणमय कोशाला स्वतं.चे स्वाभाविक शिर.प्रभृति अवयव जरी नसले तरी त्याच्या ठिकाणीं त्याची कल्पना करून पुरुषाकार प्राणमयाचीच उपासना करावी. तशी कल्पना करिता येणें शक्य नाहीं, ह्मणून ह्मणाल तर तेंही युक्त नव्हे. कारण पूर्वोक्त देहामध्यें ओतप्रोत भरून राहिलेल्या त्याला वरील ताम्ररसाच्या दृष्टान्तानें तदाकारता येऊ शकते. ) ' तस्य प्राणः एव शिरः– ' त्या प्राणमय कोशाचें हृदयापासून वर–मुख व नासिका, यांतून–संचार करणारी प्राणवृत्ति हेंच शिर-मस्तक-आहे, असें चिंतन करावें. 'व्यानः दक्षिणः पक्षः–' सर्व नाड्यांतून संचार करणारी व्यान या नांवाची वायुवृत्ति हाच त्या प्राणमय पक्ष्याचा उजवीकडील पंख आहे. 'अपान उत्तरः

पक्षः–' हृदयाच्या खालीं संचार करणारी अपान नावाची वायुवृत्ति हाच त्याचा डावीकडील पख आहे ( त्या दोन वृत्ती हेच प्राणमय पक्ष्याचे दोन्हीकडील दोन पख आहेत, असें चिंतन करावें.) 'आकाशः आत्मा–' उदरस्थ अवकाश हाच प्राणमय पक्ष्याचा आत्मा–मध्यप्रदेश–आहे. ( उदरस्थ अवकाशावरून त्यातील समान वायु लक्षित होतो यास्तव समान हाच त्याचा आत्मा आहे, असें समजावें. ) ' पृथिवी पुच्छं प्रतिष्ठा–' पृथ्वी ( ह्या० पृथ्वीशब्दावरून उपलक्षित होणारा ऊर्ध्वगामी उदान ) हेंच त्या प्राणमय पक्ष्याचं पुच्छ व त्यामुळेंच आधार आहे. ( आकाश व पृथ्वी या शब्दावरून लक्षणेनें समान व उदान, या वायूचें ग्रहण न केल्यास आरंभिलेल्या प्राणमयकोशाच्या प्रतिपादनास बाध येईल यास्तव लक्षणेनें असाच अर्थ करावा ज्याप्रमाणें पृथ्वी प्राण्याच्या स्थितीचें निमित्त होते त्याप्रमाणें उदान वायु प्राणादिकांची देहात स्थिति होण्यास कारण होतो. कारण तो आपल्या वृत्तीचा संकोच करून जोंवर देहात असतो तोंवरच प्राण, अपान इत्यादि सर्व वायुवृत्ती देहात राहू शकतात. ह्मणूनच तो प्राणमयाची प्रतिष्ठा–आधार–आहे. आता अन्नमयाप्रमाणें या प्राणमयाविषयींही श्लोकाचें प्रमाण देतात —)

तदप्येष श्लोको भवति ।

( इति ब्रह्मवल्ल्यध्याये द्वितीयोऽनुवाकः )

अर्थ–त्याविषयींही हा श्लोक–मंत्र–आहे. २

---

प्राणं देवा अनुप्राणन्ति । मनुष्याः पशवश्च ये ।
प्राणो हि भूतानामायुः । तस्मात्सर्वायुषमुच्यते ।
सर्वमेव त आयुर्यन्ति । ये प्राणं ब्रह्मोपासते ।
प्राणो हि भूतानामायुः । तस्मात्सर्वायुषमुच्यत इति ॥

अर्थ—' ये देवाः मनुष्याः च पशवः ते प्राणं अनु प्राणन्ति–' जे सात्त्विक यागादिक व अग्न्यादिक देव, राजस ब्राह्मण-क्षत्रियादि मानव व तामस पशू ते सर्व आपापल्या देहांतील प्राण-वायूच्या मागून ह्म० तो चेष्टा करूं लागला असतां त्याच्या बळावर चेष्टा करतात. ( प्राणच देहाकडून हालचाल करवितो. ) ' हि प्राणः भूतानां आयुः–' कारण मुख्य प्राणच सर्व प्राणिशरीराच्या जीवनाचें कारण आहे. ( यावरून देहच आत्मा व इंद्रियेंच आत्मा, असें ह्मणणाऱ्या वादांचें निराकरण झालें. ) ' तस्मात् सर्वायुषं उच्यते–' प्राण सर्व भूतांचें आयुष्य असल्यामुळें त्याला सर्वायुष ह्मणतात. ' ये प्राणं ब्रह्म उपासते ते सर्व एव आयुः यन्ति–' प्राणमय कोशाच्या केवळ ज्ञानानें ज्याची अन्नमय कोशच आत्मा आहे, ही वासना निवृत्त होत नसेल त्यांनीं त्या वासनानिवृत्तीकरितां प्राणोपाधिक ब्रह्माची उपासना करावी. कारण जे ती उपासना करितात ते सर्वेच आयुष्यास प्राप्त होतात. ( ह्म० प्राणोपाधिक ब्रह्मोपासनेमुळेंच या जन्मीं अपमृत्यूचा परिहार होऊन सर्व आयुष्यास प्राप्त होतात. पूर्णायु होतात, असा याचा भावार्थ. वरच्या प्रमाणेंच येथें प्राणोपासना व तिचें फळ सांगितलें आहे. पुरुषाचें आयुष्य शंभर वर्षे असतें. आध्यात्मिक–शरीरस्थ–प्राणोपाधिक ब्रह्माचें उपासन केल्यास याच जन्मीं पूर्ण आयुष्य हें फळ मिळतें; आणि आधिदैविक हिरण्यगर्भाख्य प्राणाचें उपासन केल्यास उपासक जन्मान्तरीं हिरण्यगर्भरूपास प्राप्त होऊन महाप्रलयापर्यंत सर्व आयुष्याचा अनुभव घेतात. कोशाच्या प्रशंसेकरितां पूर्वी उच्चारलेल्या ' प्राणो हि भूतानां ' इत्यादि वाक्याचा उपासनेच्या प्रशंसेकरितां पुनरपि उच्चार केला आहे. त्याचा शब्दार्थ वर सांगितल्याप्रमाणेंच आहे. इति शब्दाचा भावार्थही वर सांगितल्याप्रमाणेंच समजावा. )

आता प्राणमयकोशाच्या उपदेशाचें तात्पर्य सांगतात—

**तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य ॥**

अर्थ–' यः–' जो प्राणमय आता सांगितला तो ' एषः एव–' हाच ' तस्य पूर्वस्य–' त्या पूर्वोक्त अन्नमयाचा ' शारीरः आत्मा–' शरीरस्थ आत्मा आहे. उपासनेच्या योगानें प्राणमयच आत्मा आहे, असा दृढनिश्चय झाला ह्मणजे अन्नमय आत्मा आहे, हा भ्रम निवृत्त होतो, आणि अन्नमय शरीर असून प्राणमय हा त्याचा शरीरी आहे, असा निश्चय होतो. याप्रमाणें अन्नमयापासून निवृत्त झालेल्या अधिकारी उपासकाला प्राणमयाच्याही आंत प्रवेश करविण्याकरितां वेद मनोमयकोशाचा उपदेश करतो—

**तस्माद्वा एतस्मात्प्राणमयात् । अन्योऽन्तर आत्मा मनोमयः । तेनैष पूर्णः ॥**

अर्थ–या या प्रसिद्ध प्राणमयाहून पृथक् व त्यांत असणारा मनोमय आत्मा आहे. त्याच्या योगानें हा पूर्ण आहे (ब्रह्माच्या आश्रयानें राहिलेली व जगदुपादानभूत अशी माया त्रिगुणात्मक आहे. तिच्यांतील तमोगुणाचा भाग अन्नमयकोशाचें कारण असल्यामुळें त्यांत जाड्यच पुष्कळ आढळतें त्यांत क्रियाशक्ति अथवा ज्ञानशक्ति मुळींच उपलब्ध होत नाहीं मायेंतील रजोगुणाचा भाग प्राणमयाचें कारण आहे. त्यामुळें प्राणमयकोशामध्यें क्रियाशक्ति उपलब्ध होते मायेंतील सत्त्वगुणाचा भाग मनोमयादि तीन कोशाचें कारण आहे त्यामुळेंच त्यांत ज्ञानशक्ति उपलब्ध होते तमोगुणमिश्रित सत्त्व गुण हें मनोमयाचें कारण आहे. त्यामुळें मनोमयामध्यें राग–द्वेषादिक तामस धर्म उपलब्ध होतात रजोमिश्रित सत्त्वगुण विज्ञानमय कोशाचें कारण आहे. त्यामुळें त्यांत यज्ञादि वैदिक क्रिया व कृष्यादि लौकिक क्रिया यांचें कर्तृत्व आढळतें शुद्ध सत्त्वगुण हें आनन्दमयाचें कारण आहे. त्या-

मुळें त्या आनंदमयात प्रिय, मोद व प्रमोद या नावाचें विशेष प्रकारचें सुख आढळतें. ज्ञानशक्ति स्वरूपत. जरी एकरूप असली तरी तिचें करणशक्ति, कर्तृशक्ति व भोगशक्ति असे अवान्तर भेद झाले आहेत. त्यातील करणशक्तीपासून मन झालें आहे त्याचा विकार असा—जो काम, संकल्प, संशय, श्रद्धा, अश्रद्धा, धृति ( संतोष ), अधृति, लज्जा, भीति इत्यादि वृत्तींचा समूह तोच मनोमयकोश आहे. त्या आतील मनोमयकोशानें बाहेरील प्राणमयकोश पूर्ण आहे. क्रियाशक्तीप्रमाणेंच ज्ञानशक्तीचीही शरीरात नखशिखान्तव्याप्ति दिसते. अन्त.करणरूप मनावरून बाहेरील श्रोत्रादिक व वागादिक दहाही इंद्रियें उपलक्षित होतात. यास्तव सर्व ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें याचा मनोमय कोशात अन्तर्भाव होतो. मनोमयकोशात मन व कर्मेंद्रियें याचाच मात्र अंतर्भाव होतो, असें कित्येक ह्मणतात. )

असो, आता या सर्वेंद्रियसमष्टिरूप मनोमय कोशाचे ठिकाणींच आत्मत्वाचा आरोप करून त्याच्या उपासनेचें विधान करावयासाठीं श्रुति उपास्य कोशाचें स्वरूप दाखविते—

स वा एष पुरुषविध एव। तस्य पुरुषविधताम्। अन्वयं पुरुषविधः। तस्य यजुरेव शिरः। ऋग्दक्षिणः पक्षः। सामोत्तरः पक्ष.। आदेश आत्मा। अथर्वाङ्गिरस. पुच्छं प्रतिष्ठा। तदप्येष श्लोको भवति॥ (इति ब्रह्मवल्ल्यध्यायें तृतीयोऽनुवाक.)

अर्थ—तो हा मनोमय कोश पुरुषाकारच आहे. प्राणमय कोशाच्या पुरुषाकारतेस अनुसरून हा पुरुषाकार झाला आहे. यजुर्मंत्र किंवा यजुर्मंत्रविषयक वृत्ति हेंच त्या पक्ष्याकार मनोमयाचें शिर आहे. 'ऋग्—' मंत्रविषयींची वृत्ति हा उजवा पख, सामविषयक वृत्ति हा डावा पख, 'आदेश' ह्म० विधान करणाऱ्या ब्राह्मणवाक्या-

विषयींची वृत्ति हाच आत्मा–मध्यभाग आणि अथर्व व अंगिरस या नावाच्या ऋषींनीं पाहिलेल्या अथर्व वेदगत मंत्रांविषयींची वृत्ति हेंच पुच्छ, प्रतिष्ठा–आधार–आहे. पूर्वीप्रमाणेंच या मनोमयाविषयीं हा मंत्र आहे ३.

---

यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह ।
आनन्दं ब्रह्मणो विद्वान् । न बिभेति कदाचनेति ॥

अर्थ—'यत –' ज्या स्थूल सूक्ष्म जगाच्या कारणभूत ब्रह्मानंदा पासून ' वाचः- ' वाचक–शब्द किंवा वर सांगितलेल्या यजुष्, ऋक्, साम, आदेश व अथर्वांगिरस, एतद्रूप व दुसऱ्याही वाणी ' मनसा सह–' मनासहवर्तमान ' अप्राप्य ' प्राप्त न होता ( ब्रह्मानंदाला प्राप्त न होता ) ' निवर्तन्ते–' निवृत्त होतात त्या ' ब्रह्मणः आनंद विद्वान्–' ब्रह्मानंदाला साक्षात् जाणणारा ( सायणाचार्य ह्मणतात– त्या मनोमय–उपाधिविशिष्ट ब्रह्मानंदाची उपासना करणारा ) ' कदाचन–' कधींही ' न बिभेति–' भीत नाहीं. ' इति ' येथील इति-शब्दही पूर्वीप्रमाणेंच मंत्रसमाप्ति किंवा मनोमय कोशसमाप्ति सुच-विते, असें जाणावें. ( श्रीशंकरानंद ह्मणतात– आह्मी ब्रह्म सांगतों, असें ह्मणून प्रवृत्त झालेल्या वाग्वृत्ती ब्रह्माचे ठिकाणी संबंध, गुण, क्रिया, जाति व रूढी यांतील एकही शब्दप्रवृत्तीचें निमित्त नसल्यामुळें त्याला विषय न करितां आमचा विषय होणारें जें जें कांहीं आहे तें ब्रह्म नव्हे, एवढेंच वाटून राजगृहांतून भग्नमनोरथ होऊन परतणाऱ्या याचकाप्रमाणें परत फिरतात मनकल्पित इष्ट वस्तूची प्राप्ति झाली असतां वरती होत नाहीं, असा निश्चय झाला असतां, अशी दोन प्रकारें निवृत्ति संभवते. येथील वाणीची निवृत्ति दुसऱ्या प्रकारची आहे. पण वाणीचा विषय न होणारा जाई, चाफा इत्यादि पुष्पाचा सुगंध मनाचा विषय होतो. त्याप्रमाणें ब्रह्म वाणीचा विषय जरी न झालें तरी मनोविषय होईल, असें को-

णाला वाटूं नये ह्मणून ' मनसा सह ' असें ह्मटलें आहे **सायणाचार्य** ह्मणतात–ब्रह्मानन्दाची उपासना करणाऱ्या उपासकाचे ठिकाणीं रागद्वेषादिक संभवत नाहींत. कारण त्यांना नित्य उपासकाचे ठिकाणीं अवकाशच मिळत नाहीं त्यामुळें त्याला ऐहिक भीति नसते व उपासकाला क्रममुक्ति मिळत असल्यामुळें पारलौकिक भीतिही नसते. ह्मणून मंत्रांत ' **कदाचन** ' असें ह्मटलें आहे. आतां मन हा प्राणाचाच एक भाग आहे, असें कित्येक समजतात. त्या समजुतीचा निषेध करण्यासाठीं अथवा मनोमय कोशाच्या उपदेशाचें तात्पर्य सांगण्यासाठीं पुढील श्रुतिभाग आहे )

**तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य ।**

*अर्थ*—त्या प्राणमयाचा हा मनोमयच शारीर आत्मा आहे. ह्म० प्राणमय शरीर व मनोमय त्याचा स्वामी–शरीरी. ( या कथनानें प्राण आत्मा आहे, या समजुतीचें निवारण केलें. असो, या उपासनेच्या योगानें मनोमय कोशच आत्मा आहे, असा निश्चय होतो त्यानंतर उपासकाला त्याच्याही आंतील विज्ञानाची उपासना करावयास लावण्यासाठीं वेद विज्ञानमय कोशाचा उपदेश करतो–)

**तस्माद्वा एतस्मान्मनोमयात् । अन्योन्तर आत्मा विज्ञानमयः । तेनैष पूर्णः ॥**

*अर्थ*—मी इच्छितों, मी संकल्प करितों, इत्यादि अनुभवावरून ज्याचें ज्ञान होतें त्या या मनोमयाहून निराळा व त्याच्या आंत विज्ञानमय आत्मा आहे. त्या विज्ञानमयाकडून हा मनोमय नखशिखान्त व्यापलेला आहे. ( सत्त्वगुणाचें कार्य अशा ज्ञानशक्तींतील तमोगुणमिश्रित भाग जसा राग-द्वेषादि तामस धर्मयुक्त मन होतो त्याप्रमाणेंच रजोमिश्र भाग राजस कर्तृत्व-धर्मयुक्त विज्ञान होतो. विज्ञानमय ह्मणजे विज्ञानविकार. ज्ञानेंद्रियें व बुद्धिवृत्ति यांच्या समूहाला 'विज्ञानमय कोश' ह्मण-

तात. नैयायिकादिकांनीं मानलेला कर्ता, भोक्ता, जीवात्मा हाच होय. सांख्य–अन्तःकरणाच्या अहंकाराख्य चिच्छक्तियुक्त भागालाच 'विज्ञानमय' ह्मणतात. आतां विज्ञानमयच आत्मा आहे, अशी बुद्धि दृढ होण्यासाठीं त्याच्या उपासनेचें विधान करणारा वेद उपास्य कोशाचें स्वरूप सांगतो—)

स वा एष पुरुषविध एव। तस्य पुरुषविधताम्।
अन्वयं पुरुषविधः। तस्य श्रद्धेव शिरः। ऋतं
दक्षिणः पक्षः। सत्यमुत्तरः पक्षः। योग आत्मा।
महः पुच्छं प्रतिष्ठा। तदप्येष श्लोको भवति ॥

( इति ब्रह्मवल्ल्यध्याये चतुर्थोऽनुवाकः )

अर्थ—तो हा शास्त्रें व लोक यांत कर्ता ह्मणून प्रसिद्ध असलेला विज्ञानमय पुरुषाकारच आहे. पूर्वोक्त मनोमयाच्या पुरुषाकारतेच्या अनुसार हाही पुरुषाकार झाला आहे. श्रद्धा हेंच त्याचें शिर आहे, पूर्वोक्त ऋत हाच उजवा पंख आहे. सत्यच डावा पंख आहे. योग ह्म० शास्त्रार्थाविषयीं संदेहरहित वृत्ति अथवा सप्रज्ञातादिरूप समाधि हाच आत्मा आहे, आणि 'महः' ह्म० अव्याकृताचें हिरण्यगर्भसंज्ञक प्रथम कार्य–महत्तत्व, हेंच पुच्छ–प्रतिष्ठा आहे. या अर्थीं हा असा श्लोक आहे. ४.

---

विज्ञानं यज्ञं तनुते। कर्माणि तनुतेऽपि च। विज्ञानं
देवाः सर्वे। ब्रह्म ज्येष्ठमुपासते। विज्ञानं ब्रह्म
चेद्वेद। तस्माच्चेन्न प्रमाद्यति। शरीरे पाप्मनो
हित्वा। सर्वान्कामान्समश्नुत इति ॥

अर्थ—कर्तृत्वशक्ति विज्ञान ज्योतिष्टोमादि यज्ञाचें अनुष्ठान करतें. तसेंच अग्निहोत्रादि श्रौत, सध्यावन्दनादि स्मार्त व कृष्यादि लौकिक कर्में तें करतें. इंद्रादि सर्व देव ज्येष्ठ ब्रह्मरूपानें विज्ञानाची

उपासना करितात. त्याच्याप्रमाणें जो पुरुष विज्ञानोपाधिक ब्रह्माची उपासना करतो, आणि त्या उपासनेपासून जो जन्मभर च्युत होत नाहीं (मी ब्रह्म आहें, अशा प्रकारच्या प्रत्ययाचा प्रवाह सोडून मी मनुष्य, कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी आहें, असा प्राकृत जनाप्रमाणें व्यवहार करणें हाच प्रमाद आहे. असला प्रमाद न करितां जो यावज्जीव उपासना करतो तो) या शरीरांतच सर्व पापें सोडून (ह्मणजे **सायणाचार्य** ह्मणतात-शरीरांत असतानाच-जिवंतपणींच-उत्तर जन्मरूप दुःखास कारण होणाऱ्या सर्व पापाचा परित्याग करून ) ब्रह्मलोकात केवळ संकल्पानेंच संपादन केलेल्या सर्व भोगास भोगून तत्त्वज्ञान झालें असतां मुक्त होतो ' इति-' शब्दाचा अर्थ मागच्या प्रमाणेंच समजावा.

विज्ञानमयाविषयीं निश्चय झाला असता त्याची उपासना करणाऱ्या उपासकाला मनोमय हें त्याचें शरीर आहे, असें निश्चयपूर्वक कळतें, असें श्रुति दाखविते—

**तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य ॥**

अर्थ-' तस्य पूर्वस्य यः एषः एव शारीरः आत्मा- ' त्या पूर्व मनोमय कोशाचा जो हा ज्ञानमय कोश तोच शरीरगत आत्मा आहे, व (मनोमय त्याचें शरीर आहे अर्थात् मन आत्मा नव्हे. आता विज्ञानमयही आत्मा नव्हे, असें सांगण्यासाठीं वेद आनंदमयाचा उपदेश करितो.— )

**तस्माद्वा एतस्माद्विज्ञानमयात्। अन्योन्तर आत्माऽऽनन्दमयः। तेनैष पूर्णः ॥**

अर्थ-त्या या प्रसिद्ध विज्ञानमयाहून निराळा व त्याच्या आंत असणारा **आनन्दमय** आत्मा आहे. त्याच्या योगानें हा विज्ञानमय परिपूर्ण आहे. ( आनंद हें परब्रह्माचें स्वरूप आहे त्याचे पुढें सांगितलेले प्रिय, मोद व प्रमोद, हे विकार आहेत. वस्तुतः आनंद निर्विकार आहे.

पण घटादि उपाधींमुळें जसे आकाशाचे, त्याप्रमाणें सात्त्विक अन्तःकरण-रूपवृत्तींमुळें त्याचे कल्पित भेद संभवतात. विषय आवडणें, ते प्राप्त होणें व त्याचा उपभोग घेणें, यावेळीं निरनिराळ्या वृत्ती होत असल्यामुळें त्यांच्या योगानें आनंदाचेही प्रिय, मोद व प्रमोद असे भेद प्रतीत होतात. प्राणमय कोशानें ज्याला व्यापलें आहे अशा सर्व देहांत चलन हें प्राणांचें कार्य जसें अनुभवास येतें, मनोमयानें व्यापलेल्या सर्व प्राणविशिष्ट देहांत मनःकार्यभूत चेतनत्वरूप ज्ञानशक्ति जशी उपलब्ध होते, विज्ञानमयानें व्यापलेल्या आणि प्राण व मन यानीं युक्त असलेल्या सर्व देहांत 'मी कर्ता' अशा प्रकारचें कर्तृत्व जसें आढळतें त्याचप्रमाणें आनंदमयानें व्यापलेल्या विज्ञान-मन-प्राणविशिष्ट देहांतील हस्त-पादादि अवयवांतही सुख अनुभवास येतें. अन्नमयादि कोश प्राणमयादि उत्तरोत्तर कोशांनीं व्याप्त-पूर्ण-आहेत, असें ह्मणण्याचें कारण हा अनुभवच आहे. हस्तादिकांमध्यें सुखाप्रमाणें दुःखही अनुभवास येतें, हें खरें; पण त्याचें कारण मनोमय कोश आहे. कारण दुःख ही मनोमय कोशाची वृत्ति आहे. ह्मणूनच मनाचा निरोध केला असता दुःखाचा प्रत्यय येत नाहीं. मुख्य सुख, ही मनाची वृत्ति नसल्यामुळेंच मनाचा निरोध केला असतां किंवा तें अज्ञानांत लीन झालें असताही सुख भासतें. आतां दुःखाचा अभाव ह्मणजेच आनंद किंवा सुख, असें कित्येक समजतात; पण तें बरोबर नाहीं. कारण अभाव नेहमीं प्रतियोगिनिरूपित असतो. घटाचा अभाव घटनिरूपित असतो, त्यामुळें सुख हा जर अभावरूप पदार्थ असता तर त्याची प्रतीति दुःखस्मरणपूर्वक आली असती. ह्मणजे प्रत्येक अभाव, 'हा घटाचा अभाव, हा पटाचा अभाव' इत्यादि प्रकारें घट, पट या प्रतियोगींच्या स्मरणासहवर्तमानच जसा अनुभवास येतो त्याप्रमाणें हें सुखेमुळें होणाऱ्या दुःखाच्या अभावरूप सुख, तें तृष्णेच्या योगानें होणाऱ्या दुःखाच्या अभावरूप सुख, असेंच प्रत्येक सुख प्रतीत झालें असतें. पण

तसें होत नाहीं. तर प्रत्येक सुख सामान्यत. सुखरूपानेंच प्रतीत होतें. शिवाय चित्ताच्या शांत दशेंत होणारें सुख तर कोणत्याच दुःखाच्या अभावरूप नसतें. यास्तव मुख्य सुख ह्म० आनंद, हा भाव पदार्थ आहे. अभाव नव्हे. असो, आता श्रुति आनंदमयाचें उपास्य स्वरूप सांगते–)

स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् ।
अन्वयं पुरुषविधः । तस्य प्रियमेव शिरः । मोदो
दक्षिणः पक्षः । प्रमोद उत्तरः पक्ष. । आनन्द
आत्मा । ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ॥

( इति ब्रह्मवल्ल्यध्याये पञ्चमोऽनुवाकः )

अर्थ–विज्ञानमयाच्या आत असलेला जो आनन्दमय तो हा ( मी सुखी, भोक्ता इत्यादि रूपानें अनुभवास येणारा ) पुरुषाकारच आहे. विज्ञानमयाच्या शिर पक्षादिरूप पुरुषाकारतेच्या अनुसार हा स्वत ही पुरुषाकारच होतो. त्याचे प्रिय, मोद व प्रमोद या सात्विक वृत्तींत प्रतिबिंबित झालेले आनन्दच क्रमानें शिर, उजवा पख व डावा पख आहेत. इष्ट वस्तूला नुस्तें पाहून जें सुख होतें त्याला **प्रिय** ह्मणतात. त्याचा लाभ झाला असता जें सुख होतें तो **मोद** व त्याच्या योगानें काहीं उपकार झाला असता जें सुख होतें तो **प्रमोद** होय. त्या सर्व वृत्तींच्या उपादानभूत अज्ञानात प्रतिबिंबित झालेला ( सुषुप्तींतील ) आनंद, हाच या पुरुषाकार पक्ष्याचा 'आत्मा' मध्यदेश आहे. मुख्य बिंबभूत आनन्द हेंच **ब्रह्म पुच्छ व प्रतिष्ठा** आहे. ( प्रिय, मोद व प्रमोद या जरी मनाच्या वृत्ती आहेत तरी त्या आनंदाच्या प्रतिबिंबभूत आहेत. आनन्दमय कोशाची प्रतिष्ठा, असें ब्रह्म तत्त्वत. साक्षात् जाणणें, हेंच सर्व उपासनेचें फळ आहे. ह्मणून श्रुतीनें येथें आनन्दमय कोशाचें निराळे फळ सांगितलें नाहीं. केवळ ब्रह्म पुच्छ प्रतिष्ठा आहे, असें सांगूनच ती स्वस्थ बसली आहे. ह्मणजे सर्व जगदाधारभूत ब्रह्मतत्त्वाच्या

तसें होत नाहीं. तर प्रत्येक सुख सामान्यतः सुखरूपानेंच प्रतीत होतें. शिवाय चित्ताच्या शांत दशेंत होणारें सुख तर कोणत्याच दुःखाच्या अभावरूप नसतें. यास्तव मुख्य सुख ह्म० आनंद, हा भाव पदार्थ आहे. अभाव नव्हे. असो; आतां श्रुति आनंदमयाचें उपास्य स्वरूप सांगते–)

स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् ।
अन्वयं पुरुषविधः । तस्य प्रियमेव शिरः । मोदो
दक्षिणः पक्षः । प्रमोद उत्तरः पक्षः । आनन्द
आत्मा । ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति॥

( इति ब्रह्मवल्ल्यध्याये पञ्चमोऽनुवाकः )

अर्थ–विज्ञानमयाच्या आंत असलेला जो आनन्दमय तो हा (मी सुखी, भोक्ता इत्यादि रूपानें अनुभवास येणारा ) पुरुषाकारच आहे. विज्ञानमयाच्या शिरःपक्षादिरूप पुरुषाकारतेच्या अनुसार हा स्वतःही पुरुषाकारच होतो. त्याचे प्रिय, मोद व प्रमोद या सात्विक वृत्तींत प्रतिबिंबित झालेले आनन्दच क्रमानें शिर, उजवा पक्ष व डावा पंख आहेत. इष्ट वस्तूला नुसतें पाहून जें सुख होतें त्याला **प्रिय** ह्मणतात. त्याचा लाभ झाला असता जें सुख होतें तो **मोद** व त्याच्या योगानें कांहीं उपकार झाला असतां जें सुख होतें तो **प्रमोद** होय. त्या सर्व वृत्तींच्या उपादानभूत अज्ञानांत प्रतिबिंबित झालेला ( सुषुप्तींतील ) **आनंद**, हाच या पुरुषाकार पक्ष्याचा '**आत्मा**' मध्यदेश आहे. मुख्य बिंबभूत आनन्द हेंच **ब्रह्म पुच्छ** व **प्रतिष्ठा** आहे. ( प्रिय, मोद व प्रमोद या जरी मनाच्या वृत्ती आहेत तरी त्या आनंदाच्या प्रतिबिंबभूत आहेत. आनन्दमय कोशाची प्रतिष्ठा, असें ब्रह्म तत्त्वतः साक्षात् जाणणें, हेंच सर्व उपासनेचें फळ आहे. ह्मणून श्रुतीनें येथें आनन्दमयकाशाचें निराळें फळ सांगितलें नाहीं. केवळ ब्रह्म पुच्छ प्रतिष्ठा आहे, असें सांगूनच ती स्वस्थ बसली आहे. ह्मणजे सर्व जगदाधारभूत ब्रह्मतत्त्वाच्या

उपदेशातच तिचें पर्यवसान झालें आहे आता वेद या आनंदमय कोशातील प्रधान, असें जें ब्रह्म त्याचें प्रतिपादन करणाऱ्या प्रत्यक्ष मंत्राचाच उल्लेख करतो.– ) त्या ब्रह्माचें प्रतिपादन करणारा हा पुढील श्लोक आहे. ५.

---

असन्नेव स भवति। असद्ब्रह्मेति वेद चेत्। अस्ति-
ब्रह्मेति चेद्वेद। सन्तमेनं ततो विदुरिति ॥

अर्थ–व्यवहारात नेत्रांनीं दिसणाऱ्या, पाणी आणणें, इत्यादि कार्यांच्या उपयोगी असलेल्या ह्म० व्यवहारयोग्य घटाला ' आहे ' असें ह्मणतात व असा जो नसतो त्याला 'नाहीं' असें ह्मणतात. वास्तव व्यवहार–वासनेनें युक्त असलेले पुरुष व्यवहाराचा विषय न होणाऱ्या ब्रह्माला 'असत्' समजतात. पण विवेकी व्यवहाराच्या उपयोगीं असलेल्या भूतांना व भौतिक पदार्थांना–श्रुति, युक्ति व अनुभव यावरून माया-मयत्व आहे, असें ठरत असल्यामुळें–असत् समजतो आणि व्यवहारा-तीत ब्रह्म सत्य आहे, असा श्रुत्यादिकावरून निश्चय होत असल्यामुळें ब्रह्माचें सत्त्व मानतो वास्तव श्रुति ह्मणते ' **ब्रह्म असत् इति वेद चेत् सः असन् एव भवति**–' ब्रह्म असत् आहे, असें जो जाणतो तो असत्–च होतो. ( कारण अन्नमयादिकोशाचें अनात्मत्व वर दाख-विलें आहे आणि तदतिरिक्त ब्रह्माचें सत्त्व तर हा असत्त्ववादी मानीत नाहीं. ) पण ' **ब्रह्म अस्ति इति वेद चेत् ततः एनं सन्तं विदुः इति**–' जो पुरुष पंचकोशातीत ब्रह्म आहे, असें जाणतो त्याचें तें ब्रह्मच स्वरूप आहे त्यामुळें शास्त्रपारगत त्या विवेक्याला विद्यमान–सात्मक–समजतात ( किंवा आनंद ब्रह्म नाहीं असें जो समजतो तो असाधु होतो. कारण वर्णाश्रमादि व्यवस्थारूप सर्व सन्मार्ग ब्रह्मज्ञाना-करिताच असल्यामुळें ब्रह्माचाच अपलाप करणारा तो नास्तिक–सर्व

सन्मार्गदूषक-होतो. पण ब्रह्म आहे, असें ह्मणणाराला त्याच्या उलट साधु-सर्व सन्मार्गस्थापक-ह्मणतात. आतां उपासकाची आनंदमयाचे ठिकाणीं व जिज्ञासूची ब्रह्माचे ठिकाणीं आत्मबुद्धि दृढ करण्यासाठीं श्रुति सांगते. )

**तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य ॥**

**अर्थ**–'*यः*–' *जो आनन्दमय* ' **एष एव**–' तोच '**तस्य पूर्वस्य शारीर आत्मा**–' त्या पूर्वीच्या विज्ञानमयाचा शारीर आत्मा आहे. विज्ञान हें त्याचें शरीर आहे (ज्याअर्थीं ब्रह्म आहे, नाहीं इत्यादि विकल्प संभवतात त्याअर्थीं हे असे प्रश्न येतात. **सायणाचार्य** ह्मणतात-याप्रमाणें ब्रह्मोपदेशरूप श्रवणप्रकरण संपवून मननप्रकरणाच्या आरंभीं शिष्यरूप श्रुति पुढील प्रश्न उपस्थित करते.—)

**अथातोऽनुप्रश्नाः । उताविद्वानमुं लोकं प्रेत्य ।**
***कश्चन गच्छती ३ । आहो विद्वानमुं लोकं प्रेत्य ।***
**कश्चित्समश्नुता ३ उ ॥**

**अर्थ**—' **अथ अतः**–' वर सांगितल्याप्रमाणें उपदेश केल्यानंतर उपदिष्ट अर्थाविषयीं शिष्याच्या मनात ज्याअर्थीं अनेक संदेह उद्भवले त्याअर्थीं ' **अनु प्रश्नाः**–' तो उपदिष्ट अर्थाच्या अनुसार असे प्रश्न करतो. ' **कश्चन उत अविद्वान् प्रेत्य अमुं लोकं गच्छती** ३–' काय कोणीही अविद्वान् शरीरांतून निघून या परमात्म-लोकास प्राप्त होतो ? ( कीं नाहीं ? ) ' **आहो कश्चित् विद्वान् प्रेत्य अमुं लोकं समश्नुते उ**–' कीं कोणीही विद्वान् या देहांतून निघून त्या परमात्मलोकास पोंचतो, ( कीं तोही पोंचत नाहीं ? कारण सर्व जगाचें कारण व जीवरूपानें देहात प्रविष्ट झालेलें ब्रह्म विद्वान् व अविद्वान् या दोघांनाही समान आहे. यास्तव विद्वानाला जर त्याची प्राप्ति होत असली तर ती अविद्वानालाही निःसंशय होईल, आणि अविद्वानाला जर ती

उपदेशातच तिचें पर्यवसान झालें आहे आता वेद या आनंदमय कोशातील प्रधान, असें जें ब्रह्म त्याचें प्रतिपादन करणाऱ्या प्रत्यक्ष मंत्राचाच उल्लेख करतो.— ) त्या ब्रह्माचें प्रतिपादन करणारा हा पुढील श्लोक आहे. ५.

---

**असन्नेव स भवति । असद्ब्रह्मेति वेद चेत् । अस्ति-**
**ब्रह्मेति चेद्वेद । सन्तमेनं ततो विदुरिति ॥**

**अर्थ**—व्यवहारात नेत्रांनीं दिसणाऱ्या, पाणी आणणें, इत्यादि कार्यांच्या उपयोगी असलेल्या ह्म० व्यवहारयोग्य घटाला ' आहे ' असें म्हणतात व असा जो नसतो त्याला 'नाहीं' असें म्हणतात. यास्तव व्यवहार-वासनेनें युक्त असलेले पुरुष व्यवहाराचा विषय न होणाऱ्या ब्रह्माला 'असत्' समजतात. पण विवेकी व्यवहाराच्या उपयोगीं असलेल्या भूतांना व भौतिक पदार्थांना-श्रुति, युक्ति व अनुभव यावरून माया-मयत्व आहे, असें ठरत असल्यामुळें-असत् समजतो आणि व्यवहारा-तीत ब्रह्म सत्य आहे, असा श्रुत्यादिकांवरून निश्चय होत असल्यामुळें ब्रह्माचें सत्त्व मानतो यास्तव श्रुति म्हणते **' ब्रह्म असत् इति वेद चेत् सः असन् एव भवति-'** ब्रह्म असत् आहे, असें जो जाणतो तो असत्-च होतो. ( कारण अन्नमयादिकोशाचें अनात्मत्व वर दाख-विलें आहे आणि तदतिरिक्त ब्रह्माचें सत्त्व तर हा असत्त्ववादी मानीत नाहीं. ) पण **' ब्रह्म अस्ति इति वेद चेत् ततः एनं सन्तं विदुः इति-'** जो पुरुष पंचकोशातीत ब्रह्म आहे, असें जाणतो त्याचें तें ब्रह्मच स्वरूप आहे त्यामुळें शास्त्रपारगत त्या विवेक्याला विद्यमान-सात्मक-समजतात ( किंवा आनंद ब्रह्म नाहीं असें जो समजतो तो असाधु होतो. कारण वर्णाश्रमादि व्यवस्थारूप सर्व सन्मार्ग ब्रह्मज्ञाना-करितांच असल्यामुळें ब्रह्माचाच अपलाप करणारा तो नास्तिक-सर्व

सन्मार्गदूषक-होतो. पण ब्रह्म आहे, असें ह्मणणाराला त्याच्या उलट साधु-सर्व सन्मार्गस्थापक-ह्मणतात. आतां उपासकाची आनंदमयाचे ठिकाणीं व जिज्ञासूची ब्रह्माचे ठिकाणीं आत्मबुद्धि दृढ करण्यासाठीं श्रुति सांगते. )

तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य ॥

अर्थ-' यः-' जो आनन्दमय ' एष एव-' तोच ' तस्य पूर्वस्य शारीर आत्मा-' त्या पूर्वीच्या विज्ञानमयाचा शारीर आत्मा आहे. विज्ञान हें त्याचें शरीर आहे. (ज्याअर्थीं ब्रह्म आहे, नाहीं इत्यादि विकल्प संभवतात त्याअर्थीं हे असे प्रश्न येतात. सायणाचार्य ह्मणतात-याप्रमाणें ब्रह्मोपदेशरूप श्रवणप्रकरण सपवून मननप्रकरणाच्या आरंभीं शिष्यरूप श्रुति पुढील प्रश्न उपस्थित करते.—)

अथातोऽनुप्रश्नाः । उताविद्वानमुं लोकं प्रेत्य । कश्चन गच्छती३ । आहो विद्वानमुं लोकं प्रेत्य । कश्चित्समश्नुता३ उ ॥

अर्थ—' अथ अतः-' वर सांगितल्याप्रमाणें उपदेश केल्यानंतर उपदिष्ट अर्थाविषयीं शिष्याच्या मनांत ज्याअर्थीं अनेक संदेह उद्भवले त्याअर्थीं ' अनु प्रश्नाः-' तो उपदिष्ट अर्थाच्या अनुसार असे प्रश्न करतो. ' कश्चन उत अविद्वान् प्रेत्य अमुं लोकं गच्छती ३-' काय कोणीही अविद्वान् शरीरातून निघून या परमात्म-लोकास प्राप्त होतो? ( कीं नाहीं? ) ' आहो कश्चित् विद्वान् प्रेत्य अमुं लोकं समश्नुते उ-' कीं कोणीही विद्वान् या देहातून निघून त्या परमात्मलोकास पोंचतो, ( कीं तोही पोंचत नाहीं? कारण सर्व जगाचें कारण व जीवरूपानें देहांत प्रविष्ट झालेलें ब्रह्म विद्वान् व अविद्वान् या दोघांनाही समान आहे. यास्तव विद्वानाला जर त्याची प्राप्ति होत असली तर ती अविद्वानालाही निःसंशय होईल; आणि अविद्वानाला जर ती

‘ तत् अनुप्रविश्य–’ त्यात भोक्तृरूपानें प्रवेश करून त्यानंतर ‘ सत् च त्यत् च–’ तें तेज, जल व अन्नरूप सत् आणि वायु–आकाशरूप त्यत् झालें. ( उत्पन्न केलेल्या सर्व शरीरांत प्रवेश करून तें परमात्मरूप जसें भोक्तृरूपानें तसेंच सत्–प्रत्यक्षगम्य व त्यत्–परोक्ष भोग्यरूपानेंही परिणत झालें. पृथ्वी, अप् व तेज हीं तीन भूतें प्रत्यक्षगम्य असल्यामुळें त्यांना सत् आणि वायु व आकाश हीं भूतें अप्रत्यक्ष असल्यामुळें त्यांना त्यत् म्हटलें आहे. अर्थात् ब्रह्मच भोक्ता व भोग्य झालें. ) ‘ निरुक्तं च अनिरुक्तं च–’ तो परमात्माच निरुक्त व अनिरुक्त झाला. निरुक्त म्ह० ज्याचा शब्दानें उल्लेख करता येतो. जसें–हा घट, ह्याचें पोट मोठें आहे, ह्याची मान आवळली आहे, हा मातीचा आहे. त्यांत जल ठेवतां येतें इत्यादि. पण ज्याविषयीं असा शब्दव्यवहार करता येत नाहीं तें अनिरुक्त. जसें–दूध, ऊसाचा रस, सत्रें, द्राक्ष इत्यादिकांतील माधुर्याचा भेद सांगता येत नाहीं. त्याचप्रमाणें ‘ निलयनं च अनिलयनं च–’ फळ पुष्प, मूळ इत्यादिकांतील गुणाचा आधार व गंध, रस इत्यादि आधेय तो झाला. ‘विज्ञानं च अविज्ञानं च ’ गाय, घोडा इत्यादि, चेतन व काष्ठ पाषाणादि अचेतन तोच झाला. ‘ सत्यं च अनृतं च सत्यं अभवत्–’ लोकव्यवहारांत बाधरहित वस्तु व बाधित होणारी वस्तु, तेंच सर्व बाधशून्य भावरूप ब्रह्म झालें. त्यामुळेंच तें ब्रह्म सत्–विद्यमान आहे. कारण असत् जर सर्वात्मक असतें तर हें सर्व मनुष्यशृंगादिकांप्रमाणें असत् भासलें असतें. पण प्रतीत होणारी प्रत्येक वस्तु ‘ सत्–आहे, ’ अशा रूपानेंच भासते. यास्तव भोग्याकारानें परिणत झालेलें ब्रह्म सद्रूप आहे. याप्रमाणें ब्रह्माचा सद्भाव युक्तीनीं सिद्ध करून श्रुति विद्वानांच्या अनुभवानेंही तो सिद्ध करिते—

यदिदं किं च । तत्सत्यमित्याचक्षते । तदप्येष श्लोको भवति ॥

( इतिब्रह्मवल्ल्यध्याये षष्ठोऽनुवाकः )

अर्थ–भोक्तृभोग्यरूप हें जें कांहीं जगत् दिसतें तें वस्तुतः जगत् नाहीं. तर सत्य–अबाध्य ब्रह्म आहे, असें विवेकी सांगतात. (यास्तव विद्वदनुभवसिद्ध ब्रह्म असत् नाहीं. श्रुति पूर्वोक्त ब्रह्माचा सद्भाव प्रकट करणारा मंत्र उदाहरणार्थ देते.) त्या अर्थीही हा श्लोक आहे. ६.

---

असद्वा इदमग्र आसीत् । ततो वै सदजायत ।
तदात्मानं स्वयमकुरुत। तस्मात्तत्सुकृतमुच्यत इति॥

अर्थ–' इदं अग्रे असत् वै आसीत्–' नाम व रूप यांच्या योगानें व्यक्त झालेलें हें जगत् उत्पत्तीच्या पूर्वी असत् ह० अनभिव्यक्त होतें. 'ततः वै सत् अजायत–' त्या अव्यक्तनामरूपात्मक ब्रह्मापासून सत्–व्यक्तनामरूपात्मक जगत् उत्पन्न झालें. (पण पित्यापासून झालेला पुत्र जसा पृथक् असतो तसें ब्रह्मापासून झालेलें जगत् पृथक् नाहीं. तर ) 'तत् आत्मानं स्वयं अकुरुत–' तें आत्म्याला–सच्चिदानन्दैकरसस्वरूपाला–स्वय–दुसऱ्या कोणा कर्त्याची अपेक्षा न करिता–जगदाकार करतें झालें. ( घटाच्या मृत्तिकेप्रमाणें जगाचें उपादान कारण निराळें व कुंभाराप्रमाणें निमित्त कारण निराळें, असा येथें प्रकार नाहीं. तर जगाचें उपादान व निमित्त ब्रह्मच आहे. ) ' तस्मात् तत् सुकृतं उच्यते–' यास्तव तें ब्रह्म ' सुकृत ' असें म्हटलें जातें. ( येथील सुशब्द स्वयं, या अर्थी व कृतशब्द कर्तृत्व, या अर्था आहे. त्यामुळें ब्रह्म सुकृत ह० स्वयं कर्तृ आहे, असें शास्त्रज्ञ म्हणतात. जीव स्वतः कर्ते नाहींत. तर ते अन्तर्यामीकडून प्रेरित होऊनच कार्य करितात. पण ब्रह्म तसें दुसऱ्या कोणाकडून प्रेरित होऊन करीत नाहीं. ब्रह्म स्वयं कर्तृ

आहे, या प्रसिद्धीवरूनही त्याचा सद्भाव सिद्ध होतो. येथील इति-शब्दही मंत्रसमाप्त्यर्थ आहे. आता याहून निराळ्याप्रकारानें त्याचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं वेद त्याची आनन्दरूपता सांगतो— )

**यद्वै तत्सुकृतम् । रसो वै सः । रसं ह्येवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति ॥**

अर्थ—' यत् सुकृतं- ' जें पूर्वोक्त सुकृतशब्दवाच्य ब्रह्म आहे ' सः रसः वै-' तो रस आहे. ( व्यवहारातही तृप्तिरूप आनंदाला कारण होणाऱ्या मधुरादि पदार्थांला रस ह्मणतात. त्रमही विद्वानाच्या कृतकृत्यत्वादिरूप आनन्दाचे निमित्त होतें. यास्तव तें 'रस' होय. रस ह्म० स्वप्रकाशमान होणारा आनंद. ) ' अयं रसं हि एव लब्ध्वा आनन्दी भवति- ' हा अधिकारी या रसाला प्राप्त होऊनच आनंदी होतो. ( कारण तत्त्वज्ञाला लौकिक आनंददायी पदार्थ मिळाल्यानें आनंद होत नाहीं. तर आत्मलाभच त्याच्या संतोषाचें कारण होतो. तस्मात् विद्वानाच्या आनंदाला कारण होणारें ब्रह्म आहे, असेंच सिद्ध होतें. ) शिवाय ब्रह्म देहादिकाची हालचाल व विषयजन्य आनन्द याचेंही निमित्त असल्यामुळें ' तें आहे, ' असेंच ह्मटलें पाहिजे, असें सुचविण्यासाठीं श्रुति ह्मणते—

**को ह्येवान्यात्कः प्राण्यात् । यदेष आकाश आनन्दो न स्यात् । एष ह्येवानन्दयाति ॥**

अर्थ-आकाशे किंवा आकाशः असा हा शब्द सप्तम्यन्त किंवा प्रथमान्त घ्यावा. सप्तम्यन्त घेतल्यास 'गुहायां परमे व्योमन्' (पृष्ठ ४८) येथें सांगितलेला अर्थ समजावा व प्रथमान्त घेतल्यास ' सर्वत्र प्रकाशमान होणारा, ' असा त्याचा अर्थ समजावा. सारांश परम आकाशांतील-अव्याकृतांतील-अथवा सर्वतः प्रकाशमान होणारा ' एष आनन्दः-'

हा रसाख्य आत्मरूप आनन्द ' यद् न स्यात्- ' जर नसेल तर ' कः हि एव अन्यात् कः प्राण्यात्- ' कोणता बरें कर्ता देहाच्या आत वागादि इंद्रियांच्या द्वारा चेष्टा करील ? ( ' अन्-चेष्टायां ' या पाणिनिपठित चेष्टा या अर्थी असलेल्या अन्-धातूपासून 'अन्यात्' हें विध्यर्थी रूप झालें आहे ) त्याचप्रमाणें ' कः प्राण्यात् ' प्राणाचें श्वास हें कर्म कोण करील ? ( शंकरानन्द ह्मणतात—आत्म कामनेनें, आत्म्याच्या सुखाकरिता सर्व लौकिक व वैदिक चेष्टा-हालचाल-होते प्राणधारणही त्यासाठींच आहे पण आत्मा जर दुःख किंवा दुःखाचें साधन असता तर तो विषाच्या दशापासून होणाऱ्या दुःखाप्रमाणें अथवा विषप्रमाणें त्याज्य झाला असता शिवाय तो जर सर्पादिका-प्रमाणें दुःख साधन असता तर त्याच्यासाठीं भार्यादिक प्रिय झालीं नसतीं तस्मात् तो सुखरूप आहे, असेंच मानणे उचित आहे ह्मणू-नच ताे परम प्रेमाचें स्थान आहे तो जर परप्रेमास्पद नसता तर त्याच्या करिता सर्व लौकिक व वैदिक चेष्टा झाली नसती 'अहो पण हा जर असा आनंदरूप आहे तर सर्व लोक आनंदासाठीं दुसऱ्या बाह्य साधनांचा अंगीकार का करितात,' असें कोणी विचाराल ह्मणून श्रुति सांगते—) ' एष एव हि आनन्दयाति- ' हाच सर्वांना संतुष्ट करतो ( तो आकाश आनंदात्मा स्वयंप्रकाशमान जरी आहे तरी अनादि अविद्येनें आवृत झाला आहे त्यामुळें तो साधन व साध्यरूप होऊन बहिर्मुख जीवांना बाह्य साधनरूपानें सुखद होतो तस्मात् अविद्यादशांत आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व जीवांना तो साधनांच्या द्वारा व विषयांना साक्षात् आनंद देतो ' आनन्दयाति-' हें छांदसरूप आहे )

याप्रमाणें आत्म्याचें अस्तित्व सिद्ध करून आतां अभेदरूपानें च त्याला केव्हा व कसा प्राप्त होतो तें श्रुति सांगते—

यदा ह्येवैष एतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयनेऽभयं प्रतिष्ठां विन्दते । अथ सोऽभयं गतो भवति ॥

अर्थ—' हि–' ज्या अर्थी विद्वानाला ब्रह्मप्राप्ति नियमानें होते त्या अर्थी ' यदा–' जेव्हा ' एषः एतस्मिन् अदृश्ये अनात्म्ये अनिरुक्ते अनिलयने अभयं प्रतिष्ठां विन्दते–' हा जिज्ञासु किंवा विद्वान् या प्रकृत स्वानुभवगम्य अदृश्य–चक्षुरादि इंद्रियाचा विषय न होणाऱ्या, अनात्म्य त्रिविधशरीरशून्य, अनिरुक्त वाणीचा विषय न होणाऱ्या व अनिलयन–अनाधार ( अर्थात् सर्वकार्यधर्मरहित ), अशा आत्म्याच्या ठिकाणी निर्भयपणें प्रतिष्ठेस–तेंच मी अशारीतीनें उत्कृष्ट स्थितीस–प्राप्त होतो ' अथ सः अभयं गत भवति–' तेव्हा तो अभयास गेला आहे, असें होतें ( अभय ह्म० द्वैतराहित्य. कारण ब्रह्मव्यतिरिक्त वस्तूला भय ह्मणतात मी निराळा व ब्रह्म निराळें अशा प्रकारचें द्वैत हेंच भय आहे पण तशा भयानें रहित अशा प्रतिष्ठेस–तादात्म्यस्थितीस प्राप्त होतो, अशी योजना करावी )

या विद्वानाला ब्रह्मप्राप्ति निश्चयानें होते, असें सांगून त्याविषयींच्या संशयाचें निराकरण केलें. आता अविद्वानाला त्याची प्राप्ति होत नाहीं, असें निश्चयानें सांगून श्रुति त्याविषयींच्या संशयाचेंही निराकरण करते—

यदा ह्येवैष एतस्मिन्नुदरमन्तरं कुरुते । अथ तस्य भयं भवति ॥

अर्थ— 'यदा एव हि–' आणि जेव्हा ' एषः एतस्मिन् अरं उत् अन्तरं कुरुते–' हा–अज्ञानी–या आत्म्याहून पृथक् नसलेल्या ब्रह्मामध्यें थोडेंही अन्तर–भेद करतो ' अथ तस्य भय भवति–' तेव्हां त्याला भय–होतें ( शंकरानन्द ह्मणतात—हि–ज्याअर्थी

ब्रह्माच्या आधारानेंच राहिलेला अज्ञ निदिध्य जन्मान्धाप्रमाणें 'ब्रह्मच मी' असें जाणत नाहीं त्याअर्थी तो या ब्रह्मामध्यें जेव्हां स्वल्पही भेददृष्टि ठेवतो तेव्हां तो जन्म-मरणादि असह्य संसारभयास प्राप्त होतो. )

' अहो पण अविद्वानाला जरी तसें भय प्राप्त होत असलें तरी शास्त्रीय कर्म किंवा सगुण उपासना, यास जाणणाऱ्या विद्वानाला ब्रह्मज्ञाप्रमाणें ब्रह्मप्राप्ति होणेंच उचित आहे,' म्हणून कोणी म्हणेल, असें समजून श्रुति सांगते—

तत्त्वेव भयं विदुषोऽमन्वानस्य । तदप्येषं श्लोको भवति ॥ ( इति ब्रह्मवल्ल्यध्याये सप्तमोऽनुवाक.)

अर्थ—' तु विदुषः अपि अमन्वानस्य तत् एव भयं-' परंतु कर्मादिकांना जाणणाऱ्याही अब्रह्मज्ञाला तेंच भय होतें. ( भेददृष्टि ठेवल्यामुळें अत्यन्तमूढाप्रमाणें त्या शास्त्रज्ञालाही तें पूर्वोक्तच जन्ममरणादिलक्षण भय होतें. आता कर्म, उपासना इत्यादि भेदप्रचुर विद्येनें युक्त असलेल्या ब्रह्मतत्त्वज्ञानशून्य पुरुषाला संसार-भय असतें, याविषयीं श्रुति श्लोकाचें प्रमाण देते ) त्या अर्थी हा श्लोक आहे. ७.

---

भीषाऽस्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च मृत्युर्धावति पञ्चम इति ॥

अर्थ—' वातः अस्मात् भीषा पवते-' पूर्वजन्मीं सर्वोत्तम उपासना व कर्मे करून त्यामुळें या जन्मीं वायुरूपानें उत्पन्न झालेला, व देव झाल्यामुळें मोठ्या माहात्म्यानें संपन्न असलेला हा ( वायुसंज्ञक जीव ) या अन्तर्यामिरूप ब्रह्माच्या भयानें वाहतो. ( आळस न करिता एकसारखा संचार करतो. ) ' सूर्यः भीषा उदेति-' सूर्यही याच्या भीतीनेंच उदय पावतो. ' अस्मात् भीषा अग्निः च इन्द्रः च-'

याच्या भीतीनेंच अग्नि दहनकर्म करतो व त्रैलोक्यनाथ इंद्र त्रिलोकीचें रक्षण करतो. 'पञ्चमः मृत्युः धावति–' या चौथ्याच्या अपेक्षेनें पाचवा असलेला मृत्यु–स्थावर जंगमाचा विनाश करणारा–देव प्राण्याचा संहार करण्यासाठीं धावतो. 'इति' श्लोकसमाप्तीकरिता आहे. (असंग व निर्गुण ब्रह्मानें भयाचें निमित्त होणेंही प्रशस्त नव्हे. वास्तव मायोपाधि ब्रह्म अन्तर्यामिरूपानें सर्वांचें भयकारण होतें, असें समजावें. याप्रमाणें सर्व प्रश्नांचें उत्तर देऊन झालें. पण पूर्वी 'तो सर्व भोगास एकदमच भोगतो' व 'तो रस आहे' असें म्हणून त्याचें आनन्दरूपत्व संक्षेपत दाखविलें आहे वास्तव त्याचा निर्णय करण्यासाठीं श्रुति विचाराला आरंभ करते—)

**सैषाऽऽनन्दस्य मीमांसा भवति ।**

अर्थ—'**सा एषा**–' ती प्रसिद्ध असलेली ही पुढील आनंदाची मीमांसा आहे ( मीमांसा म्ह० पूजित विचार. ब्रह्मज्ञाना तो अतिशय सुख देतो. कारण त्याच्या योगानें हा आनन्द सर्वोत्कृष्ट आहे, भावरूप आहे व निरतिशय असल्यामुळें मुख्य पुरुषार्थ आहे, असा निर्णय होतो. **सायणाचार्य** म्हणतात—हा ब्रह्मानन्द लौकिक आनंदाप्रमाणें विषय-विषयिसंबंधानें होतो कीं तो स्वाभाविक आहे, अशी मीमांसा येथून प्रवृत्त होते तिच्या आरंभीं स्वाभाविक आनंदाला इतर आनंदापासून पृथक् करून दाखवण्यासाठीं त्याचीं द्वारेंच, असे दुसरे विषयानन्द क्रमानें सांगितले आहेत ते सर्व ब्रह्मानन्दाचे लेश असल्यामुळें त्याच्या निश्चयाचीं द्वारें होऊं शकतात विषयानंद ब्रह्मानन्दाचे लेश आहेत, हें अशा प्रकारें जाणावें —

अविद्येनें विवेकाला तिरस्कृत केलें असता अविद्येचा उत्तरोत्तर उत्कर्ष होऊं लागतो आणि त्यामुळेंच हिरण्यगर्भापासून मनुष्यापर्यंत जे जीव आहेत त्याच्यामध्यें तो स्वाभाविक ब्रह्मानन्द उत्तरोत्तर क्षीण

होत जातो. तो चचळ, लौकिक व साधनाधीन होतो. प्रत्येक प्राण्याची कर्मे, पूर्व ज्ञान व त्याच्या अनुसार त्याला उपलब्ध झालेलीं साधनें यांच्या योगानें तो न्यूनाधिक होतो. मनुष्यापासून तर या गधर्वादि-योनींत उत्तरोत्तर अविद्या, काम व कर्म यांचा अपक्षय व विद्येचा उत्कर्ष होत गेल्यामुळें त्यांच्यामध्ये व्यक्त होणाऱ्या आनंदाचें प्रमाणही उत्तरोत्तर वाढत जातें. पण कामनाशून्य विद्वान् श्रोत्रियाला त्या आनंदाचा साक्षात् अनुभव येतो. कारण विद्येच्या योगानें अविद्याकृत विषय विषयिभाव निवृत्त झाला असता स्वाभाविक परिपूर्ण एक आनन्दच अवशिष्ट राहतो. असो, यास्तव आतां त्या स्वाभाविक आनंदाच्या द्वार-भूत विषयानंदातील आह्मा मानवांना प्रसिद्ध असलेला मानुष आन-न्दच श्रुति प्रथम दाखवितें—)

युवा स्यात्साधुयुवाऽध्यायकः । आशिष्ठो दृढिष्ठो बलिष्ठः । तस्येयं पृथ्वी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् । स एको मानुष आनन्दः ॥

अर्थ—मनुष्याला बाल्यावस्थेंत विषयाचे गुण कळत नाहींत त्यामुळें त्याला वनिता चन्दनादि विषयांपासून आनंद होत नाहीं त्याचप्रमाणें वृद्धावस्थेंत त्या विषयाचे गुण जरी अवगत असले तरी इंद्रियवृत्ति क्षीण झाल्यामुळें त्याचा उपभोग घेववत नाहीं, ह्मणून येथें ' युवा स्यात्–' तरुण असावा, असें ह्मटलें आहे सोळाव्या वर्षा-पासून केंस पिकत तों प्रायः यौवनावस्था असते पण यौवन-दशेंतही कुरूपत्व, रोग इत्यादिकारणांनीं दुःख संभवतें ह्मणून ' साधुयुवा– मदनासारखा सुंदर व सशक्त असावा, असें ह्मटलें आहे पण तो तसा जरी असला तरी चवदा विद्या व चौसष्ट कला यांतील एकीचेंही ज्ञान नसल्यास दुःख होतें. ह्मणून ' अध्यायकः–' विद्वान् असावा, असें ह्मटलें आहे परंतु तो तसलाही मनुष्य दीर्घसूत्री किंवा अग्निमांद्यामुळें

रुचिहीन जर असला तर त्याला दुःख होतें. यास्तव 'आशिष्ठः–' कार्यांत सत्वर प्रवृत्त होणारा अथवा अग्नि प्रदीप्त असल्यामुळें सर्व भोज्य मोठ्या रुचीनें खाणारा असावा, असें ह्मटलें आहे. पण तो असा असला तरी त्याचें मन दृढ नसल्यास त्याच्या हातून धैर्याचीं कार्यें होत नाहींत. ह्मणून 'दृढिष्ठः–' दृढ, धीर, असें ह्मटलें आहे. पण धैर्यवान्‌ही शरीर बलहीन असल्यास अश्वारोहणादि काहीं करू शकत नाहीं यास्तव 'बलिष्ठः–' अतिशय बळकट असावा येथवर त्याची भोक्तृत्वसंपत्ति सांगितली. आता श्रुति भोग्यसंपत्ति सांगते— '**तस्य इयं सर्वा पृथ्वी वित्तस्य पूर्णा स्यात्–**' त्याची ही सर्व समुद्रवलयांकित पृथ्वी धनानें–भोग्यद्रव्यानें–पूर्ण असावी, ह्मणजे इतर श्रुतोच्या अनुसार तो सार्वभौम राजा असावा '**सः एकः मानुषः आनन्दः–**' तो एक मानुष आनंद आहे. ( ह्म० इतक्या सर्व सामग्रीनें संपन्न असलेल्या सार्वभौमराजाचा जो आनंद तोच मनुष्य लोकचा आनंद आहे. त्याच्या खालचे सर्व आनंद दुःखमिश्रित असल्यामुळें खरे आनंदच नव्हेत कारण तसल्या सार्वभौमाराचून दुसरा कोणी मनुष्य सर्व प्रकारें तृप्त आहे, असें आढळतच नाहीं कारण आनंद ह्मणजे तृप्ति विषयाभिलाष तिचा विरोधी आहे. सार्वभौमावाचून इतर मनुष्याला कोणत्या ना कोणत्या तरी अप्राप्त विषयाचा अभिलाष असणें, अगदीं अवश्य आहे त्यामुळें त्याच्या ठिकाणीं खरा आनंद संभवत नाहीं. पण वर सांगितलेल्या प्रकारच्या सार्वभौमाला मनुष्यलोकातील सर्व विषय प्राप्त झालेले असल्यामुळें त्याच्या तृप्तीला विरोधी विषयाभिलाष प्रतिबंध करू शकत नाहीं, आणि अशी स्थिति असल्यामुळें विषयाभिलाषाची जितकी जितकी अधिक निवृत्ति होत जाते तितका तितका आनंदही अधिक व्यक्त होतो, अशा अभिप्रायानें श्रुति वरील आनंदाहून अधिक आनंद सांगते—)

**ते ये शतं मानुषा आनन्दाः। स एको मनुष्यगन्धर्वाणामानन्दः। श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥**

अर्थ—'ते–' सार्वभौमाचा एक आनन्द अशा प्रमाणाचे 'ये शतं मानुषाः आनन्दाः–' जे शभर मानुष आनन्द '**सः मनुष्यगन्धर्वाणां एकः आनन्दः**–' तोच आनदसघ मनुष्यगन्धर्वांचा एक आनद होय. ( ह्म० शभर सार्वभौम राजाची तृप्ति जर एकत्र केली तर तिचें जें प्रमाण होतें तितक्या प्रमाणाचा एका गधर्वाचा आनद–तृप्ति- असतो. या कल्पात मनुष्य हाऊन विशेष विद्या, कर्म इत्यादिकाच्या योगानें जे गधर्वत्वास प्राप्त होतात ते मनुष्यगधर्व होत. त्याच्यामध्यें अन्तर्धानादिकाची शक्ति असल्यामुळें ते मनुष्याहून उत्कृष्ट असतात. ते अन्तरिक्ष लोकात राहतात. त्याच्या स्वरूपाचें वर्णन वार्तिककारानीं असें केलें आहे–पूर्वीं मनुष्यलोकीं असलेले पुरुष विशिष्ट कर्मादिकाच्या योगानें गधर्व होतात. ते सुगधसपन्न, इच्छेस येईल तें रूप धारण करणारे, अन्तर्धानादि शक्तींनीं युक्त व नृत्य-गीतादिकात कुशल असतात. त्यामुळें मनुष्याप्रमाणें त्याच्या आनदात प्राय. विघ्न येत नाहीं, आणि जरी तें एकादे वेळीं आलें तरी त्याचा परिहार करण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें असतें त्यामुळें त्याच्या चित्तामध्ये विशेष प्रसाद सभवतो आणि त्यामुळेंच विशेष सुखाचीही अभिव्यक्ति होते पण अन्तरिक्षात राहणाऱ्या गधर्वांच्या आनदाचा अनुभव आह्मा भूस्थ मनुष्याना नसतो, ह्मणून श्रुति या लोकच्या निष्काम श्रोत्रियाच्या आनदासारखा तो असतो, असें सागते–) '**च अकामहतस्य श्रोत्रियस्य**–' आणि अकामहत श्रोत्रियाचाही तो एक आनद आहे. ( श्रोत्रिय ह्म० वेदाध्यायी. तो सर्व लोकीं असलेल्या व आनन्दाचें निमित्त होणाऱ्या विषयामध्यें अनेक दोष पाहतो. विषय मोठ्या प्रयासानेंच साध्य होतात, ते न्यूनाधिक योग्यतेचे असतात, जरी प्राप्त झाले

तरी सतत रहात नाहींत तर क्षय पावतात इत्यादि दोष त्याला प्रत्यक्ष दिसतात. शास्त्र व अनुभव, यांवरून त्याचा तसा निश्चय झालेला असतो. ह्मणून तो त्याविषयीं निरिच्छ असतो. त्यामुळें मनुष्यगंधर्व-लोकीं जाऊन तेथील विषयाचा उपभोग घेणाराला जितका आनंद होतो तितका त्याविषयीं निरिच्छ असलेल्या वेदवेत्त्या ब्राह्मणालाही होऊं शकतो. कारण जो त्याविषयीं निरिच्छ असतो, त्याचा ज्या-विषयीं अभिलाषच नसतो त्याला त्या विषयाच्या प्राप्तीमुळें होणाऱ्या सुखाहून शतपट सुख होतें. आतां गंधर्वलोक व त्यांतील विषय यांचें ज्याला ज्ञानच नसतें त्या मूढालाही त्यांविषयीं इच्छा नसते, हें खरें; पण त्याला पुढें जेव्हां त्याचें ज्ञान होतें तेव्हां त्याविषयीं अभिलाष होतो; आणि त्यामुळें त्याच्या तृप्तीचा भग होतो. श्रोत्रियाला गंधर्वादि लोकाचें ज्ञान असूनही तो त्याविषयीं अभिलाष धरीत नाहीं. ह्मणून त्याची तृप्ति निरंकुश राहूं शकते. नृत्य-गीतादिकांमुळें होणारी जी चित्ताची क्षणिक उल्लासवृत्ति ती विकारात्मक असल्यामुळें स्वाभाविक शांतीचा भंग करते यास्तव तसल्या हर्षादिवृत्ती हा मुख्य आनन्द नव्हे. तर अकामतेमुळें प्रवाहासारखी सतत राहणारी शांति हाच आनन्द आहे. याप्रमाणें वर मनुष्य व मनुष्यगंधर्व याच्या आनंदाचे दोन पर्याय सांगून आतां श्रुति तिसरा पर्याय सांगते—

ते ये शतं मनुष्यगन्धर्वाणामानन्दाः । स एको देवगन्धर्वाणामानन्दः। श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥

अर्थ—ते जे मनुष्यगंधर्वांचे शंभर आनन्द त्याचा समूह हाच देवगंधर्वांचा एक आनन्द आहे (सृष्टीच्या आरंभीं देवलोकीं उत्पन्न झालेल्या गायकांना देवगंधर्व ह्मणतात.) आणि अकामहत श्रोत्रियाचाही तो एक आनंद आहे. (आतां वेदभगवान् चवथा पर्याय सांगतात—)

ते ये शतं देवगन्धर्वाणामानन्दाः । स एकः पितृ-
णां चिरलोकलोकानामानन्दः । श्रोत्रियस्य
चाकामहतस्य ॥

अर्थ—ते जे देवगन्धर्वांचे शभर आनन्द तो चिरकाल राहणाऱ्या लोकाचा अनुभव घेणाऱ्या पितराचा व निष्काम श्रोत्रियाचा एक आनन्द आहे (आता आनन्दाचा पाचवा पर्याय सागतात--)

ते ये शतं पितृणा चिरलोकलोकानामानन्दाः । स
एक आजानजानां देवानामानन्दः । श्रोत्रियस्य
चाकामहतस्य ॥

अर्थ–ते जे चिरकाल राहणाऱ्या लोकाच्या अनुभव घेणाऱ्या पितराचे शभर आनद तो आजानजान देवाचा व निष्काम श्रोत्रियाचा एक आनद आहे (पितृ–लोकावर आजान या नावाचा कोणी एक देवलोक आहे. त्यात उत्पन्न झालल्या देवाना 'आजानज देव' ह्मणतात. आता सहावा पर्याय सागतात—)

ते य शतमाजानजाना देवानामानन्दाः । स एकः
कर्मदेवाना देवानामानन्द. । ये कर्मणा देवानपि
यन्ति । श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥

अर्थ–त जे आजानज देवाच शभर आनद तो कर्म देवाचा व निष्काम श्रोत्रियाचा एक आनन्द आहे 'ये कर्मणा देवानपि-यन्ति–' आजानज देवाच्या भोगाहूनही उत्तम भाग सपादन करायासाठीं जे विशेष वैदिक कर्माचें अनुष्ठान करितात व देवास प्राप्त होतात ते कर्मदेव हात (स्वत श्रुतीनेच ही कर्मदेवाची व्याख्या सागितली आहे आता श्रुति सातवा पर्याय सागत—)

ते ये शतं कर्मदेवाना देवानामानन्दाः । स एको
देवानामानन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥

अर्थ–ते जे कर्मदेव देवाचे शभर आनन्द तो देवाचा व निष्काम श्रोत्रियाचा एक आनन्द आहे. ( येथील देवशब्दानें हविर्भाग घेणाऱ्या तेहतीस देवाचें ग्रहण करावें आता श्रुति आठवा पर्याय सागते—)

ते ये शतं देवानामानन्दाः । स एक इन्द्रस्यानन्दः।
श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥

अर्थ–ते जे देवाचे शभर आनद तो इद्राचा व निष्काम श्रोत्रियाचा एक आनन्द आहे. ( आता श्रुति नववा पर्याय सागते—)

ते ये शतमिन्द्रस्यानन्दाः । स एको बृहस्पतेरा-
नन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥

अर्थ–ते जे इद्राचे शभर आनन्द तो बृहस्पतीचा व निष्काम श्रोत्रियाचा एक आनन्द आहे. ( बृहस्पति ह्मणजे इद्राचा आचार्य. आता वेद दहावा पर्याय सागतो–)

ते ये शत बृहस्पतेरानन्दाः । स एकः प्रजापतेरा-
नन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥

अर्थ–ते जे बृहस्पतीचे शभर आनन्द तो प्रजापतीचा ( ह्म० विराट् पुरुषाचा ) व निष्काम श्रोत्रियाचा एक आनन्द आहे. ( आता श्रुति आनदाचा शेवटचा अकरावा पर्याय सागते—)

ते ये शतं प्रजापतेरानन्दाः । स एको ब्रह्मण
आनन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य ॥

अर्थ–ते जे प्रजापतीचे शभर आनद तो ब्रह्माचा व निष्काम श्रोत्रियाचा एक आनन्द आहे. ( येथें ब्रह्मा ह्म० सर्व ससारमडळाला व्यापणारा समष्टि-व्यष्टिरूप सूत्रात्मा हिरण्यगर्भ. तो सर्व शरीरवानांतील पहिला आहे त्यामुळें सर्व सासारिक आनदाचा उत्कर्ष त्याच्यामध्यें परिसमाप्त होतो आणि वर दाखविल्याप्रमाणें श्रोत्रियाचे ठिकाणी सर्व आनन्द असल्यामुळें ' तो ब्रह्मविद् सर्व कामांत एकाच वेळी

भोगतो ' ( पृष्ठ ४८ ). हीं आरंभीं केलेली प्रतिज्ञा उपपन्न होते. श्रीशंकरानन्द ह्मणतात–हिरण्यगर्भाहून उत्कृष्ट असलेला जो ब्रह्मानन्द तो वाणी व मन यांचा विषय होत नाहीं. त्यामुळें हिरण्यगर्भाचा आनन्द हाच ब्रह्मानन्दरूप सागराच्या एका बिंदूसारखा आहे; असें ह्मणून व ब्रह्मानन्दाची नुसती दिशा दाखवून श्रुतीनें तूष्णींभाव स्वीकारला आहे. इ० आतां यापुढें त्याकरितां तो स्वप्रकाश आनन्दात्माच प्रमाण आहे, मी नव्हे, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. याप्रमाणें परमानन्दाच्या द्वारभूत सांसारिक आनन्दाचा उत्कर्ष, आगम व श्रोत्रियाचा अनुभव यांच्या योगानें श्रुतीनें दाखविला. आतां ज्याचा मुख्यतः बोध करावयाचा' आहे तोच ब्रह्मानन्द दाखवितात— )

**स यश्चायं पुरुषे । यश्चासावादित्ये । स एकः ॥**

अर्थ–' सः ' तो–परोक्ष, हिरण्यगर्भाहून उत्कृष्ट आनन्द 'च यः अयं–' आणि जो हा स्वयं प्रकाशमान आनंद ' पुरुषे– ' पुरुषशब्दवाच्य पंचकोशात्मक देहांत ब्रह्म पुच्छरूपानें सांगितला आहे ' च यः असौ आदित्ये–' आणि तसाच जो हा आदित्यामध्यें आहे (ह्मणजे पुरुषांत व आदित्यांत राहणारा जो आनंद, अर्थात् आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक आनन्द ) ' सः एकः–' तो एक आहे. ( अर्थात् मानुषानन्द, देवानन्द इत्यादि भासणारा भेद वास्तविक नसून तो मानुष, देव इत्यादि भेदरूप उपाधिप्रयुक्तच आहे. त्यामुळें त्याचा स्वरूपतः भेद नाहीं. जिज्ञासूंनीं–ब्रह्मादिस्थावरान्त आनन्दांचा वास्तविक भेद नाहीं. कारण ते सर्व एका ब्रह्मानन्दरूप सागराचे लेश आहेत,– असा निश्चय करावा; असें वरील मीमांसेच्या योगानें ठरलें. आतां त्या आनन्दाला जाणण्याचें फळ सांगतात— )

**स य एवंवित् । अस्माल्लोकात्प्रेत्य । एतमन्नमयमात्मानमुपसंक्रामति । एतं प्राणमयमात्मानमुपसं-**

क्रामति । एतं मनोमयमात्मानमुपसंक्रामति । एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रामति । एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति । तदप्येष श्लोको भवति ॥

( इति ब्रह्मवल्ल्यध्यायेऽष्टमोऽनुवाक )

अर्थ-' सः यः एवंविद्-' तो जो असें जाणणारा ( आदित्य व पुरुष यांतील ब्रह्मानन्द एक आहे, असें समजणारा ) पुरुष तो ' अस्मात् लोकात् प्रेत्य- ' या लोकांतून ह्म० प्रत्यक्ष दिसणाऱ्या या दृष्टादृष्ट साधनफलरूप पुत्रादि लोकापासून निवृत्त होऊन, त्याविषयीं निरपेक्ष होऊन ( मेल्याप्रमाणेंच त्याविषयीं अभिलाषशून्य होऊन ) ' एतं अन्नमयं आत्मानं उपसंक्रामति- ' या श्रुतिबोधित पूर्वोक्त अन्नमय आत्म्यास-इंद्रियांच्या द्वारा विषय प्राप्त करून देणाऱ्या देहास-अगदीं सामीप्यानें प्राप्त होतो. पुत्रादि बाह्य पदार्थांच्या सुखदुःखावरील अभिमान सोडून हा अन्नमयच मी आहें, अशी भावना दृढ करतो. (किंवा शंकरानन्द ह्मणतात — अन्नमय आध्यात्मिकादिभेदभिन्न जरी असला तरी तो आरोपित आहे. यास्तव वस्तुत. मीच हें सर्व आहें; असें यथार्थपणें जाणतो त्याचप्रमाणें पुढील प्राणमयादि पर्यायात जाणावें. ) तसाच तो अन्नमयावरील आसक्ति कमी करून प्राणमय आत्माच मी आहें, असा निश्चय दृढ करतो. प्राणमयावरील आसक्ति सोडून मनोमय आत्माच मी आहें, अशी भावना दृढ करतो नंतर मनोमयावरील अभिमान सोडून विज्ञानमय आत्मा मी आहें, असें जाणतो; आणि शेवटीं विज्ञानमयालाही सोडून आनन्दमय आत्मा मी आहें, असें तो समजतो. ह्मणजे तो उत्तरोत्तर त्या त्या कोशाशीं तादात्म्य पावत जातो आनन्दमयापर्यंत जाऊन पोचल्यावर त्याच्या प्रियादि अवयवावरील आसक्ति कमी करून शेवटीं उपासक पुच्छरूप ब्रह्मामध्यें पर्यवसान पावतो. ज्ञान होण्यापूर्वी मी देह आहें, ब्राह्मण

आहें. इत्यादि जसें तो समजत होता तसेंच आतां ज्ञान झाल्यावर मी सर्वाधार ब्रह्म आहें, असें समजून शांत होतो. त्यानंतर "मी विज्ञान; मन, प्राण, देह किंवा बाह्य पुत्रादि आहें, असा भ्रम त्याला होत नाहीं: तर तो मी सर्व चराचरांचा आत्मा आहें, अशा दृढ निश्चयामुळें आनन्द ब्रह्म होतो. ) ' तदपि एष श्लोको भवति– ' त्या पंचकोशाधिष्ठान अवाङ्मनसगोचर पुच्छरूप ब्रह्मरसाविषयीं हा श्लोक–मंत्र–आहे. ( जो ज्या स्वरूपाचा असतो तो त्याला च भीत नाहीं, जसा–वाघ आपल्यालाच कधीं भीत नाहीं, असें सांगण्यासाठीं हा मंत्र प्रवृत्त झाला आहे. ) ८.

---

यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह ।
आनन्दं ब्रह्मणो विद्वान् । न बिभेति कुतश्चनेति ॥

अर्थ–( चवथ्या अनुवाकाच्या आरंभीं या मंत्राचा सविस्तर अर्थ सांगितला आहे. तथापि शब्दार्थ असा–) ज्याच्यापासून वाणी मनःसह त्याला प्राप्त न होतां परत फिरतात त्या ब्रह्माच्या आनन्दाला जाणणारा विद्वान् कोणालाही भीत नाहीं. ( पूर्वी मनोमयाचें प्रकरण असल्यामुळें मनोमयाची उपासना करणाराला केव्हांही–या जन्मीं किंवा जन्मान्तरीं–भीति नसते. कारण भीतीचें निमित्त जरी उपस्थित झालें तरी तो त्याचें निवारण करूं शकतो, असें सांगितलें व आतां अद्वितीय ब्रह्मानन्दच मी आहें, असें स्वानुभवानें जाणणाऱ्या त्याला भीतीचें कांहीं कारणच रहात नाहीं, अशा अभिप्रायानें ' कुतश्चन ' असें ह्मटलें आहे. ' अहो पण धर्म व अधर्म हीं दोन्हीं संतापाचीं कारणें विद्यमान असतांना तो कोणालाही भीत नाहीं, असें कसें ह्मणतां येईल ? ' अशी शंका कोणी घेईल, ह्मणून श्रुति सांगते—)

एतं ह वाव न तपति । किमहं साधु नाकरवम् ।
किमहं पापमकरवमिति ॥

अर्थ—( मरणकाल समीप आला असता सर्व प्राण्याच्या मनात ) 'अहं साधु किं न अकरवम्, अहं पापं किं अकरवं इति एतं ह वाव न तपति–' मी पूर्वी शरीरसामर्थ्य व द्रव्यादिसंपत्ति यांचें आनुकुल्य असताना ( स्वर्गादिकाचें साधन ) यागादि पुण्य कर्म का केलें नाहीं ( परद्रव्यापहारादि नरकसाधन ) पाप का केलें ? ( अशी चिंता उद्भवते. पण तसली चिंता ) या एका ब्रह्मवेत्त्यालाच संतप्त करीत नाहीं ( कारण–)

स य एवं विद्वानेते आत्मानं स्पृणुते । उभे ह्येवैष एते आत्मानं स्पृणुते । य एवं वेद । इत्युपनिषद् ॥

( इति ब्रह्मवल्ल्यध्याये नवमोऽनुवाकः )

अर्थ–तो जो असें ( ह्य० हीं पुण्य-पाप कर्मे संतापाचीं निमित्तें आहेत, असें शास्त्र व युक्ति यावरून ) जाणणारा विद्वान् असतो तो पुरुष ( कर्मप्रयुक्त संतापनिवारणार्थ ) आत्म्याला बलयुक्त करतो. ( हा आत्मा साक्षी आहे, धर्माधर्मांचा कर्ता नव्हे, अशा निश्चयानें तो संतापरहित–प्रीत होतो, असा याचा भावार्थ ' अहो पण आत्मा अकर्ता व ब्रह्म आहे, असें जरी ज्ञान झालेलें असलें तरी वर्तमान देहेंद्रियाच्या योगानें पुण्यपाप अवश्य होतें त्याचप्रमाणें पूर्वसंचित पुण्यपापही असतें, ' अशी आशंका घेऊन श्रुति सांगते–) ' यः एवं वेद सः एषः उभे हि एव एते आत्मानं स्पृणुते–' जो पुरुष अशा प्रकारें पुण्य व पाप तापाचें निमित्त आहे व आत्मज्ञान त्याचें निवारक आहे, असें जाणतो तो हीं दोन्हीं–पुण्य व पाप–आत्माच आहे, असें पाहतो. ( चार्वाक धर्माधर्मजन्य पुण्यपाप मुळीं नाहींच, असें समजतो, म्हणून तो नास्तिक पण हा तत्त्वज्ञ धर्माधर्मजन्य पुण्यपाप आत्मस्वरूपाहून पृथक्–स्वतंत्रपणें विद्यमान–नाहीं, असें जाणतो. ) 'इति उपनिषद्–' असें हें उपनिषद् आहे ( उपनिषद् ह्य० ब्रह्मविद्याप्रतिपादक ग्रंथ. हें शेवटचें वाक्य अनुवाकाचा उपसंहार करण्यासाठीं आहे. ) ९

सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवा-
वहै । तेजस्विनावधीतमस्तु । मा विद्विषावहै । ॐ
शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

( इति अष्टमः प्रपाठकः । )

अर्थ—या शांतीचा अर्थ वर ( पृष्ठ ४९ ) पहावा. येथें तैत्तिरीय आरण्यकाचा आठवा प्रपाठक व उपनिषदाचा दुसरा ब्रह्मवल्ल्यध्याय समाप्त झाला.

---

अथ भृगुवल्ल्यध्यायः ।

हरि ॐ ' सह नाववतु० ' इत्यादि शान्ति ।

भृगुर्वै वारुणिः । वरुणं पितरमुपससार । अधीहि
भगवो ब्रह्मेति ॥

अर्थ—दुसऱ्या अध्यायात ब्रह्मविद्येचें निरूपण केलें. आता तिसऱ्या अध्यायात त्याच्या साधनाचें निरूपण केलें जात आहे पहिल्या संहितो उपनिषदात बहिरंगसाधनभूत कर्मे व उपासना सांगितली आहे, हें खरें; परंतु तेथें विचाररूप अन्तरंग साधन सांगितलें नाहीं. यास्तव तें येथें सांगितलें जात आहे. कारण तें सांगितलें ह्मणजे मनन व निदिध्यासन हीं त्याची अगेंही सांगितल्यासारखीं होतील वेद आता अगोदर विद्यास्तुत्यर्थ उपाख्यान सांगतो. ' भृगुः वै वारुणिः—' भृगु या नावाचा कोणी एक गोत्रप्रवर्तक महर्षि होता. संहिता व ब्राह्मण या दोन्ही वेदभागात त्याची प्रसिद्धि आहे. तो वरुणाचा पुत्र होता. ' सः वरुणं पितरं उपससार—' तो आपल्या वरुण नावाच्या पित्यापाशीं शिष्यभावानें—गुरूपसदन—न्यायानें—गेला. ' हे भगवः ब्रह्म अधीहि इति ( उपससार )—' हे पूज्यस्वरूप गुरो, ब्रह्माचें चांगलें स्मरण कर. ( आपल्या मनानें त्याचें चांगलें स्मरण करून मला त्याचा उपदेश कर, अशा अर्थाचा मत्र ह्मणत त्यानें गुरूपसदन केलें. )

वर सांगितल्याप्रमाणें भृगु वरुण–पित्यापाशीं शिष्यभावानें उपदेशार्थ आला असता पिता—

**तस्मा एतत्प्रोवाच । अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनो वाचमिति ॥**

अर्थ—'तस्मै–' त्या ' अधीहि भगवो ब्रह्म ' इत्यादि मंत्र ह्मणून समीप आलेल्या भृगूला ' एतत् प्रोवाच–' हें अन्नादिक–ब्रह्मबोधाचें द्वार–सांगता झाला. ' अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनः वाचं–' अन्न ह्म० शरीर–अन्नमय कोश ( अर्थात् आध्यात्मिकादि–भेदानें त्रिविध शरीरें ), प्राणमयकोश ( क्रियाशक्तिमान्, शरीरस्थ अत्ता–अन्नभक्षक ), चक्षुरिन्द्रिय, श्रोत्रेन्द्रिय, मन ( अर्थात् ज्ञानशक्तियुक्त साधनें ) व वाक् ( शब्दोच्चाराचें साधन ) ' इति–' अशाप्रकारें ( पिता त्या पुत्राला ब्रह्मज्ञानाच्या द्वाराचा उपदेश करता झाला. मन हें अन्तःकरण सर्व इंद्रियांना साधारण आहे. शाखाग्रावर चंद्र आहे, असें ह्मटलें असतां चंद्र पाहण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्याची दृष्टि शाखाग्राकडे वळते व चंद्रदर्शन होतें. ह्मणजे शाखाग्र चंद्राचें लक्षक होतें. त्यामुळें लक्षक या रूपानें तें चंद्रदर्शनाचें द्वार होतें. त्याचप्रमाणें बुद्धिरूप गुहेत स्थित असलेल्या ब्रह्मदर्शनाचीं उपलक्षक अन्न प्राणादिक हीं, त्याचीं द्वारें आहेत अर्थात् 'अहं' या प्रतीतीवरून ज्ञात होणाऱ्या अन्नमय, प्राणमय इत्यादिकांमध्यें ब्रह्माला शोधावें. श्रीशंकरानन्द ह्मणतात–भोक्ता, भोग्य व भोगसाधनें यांचा समूह हाच सर्व प्रपंच आहे. तो प्रपंच हेंच ब्रह्माचें लक्षण, येथें सांगितलें आहे. कारण आत्म्याचें यथार्थ ज्ञान होईपर्यंत साधकाला मला कांहीं कळतें, मी विद्वान् आहें, असा अभिमान असतो. वास्तव तो नाहींसा व्हावा ह्मणून जिज्ञासु पुरुषाला प्रपंचांतीलच भोग्य, भोगसाधन किंवा भोक्ता यांतील कोणत्या तरी एकाद्या वस्तूमध्यें ब्रह्मदृष्टि ठेवून उपासना करावी लागते. ति॰श यो·

गानें त्याचें पाप क्षीण होतें. पापाचा क्षय झाला असता साक्षात्काराला प्रतिबंध करणारे अभिमानादि दोष नाहींसे होतात आणि त्यामुळे ब्रह्म-साक्षात्कार निर्विघ्नपणें होऊं शकतो. त्यावाचून तो होत नाहीं अशा अभिप्रायानें श्रुति सांगते—)

तं होवाच । यतो वा इमानि भूतानि जायन्ते ।
येन जातानि जीवन्ति । यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति ।
तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति ॥

अर्थ—'तं–' ज्याला वरील द्वाराचा उपदेश केला आहे त्या-ज्ञानाचीं द्वारें ऐकून साक्षात् ज्ञान ऐकण्याविषयीं अतिशय उत्सुक झालेल्या–भृगूला 'ह उवाच–' खरोखर पिता ह्मणाला 'यतः–' ज्या वस्तूपासून, ज्या एका निमित्त व उपादान कारणापासून 'इमानि वै भूतानि जायन्ते–' हीं प्रसिद्ध असलेलीं भूतें–आकाशादिक पंचभूतें व स्वेदजादिक भौतिक शरीरें–उत्पन्न होतात, 'येन–' ज्या जीवनकारणभूत वस्तूच्या योगानें 'जातानि–' उत्पन्न झालेलीं तीं 'जीवन्ति–' जिवंत राहतात, प्राणधारण करणें, एतद्रूप स्थिति करितात, घटाच्या मृत्ति-कारूप उपादान कारणाप्रमाणें 'यत्–' ज्या लयस्थानीं 'प्रयन्ति (सन्ति)–' आपला कार्यस्वभाव सोडून जाणारीं भूतें 'अभि-संविशन्ति–' पूर्णपणें प्रवेश करितात (ह्मo ज्याप्रमाणें फेस, तरंग, बुडबुडे इत्यादिकाची उत्पत्ति, स्थिति व लय समुद्रात होतात त्याप्रमाणें प्रपंचाच उत्पत्ति स्थिति लय ज्यामध्यें होतात) 'तत् विजिज्ञा-सस्व–' त्याला विशेषें करून–तेंच मा आहे, अशा भावनेन–जाण-ण्याची इच्छा कर त्याच्याविषयीं विचार कर 'तत् ब्रह्म–' तेंच तू विचारलेलें ब्रह्म आहे 'इति' हा शब्द पित्याचें उत्तर संपलें, असें सुचवितो.

स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ॥

(इति तृतीये भृगुवल्ल्यध्याये प्रथमोऽनुवाकः ।)

अर्थ--ज्यानें पित्याचें वरील वाक्य मोठ्या श्रद्धेनें ऐकलें आहे असा **'सः तपः अतप्यत-'** तो तप करता झाला. ( येथें तप ह्म० आलोचन. अन्नादि उक्त द्वारांतील कोणत्या द्वाराचे ठिकाणीं 'यतो वा०' इत्यादि वाक्यातील लक्षण आहे, असा त्यानें विचार केला, असा याचा अभिप्राय. ) 'सः तपः तप्त्वा-' तो तप करून ( विचार करून पुढें सांगितल्याप्रमाणें निश्चय करता झाला. **सायणाचार्य** ह्मण-तात—येथें तप शब्दानें चारी आश्रमाचा धर्म विवक्षित आहे. कारण तोच ब्रह्मज्ञानाचें निमित्त आहे. अनाश्रमी विधुरादिकाचा जपादि धर्मही ज्ञानाचें निमित्त होतो, असें जरी सांगितलेलें असलें तरी आश्रमी पुरुषाचा धर्म अतिशय प्रशस्त आहे, असें भगवान् व्यासांनीं उत्तर मीमांसेंत ( अ. ३ पा. ४ सू. ३९ ) सांगितलें आहे. शिवाय श्रुति व स्मृति यामध्यें आश्रमधर्म या अर्थीही तप शब्दाचा उपयोग केलेला आढळतो. जसें 'तपो हि स्वाध्याय' या वाक्यांत स्वाध्यायरूप ब्रह्मचारिधर्माचे ठिकाणीं तपःशब्दाचा प्रयोग केला आहे 'एतत्खलु वाव तप इत्याहुर्य स्व ददाति' या वाक्यांत धनदान या गृहस्थाच्या धर्माला तप ह्मटलें आहे, 'तपो नानशनात्परं' या वाक्यांत वनस्था-च्या अनशनाला-उपवासाला-तप ह्मटलें आहे आणि 'मनसश्चेन्द्रि-याणां च ह्यैकाग्र्यं परमं तपः' या वाक्यांत ऐकाग्र्याला ह्म० यति-धर्माला तप ह्मटलें आहे आणि तीं चारी तपें ब्रह्मज्ञानोपकारक आहेत. स्वाध्यायाच्या योगानें ब्रह्मज्ञानाविषयीं प्रमाण निष्पन्न होतें, दानाच्या योगानें विविदिषा उत्पन्न होते, उपवासाच्या योगानें इंद्रि-याच्या दर्पाचें निवारण होतें आणि ऐकाग्र्य हें तर ज्ञानाचें साक्षात् कारण आहे. **श्रीशंकराचार्यांनीं** 'तप -' शब्दानें केवळ ऐकाग्र्याचेंच ग्रहण केलें आहे भाष्यार्थांत त्याचा विशेष खुलासा होईल. वेदभाष्य-कार **सायणाचार्यांनीं** या अध्यायाचा एकच अनुवाक मानला आहे.

पण वेदिक, आचार्य व शंकरानन्दादि याच्या मताप्रमाणें आम्हीं याही अध्यायाचे अनुवाक तोडले आहेत. ) १

---

अन्नं ब्रह्मेति व्यजानात् । अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । अन्नेन जातानि जीवन्ति । अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥

अर्थ—' सः अन्नं ब्रह्म इति व्यजानात्–' तो भृगु (स्वाध्यायपूर्वक ऐकाग्र्यरूप तप व त्या तपाच्या योगानें विचार करून आणि पूर्वोक्त लक्षण योजून प्रथम) अन्नच ब्रह्म आहे, असा निश्चय करता झाला.' हि–' कारण 'अन्नात् एव खलु इमानि भूतानि जायन्ते–' अन्नापासूनच खरोखर हीं देहरूप भूतें उत्पन्न होतात. उत्पन्न झालेलीं तीं अन्नाच्या योगानेंच जिवत राहतात. लीन होताना अन्नातच सर्वथा प्रवेश करितात. ' इति (व्यजानात्)–' अशा रीतीनें जाणता झाला, असा संबंध.

तद्विज्ञाय । पुनरेव वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तं होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ॥ ( इति भृगुवल्ल्यध्याये द्वितीयोऽनुवाक । )

अर्थ—' तत् विज्ञाय–' तें अन्न ब्रह्म आहे, असें जाणून ( पण त्या ज्ञानानें चित्ताचें समाधान न झाल्यामुळें ) ' पुनर् एव ' अधीहि भगव ब्रह्म ' इति वरुणं पितरं उपसार–' पुनरपि ' हे भगवन्, ब्रह्माचें स्मरण करा व मला त्याचा उपदेश करा, ' अशा अर्थाचा उपसरण मंत्र ह्मणत वरुण पित्याजवळ गेला. तेव्हा पिता त्याला ह्मणाला, "तपाच्या योगानें ( साधनरूप ज्ञानानें तू स्वत.च ) ब्रह्माला विशेष प्रकारें जाण्याची इच्छा कर. कारण तें पूर्वोक्त विचाररूप तपच ब्रह्म

आहे." तें ऐकून त्यानें तप केलें आणि तो तप करून (पुढें सांगितल्या-प्रमाणें निश्चय करता झाला. शंकरानन्द ह्मणतात—यावरून ब्रह्मजिज्ञासूनें नित्यानित्यवस्तुविवेकादि साधन संपादन करावें. पण तें संपादन करावयास अशक्त असलेल्या साधकानें अन्नाच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी, असें अर्थात् सिद्ध होतें. ) २.

---

प्राणो ब्रह्मेति व्यजानात् । प्राणाद्ध्येव खल्वि-
मानि भूतानि जायन्ते । प्राणेन जातानि जीवन्ति ।
प्राणं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तद्विज्ञाय । पुनरेव
वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति ।
तं होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति ।
स तपोऽतप्यत । सतपस्तप्त्वा ॥

( इति भृगुवल्ल्यध्याये तृतीयोऽनुवाकः )

अर्थ—( अन्नच ब्रह्म आहे, असा जरी त्यानें निश्चय केला होता तरी त्यामुळें त्याच्या चित्ताला समाधान वाटलें नाहीं. कारण अन्न कुजतें, तेव्हा तें प्रपंचाचें कारण कसें होईल ? शरीरही प्राण-रहित असलें तर कुजल्याशिवाय रहात नाहीं तेव्हां अन्नाला ब्रह्म कसें ह्मणता येईल, असा त्याचा त्यालाच संशय आला; आणि तो घालविण्यासाठीं आळस न करिता अथवा मला जें समजलें आहे तेंच खरें आहे, असा आग्रह न धरता नम्रपणानें व जिज्ञासाबुद्धीनें पित्या-पाशीं गेला. पण वरुणानें त्याला साक्षात् ब्रह्म न सांगतां किंवा आधुनिक गुरुंप्रमाणें मस्तकावर हात ठेवून शिष्याला कृतार्थ न करितां तूं आपणच विचार कर; ऐकाग्र्यरूप तप हेंच ब्रह्म आहे, कारण तेंच ब्रह्माचें मुख्य साधन आहे, असें ह्मटलें. शिवाय पूर्वोक्त सत्य-ज्ञानादि स्वरूपलक्षणपर वाक्यानें ब्रह्माचा उपदेश केल्यास तें आगमप्रमाणाचें प्रमेय होईल आणि त्यामुळें आपल्या भृगु-

पुत्राला धर्माधर्मांप्रमाणें परोक्ष ब्रह्माचेंच ज्ञान होईल. अपरोक्ष ब्रह्मसाक्षात्कार होणार नाहीं. पण त्यानें ऐकाग्र्यमनानें आपल्या-, पाशींच चांगला विचार केल्यास त्याला तो होईल; अशा अभिप्रायानें वरुणानें आपल्या आत्मरूप पुत्रालाही ब्रह्माचें स्वरूपलक्षण न सांगता तप करावयासच सांगितलें. तेव्हां भृगूनेंही एकाग्रचित्तानें विचार करून व प्राणाचे ठिकाणीं जगत्कारणत्वलक्षण योजून प्राण ब्रह्म आहे, असा निश्चय केला. ऐतरेय शाखाध्यायी ब्राह्मणानीं 'न ह वा ऋते प्राणाद्रेतः सिच्यते पूयेत्र सम्भवेत् ।' *या वाक्यात प्राणरहित* रेत गर्भाशयातून कुजून बाहेर पडेल. त्याच्यापासून शरीरोत्पत्ति होणार नाहीं, असें ह्मटलें आहे. त्यावरून प्राण शरीरोत्पत्तीचें कारण आहे, *असा निश्चय होऊ शकतो. कारण कोणताही लिंगशरीरयुक्त जीव* स्वर्गांतील सुखोपभोगानें पुण्याचा व नरकातील दु खोपभोगानें पापाचा क्षय होताच तिसऱ्या रत्नात (पृष्ठ २९७) सांगितल्याप्रमाणें वृष्टीच्या द्वारा *भूलोकीं येऊन अन्नासहवर्तमान पुरुषात प्रवेश करून रेतासह स्त्रीगर्भांत* जेव्हां प्रवेश करतो तेव्हां रेताबरोबरच गर्भाशयात गेलेला प्राणवायु रेताला सुकवून पिंडादि क्रमानें त्या जीवाच्या देहाला वाढवितो; आणि *त्या रेतामध्यें प्राण नसल्यास त्याचा शरीराकार परिणाम होत नाहीं,* *यास्तव प्राण उत्पत्तीचें निमित्त आहे त्याचप्रमाणें प्राण देहाच्या स्थितीचें* निमित्त आहे, असें 'यावदस्मिञ्शरीरे प्राणो वसति तावदायु' ।' या कौषीतकी शाखेच्या उपनिषद्वाक्यांत ह्मटलें आहे आणि प्राण निघून गेला असता देहाला मरण येतें, हें तर प्रसिद्ध आहे. यास्तव प्राण प्रपंचाचें उपादान कारण जरी नसला तरी जन्म-स्थिति-नाशाचें निमित्त आहे. यास्तव तेंच ब्रह्म आहे, असा त्यानें निश्चय केला आता अक्षरार्थ सांगतों— ) प्राणच ब्रह्म आहे, असें तो जाणता झाला. कारण प्राणापासूनच हीं भूतें होतात. उत्पन्न झालेलीं तीं प्राणाच्या

योगानेंच जिवत राहतात. लीन होताना प्राणामध्येंच प्रवेश करितात, असें जाणून पुनरपि संशय आल्यामुळें तो ' भगवन्, ब्रह्माचें स्मरण करून मला उपदेश करा, ' अशा अर्थाचा मत्र ह्मणत वरुण पित्यापाशीं गेला. तेव्हा पिता त्याला ह्मणाला " तू विचाररूप तपानें ब्रह्माला साक्षात् जाणण्याची इच्छा कर. कारण विचाररूप तपच ब्रह्माचें मुख्य साधन असल्यामुळें ब्रह्म आहे " तेव्हा तो भृगु तप करता झाला आणि त्यानें तप करून ( असा निश्चय केला. प्राण जड आहे त्यामुळें त्याला ब्रह्म ह्मणणें सयुक्तिक नाहीं. कारण 'प्रज्ञान ब्रह्म, विज्ञानमानन्द ब्रह्म ' इत्यादि वाक्यावरून ब्रह्म चेतन आहे, असें प्रतीत होतें. मन ज्ञानशक्तियुक्त आहे यास्तव तें चेतन आहे, आणि जन्मादिकाचें कारणत्व हें लक्षणही त्याच्या ठिकाणीं सभवतें. कारण वरच्या पर्यायात गर्भांत प्राणानें प्रवेश करणें हें जसें शरीरोत्पत्तीचें निमित्त सागितलें आहे त्याप्रमाणें प्रश्नोपनिषदातील 'मनोकृतेनायात्यस्मिञ्शरीरे' या वाक्यात प्राणाचा प्रवेश मनाच्या अधीन आहे, असें सागितलें आहे मन कृत ह्मणजे मन सकल्प, त्याच्या योगानें तो या शरीरात येतो, असा त्या वाक्याचा अर्थ आहे त्याचप्रमाणें कृषि, वाणिज्य इत्यादि जीवनाचा उपाय मनानें विचार केल्यावाचून सपादन करता येत नाहीं यास्तव मनच शरीराच्या स्थितीचें निमित्त आहे, आणि मनानें शरीराचा त्याग केला ह्मणजेच मरण येत असल्यामुळें मन मरणाचेंही निमित्त आहे, असें ठरतें असा विचार हेंच तप करून मनच ब्रह्म आहे, असा पुढील पर्यायात सागितल्याप्रमाणें त्यानें निश्चय केला). ३.

---

मनो ब्रह्मेति व्यजानात् । मनसो ह्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । मनसा जातानि जीवन्ति । मनः प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तद्विज्ञाय पुनरेव वरुणं

पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तं होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ॥

( इति भृगुवल्ल्यध्याये चतुर्थोऽनुवाक । )

अर्थ—वर सांगितल्याप्रमाणें आपल्या पाशींच विचाररूप तप करून तो मन ब्रह्म आहे असें जाणता झाला कारण मनापासूनच हीं सर्व भूतें उत्पन्न होतात मनाच्या योगानेंच उत्पन्न झालेलीं तीं जिवत राहतात लीन होत असताना मनातच लय पावतात ( यास्तव मनच ब्रह्म आहे, असा तो निश्चय करता झाला. पण त्यामुळें त्याच्या मनाला समाधान वाटेना कारण मन चक्षुरादि इतर इंद्रियाप्रमाणें करण असल्यामुळें तें कर्त्याच्या अधीन असतें त्यामुळें त्याला ब्रह्मत्व संभवत नाहीं, असें वाटून) तो पुन पित्याकडे पूर्वोक्त मंत्र ह्मणत गेला. पित्यानेंही त्याला पूर्वीप्रमाणेंच तप करावयास सांगितलें. तेव्हा त्यानें—' विज्ञान यज्ञ तनुते ' (पृष्ठ ६४) या पूर्व अध्यायातील वाक्यावरून विज्ञानच कर्ता आहे, असा निश्चय होतो उत्पत्त्यादिकाचें निमित्त होणें, हें ब्रह्मलक्षण त्याच्या ठिकाणीं संभवतें केलेल्या कर्मांच्या द्वारा तें देहोत्पत्तीचें निमित्त होतें. कृष्यादि लौकिक कर्मांचें कर्तृत्वही त्याच्याकडे असतें त्यामुळें तें जीवनाचें निमित्तही आहे आणि मरणाला कारण होणाऱ्या युद्धादिकाचें कर्तृत्वही त्याच्याकडेच असल्यामुळें तेंच ब्रह्मलक्षणानें लक्षित आहे–असा विचार हेंच तप केलें, आणि तें तप करून पुढें सांगितल्याप्रमाणें निश्चय केला. ४.

---

विज्ञानं ब्रह्मेति व्यजानात्। विज्ञानाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । विज्ञानेन जातानि जीवन्ति । विज्ञानं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तद्विज्ञाय ।

पुनरेव वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तं होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ।

( इति भृगुवल्ल्यध्याये पञ्चमोऽनुवाकः । )

अर्थ–विज्ञान ब्रह्म आहे, कारण विज्ञानापासूनच खरोखर हीं सर्व भूतें उत्पन्न होतात उत्पन्न झालेलीं तीं विज्ञानाच्या योगानेंच जिवंत राहतात, आणि आपला कार्यभाग सोडताना विज्ञानातच प्रवेश करितात, यास्तव विज्ञानच ब्रह्म आहे, असा त्यानें निश्चय केला (पण कर्तृत्व क्लेशाला कारण होतें यास्तव विज्ञान ब्रह्म नव्हे शिवाय अन्नापासून विज्ञानापर्यंत जे चार पदार्थ वर सांगितले आहेत ते सर्व भूतांचे हेतू आहेत, असें ह्मणता येत नाहीं कारण आकाशादि भूतें अन्नादि भौतिक पदार्थांपासून होण्याचा संभव नाहीं, असा संशय आल्यामुळें ) तो पुनरपि आपल्या पित्यापाशीं 'अधीहि भगवो०' इत्यादि मंत्र ह्मणत गेला पण पिता त्याला ह्मणाला, "तपाच्या योगानें तूंच ब्रह्माला जाण कारण विचाररूप तप हेंच ब्रह्मप्रापक असल्यामुळें ब्रह्म आहे" तेव्हा त्यानें तप केलें आणि विचार करून ( असा निश्चय केला –विज्ञानाप्रमाणें आनंद क्लेशकर नाहीं ह्मणूनच सर्व प्राणी त्याची इच्छा करतात तो सर्व जीवांना अत्यंत अभीष्ट असल्यामुळें परम पुरुषार्थही आहे त्याला आकाशादि भूतांचें कारणत्वही आहे यास्तव तो आनंदच ब्रह्म आहे ) ५

---

आनन्दो ब्रह्मेति व्यजानात् । आनन्दाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । आनन्देन जातानि जीवन्ति । आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥

अर्थ–आनंदच ब्रह्म आहे, असें तो जाणता झाला कारण आनंदापासूनच खरोखर हीं भूतें उत्पन्न होतात, उत्पन्न झालेलीं तीं

आनंदाच्या योगानेंच जिवंत राहतात आणि कार्यभाव सोडीत असताना तीं आनदातच प्रवेश करितात ( यास्तव आनदच ब्रह्म आहे. **श्रीशंकरानंद** ह्मणतात–अन्नामध्ये विनाशित्व, प्राणामध्यें जडत्व, मनामध्यें अनिश्चयात्मकत्व व विज्ञानामध्यें सुख-दुःखभोक्तृत्व हा दोष असल्यामुळें त्यांतील एकालाही ब्रह्म ह्मणता येत नाहीं. ' चक्षु श्रोत्र० ' इत्यादि (पृष्ठ ९०) पूर्वोक्त वाक्यांत विज्ञान जरी सागितलेलें नसलें तरी वागादि क्रियाशक्ति व चक्षुरादि ज्ञानशक्ति यांचें अस्तित्व प्राण व मन यांच्या अधीन असतें व मन विज्ञानाच्या तन्त्रानें असतें, असा अनुभव आहे. यास्तव भृगूनें न सागितलेल्याही त्याला आपल्या बुद्धीनें जाणलें. )

असो; या वरील आख्यायिकेंत भृगूनें जगाचें कारण ह्मणून ज्याचा विचार केला आहे त्या आनन्दरूप ब्रह्माच्या साक्षात्काराचें चित्तैकाग्र्यरूप तप हेंच अन्तरग साधन आहे, असें सागितलें. पण *अन्नादि चार पदार्थांहून आनन्दरूप पाचवें पृथक् तत्त्व जसें आहे,* तसें त्या आनदाहूनही आणखीं पृथक् सहावें तत्त्व आहे कीं काय, अशी शका आली असता श्रुति तिचें निवारण करण्यासाठीं पूर्वोक्त *विद्येचा उपसहार करिते*—

सैषा भार्गवी वारुणी विद्या। परमे व्योमन्प्रतिष्ठिता ॥

अर्थ–' **सा**–' ती–इतर श्रुतींत प्रसिद्ध असलेली–' **एषा**–' ही–एकाग्र चित्ताच्या योगानें साक्षात् अनुभवास आलेली ' **भार्गवी**–' भृगूनें प्राप्त करून घेतलेली व ' **वारुणी**–' वरुणानें सागितलेली ' **विद्या**–' ब्रह्मविद्या **परम आकाशांत** ( आनन्दात्म्यामध्यें ) प्रतिष्ठित आहे, आनन्दात्म्यामध्येंच तिचें पर्यवसान झालें आहे; ती विद्या ब्रह्मतत्त्वामध्यें सर्व प्रकारें समाप्त झाली आहे.

ज्याचें चित्त एकाग्र झालें आहे, अशा उत्तम अधिकाऱ्याला ही विद्या अगदीं सुलभ आहे. पण संसारातील एखाद्या फलाच्या इच्छेनें ज्याचें चित्त चंचल झालेलें असतें त्याला तें फलही याच्या उपासनेनें मिळू शकतें, असें सांगण्याच्या हेतूनें चित्तैकाग्र्याला कारण होणाऱ्या, उपासनेचें विधान श्रुति करते—

**स य एवं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भव- ति । महान्भवति । प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ॥**

( इति भृगुवल्ल्यध्याये षष्ठोऽनुवाकः । )

अर्थ—तो जो अधिकारी ' एवं—' अन्न-प्राण-मनो-विज्ञान इत्यादिकाच्या आंत असणारा आनंद मी आहें, असें साक्षात् जाणतो तो अविद्यासंस्कारशून्य होत्साता ब्रह्मामध्येंच स्थिर राहतो. पण असें जाणण्यास जो समर्थ नसतो त्यानें अन्नमयादि पंचकोशाच्या कारणामध्यें ब्रह्मदृष्टि करावी. अन्नमयादिकांचें कारण अन्नादिक आहे. आनन्दमयानें कारण आनंद असून तो आनंदच ब्रह्म या नावाचें त्याचें पुच्छ आहे. ह्मणून त्या आनंदाला ब्रह्म जाणल्यावर भृगु पुनः पित्याकडे गेला नाहीं. तस्मात् अन्नादिकाच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि ठेवून उपासना करणारा उपासक अन्तःकरणशुद्धीच्या द्वारा या शरीरात असतानाच किंवा अन्य जन्मीं ब्रह्मामध्यें प्रतिष्ठित होतो 'य एवं वेद या वाक्यानें अन्नादिकाच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि ठेवून उपासना करण्याचें विधान केलें आहे, असेंही ह्मणता येणें शक्य असल्यामुळें तशी उपा-सना करणाऱ्या पुरुषाच्या मनात लोभ उत्पन्न करण्यासाठीं त्या उपा-सनेचें दृष्ट फळही श्रुति सांगते—' **अन्नवान् अन्नादः भवति**—' तो -बहु अन्नसंपन्न व तें खाण्यास समर्थ ( रोगादिरहित ) होतो. पुत्र-पौत्रादि प्रजा, गाई, घोडे इत्यादि पशु, अध्ययनजन्य तेज इत्यादि-

कांच्या योगानें तो सर्वांहून अधिक होतो. तो प्रजादिकांविषयींच्या कीर्तिनेंही समृद्ध होतो. ६.

---

ज्या अर्थी द्वारभूत अन्नाची उपासना केली असतां ब्रह्मज्ञान होतें त्याअर्थी या उपासकानें गुरूप्रमाणेंच–

**अन्नं न निन्द्यात्। तद्व्रतम्॥**

अर्थ–अन्नाची निन्दा करूं नये. अन्नाची निंदा न करणें, हें त्या उपासकाचें व्रत आहे. ( यास्तव त्यानें त्याचें नियमानेंच पाळण करणें उचित आहे. कारण त्याच्या हातून त्या व्रताचा अतिक्रम झाल्यास उपासन अंगविकल होतें. याप्रमाणें मुख्य अन्न व अन्नाद यांची उपासना सांगून आतां त्याच्या विपरीत दुसरी उपासना श्रुति सांगते–)

**प्राणो वा अन्नम्। शरीरमन्नादम्। प्राणे शरीरं प्रतिष्ठितम्। शरीरे प्राणः प्रतिष्ठितः। तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम्॥**

अर्थ–खाल्लेलें अन्न जसें शरीरात असते त्याप्रमाणें शरीरांत राहणारा पंचवृत्तियुक्त प्राणच अन्न आहे; आणि आपल्यांतील त्या प्राणरूप अन्नाला धारण करीत असल्यामुळें शरीरच अन्नाद–अन्नभोक्ता–आहे. गृहांतील स्तंभ जसा गृहाला धारण करतो त्याप्रमाणें देहस्थ प्राण देहाला धारण करीत असल्यामुळें '**प्राणे शरीरं प्रतिष्ठितम्**–' प्राणामध्यें शरीर प्रतिष्ठित आहे; आणि '**शरीरे प्राणः प्रतिष्ठितः**–' शरीरांत प्राण प्रतिष्ठित आहे, हें तर प्रसिद्ध आहे. '**तत् एतत् अन्नं अन्ने प्रतिष्ठितम्**–' याप्रमाणें तें हें अन्न अन्नामध्यें प्रतिष्ठित आहे. ( प्राणरूप अन्न शरीररूप अन्नाच्या व तें त्याच्या, अशारीतीनें परस्परांच्या आधारानें तीं दोघें राहतात

भावार्थ घरावरील आच्छादन व खालील घर हीं जशीं परस्पराच्या आधारानेंच असतात त्याप्रमाणें हें समजावें. याप्रमाणें उपास्य सांगून आता त्याची उपासना व तिचें फळ श्रुति सांगते–)

**स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान्भवति । प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ॥**

( इति तृतीये भृगुवल्ल्यध्याये सप्तमोऽनुवाकः । )

अर्थ–तो जो कोणी उपासक हें एक अन्न दुसऱ्या अन्नामध्यें प्रतिष्ठित आहे, असें जाणतो तो प्रतिष्ठित होतो. अन्नसपन्न, व अन्न भक्षण करण्यास समर्थ होतो. तो विद्येच्या योगानें सर्वांहून अधिक होतो प्रजा, पशु, ब्रह्मवर्चस तेज व त्या सर्वांविषयींची कीर्ति यांनीं सर्वांहून श्रेष्ठ होतो. ७.

---

**अन्नं न परिचक्षीत । तद्व्रतम् ॥**

अर्थ–यास्तव कोणी कोणाला अन्न देत असला तर त्याचें निवारण करू नये किंवा पात्रात वाढलेलें अन्न टाकून उठू नये. अन्नोपासकाचें तें व्रत आहे. ( पचकोशाच्या क्रमानें या पुढें मन, विज्ञान इत्यादिकाचें विधान करावयास पाहिजे होतें, पण मन व विज्ञान याना भौतिकत्व असल्यामुळें प्राणशब्दानें वायु, या भूताचा व अन्नशब्दानें सर्व भौतिकाचा अगीकार करून श्रुति भूताचेंच वर्णन पुढें करते –)

**आपो वा अन्नम् । ज्योतिरन्नादम् । अप्सु ज्योतिः प्रतिष्ठितम् । ज्योतिष्यापः प्रतिष्ठिता । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् ॥**

अर्थ–आप हेंच अन्न आहे व ज्योति अन्नाद आहे. ( प्यालेल्या जळाला उदरस्थ अग्नि शोषून टाकीत असतो. म्हणून तें अन्न व अग्नि

अन्नाद–त्याला खाणारा. ) जलात ज्योति प्रतिष्ठित आहे व ज्योतींत आप ( जल ) प्रतिष्ठित आहे. ( वृष्टीच्या जलात विद्युत् दिसते व देह सतप्त झाला असता स्वेद दिसतो. त्यामुळें तीं दोन्ही परस्पराच्या आधारानें राहतात, असें दिसतें. ह्मणून तीं परस्पराचीं अन्नेंही होतात.) याप्रमाणें हें एक अन्न दुसऱ्या अन्नात प्रतिष्ठित आहे. ( येथेंप्रमाणें उपास्य दाखवून श्रुति उपासनेचें विधान करते— )

**स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ॥**

( इति भृगुवल्ल्यध्यायेऽष्टमोऽनुवाक । )

अर्थ–तो जो उपासक हें अन्न अन्नात प्रतिष्ठित आहे, असें जाणतो, उपासना करतो तो प्रतिष्ठित होतो. तो अन्नवान् व अन्नाद होतो. विद्वत्तर होतो, प्रजा, पशु, ब्रह्मवर्चस तेज व तज्जन्य कीर्ति याच्या योगानें मोठा होतो. ८.

---

**अन्नं बहु कुर्वीत। तद्व्रतम् ॥**

अर्थ–(आठव्या अनुवाकाच्या आरंभीं भोजनसमयीं प्राप्त झालेलें अन्न चागलें नाहीं, अशा बुद्धीनें त्याचा परिहार करूं नये, असें सांगितलें आता येथें अतिथींना देण्यासाठीं ) पुष्कळ अन्न संपादन करावें. कारण प्रस्तुत अन्नोपासकाचें तें व्रत आहे, (असें सांगितलें आहे. श्रुति या अनुवाकात आणखीं एक उपास्य सांगते— )

**पृथिवी वा अन्नम् । आकाशोऽन्नादः । पृथिव्यामाकाशः प्रतिष्ठितः । आकाशे पृथिवी प्रतिष्ठिता । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् ॥**

अर्थ—सर्भोवार पसरलेल्या आकाशाच्या मध्यभागीं असलेली पृथ्वी हेंच अन्न व त्याला आपल्या उदरांत सांठविणाऱ्या आकाशाला अन्नाद म्हटलें आहे. अशाप्रकाला आकाश पृथ्वीच्या आधारानें राहिलें आहे, असें वाटतें. म्हणून पृथ्वीमध्यें आकाश प्रतिष्ठित आहे व आकाशांत पृथ्वी प्रतिष्ठित आहे, असें भासतें. ( पण विचारदृष्ट्या पाहिल्यास आकाशच पृथ्वीचा आधार आहे. त्या दोघांना परस्पर अन्नत्व आहे, असें चिंतन करण्याविषयीं श्रुति सांगते– ) तें हें अन्न अन्नांत प्रतिष्ठित आहे. ( एक दुसऱ्याच्या आधारानें राहिलें आहे. आतां त्याचीच उपासना करावयास श्रुति सांगते– )

स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ॥

इति भृगुवल्ल्यध्याये नवमोऽनुवाकः । )

अर्थ—तो जो याप्रमाणें अन्न अन्नांत प्रतिष्ठित आहे, असी उपासना करतो तो प्रतिष्ठित होतो. अन्नवान् व अन्नाद होतो. प्रजा, पशु व ब्रह्मवर्चस यांच्या योगानें मोठा होतो. कीर्तीनेंही मोठा होतो. ९.

---

न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत । तद्व्रतम् ॥

अर्थ—'कंचन-' ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत कोणाही 'वसतौ-' मी आजची रात्र तुमच्या येथें वसति करून उद्यां पुढें जाईन; मला रात्रभर जागा द्या, असें म्हणून कोणी राहावयास आल्यास त्यानें 'न प्रत्याचक्षीत-' निवारण करूं नये. आमच्या घरांत जागा नाहीं, असें सांगूं नये. उपासकाचें हें व्रत आहे. ( यास्तव त्या व्रताचें अनुष्ठान निर्विघ्नपणें होण्यासाठीं श्रुति उपायही सांगते– )

तस्माद्यया कया च विधया बह्वन्नं प्राप्नुयात् । अराध्यस्मा अन्नमित्याचक्षते ॥

अर्थ—( ज्या अर्थी अभ्यागताला रहावयास जागा दिली असतां अन्नही द्यावें लागतें, कारण तें न दिल्यास कठोपनिषदांत मोठा दोष सांगितला आहे ) ' तस्मात्–' त्या अर्थी ' यया कया च विधया–' अन्न देण्यासाठीं याजन, अध्यापन व प्रतिग्रह यांतील कोणत्या तरी, एका प्रकारानें ' बहु अन्नं प्राप्नुयात्–' पुष्कळ अन्न संपादन करून ठेवावें. ( आतां त्या विषयीं शिष्टाचार कसा आहे तें श्रुति सांगते–) जो आपल्या घरीं रहावयास आला असेल ' अस्मै–' त्याला ' अन्नं अराधि–' अन्न तयार झालें आहे, ' इति आचक्षते–' असें अन्नवान् विद्वान् सांगतात. ( त्याचा परिहार करीत नाहींत. आतां पुष्कळ अन्न संपादन करण्यांत पुष्कळ फळ आहे, असें दाखविण्यासाठीं श्रुति विशेष दानाचें विशेष फळ सांगते–)

एतद्वै मुखतोऽन्नं राद्धम्। मुखतोऽस्मा अन्नं राध्यते।
एतद्वै मध्यतोऽन्नं राद्धम्। मध्यतोऽस्मा अन्नं राध्यते।
एतद्वै अन्ततोऽन्नं राद्धम्। अन्ततोऽस्मा अन्नं राध्यते। य एवं वेद॥

अर्थ—( शंकरानन्द ह्मणतात—देश, काल, पात्र, श्रद्धा, सत्कार इत्यादिकांची संपत्ति हें अन्नदानाचें अंग आहे, हें सुचविण्यासाठीं श्रुति जसें द्यावें तसेंच फळ प्राप्त होतें, असें सांगते—) ' एतत् वै अन्नं मुखतः राद्धं ( भवति )–' हेंच प्रसिद्ध अन्न मुख्य देश, काल, मुख्य पात्र, अतिशय श्रद्धा, सत्कार, मुख्य सात्त्विक दाता इत्यादि प्रकारच्या मुख्य वृत्तीनें दिलें असतां ' अस्मै अन्नं मुखतः राध्यते–' त्या दात्याला अन्न तशा मुख्य वृत्तीनेंच ह्म० मुख्य देशांत, मुख्य कालांत, मुख्य वृत्तीनें मुख्य झालेल्या त्याला अनायासानें सिद्ध होतें. मध्यम देश, काल, वृत्ति, पात्र, दाता, इत्यादिकांच्या योगानें दिलेलें अन्न मध्यम देशात, मध्यम कालात, मध्यम वृत्तीनें, मध्यम स्थितींत दात्याला परत मिळतें; आणि ' अन्ततः–' अधम देश, काल, वृत्ति इत्यादि-

अथ दैवीः । तृप्तिरिति वृष्टौ । बलमिति विद्युति । यश इति पशुषु । ज्योतिरिति नक्षत्रेषु । प्रजातिरमृतमानन्द इत्युपस्थे । सर्वमित्याकाशे ॥

अर्थ—'अथ–' मनुष्याच्या पाच शरीरावयवाच्या ठिकाणीं उपासना करावयास सांगितल्यानंतर '**दैवीः–**' देवशरीरावयवगत उपासना सांगतों. '**वृष्टौ तृप्तिः इति–**' वृष्टि करणाऱ्या देवताच्या ठिकाणीं तृप्ति या रूपानें ब्रह्म अवस्थित आहे, असें ध्यान करावें. '**विद्युति बलं इति–**', विद्युद्देवतेच्या ठिकाणीं बलरूपानें ते स्थित आहे, '**पशुषु यशः इति–**' पशूंच्या ठिकाणीं यश या रूपानें तें आहे, '**नक्षत्रेषु ज्योतिः इति–**' नक्षत्रा या ठिकाणीं ज्योति, या रूपानें आहे, '**उपस्थे प्रजातिः अमृतं आनन्दः इति–**' उपस्थेंद्रियाच्या देवतेमध्यें पुत्रोत्पादन, स्त्रीसह क्रीडा व गुह्येंद्रियस्पर्शजन्य आनन्द या रूपानें ब्रह्म आहे, असें जाणावें. '**आकाशे सर्वं इति–**' आकाशांत भूतभौतिकरूप सर्व जगत्, या रूपानें ब्रह्म स्थित आहे, असें चिंतन करावें. ( **शंकरानन्दांनीं** आपल्या दीपिकेंत आचार्यांच्या भाष्याच्या अनुसार वृष्टि, विद्युत् इत्यादिशब्दांनीं वृष्ट्यादिकांच्या देवता न घेता प्रत्यक्ष वृष्टि, विद्युत् इत्यादिकांचेंच ग्रहण केलें आहे. '**क्षेम इति वाचि**' येथपासून पुढील सर्व उपासनामध्यें फल मिळतें, असें समजावें. कारण 'त यथा यथोपासते तदेव भवति' ह्म० पुरुष त्याची जशी जशी उपासना करितात तसेच होतात, अशी त्याविषयीं श्रुति आहे. याच श्रुत्यर्थाला अनुसरून प्रस्तुत श्रुति आणखीं काहीं उपासना फलासह सांगते–)

तत्प्रतिष्ठेत्युपासीत । प्रतिष्ठावान्भवति । तन्मह इत्युपासीत । महान्भवति । तन्मन इत्युपासीत । मानवान्भवति । तन्नम इत्युपासीत । नम्यन्तेऽस्मै कामाः । तद्ब्रह्मेत्युपासीत । ब्रह्मवान्भवति । तद्ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । पर्येणं म्रियन्ते द्विषन्तः सपत्नाः । परि येऽप्रिया भ्रातृव्याः ॥

अर्थ—तें ब्रह्म प्रतिष्ठा–सर्वांच्या स्थितीचें कारण–आधार आहे, अशी उपासना करावी. ह्मणजे उपासक प्रतिष्ठावान् अन्न-वस्त्रादि जीवनस्थितीच्या साधनानीं सपन्न होतो. तें ब्रह्म महः–महत्त्वगुणयुक्त आहे, अशी उपासना करावी. ह्मणजे उपासक महान्–धनादिकानीं समृद्ध होतो. तें ब्रह्म मननशक्तियुक्त आहे, अशी कल्पना करावी. ह्मणजे उपासक 'मानवान्–' मननशक्तिमान् होतो. तें ब्रह्म नमनानें ह्म० नमनाख्य वशीकरणानें युक्त आहे, अशी भावना करावी. ह्मणजे त्या उपासनेच्या योगानें उपासकापुढें त्याचे सर्व काम्य विषय नम्र होतात. ह्मणजे सर्व विषय त्याच्या स्वाधीन असतात. तें ब्रह्म वेदरूप आहे, अशी भावना करावी. ह्मणजे उपासक 'ब्रह्मवान्–' होतो. वेद त्याच्या अधीन राहतो. तें ब्रह्म ब्रह्माच्या ह्म० असग व उदासीन ब्राह्मणाच्या 'परिमरः' शत्रूचा मृत्यु आहे, अशी उपासना करावी. ह्मणजे या उपासकाच्या विरुद्ध असलेले त्याचे द्वेष्टे–शत्रू–मरतात. 'ये अप्रियाः भ्रातृव्याः (ते अपि परि म्रियन्ते)–' जे द्वेष करीत नसले तरी उपासकाचे अप्रिय भातृव्य (भाऊबद) असतात तेही मरतात. (साराश ब्रह्म शत्रूचें विनाशक आहे, अशी भावना ठेवून त्याची उपासना करणाऱ्या उपासकाचा द्वेष करणारे अथवा उपासक ज्याचा द्वेष करीत असेल ते सर्व मरतात. ह्मणजे भावनेप्रमाणें शुभाशुभ फळ मिळतें.)

याप्रमाणें आनन्दात्म्याविषयींच्या उपासना सागून त्याच्या योगानें या जन्मीं अथवा जन्मान्तरीं ज्याचें चित्तैकाग्र्य झालें आहे त्याला अवश्य ज्ञातव्य व पूर्व वल्लींत सागितलेलाच अखड आनन्द श्रुति सांगते. ह्म० त्या मुख्य अधिकाऱ्याला आनदात्म्याचा बोध करते—

स यश्चायं पुरुषे । यश्चासावादित्ये । स एकः । स य एवंवित् । अस्माल्लोकात्प्रेत्य । एतमन्नमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं मनोमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रम्य । एतमानन्दमयमात्मानमुपसं-

क्रम्य। इमाँल्लोकान्कामान्नी कामरूप्यनुसंचरन्।
एतत्साम गायन्नास्ते ॥

अर्थ-('स यश्चाय०' येथपासून 'आनन्दमयमात्मानमुपसंक्रम्य' येथवरच्या वाक्याचा अर्थ ब्रह्मवल्ल्यध्यायात (पृष्ठ ८५) सांगितलेला आहे. तथापि नानाप्रकारच्या उपासनाच्या योगानें साध्य होणाऱ्या चित्तैकाग्र्यरूप तपाचे परम पुरुषार्थामध्यें पर्यवसान होतें, असें दाखविण्यासाठीं श्रुतीनें तोच पुन येथे सांगितला आहे या वाक्याचा शब्दार्थ असा-) तो जो आनंद या पुरुषात आहे व जो आदित्यात आहे तो एक आहे, आणि जो अशी उपासना करतो तो या बाह्य पुत्रादि लोकापासून निवृत्त होऊन, या शरीररूपी अन्नमय आत्म्याशीं तादात्म्य पावून, या प्राणमय आत्म्याशीं तादात्म्य पावून, या मनोमय आत्म्याशीं तादात्म्य पावून, या विज्ञानमय आत्म्याशीं तादात्म्य पावून आणि या आनन्दमय आत्म्याशीं तादात्म्य पावून (हा मुक्त होतो आनंदमय कोशाचें पुच्छ ब्रह्म, ह्मणून सांगितलेल्या अखंड एकरस आनंदालाच आत्मरूपानें साक्षात् जाणल्यामुळें आणि त्या कारणानेंच प्रिय, मोद, प्रमोद व आनंद या आनंदमयाच्या पुच्छेतर अवयवांना व त्या पूर्वीच्या चारी कोशांना अनात्मे समजून त्याच्याविषयींचा 'हेच आत्मे आहेत,' हा भ्रम सोडल्यामुळें तो पुरुष मुक्तच होतो. तथापि त्याच्या शरीराचा पात झालेला नसल्यामुळें लोक त्याला 'हा जिवंत आहे' असें ह्मणतात कारण त्याचें शरीर व इंद्रियें यांचा समूह त्यांना प्रत्यक्ष दिसत असतो ह्मणजे लोकदृष्ट्या तो जिवंत असतो, पण त्याच्या दृष्टीनें तो मुक्त असतो. वास्तव तो जीवन्मुक्त होय तो वर सांगितल्याप्रमाणें मुख्य आनंदात्म्याशीं तादात्म्य पावून शरीरपात होईतों इतर पुरुषाप्रमाणें राहतो. पण तो काय करीत राहतो तें श्रुति सांगते-) **कामान्नी** व **कामरूपी** होऊन या लोकातून क्रमानें संचार करीत राहतो जो इच्छेस येईल तेथें अन्नभक्षण करतो तो कामान्नी व जो इच्छेस येईल तो वेष धारण करतो तो कामरूपी; अर्थात् मी अन्न अमुकच ठिकाणीं,

अमुकच प्रकारचें खाईन व वेष अमुकच करीन, असा इतर देहाभिमान्याप्रमाणें आग्रह न धरिता यथेच्छ अन्न व वेष धारण करणारा तो काशी, द्वारका इत्यादि या लोकाच्या निरनिराळ्या प्रदेशातून 'अनु-' आत्मसाक्षात्कारानंतर 'सचरन्' संचार करीत हें सर्व जगत् माझेंच आहे, असें समजून संतुष्ट होतो आणि 'एतत्साम गायन् आस्ते-' या पुढील सामाचें–गीता मंत्र–मंत्राचें गायन करीत (अथवा साम ह्म० समत्वप्रतिपादक वचन संसारशूलानें आर्त झालेल्या प्राण्यांना पाहून अतिशय दु खी झालेला तो मोठ्यानें असे शब्द करीत ) दग्धपट-न्यायानें शरीर धारण करतो एकादें वस्त्र जळलें तरी त्याची वाण तशीच दिसत असते, हें प्रसिद्ध आहे त्याचप्रमाणें आत्मज्ञानानें तो शरीररहित जरी झाला तरी सशरीर असल्यासारखा भासतो )

आपल्या शिष्यापुढें आपलें सर्वात्मत्व प्रकट करणें हें ज्या साम गानाचें फळ आहे तें सामच श्रुति दाखविते—

हा३वु हा३वु हा३वु । अहमन्नमहमन्नम हमन्नम् । अहमन्नादो३ऽहमन्नादो३ऽहमन्नादः । अह श्लोककृदह श्लोककृदह श्लोककृत् । अह मस्मि प्रथमजा ऋता३स्य । पूर्व देवेभ्योऽमृतस्य ना३भायि । यो मा ददाति स इदेव मा३ऽऽवाः । अहमन्नमन्नमदन्तमा३द्मि अह विश्व भुवनमभ्य भवा३म् । सुवर्न ज्योतीः ॥

अर्थ—आश्चर्यवाचक 'अहा' शब्दाचा येथें गानाकरिता वर्णविकार होऊन 'हावु' असा शब्द झाला आहे आश्चर्याचा अतिशयपणा व्यक्त करण्यासाठीं त्याचा तीनदा उच्चार केला आहे पूर्वी केवळ देहरूप असलेल्या मला गुरु व शास्त्र यांच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या केवळ ज्ञानानेंच सर्वात्मक ब्रह्मरूपता प्राप्त झाली आहे, हें मोठेंच आश्चर्य होय, असा त्याचा अर्थ आहे 'अहं अन्न' या त्रिवार उच्चारलेल्या वाक्यानें गुरु आपला सर्वात्मत्वानुभव ( ह्म० मी सर्वात्मक आहें, हा अनुभव ) प्रकट करीत आहेत जें जें व्रीहि-यव गोधूमादि अन्न आहे तें तें सर्व मीच आहें. कारण त्यांतील नाम व रूप या

भागास मिथ्यात्व आहे, आणि सच्चिदानन्दरूप अधिष्ठान भाग हें माझेंच रूप आहे. त्याचप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, गाय, घोडा इत्यादि चेतनरूप अन्नादही मी आहें. श्लोक हा शब्द संघ किंवा पद्य याचा वाचक आहे. यास्तव **श्लोककृत्** ह्म० सैन्यादिरूप संघ करणारा राजा किंवा काव्यादि ग्रंथातील श्लोक करणारा विद्वान् **'अहं अस्मि–'** मी आहें. ( **श्रीशंकरानन्द** ह्मणतात–अह अन्न इत्यादि तीन वाक्यें तीनदा उच्चारून पहिल्या वाक्यानें मूलोकस्थ अन्न, अन्नाद व श्लोककृत्, दुसऱ्या वाक्यानें अंतरिक्षातील अन्नादिक व तिसऱ्या वाक्यानें स्वर्गातील अन्नादिक मीच आहें, असें ह्मटलें आहे. किंवा मी ह्मणतो हें सत्य आहे, असें सांगण्यासाठीं त्याच त्या वाक्याचा त्रिवार उच्चार केला आहे.) **'अहं ऋतस्य प्रथमजाः अस्मि–'** मी आनन्दात्माच मूर्तामूर्तरूप प्रपंचाचें प्रथम उत्पन्न झालेलें कारण आहें. किंवा ऋत जें ब्रह्म त्याचें प्रथम कार्य-हिरण्यगर्भ-आहें. प्रथमजा व ऋतस्य येथील प्लुत स्वर आश्चर्यद्योतक आहे. **'देवेभ्यः पूर्वं–'** संसाराच्या पूर्वीं देव उत्पन्न झाले, अशी प्रसिद्धि आहे. यास्तव मी विराटाच्या अवयवभूत अग्न्यादि देवांहून पूर्वीं होतों. कारण मींच त्यांना उत्पन्न केलें आहे. **'अमृतस्य नाभिः–'** मी वेदाख्य अथवा मोक्षाख्य अमृताची नाभि–मध्य–आधारप्रदेश आहें. **'यः मा ददाति सः एव इत् मा आवाः–'** जो मज अन्नाचा किंवा आत्मज्ञानाचा दाता मज अन्नाला अथवा ज्ञानाला देतो तोच अशा प्रकारें मला रक्षितो. ( जो आचार्य शिष्यांना मज परमात्म्याचा उपदेश करतो तोच त्या उपदेशाच्या योगानें माझें रक्षण करतो. किंवा जो उदार पुरुष मज अन्नरूप आत्म्याचें ब्राह्मणादिकांस भक्षणार्थ दान देतो तोच अन्नदाता ब्राह्मणादिरूपी माझें रक्षण करतो. कारण ) **'अहं अन्नं अन्नं अदन्तं अद्मि–'** मी अन्नदेवतारूप होऊन मज अन्नाचें दान न करितां स्वतःच भक्षण करणाराला भक्षितो. ( स्वतःकरिताच अन्न शिजविणाऱ्या कृपण व लोभी पुरुषाला महा रौरवादि नरकांत पाडून मी दुःखी करतों. मी सर्वात्मा असतानाही जगन्निर्वाहाकरितां असें करतो, हें आश्चर्य आहे, असें प्रकट करण्यासाठीं **'आ३द्मि'** असा प्लुत स्वर

योजला आहे.) 'अहं विश्वं भुवनं अभ्यभवाम्-' मीं सर्व भुवनाला पराभूत केलें आहे. (मी जरी दुसऱ्याला खात असलों तरी मला खाणारा कोणी नाहीं. कारण मी आपल्या अपरिच्छिन्न आनन्दरूपानें महेश्वर होऊन प्रलयसमयीं सर्व विश्वाचा उपसंहार करतों.) 'सुवर् न ज्योतीः -' मी सूर्याप्रमाणें ज्योतीरूप आहें. 'सुवर्' हा स्वर्गवाची शब्द स्वर्गस्थ आदित्याचा बोध करवितो. 'न' हा शब्द उपमार्थी आहे. त्यामुळें-जसा आदित्य दुसऱ्या प्रकाशाची अपेक्षा न करितां स्वतः प्रकाशमान होतो, त्याप्रमाणेंच मी चक्षुरादि इंद्रियांची अपेक्षा न धरितांच चैतन्यज्योतीरूप आहें.

**य एवं वेद। इत्युपनिषद्॥** (इति भृगुवल्ल्यध्याये दशमोऽनुवाकः)

**अर्थ**–जो अधिकारी वर सांगितल्याप्रमाणें–अन्नमयादिकांच्या द्वारा मीच सर्व अन्न-अन्नादरूप आहें, असें–साक्षात् जाणतो, त्या स्थितीचा अनुभव घेतो त्याला वरील सामात सांगितलेलें सर्वात्मानुभवरूप फळ मिळतें. 'स य एवंविद्' असें ह्मणून फलास पात्र होणाऱ्या विद्वानाचा निर्देश वर (पृ. १०८) केलेला असतानाही येथें पुनः 'य एवं वेद' असें ह्मणून विद्वानालाच हें फळ मिळतें; अविद्वानाला मिळत नाहीं; व विद्वानाला फळ अवश्य मिळतेंच, असा दोन प्रकारचा नियम केला आहे. 'इति-' 'भृगुर्वै वारुणिः' येथून 'य एवं वेद' येथवरच्या या ग्रंथानें ज्या विद्येचें प्रतिपादन केलें आहे ती उपनिषद् होय. (कारण ती ब्रह्मसाक्षात्कार करवून बंधनें शिथिल करते, व कार्यासह अविद्येचा विनाश करते. संस्कृत भाषेंत 'उपनिषद्' हा शब्द स्त्रीलिंगी आहे.) १०.

---

सह नाववतु। सह नौ भुनक्तु। सह वीर्यं करवावहै। तेजस्वि नावधीतमस्तु। मा विद्विषावहै।

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः॥

येथें हा तैत्तिरीयोपनिषदाचा तिसरा भृगुवल्ल्यध्याय व आरण्यकाचा नववा प्रपाठक समाप्त झाला. येथें हें उपनिषद्‌ही समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला वर्ष २ रें अंक ४ था

रत्न ७ वें

# नारायणोपनिषद्.

( अन्वय व अर्थ-यासह )

संपादक व प्रकाशक

आचार्यभक्त-विष्णु वामन बापट.

पुणें, सदाशिव पेठ २४१.

शके १८३६ वैशाख शु० ५.

पुणें—ता. १० एप्रिल सन १९१४.

हें मासिक दत्तात्रय गणेश खांडेकर यांनी "लॉ प्रिंटिंग" प्रेस
४४५ शनवार पेठ पुणें येथें छापिलें आणि विष्णु वामन
बापटशास्त्री यांनीं २४१ सदाशिव पेठ पुणें
येथें प्रसिद्ध केलें.

किंमत ८ आणे.

# प्रस्तावना.

रत्न सहावें ' आत्मपुराण अध्याय १० ' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत झटल्याप्रमाणें आज आह्मी हें नारायणोपनिषद् अन्वय व शब्दशः अर्थांसह प्रसिद्ध करीत आहों. यांत संध्यावंदन-वैश्वदेव-श्राद्ध-श्रावणी-त्रिसुपर्ण–पुरुषसूक्त इत्यादि आपल्या आह्निकाच्या उपयोगीं असलेले पुष्कळ मंत्र असल्यामुळें याचा उपयोग ब्रह्मज्ञानाप्रमाणें कर्मानुष्ठानाकडेही होतो. हें उपनिषद् खिलकांडरूप असल्याकारणानें ह्मणजे यांत ज्ञान व कर्म यांच्या अवशिष्ट भागाची पूर्ति केलेली असल्यामुळें अर्थात्च यांत ज्ञानोपयोगी परमात्मस्वरूपवर्णनात्मक मंत्रही पुष्कळ आहेत. त्यांचा अर्थ वाचून कोणाच्याही मनांत आपल्या अंतर्यामीविषयीं उचित प्रेम उत्पन्न झाल्यावाचून राहणार नाहीं, असें आह्मी स्वानुभवानें सांगतों.

उपनिषदांना प्रायः स्वर नसतात, पण यजुर्वेदाच्या कांहीं उपनिषदांना ते आहेत. तैत्तिरीयारण्यकाच्या सर्व उपनिषदांना ते आहेत. पण प्रमादपरिहारार्थ स्वरपाठ गुरुमुखानेंच करणें अवश्य असल्यामुळें व आमचीं हीं पुस्तकें अर्थप्रधान असल्यामुळें आह्मी शीक्षा, ब्रह्मविद्या, भृगु व हें नारायण, यांना स्वर दिले नाहींत. ज्यांना या उपनिषदांचा पाठ करावयाचा असेल त्यांनीं वैदिकांपासून त्यांची सस्वर संथा घेऊनच पाठ करावा. त्याचप्रमाणें या नारायणोपनिषदाच्या पहिल्या ४८ पानांपर्यंत वरील मथळ्यांत अनुवाकाच्या जागीं कामगार लोकांच्या प्रमादानें ' अध्याय ' हा शब्द पडला आहे. तो ' अनुवाक ' असा वाचावा व ३५ पृष्ठावर अनुवाकाचा अंक २, ३९ पृष्ठावर ५, ४१ पृष्ठावर ८, ४३ वर ११ आणि ४५ व ४७ यांवर १२ अंक घालावा. पुढील हेडिंगें बरोबर आहेत. आषाढ शुद्ध पंचमीला 'तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ' हें पुस्तक प्रसिद्ध होईल, असें प्रिय वाचकांस सुचवून आह्मी ही प्रस्तावना संपवितों.

पुणें सदाशिव पेठ २४१.<br>
वैशाख शु.३ मंगळवार शके १८२६. } वि. वा. बापट.

---

# विषयानुक्रमणिका.

| क्रमांक | विषय | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | ब्रह्मतत्त्वाचें प्रतिपादन ... ... ... ... ... | २ |
| २ | ज्ञानप्राप्तिसाधनभूत ध्यानादि कर्मोपयोगी मंत्र ... ... | १७ |
| ३ | मृत्तिकादिस्नानांगभूत मंत्र ... ... ... ... | २१ |
| ४ | अघमर्षणसूक्त ... ... ... ... ... | ३१ |
| ५ | पुन स्नान, आचमन, पुन. स्नान इत्यादिकाचे मंत्र ... | ३२ |
| ६ | स्नानांतर जप्य मंत्र ... ... ... ... ... | ३५ |
| ७ | अन्नेच्छु पुरुषाच्या होमार्थ महा व्याहृति-मंत्र ... ... | ३८ |
| ८ | नुत्त्या पापक्षयार्थ मंत्र ... .. ... ... ... | ३९ |
| ९ | प्रतिबंधनिवारणपूर्वक ज्ञानप्राप्त्यर्थ-मंत्र ... ... ... | ४० |
| १० | पुण्य व पाप यांची क्रमानें स्तुति व निंदा ... ... | ४३ |
| ११ | पुण्याचरणानें शुद्धचित्त पुरुषाला तत्त्वाचा उपदेश ... | ४४ |
| १२ | ब्रह्मतत्त्वस्मरणाचें अन्तरंगसाधन ... ... ... ... | ५१ |
| १३ | ब्रह्मतत्त्वाच्या उपासनेचा प्रकार ... . ... ... | ५२ |
| १४ | उपास्यातील विशेष गुण .. ... ... ... | ५४ |
| १५ | महादेवाच्या पंचमुखाचें प्रतिपादन . ... ... | ६१ |
| १६ | उपास्याला नमस्कार करताना ह्मणावयाचे मंत्र ... .. | ६४ |
| १७ | प्रतिबंधनिवारक रक्षोघ्न मंत्र ... .. . . .. | ६६ |
| १८ | पृथ्वी, जळ इत्यादि देवताक मंत्र ... ... | ६९ |
| १९ | तिन्ही संध्यांतील अभिमंत्रित जलप्राशनाचे मंत्र ... | ७० |
| २० | गायत्रीच्या आवाहनाचें मंत्र ... . ... ... | ७३ |
| २१ | प्राणायाममंत्र, व सशिर गायत्री ... .. ... ... | ७५ |
| २२ | गायत्रीविसर्जनाचे मंत्र .. ... ... ... ... | ७६ |

२३ त्रिसुपर्ण मंत्र व त्यांच्या पाठाचें फळ ... ... ... ७७
२४ मेधाप्राप्त्यर्थ जप्य मंत्र ... ... ... ... ... ८२
२५ देवताच्या प्रार्थनेचे मंत्र ... ... ... ... ... ८४
२६ विरजाहोमसंबंधी मंत्र ... ... ... ... ... ९२
२७ वैश्वदेव व बलिहरण मंत्र... ... ... ... ... ९७
२८ पापक्षयार्थ मंत्र ... ... ... ... ... ... ९९
२९ प्राणाहुती व पूर्वोत्तर जलप्राशन ... ... ... १००
३० भुक्त अन्नाचें अभिमंत्रण ... ... ... ... ... १०१
३१ परमात्मस्वरूपप्रतिपादक मंत्र ... ... ... ... १०२
३२ इंद्र-सप्तर्षिसंवादरूप व इतर जप्य मंत्र ... ... ... १०३
३३ सन्यासप्रकरण—सत्यादि-संन्यासान्त साधनें ... ... १०६
३४ मोक्षसाधनांचें उपपादन ... ... ... ... ... ११०
३५ तत्त्वज्ञाच्या व्यवहाराला पञ्जांगरूपत्व आहे. ... ... १२१

---

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला, वर्ष दुसरें, अंक ४ था.

रत्न सातवें.

( सार्थ )

# नारायणोपनिषद्.



ॐ सह नाववतु। सह नौ भुनक्तु। सह वीर्यं करवावहै। तेजस्वि नावधीतमस्तु। मा विद्विषावहै॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः॥

या शांतीचा 'अर्थ' रत्न ४ पृष्ठ ४५ वर पहा.

बृहदारण्यकांतील ७ व ८ हे दोन अध्याय खिलकांडरूप आहेत, हें जसें आचार्यांनीं सांगितलें आहे त्याप्रमाणेंच ही नारायणीयनांवाची याज्ञिकी उपनिषद्-ही खिलकांडरूप आहे. कर्म, उपासना व ब्रह्मतत्त्वज्ञान यांतील जें कांहीं अवशिष्ट राहिलें असेल तें सर्व सांगितल्यामुळें प्रकीर्णरूप झालेलें जें वेदाचें प्रकरण त्याला खिलकांड ह्मणतात. या उपनिषदांत 'अम्भस्य पारे' इत्यादि मंत्रांनें ब्रह्मतत्त्वाचें कथन केलें आहे. 'आदित्यो वा एषः' इत्यादि मंत्रानें उपासन सांगितलें आहे व 'भूरग्नये पृथिव्यै स्वाहा' इत्यादि मंत्रानें कर्में सांगितलीं आहेत. यांत कर्माचें बाहुल्य असल्यामुळें हिला याज्ञिकी उपनिषद् ह्मणतात, आणि आरंभीं ब्रह्मतत्त्वाचें व अंतीं त्याच्या सत्यादि-संन्यासान्त साधनांचें कथन केलेलें असल्यामुळें ही 'उपनिषद्' होय. *संस्कृतांत उपनिषद् हा शब्द स्त्रीलिंगी आहे. या उपनिषदाचा* पाठसंप्रदाय निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या प्रकारचा आहे. शाखाभेद हेंच जरी त्याचें कारण आहे तरी निरनिराळ्या देशांत राहणाऱ्या तैत्तिरीय शाखाध्यायी शिष्टांनीं त्या पाठसंप्रदायांचा आदर केलेला असल्यामुळें सर्वही

पाठ प्रायच आहेत. त्यातील द्रविडांचा पाठ चोसष्ट अनुवाकाचा आहे कर्नाटकात कित्येक याचे चौऱ्याहत्तर व ऐशीं अनुवाक मानतात पण आम्ही त्यातील ऐशीं अध्यायाचा पाठ प्राग्य मानून त्याचेंच प्राधान्यन व्याख्यान करतों पहिल्या अनुवाकाच्या आरंभीं कांहीं ऋचा ब्रह्मतत्त्वाचें प्रतिपादन करतात त्यातील पहिल्या ऋचेचा अर्थ असा—

**अम्भस्य पारे भुवनस्य मध्ये नाकस्य पृष्ठे महतो महीयान् ।**
**शुक्रेण ज्योतींषि समनुप्रविष्टः प्रजापतिश्चरति गर्भे अन्तः ॥**

**अन्वय**–अम्भस्य पारे महतः महीयान् भुवनस्य मध्ये महतः महीयान् नाकस्य पृष्ठे महतः महीयान् शुक्रेण ज्योतींषि समनुप्रविष्टः गर्भे अन्तः प्रजापतिः चरति ।

**अर्थ**—अनेक प्रकारच्या समुद्रांतील जलाच्या परतीरीं असलेला जो फार मोठा लोकालोक पर्वत त्याहून हा परमेश्वर फार मोठा आहे त्याच-प्रमाणें पृथ्वीप्रभृति लोकामध्ये जे मेरूसारखे मोठे पर्वत त्याहूनही तो मोठा आहे स्वर्गातील जो ब्रह्मलोकासारखा मोठा लोक त्याहूनही ता अतिशय मोठा आहे ता परमेश्वर प्रकाशक जीवचैतन्यरूपानें अन्तःकरणात चागल्या रीतीन प्रविष्ट झाला आहे ( येथें ज्योतींषि ह्म० अन्तःकरणें कारण तीं ज्योतीप्रमाण निर्मल असतात ) ब्रह्माडरूप गर्भात तो प्रजापति ( ह्म० विराड्रूप ) होऊन राहतो.

**यस्मिन्निद स च वि चैति सर्वं यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः ।**
**तदेव भूत तदु भव्यमा इद तदक्षरे परमे व्योमन् ॥**

**अन्वय**–इद सर्वं यस्मिन् समेति च व्येति । अधि विश्वे देवा यस्मिन् निषेदुः । तद एव भूत भव्य इद तत् उ आ । तत् अक्षरे परमे व्योमन् ॥

**अर्थ**—हे सर्व जगत् ज्या अव्याकृत मूळ कारणामध्ये सृष्टिसमयीं उत्पन्न होऊन सबद्ध होत व सहारकाळीं लीन होऊन त्याच्याशीं असलेला सबध सोडत सर्वोत्कृष्ट *हिरण्यगर्भ*, *विराट्*, *अग्नि*, *इन्द्र* इत्यादि सर्व देव ज्या अव्यक्त मूलकारणामध्ये सर्वथा त्याचाच आश्रय धरून राहिले आहेत, तेंच

ह्म० सृष्टि-संहारकालांचें व देवांचें आधारभूत अव्याकृतच भूतकालचें जगत् आहे. भविष्यत् कालचें व हें वर्तमानकालचें जगत्-ही तेंच अव्याकृत आहे, हेंही प्रसिद्ध आहे. तें तसलें अव्याकृत विनाशरहित, उत्कृष्ट व आकाशासारख्या अमूर्त परमात्म्यामध्यें राहतें.

**येनावृतं खं च दिवं महीं च येनादित्यस्तपति तेजसा भ्राजसा च।**
**यमन्तः समुद्रे कवयो वयन्ति तदक्षरे परमे प्रजाः॥**

अन्वयः–येन खं दिवं महीं च आवृतं येन आदित्यः तेजसा च भ्राजसा तपति कवयः यं समुद्रे अन्तः वयन्ति तत् परमे अक्षरे प्रजाः ( उत्पादयति )॥

अर्थ—ज्या चिद्रूप कारणानें अन्तरिक्षलोक, द्युलोक व भूर्लोक या सर्वांना व त्यांतील देहांना व्यापिलें आहे, ज्या परमेश्वराकडून अनुगृहीत झालेला आदित्य स्वमंडलान्तर्गत भास्वर रूपानें व पसरलेल्या किरणरूप दीप्तीनें हें सर्व जगत् सर्वतः तप्त व प्रकाशित करतो, तत्त्ववेत्ते ज्या परमात्म्याला समुद्रांत ( ह्म० समुद्र या शब्दावरून उपलक्षित होणाऱ्या सर्व जगांत ) तंतूंप्रमाणें पाहतात ( ह्मणजे पटाच्या स्वरूपांत तंतू जसे व्याप्त असतात त्याप्रमाणें ब्रह्मतत्त्व जगांत व्यापलेलें आहे, असें पाहतात, ) तें ब्रह्मतत्त्व उत्कृष्ट व नाशरहित अशा निज स्वरूपांत राहून सर्व प्रजेला उत्पन्न करतें.

**यतः प्रसूता जगतः प्रसूती तोयेन जीवान् व्यचसर्ज भूम्याम्।**
**यदोषधीभिः पुरुषान्पशूंश्च विवेश भूतानि चराचराणि॥**

**अन्वयः**–जगतः प्रसूती ( प्रसूतिः ) यतः प्रसूता। ( तत् ) तोयेन जीवान् भूम्यां व्यचसर्ज, यत् ओषधीभिः पुरुषान् च पशून् च चराचराणि भूतानि विवेश॥

अर्थ—जगाची उत्पत्ति ज्या अव्याकृतोपहित चैतन्यापासून प्रवृत्त झाली तें कारणरूप चैतन्य जलानें ( ह्म० जलावरून उपलक्षित होणाऱ्या पंचभूतांच्या योगानें ) मनुष्य, गाय इत्यादि जीवदेहांस ह्या सृष्टींत विशेष प्रकारें उत्पन्न करतें झालें. तसेंच जें मायाविशिष्ट चैतन्यरूप कारण ओषधींच्या योगानें ( ह्म० व्रीहि, यव इत्यादिकांवरून उपलक्षित होणारें अन्न

होऊन ) मनुष्य, पशू व तदुपलक्षित स्थावर-जंगम शरीरें या सर्वांमध्यें प्रवेश करतें झालें. ( त्या चैतन्यानें सर्व जगत् व्यापलें आहे. वृक्षादि स्थावर पदार्थांमध्यें वृष्टिजलरूपानें त्याचा प्रवेश संभवतो. )

**यतः परं नान्यदणीयसं हि परात्परं यन्महतो महान्तम् ।**
**यदेकमव्यक्तमनन्तरूपं विश्वं पुराणं तमसः परस्तात् ॥ १ ॥**

अन्वयः-यत् परात्परं यत् महतः महान्तं यत् एकं अव्यक्तं अनन्तरूपं विश्वं पुराणं तमसः परस्तात् । यतः परं अन्यत् अणीयसं न हि ॥

अर्थ--जें शुद्ध तत्त्व हिरण्यगर्भादि उत्कृष्टांहूनही अत्यंत उत्कृष्ट आहे व जें आकाशादि महत्पदार्थांहूनही फार मोठें आहे तसेंच जें एक ( ह्म० सजातीय, विजातीय व स्वगतभेदरहित ), अव्यक्त ( इंद्रियाचा विषय न होणारें ), अनन्तरूप ( देश-काल-वस्तुपरिच्छेदशून्य ), विश्व ( जगदात्मक ), पुराण ( अनादिसिद्ध ) व अज्ञानसंज्ञक तमाहून पृथक् आहे त्या तत्त्वाहून दुसरें अधिक सूक्ष्म ( अत्यंत दुर्लक्ष्य ) व उत्कृष्ट कांहीं नाहीं. ५

**तदेवर्तं तदु सत्यमाहुस्तदेव ब्रह्म परमं कवीनाम् ।**
**इष्टापूर्तं बहुधा जातं जायमानं विश्वं बिभर्ति भुवनस्य नाभिः ॥**

अन्वय -तद् एव ऋतं तद् उ सत्यं आहुः । कवीनां यत् परमं ब्रह्म तद् अपि तद् एव । इष्टापूर्तं बहुधा जातं जायमानं विश्वं भुवनस्य नाभिः बिभर्ति ॥

अर्थ-तें अधिष्ठानरूप ब्रह्मच ऋत आहे, व त्यालाच सत्य ह्मणतात. ( मनानें सत्यार्थाचें चिन्तन करणें हें ऋत व वाणीनें त्याचें उच्चारण करणें हें सत्य होय. ) वेदशास्त्रपारंगत विद्वानांना प्रमाण ह्मणून अतिशय आदरणीय झालेलें जें वेदरूप ब्रह्म तेंही तें अधिष्ठानरूप ब्रह्मच आहे. दर्शपौर्णमासादि श्रौत कर्म व वापीकूपादि स्मार्त कर्म हीं दोन्हीं तेंच आहे. तसेंच पूर्वकल्प, त्याच्या पूर्वीचा कल्प इत्यादि बहुत प्रकारें उत्पन्न झालेलें व तसेंच आताही उत्पन्न होणारें सर्व जगत् सर्व लोकांची नाभि (ह्म० चक्राच्या नाभीप्रमाणें आधारभूत) परमात्मा धारण करतो. (अर्थात् सर्व आरोपित अधिष्ठानरूपच असतें.)

तदेवाग्निस्तद्वायुस्तत्सूर्यस्तदु चन्द्रमाः ।
तदेव शुक्रममृतं तद्ब्रह्म तदापः स प्रजापतिः ॥

अन्वयः–तद् एव अग्निः, तद् वायुः, तत् सूर्यः, तद् उ चन्द्रमाः, शुक्रं च अमृतं तद् एव, तत् ब्रह्म, तद् आपः, सः प्रजापतिः ॥

अर्थ–तेंच अग्नि, वायु, सूर्य व चन्द्रमा आहे. देदीप्यमान नक्षत्रादिरूप शुक्र व देवांकडून सेवन केलें जाणारें अमृत, हीं दोन्हीं तेंच अधिष्ठानरूप ब्रह्म आहे. तेंच हिरण्यगर्भरूप ब्रह्म, तेंच आप ( व आप् या तत्त्वावरून उपलक्षित होणारीं पंचभूतें, ) आणि तोच विराड्रूप प्रजापति आहे. (सारांश, अविद्यादृष्टीनें जें जें कांहीं विविध भासतें तें ते सर्व विद्यादृष्टीनें अखंड ब्रह्मच आहे. त्याकरितांच बृहदारण्यकांत 'जेव्हां द्वैताचा आभास होतो तेव्हां एक दुसऱ्या सर्वांना आपणांहून भिन्न जाणतो, पण जेव्हां या अधिकारी जीवाला सर्व आत्माच आहे, असें कळतें तेव्हां तो विद्वान् कोणत्या साधनानें कोणाला पाहणार ?' अशा क्रमानें अविद्यादृष्टि व विद्यादृष्टि दाखविली आहे. )

'अहो पण विष्णुपुराणांत ' प्रकृतिः पुरुषश्चैव नित्यौ कालश्च सत्तम ' ह्या हे श्रेष्ठा, प्रकृति, पुरुष व काल नित्य आहेत असें ह्मटलें आहे, त्यामुळें द्वैताला विद्यादृष्ट्याही ब्रह्मरूपत्व नाहीं, असें ठरतें' ह्मणून कोणी ह्मणेल, तर ते बरोबर नाहीं, असें या पुढील दोन ऋचांत दाखवितात—

सर्वे निमेषा जज्ञिरे विद्युतः पुरुषादधि ।
कला मुहूर्ताः काष्ठाश्चाहोरात्राश्च सर्वशः ॥
अर्धमासा मासा ऋतवः संवत्सरश्च कल्पताम् ।
स आपः प्रदुघे उभे इमे अन्तरिक्षमथो सुवः ॥

अन्वय–सर्वे निमेषाः विद्युतः पुरुषात् अधि जज्ञिरे । काष्ठाः कलाः मुहूर्ताः सर्वशः अहोरात्राः, अर्धमासाः, मासाः, ऋतवः, संवत्सरः च कल्पताम् । सः आपः प्रदुघे । अन्तरिक्षं अथो सुवः इमे उभे प्रदुघे ॥

अर्थ–(निमि या नांवाचा जनकाचा आद्य पूर्वज होता.त्याच्या नांवावरून निमेष हा शब्द रूढ झाला आहे. देवाच्या वरामुळे तो डोळ्यांच्या

उघड-झांपीचे ठिकाणीं राहतो. ह्मणून त्यांना निमेष ह्मणतात. डोळ्याचें पातें स्वभावतःच मिटून उघडण्यास जो काल लागतो त्या सूक्ष्म कालाला निमेष ह्मणतात.) सर्व निमेष स्वयंप्रकाश परिपूर्ण पुरुषापासून आधिक्यानें उत्पन्न झाले आहेत. निमेषाहूनही काष्ठा हें कालाचें अधिक परिमाण आहे. कारण अठरा निमेषांची एक काष्ठा होते. तीस काष्ठांची एक कला; तीस कलांचा एक क्षण; बारा क्षणांचा एक मुहूर्त; तीस मुहूर्तांचा एक अहोरात्र; पंधरा अहोरात्रांचा अर्धमास; दोन अर्धमासांचा एक मास, दोन मासांचा एक ऋतु व तीन ऋतूंचा एक संवत्सर हे सर्व त्या परमेश्वरापासून उत्पन्न झाले. ('कल्पन्तां' असें बहुवचन कित्येक ह्मणतात. वास्तव तसा पाठ घेतल्यास निमेषादि सर्व कालविशेष त्या स्वप्रकाश परमेश्वरामुळें आपापलें प्रयोजन सिद्ध करण्यास समर्थ होतात, असा अर्थ समजावा. 'सर्वेशः' या पदानें लव, त्रुटि इत्यादि कालाचे सर्व भेद घ्यावे.) स्वतः निर्माण केलेल्या या कालभेदरूपी उपाधीनें युक्त असलेला परमेश्वर त्या त्या कालाला उचित असलेलें आपार्चे(ह्मणजे जलोपलक्षित पृथिवीचें) दोहन करतां झाला. ह्मणजे प्राण्यांना ज्याची अपेक्षा आहे असें सर्व प्रकारचें भोग्य त्यानें पृथ्वीमध्यें संपादन केलें. तसेंच अन्तरिक्ष हें एक स्थान व स्वर्ग हें दुसरें, अशा त्या दोन स्थानांचें दोहन केलें. (ह्मणजे त्या स्थानांमध्येंही भोग्य वस्तूंचें संपादन केलें. तात्पर्य, विष्णुपुराणांत कालाला जरी नित्य ह्मटलेलें असलें, तरी पुराणेंही अविद्यादृष्टी जनांकरितांच असल्यामुळें तो परम सिद्धान्त होऊं शकत नाहीं, अशा अभिप्रायानें येथें विद्यादृष्ट्या कालही ब्रह्मरूप आहे, असें सांगण्यासाठीं ब्रह्मापासून त्याची उत्पत्ति वर्णिली आहे.)

परमात्मा ऊर्ध्वत्वादि आकारांनीं रहित असल्यामुळें काल, लोक इत्यादि सर्वांचें कारण आहे; व त्यामुळेंच सर्वांमध्यें अनुगत असलेल्याही त्याचें प्राण्यांना साक्षात् ज्ञान होत नाहीं, असें पुढील दोन मंत्र सांगतात.–

नैनमूर्ध्वं न तिर्यञ्चं न मध्ये परिजग्रभत् ।
न तस्येशे कश्चन तस्य नाम महद्यशः ॥ २ ॥

न सदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् ।
हृदा मनीषा मनसाभिक्लृप्तो य एन विदुरमृतास्ते भवन्ति ॥

अन्वयः—( कश्चित् ) एन ऊर्ध्वं तिर्यञ्च मध्ये वा अवस्थित न परिजग्रभत्, तस्य कश्चन न ईशे । ( अत एव ) तस्य महद्यश इति नाम ( सपन )। अस्य रूप ( नीलपीतादिक ) सदृशे न तिष्ठति । अत कश्चन एन चक्षुषा न पश्यति । हृदा मनीषा मनसा अभिक्लृप्त भवति । ये एन विदु ते अमृता भवन्ति ॥

अर्थ—कोणीही पुरुष या परमात्म्याला स्तंभाप्रमाणें ऊर्ध्वाकारानें किंवा घरावरील वाशाप्रमाणें तिरकस आकारान किंवा घरात असलेल्या घराच्या धन्याप्रमाणें ग्रहण करावयास समर्थ होत नाहीं ( कारण त्याच्या ठिकाणीं ते ते आकार नसतात कोणीही पुरुष त्याचे ग्रहण करता यावें ह्मणून तू अमुक आकाराचा हो, असें त्याचें नियमन करू शकत नाहीं ) ह्मणून त्या परमात्म्याचें ' महत् यश ' असें नाव पडलें आहे ( कारण तो अत्यन्त स्वतन्त्र असल्यामुळें त्याचें यश सर्वाहून अधिक आहे ) शिवाय या परमात्म्याच नील, पीत, शुक्र इत्यादि प्रकारच रूप प्राण्याच्या दृष्टीचा विषय होत नाहीं त्यामुळें एखादा अत्यन्त कुशल पुरुषही अति पटु चक्षु रिन्द्रियानें सुद्धा त्याला पहात नाहीं ( परतु गुरूपदेश व शास्त्र यानीं युक्त असलेला पुरुष ) हृदयकमलस्थ व भौतिक वस्तुविषयक मनोवृत्तींचें नियमन करणाऱ्या अन्त करणानें त्याचा सर्व प्रकारें निश्चय करतो. ( योगयुक्त मन लौकिक मनोवृत्तींचें नियमन करतें, हें प्रसिद्ध आहे तसल्या अन्तर्मुख एकाग्र मनानें परमात्म्याचा अनुभव घेता येतो ) जे या परमात्म्याला एकाग्र मनान साक्षात् जाणतात ते मरणधर्मरहित होतात ( प्राणानीं देहाला सोडून जाणें, याला उत्क्रमण ह्मणतात मरणही तेंच आहे तत्त्ववेत्याना तसलें मरण नसत कारण त्याचे प्राण शरीराला सोडून न जाता येथच लीन होतात )

आता हा वर सांगितलेला अर्थच दृढ करावयासाठी दुसऱ्या प्रकरणातील मन्त्राच उदाहरण देतात—

अद्भ्यः संभूतो हिरण्यगर्भ इत्यष्टौ ॥

अन्वय –'अद्भ्य संभूत ०' इति पट् 'हिरण्यगर्भ' समवर्तत०' इति अष्टौ ।

अर्थ–'अद्भ्य संभूत पृथिव्यै रसाच्च ०' इत्यादि सहा मंत्रांचा अनुवाक व 'हिरण्यगर्भ समवर्ततांग्रे०' इत्यादि आठ ऋचा वरील अर्थाच्या उपयोगी आहेत ( यास्तव आता अगोदर यापुढें त्याचा मूळा सह अर्थ देतों. )

अद्भ्यः संभूत पृथिव्यै रसाच्च । विश्वकर्मण समवर्तताधि ।
तस्य त्वष्टा विदधद्रूपमेति । तत्पुरुषस्य विश्वमाजानमग्रे ॥

अन्वय –विश्वकर्मण अद्भ्य पृथिव्यै रसात् च संभूत (आदित्य चन्द्रनक्ष त्रादिभ्य ) अधि समवर्तत । अपि च त्वष्टा तस्य रूप विदधत् एति । तस्य पुरुषस्य अग्रे आजान विश्व वर्तते ॥

अर्थ—विश्व ह्म० ब्रह्माण्ड, तेंच ज्याचें कर्म आहे, अशा परमात्म्यापासून उदक, पृथिवी व तेज यांपासून ( आणि उपलक्षणेनें वायु व आकाश यापासून ह्म० यांच्या द्वारा अर्थात् पंच भूतांच्या द्वारा ) उत्पन्न झालेला आदित्य, चंद्र, नक्षत्रें, तारका, इत्यादि तेजस्वी देवतांहून व इंद्रादि इतर देवतांहून अधिक–तेजानें उत्कृष्ट झाला तसेंच, तेजानें देदीप्यमान झालेला आदित्य, त्या परमात्म्याचें रूप आपणामध्ये धारण करीत उदयाचलावर येतो. ( कारण सूर्यादिकांतील तेज आदित्यसंबधी आहे, असा सर्व वेदान्तांचा घोष चालला आहे. ) असो, अशा प्रकारचा जो सविता त्याच पुरुषाच्या अग्रभागीं–दृष्टिमार्गांत–हें प्रसिद्ध समस्त जगत् राहतें.

या दुसऱ्या मंत्रांत कोणी एक सूर्योपासक आपला अनुभव प्रगट करतो.—

वेदाहमेतं पुरुषं महान्तं । आदित्यवर्णं तमसः परस्तात् ।
तमेव विद्वानमृतमिह भवति । नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ॥

अन्वय–अहं एतं (आकाशमण्डले परिदृश्यमानं) महान्तं आदित्यवर्णं तमसः परस्तात् वर्तमानं पुरुषं वेद । तं एव विद्वान् इह अमृतः भवति । अयनाय अन्यः पन्था न विद्यते ॥

अर्थ-मी या आकाशमंडलांत दिसणाऱ्या, आदित्याच्या कांतीप्रमाणें ज्याची कांति आहे अशा, अंधकाराहून दूर-विलक्षण-असलेल्या व पूर्ण पुरुषार्थरूप भगवान् सूर्याला जाणतों, आणि त्या तसल्या विशेष गुणांनीं विशिष्ट असलेल्या पुरुषाला अशा प्रकारें जाणणारा विद्वान् अमृत होतो. मोक्षप्राप्तीला या जाणण्याहून दुसरा मार्ग नाहीं. २.

प्रजापतिश्चरति गर्भे अन्तः । अजायमानो बहुधा विजायते । तस्य धीराः परिजानन्ति योनिं । मरीचीनां पदमिच्छन्ति वेधसः ॥३॥

अन्वयः-प्रजाना पति.-पालकः गर्भे अन्त (रोदस्योर्मध्ये) चरति। स्वयः अजायमान बहुधा-चराचररूपेण-विजायते। ये मरीचीना पद इच्छन्ति ते धीराः वेधसः तस्य योनिं परिजानन्ति ॥

अर्थ-तो सर्व प्रजेचा पालक आकाश व पृथ्वी यांच्या मध्यमार्गी संचार करतो. तो स्वत' उत्पन्न होणारा नसल्यामुळें बहुत प्रकारें चराचररूपानें उत्पन्न होतो. (सूर्यच सर्वात्मक होतो, असा याचा अर्थ.) जे पुण्यवान् पुरुष मरीचींचें स्थान इच्छितात त्या धीरानीं त्या जगद्विधात्या सूर्याच्या कारणाला ह्म० परमात्म्याला सर्वत्र पूर्णरूपानें जाणावें. ३.

यो देवेभ्य आतपति । यो देवानां पुरोहितः । पूर्वो यो देवेभ्यो जातः । नमो रुचाय ब्राह्मये ॥ ४ ॥

अन्वय —य देवभ्य आतपति। यः देवाना पुरोहितः। य देवेभ्यः पूर्व. जातः। तस्मै रुचाय ब्राह्मये नम ॥

अर्थ-जो कर्मानुष्ठानाच्या द्वारा देवांवर उपकार करण्यासाठीं सर्वतः तापतो, जो देवाच्या अग्रभागीं हितकारी होऊन राहिलेला आहे, जो सर्व देवांच्या आरंभीं झाला-ह्म० जो सर्वाहून ज्येष्ठ आहे-त्या देदीप्यमान ब्रह्म-पुत्राला-सूर्य देवाला-नमस्कार असो. ४.

रुचं ब्राह्मं जनयन्त । देवा अग्रे तदब्रुवन् । यस्त्वैवं ब्राह्मणो विद्यात् । तस्य देवा असन् वशे ॥ ५ ॥

**अन्वय**—देवा अग्रे रुचं ब्राह्मं जनयन्तः तत् अब्रुवन्। यः ब्राह्मणः एवं विद्यात् तस्य वशे देवाः असन्।

*अर्थ*—परमात्मा महासर्गाच्या आरंभीं ऋग्वेदरूप व सर्व वेदान्तवेद्य सूर्याला उत्पन्न करीत असताना हें पुढील वाक्य बोलला। ('देवा' व 'जनयन्त' असा मन्त्रात बहुवचनीं प्रयोग जरी केलेला आहे तरी इंद्रादि देव सूर्याचे जनक आहेत, असें समजण्यास काहीं प्रमाण नाहीं म्हणून त्याचा 'परमात्मा' असा एकवचनीं अर्थ केला आहे) जो ब्राह्मण अशा प्रकारें त्याला जाणतो त्याच्या अधीन इंद्रादि सर्व देव राहतात ५

वरील मन्त्रात सूर्याची परोक्षतन स्तुति करून आता या मन्त्रात अपरोक्षपणें स्तुति करतात—

**हरीश्च ते लक्ष्मीश्च पत्न्यौ। अहोरात्रे पार्श्वे। नक्षत्राणि रूपम्। अश्विनौ व्यात्तम्। इष्टं मनिषाण। अमुं मनिषाण। सर्वं मनिषाण।**

**अन्वय**—भो भगवन् आदित्य ते ह्रीः च लक्ष्मीः पत्न्यौ। अहोरात्रे पार्श्वे। नक्षत्राणि रूपम्। अश्विनौ व्यात्तम्। इष्टं मनिषाण। अमुं मनिषाण। सर्वं मनिषाण॥

अर्थ—हे भगवन् आदित्या, जगज्जीवना, आपल्या सौन्दर्यानें मन हरण करणारी ह्री व इंदिरा या तुझ्या भार्या आहेत, नक्षत्रें हेंच तुझें रूप होय आकार आहे अश्विनीकुमार हेंच तुझें उघडलेलें मुख आहे (व सर्व ब्रह्माण्ड हे तुझे इतर अवयव आहेत याप्रमाणें स्तुति केला गेला तो भगवान् श्रीसूर्य भक्तापुढें प्रत्यक्ष उभा राहून त्याला म्हणतो–) हे भक्ता, तुला जें अभीष्ट असेल तें मजपासून मागून घे, या परलोकाची इच्छा कर, आणि तुला जें जें हवें असेल तें तें मागून घे ६

**हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत्।**
**स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम॥**

**अन्वय**—यस्मात् परः [illegible] भूः अग्रे समवर्तत। तत् सः च यः प्रसादतः भूतस्य एकः पतिः [illegible] मनः पृथिवीं इमां द्याम् उत द्याम् दाधार। कस्मै देवाय हविषा विधेम। (न [illegible] तस्यैव प्रीत्यर्थं प्रेतं स्मार्तं च सर्वं कर्म कुर्म।)

अर्थ—ज्या परमात्म्यापासून चतुर्मुख सृष्टीच्या आरंभीं उत्पन्न झाला व उत्पन्न झालेला तो ज्याच्या प्रसादानें सर्व भुवनांचा एकच पति झाला तो या पृथिवीला व द्युलोकालाही धारण करता झाला. तेव्हां त्याला सोडून दुसऱ्या कोणाला उद्देशून हविर्युक्त यज्ञाच्या योगानें आम्हीं अनुष्ठान करावें ? ( दुसऱ्या कोणाकरितांही नाहीं; तर त्या परमात्म्याच्या प्रीत्यर्थच आम्हीं सर्व श्रौत-स्मार्त कर्म करावें. ) १.

*यः प्राणतो निमिषतो महित्वैक इद्राजा जगतो बभूव ।*
*य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ॥*

*अन्वय.* —यः परमात्मा प्राणतः निमिषत. जगतः महित्वा एकः इत् राजा बभूव । यः परमात्मा अस्य ब्रह्माण्डस्य मध्ये विद्यमानान् द्विपद. चतुष्पदः ईशे । तं विना कस्मै देवाय हविषा विधेम ॥

अर्थ—जो परमात्मा प्राणयुक्त व निमिषयुक्त इ० जंगम व स्थावर यांचा एकच राजा झाला व जो परमात्मा या ब्रह्मांडांत असलेल्या मनुष्य-पश्वादि द्विपद व गाय-घोडा इत्यादि चतुष्पद प्राण्यांचे नियमन करतो, सर्व प्राण्यांच्या हृदयकमलांत राहून अन्तर्यामिरूपानें सर्व जगाला पुण्यपापात नियुक्त करतो त्याला सोडून आम्हीं दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? २.

य आत्मदा बलदा यस्य विश्व उपासते प्रशिषं यस्य देवाः ।
यस्य छायामृतं यस्य मृत्युः कस्मै देवाय हविषा विधेम ॥

अन्वयः—य आत्मदा बलदा यस्य प्रशिषं विश्वे देवा. उपासते यस्य छाया अमृतं यस्य अशरणागतत्व मृत्युः तं विना कस्मै देवाय हविष विधेम ॥

अर्थ—जो जीवरूप आत्मा देतो, बल देतो ज्या परमात्म्याची आज्ञा सर्व मनुष्य व देवही शिरसा मान्य करितात, ज्या परमात्म्याची छाया-शरणागतत्व मोक्षाचें कारण होतें व अशरणागतत्व नरकाचें निमित्त होतें त्याच्यावांचून दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ३.

यस्येमे हिमवन्तो महित्वा यस्य समुद्रं रसया सहाऽऽहुः ।
यस्येमाः प्रदिशो यस्य बाहू कस्मै देवाय हविषा विधेम ॥

अन्वय —इमे हिमवन्तो यस्य महित्वा। वेदा रसया सह समुद्रं यस्य महित्वा आहुः। इमाः प्रदिशः यस्य अवयवा च प्रदिशः यस्य बाहू तं विना कस्मै देवाय हविषा विधेम ॥

अर्थ—हे भूलोकीं असलेले हिमालयप्रभृति पर्वत, ही ज्याची विभूति आहे, त्याचप्रमाणें वेद नद्यासह समुद्राला ज्याची विभूति ह्मणतात, ह्या प्राच्यादि चार दिशा ज्याचे अवयव आहेत, व आग्नेय्यादि उपदिशा ज्याचे बाहू आहेत, साराश पर्वत, नद्या, समुद्र, दिशा, विदिशा, वृक्ष, प्राणी इत्यादि ही सर्व ज्याची विभूति आहे, त्यावाचून दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी? ४

यं क्रन्दसी अवसा तस्तभाने अभ्यैक्षेतां मनसा रेजमाने।
यत्राधि सूर उदितो व्येति कस्मै देवाय हविषा विधेम ॥

अन्वय —यत्र अधि सूरः उदितः सन् व्येति (शिशुमारचक्रं परितः भ्राम्यति) तं क्रन्दसी अवसा तस्तभाने रेजमाने यं मनसा अभ्यैक्षेताम् तं विना कस्मै देवाय हविषा विधेम ॥

अर्थ—ज्या द्यावा-पृथिवींच्या मध्यें सूर्य उदय पावून शिशुमार चक्राच्या सभोंवार भ्रमण करतो त्या अतिवृष्टि, विद्युपात इत्यादिकांच्या योगानें व प्रलयाधार असल्यामुळें प्राण्यांच्या रोदनाला कारण होणाऱ्या रक्षक अन्नाच्या योगानं जीवाची स्थिति करणाऱ्या (अर्थात् जगाच्या उत्पत्ति-स्थिति लयाचे कारण होणाऱ्या) आणि विराजमान होणा या द्यावापृथिवी ज्या परमात्म्याचें निर्मल मनोवृत्तीनें सर्व प्रकारें ध्यान करितात त्यावाचून आह्मी दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी? ५

येन द्यौरुग्रा पृथिवी च दृढा येन स्वस्तभितं येन नाकः।
योऽन्तरिक्षे रजसो विमानः कस्मै देवाय हविषा विधेम ॥ ६ ॥

अन्वय —उग्रा द्यौः पृथिवी च येन दृढा येन स्वः स्तभितं। येन नाकः निर्मितः यः अन्तरिक्षे रजसः विमानः तं विना० ॥

अर्थ—अशनिपातादिकांमुळें उग्र असलेली द्यौ (स्वर्ग) व पृथ्वी, यांना ज्या परमात्म्यानें दृढ ह्म० सर्व प्राण्याचें धारण व पोषण करण्यास

समर्थ केलें आहे, ज्यानी आदित्यमंडल अन्तरिक्षात निराधार स्थापिलें आहे, (आणि त्यामुळेंच तें भूमीवर पडत नाहीं,) ज्या परमात्म्यानें स्वर्गलोक पुण्यवानांच्या उपभोगाकरिता निर्मिलेला आहे व जो अन्तरिक्षात वृष्टिरूप जलाला निर्माण करणारा आहे त्याला सोडून आम्हीं आणखी दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ६.

आपो ह यन्महतीर्विश्वमायं दक्षं दधाना जनयन्तीरग्निम्।
ततो देवानां निवर्ततासुरेकः कस्मै देवाय हविषा विधेम॥

अन्वय — यत्-यदा जगतीं निर्मातुं सकल्पितवान् ततः देवाना असु एकः परमात्मा आ अयं दक्ष दधाना अग्नि जनयन्ती महतीः आप निरवर्तत ॥

अर्थ--जेव्हा त्या ब्रह्मदेवादि सर्व प्राण्याच्या प्राणभूत परमात्म्यानें जगाला निर्माण करण्याचा सकल्प केला तेव्हा त्यान सर्व प्रकारे शुभावह आणि सर्व प्राण्याच्या धारणास व पोषणास समर्थ अशा विश्वाला धारण करणाऱ्या आणि अग्नीला उत्पन्न करणाऱ्या पूज्य जलाला निर्माण केले त्याला सोडून आम्ही आणखी दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ७.

यश्चिदापो महिना पर्यपश्यद्दक्षं दधाना जनयन्तीरग्निम्।
यो देवेष्वधि देव एक आसीत् कस्मै देवाय हविषा विधेम॥

अन्वय --दक्षं दधाना अग्नि जनयन्ती आप चित् य महि । पर्यपश्यत् य देवेषु अधि एक देव. आसीत् त विना कस्मै देवाय० ॥

अर्थ—श्रौतस्मार्त कर्माचें अनुष्ठान करण्यास समर्थ असलेल्या अग्नीला धारण करणाऱ्या व वडवाग्नीसारख्या अग्नीला उत्पन्न करणाऱ्या आपाला जो चिद्रूप परमात्मा आपल्या महिम्यानें पाहता झाला, ह्म० तें आप सर्व जीवाचें साधन आहे, असें त्यानें पाहिलें आणि तसाच जो सर्व देवाहून अधिक असल्यामुळे एक देव झाला त्या परम्यात्म्यावांचून आम्हीं दुसऱ्या कोणाची परिचर्या करावी ? ८.)

---

सर्व जगाला अधीन करतो. त्याचप्रमाणें पतनशील पंच महाभूतांच्या योगानें सर्व जगाला उत्पन्न करतो. अशा प्रकारें हा देव यावा पृथिव्यादिक सर्व जगत् उत्पन्न करीत एकच राहतो.

आतां या उक्त अर्थाविषयीं अतिशय श्रद्धा उत्पन्न करावयासाठीं पुढील दोन मंत्रांनीं गंधर्वाचा वृत्तान्त दाखवितात--

**वेनस्तत्पश्यन् विश्वा भुवनानि विद्वान् यत्र विश्वं भवत्येकनीळम्**
**यस्मिन्निदं सं च वि चैकं स ओतः प्रोतश्च विभु प्रजासु ॥**
**प्र तद्वोचे अमृतं नु विद्वान् गन्धर्वो नाम निहितं गुहासु ।**
**त्रीणि पदा निहिता गुहासु यस्तद्वेद सवितुः पिता सत् ॥**

**अन्वयः**–यत्र विश्वं एकनीडं भवति तत् पश्यन् विश्वा भुवनानि विद्वान् वेनः गन्धर्वः गुहासु निहितं अमृतं तत् वस्तु स्वानुभवेन विद्वान् प्रवोचे नु यस्मिन् परमात्मवस्तुनि इदं जगत् सं च वि च भवति । एकः सः विभुः सन् प्रजासु ओतः प्रोतः च अवतिष्ठते । गुहासु त्रीणि पदा निहिता । यः तत् वेद सः सवितुः पिता सत् ।

**अर्थ**—ज्या परमात्म्यामध्यें जगत् एकरूप होतें त्याला गुरुशास्त्रप्रसादानें साक्षात् जाणणारा वेन नावाचा गंधर्व सर्व प्राण्यांच्या बुद्धीमध्यें असलेल्या विनाशरहित तत्त्वाला स्वानुभवानें जाणून आपल्या शिष्यांना सांगता झाला. ( आत्मसाक्षात्कारानंतर सर्व जगत् आत्मरूपच आहे, असें ज्ञान होतें. ) तसेंच त्यानें पाहिलेल्या त्या परमात्म्यामध्यें हें जगत् उत्पन्न होतें व लीन होतें. तो अद्वितीय तत्त्वरूप परमात्मा व्यापी होऊन सर्व प्रजांचे ठिकाणीं पटांतील दीर्घ उभ्या तंतूंप्रमाणें ओत व आडव्या तंतुंप्रमाणें प्रोत होऊन राहतो. प्राण्यांच्या बुद्धींमध्यें जाग्रत्-स्वप्न सुषुप्तिरूप तीन स्थानें अवस्थित आहेत. जो हा गंधर्व त्या जागरितादि तीन स्थानाच्या अधिष्ठानाला जाणतो तो आपल्या उत्पादकाचाही पिता–जनक होतो. ( लौकिक पिता पुत्राच्या नुसत्या देहाला उत्पन्न करतो. पण ब्रह्मतत्त्वज्ञ परमात्मरूपानें सर्व जगदुत्पादक असल्यामुळें आपल्या जनकाचाही जनक होतो, असा भावार्थ. )

तो परमेश्वर व्यवहारकाळीं सर्व प्राण्यांवर उपकार करणारा व परमार्थदर्शी पुरुषाला मोक्ष देणारा आहे, असें दोन मंत्रांनीं दाखवितात—

स नो बन्धुर्जनिता स विधाता धामानि वेद भुवनानि विश्वा ।
यत्र देवा अमृतमानशानास्तृतीये धामान्यध्यैरयन्त ॥
परि द्यावापृथिवी यन्ति सद्य परि लोकान्परि दिशः परि सुवः ।
ऋतस्य तन्तुं विततं विचृत्य तदपश्यत् तदभवत्प्रजासु ॥

अन्वय –स नः बन्धुः, जनिता, विधाता, विश्वा भुवनानि धामानि वेद । यत्र तृतीये लोके स्वर्गाख्ये अमृतं आनशानाः धामानि अध्यैरयन्त । ये मुमुक्षवः ते सर्वे विदिततत्त्वाः सन्तः द्यावापृथिवी सद्यः परियन्ति । तथा अवशिष्टान् लोकान् परियन्ति । दिशः परियन्ति । सुव परियन्ति । ऋतस्य तन्तुं विततं विचृत्य यः ब्रह्मतत्त्वं अपश्यत् स एव प्रजासु तत् अभवत् ॥

अर्थ—तो परमात्मा आम्हा सर्वांचा बंधु आहे. (कारण तो आमच्या सुकृताच्या अनुरोधानें आमचा हितकारी होतो.) तसाच जनिता म्ह० उत्पादक पिता आहे. (कारण तो सर्वस्रष्टा आहे.) तो जगाचा निर्माता होऊन सर्व उत्तमाधम लोक व त्यात देवादिकांना योग्य असलेलीं स्थानें यास जाणतो. ज्या तिसऱ्या स्वर्गसंज्ञक लोकात इन्द्रादि देव अमृत प्राशन करीत *स्वकीय स्थानास सर्वतः प्राप्त झालेले असतात* (ते सर्व जाणून त्यानीं केलेल्या काम्य कर्मांच्या अनुसार फल देतो.) जे मुमुक्षू असतात ते तत्त्ववेत्ते होऊन तत्क्षणीं द्यावापृथिवीसंज्ञक दोन लोकांस तत्काल व्यापितात. त्याचप्रमाणें ते बाकी राहिलेल्या अन्तरिक्षादि लोकांस व्यापितात. प्राच्यादि दिशा व स्वर्ग यानाही व्यापितात (सर्वात्मक झाल्यामुळे त्याची सर्वव्याप्ति सांगितलेली आहे.) परब्रह्माचें अविच्छिन्न अवस्थान आहे, असें जाणून, असा निश्चय करून जो त्या ब्रह्माला साक्षात् जाणतो तोच प्रजेमध्यें तं ब्रह्मतत्त्व होतो.

‘ अम्भस्य पारे० ’ या पहिल्या ऋचेपासून वरील मंत्रापर्यंत प्रतिपादिलेल्या ब्रह्मतत्त्वाचा उपसंहार करितात—

परीत्य लोकान् परीत्य भूतानि परीत्य सर्वाः प्रदिशो दिशश्च।
प्रजापतिः प्रथमजा ऋतस्यात्मनात्मानमभिसंबभूव ॥

अन्वय –ऋतस्य प्रथमजाः प्रजापति लोकान् भूतानि सर्वा प्रदिशः दिश परीत्य ( सर्वत व्याप्य सृष्टिकाले सृष्ट्वा पुनरपि ) परीत्य ( स्थितिकाले रक्षित्वा ) आत्मना आत्मान अभिसबभूव ।

अर्थ—सत्य ब्रह्माचा प्रथमकार्यभूत प्रजापति ( हिरण्यगर्भ ) भूः, भुव इत्यादि लोक, देव-मनुष्यादि प्राणिदेह, आग्नेय्यादि सर्व प्रदिशा व प्राच्यादि दिशा या सर्वांना व्यापून, सृष्टिकालीं उत्पन्न करून, पुनरपि स्थिति-कालीं त्या सर्वांचें रक्षण करून स्वस्वरूपानें ( स्वरूपविषयक तत्त्वज्ञानानें ) सत्यज्ञानादिलक्षण स्वात्म्यास सर्वत प्राप्त झाला आहे.

---

येथवर ब्रह्मविद्येचें प्रतिपादन केलें. आता तिच्या प्राप्तीचीं साधनें अशीं जीं–सोपाधिक ब्रह्माचें ध्यान, जप, स्नान, इत्यादि–कर्में त्याचे अग-भूत मत्र पूर्वी कर्मकाण्डात सागितलेले नाहींत. ते आता या खिलकाण्डात सागतात. पण वेद आता अगोदर एका मत्रानें ब्रह्मप्राप्त्यर्थ अन्तर्यामीची प्रार्थना करतो—

सदसस्पतिमद्भुतम् प्रियमिन्द्रस्य काम्यम्। सनिं मेधामयासिषम् ॥

अन्वय –अह अद्भुत इन्द्रस्य प्रिय काम्य सनिं मेधा प्रयच्छन्त सदस पतिं अयासिष अस्मि ॥

अर्थ—मी या अचिन्त्य जगाची रचना करणाऱ्या अद्भुत, इंद्राचाही अन्तर्यामी असल्यामुळें इंद्रालाही प्रिय असलेल्या, ह्मणूनच दुसऱ्या सर्वां-कडूनही अपेक्षा केल्या जाणाऱ्या, कर्मांची फळें देणाऱ्या आणि श्रुत व अधीत मन्त्रांचें धारण करण्याची शक्ति देणाऱ्या त्या जगाच्या पालकाला—अन्तर्यामीला–प्राप्त झालों आहें.

आता कर्मठ अभ्युपाधिक परमेश्वराची इष्टप्राप्तीविषयीं प्रार्थना करतो—

उद्दीप्यस्व जातवेदोऽपघ्नन्निर्ऋतिं मम। ( ४ )
पशूंश्च मह्ममावह जीवनं च दिशो दिश ॥

अन्वयः-हे जातवेदः मदनुग्रहार्थं मम निर्ऋतिं अपघ्नन् उद्दीप्यस्व । मह्यं पशून् जीवनं च सर्वं भोग्यजातं आवह । ततः दिशः दिश ॥

अर्थ—( उत्पन्न झालेल्या प्राणिशरीरांत जाठराग्नीच्या रूपानें राहणाऱ्या किंवा उत्पन्न झालेल्या यजमानांना फल देण्यासाठीं आपल्या चित्तांत निश्चय करणाऱ्या ) हे अग्ने, तूं मजवर अनुग्रह करण्यासाठीं माझें अनिष्ट करणाऱ्या निर्ऋतीचा-पापदेवतेचा-विनाश करीत उत्कर्षानें दीप्त हो. त्यानंतर मजकरितां गायी, घोडे इत्यादि पशू व दीर्घ आयुष्य आणि त्याच-प्रमाणें दुसरेंही सर्व भोग्यजात संपादन कर. त्यानंतर मला प्राच्यादि दिशां-मध्यें सुखानें निवास करण्यासाठीं त्या त्या दिशांतील निवासयोग्य स्थानें दे.

आता त्या संपादित पशूंच्या अविनाशाची प्रार्थना करितात—

मा नो हिंसीज्जातवेदो गामश्वं पुरुषं जगत् ।
अबिभ्रदग्न आगहि श्रिया मा परिपातय ॥

अन्वयः-हे जातवेदः त्वत्प्रसादात् मदीयं गवादिकं निर्ऋतिः मा हिंसीत् । हे अग्ने, त्वं अबिभ्रत् आगहि । ततः मा श्रिया परिपातय ॥

अर्थ—हे अग्ने, तुझ्या प्रसादानें माझ्या गायीला, अश्वाला, पुरु-षाला व इतर गृह-क्षेत्रादिकांला पापदेवता नष्ट न करो. हे अग्ने, तू आमच्या अपराधांना मनांत न धरतां आह्मावर अनुग्रह करण्यासाठीं ये आणि मला धन-धान्यादि संपत्ति सर्वतः प्राप्त करून दे.

आता गायत्रींचे निरनिराळ्या देशांत निरनिराळे श्रुतिपाठ आहेत. विज्ञाने-श्वरप्रभृति प्राचीन निबन्धकारांनी त्यांतील नवसष्ट अध्यायाच्या द्राविडपाठाचा आदर केला आहे. पण महाराष्ट्रांतील हिरण्यकेशी वैदिक अनुवाकांचा पाठ करीत असतात. यास्तव आह्मीही त्यांच्या अनुरोधानेंच व्याख्यान करतों. येथें अग्नीहून बाकी गायत्रीछंदांनी आत्मप्राप्तीच्या द्वारभूत देवतांची प्रार्थना केली आहे.

पुरुषस्य विद्म सहस्राक्षस्य महादेवस्य धीमहि । तन्नो रुद्रः प्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि । तन्नो रुद्रः प्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे वक्रतुण्डाय धीमहि । तन्नो दन्ती प्रचोदयात् ॥
तत्पुरुषाय विद्महे चक्रतुण्डाय धीमहि । (५) तन्नो नन्दिः प्रचोदयात् ॥

तत्पुरुपाय विद्महे महासेनाय धीमहि। तन्नः षण्मुखः प्रचोदयात् ॥
तत्पुरुपाय विद्महे सुवर्णपक्षाय धीमहि। तन्नो गरुड प्रचोदयात्॥
वेदात्मनाय विद्महे हिरण्यगर्भाय धीमहि। तन्नो ब्रह्म प्रचोदयात् ॥
नारायणाय विद्महे वासुदेवाय धीमहि। तन्नो विष्णुः प्रचोदयात् ॥
वज्रनखाय विद्महे तीक्ष्णदंष्ट्राय धीमहि।(६)तन्नो नारसिंह प्रचोदयात्।
भास्कराय विद्महे महद्द्युतिकराय धीमहि। तन्नो आदित्यः प्रचोदयात्।
वैश्वानराय विद्महे लालीलाय धीमहि। तन्नो अग्निः प्रचोदयात् ॥
कात्यायनाय विद्महे कन्यकुमारि धीमहि। तन्नो दुर्गि प्रचोदयात् ॥

**अन्वय** –सहस्राक्षस्य पुरुषस्य स्वरूपं विद्म। तदर्थं तस्य विराड्रूपस्य महादेवस्य स्वरूप धीमहि। तत न' रुद्र प्रचोदयात् ॥ तत्पुरुषाय महादेवाय विद्महे धीमहि च। तत् न रुद्र प्रचोदयात् ॥ तत्पुरुषाय वक्रतुण्डाय विद्महे धीमहि च। तत् न दन्ति. प्रचोदयात् ॥ तत्पुरुपाय चक्रतुण्डाय विद्महे धीमहि च तत् नन्दि नः प्रचोदयात्॥ तत्पुरुपाय महासेनाय धीमहि तन्न षण्मुखः प्रचोदयात् ॥ तत्पुरुपाय सुवर्णपक्षाय विद्महे धीमहि च। तत् न गरुड. प्रचोदयात् ॥ वेदात्मनाय हिरण्यगर्भाय विद्महे धीमहि च। तनो ब्रह्म प्रचोदयात् ॥ नारायणाय वासुदेवाय विद्महे धीमहि च। तत् न विष्णु प्रचोदयात् ॥ वज्रनखाय विद्महे तीक्ष्णदंष्ट्राय धीमहि तन नारसिंह प्रचोदयात् ॥ भास्कराय विद्महे महद्द्युतिकराय धीमहि। तन्न आदित्य प्रचोदयात् ॥ वैश्वानराय विद्महे लालीलाय धीमहि। तत् नः अग्नि प्रचोदयात् ॥ कात्यायनाय विद्महे कन्यकुमारि धीमहि। तत् न दुर्गि प्रचोदयात् ॥

**अर्थ**–'विश्वतश्चक्षु' इत्यादि मन्त्रात सांगितलेला विराट् पुरुष सहस्राक्ष आहे. त्या सहस्राक्ष पुरुषाचें स्वरूप आह्मीं जाणावें, यासाठीं आह्मी त्या महादेवाच्या स्वरूपाचें ध्यान करतों. त्या ध्यानात आह्माला रुद्र प्रेरणा करो. त्या आगमप्रसिद्ध पुरुपाकार महादेवाला आह्मीं जाणावें ह्मणून त्याचें ध्यान करतों. त्या ध्यानात रुद्र आह्माला प्रवृत्त करो हत्तीच्या सोंडिप्रमाणें ज्याचें तोंड लांब आहे व रत्नकलशाचें धारण करण्यासाठीं जें वक्र झालें आहे अशा त्या वक्रतुंडाला जाणण्यासाठीं आह्मी त्याचें ध्यान करतों. त्या ध्यानात मोठ्या दातानें युक्त असलेला देव आह्माला प्रवृत्त करो.

त्या स्वेच्छेनें पुरुषरूप धारण करणाऱ्या परम शिवाच्या वाहनरूप नन्दिकेश्वराला आम्ही जाणतों, आणि चक्राप्रमाणें ज्याचें तोंड आहे ( भगवान् विष्णूनें सोडलेलें चक्र जसें राक्षसाना मारतें त्याप्रमाणे शंकराचा राक्षसाशीं संग्राम चालला असता नंदी त्याना तोंडानें मारतो, हें प्रसिद्ध आहे यास्तव ) त्या चक्रतुंडाचें आम्ही ध्यान करतों. तो आह्मास प्रेरणा करो. त्या पूर्णरूप देवसेनानीला आम्ही जाणतों व त्याचें ध्यान करतो तो षडानन आह्माला प्रेरणा करो येथें त्या प्रसिद्ध पक्षिराजाचें रूप धारण करणाऱ्या सुवर्णपक्षयुक्त पुरुषाला जाणण्यासाठीं आह्मी त्याचें ध्यान करतों. तरी त्यामध्यें तो गरुड आह्माला प्रवृत्त करो वेदरूप हिरण्यगर्भाला आम्ही जाणतों व त्याचें ध्यान करतों ते ब्रह्म आह्माला पुण्यामध्यें प्रवृत्त करो. नरशरीराच्या उपादानरूप अन्नादि पच मूलाना नार ह्मणतात त्यात मुख्य असलेल्या ज्या आप् त्या ज्याचें अयन ह्म० आधार आहे तो नारायण ह्मणजे समुद्रजलशायी त्या नारायण वासुदेवाला ( ह्म० कृष्णावतारात वसुदेवपुत्र झालेल्या देवाला ) प्राप्त व्हावें ह्मणून आह्मी त्याचें ध्यान करतों तरी आपल्या वास्तविक परब्रह्मरूपानें जगाला व्यापणारा विष्णु आह्माला त्या ध्यानांत प्रेरणा करो. ज्याचीं नखें वज्रासारखीं आहेत व दंष्ट्रा तीक्ष्ण आहेत त्याला आह्मी जाणतों व त्याचें ध्यान करतों तो नारसिंह आह्माला प्रेरणा करो महद्युतीला ह्म० त्रैलोक्यांत पसरणाऱ्या कांतीला करणारा व भूलोकींच दीप्तीला करणारा जो आदित्य त्याला आह्मी जाणतों व त्याचें ध्यान करतों तो आह्माला शुभ कार्यांत प्रवृत्त करो जो आपल्यामध्यें अर्पण केलेलीं हव्यें स्वत घेऊन दुसऱ्या देवतांना पोंचवितो तो अग्नि, सर्व नराना जो हितकर असतो तो वैश्वानर, कुटुंबसबधी टीला हीच हेला व सर्व देवतामध्यें अग्रगण्यत्वरूप टीला, यांनीं जो युक्त असतो तो हेटालिल, त्याला आह्मी जाणतों व त्याचें ध्यान करतों. तो आह्मांला प्रेरणा करो ( 'हेलाटील' या शब्दांतील 'हे' ए अक्षर जाऊन लाटील एवढेंच राहिलें व त्याची चतुर्थी 'टाटीलाय' अशी झाली आहे. )

गजचर्म धारण करणारा रुद्र (कात्य) जिचें अयन-अधिष्ठान-उत्पादक आहे ती कात्यायनी, तीच कन्या व कुमारी (अनिष्टाचें निवारण करणारी); तिच्या आकारानें नटलेल्या परमेश्वराला जाणण्यासाठीं आह्मी ध्यान करतों. तरी त्यामध्यें ती दुर्गा आह्मांला प्रवृत्त करो· (या सर्व गायत्रींचा चित्तशुद्धीकरितां ध्यानपुरःसर जप करावा.)

---

*आतां यापुढें स्नानाङ्गभूत मंत्र सांगतात. पण आरंभीं मस्तकावर मृत्तिके-सह दूर्वा धारण करावयासाठीं दूर्वाभिमंत्रण मंत्र सांगतात—*

सहस्रपरमा देवी शतमूला शताङ्कुरा।
सर्वं हरतु मे पापं दूर्वा दुःस्वप्ननाशिनी॥
काण्डात्काण्डात् प्ररोहन्ती परुषः परुषः परि। (७)
एवा नो दूर्वे प्रतनु सहस्रेण शतेन च॥
या शतेन प्रतनोषि सहस्रेण विरोहसि।
तयास्ते देवीष्टके विधेम हविषा वयम्॥

**अन्वयः**-सहस्रपरमा देवी शतमूला शताङ्कुरा दुःस्वप्ननाशिनी दूर्वा मे पापं हरतु। हे दूर्वे, काण्डात् काण्डात् परुषः परुषः परि प्ररोहन्ती एव नः शतेन सहस्रेण प्रतनु॥ हे देवि, इष्टके, या त्वं शतेन प्रतनोषि सहस्रेण विरोहसि तस्याः ते परि-चर्यां वयं हविषा विधेम।

**अर्थ**—ही जी दूर्वाभिमानिनी देवता ती पवित्र करणाऱ्या दुसऱ्या सहस्रावधि द्रव्यांहून उत्कृष्ट आहे. ती प्रकाशमान आहे. तिला शेकडों मुळें आहेत. अनेक अंकुर आहेत. ती दुष्ट स्वप्नांचा नाश करणारी आहे. यास्तव ती दूर्वा देवी माझें सर्व पाप हरण करो. हे पापहिंसके दूर्वे, तूं प्रत्येक पेरापासून आपला अंकुर उत्पन्न करतेस· व प्रत्येक मुळापासून तुझा उद्भव होतो. अशा प्रकारची तूं आमचा शेंकडों पुत्र व सहस्रावधि पौत्र यांच्या योगानें सर्वोत्कृष्ट विस्तार कर. हे देवि, इष्ट मंत्र व भक्त यांच्याकडून स्तुति

पदोपदीं रक्षण कर. हे मृत्तिके, तूं कामधेनूप्रमाणें सर्वांना संतुष्ट करणारी, नानाप्रकारच्या धान्यांना व तृणादिकांना धारण करणारी व प्राण्यांचेंही धारण करणारी भूमि होऊन कृष्णवर्ण ( काळ्या ) व शंभर-बाहुयुक्त वराहावताराकडून पूर्वी वर उठविली गेली आहेस. हे मृत्तिके, मीं जें दुष्कर्मरूप पाप केलें असेल त्याचा तूं नाश कर. तूं परमात्म्या ब्रह्माकडून भूमिरूपानें स्थापिली गेली आहेस. ह्म० तूं ब्रह्मदत्ता आहेस. काश्यप व इतर ऋषी योंनीं स्नानाचे वेळीं तुझें अभिमंत्रण केलें आहे व त्यांचें पाप तूं नाहींसें केलें आहेस. ( यास्तव आह्मीही तुझें अभिमंत्रण करतों. कारण तें शिष्टाचारानेंच प्राप्त आहे. ) जव, गहूं इत्यादि जें जें ह्मणून पुष्टीचें साधन आहे तें तें सर्व हे मृत्तिके, तुझ्यामध्यें प्रतिष्ठित आहे. यास्तव तूं मला पुष्टि दे. सर्व प्राणी जिच्यामध्यें प्रतिष्ठित होतात ती प्रतिष्ठिता. हे प्रतिष्ठिते, मृत्तिके, माझें तें सर्व पाप नष्ट कर. हे मृत्तिके, त्या तूं माझ्या पापाचा नाश केलास ह्मणजे त्यामुळेंच मी परम गतीस जाईन.

याप्रमाणें दूर्वा व मृत्तिका यांना उजव्या हातावर घेऊन व मंत्रांनीं अभिमंत्रून कर्मठ दोन मंत्रांनीं इंद्रापासूनही अभयाची प्रार्थना करतो–

यत इन्द्र भयामहे ततो नो अभयं कृधि ।
मघवञ्छग्धि तव तन्न ऊतये विद्विषो विमृधो जहि ॥
स्वस्तिदा विशस्पतिर्वृत्रहा विमृधो वशी ।
वृषेन्द्रः पुर एतु नः स्वस्तिदा अभयंकरः ॥

अन्वयः–हे इन्द्र, मघवन्, यतः भयामहे ततः नः अभयं कृधि । तत् नः शग्धि । तव न ऊतये विमृधः विद्विष जहि । स्वस्तिदा, विशस्पतिः, वृत्रहा, विमृधः वशी, वृषा, स्वस्तिदाः, अभयंकर इन्द्रः, नः पुरः एतु ।

अर्थ–हे इन्द्रा, हे मघवन्, आह्मी ज्या पापाला, शत्रूला किंवा नरकाला भितो त्या पापादिकांपासून आह्मांला अभय कर. (ह्म० आह्मी तुझ्या प्रसादानें निष्पाप, निःशत्रु व निर्नरक होऊं, असा मात्र. केवळ त्यांची भीति वाटूं नये, एवढेंच नव्हे तर ) त्यांचा तूं नाश कर. तसेंच, आह्मी तुझे भक्त व त्यामुळेंच

तुझे संबंधी आहों. यास्तव आमच्या रक्षणाकरितां पीडा देणाऱ्या आमच्या अन्तर्बहिः शत्रूंना मार. इहलोकसंबंधी सौख्य देणारा, भक्त प्रजेचा पति, वृत्रासुराला मारणारा, शत्रूंना आपल्या स्वाधीन ठेवणारा, पुष्करावर्तादि मेघांना आज्ञा करून भूमीवर वृष्टि करणारा, व परलोकसंबंधीं कल्याण व अभय करणारा इंद्र स्नान करावयास उद्युक्त झालेल्या आमच्या समक्ष आमचें रक्षण करण्यासाठीं येवो.

स्नान करीत असतांना सुसरी, मासे इत्यादिकांची पीडा होऊं नये ह्मणून एका मंत्रानें कर्मद्व क्षेमाची याचना करतो.—

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः।
स्वस्ति नस्ताक्ष्यों अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु॥

अन्वयः-वृद्धश्रवाः इन्द्रः नः स्वस्ति दधातु। विश्ववेदाः पूषा नः स्वस्ति दधातु। अरिष्टनेमिः तार्क्ष्यः नः स्वस्ति दधातु। बृहस्पतिः नः स्वस्ति दधातु॥

अर्थ—ज्याचें यश समृद्ध आहे, असा इन्द्र आह्मांला स्वस्ति देवो, ह्मणजे आमचें पोषण करो. बहुज्ञानवान् अथवा बहु धनवान् पूषा आह्मांला स्वस्ति करो. ज्याच्या रथाची चक्रनेमि फार दूर गमन केलें तरी राक्षसांकडून छिन्नभिन्न केली जात नाहीं असा गरुड आह्मांला स्वस्ति करो. तसाच बृहस्पति आह्मांला स्वस्ति करो.

आतां एका मंत्रानें सोम व इन्द्र यांची प्रार्थना करितात—

आयान्तमन्युस्तृपलप्रभर्मा धुनिः शिमीवाञ्छरुमाँ ऋजीषी।
सोमो विश्वान्यतसा वनानि नार्वागिन्द्रं प्रतिमानानि देभुः॥ (१०)

अन्वयः—आयान्तमन्युः तृपलप्रभः धाधुनिः शिमीवान् शरुमान् तथा ऋजीषी सोमः अतसा विश्वानि वनानि पुष्णाति। अर्वाक् प्रतिमानानि इन्द्रं न देभुः॥

अर्थ—उगीच वर वर रागावणारा, (ह्म० आईबाप मुलांवर जसे कधीं मनापासून रागावत नाहींत तर नुसते वरवर रागावतात त्याप्रमाणें) चंद्रकांत मण्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा, मधमाश्यांना वगैरे प्रिय वाटणारा अथवा वासनासमयीं सर्वांना रम्य भासणारा, शमी ज्याला फार आव-

इतो असा, तसाच अतिशय सौख्यसंपन्न, व अतिशय दीप्तिमान् चंद्रमा सर्व वनाना पोसतो तसेंच इंद्राच्या अपेक्षेनें अर्वाक् असलेलीं उपमानें इन्द्राला पीडा देऊं शकत नाहींत. (व्यवहारात प्राण्याला स्वत सारख्या असलेल्या दुसऱ्या वस्तूचा हेवा वाटतो व त्यामुळें मानसिक पीडा होते. पण तसा कोणी स्वसदृश नसल्यास त्याला पीडा होत नाहीं तस्मात् इन्द्र निरुपम आहे, असा भावार्थ.)

आता एका मन्त्रानें परमात्म्याची प्रार्थना केली जाते—

**ब्रह्म जज्ञान प्रथम पुरस्ताद्वि सीमत सुरुचो वेन आव ।**
**स बुध्निया उपमा अस्य विष्ठा सतश्च योनिमसतश्च विव ॥**

**अन्वय**—प्रथम पुरस्तात् जज्ञान वेन (वन) ब्रह्म सुरुच लोकान् सीमत व्याव (वि आव)। स (तद्ब्रह्म) उपमा अस्य विष्ठा बुध्निया सत योनिं असत च योनिं विव ।

**अर्थ**—सर्व देवाच्या पूर्वी असणार, त्याचप्रमाणें पूर्व दिशेंत सूर्यरूपानें उगवणारें व सर्वांना प्रिय असलेलें ब्रह्म अतिशय शोभणाऱ्या तीन लोकास भूलोकच्या मध्यप्रदेशापासून स्वप्रकाशानें प्रगट करतें झालें तें ब्रह्म अवकाशयुक्त व विविधस्थानभूत प्राच्यादि दिशा, घट पटादि सत् वस्तूचें स्थान व वाय्वादि असत् ह्म• अमूर्त वस्तूच स्थान यास प्रकाशित करतें.

आता कर्मठ पुनरपि दोन मन्त्रांनीं पुन घेतलेल्या मृत्तिकेच्या शुद्धीकरिता पृथ्वीची प्रार्थना करतो—

**स्योना पृथिवि भवा नृक्षरा निवेशनी ।**
**यच्छा न शर्म सप्रथा ॥**
**गन्धद्वारा दुराधर्षां नित्यपुष्टा करीषिणीम् ।**
**ईश्वरीं सर्वभूतानां तामिहोपह्वये श्रियम् ॥**

**अन्वय**—हे पृथिवि, नृक्षरा निवेशनी सप्रथा त्व न स्योना भवा। शर्म यच्छा ॥ गन्धद्वारा दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीं सर्वभूतानां ईश्वरीं श्रियं तां इह उपह्वये ॥

अर्थ—हे विशाले, मनुष्यादि चतुर्विध भूतांना उत्पन्न करणारी, उत्पन्न केलेल्या भूतांना ग्राम-अरण्यादि यथायोग्य स्थानीं स्थापणारी आणि अतिशय सहनशील या कीर्तीनें युक्त असलेली तूं आमच्या दुःखाचा नाश करणारी हो. घ्राणेंद्रियानें ग्रहण केला जाणारा गन्ध हेंच जिच्या उपलब्धीचें साधन आहे, असुरादि प्रतिकूल पुरुषांनाही जिचा तिरस्कार करतां येत नाहीं, जी सर्वदा व्रीहि-यवादि धान्यांनीं परिपूर्ण आहे, जी पुष्कळ गोमयानें ह्म० गार्यी, ह्मशी इत्यादि पशूंनीं युक्त आहे, देव-मनुष्यादि सर्व जीवांच्या देहांची उत्पादक व त्यामुळें जी त्यांची ईश्वरी ह्म० नियन्त्री आहे त्या सर्व भूतांना सेव्य असलेल्या मृत्तिकाभिमानिनी देवीला मी या स्नानकर्मांत बोलावितों.

या पुढील मंत्रांनीं मंत्रविलेली मृत्तिका पायांपासून मस्तकापर्यंत सर्व शरीराला लावून जलप्रवेश करण्याकरितां मंत्र ह्मणतो—

**श्रीर्मे भजतु । अलक्ष्मी र्मे नश्यतु । विष्णुमुखा वै**
**देवाश्छन्दोभिरिमाँल्लोकाननपजय्यमभ्यजयन् ।**
**महाꣳ इन्द्रो वज्रबाहुः षोडशी शर्म यच्छतु । ( १० )**

अन्वयः—मे श्रीः भजतु । मे अलक्ष्मीः नश्यतु । ये विष्णुमुखाः देवाः छन्दोभिः इमान् लोकान् अनपजय्यं यथा तथा अभ्यजयन् । वै वज्रबाहुः षोडशी महान् इन्द्रः शर्म यच्छतु ॥

अर्थ—मला गजान्तलक्ष्मी प्राप्त होवो. माझी अलक्ष्मी ( दारिद्र्य ) नाश पावो. ( ह्मणजे ती आह्मांपासून, आमच्या कुलांतील लोकांपासून, आमच्या बंधुवर्गापासून, आमच्या गांवापासून व आमच्या राष्ट्रापासूनही दूर राहो. ) जे विष्णुप्रभृति देव ते वेदविहित साधनांच्या योगानें चवदा लोकांस मुख्य मुख्य राक्षसांनाही जिंकतां न येईल अशा रीतीनें दीर्घ उपभोगाकरितां प्राप्त झाले आहेत. यास्तव ते अभीष्ट देणारे होवोत. प्रसिद्ध वज्रबाहु व पूर्ण षोडशकलायुक्त त्रैलोक्यपूज्य इंद्रही आह्मांला सुख देवो.

कंबरभर पाण्यांत प्रवेश केल्यावर जलाचें अभिमंत्रण करण्याचा मंत्र–

स्वस्ति नो मघवा करोतु हन्तु पाप्मानं योऽस्मान्द्वेष्टि ॥

अन्वयः—मघवा नः स्वस्ति करोतु । यः पाप्मा अस्मान् द्वेष्टि तं हन्तु ।

अर्थ—शचीपति आह्मांला स्वस्ति करो. जो पापी पुरुष आमचा द्वेष करतो त्या पाप्याला तो मारो.

सामान ५ स्वरणं कृणुहि ब्रह्मणस्पते । कक्षीवन्तं य औशिजम् ॥
शरीरं यज्ञशमलं कुसीदं तस्मिन्त्सीदतु योऽस्मान्द्वेष्टि ॥

अन्वयः—हे ब्रह्मणस्पते, मा सोमानं स्वरणं कृणुहि । औशिजं कक्षीवन्तं यः परमर्षिः सः मम शरीरं यज्ञशमलं करोतु । यः अस्मान् द्वेष्टि स यत् कुसीदं तस्मिन् सीदतु ॥

अर्थ—शाखा व उपशाखा यासह वेदांचें पालन करणाऱ्या हे परमात्म्या, मला सोमयाग करणारा व सर्व शाखांतील उदात्तादि स्वरांचा उच्चार करणारा कर. ( ह्म० तुझ्या अनुग्रहानें मी स्वरादिसहित वेदाध्ययन करून सोमादि याग करीन, असें कर. ) कक्षीवान् या नांवाचा जो उशिक्-नांवाच्या मातेचा पुत्र महर्षि तो माझ्या शरीराला क्रतु व यज्ञ यांविषयींचे श्रम सहन करण्यास समर्थ करो. तसाच जो शत्रु आमचा द्वेष करतो तो नरकांत चिरकाल राहो.

आतां गुडघाभर पाण्यांत प्रवेश करून जप करावयाचे मंत्र ह्मणतो—

चरणं पवित्रं विततं पुराणं येन पूतस्तरति दुष्कृतानि ।
तेन पवित्रेण शुद्धेन पूता अतिपाप्मानमरातिं तरेम ॥

अन्वय—यत् चरणं पवित्रं विततं पुराणं येन पूतः मर्त्यः दुष्कृतानि तरति तेन पवित्रेण शुद्धेन पूताः वयं अरातिं नरकं अतितरेम ।

अर्थ—( या मंत्रानें लक्ष्मीपतीच्या चरणकमलाची स्तुति केली जाते. ) जें विष्णूचें चरण पवित्र, विस्तृत व पुरातन आहे, ज्या चरणानें पवित्र झालेला मर्त्य पापांचें उल्लंघन करतो, त्या पवित्र व शुद्ध वैष्णव पदानें ज्यांचें अन्तःकरण पवित्र झाले आहे, असे आह्मी नरकाला कारण होणाऱ्या व त्यामुळेंच शत्रुरूप, अशा पापाचें उल्लंघन करूं.

सजोषा इन्द्र सगणो मरुद्भि सोम पिब वृत्रहञ्छूर विद्वान् ।
जहि शत्रूꣳ रपमृधो नुदस्वाथाभय कृणुहि विश्वतो न ॥

अन्वय—हे वृत्रहन्, हे शूर, हे इंद्र, त्व सजोषा, सगण, विद्वान् मरुद्भि सह सोम पिब शत्रून् जहि। मृध अपनुदस्व। अथ न विश्वत अभय कृणुहि॥

अर्थ—हे वृत्रघ्ना, शूरा, इंद्रा, तू अन्त करणानुरूप ज्याची प्रीति आहे असा आहेस, सगण आहेस व सर्वज्ञ आहेस तू देवतासह सोमपान कर शत्रूना मार सग्रामाचा नाश कर आणि आह्माला सर्वत अभय दे (निर्भय कर)

सुमित्रा न आप ओषधय सन्तु। दुर्मित्रास्तस्मै
भूयासुर्योऽस्मान् द्वेष्टि य च वय द्विष्म ॥

अन्वय–या आप तज्जन्या ओषधय च न सुमित्रा सन्तु। य शत्रु अस्मान् द्वेष्टि य च वय द्विष्म तस्मै दुर्मित्रा भूयासु॥

अर्थ—ज्या आप् (जल) व आपापासून झालेल्या व्रीहि-यवादि ओषधि त्या आह्माला अनुकूल होवोत व जो शत्रु आमचा द्वेष करतो व आह्मी ज्याचा द्वेष करतो त्या शत्रूला त्या प्रतिकूल होवोत ३६

आपो हिष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन (११) महे रणाय चक्षसे।
यो व शिवतमो रसस्तस्य भाजयतेह न ॥ उशतीरिव मातर ॥
तस्मा अरगमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ॥ आपो जनयथा च न ॥

अन्वय—हे आप, हि मयोभुव स्थ। ता न महे रणाय चक्षसे दधातन। हे आप, य व शिवतम रस तस्य इह न उशती मातर इव भाजयत। हे आप यस्य क्षयाय जि-वथ तस्मै व अर गमाम। आप न जनयथा॥

अर्थ—हे आप, ज्या अर्थी तुह्मी स्नानपानादिकाच्या द्वारा सुख देणाऱ्या आहा त्या अर्थी त्या तुह्मी आह्माला (तुमच्या भक्ताना) रमणीय व पूज्य अशा आत्मदर्शनाकरिता पुष्ट करा (त्यावाचून आमचें जीवन व्यर्थ आहे) तुमचा जो अतिशय कल्याणावह रस आहे त्याचें या भूलोकीं असलेल्या आह्माला अपत्यांच हित इच्छिणाऱ्या मातांप्रमाणें, स्थान

करा (आह्मांला तुमच्या रक्षार्चे पात्र करा ) ज्या अर्थी आमच्या पापाचा क्षय करण्याविषयीं तुह्मांला मोठें प्रेम असतें त्या अर्थी त्याच्या क्षयाकरितां आह्मी तुह्माला शरण येतों. तसेंच अहो जलदेवतानो, आह्मांला पुत्र दुहि त्रादिकाच्या उत्पत्तीस समर्थ करा

असो, या मन्त्रानीं मन्त्रविलेली मृत्तिका अगाला लावून जलात प्रवेश करण्यासाठीं जलाधिपतींची प्रार्थना करण्याकरिता दोन मन्त्र सागतात—

**हिरण्यशृङ्ग वरुण प्रपद्य तीर्थं मे देहि याचित ।**
**यन्मया भुक्तमसाधूना पापेभ्यश्च प्रतिग्रह ॥**
**यन्मे मनसा वाचा कर्मणा वा दुष्कृत कृत ।**
**तन्न इन्द्रो वरुणो बृहस्पति सविता च पुनन्तु पुन पुन ॥**

अन्वय –हिरण्यशृङ्ग वरुण प्रपद्य । तादृश त्व याचित मे तीर्थं देहि । किंच असाधूनां गृहे यन्मया भुक्त तथा पापेभ्य प्रतिग्रह च कृतः अन्यत् अपि मनसा, वाचा, कर्मणा वा यत् दुष्कृत कृत तत् मे सर्वं इन्द्र, वरुण, बृहस्पति च सविता पुन पुन पुनन्तु ॥

अर्थ—सोन्याच्या शृंगाप्रमाणें ज्याच्या मस्तकावर मुकुट आहे त्या हिरण्यशृंग वरुणाला मी त्याच्या अनुग्रहार्थ प्राप्त होतों तशा प्रकारच्या वरुणा, तू मीं याचना केली असल्यामुळें मला तीर्थ (ह्मणजे जलात प्रवेश करावयास स्थान ) दे. तसेंच पाप्याच्या घरीं मीं जें अन्न खाल्लें आहे व प्रतिग्रह घेतला आहे त्याचप्रमाणें मीं जें मनानें, वाणीनें किंवा शरीरानें पाप केलें आहे तें माझें पाप इंद्र, वरुण, बृहस्पति व सविता त्या त्या वेळीं ( पुन पुन ) पावन करोत, पापाचें शोधन करोत

आतां जलांतील देवाना नमस्कार करावयाचा मन्त्र—

**नमोऽग्नयेऽप्सुमते नम इन्द्राय नमो वरुणाय नमो वारुण्यै नमोऽद्भ्य ॥ (१२)**

अन्वय अप्सुमते अग्नये नम । इन्द्राय नम । वारुण्यै नम । अद्भ्य नम ॥

अर्थ–जलात गुप्त होऊन राहिलेल्या अग्नीला, इंद्राला, वरुणाला ( जलाभिमानी देवाला ) वारुणीला ( जलाभिमानिनी देवतेला ) व जलाला नमस्कार असो

जेथें बुडी मारावयाची तेथील दुष्ट जलाला दूर करण्याचा मंत्र—

**यदपां क्रूरं यदमेध्यं यदशान्तं तदपगच्छतात् ॥**

अन्वय–अपां यत् क्रूरं रूपं यच्च अमेध्यं यदपि अशान्तं तत् सर्वं अपगच्छतात् ॥

अर्थ–जलाचें जें क्रूर ह्म० मरणाला कारण होणारें रूप ( पाण्याची ओढ, भोंवरे अतिशय खोली, इत्यादि मरणाचीं निमित्तें आहेत ) तसेंच जें अमेध्य ( ह्म० थुंकी, शेंबूड इत्यादिकांमुळें अपवित्र झालेलें ) रूप, तसेंच जें वात, कफ इत्यादिकांस उत्पन्न करणारें अशान्त रूप तें सर्व या निमज्जन प्रदेशांतून ( बुडी मारण्याच्या स्थानापासून ) दूर जावो.

आता निमज्जनाचे ( स्नानाचे, बुडी मारण्याचे ) दोन मंत्र—

**अत्याशनादतीपानाद्यच्च उग्रात्प्रतिग्रहात् ।**
**तन्नो वरुणो राजा पाणिना ह्यवमर्शतु ॥**
**सोऽहमपापो विरजो निर्मुक्तो मुक्तकिल्बिषः ।**
**नाकस्य पृष्ठमारुह्य गच्छेद्ब्रह्म सलोकताम् ॥**

अन्वय–यत् अत्याशनात्, अतीपानात्, च उग्रात् प्रतिग्रहात् संपादितं पापं तत् मे सर्वं वरुण राजा पाणिना अवमर्शतु हि । ततः पापरहितः सः अहं विरजः निर्मुक्तः मुक्तकिल्बिषः सन् नाकस्य पृष्ठं आरुह्य ब्रह्मसलोकतां गच्छेत् ॥

अर्थ–( देव, पितर व मनुष्य यांना उद्देशून केलेल्या यज्ञावाचून खाल्लेलें जें अन्न तें अत्याशन, देव, ऋषि व पितर यांच्या तर्पणाचें उल्लंघन करून प्यालेलें जें अन्न तें अतिपान, अशास्त्रीय आचरण करणाऱ्या पुरुषापासून धनाचा प्रतिग्रह करणें हा उग्र प्रतिग्रह, त्या सर्वांना केल्यामुळे घडलेलें जें पाप त्या माझ्या पापाला वरुण राजा आपल्या हातानें दूर करो. ह्मणजे पापरहित झालेला हा मी रजोगुणरहित, संसाराला कारण होणाऱ्या रागद्वेषादि दोषापासून सर्वथा मुक्त व त्यामुळेंच पापरहित होऊन स्वर्गाच्या ऊर्ध्वभागीं चढून हिरण्यगर्भाच्या सलोकतेस ( हिरण्यगर्भाच्या भोगांसारख्या भोगास ) प्राप्त होईन.

**यश्चाप्सु वरुणः स पुनात्वघमर्षणः ।**

अन्वयः—अप्सु यः वरुणः सः अघमर्षणः नः पुनातु ।

अर्थ—समुद्र, नद्या, वापी, कूप, तडाग इत्यादि स्थानांतील जो वरुण तो महापातकांचाही नाश करणारा देव आह्मांला पावन करो.

आतां पवित्र गंगादि नद्यांच्या आवाहनाचा मंत्र—

**इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि स्तोमꣳ सचता परुष्णिया ।**
**असिक्निया मरुद्वृधे वितस्तयाऽऽर्जीकिये शृणुह्या सुषोमया॥**

अन्वयः–हे गङ्गे, यमुने, सरस्वति, शुतुद्रि, मरुद्वृधे, आर्जीकीये, परुष्णिया, असिक्निया, वितस्तया, सुषोमया सह मे इमं स्तोमं शृणुहि । श्रुत्वा तत्र आसचता (जले आगत्य तद्द्वारेण मयि समवेता भवत ।)

अर्थ—हे गंगे, यमुने, सरस्वति, शुतुद्रि, मरुद्वृधे व आर्जीकीये, तुह्मी सर्व जणी नद्या परुष्णि, असिक्नि, वितस्ता व सुषोमा यांसहवर्तमान माझें हें स्तोत्र ऐका व तें ऐकून आणि जलांत येऊन त्याच्या द्वारा माझ्यामध्यें संबद्ध व्हा.

जलांत बुडालेल्या पुरुषाच्या प्राणयामाकरितां अघमर्षण सूक्त—

**ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत ।**
**ततो रात्रिरजायत ततः समुद्रो अर्णवः । (१३)**
**समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत ।**
**अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी ।**
**सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत ।**
**दिवं च पृथिवीं चान्तरिक्षमथो सुवः ॥**

अन्वयः–ऋतं च सत्यं च तपसः अधि अभीद्धात् अजायत । ततः रात्रिः अजायत । ततः अर्णवः समुद्रः । अर्णवात् समुद्रात् अधि संवत्सरः अजायत । अहोरात्राणि विदधत् सः मिषतः विश्वस्य वशी भूत्वा वर्तते । धाता, सूर्याचन्द्रमसौ, दिवं, पृथिवीं, अन्तरिक्षं अथो सुवः यथापूर्वं अकल्पयत् ॥

अर्थ—मनानें यथार्थ संकल्प करणें, वाणीनें यथार्थ भाषण करणें, आणि दुसरेंही सर्व शास्त्रीय धर्मजात, तपाच्या नंतर ह्मणजे स्रष्टव्य जगाच्या

पर्यालोचनानंतर ( रत्न ४ पृ ७१ पहा ) त्या प्रकाशमान परमात्म्यापासून उत्पन्न झाले त्या स्वप्रकाश परमात्म्यापासून रात्र झाली ( व दिवसही झाला ) त्याच्यापासूनच हा क्षारोदकानें भरलेला समुद्र झाला अवान्तर भेदयुक्त समुद्रानंतर संवत्सर ( व तदुपलक्षित सर्व काळ ) झाला तो उत्पादक परमेश्वर अहोरात्र व तसेंच दुसरेही सर्व काळाचे अवयव यास उत्पन्न करीत निमिषोन्मेषादि युक्त सर्व प्राण्यांचा स्वामी होऊन राहतो तो तशा प्रकारचा परमेश्वर सूर्य, चन्द्रमा इत्यादि देव, स्वर्ग, पृथिवी, अन्तरिक्ष इत्यादि लोक, स्वर्गांतील नन्दनादि भोगविशेष या सर्वांना पूर्व कल्पांतील त्या त्या पदार्थांच्या रूपानेंच नुसत्या संकल्पानें तयार करता झाला.

याप्रमाणें प्राणायामानं अघमर्षण केल्यावर पुन स्नान करावयासाठीं तीन ऋचा पढतात—

यत्पृथिव्याः रज स्वमान्तरिक्षे विरोदसी । इमाःस्तदापो वरुण पुनात्वघमर्षण ॥ पुनन्तु वसव पुनातु वरुण पुनात्वघमर्षण । एष भूतस्य मध्ये भुवनस्य गोप्ता एष पुण्यकृतां लोकानेष मृत्यो र्हिरण्मय । द्यावापृथिव्योर्हिरण्मयः सः श्रितः सुव । ( १४ ) स न सुव सः शिशाधि ॥

अन्वय –पृथिव्यां वर्तमानाना अस्माकं स्व रज यत् अस्ति वा अन्तरिक्षे विशेषत विरोदसी मत् पाप अस्ति तत् आप अघमर्षण वरुण इमान् अस्मान् पुनातु । वसव पुनन्तु । वरुण अपि एन पुनातु । अघमर्षण अन्य अपि एन पुनातु ॥ एष भूतस्य मध्ये, भुवनस्य गोप्ता । एष पुण्यकृतां लोकान् प्रयच्छति । एष पापिनां मृत्यो हिरण्मय ज्वालविशेषं प्रयच्छति । यत्र हिरण्मय ब्रह्माण्डरूप द्यावा पृथिव्यो श्रित वर्तते । हे वरुण स स न सुव शिशाधि ॥

अर्थ—या पृथ्वींत राहणाऱ्या आमचें जं स्वकीय पाप आहे त्याच प्रमाणें सर्वत आन्तरिक्ष लोकांत व विशेषत भुवि व स्वर्ग यांच्या मध्यमार्गीं जें पाप आहे त्याचप्रमाणें पृथ्वीच्या खालच्या पाताळादिकांत जें आमचें पाप आहे, (व त्या त्या लोकांत जन्म घेतला असतां आमच्या हातून जें पाप

घडतें ) तें सर्व व त्याचें अनुष्ठान करणारे हे आह्मी यांना तो जलाचा स्वामी व पापांचा नाश करणारा वरुण शुद्ध करो. अष्टावसू याला पावन करोत. वरुणही याला पावन करो. दुसराही पापविनाशक देव याला पावन करो. ( याप्रमाणें त्यांनीं ह्मटलेलं असल्यामुळें पवित्र झालेल्या मला तूंही यमदेव पीडा करूं नकोस. तर मजवर अनुग्रह कर. ) वरुण मागें होऊन गेलेल्या, हल्लींच्या व पुढच्या सर्व प्राण्यांचा रक्षक आहे. हा वरुण ज्योतिष्टोमादि पुण्य करणाऱ्या पुरुषांचे लोक देतो. त्याचप्रमाणें तो सर्व पाप्यांना प्राण्यांना मारणाऱ्या यमाचा हिरण्मय लोक देतो. त्यांत ब्रह्माण्डरूप सुवर्लोक द्यावाभूमीचा आश्रय करून राहतो. हे वरुणा, तो तूं आह्मांला तशा प्रकारचा स्वर्गलोक दे.

याप्रमाणें तीन ऋचा ह्मणून स्नान करणाऱ्या पुरुषाच्या आचमनार्थ मंत्र—

**आर्द्रं ज्वलति ज्योतिरहमस्मि। ज्योतिर्ज्वलति ब्रह्माऽहमस्मि। योऽहमस्मि ब्रह्माहमस्मि। अहमस्मि ब्रह्माहमस्मि। अहमेवाहं मां जुहोमि स्वाहा ॥**

अन्वय.—यत् आर्द्रं तत् ज्वलति, तत् ज्योतिः अहं अस्मि। यत् ज्योतिः ज्वलति तत् ब्रह्म एव अहं अस्मि। यः अहं पुरा जीवः अस्मि सः एव इदानीं अहं ब्रह्म अस्मि। अहं अस्मि ब्रह्म अहं अस्मि। तादृश अहं जलरूपं मां उदराग्नौ जुहोमि स्वाहा ॥

अर्थ—हें जें उदकरूप आर्द्र आहे तें स्वतःच्या अधिष्ठानभूत चैतन्यानें प्रकाशमान होतें. तें अधिष्ठान चैतन्यरूप ज्योति मी आहें. ( संस्कृतांत ' ज्योतिष् ' हा शब्द नपुंसकलिंगी आहे. देह, इंद्रियें इत्यादिकांहून पृथक् केलेल्या माझें स्वरूप तें जलाधिष्ठान चैतन्यच आहे. ) कारण जी ज्योति जळते ह्मणून ह्मटलेलें आहे ती ब्रह्मच आहे. यास्तव मी ज्योति आहें, असें ह्मटलें असतां मी ब्रह्म आहें, असें ह्मटल्यासारखें होतें. ( यावरून–पूर्वसिद्ध जीवात्म्याचें स्वरूप नाहींसें होतें व त्याला

दुसऱ्या रूपाची प्राप्ति होते, असें कोणीं समजूं नये, तर मी आपल्याला पूर्वीसुद्धा जीव समजत होतों तोच आता ब्रह्म समजतों ह्मणजे पूर्वी सुद्धा वस्तुत ब्रह्मच असलेल्या माझ्या ठिकाणीं अज्ञानानें जीवत्वाचा आरोप केला होता. पण विवेकानें त्या अज्ञानाला घालविलें असता आता मी आपल्या वास्तविक पूर्वसिद्ध ब्रह्मस्वरूपाचा अनुभव घेत आहें माझ्या ठिकाणीं ब्रह्मत्व नवेंच आलें आहे, असें नाहीं ) यास्तव मी ब्रह्म आहें या अनुभवाच्या वेळींही पूर्वसिद्ध मीच आहें. ( ह्मणजे माझें ब्रह्मत्व गौण नाहीं मुख्य आहे ) तशा प्रकारचा मी जलरूप अशा मला उदराग्नींत टाकतों ' स्वाहा ' हा शब्द हवि देणें, या अर्थी आहे. ( माझ्या देहांत असलेल्या देवाना मीं जलरूप हवि दिला आहे )

आचमनानतर पुनरपि स्नानाचा मत्र सागतात—

अकार्यकार्यवकीर्णी स्तेनो भ्रूणहा गुरुतल्पगः ।
वरुणोऽपामघमर्षणस्तस्मात्पापात्प्रमुच्यते ॥

अन्वय —अकार्यकारी, अवकीर्णी, स्तेन , भ्रूणहा, गुरुतल्पग । एतादृश अपि मा अघमर्षण अपा स्वामी वरुण तस्मात् पापात् प्रमुच्यते ॥

अर्थ—शास्त्रनिषिद्ध मासभक्षणादि अकार्य करणारा, अगम्य स्त्री गमन करणारा, ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणारा, भ्रूणहत्या करणारा ( ह्म॰ वेदवेदागज्ञ ब्राह्मण किंवा गर्भ यास मारणारा ), गुरुस्त्रीसमागम करणारा, अशा प्रकारचें पाप करणाऱ्याही मला पापविनाशक जलस्वामी वरुण त्या सर्व पापापासून मुक्त करतो

गुप्त पापाच्या क्षालनार्थ स्नानाचा मत्र—

रजोभूमिस्त्व मा॰ रोदयस्व प्रवदन्ति धीरा ।

अन्वय —हे परमात्मन्, यद्यपि अहं रजोभूमि तथापि त्व मां न रोदयस्व किंतु अनुगृहाण इति धीरा प्रवदन्ति ॥

अर्थ—हे परमात्म्या, मी जरी पापस्थान आहें तरी तूं मला पाप पश्चात्ताप रडवूं नको. तर पापाचा नाश करून मजवर अनुग्रह कर असें बुद्धिमान् लोक ह्मणतात.

आतां स्नानानंतर जप करावयास योग्य असलेला मंत्र—

**आक्रान्त्समुद्रः प्रथमे विधर्मञ्जनयन्प्रजा भुवनस्य राजा ।**
**वृषा पवित्रे अधि सानो अव्ये बृहत्सोमो वावृधे सुवान इन्दुः (१५)**

अन्वय.—विधर्मन् प्रथमे प्रजाः जनयन् समुद्रः आक्रान् । स. भुवनस्य राजा, कामवर्षणहेतुत्वात् वृषा, सोमः पवित्रे, अधि, अव्ये सानो बृहत् वावृधे । सः सोमः सुवानः इन्दुः ॥

अर्थ—प्राण्यांनी पूर्वकल्पांत केलेले विविध धर्म ज्या वेळी आपलें फळ देण्यासाठीं जागे होतात त्याच विधर्मसंज्ञक सृष्टीच्या आदिसमयीं प्रजेला उत्पन्न करणारा आनंदसमुद्र परमात्मा सर्व जगाला व्यापता झाला. तो भुवनाचा पालक असल्यामुळें राजा व स्वभक्तांवर इष्ट विषयाचा वर्षाव करणारा असल्यामुळें वृषा आहे. उमा नांवाच्या ब्रह्मविद्याभिमानिनी देवीसह असलेला परमात्मा पवित्र, रक्षण करणाऱ्या व सर्वांपेक्षां अधिक अशा हृदयकमलांत अतिशय वृद्धि पावला आहे. (ज्ञा० पूर्वी अविद्याच्छादित झाल्यामुळें तो संकुचित जीवसा होतो. पण पुढें ती अविद्या विद्येमुळें तिरस्कृत झाली असतां त्याच्या स्वाभाविक ब्रह्मतेचा आविर्भाव होतो व त्यामुळें तो वृद्धि पावल्यासारखा भासतो.) तो सोम जीवांच्या धर्माधर्मांचा प्रेरक आहे. तो फलदानानें चंद्राप्रमाणें आह्लादाचा हेतु होतो. (इति नारायणोपनिषदि प्रथमोनुवाकः)

आतां अनिष्टपरिहारार्थ जप करावयास योग्य असलेले सहा मंत्र सांगतात—

जातवेदसे सुनवाम सोममरातीयतो निदहाति वेदः ।
स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा नावेव सिन्धुं दुरिताऽत्यग्निः ॥

अन्वयः—जातवेदसे सोमं सुनवाम । वेद अरातीयतः निदहाति । सः नः अस्माकं विश्वा दुर्गाणि अतिपर्षद् । यथा नावा सिन्धुं तथा अग्नि. दुरिता अतिपर्षद् ॥

अर्थ—आह्मी अग्नीला यागसमयीं, लतारूप सोम पिळून अर्पण करतों. सर्व जाणणारा वेदसंज्ञक अग्नि आमच्याशीं शत्रूप्रमाणें आचरण

करणा या पुरुषास सर्वथा भस्म करून सोडतो तो अग्नि आमच्या सर्व आपत्तींना सर्वथा नाश करता झाला जसा नाविक नावेच्या योगानें इतरांना समुद्रातून पार नेतो त्याप्रमाणें अग्नि पापांपासून पार करतो.

तामग्निवर्णां तपसा ज्वलन्तीं वैरोचनीं कर्मफलेषु जुष्टाम्।
दुर्गां देवीं शरणमहं प्रपद्ये सुतरसि तरसे नमः ॥

अन्वय —अग्निवर्णां तपसा ज्वलन्तीं वैरोचनीं कर्मफलेषु जुष्टां दुर्गां देवीं अहं शरणं प्रपद्ये। हे सुतरसि तस्यै नमः अस्तु ॥

अर्थ—जिचा वर्ण अग्नीसारखा आहे, आपल्या स्वाभाविक संतापानें जाज्वल्य होणारी, विशेषतः स्वतःच प्रकाशमान होणाऱ्या परमात्म्यानें पाहिलेली असल्यामुळें वैरोचनी व स्वर्ग, पशु पुत्र इत्यादि कर्मफलाकरिता उपासकांकडून सेविली गेलेली अशा त्या दुर्गा देवीला मी शरण जातों संसारातून पार करणारे हे देवि, मला तारणाऱ्या तुला नमस्कार असो

अग्ने त्वं पारया नव्यो अस्मान्त्स्वस्तिभिरति दुर्गाणि विश्वा।
पूश्च पृथ्वी बहुला न उर्वी भवा तोकाय तनयाय शंयोः ॥

अन्वय —हे अग्ने नव्यः त्वं अस्मान् स्वस्तिभिः विश्वा दुर्गाणि अतिपारय। नः त्वत्प्रसादात् या पूः च सा पृथ्वी भवतु। तथा उर्वी बहुला भवतु। त्वं च तोकाय तनयाय–अस्मदीयाय पुत्राय शंयोः भव ॥

अर्थ —हे अग्ने, स्तुति करण्यास योग्य असलेला तू आम्हाला कल्याण कर उपायांच्या योगानें सर्व आपत्तींचें उल्लंघन करून संसाराच्या पैलतीरास ने. तुझ्या प्रसादानें आमची जी रहावयाची नगरी आहे तीही विस्तीर्ण होवो शेत उत्पन्न करण्यास योग्य असलेली भूमि ही पुष्कळ होवो तू आमच्या आपत्याला व पुत्राला सुखसंपन्न करणारा हो. ५४.

विश्वानि नो दुर्गहा जातवेदः सिन्धुं न नावा दुरितातिपर्षि।
अग्ने अत्रिवन्मनसा गृणानोऽस्माकं बोध्यविता तनूनाम् ॥

अन्वय —हे जातवेदः दुर्गहा त्वं नावा सिन्धुं इव विश्वानि दुरितानि अतिपर्षि। हे अग्ने अत्रिवत् मनसा गृणानः अस्माकं तनूनां अविता बोधि ॥

अर्थ—हे अग्ने, सर्व आपत्तींचा नाश करणारा तू आह्माला नाविक जसा नावेच्या योगानें नदी किंवा समुद्र यातून त्याप्रमाणें सर्व पापातून अतिशय तारतोस हे अग्ने, तू अत्रीप्रमाणे मनानें शुद्ध भावना करीत आमच्या शरीराचा रक्षक होऊन सावधान होऊन रहा. ( आध्यात्मिकादि तापत्रयरहित असल्यामुळें अनिसंशक जीवन्मुक्त महर्षि सर्वांच्या विषयीं मनात दया बाळगून या जगांत 'सर्व सुखी राहोत, सर्व नीरोग असोत,' इत्यादि सर्वदा चिंतन करतो त्याप्रमाणें तू आह्माविषयीं शुभ भावना कर )

पृतनाजितꣳ सहमानमुग्रमग्निꣳहुवेम परमात्सधस्थात् ।
स नः पर्षदतिदुर्गाणि विश्वा क्षामद्देवो अतिदुरिताऽत्यग्निः ॥(१)

अन्वय—पृतनाजित सहमान उग्र अग्निं परमात् सधस्थात् हुवेम । सः नः विश्वा दुर्गाणि अतिपर्षत् । अग्निः देवः क्षामत् अतिदुरिता ॥

अर्थ—शत्रूंच्या सैन्याला जिंकणाऱ्या व ह्मणूनच शत्रूंना सहन करणाऱ्या, उग्र अग्नीला त्याच्या भृत्यासह रहावयाच्या उत्कृष्ट स्थानापासून आह्मी बोलावितों. तो अग्नि आमच्या सर्व आपत्तींचा सर्वथा नाश करो. तसाच अग्नि देव आमच्या अपराधाची क्षमा करून आमच्याकडून ब्रह्महत्यादि महापातकाचेंही उल्लंघन करवितो.

प्रत्नोषि कमीड्यो अध्वरेषु सनाच्च होता नव्यश्च सत्सि ।
स्वां चाग्ने तनुवं पिप्रयस्वास्मभ्यं च सौभगमायजस्व ॥

अन्वय—हे अग्ने, त्वं अध्वरेषु ईड्यः कं प्रत्नोषि । सनात् च होता नव्यः च सत्सि । अतः हे अग्ने स्वां च तनुवं पिप्रयस्व । ततः अस्मभ्यं च सौभगं आयजस्व ॥

अर्थ—हे अग्ने, तू यज्ञात स्तुत्य होऊन सुखाचा विस्तार करतोस. कर्मफलाचा दाताही होऊन होता (होमनिष्पादक) होतोस (स्तुत्य होऊनही यागप्रदेशीं राहतोस) यास्तव हे अग्ने, तू आपल्याही तनूला आमच्या हवींनें प्रसन्न कर आणि त्यानंतर आह्मालाही सौभाग्य संपन्न कर.

गोभिर्जुष्टमयुजो निषिक्तं तवेन्द्र विष्णोरनुसंचरेम।
नाकस्य पृष्ठमभिसंवसानो वैष्णवीं लोक इह मादयन्ताम्॥

अन्वयः—हे इंद्र, अयुज विष्णोः तव गोभिः जुष्टं ( अमृतधाराभिः ), निषिक्तं ( महाभाग्यं उद्दिश्य ) अनुसंचरेम। नाकस्य पृष्ठं अभिसंवसान' वैष्णवीं कुर्वाण मा इह लोके मादयन्ताम्॥

अर्थ—हे इंद्रा, पाप व दुःख यांनीं युक्त न होणाऱ्या व सर्व यागांमध्यें व्यापनशील अशा तुझ्या धेनूंनीं सेविलेल्या व अमृतधारांचा ज्यावर वर्षाव झाला आहे अशा महाभाग्याला उद्देशून आम्ही ( भृत्यांप्रमाणें ) तुझ्या अनुसार वर्तन करतों. स्वर्गावर सर्वतः वास करणारे देव विष्णूची भक्ति करणाऱ्या मला माझें वांछित देऊन या लोकीं हर्षयुक्त करोत.

( इति द्वितीयोऽनुवाकः )

त्यांना उद्देशून दिलेलें हें अन्न सुहुत होवो. सुवःप्रतिपाद्य आदित्य व द्युलोक, यांना हें अन्न स्वाहा. भूः, भुवः, सुवः, या मंत्राच्या प्रतिपाद्य चंद्राला व दिशांना उद्देशून दिलेलें द्रव्य सुहुत होवो. ( येथें होमद्रव्य अन्न आहे. आणि विशेष फळ सांगितलेलें नसल्यामुळें पापक्षय हें साधारण फळ जाणावें ) याप्रमाणें चार मंत्रांनीं यथाशक्ति होम करून नंतर पूर्वाभिमुख होऊन ' नमो देवेभ्यः ' या मंत्रानें उपस्थान करावें. ' स्वधा पितृभ्यः ' या मंत्रानें दक्षिणाभिमुख होऊन उपस्थान करावें ( स्वधाशब्द पितरांना प्रिय असलेला नमस्कारादि उपचार सांगतो. ) मी भूः, भुवः व सुवः या तिन्ही लोकीं पापरहित होतों. ' ओं ' हा शब्द अंगीकाराचें प्रतिपादन करतो ( इति तृतीयोऽनुवाकः )

---

आतां केवळ पापक्षयार्थ मंत्र सांगतात––

**भूरग्नये पृथिव्यै स्वाहा भुवो वायवेऽन्तरिक्षाय स्वाहा सुवरादित्याय दिवे स्वाहा भूर्भुवःसुवश्चन्द्रमसे दिग्भ्यः स्वाहा नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवःसुवरन्न ओम् ॥ ( ४ )**

अन्वयः––भूः अग्नये, पृथिव्यै स्वाहा । इत्यादि

**अर्थ**––येथें आज्य हें होमद्रव्य आहे. तें सुहुत असो; इत्यादि अर्थ स्पष्ट आहे. ' अन्न ओम् ' याचा अर्थ–हे अग्ने, तूं ही माझी पापनिवारणाची प्रार्थना सफळ कर. मला अन्न प्राप्त होवो,-असा जाणावा. (इति चतुर्थोऽनुवाकः)

---

ज्याला पूजेची इच्छा असते, लोकांनीं आपला सत्कार करावा असें वाटतें, त्यानें कोणत्या मंत्रानें होम करावा तें सांगतात––

**भूरग्नये च पृथिव्यै च महते च स्वाहा भुवो वायवे चान्तरिक्षाय च महते च स्वाहा सुवरादित्याय च दिवे च महते च स्वाहा भूर्भुवःसुवश्चन्द्रमसे च नक्षत्रेभ्यश्च महते च स्वाहा नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवःसुवर्महरोम् ॥ ( ५ )**

अन्वय —भू अग्नये, पृथिव्यै महते च स्वाहा। इत्यादि

अर्थ—महते म्हणजे प्रौढ किंवा पूज्य हिरण्यगर्भाला 'महते च' येथील चकारानें त्या त्या देवताचे सेवक देव घ्यावे. त्यानाही उद्देशून हें द्रव्य सुहुत असो महरों ह्म० मीं पूजेला प्राप्त व्हावें (इति पञ्चमोऽनुवाक)

---

'भूरग्नये०' इत्यादि अनुवाकात पापक्षयार्थ होममन्त्र सागितले आता ज्ञानप्रतिबन्धाच्या निवारणाने मुमुक्षुला ज्ञानाची प्राप्ति व्हावी म्हणून होम मन्त्र सागतात—

पाहि नो अग्न एनसे स्वाहा। पाहि नो विश्ववेदसे स्वाहा॥
यज्ञं पाहि विभावसो स्वाहा। सर्वं पाहि शतक्रतो स्वाहा॥(६)

अन्वय —हे अग्ने, न एनसे पाहि। स्वाहा। न विश्ववेदसे पाहि। तदर्थं तुभ्य इद स्वाहा। विभावसो, यज्ञ पाहि स्वाहा। हे शतक्रतो सर्व पाहि स्वाहा।

*अर्थ—हे अग्ने, ज्ञानप्रतिबन्धक पापापासून रक्षण कर त्यासाठीं हें* तुला सुहुत असो सर्व तत्त्वज्ञानाच्या सिद्ध्यर्थ आमचें पालन कर तदर्थ तुला स्वाहा विशेष दीप्ति हेंच ज्याचें धन आहे तो विभावसु अग्नि, हे विभावसो, ज्ञानाच्या इच्छेनें आह्माकडून अनुष्ठान केल्या जाणाऱ्या साधनांनीं निर्विघ्न पणें समाप्ति करून आमचं पालन कर ज्या अग्नीकडून शंभर यज्ञ केले जातात तो शतक्रतु अग्नि, हे शतक्रतो, आमच्या गुरुशास्त्रादि सर्व ज्ञान-साधनाचें रक्षण कर (स्वाहाशब्दाचा अर्थ वर दिलाच आहे ६)

पाहि नो अग्न एकया। पाह्युत द्वितीयया।
पाह्यूर्जं तृतीयया। पाहि गीर्भिश्चतसृभिर्वसो स्वाहा॥ (७)

अन्वय —हे अग्ने हे वसो, न एकया पाहि। स्वाहा। उत द्वितीयया पाहि। स्वाहा, तृतीयया ऊर्जं पाहि। चतसृभि गीर्भि पाहि स्वाहा॥

*अर्थ —हे अग्ने, हे वसो (जगन्निवास हारो), तू एका ह्म० ऋग्वेद लक्षण वाणीने सर्व प्रकारें स्तुति केला गेलेला असा होऊन आमचं रक्षण कर त्याकरिता हं आज्य तुला सुहुत असो दुसऱ्या यजुर्वेदरूप वाणीनेंही*

स्तुतिकेला गेलेला असाही तूं आमचें रक्षण कर; स्वाहा. तसेंच, तिसऱ्या सामवेदरूपी वाणीनें अभिष्टुत असा तूं आमचें बल व अन्नरस यांचें रक्षण कर; स्वाहा आणि ऋग्, यजुः, साम व अथर्वरूप चारी वाणींनीं अभिष्टुत असा तूं आमचें रक्षण कर; स्वाहा.

---

ज्याला सर्व ज्ञानप्रतिपादक वेदान्ताची प्राप्ति व्हावी, अशी इच्छा असते त्यानें कोणत्या मंत्राचा जप करावा, तें सांगतात--

**यश्छन्दसामृषभो विश्वरूपश्छन्दोभ्यश्छन्दाऽस्याविवेश । सचाऽशिक्यः पुरोवाचोपनिषदिन्द्रो ज्येष्ठ इन्द्रियाय ऋषिभ्यो नमो देवेभ्यः स्वधा पितृभ्यो भूर्भुवः सुवश्छन्द ओम् ॥ (८)**

**अन्वयः**--यः प्रणवः छन्दसां मध्ये ऋषभः-श्रेष्ठः विश्वरूपः-सर्वजगदात्मकः । तादृशः प्रणवः छन्दोभ्यः प्रादुर्भूतः सन् छन्दांसि आविवेश । सताशिक्यः ज्येष्ठः इन्द्रः ऋषिभ्यः इन्द्रियाय उपनिषत् प्रोवाच । अतः तत्प्रतिबन्धनिवारणाय देवेभ्यः नमः पितृभ्यः स्वधा । भूर्भुवःसुवरोम् ॥

अर्थ—( रत्न ४ पृष्ठ २१ येथें वर्णन केल्याप्रमाणें ) जो प्रणव वेदांमध्यें श्रेष्ठ व सर्व जगद्रूप आहे तो वेदांपासून प्रादुर्भूत झाला. ( म्हणजे तो वेदाचें सार या रूपानें प्रजापतीला स्फुरला. ) तो पुनः गायत्र्यादि छंदांमध्यें शिरला. ( म्ह० त्यांत त्याचा प्रयोग करूं लागले. ) कर्माचें अनुष्ठान करणारे उपासक व ज्ञानी, या सज्जनांना प्राप्त करून घेतां येण्याजोगा व सर्वांचें कारण असल्यामुळें सर्वांहून पहिला, असा प्रणवप्रतिपाद्य परमैश्वर्ययुक्त परमात्मा अन्तर्मुख जिज्ञासूंना ज्ञानसामर्थ्याकरितां सर्व वेदान्तप्रसिद्ध ब्रह्मविद्या सांगता झाला. यास्तव मी त्या ज्ञानाच्या प्रतिबंधाचें निवारण व्हावें म्हणून देवांना नमस्कार करतों. पितरांनाही स्वधाशब्दानें प्रसन्न करतों. मी भूः, भुवः व सुवः अशा तीन लोकांत स्थित असलेल्या वेदांस प्र होतों. ( इति अष्टमोऽनुवाकः )

---

आतां प्राप्त झालेल्या वेदांचें विस्मरण न व्हावें, म्हणून जप्य मंत्र—

**नमो ब्रह्मणे धारणं मे अस्त्वनिराकरणं धारयिता भूयासं कर्णयोः श्रुतं मा च्योढ्वं ममामुष्य ओम् ॥ (९)**

**अन्वय**—ब्रह्मणे नमः अस्तु। तत्प्रसादान्मदीये चित्ते ग्रन्थतदर्थयोः धारणं अस्तु। अनिराकरणं यथा स्यात् तथा धारयिता भूयासं। अमुष्य मम कर्णयोः श्रुतं आसीत् तत् सर्वं मा च्योढ्व। ततः अहं ओं स्थिरं धारणं प्राप्नुयाम् ॥

**अर्थ**—जगाच्या कारणाला नमस्कार असो, त्याच्या प्रसादानें माझ्या चित्तांत ग्रंथ व त्याचा अर्थ, यांचें धारण होवो. म्हणजे त्यांचें विस्मरण न होईल अशा रीतीनें मी त्यांचें धारण करणारा व्हावें, अशी प्रार्थना करणाऱ्या या माझ्या कानांनीं जें काहीं वेदशास्त्रादिक केव्हांही ऐकलें असेल त्या सर्वांचा विनाश करूं नको. त्यामुळें मला स्थिर धारणा प्राप्त होवो. (९.)

---

चित्तैकाग्र्यरूप तप हेंच ज्ञानाचें साधन आहे. कारण 'मन व इंद्रियें यांचें ऐकाग्र्य हेच परम तप आहे,' असें श्रुतींत सांगितलें आहे. यास्तव त्या तपाची सर्व श्रौत-स्मार्त कर्मस्वरूपतेनें प्रशंसा करितात. अथवा अशा प्रकारच्या तपाच्या सिद्ध्यर्थ जप्य मंत्र सांगतात—

**ऋतं तपः सत्यं तपः श्रुतं तपः शान्तं तपो दमस्तपः शमस्तपो दानं तपो यज्ञं तपो भूर्भुवः सुवर्ब्रह्मैतदुपास्यैतत्तपः ॥**

**अन्वयः**—ऋतं, सत्यं, श्रुतं, शान्तं, दमः, शमः, दानं, यज्ञं (यज्ञः) सर्वं तपः अस्ति। हे मुमुक्षो, भूर्भुवःसुवरात्मकविराड्देहरूपं यद्ब्रह्म अस्ति एतद् ब्रह्म उपास्य। एतत् तपः॥

**अर्थ**—मनानें यथार्थ वस्तूचें चिंतन करणें हें ऋत, वाणीनें यथार्थ भाषण करणें, हें सत्य, वेदाच्या पूर्वोत्तर भागाचा अर्थ समजावा म्हणून दोन्हीं मीमांसांचें श्रवण करणें, हें श्रुत, बाह्य व आभ्यंतर इंद्रियांची शान्ति, हें शान्त, शास्त्रोक्त उपवासादिकांच्या योगानें शरीराचें कर्षण करणें ( शरीरास कृश करणें ), हा दम, शत्रूवरही न रागावणें, हा शम, धन असतां

तरी त्यावरील स्वत्व काढून घेऊन त्याच्या जागीं परस्वत्व संपादन करणें, ह्मणजे तें दुसऱ्याचें करणें, हें दान; अग्निहोत्रादि कर्मे, हा यज्ञ, हें सर्व अर्वाचीन तप आहे. हे मुमुक्षो, भूरादिलोकत्रयात्मक विराड्देहरूप जें ब्रह्म आहे त्याची उपासना कर. (ह्मणजे मनांत विजातीय प्रत्ययानीं रहित असा सजातीय प्रत्ययाचा प्रवाह सुरू ठेव. अशा प्रकारचें उपासन हेंच तप आहे. १०.

आतां विहितानुष्ठानरूप पुण्य हें एक ज्ञानाचें साधन आहे, या रूपानें त्याची प्रशंसा करितात व निषिद्धाचरणरूप पाप हें ज्ञानाला प्रतिबंध करणारें आहे, यारूपानें त्याची निंदा करितात—

**यथा वृक्षस्य संपुष्पितस्य दूराद्गन्धो वात्येवं पुण्यस्य कर्मणो दूराद्गन्धो वाति यथासिधारां कर्तेऽवहितामवक्रामे यद्युवे युवे हवा विह्वयिष्यामि कर्त पतिष्यामीत्येवममृतादात्मानं जुगुप्सेत् ॥**

*अन्वय*—यथा संपुष्पितस्य वृक्षस्य गन्धः दूरात् वाति एवं पुण्यस्य कर्मणः गन्धः ( सत्कीर्तिः ) दूरात् वाति । यथा लोकि कर्ते अवहिता असिधारा अवक्रामे । यद् हवा युवे युवे विह्वयिष्यामि कर्ते पतिष्यामि ( एवं चिन्तयति ) तथा मुमुक्षुः अपि अमृतात् आत्मान स्थिरीकृत्य पापात् जुगुप्सेत ॥

**अर्थ**—ज्याप्रमाणें उद्यानादिकांत असलेल्या चंपकादि फुललेल्या वृक्षाचा वास वायूबरोबर दूरवर पसरतो त्याप्रमाणें ज्योतिष्टोमादि पुण्यकर्माची सत्कीर्ति सुगंधासारखी दूरवर जाते. ( ह्म० मनुष्यलोकांतून स्वर्गांत जाते. यास्तव पुण्याचें आचरण करावें. आतां पापाविषयीं दृष्टान्त देतात- ) ज्याप्रमाणें व्यवहारांत एखादा काहीं कारणानें मी एखाद्या मोठ्या खळग्यावर लांकडाप्रमाणें आडव्या ठेवलेल्या तरवारीच्या धारेवरून चालेन, असा निश्चय करतो पण पुढें चालण्याचा प्रसंग आला असतां ' जर ' मीं या धारावर जोरानें पाय टाकिला तर तो कापेल व तो तसा न टाकला तर खालीं गर्तेत पडेन, तात्पर्य कसेंही जरी केलें तरी मला या कर्मापासून दुःखच होईल, असा मनांत विचार करून त्या कर्मापासून निवृत्त होतो त्याप्रमाणें मुमुक्षूनेंही मोक्षप्राप्तीकरतां अन्तःकरणाला स्थिर करून पापापासून

उपरत व्हावें. पापाची घृणा करावी ( मी जर उघड उघड पापाचरण केलें तर लोक माझी निंदा करतील व गुप्तपणें ते केलें तर मला नरक यातना होतील यास्तव मी प्रकट किंवा गुप्त पाप करणार नाहीं, असा निश्चय करून उपरत व्हावें (११)

---

अशी पुण्याची स्तुति व पापाची निंदा ऐकून जो पुण्याचरण करतो व पापाचरण सोडतो त्याचे चित्त शुद्ध होतें, आणि तशा शुद्धचित्त पुरुषाला तत्त्वाचा उपदेश करण्यासाठीं बाराव्या अनुवाकाचा आरंभ करितात—

अणोरणीयान्महतो महीयानात्मा गुहायां निहितोऽस्य जन्तोः ।
तमक्रतुं पश्यति वीतशोको धातुः प्रसादान्महिमानमीशम् ॥

**अन्वय.**— अणोः अणीयान्, महतः महीयान् आत्मा अस्य जन्तोः गुहायां निहितः । तं अक्रतुं महिमानं ईशं शमदमादिगुणयुक्तः धातुः प्रसादात् अधिकारी पुरुषः पश्यति । च ईदृश परमेश्वरं साक्षात्कृत्य वीतशोकः भवति ॥

**अर्थ**—सच्चिदानन्दरूप परमेश्वर सर्वांचे अधिष्ठान आहे त्यामुळें तो सर्व जगाचें स्वरूपही आहे त्यामुळें त्याला ' आत्मा ' म्हणतात. कारण आत्मशब्द स्वरूपवाची आहे असो, सर्व जगाचें स्वरूप असा हा आत्मा या मायाकार्यभूत व्यवहारांत अतिशय सूक्ष्म म्हणून मानलेल्या परमाणूहून अतिशय सूक्ष्म आहे त्याचप्रमाणें व्यवहारांत आकाश, दिशा इत्यादिकांचें परिमाण सर्वांहून अधिक असल्यामुळें त्यांना महत्परिमाणवान् म्हणतात. पण हा आत्मा त्याहूनही अतिशय अधिक असल्यामुळें निरतिशय महत्परिमाणवान् आहे तशा प्रकारचा हा परमात्मा या देवमनुष्यादिरूप जन्तूंच्या बुद्धिरूप गुहेंत राहिलेला आहे ( कारण आत्मज्ञानाच्या योगानें तो बुद्धींतच उपलब्ध होतो ) त्या संकल्परहित व अतिमहान् परमेश्वाला शमदमादिगुणयुक्त पुरुष परमेश्वराच्या अनुग्रहानें अधिकारी होऊन साक्षात् जाणतो आणि त्यामुळेंच जन्ममरणादि शोकरहित होतो

शुद्धचित्त पुरुषांना जाणण्यास योग्य असलेला तो परमात्मा जगाचें कारण आहे, असें शाखाचंद्रन्यायानें सांगतात—

सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्त जिह्वाः ॥
सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशयान्निहिताः सप्त सप्त ॥

अन्वयः—तस्मात् सप्त प्राणा प्रभवन्ति । सप्त अर्चिषः, सप्त समिधः, सप्त जिह्वाः, येषु प्राणाः चरन्ति ते इमे भूरादयः सप्त लोकाः प्रभवन्ति । गुहाशयान् सप्त सप्त निहिताः ॥

अर्थ—त्या मायाशक्तिविशिष्ट परमात्म्यापासून सात प्राण ( ह्म० दोन चक्षु, दोन श्रोत्र, दोन नासिका व एक मुख ) उत्पन्न होतात. त्या सात प्राणांची आपआपल्या विषयांना प्रकाशित करण्याची शक्ति याच सात अर्ची–ज्वाला आहेत. त्याच्या योगानें ग्रहण केले जाणारे सात विषय याच सात समिधा आहेत. त्याचप्रमाणें काली, कराली, मनोजवा इत्यादि सात जिह्वा, तसेच ज्यांत हे मनुष्य, देव इत्यादिकांच्या शरीरांत राहणारे प्राण संचार करितात ते हे सात लोक, त्या परमात्म्यापासून होतात. बुद्धिरूप गुहेंत उपलब्ध होणारा जो परमात्मा त्याच्यापासून सात ऋषी, सात समुद्र इत्यादि सर्व सप्तसंख्याविशिष्ट पदार्थ झाले.

अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्स्यन्दन्ते सिन्धवः सर्वरूपाः ।
अतश्च विश्वा ओषधयो रसाच्च येनैष भूतस्तिष्ठत्यन्तरात्मा ॥

अन्वयः—सर्वे समुद्राः गिरयः च अतः उत्पन्नाः । सर्वरूपाः सिन्धवः अस्मात् स्यन्दन्ते । विश्वा ओषधयः अतः रसात् भवन्ति । एष अहंप्रत्ययगम्यः अन्तरात्मा येन ओपाधिकेन भूत सन् तिष्ठति ॥

अर्थ—त्याच्या पासून सर्व समुद्र व सर्व पर्वत, उत्पन्न होतात. अनेक दिशांनीं वाहणाऱ्या नद्या त्याच्या योगानेंच वाहतात. विद्वानाच्या अनुभवास योग्य असलेल्या त्या रससंज्ञक परमात्म्यापासून सर्व ओषधी उत्पन्न झाल्या आहेत. हा अहंप्रत्ययगम्य अन्तरात्मा ( ह्म० स्थूल देह व चिदात्मा याच्या मध्यें असणारा लिंगदेह ) ज्या ओपाधिरसानें अधिष्ठित होऊन परमात्म्यापासून उत्पन्न होतो, त्याच्यापासून हें सर्व होतें.

ब्रह्मा देवानां पदवीः कवीनामृषिर्विप्राणां महिषो मृगाणाम्।
श्येनो गृध्राणां स्वधितिर्वनानां सोमः पवित्रमत्येति रेभन्॥

अन्वय—देवानां मध्ये ब्रह्मा भूत्वा परमेश्वर अवतिष्ठते। कवीनां मध्ये पदवः, विप्राणां ऋषिः, मृगाणां महिषः, गृध्राणां श्येनः, वनानां स्वधितिः भवति सोमः भूत्वा रेभन् सन् सर्वं पवित्रं अत्येति॥

अर्थ—परमेश्वर अग्नि, इंद्र इत्यादि देवामध्यें चतुर्मुख होऊन नियामकत्वानें राहतो, तसाच तो काव्य नाटकादि करणाऱ्या पुरुषामध्यें शब्द-सामर्थ्याभिज्ञ व्यास वाल्मीकिरूप (पदवी) होऊन राहतो तो वैदिक मार्ग-वर्ती ब्राह्मणामध्यें गोत्रप्रवर्तक वसिष्ठादि ऋषिरूप झाला आहे, तो चतुष्पाद पशूमध्यें शक्तिमान् महिष, गृध्रोपलक्षित पक्ष्यामध्यें श्येन, व वृक्षसमुदायरूप वनात त्याला तोडणारा परशु झाला आहे तो यागसाधनभूत सोमवल्ली होऊन व मंत्रशब्दयुक्त होऊन गंगाजल, कुश, दर्भ इत्यादि दुसऱ्या सर्व पवित्र द्रव्याचें उल्लंघन करतो

व्यवहारदशेंत परमेश्वर चतुर्मुखादिकाच्या शरीरात विशेषें करून राहतो, असें सांगून जगाच्या मूळ कारणभूत मायाशक्तीच्या बळानें बद्ध मुक्तव्यवस्था कशी लागते, तें दाखवितात—

अजामेकां लोहितशुक्लकृष्णां वह्वीः प्रजाः जनयन्तीं सरूपाम्।
अजो ह्येको जुषमाणोऽनुशेते जहात्येनां भुक्तभोगामजोऽन्यः॥(१)

अन्वय—अजां एकां लोहितशुक्लकृष्णां बह्वीः सरूपाः प्रजाः जनयन्तीं अजः एकः जुषमाणः अनुशेते अन्यः अजः भुक्तभोगां एनां जहाति॥

अर्थ—अनादि असल्यामुळें उत्पन्न न होणारी, एक, लोहित शुक्ल कृष्णरूप, व आपल्या सारख्याच स्वरूपाची पुष्कळ प्रजा उत्पन्न करणारी जी मूळ प्रकृतिरूप माया, तिच्या अनुसार एक (आसक्त) जीव तिचें मोठ्या प्रेमानें सेवन करीत राहतो (विवेक न करतां केवळ विषयोपभोग घेणारा तो जन्म मरणप्रवाहरूपानें संसार करतो) पण दुसरा विरक्त जीव जिचा भोग घेतला आहे, अशा त्या मायेचा त्याग करतो (कृ० ता विरक्तीच्या पूर्वी ते भोग भोगतो, त्यानंतर नाही)

जो पुरुष विवेकानें मायेचा त्याग करतो त्याला सर्व जगत् ब्रह्मरूपानें भासत, असा अर्थ सांगतात—

हंसः शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत्।
नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत्॥

अन्वय —हंस, शुचिषद्, वसु, अन्तरिक्षसद्, होता, वेदिषद्, अतिथि, दुरोणसद्, नृषद्, वरसत्, ऋतसत्, व्योमसद्, अब्जा, गोजा, ऋतजा, अद्रिजा एतत्सर्वं ऋतं बृहत्॥

अर्थ—जो सर्वदा गमन करतो तो हंस ह्मणजे आदित्य, तो शुद्ध मंडलात राहतो, वायु सूत्रात्मस्वरूपानें जगन्निवासाला कारण होतो, यास्तव तो वसु होय, तो अन्तरिक्षांत गमन करतो. होमनिष्पादक आहवनीयादि अग्नि हाच होता होय, त्या रूपानें तो सोमयागाच्या अंगभूत वेदीमध्यें राहतो अमावास्यादि विशेष तिथीची अपेक्षा न करितां भोजनाची याचना करण्यासाठीं ठिकठिकाणीं जाणारा जो विदेशी पुरुष तो अतिथि होय, तो अतिथिरूपानें दुसऱ्याच्या घरीं जातो मनुष्यामध्यें कर्माधिकारी जीवरूपानें जो जातो तो नृषत्, काशी, द्वारवती इत्यादि श्रेष्ठ क्षेत्रांत पूज्यरूपानें जो जातो तो वरसत्, ऋत ह्मणजे सत्य, वैदिक कर्मामध्यें फलरूपानें जो जातो तो ऋतसत्, आकाशांत नक्षत्रादिरूपानें जो जातो तो व्योमसत्, जो नद्या, समुद्र इत्यादिकांतील जलांत शंख-मकरादिरूपानें उत्पन्न होतो तो अब्जा, गायींपासून क्षीरादिरूपानें जो उत्पन्न होतो तो गोजा, सत्य वचनापासून जो कीर्ति रूपानें होतो तो ऋतजा, पर्वतापासून वृक्षादिरूपानें जो उत्पन्न होतो तो अद्रिजा, सारांश येथें हंसादिरूपानं सांगितलेलें जें हें जगत् आहे तें सर्व सत्य ब्रह्म आहे (ह्मणजे अज्ञानी लोकाच्या दृष्टीनें जगद्रूपानें भासणारें हें सर्व ज्ञानिदृष्ट्या ब्रह्मच आहे)

या पुढील मंत्रांत ज्ञानसाधनभूत यागादि कर्मांच्या हेतुभूत अग्नींची आनुकूल्याविषयीं प्रार्थना करितात—

घृतं मिमिक्षिरे घृतमस्य योनिर्घृते श्रितो घृतम्वस्य धाम॥
अनुष्वधमावह मादयस्व स्वाहाकृतं वृषभ वक्षि हव्यम् ॥

अन्वय—पूर्वे अग्नौ घृतं मिमिक्षिर। घृतं अस्य योनि.। तत अयं घृते श्रितः घृत उ अस्य धाम। हे अग्ने अनुष्वध देवान् आवह। मादयस्व। हे वृषभ, स्वाहाकृत हव्य वक्षि॥

अर्थ—पूर्वीचे यजमान आहवनीयादिरूप अग्नींत घृताचा सेक करते झाले. तं घृत या अग्नीची योनि ह्म० उत्पत्तिकारण आहे. (कारण घृताच्या सेकानें अग्नींत ज्वाळाची उत्पत्ति झाल्याचें दिसतें.) त्यामुळें हा अग्नि घृताचा आश्रय करून राहिला आहे. घृतच या अग्नीचें स्थान आहे किंवा तेजाचें कारण आहे. हे अग्ने, स्वधेच्या मागून-आमच्या हवीचें स्वरूप घेऊन देवांना येथें आण आणि त्यांना येथें आणून अतिशय हृष्ट कर. हे श्रेष्ठा, स्वाहाकारानें आह्मीं दिलेलें हव्य देवांना पोंचीव.

**वयं नाम प्रब्रवामा घृतेनास्मिन्यज्ञे धारयामा नमोभि ।**
**उप ब्रह्मा शृणवच्छस्यमान चतु शृङ्गोऽवमीद्गौर एतत् ॥**

अन्वय —वय ज्ञानार्थिन पुरुषाः अस्मिन् ज्ञानयज्ञे घृतेन प्रणवरूप नाम प्रब्रवाम । नमोभिः सर्वदा धारयाम । शस्यमान उपशृणवत् एतत् ब्रह्म चतु शृङ्ग गौरः ऋषभः अवमान् ॥

अर्थ—आम्ही ज्ञानार्थी पुरुष या ज्ञानयज्ञात स्वप्रकाश निमित्तभूत ब्रह्माच्या योगानें प्रणवरूप नाम सर्वदा उच्चारतो आणि नमस्कारानीं युक्त असलेले आम्ही आपल्या चित्तात सर्वदा ब्रह्मतत्त्वाचें धारण करतो. आम्हा करून प्रणवाच्या योगानें स्तुति केल्या जाणाऱ्या व आमच्या समीप असलेल्या तत्त्ववेत्त्याकडून ऐकल्या जाणाऱ्या या ब्रह्मतत्त्वाला अकार उकार-मकार नादरूप चार शृंगानीं युक्त असलेला श्वेत ( पांढरा ) प्रणवाख्य वृषभ आकता झाला ( ह्म० उक्त प्रणव ब्रह्मतत्त्वाचें प्रतिपादन करतो. )

**चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।**
**त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यां आविवेश ॥(२)**

अन्वय –अस्य चत्वारि शृङ्गा त्रय पादा द्वे शीर्षे अस्य सप्त हस्तास । त्रिधा बद्ध वृषभ मह रोरवीति । देव मर्त्यान् आविवेश ॥

अर्थ—ब्रह्म प्रणवप्रतिपाद्य असल्यामुळे प्रणवाचीं जीं अकारादि चार शृंगें तीं याचींच आहेत त्याचप्रमाणें त्या ब्रह्माचे विश्व तैजस प्राज्ञ हे तीन अध्यात्म व विराट् हिरण्यगर्भ-अव्याकृत हे तीन अधिदैव पाद आहेत. (ज्याच्या योगानं ब्रह्मत्वाला प्राप्त होता येतें ते पाद ) चिदचिद्रूप दोन शक्ती हींच दोन मस्तकें आहेत त्याचप्रमाणें या ब्रह्माचे भूरादि सात लोक हेच जणु काय सात हात आहेत. अकार-उकार मकारामध्यें विश्व-तैजस प्राज्ञ व विराड् हिरण्यगर्भ अव्याकृत या तीन प्रकारें सबद्ध असलेला प्रणवरूप वृषभ तेजोरूप ब्रह्मतत्त्वाचें अतिशय प्रतिपादन करतो ( आतां तें प्रतिपाद्यत्वच स्पष्ट करतात– ) परमेश्वर मनुष्यदेहामध्यें सर्वत्र प्रविष्ट झाला आहे.

**त्रिधा हितं पणिभिर्गुह्यमानं गवि देवासो घृतमन्वविन्दन्।**
**इन्द्र एकं सूर्य एकं जजान वेनादेकं स्वधया निष्टतक्षुः॥**

अन्वय —त्रिधा हितं पणिभिः गुह्यमानं घृतं देवासः गवि अन्वविन्दन्। इन्द्रः एकं जजान। सूर्य एकं जजान। वेनात् एकं। स्वधया निष्टतक्षुः॥

अर्थ—शरीरांत विश्व तैजस प्राज्ञसंज्ञक तीन प्रकारांनीं व ब्रह्मांडात विराडादि तीन प्रकारांनीं असलेलें व स्तुति आणि उपदेश करणाऱ्या आचार्यांकडून परम रहस्य ह्मणून गुप्त ठेविलें जाणारें जे स्वप्रकाश ब्रह्मतत्त्व त्याला देवासारखे सात्त्विक अन्तर्मुख पुरुष तत्वमस्यादि वेदरूप वाणींत अनुक्रमानें प्राप्त झाले. ( ह्म० देवाना तें महावाक्यांत सांपडलें. ) परम ऐश्वर्ययुक्त विराट् पुरुष एका जागरणरूपाला उत्पन्न करता झाला. हिरण्यगर्भ स्वप्नरूपाला उत्पन्न करता झाला. सर्व दुःख रहित व त्यामुळेंच रमणीय अशा अव्याकृतापासून एक सुषुप्तरूप निष्पन्न झालें. स्वतःच्याच आधारानें राहणारी ब्रह्मरूप चित् हीच स्वधा आहे. तिच्या योगानें वर सांगितलेले इंद्र, सूर्य व वेन या नांवाचे विराट्, हिरण्यगर्भ व अव्याकृत जागति, स्वप्न व सुषुप्त यास निष्पन्न करिते झाले.

**यो देवानां प्रथमं पुरस्ताद्विश्वाधियो रुद्रो महर्षिः। हिरण्यगर्भं पश्यत जायमानं स नो देवः शुभया स्मृत्या संयुनक्तु॥**

अन्वय.—यः विश्वाधियः, रुद्रः, महर्षिः. देवानां प्रथमं, पुरस्तात् जायमानं हिरण्यगर्भं पश्यत ( पश्यति ) सः देवः नः शुभया स्मृत्या संयुनक्तु॥

अर्थ—जो जगाचें कारण असल्यामुळें त्याहून अधिक असलेला, वैदिक शब्दाला प्राप्त होणारा ( ह्म० वेदप्रतिपाद्य, ) व अतीन्द्रिय वस्तूंना जाणणाऱ्या ऋषींतील श्रेष्ठ देव इंद्रादि देवांच्या आरंभीं असलेल्या व इंद्रादिकांच्या पूर्वी उत्पन्न झालेल्या हिरण्यगर्भाला साक्षात् पाहतो तो परमेश्वर आह्मांला शुभ स्मृतीनें ह्म० सर्व संसारनिवर्तक सुंदर ब्रह्मतत्त्वानुस्मरणानें संयुक्त करो. ( ब्रह्मविद्येच्या प्राप्तीकरितां या मंत्राचा जप करावा. )

आतां स्मरणीय तत्त्वाचा निर्देश करतात—

**यस्मात्परं नापरमस्ति किंचिद्यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति कश्चित् ।**
**वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकस्तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ॥**

अन्वय —यस्मात् परं न अपरं अपि किंचित् वस्तु नास्ति । यस्मात् किंचिदपि अणीयः वस्तु नास्ति। तथा ज्यायः अपि किंचित् नास्ति। वृक्ष इव एकः स्तब्धः दिवि तिष्ठति । तेन पुरुषेण इदं सर्वं पूर्णम् ॥

अर्थ—ज्या ब्रह्मतत्त्वाहून उत्कृष्ट किंवा निकृष्टही कांहीं नाहीं, ज्या तत्त्वाहून अत्यल्प वस्तुही नाहीं, व दुसरी अधिक वस्तूही नाहीं, (या मंत्रांतील 'पर' व 'अपर' या शब्दांनीं गुणांचा उत्कर्ष व निकर्ष आणि 'अणीयः' व 'ज्यायः' या शब्दांनीं परिमाणाचा उत्कर्ष व अपकर्ष, विवक्षित आहे.) ज्याप्रमाणें व्यवहारात वृक्ष गमन व आगमन यानीं रहित होऊन एकाच जागीं स्तब्ध राहतो त्याप्रमाणें हा एक परमेश्वर निर्विकार होऊन स्वप्रकाशस्वरूपांत राहतो. त्या पूर्ण चिदेकरस परमात्म्याच्या योगानें हें सर्व जगत् पूर्ण आहे. (म्ह० हा जगाचा आकार नाहीं तर हें केवळ ब्रह्मतत्त्वच आहे.)

त्या पूर्वोक्त ब्रह्मतत्त्वस्मरणाचें सर्वत्यागरूप अन्तरंग साधन या मन्त्रात सांगितलें आहे—

**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।**
**परेण नाकं निहितं गुहायां विभ्राजदेतद्यतयो विशन्ति ॥**

**अन्वय.**—न कर्मणा तदमृतत्वं लभ्यते । न प्रजया न च धनेन । किंतु तेषां त्यागेन एके अमृतत्वं आनशुः । यत् एतत् यतयः विशन्ति तत् अमृतत्वं नाकं परेण सत् गुहायां निहितं विभ्राजते ॥

अर्थ—पूर्व वेदांत अग्निहोत्रापासून सहस्र संवत्सरसत्रान्त जें कर्म सांगितलें आहे त्या कर्माच्या योगानें अमृतत्व प्राप्त होत नाहीं. पितृ ऋणांतून सोडवावयास कारण होणारी जी पुत्ररूप प्रजा तिच्या योगानेंही अमृतत्व प्राप्त होत नाहीं. धनदान अनेक प्रकारच्या फळाचें साधन आहे, असें 'दाने सर्वं प्रतिष्ठितं, तस्माद्दानं परमं वदन्ति।' ही श्रुति सांगते व त्या दानाचें

साधन धन आहे. पण त्या धनानेंही अमृतत्व प्राप्त होत नाहीं तर कर्म, प्रजा, धन इत्यादि सर्व लौकिक व वैदिक व्यवहाराचा त्याग केल्यानें कांहीं थोड्याशा अन्तर्मुख पुरुषानाच अमृतत्व प्राप्त होतें ज्या अमृतत्वात यती प्रवेश करितात तें अमृतत्व स्वर्गाहूनही उत्कृष्ट असून आपल्या एकाग्र बुद्धींतच अवस्थित आहे, असा अन्तर्मुख अधिकारी अनुभव घेतात.

वरील ऋचेंत त्याग हें मोक्षाचें साधन सांगितलें आहे, पण दुसऱ्या श्रुति-स्मृतिवचनात ज्ञानच मोक्षाचे साधन आहे, असें ह्मटलें आहे तेव्हा त्याचा विरोध घालविण्यासाठीं ज्ञान व सन्यास याचा मोक्षाशीं कसा पृथक् सबध आहे ते दाखवितात—

वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः सन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ।
ते ब्रह्मलोके तु परान्तकाले परामृतात्परिमुच्यन्ति सर्वे ॥

अन्वय —ये वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः सन्यासयोगात् शुद्धसत्त्वाः यतयः ते सर्वे तु ब्रह्मलोके सति परान्तकाले परामृतात् परिमुच्यन्ति ॥

अर्थ—वेदान्त वाक्यावरून उत्पन्न झालेलें जें विशिष्ट ज्ञान त्याच्या योगानं ज्यानीं जीवब्रह्मैक्यलक्षण अर्थ निश्चित केला आहे ते वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थ पुरुष होत. सन्यासपूर्वक केलेला जो योग तो सन्यासयोग (सन्यास ह्म० पूर्वोक्त कर्म, प्रजा व धन, याचा त्याग आणि योग ह्मणजे चित्तवृत्तिनिरोध ) त्याच्यायोगानें ज्यांचें चित्त शुद्ध झालें आहे व त्यामुळच जे यती (ह्म० नियमशील ) आहेत ते ससारी पुरुषांहून निराळ्या-प्रकारचे असलेले सर्व ब्रह्माचा साक्षात्कार झाला असता परान्तकाळीं (ह्म० आत्मसाक्षात्कारानतर एकदाच होणारा जो शेवटचा देहपात–अन्त–त्यावेळीं) अव्याकृतापासूनहि मुक्त होतात (अज्ञानदशेंतील मरण हा अपर अन्तकाळ आहे. कारण त्या मरणानतरही अज्ञानी पुन देहधारण करतो. पण ज्ञानानतर येणारें जें शेवटचें मरण त्यानतर पुनरपि देहग्रहण करण्याचा प्रसंग येत नाहीं ह्मणून तो परान्त काळ आहे. त्या वेळीं ज्ञानी ससारबधापासून मुक्त होतो अज्ञानी सुद्धां प्रळयसमयीं स्थूळ व सूक्ष्म अशा दोन्ही शरीरां-

पासून मुक्त होतो, हें खरें; पण अज्ञानी तत्त्वज्ञानावांचून नाश न पावणाऱ्या अव्याकृतापासून मुक्त होत नाहीं आणि तत्त्वज्ञ अव्यकृतापासूनही मुक्त होतो.)

तत्त्व जाणण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाला सूक्ष्म उपाय सांगतात—

दहं विपापं परमेश्मभूतं यत्पुण्डरीकं पुरमध्यसंस्थम् ।
तत्रापि दहं गगनं विशोकस्तस्मिन्यदन्तस्तदुपासितव्यम् ॥

अन्वय.—दहं विपापं परमेश्मभूतं पुरमध्यसंस्थं यत्पुण्डरीकं तत्रापि यत् दहं विशोक. गगनं तस्मिन् अन्त: यत् ब्रह्मतत्त्वं अस्ति तदुपासितव्यम् ॥

अर्थ—राजधानींतील राजप्रासादासारखें जें हें अल्प, शरीरदोषांनीं दूषित न होणारें व परमात्म्याचें गृहरूप अष्टदल कमळ आहे; व त्या अत्यल्प पुरांतही जें अतिशय अल्प शोकरहित गगनाख्य ब्रह्म आहे त्या कमळांतील ब्रह्मतत्त्वाची ( सतत अविछिन्न ) उपासना करावी.

यो वेदादौ स्वरः प्रोक्तो वेदान्ते च प्रतिष्ठितः ।
तस्य प्रकृतिलीनस्य यः पर. स महेश्वरः ॥ ( १२ )

अन्वयः—य. स्वरः वेदादौ प्रोक्त वेदान्ते च प्रतिष्ठितः तस्य प्रकृतिलीनस्य यः परः सः महेश्वरः ज्ञेयः ॥

अर्थ—' अग्निमीळे०, ' ' इषे त्वोर्जे त्वा०' इत्यादि वेदाच्या आरंभीं जो स्वर असतो व जो उपनिषदांतही प्रतिपादिलेला आहे तो प्रणव ध्यान-कालीं अव्याकृतसंज्ञक जगत्कारणांत लीन होतो. ( 'ह्मणजे त्याच्या अकार, उकार व मकार या तीन मात्रांचे ठिकाणीं क्रमानें विराट्, हिरण्यगर्भ व अव्याकृत यांचें ध्यान करून विराड्रूप अकाराचा उकारांत लय करून ह्मणजे अकार उकाररूप आहे, असें समजून त्या हिरण्य-गर्भरूप उकाराला मूळ प्रकृतिरूप मकारांत लीन करून, याप्रमाणें ) त्या प्रकृतींत लीन झालेल्या प्रणवाचा जो पर ह्मणजे नादामध्यें चतुर्थ मात्रा-रूपानें ध्यान करण्यास योग्य असा उत्कृष्ट आत्मा आहे तो हा परमेश्वर, असें समजावें. (या मंत्रांत पूर्वोक्त गगनाख्य वस्तूचा विस्तार केला आहे).१२

———

वाराव्या अनुवाकाच्या शेवटीं हृदयकमलांत उपासना करावयास योग्य असें जें महेश्वराचें रूप दाखविलें त्या उपास्यांतील विशेष गुण या अनुवाकांत विस्तारानें दाखवितात—

सहस्रशीर्षं देवं विश्वाक्षं विश्वशंभुवम्।
विश्वं नारायणं देवमक्षरं परमं पदम्॥

अन्वय —सहस्रशीर्षं विश्वाक्षं विश्वशंभुवं विश्वं नारायणं देवं अक्षरं परमं पदं देवं ध्यायेत्॥

अर्थ—अनंत शिरांनीं युक्त असलेला, (सर्व जगदात्मक विराड्रूप, हाच महेश्वराचा देह आहे. यास्तव आह्मां जीवांचीं शिरें हीं त्याचींच शिरें आहेत, त्यामुळें तो महेश्वर अनंत शिरानीं युक्त आहे. त्याच न्यायानें) सर्व नेत्रांनीं युक्त असलेला, सर्व जगाचें सुख ज्याच्यापासून होतें तो विश्वशंभु, जगदात्मक, नारायण (जगत्कारणभूत पंचभूतांमध्यें राहिलेला), स्वप्रकाश, अक्षर, सर्वांचें कारण असल्यामुळें श्रेष्ठ व ज्ञान्यांकडून प्राप्त करून घेतलें जाणारें असें जें ब्रह्म-महेश्वर त्याचें ध्यान करावें.

विश्वतः परमान्नित्यं विश्वं नारायणं हरिम्।
विश्वमेवेदं पुरुषस्तद्विश्वमुपजीवति॥

अन्वयः—विश्वतः परमात् नित्यं विश्वं, नारायणं, हरिं, इदं विश्वं पुरुष एव इति ध्यातव्यं। सः पुरुषः तत् विश्वं उपजीवति॥

अर्थ—सर्व जड वर्गाहून तो परमात्मा उत्कृष्ट विनाशरहित असल्यामुळें नित्य, सर्वात्मक असल्यामुळें विश्व, जगत्कारणांत स्थित असल्यामुळें नारायण आणि पाप व अज्ञान याचें हरण करणारा असल्यामुळें हरि आहे; तसेंच अज्ञदृष्टया दिसणारें हें सर्व तत्त्वदृष्टया परमात्माच आहे, असें ध्यान करावें. तो परमात्मा त्या विश्वावर उपजीविका करतो. (ह्मणजे इतरांच्या व्यवहाराचा निर्वाह व्हावा, ह्मणून त्याचा आश्रय करतो.)

पतिं विश्वस्यात्मेश्वरः शाश्वतः शिवमच्युतम्।
नारायणं महाज्ञेयं विश्वात्मानं परायणम्॥

अन्वयः—विश्वस्य पतिं, आत्मेश्वरं, शाश्वतं, शिवं, अच्युतं, नारायणं, महाज्ञेयं, विश्वात्मानं, परायणं ध्यायेत ॥

अर्थ—जगाचा पालक असल्यामुळें पति, आत्म्यांचा म्ह० जीवांचा नियामक असल्यामुळें ईश्वर, निरन्तर असल्यामुळें शाश्वत, परम मंगल असल्यामुळें शिव, चित्स्वभावापासून च्युत होत नसल्यामुळें अच्युत, नारायण, ज्ञेय तत्त्वांमध्यें श्रेष्ठ असल्यामुळें महाज्ञेय, जगाचें उपादान व त्यामुळेंच जगाहून अभिन्न असल्यामुळें विश्वात्मा, व उत्कृष्ट असल्यामुळें परायण; अशा ईश्वराचें ध्यान करावें.

नारायण परो ज्योतिरात्मा नारायणः परः ।
नारायण परं ब्रह्म तत्त्वं नारायण परः ॥
नारायण परो ध्याता ध्यानं नारायणः परः ॥

अन्वय.—नारायण परः, ज्योतिः, नारायणः परः आत्मा । नारायणः परब्रह्मतत्त्वं । नारायणः परः । नारायण परः ध्याता, ध्यानं च परः, एवंविधः नारायणः ध्येयः ।

अर्थ—पुराणांत नारायण या शब्दानें बोलला जाणारा जो परमेश्वर तेंच सत्य-ज्ञानादि वाक्यप्रतिपादित पर तत्त्व आहे. नारायणच परमात्मा आहे) तीच सर्वोत्कृष्ट ज्योति आहे म्हणूनच नारायण परमात्मा आहे. नारायण परब्रह्मतत्त्व आहे. नारायणच सर्वोत्कृष्ट आहे. तोच ध्याता (वेदान्ताचा अधिकारी), ध्यान (प्रत्यगात्मविषयक वृत्तिविशेष) व पापांचा शत्रु आहे. अशा नारायणाचें ध्यान करावें.

*यच्च किंचिज्जगत्सर्वं दृश्यते श्रूयतेऽपि वा ।*
*अन्तर्बहिश्च तत्सर्वं व्याप्य नारायणः स्थितः ॥*

*अन्वय.—यत् किंचित् सर्वं जगत् दृश्यते अपि वा श्रूयते तत् सर्वं वस्तुजातं अयं नारायणः अन्तर्बहिः च व्याप्य स्थितः ॥*

अर्थ—या वर्तमान जगांत जें कांहीं समीपवर्ती वस्तुजात दिसत आहे; अथवा दूर असलेलें जें वस्तुजात ऐकूं येत आहे त्या सर्वांला नारायण आंतून व बाहेरून व्यापून राहिला आहे. (ज्याप्रमाणें मुकुट, कटक इत्यादि

आभरणाचें उपादानकारण सुवर्ण त्याना आतून व बाहेरून व्यापून राहतें त्याप्रमाणें नारायण सर्वांला व्यापून राहतो. )

अनन्तमव्ययं कविं समुद्रेऽन्तं विश्वशंभुवम् ।
पद्मकोशप्रतीकाशं हृदयं चाप्यधोमुखम् ॥
अधोनिष्ट्या वितस्त्यान्ते नाभ्यामुपरि तिष्ठति ।
ज्वालामालाकुलं भाती विश्वस्यायतनं महत् ॥

अन्वयः—अनन्तं, अव्ययं, कविं, समुद्रे अन्त, विश्वशंभुवं नारायणं उपासीत । पद्मकोशप्रतीकाशं अपि च अधोमुखं हृदयं निष्ट्या अधः नाभ्या उपरि वितस्त्यान्ते तिष्ठति । तत्र विश्वस्य आयतनं ज्वालामालाकुलं महत् भाती ( भाति ) ॥

अर्थ—नारायणाचें स्वरूप देशपरिच्छेदशून्य, विनाशरहित, चिद्रूपानें सर्वज्ञ, समुद्रासारख्या अफाट संसाराचें अवसानरूप (कारण पुरुष जेव्हा नारायणाचें स्वरूप जाणतो तेव्हाच त्याच्या संसाराचा क्षय होतो), व तें नारायणस्वरूप संसाराच्या उत्पत्तीचें कारण आहे. ( आता याच श्लोकाच्या उत्तरार्धांत उपासनेचें स्थान सांगतात—) ज्याप्रमाणें अष्टदलकमळाचें मध्यछिद्र असतें त्यासारखें अधोमुख हृदय आहे. तें गळ्याच्या खालीं व नाभीच्या वर एक वीत अंतरावर असून त्यांत तें ब्रह्मांडाचें आधारभूत व प्रकाशाच्या परंपरेनें युक्त असें परब्रह्म भासतें. ( वास्तव तें संसाराचें अवसानरूप आहे. )

सततं शिलाभिस्तु लम्बत्याकोशसंनिभम् ।
तस्यान्ते सुषिरं सूक्ष्मं तस्मिन्सर्वं प्रतिष्ठितम् ॥

अन्वयः—आकोशसंनिभं हृदयकमलं लम्बति । तस्य शिलाभिः ( शिराभिः ) सततं । तस्य अन्ते सूक्ष्मं सुषिरं अस्ति । तस्मिन् सर्वं प्रतिष्ठितम् ॥

अर्थ—कमळाच्या कळ्याप्रमाणें तें हृदयकमळ शरीरांत अधोमुख लोंबतें ते सभोंवार नाड्यांनीं व्यापलेलें आहे. त्या हृदयाजवळ सूक्ष्म छिद्र ( सुषुम्ना नाडीचें नाळ ) आहे त्यांत हें सर्व जगत् राहिलें आहे.

तस्य मध्ये महानग्निर्विश्वार्चिर्विश्वतोमुखः ।
सोऽग्रभुग्विभजन्तिष्ठन्नाहारमजरः कविः ।
तिर्यगूर्ध्वमधःशायी रश्मयस्तस्य सन्तताः ॥

अन्वयः—तस्य मध्ये महानग्निः विश्वार्चिः विश्वतोमुखः। सः अग्रभुक् अजरः कविः आहारं विभजन् तिष्ठन् तस्य तिर्यगूर्ध्वमधःशायी रश्मयः संतता ॥

अर्थ—त्या सुषुम्नानाळाच्या मध्यभागीं अनेक ज्वालांनीं युक्त व अनेक मुखांनीं संपन्न असलेला महान् अग्नि राहतो. आपल्या अग्रभागीं आलेलें अन्न खाणारा, अन्नाला जिरविणारा पण स्वतः जीर्ण न होणारा व त्यामुळें कुशल असा तो वैश्वानर खाल्लेल्या आहाराचा शरीरांतील सर्व अवयवांमध्यें विभाग करीत ( अन्नरसाला शरीरभर वांटून देत ) राहतो. त्या अग्नीचे खालीं, वर व तिरकस पसरणारे किरण सर्वतः व्यापलेले असतात.

संतापयति स्वं देहमापादतलमस्तकः।
तस्य मध्ये वह्निशिखा अणीयोर्ध्वा व्यवस्थित ॥
नीलतोयदमध्यस्थाद्विद्युल्लेखेव भास्वरा ॥
नीवारशूकवत्तन्वी पीता भास्वत्यणूपमा।
तस्याः शिखाया मध्ये परमात्मा व्यवस्थितः ॥
स ब्रह्मा स शिवः स हरिः सेन्द्रः सोऽक्षरः परमः स्वराट् ॥(१३)

अन्वयः—आपादतलमस्तकः स्वं देहं संतापयति। तस्य मध्ये वह्निशिखा अणीया ऊर्ध्वा च व्यवस्थितः ( व्यवस्थिता )। नीलतोयदमध्यस्थात् विद्युल्लेखा इव भास्वरा नीवारशूकवत् तन्वी पीता भास्वती अणूपमा तस्याः शिखायाः मध्ये परमात्मा व्यवस्थितः। सः ब्रह्मा, सः शिवः, सः हरिः, सः इन्द्र, सः अक्षर, परमः स्वराट् ॥

अर्थ—पायांच्या तळापासून मस्तकापर्यंत राहून तो आपल्या देहाला सर्वदा संतप्त करतो. (तो संतापच अग्नीच्या अस्तित्वाचें चिन्ह आहे.) आपल्या विशेष प्रकारच्या ज्वालांनीं सकल देहाला व्यापणाऱ्या त्या अग्नीच्या मध्यें एक अग्नीची ज्वाला आहे. ती अत्यन्त सूक्ष्म असून सुषुम्ना नाडीच्या द्वारा वर ब्रह्मरन्ध्रापर्यंत पसरून राहिली आहे. जलानें भरल्यामुळें नीलवर्ण दिसणाऱ्या मेघाच्या मध्यें असलेल्या विद्युल्लेखेप्रमाणें ती अग्निशिखा प्रभायुक्त, सांव्याच्या कुसळासारखी सूक्ष्म ( पातळ ), बाहेरून पिवळी दिसणारी व दीप्तियुक्त

असते. तिला लौकिक अणूंचीच उपमा देता येणें शक्य आहे. त्या अग्नि-शिखेच्या मध्यें जगत्कारणभूत परमात्मा विशेषतः अवस्थित आहे. ( त्याच्या उपासनेचें स्थान जरी असें अल्प असलें तरी तो स्वतः अल्प नाहीं. तर सर्व-देवात्मक आहे, असें सांगतात–) तोच ब्रह्मदेव, तोच गौरीपति, तोच हरि, तो इंद्र, तोच अक्षरसंज्ञक मायाविशिष्ट अन्तर्यामी, तोच परम ब्र० माया-रहित शुद्ध चिद्रूप व त्यामुळेंच ब्र० पारतंत्र्याच्या अभावीं तोच स्वराट् ब्र० स्वयं राजा आहे. ( सारांश, त्या सहस्रशीर्षादि पुरुषाचें वर सांगितल्या-प्रमाणें ध्यान करावें ) १३.

---

आतां आदित्यमंडलांत परब्रह्माची उपासना सांगतात—

**आदित्यो वा एष एतन्मण्डलं तपति तत्र ता ऋचस्तदृचां मण्डलꣳ स ऋचां लोकोऽथ य एष एतस्मिन्मण्डलेऽर्चिर्दीप्यते तानि सामानि स साम्नां लोकोऽथ य एष एतस्मिन्मण्डलेऽर्चिषि पुरुषस्तानि यजूꣳषि स यजुषां मण्डलꣳ स यजुषां लोकः सैषा त्रय्येव विद्या तपति य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषः ॥ ( १४ )**

**अन्वय**—यः परमेश्वर पूर्वानुवाके अभिहित सः एष आदित्य. वै । तस्य एतत् मण्डलं तपति । तत्र ताः ऋचः वर्तन्ते । तत् मण्डलं ऋचा निष्पादितं । स ऋचां लोकः । अथ एतस्मिन् मण्डले यः एषः अर्चिः दीप्यते तानि अर्चिःस्वरूपाणि बृहद्रथंतरादिसामानि । सः अर्चिर्भागः साम्नां लोकः । अथ यः एष शास्त्रे प्रसिद्ध एतस्मिन् दृश्यमाने मण्डले तदीये अर्चिषि च पुरुषः वर्तते तानि देवतारूपाणि यजूंषि ध्यायेत । सः यजुरात्मकः पुरुषः यजुषा निष्पादितं मण्डलं इति ध्येय. । सः यजुषां लोकः । सा एषा त्रयी एव विद्या तपति । य पुरुषः अत्र अभिहित. स एषः अन्तरादित्ये हिरण्मय. विद्यते ॥

**अर्थ**—वरच्या अनुवाकांत नारायणनांवाचा जो परमेश्वर सांगितला तो हा आदित्य आहे. कारण तो सोपाधिक होऊन आदित्यरूपानें प्रकाश-मान होत राहतो. त्या आदित्याचें हें जें आम्हांला दिसणारें वर्तुल उष्ण मंडल तें तापतें ( संताप करतें. ) त्यांत ' अग्निमीळे ' इत्यादि अध्यापकांना माहीत

असलेल्या ऋचा आहेत त्यामुळें त मंडल ऋचेच्या योगानें निष्पन्न केलेल आहे. ऋचाच्या योगानें निष्पन्न केलेला तो भाग, हाच ऋगभिमानी देवताचा लोक आहे ( निवासस्थान आहे याप्रमाणें मंडल ऋग्रूप आहे, असें ध्यान करून नतर तें सामात्मक आहे, असें ध्यान करावे ह्मणजे ) या मंडलात जी ही अर्चि–ज्वाला दीप्त झालेली दिसते ( ह्म० प्रकाशमान तेज दिसत ) ती अर्चि स्वरूपेंच बृहद्रथंतरादि साम आहेत, असें ध्यान करावें तो अर्चिभाग सामाभिमानी देवाचा लोक आहे असें सामध्यान केल्यावर त मंडल यजुरात्मक आहे, असें समजाव जो हा शास्त्रात प्रसिद्ध असलेला व या प्रत्यक्ष दिसणाऱ्या मंडलात देवतारूप राहणारा पुरुष आहे तींच देवतारूप यजुर्ये आहेत तो यजुरात्मक पुरुषच यजूच्या योगान संपादन केलेलें मंडल आहे, असें चिन्तन करावें तो यजुर्भाग यजुरभिमानी देवताचा लोक आहे मण्डल, त्याची अर्चि व त्यातील पुरुष ही त्रयीच ऋक यजु व सामरूप आह, व तींच विद्या प्रकाशमान होते जो पुरुष येथ सांगितला आहे, तोच आदित्यमंडलामध्य हिरण्मय आहे ( १४ )

---

आता त्या पूर्वोक्त आदित्याचाच सर्वात्मकरूप अत्राशिष्ट गुण दाखवितात–

आदित्यो वै तेज ओजो बल यशश्चक्षु श्रोत्रमात्मा मनो मन्यु र्मनुर्मृत्यु सत्यो मित्रो वायुराकाश प्राणो लोकपाल क किं क तत्सत्यमन्नममृतो जीवो विश्व कतम स्वयभु ब्रह्मैतदमृत एष पुरुष एष भूतानामधिपतिर्ब्रह्मण सायुज्यꣳ सलोकतामाप्नोत्य तासामेव देवताना~ सायुज्य~ सार्ष्टिताꣳसमानलोकतामाप्नोति य एव वेदेत्युपनिषत ॥ ( १५ )

**अन्वय** —*य अयं आदित्य स तत् सर्वात्मकत्वात् तेज, ओज, बल* यश, चक्षु, श्रोत्र आत्मा मन, मन्यु, मनु, मृत्यु, सत्य, मित्र वायु, आकाश, प्राण, लोकपाल, क, किम्, कम्, तत्, सत्य, अन्न, अमृत जीव विश्व, कतम, स्वयंभु, ब्रह्म, एतत् अमृत, एष पुरुष एष भूताना अधिपति ।

य एवं वेद स ब्रह्मण सायुज्य, सलोकता प्राप्नोति । एतासा एव देवताना सायुज्य, सार्ष्टिता समानलोकता च आप्नोति इति उपनिषत् ॥

अर्थ—जो हा उपासना करण्यास योग्य म्हणून सांगितलेला आदित्य तोच सर्वात्मक असल्यामुळें तेज ( दीप्ति ), ओज ( बलाचें कारण ), बळ ( शरीरशक्ति ), यश, चक्षु व श्रोत्रेन्द्रिय, देह, मन, कोप, वैवस्वतादि मनु, यम, सत्य व मित्र या नावाचे देव, वायु व आकाश, पंचवृत्ति प्राण, इन्द्रादि लोकपाल, प्रजापति, अनिर्वचनीय वस्तु, सुख, परोक्ष वस्तु, यथार्थ भाषण, अन्न, देवसमुदाय किंवा मोक्षरूप अमृत, समस्त जीवकोटि, सर्व जगत्, अत्यन्त सुख व उत्पत्त्यादिरहित ब्रह्म आहे तसेंच, हा नित्य आदित्य पूर्ण असल्यामुळे पुरुष व सर्व भूतांचा अधिपति आहे (आतां हें जाणणाऱ्या पुरुषाला कोणतें फळ मिळतें तें सांगतात –) जो उपासक अशा रीतीनें आदित्याची उपासना करितो तो ब्रह्माच्या सायुज्यादिकास प्राप्त होतो ( समष्टिरूप हिरण्यगर्भाची उपासना व त्याच्या अवयवभूत देवतांची उपासना, अशी दोन प्रकारची उपासना आहे. त्यांतील हिरण्यगर्भाच्या उपासनेनें भावना दृढ झाली असतां उपासक हिरण्यगर्भाच्या सायुज्यास म्ह० तादात्म्यास प्राप्त होतो पण भावना दृढ न होतां मंद राहिल्यास ) हिरण्यगर्भाच्या सलोकतेला म्ह० त्याच्याच लोकांतील निवासाला प्राप्त होतो आतां, अंगभूत देवतांची उपासना करून भावना दृढ झाल्यास उपासक इन्द्रादि देवतांच्या सायुज्याला प्राप्त होतो, भावना मध्यम असल्यास सार्ष्टितेस म्ह० समान ऐश्वर्यास प्राप्त होतो आणि तीच मंद राहिल्यास समानलोकतेस प्राप्त होतो याप्रमाणें पूर्वोक्त अनुवाकांनीं सांगितलेली ही रहस्य विद्या समाप्त झाली ( १५ )

---

आतां यापुढें नूतन शिवालयादि करून त्यांत लिंगाची प्रतिष्ठापना करावयाचे वेळीं किंवा प्रत्यहीं पार्थिव लिंगाची प्रतिष्ठापना करावयाचे वेळीं ज्यांचा विनियोग केलेला आहे ते किंवा नुसता जप केल्यानेंही पापक्षयाला कारण होणारे मंत्र सांगतात—

निधनपतये नम । निधनपतान्तिकाय नमः । ऊर्ध्वाय नम । ऊर्ध्वलिङ्गाय नम । हिरण्याय नमः । हिरण्यलिङ्गाय नम । सुवर्णाय नम । सुवर्णलिङ्गाय नमः । दिव्याय नम । दिव्यलिङ्गाय नमः। भवाय नमः । भवलिङ्गाय नम. । शर्वाय नमः । शर्वलिङ्गाय नम । शिवाय नम । शिवलिङ्गाय नम । ज्वलाय नमः । ज्वललिङ्गाय नम । आत्माय नमः । आत्मलिङ्गाय नम । परमाय नमः । परमलिङ्गाय नम । एतत्सोमस्य सूर्यस्य सर्वलिङ्ग स्थापयति पाणिमन्त्र पवित्रम् ॥ (१६)

अन्वय —या अनुवाकाचा अन्वय सरळ आहे

अर्थ—पुष्कळ धनाच्या स्वामीला ह्म० कुबेररूप पार्वतीपतीला नमस्कार असो. निधनाचें जो रक्षण करतो तो 'निधनप,' भक्ताना तीं जो देतो तो 'त' आणि भक्ताच्या जो समीप असतो तो अन्तिक त्या निधनपन्त अन्तिकाला नमस्कार असो ऊर्ध्व लोकी देवतारूपाने असणाऱ्या शकराला नमस्कार असो ऊर्ध्व लोकीं देवानीं लिंगरूपानें स्थापिलेल्या व पूजा केल्या जाणाऱ्या पार्वतीपतीला नमस्कार असो. सर्वात्मक असल्यामुळे सुवर्णरूप, रौप्यनिर्मित लिंगाकार, स्वर्ग लोकातील सुखरूप, इन्द्रादिकानीं स्थापिलेल्या स्वर्गलोकस्थ लिंगाकार, संसाररूप, ज्याच्यापासून ब्रह्माण्ड निर्माण होतें त्या भवसज्ञक, भूलोकीं ससारी लोकाकडून पूजिल्या जाणाऱ्या, महत्सुखास प्राप्त होणाऱ्या, ब्रह्माण्डहिंसक, ज्योतिर्मय, द्वादश ज्योतिर्लिंगरूप, सर्व जगदात्मक, आत्मलिंगरूप व परमलिंगरूप शकराला नमस्कार असो या पूर्वोक्त मन्त्रानें सोम, सूर्य व सर्व देव याच्या कारणभूत, सर्व मत्र ज्याचे अवयव आहेत व पाप्याना नुसत्या स्मरणानेंच जें पवित्र करितें, अशा सर्व प्रकारच्या लिंगाला सर्व लोक स्थापितात (१६).

---

आतां शास्त्राधिकारी त्रैवर्णिकाना ज्ञानोत्पत्ति व्हावी ह्मणून महादेवाच्या पाच मुखातील पश्चिम मुखाचें प्रतिपादन करणारा मत्र सागतात —

सद्योजातं प्रपद्यामि सद्योजाताय वै नमोनमः ।
भवे भवे नाति भवे भवस्व माम्। भवोद्भवाय नमः ॥ (१७)

अन्वय —सद्योजातं प्रपद्यामि । सद्योजाताय नमो नमः अस्तु । हे सद्योजात, मा भवे भवे न भवस्व । अतिभवं भवस्व । भवोद्भवाय सद्योजाताय नमः अस्तु॥

अर्थ—सद्योजातनावाचें जें पश्चिम मुख तद्रूप परमेश्वराला मी प्राप्त होतो, तशा प्रकारच्या सद्योजाताला नमस्कार असो. हे सद्योजात, मला निरनिराळ्या जन्मनिमित्तामध्यें प्रेरणा करूं नको, तर जन्माच्या उच्छेदनासाठीं तत्त्वज्ञानात प्रेरणा कर. संसारातून उद्धार करणाऱ्या सद्योजाताला नमस्कार असो (१७)

---

उत्तर वक्त्रप्रतिपादक मंत्र सांगतात—

वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमः श्रेष्ठाय नमो रुद्राय नमः कालाय नमः कलविकरणाय नमो बलविकरणाय नमो बलाय नमो बलप्रमथनाय नमः सर्वभूतदमनाय नमो मनोन्मनाय नमः ॥१८

अन्वय —या अनुवाकाचा अन्वय सरळ आहे

अर्थ—सुंदर दीप्त वामदेवाला, जगदुत्पत्तीच्या पूर्वींच असलेल्या ज्येष्ठाला, अतिशय प्रशस्त असलेल्या श्रेष्ठाला, प्रलयात प्राण्यांना रडविणाऱ्या रुद्राला, सर्व प्राण्यांच्या आयुष्य-क्षयाला कारण होणाऱ्या कालाला, सुखाचा स्वीकार करणाऱ्या व नानाप्रकारच्या जगदुत्पत्तीच्या साधनाला, राक्षसांचे बल ज्याच्या योगानें नाहींसें होत जातें त्या बलविकरणाला, बलाला, बलप्रमथनाला, सर्व भूतांचें दमन करणाऱ्या सर्व भूतदमनाला व अतिशय सर्वज्ञ मनोन्मनाला नमस्कार असो (१८)

---

दक्षिणमुख-प्रतिपादक मंत्र—

अघोरेभ्योऽथ घोरेभ्यो घोरघोरतरेभ्यः ।
सर्वेभ्यः सर्व शर्वेभ्यो नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः ॥ (१९)

अन्वय—हे सर्व, ते अघोरेभ्यः अथ घोरेभ्यः, घोरघोरतरेभ्यः, सर्वेभ्यः रुद्ररूपेभ्यः नमः अस्तु ॥

अर्थ—हे परमेश्वरा, तुझ्या दक्षिणमुखरूप अघोर ह्म० सात्त्विक असल्यामुळें शान्त, तसेंच घोर ह्म० राजस असल्यामुळें उग्र आणि तामस असल्यामुळें घोराहूनही अतिघोर अशा तीन प्रकारच्या व लयकालीं हिंसा करणाऱ्या रुद्ररूपाला सर्व देशीं व सर्व कालीं नमस्कार असो. (१९)

---

पूर्वेकडील मुखाचें प्रतिपादन करणारा मंत्र—

तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि ।

तन्नो रुद्रः प्रचोदयात् ॥ ( २० )

अन्वय.—तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि । तत् नः रुद्रः प्रचोदयात् ॥

अर्थ—प्राग्वक्त्रदेवाचें नांव 'तत्पुरुष' असें आहे. त्या तत्पुरुष देवाला आह्मी गुरुशास्त्रमुखानें जाणतों; आणि जाणून त्या महादेवाचें ध्यान करतों. यास्तव तो रुद्रदेव आह्मांला ज्ञान व ध्यान यांकरितां प्रेरणा करो. (२०)

---

ऊर्ध्वमुखाचा प्रतिपादक मन्त्र—

ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानाम् ।

ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मा शिवो मे अस्तु सदाशिवोम् ॥

अन्वयः—य. अयं ऊर्ध्ववक्त्र देवः स. सर्वविद्यानां ईशानः, तथा सर्वभूतानां ईश्वरः, ब्रह्माधिपतिः, ब्रह्मण अधिपति , ब्रह्मा मे शिव अस्तु । सः एव सदाशिवः अहं अस्मि ॥

अर्थ—जो हा ऊर्ध्वमुख देव तो सर्व विद्यांचा नियामक आहे. त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांचा नियामक, वेदांचा सर्वोत्तम पालक, व हिरण्यगर्भाचा अधिपति आहे. अशा प्रकारचा जो व्यापक परमात्मा तो मजवर अनुग्रह करण्यासाठीं शांत होवो. तोच सदाशिव मी होतों.( २१ )

---

पुनरपि रुद्रदेवताक मंत्र—

नमो हिरण्यबाहवे हिरण्यवर्णाय हिरण्यरूपाय हिरण्यपतयेऽम्बिकापतय उमापतये पशुपतये नमोनमः ॥ ( २२ )

**अन्वय**—हिरण्यबाहवे, हिरण्यवर्णाय, हिरण्यरूपाय, हिरण्यपतय, अम्बिका-पतये, उमापतये, नम । पशुपतये नमोनम ॥

**अर्थ**—सोन्याप्रमाणें ज्याचे बाहू व इतर अवयव दिसतात त्याला, सोन्यासारखीं दुर्लभ रुद्राक्षें ज्याच्यापासून उद्भवतात त्याला, तेजोमयाला, नवनिधींच्या स्वामीला, पार्वतीपतीला व उमापतीला नमस्कार असो आब्रह्मस्तम्बपर्यंत जीव हेच पशू आहेत त्याच्या नायकाला नमस्कार असो, ( नम या शब्दाचा हिरण्यवर्णादि प्रत्येक शब्दाशीं संबंध व्हावा, ह्मणून नम शब्दाची आवृत्ति केली आहे २२ )

---

आता वर सांगितल्याप्रमाणें उपासना करणाऱ्या पुरुषानें उपास्याला नमस्कार करते वेळीं ह्मणावयाचा मंत्र—

ऋतᳪ सत्य पर ब्रह्म पुरुष कृष्णपिङ्गलम् ।
ऊर्ध्वरेत विरूपाक्ष विश्वरूपाय वै नमो नम ॥ ( २३ )

**अन्वय**—यत् एतत् पर ब्रह्म तत् ऋत सत्य, पुरुष, कृष्णपिङ्गल, ऊर्ध्वरेत, विरूपाक्ष । तस्मै विश्वरूपाय नमो नम ॥

**अर्थ**—हें जें परब्रह्म तें सत्य ह्म० अबाध्य आहे सत्यत्व व्यावहारिक व पारमार्थिक असें दोन प्रकारचें आहे (हिरण्यगर्भरूप व्यावहारिक सत्य आहे त्याचें निराकरण करून पारमार्थिक सत्याचें प्रतिपादन करण्यासाठीं 'ऋत सत्य' ह्म० अत्यंत सत्य, असें ह्मटलें आहे ) तशा प्रकारचें ब्रह्म भक्तावर अनुग्रह करण्यासाठीं उमा महेश्वरात्मक पुरुषरूप होतें. त्याचा महेश्वररूप दक्षिणभाग कृष्णवर्ण ( काळा ) व डावीकडचा उमाभाग पिङ्गलवर्ण आहे तो आपल्या सामर्थ्यानें वीर्य मस्तकांत धारण करून ऊर्ध्वरेता झाला त्याला तीन नेत्र असल्यामुळें तो विरूपाक्ष आहे. त्या सर्व जगद्रूप परमात्म्याला नमस्कार असो ( २३ )

---

आतां रुद्रदेवताक मंत्र पढतात—

**सर्वो वै रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु । पुरुषो वै रुद्रः सन्महो नमो नमः ॥**

**विश्वं भूतं भुवनं चित्रं बहुधा जातं जायमानं च यत् । सर्वो ह्येष रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु ॥ ( २४ )**

अन्वयः—सर्वः वै रुद्रः । तस्मै रुद्राय वै नमः अस्तु । यः पुरुषः सः एव रुद्रः सन् महः तस्मै नमो नमः । यत् जडं विश्वं यत् च चेतनं भूतं, यत् च चित्रं भुवनं, यत् च जातं, जायमानं सर्वः हि एषः रुद्रः तस्मै रुद्राय नमः अस्तु ॥

अर्थ—पुराणामध्यें जो पार्वतीपति रुद्र प्रसिद्ध आहे तोच सर्व आहे. कारण तो जीवरूपानें सर्व शरीरांत प्रविष्ट झाला आहे. त्या सर्वात्मक रुद्राला नमस्कार असो. प्रकृति-पुरुषांतील जो चिदात्मक पुरुष तोच भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां रुद्ररूपानें प्रतीत होतो. तेंच मद्रूप तेज आहे. तशा रुद्राला पुनः पुनः नमस्कार असो. जें जड विश्व आहे व चेतन प्राणिवर्ग आहे तसेंच हें जें चेतनाचेतनरूपानें विचित्र जगत् आहे आणि त्यांतही जें जगत् पूर्वी उत्पन्न झालेलें व यापुढें उत्पन्न होणारें आहे तो हा सर्व प्रपंच रुद्रच आहे. तसल्या सर्वात्मक रुद्राला नमस्कार असो. ( २४ )

---

***कद्रुद्राय प्रचेतसे मीढुष्टमाय तव्यसे । वोचेम शंतमः हृदे ।***
**सर्वो ह्येष रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु ॥ ( २५ )**

अन्वयः—कद्रुद्राय, प्रचेतसे, मीढुष्टमाय, तव्यसे, हृदे शन्तम वोचेम । सर्वः हि एषः रुद्रः तस्मै रुद्राय नमः अस्तु ॥

अर्थ—प्रशस्त, अतिशय ज्ञानयुक्त, भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा, स्तुति करण्यास योग्य व हृदयरूप अशा रुद्राला उद्देशून आह्मी अतिशय सुखकर स्तुतिरूप वाक्य बोलतों. हा सर्व रुद्र आहे. त्या रुद्राला नमस्कार असो. ( २५ )

---

आता अग्निहोत्रकर्मांत होम-साधन द्रव्याला कारण होणाऱ्या एका वृक्षाचें विधान करितात.—

यस्य वैकङ्कत्यग्निहोत्रहवणी भवति प्रत्येवास्याहुतयस्तिष्ठन्त्यथो प्रतिष्ठित्यै ॥ ( २६ )

अन्वय —यस्य अग्निहोत्रहवणी वैकङ्कती भवति तस्य अग्निहोत्रिण आहुतय तिष्ठन्ति । अथो प्रतिष्ठित्यै सपद्यन्ते ॥

अर्थ—अग्निहोत्रामध्यें ज्या दर्वीनें हवि अग्नींत दिला जातो ती अग्निहोत्रहवणी. ज्या अग्निहोत्र्याची ती हवणी विकङ्कत वृक्षाच्या लाकडाची असते त्या अग्निहोत्र्यानें तिच्या योगानें दिलेल्या आहुत्या निश्चयानें फलप्रद होतात. तशाच त्या चित्तशुद्धीच्या द्वारा तत्त्वज्ञानाच्या प्रतिष्ठेस कारण होतात ( २६ )

---

चित्तशुद्धीला कारण होणाऱ्या कर्मांचा उपयोग या मोक्षप्रकरणात सक्षेपत सुचवून प्रतिबंधनिवारक रक्षोघ्न मन्त्र सागतात ते जपाच्या उपयोगी आहेत—

कृणुष्व पाज इति पञ्च ॥

अन्वय —सहितायां प्रथमकाण्डे द्वितीयप्रपाठके पठिता ' कृणुष्व पाज ' इति पञ्च ऋच जपितव्या ॥

अर्थ—कृष्णयजु सहितेच्या प्रथम काण्डात तृतीय प्रपाठकामध्यें ' कृणुष्व पाज ' इत्यादि ज्या पाच ऋचा आहेत त्याचा जप करावा ( यापुढें त्या पाचीं ऋचा क्रमानें अन्वयार्थासह देतों )

कृणुष्व पाज प्रसितिं न पृथ्वीं याहि राजेवामवाँ इभेन ।
तृष्वीमनु प्रसितिं द्रूणानोऽस्तासि विध्यरक्षसस्तपिष्ठै ॥

अन्वय —हे अग्ने, पृथ्वीं प्रसितिं न पाज कृणुष्व । तत राजा इव अमवान् सन् इभेन ( शत्रून् प्रति ) याहि । त्वं तृष्वीं प्रसितिं अनु द्रूणान अस्ता असि । तस्मात् रक्षस तपिष्ठै विध्य ॥

अर्थ—हे अग्ने, ज्याप्रमाणें पक्षिभक्षक निषाद पक्ष्याना धरण्यासाठीं मोठ जाळें पसरतात त्याप्रमाणें आमच्या काम-क्रोधादि शत्रूच्या सहारार्थ

आह्मांला बल दे. नतर जसा एकादा राजा सहायसंपन्न होऊन हत्तीवरून चतुरङ्ग सेनेसह शत्रूंवर चाल करून जातो त्याप्रमाणें तूंही आमच्या शत्रूचा संहार करावयास जा. कारण तूं शीघ्र संहार करणाऱ्या प्रसितिसंज्ञक साधनानें युक्त होऊन पळणाऱ्या शत्रूंच्या मागें त्यांची हिंसा करीत व त्यांवर बाण फेंकीत जाणारा आहेस

तव भ्रमास आशुया पतन्त्यनुस्पृश धृषता शोशुचानः।
तपूंष्यग्ने जुह्वा पतङ्गा न सन्दितो विसृज विष्वगुल्का. ॥

अन्वयः—भो अग्ने, भ्रमास आशुया ये पतन्ति तान् पतङ्गान् त्वं तपूंषि तव धृषता तेजसा अनुस्पृश। त्व शोशुचान जुह्वा हविष्मान् राक्षसै. न सन्दितः विष्वक् उल्का विसृज॥

अर्थ—हे अग्ने, प्राण्याना पीडा देण्यासाठीं सर्वत्र भ्रमण करणाऱ्या व अहोरात्र इतस्ततः शीघ्र गमन करणारे जे पिशाच भटकत असतात त्याना आणि सर्व प्रपञ्चाला सताप देण्याचेच ज्याचें शील आहे अशा राक्षसाना तू आपल्या प्रगल्भ तेजानें जाळून टाक. अन्तर्बाह्य शत्रूंना अतिशय दुःख देणारा, स्रुचेनें हवन केलेल्या घृत-पुरोडाशादिरूप हवीनें युक्त असलेला व राक्षसाकडून सर्वदा अखडित असा तू शत्रूंवर सर्व बाजूंनी उल्काचा वर्षाव कर.

प्रति स्पशो विसृज तूर्णितमो भवा पायुर्विशो अस्या अदब्धः।
यो नो दूरे अघशꣳसो यो अन्त्यग्ने मा किष्टे व्यथिरादधर्षीत्॥

अन्वय —भो अग्ने, तूर्णितम त्व स्पश अस्याः विशः पायु भव (भव)। नः दूरे अन्ति यः अघशस तमपि अपाकुरु। अहमपि अदब्ध. भवामि। कि- व्यथि ते पुरस्तात् मा आदधर्षीत्॥

अर्थ—हे अग्ने, अतिशय वेगवान् असलेला तूं आह्माला पीडा देणाऱ्या शत्रूना पाशानीं बाधून ने. या आमच्या पुत्रादि प्रजेचा रक्षक हो. आह्मा पासून दूर अथवा समीप आमच्या नाशाची इच्छा करणारा जो असेल त्यालाही दूर कर. मींही शत्रूकडून न पीडिलेला, असा व्हावें. कोणीही व्यथा देणारा राक्षस तुझ्यापुढें कधींही धृष्ट न होवो.

उदग्ने तिष्ठ प्रत्यातनुष्व न्यमित्राँ ओषतात्तिग्महेते ।
यो नो अरातिं समिधान चक्रे नीचा तं धक्ष्यतसं न शुष्कम्॥

अन्वयः—भो अग्ने, उत्तिष्ठ । आतनुष्व । अमित्रान् नि-ओषतात् । हे तिग्म-हेते, नः यः अरातिं चक्रे तं शुष्कं अतसं न धक्षि । नीचा कुरु । भो समिधान, सर्वं एतत् साधय ॥

अर्थ—हे अग्ने, आह्मावर अनुग्रह करण्याकरितां तूं ऊठ. आह्मांवर दया कर. आमच्या कामादिक शत्रूंना अगदीं भस्म करून टाक. हे तीक्ष्णा-युध, आह्मांवर जो कोणी शत्रुत्व धरतो, त्या आमच्या शत्रूला शुष्क वृक्षा-प्रमाणें आळून नकोस; तर अधोमार्गांत टाक. हे देदीप्यमान अग्ने, तूं हे सर्व आमचे कार्य कर.

ऊर्ध्वो भव प्रतिविध्याध्यस्मदाविष्कृणुष्व दैव्यान्यग्ने ।
अव स्थिरा तनुहि यातुजूनां जामिमजामिं प्रमृणीहि शत्रून् २७

अन्वयः—हे अग्ने, अस्मत् रिपून् अधि प्रतिविध्य । दैव्यानि आविष्कृणुष्व । ऊर्ध्वः भव । यातुजूना स्थिरा अवतनुहि । जामिं परित्यज्य प्रमृणीहि । अजामि शत्रून् प्रमृणीहि ॥

अर्थ—हे अग्ने, आमच्या कामादि शत्रूंना अतिशय ताडन कर. त्याचप्रमाणें सत्कर्में व सदुपासना यांस प्रकट कर. सत्यलोकप्रभृति ऊर्ध्व-लोक देणारा हो. पुण्यलोकाचा विरोध करणाऱ्या राक्षसांचीं स्थिर धनुष्यें शिथिल कर आणि आळस्यादि सोडून त्याचा नाश कर. जगाचा संहार करावयास तयार झालेल्या शत्रूंना आळस सोडून मारून टाक. ( या पांचीं ऋचांचा अभिप्राय असा–हे त्रैलोक्यनायक अग्ने, आमच्या अन्तर्गत शत्रूंचें उन्मूलन करून, आम्हांला सत्कर्मामध्येंच प्रवृत्त करून, आमचें अन्तः-करण शुद्ध करून, भार्या-पुत्रादिकांसह शंभर वर्षें भोग देऊन मरणानंतर सर्व कुटुम्बासह मला मुक्ति दे. ) ( २७ )

जीवनाला कारण होणाऱ्या क्षेत्राच्या लाभादिकांच्या द्वारा मुक्तीला कारण होणारा पृथ्वीदेवताक मंत्र—

अदितिर्देवा गन्धर्वा मनुष्याः पितरोऽसुरास्तेषाꣳ सर्वभूतानां माता मेदिनी महता मही सावित्री गायत्री जगत्युर्वी पृथ्वी बहुला विश्वा भूता कतमा काया सा सत्येत्यमृतेति वसिष्ठः॥ (२८)

अन्वयः—देवाः, गन्धर्वाः, मनुष्याः, पितरः, असुराः, तेषां सर्वभूतानां अदितिः माता, मेदिनी, महता, मही, सावित्री, गायत्री, जगती, उर्वी, पृथ्वी, बहुला, विश्वा, भूता, कतमा, काया, सा, सत्या इत्येवं वसिष्ठः आह। अमृता इत्यपि सः एव आह। अस्य मंत्रस्य ऋषिः वसिष्ठः॥

अर्थ—देव, गन्धर्व, मनुष्य, पितर व असुर हे सर्व अदितिरूप आहेत, म्हणून सर्व देहांचें उपादान कारण असलेली ती अदिति सर्वांची माता आहे. मधु-कैटभ राक्षसाच्या मेदानें झालेल्या तिला मेदिनी म्हणतात, किंवा कठिन असल्यामुळें ती मेदिनी होय. ती महता म्ह० गुणांनीं अथवा धैर्यानें युक्त आहे. सर्व प्राण्यांचा उपद्रव सहन करणें हाच तो गुण अथवा हेंच धैर्य आहे. ती पूज्य अन्तर्यामीशीं संबंध ठेवणारी, आपल्या उपासकांचें रक्षण करणारी, जगदाश्रयभूत, अनेक प्रकारच्या शेतांनीं युक्त, मोठी विस्तारवाली, दाट अवयवांनीं युक्त, सर्वात्मिका, प्राणिदेहांच्या उत्पत्तीच्या पूर्वी असणारी, अतिशय सुखरूप, सर्व प्राणिदेहरूपानें परिणाम पावलेली, प्रसिद्ध, व व्यवहार-दशेंत बाधरहित, अशा प्रकारची आहे, असें वसिष्ठमुनींनीं सांगितलें आहे. तसेंच, ती मरण-धर्मरहित आहे म्ह० चतुर्युगाच्या प्रत्येक आवृत्तीबरोबर ती नाश पावत नाहीं, असेंही त्यांनीं म्हटलें आहे. यास्तव या मंत्राचा ऋषि वसिष्ठ आहे. (२८)

---

आतां वृष्टीच्या अभावामुळें होणाऱ्या उपद्रवाचा परिहार करून उपकार करणाऱ्या अब्देवताक मंत्राचा उपदेश करितात—

आपो वा इदꣳ सर्वं विश्वा भूतान्यापः प्राणा वा आपः पशव आपोऽन्नमापोऽमृतमापः सम्राडापो विराडापः स्वराडापश्छन्दाꣳसि

स्यापो ज्योतींष्यापो यजूंष्यापः सत्यमापः सर्वा देवता आपो भूर्भुवः सुवराप ॐ ॥ (२९)

अन्वय —यत् इदं जगत् अस्ति तत् सर्वं आपः वै । विश्वा भूतानि आपः । प्राणः वै आपः । पशवः अपि आपः । अन्नं आपः । अमृतं आपः । सम्राट् आपः । विराट् आपः । छदांसि आपः । ज्योतींषि आपः । यजूंषि आपः । सत्यं आपः । सर्वाः देवताः आपः भूः, भुवः, सुवः, आपः ॥

अर्थ—हें जे जगत् आहे तें सर्व जलच आहे. (कसें ते सांगतात-) सर्व शरीरें (रेतोरूप जलाचा विकार असल्यामुळें) जल आहे. जलानेंच प्राणाचें पोषण होत असल्यामुळें शरीरांतील प्राणसंज्ञक वायुही जल आहे गाय, बकरी इत्यादि पशूही जल आहे. कारण ते त्याच्यामध्यें दुधाच्या रूपानें परिणत होत असतें. जल अन्नाचें कारण आहे, हे प्रसिद्ध असल्यामुळें व्रीहियवादिरूप अन्नही जल आहे. अमृतही जल आहे. उत्तमप्रकारें प्रकाशमान होणारा सूत्रात्मा हिरण्यगर्भ, ब्रह्माण्ड देहानें स्पष्ट भासणारा विराट्, इंद्रियांची अपेक्षा न करिताच स्वयं प्रकाशमान होणारा अव्याकृताभिमानी ईश्वर, गायत्रीप्रभृति छंद, आदित्यादि ज्योति, अनियत अक्षराचे मन्त्र-यजुः, यथार्थ कथनरूप सत्य, इन्द्रादि सर्व देवता, भूः, भुवः, सुवः हे तीन लोक इत्यादि सर्व आप आहे आप मूलकारण परमात्मरूपानें प्रणवप्रतिपाद्य आहेत, असें सांगण्यासाठीं शेवटीं 'ओं' असें ह्मटलें आहे (२९)

माध्याह्न सन्ध्येंत अतिमन्त्रित जलाचें प्राशन करण्याचा मन्त्र—

आपः पुनन्तु पृथिवीं पृथिवी पूता पुनातु माम् ।
पुनन्तु ब्रह्मणस्पतिर्ब्रह्म पूता पुनातु माम् ॥
यदुच्छिष्टमभोज्यं यद्वा दुश्चरितं मम ।
सर्वं पुनन्तु मामापोऽसतां च प्रतिग्रहं स्वाहा ॥ (३०)

अन्वय —आपः पृथिवीं पुनन्तु । पृथिवी पूता सती मां पुनातु । ब्रह्मणः पतिः पुनन्तु । ब्रह्म पूता मां पुनातु । यत् उच्छिष्टं अभोज्यं यत् वा दुश्चरितं तत् सर्वं (परिहृत्य) मां आपः पुनन्तु । असता मया कृत परिग्रहं च पुनन्तु । तदर्थं इदं उदकं स्वाहा ॥

अर्थ—आप पृथ्वीला प्रक्षालनानें शुद्ध करोत ती पृथ्वी शुद्ध होऊन मज अनुष्ठान कर्त्याला पावन करो त्याचप्रमाणें आप वेदाचा पालक जो आचार्य त्याला पावन करोत आचार्यानें उपदेशिलेलें ब्रह्मस्वरूप स्वतः पवित्र होऊन मला शुद्ध करो दुसऱ्यानें खाऊन राहिलेलें जें उच्छिष्ट तसेंच जें अभोज्य ( ह्म० खाण्यास अयोग्य ) तसेंच जें माझें दुश्चरित तें सर्व नाहींसे करून जल मला पावन करो त्याचप्रमाणें शूद्रादिकाचा मा केलेला जो प्रतिग्रह त्यालाही आप पवित्र करोत त्याकरिता मंत्रविलेलें हें जल माझ्या मुखरूप अग्नींत स्वाहा ह्म० सुहुत असो ( ३० )

---

*साय सध्याकाळीं जलपान करण्याचा मंत्र—*

**अग्निश्च मा मन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्य ।**
**पापेभ्यो रक्षन्ताम् । यदह्ना पापमकार्षम् ॥**
**मनसा वाचा हस्ताभ्याम् । पद्भ्यामुदरेण शिश्ना ॥**
**अहस्तदवलुम्पतु । यत्किंच दुरितं मयि ।**
**इदमहं माममृतयोनौ । सत्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ (३१)**

**अन्वय** —य अग्नि च मन्यु च य मन्युपतय ते सर्व अपि मन्युकृतेभ्य पापेभ्य मा रक्षन्ता । अह्ना यत् पाप मनसा वाचा हस्ताभ्या, पद्भ्य, उदरेण शिश्ना अकार्षं तत् अह अवलुम्पतु । किंच यत् मयि दुरितं इद अहं मा अमृतयोनौ सत्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥

अर्थ—जो हा अग्नि, क्रोधाभिमानी देव व क्रोधस्वामी ह्म० क्रोधाचं नियमन करणारे देव ते सर्वही क्रोधामुळें घडलेल्या पापापासून माझं रक्षण करोत या संपलेल्या दिवशी मीं जें पाप मन, वाणी, दोन्ही हात, पाय, पोट व शिश्न यानीं केलें असेल तें दिवसाचा अभिमानी देव नाहींसें करो (दुसऱ्याच्या नाशादिकाचं चिन्तन करणें हें मानस, अप्रिय, मिथ्या इत्यादि भाषण हें वाचिक, अभिचारहोमादि हें हस्तकृत, गाय, ब्राह्मण, इत्यादि पूज्यांना पायाचा स्पर्श करणं हें पादकृत, अभोज्य भोजन हें उदर-कृत आणि अगम्यागमन हें शिश्न कृत पाप आहे ) तसेंच माझें दुसरेंही जें जे

पाप असेल त्याच्या या कर्त्याला ( ह्म० लिंगशरीररूप मला ) मी मरणरहित जगत्कारणामध्यें (ह्म० अबाधित स्वयप्रकाश तत्त्वामध्यें) टाकतों. ( ह्म० या होमानें मी तें सर्व भस्म करून सोडतों. ) त्यासाठीं मंत्रविलेलें हें जल माझ्या मुखाग्नींत सुहुत असो. ( ३१ )

---

प्रात संध्यासमयीं जलपानार्थ मत्र—

सूर्यश्च मा मन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्यः ।
पापेभ्यो रक्षन्ताम् । यद्रात्रिया पापमकार्षम् ।
मनसा वाचा हस्ताभ्याम् । पद्भ्यामुदरेण शिश्ना ॥
रात्रिस्तदवलुम्पतु । यत्किंच दुरितं मयि ॥
इदमहं माममृतयोनौ । सूर्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ (३२)

अन्वय —सूर्य च मन्यु च मन्युपतय च मा मन्युकृतेभ्य. पापेभ्यः रक्षन्ता । रात्रिया मनसा, व चा, हस्ताभ्या, पद्भ्या, उदरेण, शिश्ना यत् पापं अकार्ष तत् रात्रि अवलुम्पतु । किंच मयि यत् दुरितं इद अहं मा अमृतयोनौ सूर्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥

अर्थ—सूर्य, मन्यु व मन्युपति हे देव क्रोधामुळें घडलेल्या पापापासून माझें रक्षण करोत. मी गेल्या रात्रीं मनानें, वाणीनें, हातानीं, पायानीं उदरानें व शिश्नानें जें पाप केलें तें रात्रीची अभिमानी देवता नाहींसें करो. तसेंच मजमध्यें दुसरेंही जें काय पाप आहे त्या सर्वांच्या कर्त्याला ह्म० या मला मी सूर्यादिक, स्वयप्रकाश, नित्य जगत्कारणामध्यं टाकितो त्यासाठीं मंत्रविलेलें हें जल माझ्या मुखाग्नीमध्यें सुहुत असो (३२ )

प्राणायामादि सर्व कर्मामध्यें अवश्य असलेल्या ओंकाराचें ऋष्यादि सागतात—

ओमित्येकाक्षरं ब्रह्म । अग्निर्देवता ब्रह्म इत्यार्षम् ।
गायत्रं छन्दं परमात्मं सरूपम् । सायुज्यं विनियोगम् ॥ (३३)

अन्वयः—ओमिति यत् एकाक्षरं तत् ब्रह्म । तस्य देवता अग्नि. । ब्रह्म इति यत् तत् आर्षं । गायत्रं छन्द परमात्मं सरूपं विनियोगं सायुज्य ॥

अर्थ—ॐ असें जें एकाक्षर आहे तें ब्रह्म ( ह्म० सर्व ब्रह्माण्डाची उत्पत्ति, स्थिति व नाश, यांचें कारण आहे. ) त्याची देवता अग्नि आहे. ( अग्नि ह्म० सर्वव्यापक परमात्मा. ) अग्निशब्दोपलक्षित ब्रह्मच त्याचा ऋषि आहे. ( मंत्रही ब्रह्म, ऋषिही ब्रह्म व देवताही ब्रह्म. तात्पर्य ॐकार स्वतःच सर्व आहे. ) दैवी गायत्री हा याचा छन्द, परमात्मलक्षण सर्वात्मक परब्रह्माची प्राप्ति हाच याचा विनियोग आहे. ( ३३ )

तिन्ही संध्येंत मार्जनानंतर गायत्रीच्या आवाहनाचा मंत्र—

**आयातु वरदा देवी अक्षरं ब्रह्म संमितम् ।**
**गायत्रीं छन्दसां मातेदं ब्रह्म जुषस्व मे ।**
**यदह्नात्कुरुते पापं तदह्नात्प्रतिमुच्यते ॥**
**यद्रात्रियात्कुरुते पापं तद्रात्रियात्प्रतिमुच्यते ।**
**सर्ववर्णे महादेवि संध्याविद्ये सरस्वति ॥ ( ३४ )**

अन्वय —वरदा देवी अक्षरं संमितं ब्रह्म उद्दिश्य आयातु । छन्दसां माता गायत्री इदं ब्रह्म जुषस्व । हे संध्याविद्ये, सरस्वति, महादेवि, सर्ववर्णे, यदह्नात् पापं कुरुते तदह्नात् प्रतिमुच्यते । यत् रात्रियात् पापं कुरुते तत् रात्रियात् प्रतिमुच्यते॥

अर्थ—आह्मांला अभीष्ट वर देणारी गायत्री देवी विनाशरहित व वेदान्तप्रमाणानें निश्चित असें जें जगत्कारण ब्रह्म त्याचा उपदेश करण्यासाठीं येवो. गायत्री, त्रिष्टुब् इत्यादि छन्दांची अथवा वेदाची जी माता ती आह्मांला या वेदान्तप्रतिपाद्य ब्रह्मतत्त्वाचा उपदेश करो. हे संध्याविद्ये, ह्म० संध्यारूप विद्ये, हे सरस्वति, हे महादेवि, हे सर्ववर्णे, ( ह्म० रक्त, श्वेत, कृष्ण या वर्णांनीं युक्त) तुझा भक्त ज्या दिवशी जें पाप करितो त्या दिवशींच तो त्यापासून मुक्त होवो. तसेंच ज्या रात्रीं जें पाप करितो त्या रात्रींच तो त्यापासून मुक्त होवो. ( ३४ )

आता गायत्रीच्या आवाहनाचे मंत्र—

**ओजोऽसि सहोऽसि बलमसि भ्राजोऽसि देवानां धामनामासि विश्वमसि विश्वायुः सर्वमसि सर्वायुरभिभूरों गायत्रीमावाहयामि सावित्रीमावाहयामि सरस्वतीमावाहयामि छन्द-**

**ऋषीनावाहयामि श्रियमावाहयामि गायत्रिया गायत्रीच्छन्दो विश्वामित्रऋषिः सविता देवताऽग्निर्मुखं ब्रह्मा शिरो विष्णुर्हृदयꣳ रुद्रः शिखा पृथिवी योनिः प्राणापानव्यानोदानसमाना सप्राणा श्वेतवर्णा सांख्यायनसगोत्रा गायत्री चतुर्विꣳशत्यक्षरा त्रिपदा षट्कुक्षिः पञ्चशीर्षोपनयने विनियोगः ॥**

**अन्वयः**—हे गायत्रि, त्वं ओजः असि। सहः असि। बलं असि। भ्राजः असि। देवानां यत् धाम तत् नाम असि। विश्वं असि। विश्वायुः असि। सर्वं असि। सर्वायुः असि। अभिभूः असि। ॐ असि। गायत्रीं आवाहयामि। (पुढील अन्वय सरळ आहे.)

**अर्थ**—हे गायत्रि, तू ओज (बळाला कारण होणारा जो आठवा धातु तद्रूप आहेस, तूं सह (शत्रूंना पराभूत करणारी शक्ति) आहेस. तू बल (शरीरांतील व्यवहारसामर्थ्य) आहेस. तूं दीप्तिरूप आहेस. देवांचें जें तेज तच तुझें नांव आहे. सर्व जगद्रूप तूंच आहेस. तू पूर्ण आयुष्यरूप आहेस तू सर्व आहेस. तूं सर्वायु आहेस. तू सर्व पापाचा तिरस्कार करणारी आहेस व प्रणवप्रतिपाद्य परमात्मा आहेस. तशा प्रकारच्या गायत्रीचें मी मनामध्यें आवाहन करितों. सावित्रीचें आवाहन करितों. सरस्वतीचें आवाहन करितों. सर्व छन्द व ऋषि यांचें आवाहन करितो. सर्व वेदाच्या श्रीचें आवाहन करितो. (याप्रमाणे गायत्रीचे आवाहन करून व तिच्या छन्दादिकांचें स्मरण करून ध्यान करावें.) गायत्रीचा गायत्री हाच छन्द, विश्वामित्र ऋषि, सविता देवता, प्रसिद्ध अग्नि हेंच मुख, चतुर्मुख ब्रह्मा हें शिर, विष्णु हें हृदय, रुद्र ही शिखा; व पृथ्वी हीच योनि आहे प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पाच वायु तिच्यामध्ये प्रवहादिरूपानें राहतात. वागादि इन्द्रियानीं युक्त असलेली ती सप्राण आहे शुद्धसत्त्वगुणप्रधान असल्यामुळें ती श्वेतवर्ण आहे. सांख्यायन ब्र० परमात्मा, त्याचें जें गोत्र तेंच हिचें गोत्र आहे. ती गायत्री मंत्ररूप आहे. तिच्यामध्यें चोवीस अक्षरें आहेत. त्यामुळें तिचे तीन पाद आहेत. सर्व वेदरूप असलेल्या तिच्या सहा वेदाङ्गें हाच कुक्षि (कुशी) आहेत चार वेदांचे चार उपनिषद्भाग हीं तिचीं चार शिरें

व इतिहास पुराणें हें पाचवें शिर आहे. हिचा विनियोग वटूच्या उपनयनाकडे केला आहे. ( ३४ )

---

गायत्रीचें आवाहन व ध्यान, यानंतर प्राणायामासाठीं मंत्र–

ॐ भूः । ओं भुवः । ओꣳ सुवः । ओं महः ।
ओं जनः । ओं तपः । ओꣳ सत्यम् ॥
ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि ।
धियो यो नः प्रचोदयात् ।
ओमापो ज्योती रसोऽमृतं ब्रह्मभूर्भुवः सुवरोम् ॥ ( ३५ )

अन्वय —ॐ भूः ... ॐ सत्यं । ॐ यः नः धियः प्रचोदयात् तस्य सवितुः देवस्य वरेण्यं तत् भर्गः धीमहि ॥ ॐ आपः, ज्योतिः, रसः, अमृतं इति यत् तत् सर्वं ॐ ब्रह्म । भूः, भुवः, सुवः, ॐ ॥

अर्थ—भूः, भुवः इत्यादि सात व्याहृती सात लोकांच्या प्रतिपादक आहेत. ते लोक प्रणवप्रतिपाद्य ब्रह्मस्वरूप आहेत असें सांगण्याच्या इच्छेनें प्रत्येक व्याहृतीबरोबर प्रणवाचा उच्चार केला आहे 'तत्सवितुः' येथून पुढचा गायत्री मंत्र आहे त्याचें प्रतिपाद्य ब्रह्मच आहे, असें सांगण्याच्या इच्छेनें त्या मंत्राच्या पूर्वींही प्रणवाचा उच्चार केला आहे जो सविता ( परमेश्वर ) आमच्या बुद्धिवृत्तींना ब्रह्मतत्त्वामध्यें प्रेरित करितो, त्या प्रेरक अन्तर्यामी देवाच्या त्या श्रेष्ठ तेजाचें आह्मी ध्यान करितो. ( यापुढें गायत्रीचें शिर सांगतात–) ज्या समुद्र, नद्या इत्यादिकांतील आप आहेत, त्याच प्रमाणें जी आदित्यादि ज्योति आहे, तसाच मधुर, अम्ल इत्यादिक जो रस आहे तसच देवांनीं प्यालेलें जें अमृत आहे तें सर्व प्रणवप्रतिपाद्य ब्रह्मच आहे भूः, भुवः, सुवः हे तीन लोकही प्रणवप्रतिपाद्य ब्रह्म आहे. ३५

---

जपानंतर गायत्रीच्या विसर्जनाचा मंत्र—

उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्धनि ।
ब्राह्मणेभ्योऽभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखम् ॥

अन्वय —भूम्या, पर्वतमूर्धनि, उत्तमे शिखरे जाते देवी ब्राह्मणेभ्य. अभ्यनुज्ञाता यथासुख गच्छ ॥

अर्थ—भूमीवरील मेरू नावाच्या पर्वतावर जें उत्तम शिखर आहे त्यावर वर सांगितलेल्या प्रकारची गायत्री देवता राहते यास्तव हे देवि, तुझे उपासक व तुझ्या अनुग्रहानें संतुष्ट झालेले जे ब्राह्मण त्यांची अनुमति मिळाली असता तू स्वतःला सुख होईल अशा रीतीनें स्वस्थानीं जा.

स्तुतो मया वरदा वेदमाता प्रचोदयन्ती पवने द्विजाता ।
आयु पृथिव्यां द्रविणं ब्रह्मवर्चसं मह्यं दत्त्वा प्रजातु ब्रह्मलोकम् ॥

अन्वय —द्विजाता गायत्री पृथिव्या विद्यमानाय मह्य आयु, द्रविण, ब्रह्मवर्चस दत्वा पवने प्रचोदयन्ती वेदमाता वरदा मया स्तुतो ( स्तुता सती ) प्रजातु (प्रजातं) ब्रह्मलोक प्रयातु ॥

अर्थ—( पूर्व मंत्रात अपरोक्षतेन सांगितलेला मंत्र या मन्त्रात परोक्षरीतीनें स्पष्ट करितात ) द्विजाकडून उपासना केली जाणारी गायत्री किंवा सूर्यमण्डल व ब्रह्मलोक यांत प्रादुर्भूत झालेली गायत्री या पृथ्वीवर विद्यमान असलेल्या मला पूर्ण आयुष्य द्रव्य व ब्रह्मवर्चस देऊन ज्याप्रमाणं प्राणवायु सर्व प्राण्यांना प्रेरणा करून त्याकडून क्रिया करवितो त्याप्रमाणें अन्तर्यामिरूपानं प्रेरणा करणारी चारी वेदांची जननी उपासकांना इष्टार्थ देणारी आणि मजकडून स्तुति केली गेलेली अशी भ्रोतसाती परमात्म्यापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मलोकास जावो. ( ३६ )

---

पूर्वोक्त उपासना करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाला जप करावयास योग्य असा, आदित्यदेवताक मंत्र सांगतात—

घृणि सूर्य आदित्यो न प्रभा वात्यक्षरम् ।
मधु क्षरन्ति तद्रसम् ।
सत्य वै तद्रसमापो ज्योती रसोऽमृत ब्रह्म भूर्भुव सुवरोम् ॥ ३७

अन्वय —घृणि, सूर्य, अक्षर, आदित्य, प्रभा न वाति । तद् रस मधु क्षरन्ति । तद् एव, रस, आप, ज्योति, रस, अमृत, ब्रह्म, भू, भुव, सुव, ॐ एतत् सर्वं आदित्य रूप ॥

अर्थ—दीप्तिमान्, जगाला प्रसवणारा व नित्य आदित्य आपल्या प्रभे-प्रमाणें आकाशमार्गानें गमन करतो. नद्या त्या आदित्यापासून उत्पन्न झालेल्या रसाला ह्मणजे उदकाला तें मधुर होईल अशा रीतीनें वाहतात. तें आदित्य-रूप ब्रह्मच यथार्थ भाषण, मधुरादि रस, नद्यांतील जल, चन्द्र, अग्नि इत्यादि ज्योति, प्रत्येक पदार्थाचें सार, अमृत, वेदविद्या, भूः, भुवः, सुवः हे तीन लोक व प्रणव आहे. ( ह्म० सत्यादि हें सर्व आदित्यच आहे, असें मनानें चिन्तन करावें. ३७ )

---

ज्ञानप्रतिबन्धक महा पातकांची निवृत्ति करणारे त्रिसुपर्णनामक मंत्र सांगतात—

**ब्रह्ममेतु माम् । मधुमेतु माम् ॥ ब्रह्ममेव मधुमेतु माम् । यास्ते सोम प्रजा वत्सोऽभि सो अहम् ॥ दुष्ष्वप्नहं दुरुष्पह । यास्ते सोम प्राणाꣳस्ताञ्जुहोमि ॥**

अन्वयः—ब्रह्मं मां एतु । मधुं मां एतु । मधु ब्रह्मं एव मां एतु । हे सोम, ते याः प्रजाः ताः अभि सः अहं वत्सः अस्मि । हे दुष्ष्वप्नहन्, दुरुष्पह । हे सोम, याः ते प्राणाः तान् जुहोमि ॥

अर्थ—ब्रह्मतत्त्व मला प्राप्त होवो. परमानन्दरूप वस्तु मला प्राप्त होवो. मधुर ब्रह्मच मला प्राप्त होवो. हे परमात्मन् सोम, ( उमा ह्म० ब्रह्म-विद्या तिच्यासह असणारा तो सोम ) तुझ्या ज्या देव-मनुष्यादि प्रजा आहेत त्यांतील तुझा सेवक, बालक अशा प्रकारचा हा मी तुझ्या करुणेला योग्य आहें. यास्तव संसाररूप दुःस्वप्नाचा घात करणाऱ्या परमेश्वरा, तूं माझ्या दुःसह संसाराचा विनाश कर. हे परमात्मन्, तुझ्या प्राणवृत्तीमध्यें मी आ-पल्या प्राणवृत्तींचा होम करतों. ह्म० इन्द्रियांना विषयांपासून निवृत्त करून मी आपलें चित्त केवळ तुझ्या ठिकाणीं लावतों.

आतां या पहिल्या त्रिसुपर्णमंत्राचें माहात्म्य ब्राह्मणरूपानें सांगतात—

**त्रिसुपर्णमयाचितम् । ब्राह्मणाय दद्यात् ॥**
**ब्रह्महत्यां वा एते घ्नन्ति । ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठन्ति ॥**
**ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात्पङ्क्तिं पुनन्ति ॥ ओम् ( ३८ )**

**अन्वयः**—त्रिसुपर्णं अयाचित एव ब्राह्मणाय दद्यात् । ये ब्राह्मणाः त्रिसुपर्णं पठन्ति ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात् पंक्तिं पुनन्ति ॐ ॥

**अर्थ**—शिष्यानें विद्योपदेशासाठीं प्रार्थना केल्यावांचून त्याला तीं सांगूं नये, असें शास्त्र आहे. पण हें त्रिसुपर्ण शिष्याच्या याचनेवांचूनच ब्राह्मणाला द्यावें. नंतर जे ब्राह्मण या त्रिसुपर्णाचा सर्वदा जप करितात ते ब्रह्महत्या-दोषाचा विनाश करितात. त्यांना सोमयागाचें फल मिळतें. ते ज्या पंक्तींत बसून भोजन करितात त्या पंक्तींतील एक सहस्र लोकांस पावन करितात. यास्तव प्रणवप्रतिपाद्य परमात्माच या मंत्राची देवता आहे. ( ३८ )

---

दुसरें त्रिसुपर्ण सांगतात—

**ब्रह्म मेधया । मधु मेधया । ब्रह्ममेव मधु मेधया ॥**
**अद्या नो देव सवितः प्रजावत्सावीः सौभगम् ।**
**परा दुष्ष्वप्नियꣳ सुव । विश्वानि देव सवितर्दुरितानि परासुव ॥**
**यद्भद्रं तन्म आसुव । मधु वाता ऋतायते ॥**
**मधु क्षरन्ति सिन्धवः । माध्वीर्नः सन्त्वोषधीः ॥**
**मधु नक्तमुतोषसि मधुमत्पार्थिवꣳ रजः । मधु द्यौरस्तु नः पिता॥**
**मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाꣳ अस्तु सूर्यः ।**
**माध्वीर्गावो भवन्तु नः ॥**

**अन्वयः**—यत् ब्रह्म तत् मेधया लभ्यतां । मधु मेधया लभ्यतां । ब्रह्म एव मधु मेधया लभ्यतां । हे सवितः देव, अद्य नः प्रजावत् सौभगं सावीः । दुष्ष्वप्नियं परासुव । हे सवितः देव, विश्वानि दुरितानि परासुव । यत् भद्रं तत् मे आसुव । ऋतायते मह्यं वाताः मधु वान्तु । सिन्धवः मधु क्षरन्ति । नः ओषधीः माध्वीः सन्तु । नक्तं च उषसि उत ( मे ) मधु अस्तु । पार्थिवं रजः मधुमत् अस्तु । नः पिता द्यौः मधु अस्तु । नः वनस्पतिः मधुमान् अस्तु, सूर्यः मधुमान् अस्तु । गावः नः माध्वीः भवन्तु ॥

**अर्थ**—जें जगत्कारण ब्रह्म तें मला गुरूनें उपदेशिलेलें महावाक्य व त्याचा अर्थ यांच्या धारण-शक्तीच्या योगानें प्राप्त होवो. तसेंच मधु ( ह्म०

सुख ) मेधेनें (धारणाशक्तीनें) प्राप्त होवो. ब्रह्मरूप मधुही मेधेच्या योगानें प्राप्त होवो. हे प्रेरक देवा, आज आह्मा विद्यार्थ्यांना शिष्य, प्रशिष्य, पुत्र इत्यादिकांनीं युक्त असें आचार्यरूप सौभाग्य दे. दुष्ट स्वप्नासारख्या या द्वैतप्रत्ययाचें निराकरण कर. हे प्रेरक देवा, आमच्या ज्ञानाला प्रतिबंध करणारीं सर्व पापें दूर कर. असंभावना, विपरीत भावना इत्यादिकांनीं रहित असें कल्याणरूप तत्त्वज्ञान मज उपासकाला पूर्णपणें दे. ब्रह्माची इच्छा करणाऱ्या मला वायु सुखकर होतील अशा रीतीनें वाहोत (कारण वायूचा क्षोभ झाल्यास रोगाची उत्पत्ति होऊन तत्त्वज्ञानाला मोठें विघ्न होईल. यास्तव तें न व्हावें ह्मणून वायूच्या अनुकूलतेची येथें प्रार्थना केली आहे. यापुढील प्रार्थनांचाही असाच अभिप्राय जाणावा ) नद्या मधुर व आरोग्यकर जल सपादन करोत ब्रीहि-यवादि ओषधी आह्माला पथ्यकर होवोत रात्री व प्रभातसमयीं आणि दिवसाही मज विद्यार्थ्याला सुख होवो. ( ह्म० आह्माला कालकृत विघ्न न होवो. ) पृथ्वींतील रजही माधुर्ययुक्त, कटकपाषाणादिरहित व त्यामुळेंच अनुकूल असो आमच्या पित्यासारखी द्यौही अतिवृष्ट्यादि प्रातिकूल्यानें रहित असो आम्र, पनस इत्यादि वृक्ष मधुरफलांनीं युक्त होऊन आमच्या जीवनाला कारण होवोत. सूर्यही पुष्कळ सन्ताप न देता अनुकूल प्रकाशानें युक्त होवो. गाईही आमच्या जीवनाला कारण होणाऱ्या मधुर दुग्धानें युक्त होवोत.

या त्रिसुपर्ण मंत्राचा महिमा सांगतात—

य इमं त्रिसुपर्णमयाचितं ब्राह्मणाय दद्यात् ।
भ्रूणहत्या वा एते घ्नन्ति । ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठन्ति ॥
ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात्पङ्क्तिं पुनन्ति ॥ ( ३३ )

अन्वय —यः इमं त्रिसुपर्णं अयाचितं ब्राह्मणाय दद्यात् । ये ब्राह्मणाः त्रिसुपर्णं पठन्ति ते एते भ्रूणहत्यां घ्नन्ति वै । ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात् पङ्क्तिं पुनन्ति ॐ ॥

अर्थ—जो हा त्रिसुपर्ण मंत्र याचना केल्यावाचून ब्राह्मणाला देतो तो महापुण्यवान् होय. जे ब्राह्मण या त्रिसुपर्णाचा जप करितात ते ब्राह्मण-

गर्भाच्या अथवा क्षत्रिय गर्भाच्या हननाचा नाश करितात इ० भ्रूणहत्या दोषापासून मुक्त होतात ते सोमयागाच्या फलाला प्राप्त होतात पङ्क्तींतील एक सहस्र लोकाना पावन करितात. प्रणवप्रतिपाद्य परमात्माच याची देवता आहे ( ३९ )

---

आता तिसरा त्रिसुपर्ण मन्त्र सांगतात—

ब्रह्म मेधवा । मधु मेधवा । ब्रह्ममेव मधु मेधवा ॥
ब्रह्मा देवाना पदवीः कवीनामृषिर्विप्राणा महिषो मृगाणाम् ॥
श्येनो गृध्राणां स्वधितिर्वनाना सोम पवित्रमत्येति रेभन् ॥
हंस शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ॥
नृषद्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋत बृहत् ॥

अन्वय —ब्रह्म मेधवा । मधु मेधवा । ब्रह्म एव मधु मेधवा । देवानां मध्ये ब्रह्मा भूत्वा परमेश्वर अवतिष्ठते । कवीनां मध्ये पदवी , विप्राणां ऋषि , मृगाणां महिष , गृध्राणां श्येन , वनानां स्वधिति भवति । सोम भूत्वा रेभन् सन् सर्वं पवित्रं अत्येति ॥ हंस , शुचिषद् , वसु , अन्तरिक्षसत् , होता, वेदिषद् , अतिथि , दुरोणसद् , नृषद् , वरसत् , ऋतसत् , व्योमसत् , अब्जा , गोजा , ऋतजा , अद्रिजा एतत्सर्वं ऋत बृहत् ॥

अर्थ—ब्रह्म मेधवत् आहे इ० यज्ञ-दानादिकांनी प्राप्त होणारी जी जिज्ञासा तिच्या योगानें ब्रह्मज्ञानाचा लाभ होतो तसेंच मधु मेधवत् आहे. मधु ब्रह्मच मेधवत् आहे ( या पुढील अर्थ मागें पृष्ठ ४६ व ४७ यावर आहे )

ऋचे त्वा रुचे त्वा समित्स्रवन्ति सरितो न धेना ।
अन्तर्हृदा मनसा पूयमाना । घृतस्य धारा अभिचाकशीमि ॥

अन्वय —हे ऋच, त्वा रुच समित् निक्षिप्यते । सरित न धेना अन्तर्हृदा मनसा पूयमाना घृतस्य धारा स्रवन्ति । एवंविधा आत्मधारा अभिचाकशीमि ॥

अर्थ—( ब्रह्मा, विष्णु, महेश्वर किंवा विश्व, तैजस, प्राज्ञ, अथवा विराट, हिरण्यगर्भ, ईश्वर हे तीन सुवर्ण–पक्षी ज्याच्या पासून उत्पन्न

झाले त्या परमात्म्याला त्रिसुपर्ण म्हणतात. त्या त्रिसुपर्णाचें प्रतिपादन करणारा हा ग्रन्थही त्रिसुपर्ण होय. यास्तव ) हे ऋचे, ऋग्वेदरूप अशा तुला उद्देशून ही समिध अग्नीमध्यें वेदप्राप्त्यर्थ दिली जाते. मीं अग्नीमध्यें टाकलेल्या ह्या नद्यांसारख्या, देवांकडून प्याल्या जाणाऱ्या व हृदयस्थ मनानें पवित्र केल्या जाणाऱ्या घृताच्या धारा तुजकडे वहात आहेत. अशा प्रकारच्या या घृतधारा मी सर्व देवतांना देतों.

हिरण्मयो वेतसो मध्य आसाम् ।
तस्मिन्त्सुपर्णो मधुकृत्कुलायी भजन्नास्ते मधु देवताभ्यः ॥
तस्याऽऽसते हरयः सप्त तीरे स्वधां दुहाना अमृतस्य धाराम् ॥

अन्वयः—आसां मध्ये तस्मिन् सुपर्णः देवताभ्यः मधु भजन् आस्ते । यः हिरण्मयः वेतसः मधुकृत् कुलायी अस्ति । तस्य तीरे सप्त हरयः अमृतस्य धारां दुहानाः आसते ॥

अर्थ—या पूर्वोक्त घृत-धारांमध्यें त्या आहवनीय अग्नींत त्रिसुपर्ण ( परमात्मा ) सर्व देवतांना मधुर हवि वांटून देत राहतो. तो तेजोमय, बहुद्रव्यवान्, स्वर्गादि सुख देणारा व सर्व प्राण्यांच्या देहरूपी घरट्यांचा आश्रय आहे. अशा प्रकारच्या त्या परमात्म्याच्या समीप केवळ स्मरणानेंच पापें हरण करणाऱ्या अमृताच्या धारेसारख्या स्वधेला म्ह० हव्यद्रव्याच्या परंपरेला त्या त्या देवतेस पोंचविणारे सात ऋषि राहतात.

य इदं त्रिसुपर्णमयाचितं ब्राह्मणाय दद्यात् ॥
वीरहत्यां वा एते घ्नन्ति । ये ब्राह्मणास्त्रिसुपर्णं पठन्ति ॥
ते सोमं प्राप्नुवन्ति । आसहस्रात्पङ्क्तिं पुनन्ति ॥ ॐ ॥ (४०)

अन्वयः—यः इदं त्रिसुपर्णं अयाचितं० इत्यादि अन्वय पूर्वीप्रमाणें व अर्थही पूर्वीप्रमाणेंच. केवळ वेद-शास्त्रसंपन्न व वेद-शास्त्रोक्त अनुष्ठान करणारा ब्राह्मण किंवा अभिषिक्त राजा हा वीरशब्दाचा अर्थ आहे.

---

ब्रह्मज्ञानाला प्रतिबन्ध करणाऱ्या महा पातकांची निवृत्ति करण्यासाठीं तीन जप्य त्रिसुपर्ण मंत्र सांगितले. त्यांतील केवळ ब्राह्मण जातीच्या पुरुषाचा

वध करणें ही ब्रह्महत्या असून तें पञ्च महापातकांतील प्रबल महापातक आहे भ्रूणहत्या त्याहून अधिक व वीरहत्या त्याहूनही अधिक आहे पण या त्रिसुपर्ण मन्त्राचा जप यावज्जीव केल्यास तो तसल्या पातकाचेंही जर निवर्तन करतो तर तो जप सुरापानादि त्याहून निकृष्ट असलेल्या पापाचें निवर्तन करतो, हें काय सांगावें? अशा रीतीनें प्रतिबन्धाच्या निवृत्तीचा उपाय सांगून जीवात्म्याच्या ईश्वराशीं असलेल्या अभेदाचें ज्ञान व्हावें ह्मणून धारणाशक्तीच्या अभिमानी देवतेची प्रार्थना करण्यासाठींच ऋचा सांगतात

मेधा देवी जुषमाणा न आगाद्विश्वाची भद्रा सुमनस्यमाना।
त्वया जुष्टा नुदमाना दुरुक्तान्बृहद्वदेम विदथे सुवीरा ॥

अन्वय—मेधा, देवी, विश्वाची, भद्रा, सुमनस्यमाना जुषमाणा सती न आगात। हे देवि, त्वया जुष्टा दुरुक्तान् नुदमाना सुवीरा विदथ बृहत् वदेम ॥

अर्थ—ग्रन्थ व त्याचा अर्थ याना धारण करणारी शक्ति (ह्म० मेधा), तिची अभिमानी देवी, विश्वव्यापिनी, कल्याणी, आह्मावर अनुग्रह करील, अशा प्रकारच्या सुमनाची इच्छा करणारी देवी संतुष्ट होत्साती आह्माकडे येवो हे देवि, तू ज्याच्यावर अनुग्रह केला आहेस त्याचप्रमाणे पुरुषार्थाच्या उपयोगीं नसलेले वेदबाह्य अर्थ ज्यानीं सोडले आहेत ह्म० जे केवळ वेदनिष्ठ आहेत तसेच जे उत्तम पुत्र, शिष्य इत्यादिरूप आहेत ते आह्मी यज्ञाचे अनुष्ठान केलें असता शुद्धान्तःकरणयुक्त होऊन परब्रह्म तत्त्वाचें कथन करता

त्वया जुष्ट ऋषिर्भवति देवि त्वया ब्रह्मागतश्रीरुत त्वया ॥
जुष्टश्चित्रं विन्दते वसु सा नो जुषस्व द्रविणो न मेधे। (४१)

अन्वय—हे देवि मेधे, त्वया जुष्ट ऋषि भवति। त्वया जुष्ट पुरुष ब्रह्मा भवति। उत त्वया जुष्ट आगतश्री भवति। त्वया जुष्ट चित्रं वसु विन्दते। हे मेध, सा त्व न द्रविण न जुषस्व ॥

अर्थ—हे देवि मेधे, तुजकडून अनुग्रह करा गेलेला पुरुष ऋषि ह्म० अतीन्द्रियार्थदर्शी होतो तसाच तुजकडून अनुग्रह केला गेलेला पुरुष संपत्तिमान् होतो. ह्मणूनच तुजकडून अनुग्रहित झालेला पुरुष पशु,

सुवर्ण, धान्य इत्यादि विविध धनास प्राप्त होतो. हे मेधे, तशा तऱ्हेची तूं आह्मावर धनाढ्याप्रमाणें अनुग्रह कर. ( ह्म० ज्याप्रमाणें एकाया धनपतीनें अनुग्रह केला असता दरिद्रीही कृतार्थ होतो त्याप्रमाण मी कृतार्थ होईन.)४१

---

आता मेधा देणाऱ्या देवतांची प्रार्थना करण्यासाठीं मंत्र—

**मेधां म इन्द्रो ददातु मेधां देवी सरस्वती ॥**
**मेधां मे अश्विनावुभावाधत्तां पुष्करस्रजा ॥**

अन्वय.—इन्द्र म मेधा ददातु । देवी सरस्वती मेधा ददातु । पुष्करस्रजा उभौ अश्विनौ मे मेधा आधत्ता ॥

अर्थ—इन्द्र मला मेधा देवो देवी सरस्वती मला मेधा देवो. कमलमालांनीं युक्त असलेले अश्विनीकुमार मला मेधा देवोत.

**अप्सरासु च या मेधा गन्धर्वेषु च यन्मनः ॥**
**दैवीं मेधा सरस्वती सा मां मेधा सुरभिर्जुषतां स्वाहा (४२)**

अन्वय.—अप्सरासु या मेधा च गन्धर्वेषु यत् मन दैवीं मेधा सरस्वती सा सुरभि मां जुषता स्वाहा ॥

अर्थ—देव स्त्रियामध्यें जी मेधा आहे, गन्धर्वांमध्यें जें मेधारूप मन आहे, हिरण्यगर्भादि देवामध्य जी मेधा आहे आणि वेदशास्त्ररूप जी मेधा आहे ती सर्वं सुगन्धयुक्त अथवा सर्व कामना पूर्ण करणारी होऊन माझें सेवन करो. ( ४२ )

---

**आ मां मेधा सुरभिर्विश्वरूपा हिरण्यवर्णा जगती जगम्या ऊर्जस्वती पयसा पिन्वमाना सा मां मेधा सुप्रतीका जुषन्ताम् ( ४३ )**

अन्वय.—सुरभि, विश्वरूपा, हिरण्यवर्णा, जगती, जगम्या, ऊर्जस्वती पयसा पिन्वमाना मेधा मां आगच्छतु । सा मेधा सुप्रतीका मां जुषन्ता ॥

अर्थ—सुगन्धयुक्त अथवा कामना पूर्ण करणारी, बहुरूप, देवता शरीरात सुवर्णासारख्या वर्णानें युक्त असलेली, जगद्रूप, पुरुषार्थयुक्त पुरुषाना

गमन करण्यास अत्यन्त योग्य, बलवती व दुग्धादि रसानें आह्माला संतुष्ट करणारी धारणाशक्ति मजकडे सर्व प्रकारें येवो. तशा गुणांनीं युक्त असलेली ती मेधा सुखी होऊन माझें सेवन करो. ( ४३ )

---

पुनरपि मेधादिकाच्या सिद्धीकरिता अग्नि, इन्द्र व सूर्य यांच्या प्रार्थनेचा मंत्र—

मयि मेधां मयि प्रजां मय्यग्निस्तेजो दधातु। मयि मेधां मयि प्रजां मयीन्द्र इन्द्रियं दधातु। मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु॥ ( ४४ )

अन्वय —अग्नि मयि मेधा, मयि प्रजा, मयि तेजः दधातु। इन्द्र. मयि मेधा, प्रजा, इन्द्रियं दधातु। सूर्यः मयि मेधा, प्रजा, भ्राजः दधातु॥

अर्थ—अग्नि माझ्या ठिकाणीं मेधा, अविच्छिन्न सन्तति व तेज देवो. इन्द्र माझ्या ठिकाणीं मेधा, अविच्छिन्न सन्तति व वीर्यपुष्टि करो. सूर्य माझ्या ठिकाणीं मेधा, अविच्छिन्न सन्तति व भ्राज देवो. ( एकाद्याच्या तोंडाकडे पाहताच भीति उत्पन्न करणारें जें मुखतेज त्याला भ्राज ह्मणतात )

---

या पुढील ऋचेने परमात्म्यापासून आपल्या अभीष्टाची याचना करतो.

अपैतु मृत्युरमृतं न आगन्वैवस्वतो नो अभयं कृणोतु। पर्णं वनस्पतेरिवाभि नः शीयतां रयिः सचतां नः शचीपतिः ॥ ( ४५ )

अन्वयः—हे परमात्मन्, मृत्युः अस्मत्तः अपैतु। अत एव नः अमृतं आगन्, वैवस्वतः नः अभयं कृणोतु। नः पापं वनस्पतेः पर्णं इव अभिशीयताम्। नः शचीपतिः रयिं सचताम्॥

अर्थ—हे परमात्म्या, मृत्यु आह्मापासून दूर होवो. त्यामुळेंच आह्मांकडे मोक्ष येवो त्यामुळेंच वैवस्वत यम आह्मांस अभय करो. ह्मणजे आह्माला नरकदुःख न देवो. आमचें पाप अश्वत्थादि वनस्पतींच्या

पर्णाप्रमाणें क्षीण होऊन नाश पावो. आह्मांला इन्द्राच्या उपभोगास योग्य असें महत् ऐश्वर्य प्राप्त होवो. ( ४५ )

---

परं मृत्यो अनु परेहि पन्थां यस्ते स्व इतरो देवयानात्।
चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मा नः प्रजाऽरीरिषो मोत वीरान् ॥ ( ४६ )

अन्वयः—हे मृत्यो, देवयानात् यः इतरः ते स्वः पन्थाः अस्ति तं परं पन्थं ( पन्थानं ) अनुपरेहि । उत नः प्रजां वीरान् मा रीरिषः चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि ॥

अर्थ—हे मृत्यो, देवयान मार्ग व पितृयान मार्ग या दोन्ही मार्गांहून इतर जो तुझा स्वतःचा मार्ग आहे त्या श्रेष्ठ मार्गानें तूं जा. त्याचप्रमाणें आमच्या प्रजेची व भृत्यांचीही हिंसा करूं नकोस. दर्शनशक्ति व श्रवणशक्ति यांनीं युक्त असलेल्या तुला मी हें बोलत आहें. ( वास्तव तूं मजकडे पाहून माझी ही प्रार्थना सफल कर. ४६ )

---

वातं प्राणं मनसान्वारभामहे प्रजापतिं यो भुवनस्य गोपाः।
स नो मृत्योस्त्रायतां पात्वꣳहसो ज्योग्जीवा जरामशीमहि ४७

अन्वयः—वयं तं प्राणं, वातं यः भुवनस्य गोपाः तं प्रजापतिं मनसा अन्वारभे । सः नः मृत्योः त्रायता । अंहसः पातु । ज्योग्जीवाः सन्तः वार्धक्यावस्था अशीमहि ॥

अर्थ—आह्मी सर्व पिण्डांतील प्राणरूप, अन्तरिक्षस्थ वायुरूप व ब्रह्माण्डाचा रक्षक अशा परमात्म्याला अन्तरंगानें चिन्तितों. ( त्याच्या सत्तेनें प्रत्येक कार्य करितों. ) तो प्रजापति आमचें मृत्यूपासून रक्षण करो. आह्मांला पापापासून सोडवो. आह्मी चिरंजीव होऊन वार्धक्यावस्थेचा अनुभव घेऊं असें करो. ( ४७ )

---

अमुत्र भूयादध यद्यमस्य बृहस्पतेरभिशस्तेरमुञ्चः ।
प्रत्यौहतामश्विना मृत्युमस्माद्देवानामग्ने भिषजा शचीभिः ॥४८

अन्वयः—हे बृहस्पते, यमस्य यत् भयं तस्मात् मां अमुचः । अभिशस्तेः अपि मा अमुचः । अथ अमुत्र भूयात् । ( परलोकभवेन सुखेन मां संयोजय । ) अश्विना (देववैद्यौ) अस्मात् मृत्युं प्रत्यौहता । हे अग्ने, देवानां भिषजा त्वया अहं रक्षणीयः । शचीभिः स्व संयोजय ॥

अर्थ—देवगणांचा पति अशा हे बृहस्पते परमात्म्या, आह्मांला यमाच्या भयापासून सोडीव. अपयशापासूनही मुक्त कर. त्यानंतर परलोकसंबंधी सुखानें युक्त कर. तसेच अश्विनीकुमार या नावांचे देववैद्य आह्मांपासून मृत्युला दूर करोत. हे अग्ने, देवांचा वैद्य अशा तुजकडून मी रक्षणीय आहें. इन्द्रपत्नीशीं ह्म० ऐश्वर्याशीं आमचा संयोग कर. ( ४८ )

---

हरिं हरन्तमनुयन्ति देवा विश्वस्येशानं वृषभं मतीनाम् ।
ब्रह्म सरूपमनु मेदमागादयनं मा विवधीर्विक्रमस्व ॥ ( ४९ )

अन्वयः—हे परमात्मन्, हरिं, पापं हरन्तं, विश्वस्य ईशानं, मतीनां वृषभं देवाः अनुयन्ति । त्वदनुग्रहात सरूपं इदं ब्रह्म मे अनु आगात् । अयनं मा विवधीः । किंतु विक्रमस्व ॥

अर्थ—हे परमात्मा, विष्णुरूप, भक्तांच्या पापांचें हरण करणारा, सर्व जगाचा ईश, व सर्व प्राण्यांच्या बुद्धींचा श्रेष्ठ नियन्ता अशा तुझें अनुसरण सर्व देव करितात. तुझ्या अनुग्रहानें ब्राह्मणादि वैश्यांनीं सहित व सर्व द्विजांकडून प्रत्यक्ष अध्ययन केलें जाणारें असें हें ब्रह्म ( ह्म० चार वेद ) मला प्राप्त होवो. त्याप्रमाणें आह्मीं संपादन केलेल्या मोक्षमार्गाची हिंसा करूं नकोस. तर तो देण्याकडीं उद्यम कर. ( ४९ )

---

[illegible]समिधमिन्धान उभौ लोकौ सनेमहम् ।
उभयोर्लोकयोर्ऋध्वाति मृत्युं तराम्यहम् ॥ ( ५० )

अन्वयः—हे भगवन्, ( त्वदनुग्रहात् ) शल्कैः अग्निं इन्धानः अहं उभौ लोकौ सनेम् । अत एव उभयोः लोकयोः ऋद्ध्वा अहं अतिमृत्युं तरामि ॥

अर्थ—हे भगवन्, समिधरूप शुष्क काष्ठांनीं आहवनीयादि अग्नीला दीप्त करणारा मी दोन्ही लोकांस प्राप्त होतों (ह्म० सत्कर्मांनें दोन्ही लोक सिद्ध होतात. ) ह्मणूनच दोन्ही लोकांस प्राप्त होऊन मी अतिमृत्यूचें लंघन करितों. ( ह्म० आयुष्य असे पर्यंत ऐहिक भोग भोगून अन्तीं देव होतों, असा याचा भावार्थ. ५० )

---

मा छिदो मृत्यो मा वधीर्मा मे बलं विवृहो मा प्रमोषीः ।
प्रजां मा मे रीरिष आयुरुग्र नृचक्षसं त्वा हविषा विधेम॥ ५१

अन्वयः—हे मृत्यो, हे उग्र, मे बोधं मा छिद । सत्कर्मानुष्ठानं मा वधाः, मे बलं मा विवृह. । परलोकसाधनं मा प्रमोषीः । मे प्रजा आयु च मा रीरिष । तदर्थं नृचक्षसं त्वा हविषा विधेम ॥

अर्थ—हे मृत्यो, हे क्रूरा, माझ्या बोधाचा विच्छेद करूं नकोस. आमच्या सत्कर्मानुष्ठानाचा विघात करूं नकोस. माझें शरीरबल नाहींसें करूं नकोस. माझ्या परलोक-साधनाचा अपहार करूं नकोस. माझी प्रजा व आयुष्य याचा क्षय करूं नकोस. त्यासाठीं प्राण्यांच्या पुण्य-पापांचें परीक्षण करणाऱ्या, त्यांना पाहणाऱ्या तुझी हविष्प्रदानानें परिचर्या करितों. (५१)

---

मा नो महान्तमुत मा नो अर्भकं मा न उक्षन्तमुत मा न उक्षितम् । मा नो वधीः पितरं मोत मातरं प्रिया मा नस्तनुवो रुद्र रीरिषः ॥ ( ५२ )

अन्वय—हे रुद्र, नः महान्तं मा वधीः । अर्भकं, उक्षन्तं, उक्षितं, पितरं मातरं उत मा वधीः । हे रुद्र, प्रियाः नः तनुवः ( तनूः ) मा रीरिषः ॥

अर्थ—दुष्टांना रडविणाऱ्या रुद्रा, आमच्या गुरुप्रभृति पूज्यवर्गास मारूं नकोस. त्याचप्रमाणें स्तनपान करणाऱ्या अर्भकास, तरुणास, गर्भस्थ

अर्थ—हे मृत्यो, मर्त्यांना मारण्यासाठीं तुझे जे सहस्र किंवा दशसहस्र पाश आहेत त्या सर्वांचें सत्कर्मानुष्ठाच्या बळानें आम्ही निवारण करितों. ( येथील मायाशब्द शक्ति, बल यासर्थी आहे. ५७ ).

---

मृत्यवे स्वाहा मृत्यवे स्वाहा ॥ ( ५८ )

अन्वय —मृत्यवे स्वाहा । मृत्यवे स्वाहा ॥

अर्थ—ज्याच्या योगानें प्राणी मरतात त्या मृत्यूला उद्देशून दिलेलें हें आज्य सुहुत असो. ( सर्व पापाच्या नाशाकरिता येथें हे दोन मंत्र सांगितले आहेत ५८ )

---

देवकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा ।
मनुष्यकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा ॥
पितृकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा ।
आत्मकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा ॥
अन्यकृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा ।
अस्मत्कृतस्यैनसोऽवयजनमसि स्वाहा ॥
यद्दिवा च नक्तं चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ।
यत्स्वपन्तश्च जाग्रतश्चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ॥
यत्सुप्तश्च जाग्रतश्चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ।
यद्विद्वांसश्चाविद्वांसश्चैनश्चकृम तस्यावयजनमसि स्वाहा ।
एनस एनसोऽवयजनमसि स्वाहा ॥ ( ५९ )

अन्वय —हे आज्य त्वं देवकृतस्य, मनुष्यकृतस्य, पितृकृतस्य, आत्मकृतस्य, अन्यकृतस्य, अस्मत्कृतस्य एनसः अवयजनं असि । स्वाहा । दिवा च नक्तं च यत् एनः चकृम । स्वपन्तः जाग्रतः च यत् एनः चकृम । सुप्ताः जाग्रतः च यत् एनः चकृम । विद्वांसः अविद्वांसः च यत् एनः चकृम । तस्य अवयजनं असि । स्वाहा । एनसः एनसः अवयजनं असि स्वाहा ॥

अर्थ—हे घृता, तू देवकृत ( म० देवकर्मामध्यें अंगवैकल्यादिरूप अथवा इन्द्रियांच्या योगानें झालेल्या ) पापाचें निवारण करणारें आहेस.

यास्तव अग्नीला उद्देशून दिलेलें हें आज्य सुहुत असो. त्याचप्रमाणें मनुष्याला उद्देशून केलेल्या (ह्म० धिक्कार, अन्न न देणें इत्यादिरूप) पापाचें निवारक आहेस. पितृकर्मामध्यें घडलेल्या अंगवैकल्यादिरूप पापाचें निवारक आहेस. स्वत: केलेल्या अगम्यागमनादिरूप पापाचें निवारक आहेस. आमच्या भार्यादिकांनी केलेल्या पापाचें निवारक आहेस. तसेंच आमच्या सजातीयादिकांनी केलेल्या पापाचें निवारक आहेस. दिवसा व रात्रीं आह्मीं जें पाप केलें आहे त्याचें, स्वप्नांत किंवा जागेपणीं, गाढ झोंप घेत असतांना, ज्ञानत: अथवा अज्ञानतः आह्मीं जें पाप केलें आहे त्या सर्व पापाचें तूं निवारक आहेस. यास्तव अग्नीला उद्देशून दिलेलें हें घृत सुहुत असो. ५९.

---

यद्वो देवाश्चकृम जिह्वया गुरुमनसो वा प्रयुती देवहेडनम् । अरा वायो नो अभि दुच्छुनायते तस्मिन्तदेनो वसवो निधेतन स्वाहा ॥ (६०)

अन्वयः—हे वसवः, गुरुमनसः, देवा, वः उद्दिश्य यत् प्रयुती देवहेडनं जिह्वया वयं चकृम तत् एनः तस्मिन् निधेतन । हे वायो, नः अभिदुच्छुनायते अरा स्वाहा ॥

अर्थ—सर्व प्रण्याचा निवास करविणाऱ्या व गम्भीर मनानें युक्त असलेल्या हे देवांनो, तुह्मांला उद्देशून मीं जी असंख्यात विडम्बना जिह्वेनें (वाणीनें) केली आहे त्याचें पाप तुह्मी आपल्या मनामध्यें ठेवा. (ह्मणजे वाणीनें त्याचा उच्चार करूं नका. ह्मणजे आमचा तो अपराध सहन करा.) हे वायो, आमचें जें पाप दुष्ट कुत्र्याप्रमाणें आचरण करीत आहे तें तुह्मी त्या तुमच्या गम्भीर मनांत ठेवा. कारण तें पाप मरण देणारें आहे. त्यासाठीं हें आज्य त्या देवांना उद्देशून सुहुत असो. (६०)

---

कामोऽकार्षीन्नमो नमः । कामोऽकार्षीत्कामः करोति नाहं करोमि कामः कर्ता नाहं कर्ता कामः कारयिता ॥ नाहं कारयिता । एष ते कामकामाय स्वाहा ॥ (६१)

अन्वय —हे देवा युष्मभ्यं नमो नम पूर्वोक्तानि पापानि काम अकार्षीत् । काम: अकार्षीत् । काम करोति । अहं न करोमि । कामः कर्ता । अहं न कर्ता । काम. कारयिता । अहं न कारयिता । हे काम, ते कामाय एष स्वाहा ॥

अर्थ—अहो, सर्व देवांनो, तुह्माला वारंवार नमस्कार असो. पूर्वोक्त पापें कामानें केलेलीं आहेत. खरोखर तीं कामानें केलीं आहेत. कामच करतो. मी करीत नाहीं. कामच कर्ता आहे. मी कर्ता नव्हे. कारण तो कामच सर्व जगाला आपल्या अधीन करून घेऊन त्याच्याकडून पाप करविणारा आहे मी तें करविणारा नव्हे. हे कामा, त्या पापाच्या निवृत्यर्थ तुज सुंदर देवाला उद्देशून दिलेला हा आज्य-भाग सुहुत होवो. (६१)

---

मन्युरकार्षीन्नमो नमः । मन्युरकार्षीन्मन्यु करोति नाहं करोमि मन्यु कर्ता नाहं कर्ता मन्युः कारयिता नाहं कारयिता । एष ते मन्यो मन्यवे स्वाहा ॥ ( ६२ )

अन्वय —मन्यु. अकार्षीत् । हे देवा युष्मभ्यं नमो नम । मन्यु अकार्षीत् । मन्यु. करोति । अहं न करोमि । इत्यादि पूर्ववत् ॥

अर्थ—कोपाभिमानी देवानें पाप केलें आहे. हे देवानो, तुह्माला वारंवार नमस्कार असो. मन्यूनें पाप केलें आहे मन्यु ह्म० कोपदेवच तें करितो, मी करीत नाहीं. मन्यु कर्ता आहे. मी कर्ता नव्हे. मन्यु करविता आहे. मी करविता नव्हे. हे मन्यो, तुज क्रोधरूप देवाला उद्देशून दिलेला हा आज्यभाग सुहुत होवो. (६२)

---

आता यापुढें सर्वोत्कृष्ट चतुर्थाश्रमाचा स्वीकार करीत असतांना तदङ्गभूत विरजा होम कर्मामध्यें ज्याचा विनियोग केला आहे ते सर्व पाप-निवारक मंत्र सांगतात—

तिलाञ्जुहोमि सरसाꣳसपिष्टान्गन्धार मम चित्ते रमन्तु स्वाहा ।
गावो हिरण्यं धनमन्नपानꣳ सर्वेषाꣳ श्रियै स्वाहा ॥
श्रियं च लक्ष्मिं च पुष्टिं च कीर्तिं चानृण्यताम् ॥
ब्रह्मण्यं बहुपुत्रताम् । श्रद्धामेधे प्रजा संददातु स्वाहा ॥ (६३)

अन्वयः--हे गन्धार, सरसान् सपिष्टान् तिलान् जुहोमि । त्वदीयाः पावनाः गुणाः मम चित्ते रमन्तु स्वाहा ॥ हे परमात्मन् त्व प्रसादात् गावः, हिरण्यं धनं, अन्नपानं मम सिध्यन्तु । सर्वेषां भोग्यपदार्थांना प्राप्तिः अस्तु । श्रिये इदं हविः स्वाहा ॥ श्रियं, लक्ष्मीं, पुष्टिं, कीर्तिं, आनृण्यता, ब्रह्मण्य, बहुपुत्रता, श्रद्धामेधे, प्रजाः मह्यं प्रददातु । स्वाहा ॥

अर्थ--हे गन्धार ह्म० उत्तम देहसौरम्ययुक्त परमात्मन्, तुजसाठीं सरस व सातुप्रभृति धान्याच्या पिठानें युक्त अशा तिळांचा होम करतों. त्याचें फळ ह्मणून तुझे पावन गुण माझ्या चित्तांत रममाण होवोत. ( स्वाहाशब्दाचा अर्थ वरीलप्रमाणेंच करावा ) हे परमात्मन्, तुझ्या प्रसादानें मला गाई, सुवर्ण, इतर धन व अन्नपान मिळो. सर्व भोग्य पदार्थांची प्राप्ति होवो. गजान्त लक्ष्मीसाठीं तुला उद्देशून दिलेला हा हवि सुहुत होवो परमात्मा मला राज्यलक्ष्मी, मोक्षलक्ष्मी, शरीराची पुष्टि, विस्तीर्ण कीर्ति, देव, ऋषि व पितर याच्या ऋणातून मुक्ति, ब्राह्मणोत्तमत्व, बहुपुत्रत्व, गुरु व वेदान्त यांच्या वाक्यावरील विश्वास वेदशास्त्रार्थाचें ग्रहण व धारण, यांचें पटुत्व, कन्या, नातु इत्यादि देवो. ( ६३ )

---

तिला कृष्णास्तिलाः श्वेतास्तिला सौम्या वशानुगाः ।
तिला. पुनन्तु मे पापं यत्किंचिद्दुरितं मयि स्वाहा ॥
चोरस्यान्नं नवश्राद्धं ब्रह्महा गुरुतल्पगः ।
गोस्तेयꣳ सुरापानं भ्रूणहत्या तिला शान्तिꣳ शमयन्तु स्वाहा॥
श्रीश्च लक्ष्मीश्च पुष्टीश्च कीर्तिं चानृण्यताम् । ब्रह्मण्यं बहुपुत्रताम् ॥ श्रद्धामेधे प्रज्ञा तु जातवेद संददातु स्वाहा॥ ( ६४ )

अन्वयः--हे परमात्मन्, मे यत् किंचित् दुरितं तत् पापं तिलाः पुनन्तु । तुभ्य स्वाहा । केचित् तिला कृष्णाः, केचित् श्वेता । परं तु ते सर्वे अपि सौम्याः वशानुगाः ॥ हे परमात्मन्, त्वदाज्ञया तिलाः चोरस्य अन्नं, नवश्राद्धं, ब्रह्महा, गुरुतल्पगः, गोस्तेयं, सुरापानं, भ्रूणहत्या इत्यादि पापानां शमयन्तु स्वाहा ॥ हे जातवेदः, श्रीः, लक्ष्मी, पुष्टीः इत्यादि सर्वं मह्य स संददातु ॥

अर्थ—हे परमात्म्या, तुझ्या आज्ञेनें माझें जें कांहीं अकर्तव्यरूप पाप आहे तें दूर करून तिळ मला पावन करोत. त्यासाठीं हा हवि तुला उद्देशून सुहुत होवो. त्यांतील कांहीं तिळ काळे आहेत व कांहीं पांढरे आहेत. पण ते दोन्ही प्रकारचे तिळ रोगादि उपद्रव करणारे व आमच्या अर्थानें राहणारे आहेत. ( ह्म० स्वतः धर्मानें संपादन केलेलें धन देऊन ते विकत आणलेले आहेत. चौर्यादि अकृत्यानें संपादन केलेले नाहींत. हे परमात्मन्, तुझ्या आज्ञेनें तिळ चोराचें अन्न, एकोद्दिष्टादि श्राद्धान्नाचें भोजन, ब्रह्महत्या, गुरुस्त्री गमन, गाईची चोरी, मद्यप्राशन, गर्भहत्या इत्यादि पापांची शान्ति करोत. त्यासाठीं हा हवि तुला उद्देशून सुहुत असो. हे सर्व ज्ञानाच्या अथवा धनाच्या उत्पादक परमात्म्या, वरील अनुवाकाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें तूं मला श्री, लक्ष्मी, पुष्टि, कीर्ति, अनृणता, उत्तम ब्राह्मणत्व, श्रद्धा, मेधा व कुशाग्र बुद्धि उत्तम प्रकारें दे. ( ६४ )

---

अहं विपाप्मा० इत्यादि। हरित, पिङ्गल, लोहिताक्षि, हे पुरुष, उत्तिष्ठ। देहि देहि। दापयिता भव। मे चित्तवृत्तयः शुध्यन्ता। अहं विपाप्मा, विरजाः, ज्योतिः भूयासं। स्वाहा॥

अर्थ—या आज्यहोमाच्या योगानें प्राणादि पांच वायु शुद्ध होवोत. त्यामुळें ज्ञान-प्रतिबन्धक पापरहित व पापकारणीभूत रजोगुणानेंही रहित होऊन जें जगत्कारणभूत परब्रह्म तेंच मीं व्हावें. त्यासाठीं हें आज्य सुहुत असो. माझीं वागादि-प्राणान्त इन्द्रियें, शुद्धेन्द्रिय, निश्चयात्मिका बुद्धिवृत्ति, अनिश्चयरूप आकृतिवृत्ति व हें चांगलें आहे अशा प्रकारची संकल्पवृत्ति हीं सर्व शुद्ध होवोत. मीं निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाश परब्रह्म व्हावें. स्वाहा. माझ्या स्थूल शरीरांतील त्वचा, चर्म, मांस, रक्त, मेद, मज्जा, स्नायु व अस्थि शुद्ध होवोत व त्यामुळें मीं निष्पाप, रजोगुणरहित व स्वयं-प्रकाश व्हावें. स्वाहा. माझ्या स्थूल शरीराचे मस्तक, हात, पाय, कुशी, पाठ, मांड्या, उदर, जंघा, शिश्न, उपस्थ व वायु हे अवयव शुद्ध होवोत व त्यामुळें मी निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाश व्हावें. हे प्रतिबन्ध-निवारक, पिंगलवर्ण व रक्तनयन पुरुषा, उठ हा० औदासिन्य सोडून मज-वर अनुग्रह करावयास उद्युक्त हो. त्याचप्रमाणें मला पुनः पुनः शुद्धि दे. त्याचप्रमाणें आचार्यांच्या मुखानें तत्त्वज्ञान देणारा हो. माझ्या चित्तवृत्ति शुद्ध होवोत. मीं निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाश व्हावें. स्वाहा. (६५)

---

पृथिव्यापस्तेजोवायुराकाशा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा। शब्दस्पर्शरूपरसगन्धा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा॥ मनोवाक्का-यकर्माणि मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा। अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा॥ आत्मा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा। अन्तरात्मा मे शुध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा॥ परमात्मा मे शुध्यन्तां

ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ।
क्षुधे स्वाहा । क्षुत्पिपासाय स्वाहा ॥ विविट्यै स्वाहा ।
ऋग्विधानाय स्वाहा । कषोत्काय स्वाहा ॥
क्षुत्पिपासामलं ज्येष्ठामलक्ष्मीर्नाशयाम्यहम् ।
अभूतिमसमृद्धिं च सर्वान्निर्णुद मे पाप्मानꣳ स्वाहा ॥
अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयमानन्दमयमात्मा मे शु-
ध्यन्तां ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयासꣳ स्वाहा ॥ (६६)

अन्वय-—पृथिव्यापस्तेजोवायुराकाश। मे शुध्यन्ता । अहं विपाप्मा इ० ॥ शब्दस्पर्शरूपरसगन्धा मे शुध्यन्तां० ॥ मनोवाक्कायकर्माणि मे शुध्यन्तां० ॥ हे परमात्मन्, अव्यक्तभावे अहङ्कारे विमुक्तः भूयासं० ॥ मे आत्मा शुध्यन्तां । अहं ज्योतिः० ॥ मे अन्तरात्मा शुध्यन्तां ॥ अहं ज्योति० ॥ परमात्मा मे शुध्यन्तां । अहं ज्योतिः० ॥ क्षुधे स्वाहा । क्षुत्पिपासाय स्वाहा । विविट्यै स्वाहा । ऋग्विधानाय स्वाहा । कषोत्काय स्वाहा ॥ हे परमात्मन्, अहं क्षुत्पिपासामलं ज्येष्ठ अलक्ष्मीं, अभूतिं, असमृद्धिं एतान् सर्वान् नाशयामि । मे पाप्मानं निर्णुद । स्वाहा ॥ अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयं, आनन्दमयं आत्मा मे शुध्यन्तां । अहं विपाप्म ज्योति विरजाः भूयासं स्वाहा ॥

अर्थ—माझ्या शरीराचीं उपादान कारणभूत पृथिव्यादि भूतें शुद्ध होवोत. मी निष्पाप, रजोगुणरहित, स्वयंप्रकाश व्हावें. स्वाहा ( पुढील सर्व पर्यायांत 'ज्योतिरहं विरजा विपाप्मा भूयास स्वाहा' याचा अर्थ असाच समजावा. ) माझ्या शरीरांतील पञ्चमहाभूतांत असणारे जे शब्दादि गुण ते शुद्ध होवोत. माझीं मन, वाणी व शरीर यांच्यायोगानें होणारीं कर्में शुद्ध होवोत. हे परमात्म्या, ज्यांचा अभिप्राय लोकामध्यें प्रकट केलेला नाहीं, अशा व्यर्थ कर्मांपासून तुझ्या प्रसादानें मी मुक्त व्हावें. माझें शरीर शुद्ध होवो; माझें अन्तःकरण शुद्ध होवो, माझा परमात्मा शुद्ध होवो. (परमात्मा जरी नित्यशुद्ध आहे तरी अविद्यादोषानें त्याचें प्रतिभान न होणें हीच अशुद्धि आहे आणि त्याचें स्वात्मत्वानें प्रतिभान होणें हीच त्याची शुद्धि आहे.) क्षुधेच्या अधिष्ठात्री देवतेला उद्देशून दिलेला हा हवि हुत असो.

क्षुधा व तृषा यांच्या देवतांना विशेष प्रकारें व्यापणाऱ्या ब्रह्माला, कचांना उत्पन्न करणाऱ्या परमात्म्याला व कार्य-प्रपंचावर उपकार करणाऱ्या परमेश्वराला उद्देशून दिलेला हा हवि सुहुत होवो. हे परमात्मन्, मी तुझ्या प्रसादानें क्षुत्पिपासारूप मल, लक्ष्मीची वडील बहीण अलक्ष्मी, अनैश्वर्य, धनधान्यादि समृद्धीचा अभाव ह्या सर्वांचा नाश करतों. तूं माझ्या पापाचा नाश कर आणि त्यासाठीं हें सुहुत असो हें सुहुत असो. वारुणी उपनिषदांत (रत्न ४ पृष्ठ ९३–९८ पहा) सांगितलेले पञ्च कोश व तद्रूप शरीरेन्द्रियें अधिक शुद्ध होवोत आणि त्यामुळें मी निष्पाप, रजोगुणरहित व स्वप्रकाशक व्हावें (६६).

---

आतां यापुढें वैश्वदेव कर्मांत ज्यांचा विनियोग केला आहे, अशा सहा होममंत्रांचें व्याख्यान करितात —

अग्नये स्वाहा । विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा ॥
ध्रुवाय भूमाय स्वाहा । ध्रुव क्षितये स्वाहा ॥
अच्युतक्षितये स्वाहा । अग्नये स्विष्टकृते स्वाहा ॥
धर्माय स्वाहा । अधर्माय स्वाहा ॥
अद्भ्यः स्वाहा । ओषधिवनस्पतिभ्यः स्वाहा ॥
रक्षोदेवजनेभ्यः स्वाहा । गृह्याभ्यः स्वाहा ॥
अवसानेभ्यः स्वाहा । अवसानपतिभ्यः स्वाहा ॥
सर्वभूतेभ्यः स्वाहा । कामाय स्वाहा ॥ अन्तरिक्षाय स्वाहा ।
यदेजति जगति यच्च चेष्टति नाम्नो भागो यन्नाम्ने स्वाहा ॥
पृथिव्यै स्वाहा । अन्तरिक्षाय स्वाहा ॥
दिवे स्वाहा । सूर्याय स्वाहा ॥ चन्द्रमसे स्वाहा ।
नक्षत्रेभ्यः स्वाहा ॥ इन्द्राय स्वाहा । बृहस्पतये स्वाहा ॥
प्रजापतये स्वाहा । ब्रह्मणे स्वाहा ॥
स्वधापितृभ्यः स्वाहा । नमो रुद्राय पशुपतये स्वाहा ॥
देवेभ्यः स्वाहा । पितृभ्यः स्वधास्तु ॥
भूतेभ्यो नमः । मनुष्येभ्यो हन्ता ॥

प्रजापतय स्वाहा । परमेष्ठिन स्वाहा ॥
यथा कूप शतधार सहस्रधारो अक्षित ।
एवा मे अस्तु धान्यं सहस्रधारमक्षितम् ॥ धनधान्यै स्वाहा।
ये भूता प्रचरन्ति दिवानक्त बलिमिच्छन्तो वितुदस्य प्रेष्या ॥
तेभ्यो बलिं पुष्टिकामो हरामि मयि पुष्टिं पुष्टिपतिर्दधातु स्वाहा ॥

अन्वय —( ' अग्नये स्वाहा परमेष्ठिन स्वाहा एथल्या भागाचा अन्वय सरळ आहे ) यथा कूप शतधार सहस्रधार अपि अक्षित एवा ( एव ) मे सहस्रधार अक्षित धान्य अस्तु । धनधान्यै स्वाहा ॥ ये वितुदस्य प्रेष्या भूता बलिं इच्छन्त सन्त दिवानक्त प्रचरन्ति तेभ्य अहं पुष्टिकाम भूमौ बलिं हरामि । पुष्टिपति मयि पुष्टिं दधातु ॥

अर्थ—अग्नि, विश्वेदेव व ध्रुव हे तीन प्रसिद्ध आहेत ज्याची स्थिति स्थिर असते तो ध्रुवस्थिति व ज्याची स्थिति च्युत होत नाहीं तो अच्युतस्थिति प्रमाद, आलस्य इत्यादिकांच्या योगानें दुरिष्ट म्ह० वाईट रीतीनें केलेलें यजन जो स्विष्ट करतो तो स्विष्टकृत या देवताना उद्देशून दिलेलें हें अन्नादि हवि सुहुत असो ( यापुढें बलिहरण कर्मामध्ये ज्याचा विनियोग केला आहे त्या मन्त्राचें व्याख्यान–) धर्माची देवता, अधर्माची देवता, जल-देवता, ओषधिवनस्पतींची देवता, राक्षस व देवाचे भृत्य, गृहात असणाऱ्या गृह्य कुलदेवता, गृहाच्या आसपास प्रदेशीं असलेल्या अवसाननावाच्या देवता, अवसानदेवताचे स्वामी, पचभर्ते, त्रैलोक्याला मोहित करणारा रति पति, अन्तरिक्षस्थ वायु, जगात जें वृक्षादि वस्तुजात वाय्वादि निमित्तानें कापतें व जें मनुष्यादि गमनागमनादिरूप चेष्टा करितें त सर्व ज्या परमात्म्याचा भक्षणीय भाग आहे, तो परमात्मा, पृथिवी, मध्यलोकाधिष्ठानभूत देवता, द्यौ, सूर्य, चन्द्रमा, नक्षत्र, इन्द्र, बृहस्पति, प्रजापति, ब्रह्मा, अग्निष्वात्तादि पितर, पशुपति, रुद्र, इन्द्रादि देव, पितर, मृतनावाचे विशेष देव, मनुष्यें, प्रजापति व परमेष्ठी या सर्वांना उद्देशून दिलेला हा हविर्भाग सुहुत असो. ( वरील मन्त्रात स्वधा, नम व हन्ता हे तीन शब्द पितर, रुद्र व मर्त्य,

आणि मनुष्य यांना उद्देशून अन्नभाग देतांना स्वाहाशब्दासारखे योजिले आहेत. ज्याप्रमाणें कूप ह्म० जलाशय शेंकडो व सहस्रावधि धारांनीं युक्त असला तरी ह्म० त्यांतील उदक किनीही जरी काढून घेतलें तरी क्षीण होत नाहीं त्याप्रमाणें परमात्म्याच्या प्रसादानें मला सहस्रधारांनीं युक्त पण अक्षय्य धान्य प्राप्त होवो. त्यासाठीं हें अन्न धनधानी देवतेला उद्देशून सुहुत असो. पापी प्राण्यांना पीडा देणाऱ्या भगवान् कालाग्निरुद्राचे भृत्य, असे जे भूत ( विशेष प्रकारचे ग्रह ) आहाराची इच्छा करीत अहोरात्र संचार करितात त्यांना उद्देशून पुष्टीची इच्छा करणारा मी हा बलि भूमीवर ठेवतों. पुष्टिपति भगवान् माझ्या ठिकाणीं पुष्टीची स्थापना करो. (६७)

---

केवळ जपानेंच पाप-क्षय व्हावा ह्मणून हा मंत्र—

ॐ तत्सत्यम् ॥ ॐ तद्ब्रह्म । ॐ तद्वायुः ॥ ॐ तदात्मा । ॐ तत्सर्वम् । ॐ तत्पुरोर्नमः । अन्तश्चरति भूतेषु गुहायां विश्वमूर्तिषु ॥ त्वं यज्ञस्त्वं वषट्कारस्त्वमिन्द्रस्त्वꣳरुद्रस्त्वं विष्णुस्त्वं ब्रह्म त्वं प्रजापतिः । त्वं तदाप आपो ज्योती रसोऽमृतं ब्रह्म भूर्भुवःसुवरोम् ६८

अन्वयः—तत् सत्यं, तत् ब्रह्म, तत् वायुः, तत् आत्मा, तत् सर्वं, तत् पुरः नमः अस्तु । विश्वमूर्तिषु भूतेषु गुहायां अन्तश्चरति । हे भगवन्, त्वं यज्ञः, त्वं वषट्कारः, त्वं इन्द्रः, त्वं रुद्रः, त्वं विष्णुः, त्वं ब्रह्म, त्वं प्रजापतिः, त्व तत् आपः, त्वं एव आपः, त्वं एव ज्योतिः, त्वं एव रसः, त्वं अमृतं, त्वं ब्रह्म, त्वं भूः, भुवः, सुवः, त्वं ओम् ॥

अर्थ— ॐ हेंच तें अबाधित तत्त्व आहे. ओम्-च फार मोठें ब्रह्म आहे. तेंच वायु, तेंच जीव, किंबहुना तेंच सर्व चराचर जगत् आहे. तेंच विस्तीर्ण ब्रह्माण्डाचें कारण आहे. अशा प्रकारचें जें ब्रह्म तें नानाविध प्राणि-शरीरातील हृदयपुण्डरीकांत राहतें. ( याप्रमाणें परोक्षरीतीनें परमात्म्याचें सर्वात्मकत्व सांगून आतां अपरोक्ष रीतीनें तें दाखवितात. हे भगवन्, तूं यज्ञ ह्म० नानाविध क्रतुरूप आहेस. तूंच वषट्कार ह्म० देवान्न देतांना

उच्चारावयाचा शब्द आहेस. तूंच इन्द्र, रुद्र, विष्णु व ब्रह्मरूप आहेस. तूंच प्रजापति (विराट्) आहेस. तूंच तें ब्रह्माण्ड, नद्यादिकांतील जल, समुद्रांतील जल, सूर्यादि ज्योति, मधुरादि रस, अमृत, वेदराशि, भूर्भुवःसुवःसंज्ञक त्रैलोक्य व तूंच ओंकार आहेस. ( ६८ )

---

*आतां प्राणाहुती, पूर्व जलप्राशन व उत्तर जलप्राशन याचे मंत्र सांगतात—*

श्रद्धायां प्राणे निविष्टोऽमृतं जुहोमि ।
श्रद्धायामपाने निविष्टोऽमृतं जुहोमि ॥
श्रद्धायां व्याने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
श्रद्धायामुदाने निविष्टोऽमृतं जुहोमि ॥
श्रद्धायाः समाने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
ब्रह्मणि म आत्माऽमृतत्वाय ॥ अमृतोपस्तरणमसि ।
श्रद्धायां प्राणे निविष्टोऽमृतं जुहोमि ॥
शिवो मा विशाप्रदाहाय । प्राणाय स्वाहा ॥
श्रद्धायामपाने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
शिवो मा विशाप्रदाहाय । अपानाय स्वाहा
श्रद्धायां व्याने निविष्टोऽमृतं जुहोमि ॥
शिवो मा विशाप्रदाहाय । व्यानाय स्वाहा ॥
श्रद्धायामुदाने निविष्टोऽमृतं जुहोमि ।
शिवो मा विशाप्रदाहाय ॥ उदानाय स्वाहा ।
श्रद्धायाः समाने निविष्टोऽमृतं जुहोमि ॥
शिवो मा विशाप्रदाहाय । समानाय स्वाहा ॥
ब्रह्मणि म आत्माऽमृतत्वाय । अमृतापिधानमसि ॥ ६९ ॥

अन्वयः—श्रद्धया प्रत्ता प्राणे निविष्टः अमृतं जुहोमि ६० ॥ एताभिः पञ्चभिः आहुतिभिः अमृतत्वाय मे आत्मा ब्रह्मणि एकः भवतु ॥ हे जल, त्वं अमृतं प्राणदेवतायाः उपस्तरणं असि । श्रद्धया प्राणे निविष्टः अमृतं जुहोमि । हे हूयमान-द्रव्यविशेष, त्वं शिवः भूत्वा मां अप्रदाहाय विश । प्राणाय स्वाहा । ६० ॥

अर्थ—वैदिक कर्माविषयीं जो अतिशय विश्वास तीच श्रद्धा होय. ती निष्पन्न झाली असतां शरीरांतील पांच वायूंतील पहिला जो प्राण-नामक वायु त्यांत आदरयुक्त झालेला मी हें गोड हविष् टाकतों. त्याचप्रमाणें अपान, व्यान, उदान व समान यांतही हे मिष्टान्न होमितों. या पांच आहुतींच्या योगानें मोक्षासाठीं माझा जीव परमात्म्यामध्यें एकरूप होवो. (आतां भोजनाच्या आरंभीं जलप्राशनाचा मंत्र सांगतात.– ) हे जळा, तूं प्राणदेवतेचें विनाशरहित उपस्तरण ह्म० अंथरुण आहेस. ( आतां प्राणाहुतीविषयींच विकल्पित मंत्र सांगतात. ) श्रद्धा उत्पन्न झाली असतां आदरयुक्त असा मी प्राणाचे ठिकाणीं या अमृतासारख्या अन्नाचें हवन करितों. हे होम केल्या जाणाऱ्या अन्ना, तूं शान्त होऊन क्षुधाजनित दाहाचें शमन करण्यासाठीं मजमध्यें प्रवेश कर. प्राणाला उद्देशून दिलेलें हें द्रव्य सुहुत असो ( पुढील सर्व पर्यायांतही असाच अर्थ जाणावा. भोजनोत्तर जलप्राशनाचा मंत्र. ) हे जळा, तूं अविनाशी आच्छादन आहेस. ( ६९ )

---

आतां खाल्लेल्या अन्नाचें अभिमंत्रण करण्याचा मंत्र—

**श्रद्धायां प्राणे निविश्यामृतꣳहुतम् । प्राणमन्नेनाप्यायस्व॥ श्रद्धायामपाने निविश्यामृतꣳहुतम् । अपानमन्नेनाप्यायस्व॥ श्रद्धायां व्याने निविश्यामृतꣳहुतम् । व्यानमन्नेनाप्यायस्व॥ श्रद्धायामुदाने निविश्यामृतꣳहुतम् । उदानमन्नेनाप्यायस्व॥ श्रद्धायाꣳ समाने निविश्यामृतꣳहुतम् । समानमन्नेनाप्यायस्व ॥ ७० ॥**

अन्वयः—श्रद्धायां सत्यां प्राणे निविश्य अमृतं हुतं । प्राणं अन्नेन आप्यायस्व । एवमेव अग्रे ॥

अर्थ—श्रद्धा उत्पन्न झाली असतां प्राणामध्यें प्रवेश करून ह्म० अतिशय आदरपूर्वक हें मधुर अन्न मीं होमिलें आहे. हे प्राणाभिमानिनि देवि, तूं मुख-नासिकेंतून संचार करणाऱ्या वायूस या हुतान्नानें वाढीव.

त्याचप्रमाणें श्रद्धेनतर आपानामध्यें मोठ्या आदरानें हें अन्न होमिलें आहे हें अपानाभिमानिनि देवि, या अन्नानें अपानवायु वाढीव. व्यान, उदान व समान यांविषयींही असेंच समजावें (७०)

---

क्षुधा, तृषा इत्यादिकांच्या योगानें उत्पन्न झालेला जो चित्त विक्षेप त्याची शान्ति अन्न व जल यांच्या योगानें करून भोक्ता जो जीव त्याच्या परमेश्वरस्वरूपानुसधानाचें निमित्त होणारा मन्त्र दाखवितात –-

अङ्गुष्ठमात्र पुरुषोऽङ्गुष्ठ च समाश्रित ।
ईश सर्वस्य जगत प्रभु प्रीणाति विश्वभुक् ॥ ७१ ॥

अन्वय –-अङ्गुष्ठमात्र पुरुष अङ्गुष्ठ च समाश्रित अस्ति । स सर्वस्य जगत ईश, विश्वभुक्, प्रभु प्रीणाति ॥

अर्थ—हृदयस्थ आकाश ज्याच्या त्याच्या अङ्गुष्ठप्रमाण असतें त्यातील बुद्धिही तेवढीच असते तिच्या योगान अवच्छिन्न झालेला जीव रूप पुरुषही स्वाङ्गुष्ठप्रमाण असतो तो ज्ञान क्रियाशक्तीनें अङ्गुष्ठाचा आश्रय करून राहिला आहे ('अङ्गुष्ठ च' येथील चकारानें मस्तकाचा आश्रय करून राहिला आहे असाही अर्थ निष्पन्न होतो अर्थात् ता आपाद मस्तकव्यापी आहे) तो आपल्या वास्तवरूपानें सर्व जगाचा नियन्ता व त्या मुळेंच सर्व जगाचा भोग घेणारा आहे तशा प्रकारचा तो ईश्वर या भोज नाने सन्तुष्ट होवो (७१)

---

याप्रमाणें भोजनोत्तर परमेश्वरानुसन्धानाचें प्रतिपादन करणारा मन्त्र सागून भोक्त्याच्या सर्व अङ्गाच्या स्वस्थतेचें प्रतिपादन करणारा मन्त्र अनुभवपूर्वक पढतात—

वाङ्म आसन् । नसो प्राण ॥ अक्ष्याश्चक्षु ।
कर्णयो श्रोत्रम् ॥ बाहुवोर्बलम् । ऊरुवोरोज ॥
अरिष्टा विश्वान्यङ्गानि तनू ।
तनुवा मे सह नमस्ते अस्तु मा मा हिंसी ॥ ७२ ॥

अन्वयः—हे भगवन्, मे वाक् आस्ये, प्राणः नसोः, चक्षुः अक्ष्योः, श्रोत्रं कर्णयोः बलं बाहुवोः (बाह्वोः), ओजः ऊर्वोः अभूत्। विश्वानि मम अङ्गानि अरिष्टा अभूवन्। मे तनुवा सह तनूः स्वस्थीभवति स्म। भो भगवन्, ते नमः अस्तु। मां मा हिंसीः ॥

अर्थ—हे भगवन्, षड्रस अन्न आकण्ठ खाऊन तृप्त झालेल्या माझी वाणी तोंडांत, प्राण दोन्ही नासिकांमध्यें, चक्षुरिन्द्रियाची शक्ति दोन्ही नेत्रांमध्यें व श्रोत्रेन्द्रिय दोन्ही कर्णांमध्यें स्वास्थ्ययुक्त झालीं आहेत. (भोजनाच्या पूर्वीं क्षुधेमुळें तीं सर्व व्याकूळ झालीं होतीं ). त्यामुळें माझ्या दोन्ही बाहूंमध्यें बल आलें आहे. मांड्यांमध्यें गमनागमनाचें सामर्थ्य आलें आहे फार काय पण माझीं सर्व अंगें स्वस्थ झालीं आहेत. सारांश, माझ्या लिङ्गशरीरासह हें स्थूल शरीर स्वस्थ झालें आहे. ह्मणूनच, हे भगवन्, तुझ्या कृपेनें मिष्टान्नाच्या योगानें मी ज्या अर्थी तृप्त झालों आहें त्या अर्थी माझा तुला नमस्कार असो. याप्रमाणें प्रत्यहीं सर्व कुटुंबासह माझी तृप्ति करून व सर्वांगस्वास्थ्य करून मरणापर्यंत मला पीडा देऊं नकोस; तर सुख दे. (ब्राह्मणांनीं भोजनानंतर प्रत्यहीं परमेश्वराच्या उपकाराचें स्मरण करण्यासाठीं हा मंत्र अर्थानुसन्धानपूर्वक ह्मणावा. असें याचें तात्पर्य. ७२ )

---

याप्रमाणें सर्वांग स्वास्थ्य सांगून सर्व पापाचा क्षय व उत्तरोत्तर धनप्राप्ति हीं दोन फलें देणारा इन्द्र-सप्तर्षि-संवादरूप जप्य मंत्र सांगतात—

वयः सुपर्णा उपसेदुरिन्द्रं प्रियमेधा ऋषयो नाधमानाः।
अपध्वान्तमूर्णुहि पूर्धि चक्षुर्मुमुग्ध्यस्मान्निधयेऽवबद्धान् ॥७३॥

अन्वयः—नाधमानाः प्रियमेधाः सुपर्णाः वयः ऋषयः कदाचित् अपध्वान्तं इन्द्रं उपसेदुः। उपेत्य च एवं ऊचिरे। हे भगवन्, अस्मान् ऊर्णुहि। अस्माकं चक्षुः पूर्धि। अस्मान् सर्वेभ्यः पापेभ्यः मुमुग्धि। अस्मान् निधये अवबद्धान् कुरु ॥

अर्थ—कांहीं तरी याचना करण्याची इच्छा करणारे, सर्व प्राण्यांचें प्रिय करण्याची ज्यांची बुद्धि आहे आणि सुन्दर पंखांनीं युक्त असलेल्या

पक्ष्याप्रमाणें जे शीघ्र गमन करणारे आहेत, असे सप्तर्षि एकदा ज्याच्या हृदयातील अज्ञान अन्धकार नाहींसा झाला आहे, अशा इन्द्रापाशीं गेले आणि ह्मणाले 'हे भगवन् इन्द्र, आह्मांला दिव्य वस्त्र देऊन आच्छादित कर उत्तम सौन्दर्यादियुक्त पदार्थ दाखवून व देऊन आमचे नेत्र पूर्ण कर (आमच्या नेत्रांची पूर्ति कर.) आह्मांला सर्व पापापासून सोडीव. शिवाय आह्मांला निधींकरितां आसक्त कर. ह्मणजे अनेक प्रकारचें धन व रत्नें, यांच्या निधींनीं युक्त कर' (याप्रमाणें ऋषींनीं ज्याच्यापाशीं याचना केली आहे, अशा इन्द्रानें त्यांचे मनोरथ पूर्ण केले आणि त्यामुळे सुखित झालेले ऋषी भूलोकीं येऊन आपल्या आश्रमांत राहिले. ७३).

---

या मंत्राच्या जपानंतर हृदयाला हात लावून पुढील मंत्राचा जप करावा—

**प्राणाना ग्रन्थिरसि रुद्रो मा विशान्तक ।**
**तेनान्नेनाऽऽप्यायस्व ॥ ७४ ॥**

**अन्वय**—हे अहङ्कार, त्वं प्राणानां ग्रन्थिः असि । त्वं रुद्रः, अन्तकः भूत्वा मा विश । तेन अन्नेन आप्यायस्व ॥

**अर्थ**—हे हृदयवर्ति अहंकारा, तूं वायुरूप व इन्द्रियरूप प्राणांची ग्रन्थि आहेस ह्मणजे एकमेकांचा विश्लेष न व्हावा ह्मणून त्यांस एकमेकांत गुंतवून ठेवणारा आहेस अशा प्रकारचा तू रुद्र दुःखाचा विनाशक होऊन माझ्या शरीरांत प्रविष्ट हो आणि मीं खाल्लेल्या अन्नानें मला वाढीव. (७४)

---

याप्रमाणें हृदयाभिमंत्रण सांगून यावज्जीव मृत्यूचा परिहार व्हावा ह्मणून देवताप्रीणनरूप मंत्र सांगतात—

**नमो रुद्राय विष्णवे मृत्युर्मे पाहि ॥ ७५ ॥**

**अन्वय**—रुद्राय नमः अस्तु । विष्णवे नमः अस्तु । हे रुद्र, हे विष्णो, त्वं च त्वं च मृत्यु (मृत्योः) मे पाहि ॥

अर्थी सत्य हा सन्मार्गवर्ती ऋष्यादिकांचा धर्म आहे त्या अर्थी ('सतामिदं सत्यं' या व्युत्पत्तीचा आश्रय करून) सत्यवादित्व हेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें ह्मणून कित्येक महात्मे सत्यामध्यें रत असतात.

आतां दुसरें मत सांगतात--

**तप इति तपो नानशनात्परं यद्धि परं तपस्तद्दुर्धर्षं तद्दुराधर्षं तस्मात्तपसि रमन्ते ॥**

अन्वयः--तपः परं मोक्षसाधनं इति केषांचित् मतं । अनशनात् परं तपः न विद्यते । यत् हि परं तपः तत् दुर्धर्षं । अत एव तत् आ दुर्धर्षं । तस्मात् तपसि रमन्ते ॥

अर्थ--तप हें परम मोक्ष-साधन आहे, असें कित्येकांचें मत आहे. तीर्थयात्रा, जप, होम इत्यादि तपाचे अनेक प्रकार आहेत. तथापि त्या सर्वांमध्यें उपवास, एकभुक्त इत्यादिकांच्या योगानें भोजनाचा त्याग करणें याहून उत्कृष्ट तप नाहीं. कारण भोजनत्यागरूप जें कृच्छ्र-चान्द्रायणादिक परम तप आहे तें दुर्धर्ष ह्म० सहन करण्यास अशक्य आणि त्यामुळेंच सर्व प्राण्यांना सर्व प्रकारें सहन करतां येणें अशक्य आहे. ह्मणून कांहीं थोडेच श्रद्धाळू पुरुष कृच्छ्र-चान्द्रायणादि तपामध्यें रममाण होतात.

तिसरें मत सांगतात--

**दम इति नियतं ब्रह्मचारिणस्तस्माद्दमे रमन्ते ॥**

अन्वयः--दमः परं साधनं इति ब्रह्मचारिणः नियतं वदन्ति । तस्मात् दमे रमन्ते ॥

अर्थ--वाणी व चक्षुरादि बाह्य इन्द्रियें यांना निषिद्ध विषयांपासून निवृत्त करणें हाच दम होय, आणि तेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें नैष्ठिक ब्रह्मचारी सर्वदा ह्मणतात. त्यामुळें दमामध्यें रममाण होतात.

आतां चवथें मत--

***शम इत्यरण्ये मुनयस्तस्माच्छमे रमन्ते ॥***

अन्वयः--शमः एव मोक्ष-हेतुः इति अरण्ये वर्तमानाः मुनयः मन्यन्ते । तस्मात् ते शमे रमन्ते ॥

अर्थ—अन्त.करणानें क्रोधादि दोषांनीं रहित असणें हाच शम होय. तोच मोक्षाचा उत्तम हेतु आहे, असें अरण्यांत राहणारे मुनि–वानप्रस्थ–समजतात. त्यामुळें ते शमामध्यें रत होतात. पांचवें मत—

**दानमिति सर्वाणि भूतानि प्रशंसन्ति दानान्नातिदुश्चरं तस्माद्दाने रमन्ते ॥**

अन्वयः—दानं एव उत्तमं मोक्षसाधनं इति सर्वे प्राणिनः प्रशंसन्ति । दानात् अतिदुश्चरं न अस्ति तस्मात् दाने रमन्ते ॥

अर्थ—गाय, भूमि, सुवर्ण इत्यादि स्वकीय पदार्थांना शास्त्रोक्त मार्गानें दुसऱ्याचें करणें, हें दान होय. तेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें ह्मणून सर्व प्राणी दानाची प्रशंसा करितात. धनदानाहून दुष्कर कर्म कोणतेंही नाहीं. त्यामुळें त्याच्या रक्षणासाठींच पुष्कळ लोक प्राणांचा त्यागही करितात, असें आढळतें. यास्तव दाते पुरुष दानामध्यें रममाण होतात. सहावें मत—

**धर्म इति धर्मेण सर्वमिदं परिगृहीतं धर्मान्नातिदुष्करं तस्माद्धर्मे रमन्ते ॥**

अन्वयः—धर्मः उत्तमः मोक्षहेतुः इति प्रभवः मन्यन्ते । धर्मेण सर्वं इदं जगत् परिगृहीतं । धर्मात् अति दुष्करं नास्ति ॥

अर्थ—स्मृत्या व पुराणें यांनीं ज्यांचें प्रतिपादन केलें आहे अशा वापी-कूप तडागादिकांना निर्माण करणें, हाच धर्म येथें विवक्षित आहे. तो धर्मच उत्तम मोक्ष हेतु आहे, असें समर्थ लोक मानतात. तडागादिरूप धर्मानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे. कारण तडागादिकांत स्नान, जलपान इत्यादि करून मनुष्य-पश्वादि सर्व प्राणी सन्तुष्ट होतात; तसल्या धर्माहून अधिक दुष्कर असें कांहीं नाहीं. त्यामुळें श्रीमान् लोक तसल्या धर्मामध्यें रत होतात. सातवें मत.—

**प्रजन इति भूयांसस्तस्माद्भूयिष्ठाः प्रजायन्ते तस्माद्भूयिष्ठाः प्रजनने रमन्ते ॥**

अन्वय—प्रजन. उत्तमसाधनमेव भूयांसः मन्यन्ते । तस्मात् भूयिष्ठाः प्रजायन्ते । तस्मात् भूयिष्ठाः प्रजनने रमन्ते ॥

अर्थ-अपत्योत्पादन हेंच मोठें साधन आहे, असं पुष्कळ लोक मानितात. ( कारण धनिक, दरिद्री, शिष्ट, अशिष्ट इत्यादि सर्वही पुत्रोत्पादनाविषयीं अतिशय आदर दाखवितात ) त्यामुळें एकेका पुरुषापासून पुष्कळ अपत्यें उत्पन्न होतात. ह्मणूनच प्रायः सर्व प्राणी प्रजोत्पादनामध्यें रममाण होतात. आठवें मत.--

अग्नय इत्याह तस्मादग्नय आधातव्याः ।

अन्वयः--गार्हपत्यादयः अग्नयः उत्तमाः मुक्तिहेतवः इति कश्चित् आह । तस्मात् गृहस्थैः अग्नयः आधातव्याः ॥

अर्थ--गार्हपत्यादि अग्नीच मोक्ष हेतू आहेत, असें कोणी वेदार्थपरायण पुरुष ह्मणतो. त्यामुळें गृहस्थांनीं अग्नींचें आधान करावें. नवव मत--

अग्निहोत्रमित्याह तस्मादग्निहोत्रे रमन्त ॥

अन्वय --अग्निहोत्रं उत्तमं मोक्षसाधनं इत्यपरः कश्चित् आह । तस्मात् केचित् अग्निहोत्रे रमन्ते ॥

अर्थ--आहिताग्नींत सायंप्रातर्होम करणें हेंच अग्निहोत्र होय. तेंच मोक्षाचें उत्तम साधन आहे, असें दुसरा कोणी वेदार्थपरायण पुरुष ह्मणतो. त्यामुळें कित्येक अग्निहोत्रामध्यें रममाण होतात दहावें मत--

यज्ञ इति यज्ञो हि देवास्तस्माद्यज्ञे रमन्ते ॥

अन्वयः--यज्ञः उत्तमः मोक्षहेतुः इति अपरे मन्यन्ते । हि यज्ञः देवाः तस्मात् यज्ञे रमन्ते ॥

अर्थ--दर्श-पूर्णमास, ज्योतिष्टोमादि यज्ञ हेंच उत्तम मोक्षसाधन आहे, असें दुसरे कित्येक वेदार्थपरायण लोक ह्मणतात. कारण यज्ञानेंच पूर्वोक्त इन्द्रादि देव स्वर्गाला गेले आहेत. त्यामुळेंच अद्यापि कित्येक वैदिक पूर्वोक्त यज्ञामध्यें आसक्त होतात. अकरावें मत--

मानसमिति विद्वांसस्तस्माद्विद्वांस एव मानसे रमन्ते ॥

अन्वय --मानसं एव उत्तमं मोक्षसाधनं इति विद्वांसः मन्यन्ते । तस्मात् विद्वांसः मानसे एव रमन्ते ॥

*अर्थ*—मानस उपासन हच उत्तम साधन आहे, असें कित्येक सगुण ब्रह्मोपासक ह्मणतात त्यामुळेंच कित्येक उपासनेचें तात्पर्य जाणणारे वैदिक मानस उपासनेंतच रममाण होतात वाराचें मत—

**न्यास इति ब्रह्मा ब्रह्मा हि पर परो हि ब्रह्मा तानि वा एतान्यवराणि परा˜सि न्यास एवात्यरेचयद्य एव वेदेत्युपनिषत्॥७८**

*अन्वय*—न्यास एव उत्तम मोक्षहेतु इति ब्रह्मा मन्यते। स च ब्रह्मा पर हि। पर हि ब्रह्मा। तानि वा एतानि परासि तथापि सन्यास अपेक्ष्य अवराणि। स यास एव अत्यरेचयत्। य एव वेद तस्य पूर्वोक्ता उपनिषत् भवति॥

*अर्थ*—कर्मकाण्डोक्त अग्निहोत्रादि कर्मांचा आरुणि, जाबाल इत्यादि उपनिषदांत सांगितलेल्या प्रकारानें त्याग करणें हाच उत्तम मोक्षहेतु आहे, असें हिरण्यगर्भ मानतो तो ब्रह्मा परमात्मरूप आहे. तो जरी देहधारी असला तरी परमात्माच आहे त्यामुळें त्याला ब्रह्मा असें ह्मणता येतें. वर सांगितलेलीं जीं सत्यादि तपें तीं जरी श्रेष्ठ असलीं तरी सन्यासाच्या अपेक्षेनें निकृष्टच आहेत एका सन्यासानेंच त्या सर्वांचें उल्लघन केलें आहे तस्मात् जो पुरुष पूर्वोक्त प्रकारानें सन्यास इतर सर्व साधनाहून उत्तम आहे, असें जाणतो तो या रहस्यभूत विद्येला प्राप्त होतो (७८)

---

आता पूर्वोक्त मोक्षसाधन-समूहाचें उपपादन करण्याराठी आख्यायिका सागतात—

**प्राजापत्यो हारुणि सुपर्णेय प्रजापतिं पितरमुपससार किं भगवन्त परम वदन्तीति तस्मै प्रोवाच॥**

*अन्वय*—प्राजापत्य, आरुणि, सुपर्णेय, प्रजापतिं पितर उपससार ह। हे प्रजापते, भगवन्त किं साधन परम वदन्ति इति पप्रच्छ च। तत प्रजापति. तस्मै प्रोवाच॥

*अर्थ*—सुपर्णापासून झालेला आरुणिनावाचा प्रजापतीचा पुत्र आपल्या प्रजापतिनावाच्या पित्यापाशीं जाऊन, 'हे प्रजापते, पूज्य महर्षी मोक्ष साध-

नातील कोणत्या साधनाला उत्कृष्ट ह्मणतात,' असें विचारूं लागला. तेव्हां प्रजापति त्याला असें ह्मणाला.—

**सत्येन वायुरावाति सत्येनादित्यो रोचते दिवि सत्यं वाचः प्रतिष्ठा सत्ये सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्सत्यं परम वदन्ति ॥**

अन्वयः—वायुः सत्येन आ वाति । तथा आदित्यः सत्येन दिवि रोचते । सत्यं वाचः प्रतिष्ठा । सत्ये सर्वं प्रतिष्ठितं तस्मात् सत्यं परमं वदन्ति ॥

अर्थ—साम्प्रतकाळीं अन्तरिक्षांत वाहणारा जो हा वायु तो पूर्व जन्मीं मनुष्य असून त्यानें सत्यत्वाचें परिपालन केलें होतें. त्या सत्यत्वामुळेंच तो आता वायुदेवतात्वास प्राप्त होऊन लोकानुग्रहार्थ अन्तरिक्षांत वाहत आहे. त्याचप्रमाणें आदित्यही पूर्वजन्मीं अनुष्ठिलेल्या सत्याच्या योगानें द्युलोकांत प्रकाशमान होत असतो. हें सत्य वागिन्द्रियाची प्रतिष्ठा ह्म० स्थिर स्थान आहे. वाणी अनृत भाषण जरी बोलली तरी इतर लोक तिचें निराकरण करतात. ह्मणून अनृत वाणीची प्रतिष्ठा नव्हे. त्यामुळेंच सत्य भाषणांत सर्व प्रामाणिक व्यवहार प्रतिष्ठित झाला आहे त्यामुळें कित्येक सत्य हेंच परम साधन आहे, असें सांगतात.

पण प्रजापतीचें हें वचन ऐकून आरुणीला सन्तोष झाल्याचें कांहीं चिह्न दिसलें नाहीं. ह्मणून प्रजापति दुसरें साधन सांगू लागला.—

**तपसा देवा देवतामग्र आयन् तपस ऋषयः सुवरन्वविन्दन् तपसा सपत्नान् प्रणुदामारातीस्तपसि सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्तपः परमं वदन्ति ॥**

अन्वय—देवाः अग्रे तपसा देवता आयन् । तथा ऋषय. तपसा सुवर् अन्वविन्दन् वय अपि तपसा सपत्नान् अरातीः प्रणुदाम । सर्वं तपसि प्रतिष्ठितं तस्मात् तप परमं वदन्ति ॥

अर्थ—स्वर्गांत असणारे अग्नि, इन्द्र इत्यादि देव पूर्व जन्मीं केलेल्या अनत्यागरूप कृच्छ्र-चान्द्रायणादि तपाच्या योगानें देवताभावास प्राप्त झाले आहेत. तसेच वसिष्ठादि महर्षी पूर्वजन्मीं केलेल्या तपानें स्वर्गलोकास क्रमानें

प्राप्त झाले त्याचप्रमाणें आल्हीही आता अभिचाररूप तपानें आपल्या शत्रूचें व० आमच्या द्रव्य लाभाला प्रतिबन्ध करणाऱ्या पुरुषाचें निराकरण करतो दुसराही सर्व कल्याण तपामध्य प्रतिष्ठित आहे तस्मात् अनशनरूप तप हच परम मोक्ष साधन आहे असें ह्मणतात

दमेन दान्ताः किल्बिषमवधून्वन्ति दमेन ब्रह्मचारिणः सुवर-न्वगच्छन् दमो भूतानां दुराधर्षं दमे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दमं परमं वदन्ति ॥

अन्वय —दान्ता दमेन किल्बिषं अवधून्वन्ति । ब्रह्मचारिणः दमेन सुवर् अन्वगच्छन् । दमः भूतानां दुराधर्षं । दमे सर्वं प्रतिष्ठितं । तस्मात् दमं परमं वदन्ति ॥

अर्थ—बाह्येन्द्रियदमनयुक्त पुरुष या दमानं आपल्या पापाचा नाश करितात नैष्ठिक ब्रह्मचारी दमानं स्वर्गाला गेले आहेत दम प्राण्यांना सर्वदा असह्य आहे त्या दमामध्य सर्व अपेक्षित प्रतिष्ठित असत यास्तव दम हं श्रेष्ठ मुक्तिसाधन आहे, असें कित्येक लोक ह्मणतात ( या सर्व साधन-पर्यायांतील पूर्व पूर्व साधन ऐकून आरुणीनें समाधान न झाल्यामुळें प्रजापतीनं पुढचें पुढचें साधन सांगितलें आहे, असं समजावं )

शमेन शान्ताः शिवमाचरन्ति शमेन नाकं मुनयोऽन्ववि-न्दञ्छमो भूतानां दुराधर्षं शमे सर्वं प्रतिष्ठितं तस्माच्छमं परमं वदन्ति॥

अन्वय —शान्ता शमेन शिवं आचरन्ति । मुनयः शमेन नाकं अन्वविन्दन् । शमः भूतानां दुराधर्षं । शमे सर्वं प्रतिष्ठितं । तस्मात् शमं परमं वदन्ति ॥

अर्थ—रागादिरहित पुरुष शमानं मंगल पुरुषार्थांचें आचरण करि-तात नारदादि मुनी शमानेच स्वर्गास प्राप्त झाले आहेत शम सर्व भूतांना असह्य आहे, शमामध्यें सर्व प्रतिष्ठित आहे, ह्मणून शमाला परम साधन ह्मणतात.

दानं यज्ञानां वरूथं दक्षिणा लोके दातारं सर्वभूतान्युपजी-वन्ति दानेनारातीरपानुदन्त दानेन द्विषन्तो मित्रा भवन्ति दाने सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दानं परमं वदन्ति ॥

अन्वयः—दानं यज्ञानां दक्षिणा तस्मात् बलस्थं लोके सर्वभूतानि दातारं उपजीवन्ति । दानेन अरातीः अपानुदन्त । दानेन द्विषन्तः मित्रा भवन्ति । दाने सर्वं प्रतिष्ठितं तस्मात् दानं परमं वदन्ति ॥

अर्थ—गो हिरण्यादिदान ही यज्ञ-संबंधी दक्षिणा आहे. ह्मणून दान श्रेष्ठ आहे. व्यवहारांत दात्या पुरुषाच्या आश्रयानें ज्ञानी व अज्ञानी, असे सर्व उपजीविका करतात. त्याचप्रमाणें धनदानानें राजे आपल्या शत्रूचें निराकरण करतात. प्रबल शत्रूही धनदानानें संतुष्ट होऊन मित्र बनतात.

**धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति धर्मेण पापमपनुदति धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदन्ति ॥**

अन्वयः—धर्मः विश्वस्य जगतः प्रतिष्ठा । लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति । धर्मेण पापं अपनुदति । धर्मे सर्वं प्रतिष्ठितं । तस्मात् धर्मं परमं वदन्ति ॥

अर्थ—पूर्वोक्त धर्म सर्व प्राण्यांचा आश्रय आहे. लौकिकांत सर्व जन धर्माचरण करणाऱ्या पुरुषापाशीं धर्माधर्मनिर्णयार्थ जातात. प्रायश्चित्तरूप धर्माच्या योगानें लोक पापाचा विनाश करतात. धर्मामध्ये सर्व प्रतिष्ठित आहे, ह्मणून धर्म परम साधन आहे, असें ह्मणतात.

**प्रजननं वै प्रतिष्ठा लोके साधु प्रजायास्तन्तुं तन्वानः पितॄणामनृणो भवति तदेव तस्या अनृणं तस्मात्प्रजननं परमं वदन्ति ॥**

अन्वयः—लोके प्रजननं प्रतिष्ठा । प्रजायाः तन्तुं साधु तन्वानः पितृणां (पितॄणां) अनृणो भवति । तदेव तस्याः (तस्य) अनृणं । तस्मात् प्रजननं परमं वदन्ति ॥

अर्थ—पुत्रोत्पादन ही गृहस्थांची प्रतिष्ठा आहे. कारण ( रत्न १ पृष्ठ १९१ येथें सांगितल्याप्रमाणें) पुत्र स्त्रियेच्या प्रतिनिधि होतो. पुत्र-पौत्रादिरूप प्रजेची परंपरा शास्त्रीय मार्गानें अविच्छिन्न ठेवणारा पुरुष मृत पितरांच्या ऋणांतून मुक्त होतो. पुत्रोत्पादन हेंच पुत्रजनाचें ऋण फेडून टाकण्याचें साधन आहे. ह्मणून प्रजनन हें श्रेष्ठ साधन आहे, असें ह्मणतात.

**अग्नयो वै त्रयी विद्या देवयानः पन्था गार्हपत्य ऋक्पृथिवी रथन्तरमन्वाहार्यपचनं यजुरन्तरिक्षं वामदेव्यमाहवनीयः साम सुवर्गो लोको बृहत्तस्मादग्नीन् परमं वदन्ति ॥**

अन्वय —अमय त्रयी विद्या देवयान पन्था । गार्हपत्यः अग्नि ऋक्, पृथ्वी, रथन्तर इति प्रशस्यत अन्वाहार्यपचन यजु, अन्तरिक्ष, वामदेव्य आहु । आहवनीय साम, सुवर्ग लोक वृहत् । तस्मात् अग्नीन् परम वदन्ति ॥

अर्थ—गार्हपत्य, दक्षिण व आहवनीय हे तीन अग्नी ही वेदत्रयात्मक विद्या आहे व तोच देवयान मार्ग आहे. ( ह्म० यागाच्या द्वारा देवत्व प्राप्त करून देणारा मार्ग आहे ) त्या अग्नींतील पहिला गार्हपत्य अग्नि ऋग्वेदरूप, पृथ्वीरूप व रथन्तर सामात्मक आहे, असें ह्मणून त्याची प्रशंसा करितात. अन्वाहार्यपचन या नावाचा दक्षिणाग्नि यजुर्वेद, अन्तरिक्ष लोक व वामदेवनावाचे साम एतद्रूप आहे आहवनीय अग्नि सामवेद, स्वर्गलोक व बृहद्रथन्तर साम एतद्रूप आहे. ह्मणून हे तीन अग्नी हेंच परम साधन आहे, असें ह्मणतात

**अग्निहोत्रꣳ सायं प्रातर्गृहाणां निष्कृतिः स्विष्टꣳ सुहुतं यज्ञक्रतूनां प्रायणꣳ सुवर्गस्य लोकस्य ज्योतिस्तस्मादग्निहोत्रं परमं वदन्ति ॥**

अन्वय —सायंप्रात अग्निहोत्र गृहाणां निष्कृति । अग्निहोत्र स्विष्ट सुहुत । यज्ञक्रतूनां प्रायण । सुवर्गस्य लोकस्य ज्योति । तस्मात् अग्निहोत्र परम वदन्ति ॥

अर्थ—सायंकाळीं व प्रातःकाळीं अनुष्ठिलें अग्निहोत्र हींच गृहाची निष्कृति आहे ह्मणजे तें गृहाना विकृत घण्याचें साधन आहे. ( कारण अग्निहोत्राच्या अभावीं क्षुधित अग्नि गहाना जाळतो ) अग्निहोत्र सुन्दर यागरूप व होमरूप आहे. ( देवताना उद्देशून द्रव्यत्याग करणें हा याग व त्या द्रव्याला अग्नीमध्ये टाकणे हा होम होय. ) तसेंच अग्निहोत्र हा यज्ञ–क्रतूचा प्रारम्भ आहे ( अग्न्याधेय, अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, आग्रयण, चातुर्मास्य, निरूढ पशुबन्ध व सौत्रामणि हे सात हविर्यज्ञ आहेत कारण यामध्ये यूपाची गरज नसते पण क्रतु हा शब्द यूपयुक्त सामयागात रूढ आहे. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र, व अप्तोर्याम ह्या सात सोमसंस्था हेच क्रतू आहेत अग्निहोत्र या सर्व यज्ञांचें व क्रतूंच आरम्भक आहे. ) ह्मणूनच अग्निहोत्र स्वर्गलोकाची ज्योति ह्म० त्याचें प्रकाशक आहे.

यज्ञ इति यज्ञेन हि देवा दिवं गता यज्ञेनासुरानपानुदन्त यज्ञेन द्विषन्तो मित्रा भवन्ति यज्ञे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्यज्ञं परमं वदन्ति ॥

अन्वय.—यज्ञ. उत्तम साधनं इति केचित् आहुः। यज्ञेन हि देवाः दिवं गताः। यज्ञेन च असुरान् अपानुदन्त। यज्ञेन द्विषन्तः मित्रा भवन्ति। यज्ञे सर्वं प्रतिष्ठितं। तस्मात् यज्ञं परमं वदन्ति ॥

अर्थ—यज्ञ हें उत्तम साधन आहे, असें कित्येक ह्मणतात. देव पूर्वानुष्ठित यज्ञाच्या योगानें स्वर्ग लोकाला प्राप्त झालेले आहेत. यज्ञानेंच देवानीं असुराचा विनाश केला. सर्व कामनाच्या प्राप्तीचें साधन असा जो ज्योतिष्टोम त्याच्या योगानें द्वेषाच्या शत्रूंचीही इच्छा करणाऱ्या पुरुषाचे शत्रूही मित्र होतात. यज्ञामध्यें सर्व प्रतिष्ठित आहे ह्मणून यज्ञ, हें श्रेष्ठ साधन आहे, असें ह्मणतात.

मानसं वै प्राजापत्यं पवित्रं मानसेन मनसा साधु पश्यति मानसा ऋषयः प्रजा असृजन्त मानसे सर्वं प्रतिष्ठितं तस्मान्मानसं परमं वदन्ति ॥

अन्वयः—मानसं प्राजापत्यं वै पवित्रं। मानसेन मनसा साधु पश्यति। मानसाः ऋषयः प्रजा असृजन्त। मानसे सर्वं प्रतिष्ठितं। तस्मात् मानसं परमं वदन्ति॥

अर्थ—मनानें घडणारें उपासन हच प्रजापतिपदाच्या प्राप्तीचें साधन च त्यामुळेंच पवित्र ह्म० चित्तशुद्धीचें कारण आहे. मानस-उपासनेनें युक्त असलेलें जें अन्तःकरण तें त्याच एकाग्र मनानें भूत, भविष्यत, दुर असलेलें इत्यादि वस्तुजात चांगल्या तऱ्हेनें पाहत. एकाग्र मनानें युक्त असलेले विश्वामित्रादि ऋषि आपल्या नुसत्या सङ्कल्पानेंच पुष्कळ प्रजा निर्माण करते झाले. यास्तव त्या मानस उपासनेमध्यें सर्व प्रतिष्ठित आहे. त्यामुळें तें परम साधन आहे, असें ह्मणतात.

न्यास इत्याहुर्मनीषिणो ब्रह्माणं ॥

अन्वयः—न्यास इति य मोक्षहेतु. तं मनीषिणः ब्रह्माणं आहुः ॥

अर्थ—न्यास म्हणून जो मोक्षाचा हेतु सांगितला आहे त्याला बुद्धिमान् स्मृतिकार महर्षी हिरण्यगर्भरूप म्हणतात.

आता त्याच सन्यासाची स्तुति करण्यासाठीं त्याच्या योगानें प्राप्त होणाऱ्या हिरण्यगर्भाच्या रूपाचें वर्णन करितात—

**ब्रह्मा विश्वः कतमः स्वयंभु प्रजापतिः संवत्सर इति ॥**

अन्वय —य ब्रह्मा स अयं विश्व, कतम., स्वयभू, प्रजापति. च संवत्सर इति उनेयं ॥

अर्थ—जो हा हिरण्यगर्भ तो सर्व जगद्रूप, सुखस्वरूप, स्वयभू म्ह० आईबापावाचूनच आपोआप उत्पन्न झालेला व प्रजाचा पालक आणि कालात्मक आहे. तात्पर्य, अशा रीतीनें त्याच्या सर्व स्वरूपाची कल्पना करावी.

सन्यासाची पुन. स्तुति करण्याकरिता हिरण्यगर्भाच्या अवयवभूत सवत्सराचे माहात्म्य सांगतात—

**संवत्सरोऽसावादित्यो य एप आदित्ये पुरुषः स परमेष्ठी ब्रह्मात्मा ॥**

अन्वय —य अय सवत्सरः असौ आदित्य । य. एषः आदित्ये पुरुष सः एव परमेष्ठी ब्रह्म च आत्मा ॥

अर्थ—जो हा संवत्सर नावाचा काल सांगितला आहे तो आदित्यरूप आहे. ( कारण तो आदित्याच्या सतत गतीमुळे होतो. ) हा जो त्या आदित्यमण्डलातील पुरुष तोच हिरण्यगर्भरूप आहे. ( कारण आदित्यमण्डलाच्या द्वारा हिरण्यगर्भ प्राप्त होत असतो ) तो परमेष्ठीच ब्रह्म म्ह० जगाचें कारण आहे. तसाच तो आत्मा म्ह० सर्वांचा प्रत्यक् आत्मा ( पञ्चकोशाच्या पलीकडे असणारा कूटस्थ ) आहे.

याप्रमाणें आदित्यादिकांच्या द्वारा संवत्सरादिकांची प्रशंसा करून आदित्यमण्डलाच्या द्वारा त्याचीच सर्व व्यवहाराचें कारण या रूपानें स्तुति करितात—

याभिरादित्यस्तपति रश्मिभिस्ताभिः पर्जन्यो वर्षति पर्जन्येनौषधिवनस्पतयः प्रजायन्त ओषधिवनस्पतिभिरन्नं भवत्यन्नेन प्राणाः प्राणैर्बलं बलेन तपस्तपसा श्रद्धा श्रद्धया मेधा मेधया मनीषा मनीषया मनो मनसा शान्तिः शान्त्या चित्तं चित्तेन स्मृतिः स्मृत्या स्मारःस्मारेण विज्ञानं विज्ञानेनात्मानं वेदयति तस्मादन्नं ददन्त्सर्वाण्येतानि ददात्यन्नात्प्राणा भवन्ति भूतानां प्राणैर्मनो मनसश्च विज्ञानं विज्ञानादानन्दो ब्रह्म योनि. ॥

**अन्वयः**—आदित्य याभिः रश्मिभिः तपति ताभिः पर्जन्यः भूत्वा वर्षति। तेन पर्जन्येन ओषधिवनस्पतयः प्रजायन्ते। ओषधिवनस्पतिभिः अन्नं भवति। अन्नेन प्राणाः, प्राणैः बलं, बलेन तपः, तपसा श्रद्धा, श्रद्धया मेधा, मेधया मनीषा, मनीषया मनः, मनसा शान्तिः, शान्त्या चित्त, चित्तेन स्मृति, स्मृत्या स्मारं, स्मारेण विज्ञानं, विज्ञानेन आत्मानं वेदयति। तस्मात् अन्नं ददन् ( ददत् ) सर्वाणि एतानि ददाति। अन्नात् भूतानां प्राणाः भवन्ति, प्राणैः मनः, मनसः विज्ञानं, विज्ञानात् आनन्दः ब्रह्म योनिः ॥

**अर्थ**—हा आदित्य ज्या उष्णरूप किरणांनीं पुष्कळ सन्ताप करतो त्या तीव्र रश्मींनीं भूमीवरील जळ शोषून घेऊन पर्जन्य होतो व वर्षाव करतो. त्या पर्जन्यानें व्रीह्यादि ओषधी व अश्वत्थ-पनसादि वनस्पती उत्पन्न होतात. ओषधी व वनस्पती यांच्या योगानें भोज्य अन्न मिळतें. त्या अन्नानें प्राण पुष्ट होतात. ते पुष्ट झाले असतां शरीरामध्यें बल उत्पन्न होतें. त्या बलाच्या योगानें कृच्छ्र-चान्द्रायणादिरूप तप निष्पन्न होतें. तपानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे त्याच्या ठिकाणीं तत्त्वज्ञानविषयक श्रद्धा उत्पन्न होते. त्या श्रद्धेनें एकाग्रचित्त पुरुषाच्या ठिकाणीं मेधा उत्पन्न होते. मेधेच्या योगानें बुद्धि, बुद्धीच्या योगानें निरंतर मनन, मननानें क्रोधादि दोषांना अवसरच न मिळाल्यामुळें शान्ति, शान्तीमुळें विक्षेपरहित चित्त ह्या० तत्त्वविषयप्रमाण-जनित ज्ञान उत्पन्न होतें. त्या ज्ञानानें मध्यें झोंप वगैरे लागली असली तरी पुनः तत्त्वविषयक स्मृति होते. त्या स्मृतीमुळें निरंतर स्मरण होतें. त्या स्मरणानें सजातीय प्रत्यययुक्त सतत ज्ञान प्राप्त होतें. तसल्या ज्ञानानें पुरुष परमा-

त्म्याचा सर्वदा अनुभव घेतो. ज्या अर्थी अन्न अशा परंपरेनें परमात्म्याच्या अनुभवाचें निमित्त होतें त्या अर्थी अशा तऱ्हेचें अन्न देणारा पुरुष प्राण, बळ इत्यादि सर्व देतो. (आतां अन्नदान सर्व दानरूप आहे हें स्पष्ट करण्याकरितां वरील अर्थच पुनः संक्षेपतः सांगतात— ) अन्नापासून भूतांचे प्राण होतात. प्राणापासून परंपरेनें मन, मनापासून परंपरेनें विज्ञान व विज्ञानापासून परमात्मरूप आनन्द होतो आणि अशा रीतीनें उपासक स्वतः वेदान्तप्रतिपाद्य ब्रह्म व जगत्कारण होतो.

पूर्वोक्त संन्यासाची स्तुति करण्यासाठीं त्या संन्यासानें ज्याला तत्त्वज्ञान प्राप्त झालें आहे त्या पुरुषाची प्रशंसा करतात—

**स वा एष पुरुषः पञ्चधा पञ्चात्मा येन सर्वमिदं प्रोतं पृथिवी चान्तरिक्षं च द्यौश्च दिशश्चावान्तरदिशश्च स वै सर्वमिदं जगत्स भूतꣳस भव्यं जिज्ञासक्लृप्त ऋतजा रयिष्ठा श्रद्धा सत्यो महस्वान्तपसो वरिष्ठात् ॥**

**अन्वयः**—सः वै एषः पुरुषः पञ्चधा पञ्चात्मा भवति । येन सर्वं इदं जगत् प्रोतं सः एव पृथिवी च अन्तरिक्षं च द्यौः च दिशः च अवान्तरदिशः च सः वै सर्वं इदं जगत् सः एव भूतं, भव्यं अस्ति । यतः अयं जिज्ञासक्लृप्तः ऋतजाः रयिष्ठा श्रद्धा सत्यः महस्वान् अतएव तपसः ( तमसा ) वरिष्ठात् वर्तते ॥

**अर्थ**—जो पुरुष संन्यासपूर्वक तत्त्वज्ञान संपादन करतो तोच हा पुरुष सर्वात्मक, पञ्च प्रकारांनीं पञ्चात्मा (ह्म० पंचवीस वस्तुस्वरूप होतो. शब्द-स्पर्शादि पांच गुण, पृथिव्यादि पांच भूतें, चक्षुःश्रोत्रादि पांच ज्ञानेन्द्रियें, वाक्पाणि इत्यादि पांच कर्मेन्द्रियें व प्राणापानादि पांच वायू यांच्या स्वरूपभूत) होतो. ज्या ब्रह्मरूपानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे, तोच पृथ्वी, अन्तरिक्ष, स्वर्ग, दिशा, व अवान्तर दिशा यांना व्यापून राहिला आहे. तोच पुरुष हें सर्व वर्तमान जगत्, भूतकालीन जगत् व भविष्यत्कालीन जगत् आहे. (तत्त्ववेत्त्यांचा आकार इतर साधारण जनांप्रमाणें जरी दिसला तरी तो वेदान्तविचारानें सर्वात्मरूपानें निश्चित झालेला असतो. ) प्रामाणिक ज्ञानानें सर्वात्मा झालेला असतो.

तो गुरूपदेशरूप धनामध्येंच स्थित असतो. उपदेशरहित पुरुषांना प्रतीत होत नाहीं. अशा प्रकारचें विज्ञान श्रद्धेनेंच प्राप्त होणारें असल्यामुळें हा श्रद्धारूप आहे. अबाध्य जें ब्रह्म तत्स्वरूप असल्यामुळें हा सत्य आहे; स्वयप्रकाश आहे आणि ह्मणूनच ससारकारणभूत अज्ञानानें रहित असल्यामुळें तो सर्वांहून श्रेष्ठ आहे.

याप्रमाणें सन्यासपूर्वक ज्ञानयुक्त झालेल्या पुरुषाची प्रशंसा करून त्याचें फल सागतात.—

ज्ञात्वा तमेवं मनसा हृदा च भूयो न मृत्युमुपयाहि विद्वान् ॥

*अन्वय*—हे आरुणे, त्वं तं हृदा मनसा एवं ज्ञात्वा विद्वान् सन् भूयः मृत्युं न उपयाहि ।

**अर्थ**—हे आरुणे, तू त्या परमात्म्याला हृदयस्थ मनानें सन्यासपूर्वक *जाणून व ज्ञानानें युक्त होऊन पुनरपि मृत्यूला प्राप्त होऊं नकोस.* ( ज्ञानी पुरुषाचा वर्तमान देह पडला असता पुनः जन्म घ्यावा लागत नसल्यामुळें त्याला पुनर्मृत्यु नाहीं. )

येणेंप्रमाणें पुष्कळ प्रकारें प्रशंसा केलेल्या सन्यासाचा उपसंहार करितात—

तस्मान्न्यासमेषां तपसामतिरिक्तमाहु ।

*अन्वयः*—( यस्मात् न्यास पुरुषार्थस्य अन्तरंगं कारणं तस्मात् ) एषां तपसां न्यासं अतिरिक्तं आहु ।

**अर्थ**—ज्या अर्थी सन्यास हे पुरुषार्थाचें अतरग साधन आहे त्या-अर्थी तो ह्या सत्यादि सर्व तपामध्यें उत्तम साधन आहे, असें विद्वान् ह्मणतात.

सन्यासानतर प्रणवानें आत्म्याच्या ठिकाणीं समाधि लावावी, असें विधान करणारा वेद ह्या समाधीला होणाऱ्या विघ्नाचा परिहार करण्यासाठीं प्रथम अन्तर्यामीची सर्वकारणरूपानें स्तुति करतो—

वसुरण्वो विभूरसि प्राणे त्वमसि सधाता ब्रह्मन् त्वमसि विश्वधृत्तेजोदास्त्वमस्यग्निरसि वर्चोदास्त्वमसि सूर्यस्य द्युम्नोदास्त्वमसि चन्द्रमस उपयामगृहीतोऽसि ब्रह्मणे त्वा महसे ॥

अन्वयः—ब्रह्मन्, वसुरण्वः असि, विभूः ( विभुः ) असि, प्राणे सन्धाता त्वं असि, विश्वभृत् त्वं असि, तेजोदाः त्वं असि, अग्निः असि, सूर्यस्य वर्चोदाः त्वं असि। चन्द्रमसः द्युम्नोदाः त्वं असि, तथा यागेषु सोमरूपः सन् उपयामेन गृहीतः असि। त्वा महसे ब्रह्मणे भजामि ॥

अर्थ—हे ब्रह्मन्, तूं यथार्थ तत्त्वाचा उपदेष्टा आहेस. तसाच हिरण्यगर्भ, विराट् इत्यादि विविध रूपानें उत्पन्न झालेला आहेस. वायुरूप प्राणामध्यें जीवात्म्याची योजना करणारा आहेस. ब्रह्माण्डधारक आहेस. भूलोकवर्ती अग्नीला प्रकाशरूप धन देणारा आहेस. तूंच साक्षात् अग्नि आहेस. स्वर्गस्थ सूर्याला प्रकाश देणारा आहेस. चन्द्राला प्रकाश देणारा आहेस. यज्ञामध्यें सोमरूप झालेला तूं उपयामनांवाच्या मृण्मय अथवा काष्ठमय पात्रानें ग्रहण केला गेलेला आहेस. अशाप्रकारच्या तुज अन्तर्यामीला चैतन्यजोतिःस्वरूप ब्रह्मतत्त्वाच्या साक्षात्काराकरितां मी भजतों.

अशी स्तुति केल्यावर समाधीचें विधान करितात—

ओमित्यात्मानं युञ्जीतैतद्वै महोपनिषदं देवानां गुह्यं ॥

अन्वयः—ॐ इति आत्मानं युञ्जीत। एतद् वै महोपनिषदं देवानां गुह्यं ॥

अर्थ—तीन मात्रांनीं युक्त अशा प्रणवाचा उच्चार करून सर्व वेदान्तांवरून ज्याचा निर्णय झाला आहे अशा आत्म्याला आत्मरूपानें चित्तांत धारण करावें. ( समाधि-साधनभूत ओंकाराची प्रशंसा— ) हें प्रणवरूपच महोपनिषद् आहे. तें इन्द्रादि देवांचें गुह्य आहे. (कारण ते शमदमादि अधिकाररहित पुरुषाला प्रणवाचा उपदेश करीत नाहींत. )

आतां या तत्त्वज्ञानाचें फल सांगतात—

य एवं वेद ब्रह्मणो महिमानमाप्नोति तस्माद्ब्रह्मणो महिमानम् इत्युपनिषत् ॥ (७९) ॥

अन्वयः— यः एवं वेद। ब्रह्मणः महिमानं आप्नोति। तस्मात् ब्रह्मणः महिमानं आप्नोति। इति उपनिषद् ॥

अर्थ—जो पुरुष वर सांगितल्याप्रमाणें ब्रह्मतत्त्वाला जाणतो तो आपल्या परिच्छेदक स्वरूपाचा त्याग करून देश-काल-वस्तुपरिच्छेद-

शून्य ब्रह्माच्या महत्त्वाला प्राप्त होतो. ( ह्म० तत्त्वज्ञानानें त्याचा जीवत्वकृत भ्रम निवृत्त होतो आणि ब्रह्म स्वभाव आविर्भूत होतो. त्यानंतर तो जीवन्मुक्त होतो, व त्या जीवन्मुक्ताचा प्रारब्धक्षय होऊन देहपात झाला असतां ) त्या अविद्यानिवर्तक ज्ञानामुळें अविद्यावासनेनें रहित झालेला तो मुख्य ब्रह्माच्या महत्त्वास प्राप्त होतो. ( ह्म० त्याला विदेह मुक्ति मिळते. ) अशी ही तत्त्वविद्या आहे. ( ७९ )

---

संन्यासच ब्रह्मज्ञानाचें अन्तरंग साधन असल्यामुळें जिज्ञासूला तो करणें योग्य आहे; अग्निहोत्रादि कर्मानुष्ठानच करीत राहणें उचित नव्हे, असें सांगितलें. पण तत्त्वसाक्षात्कार झाला असतां त्यानंतर पुनः कर्मानुष्ठान करावयास कोणती हरकत आहे, अशी शंका कोणी घेईल ह्मणून तिचें निवारण करण्यासाठीं तत्त्वज्ञान्याचे सर्व लौकिक व्यवहारही यागरूप आहेत, असें या शेवटच्या अनुवाकांत सांगतात-पण त्यांतही या अनुवाकाच्या पूर्वभागानें योग्याचे अवयव यज्ञांगभत द्रव्यें आहेत, असें सांगतात—

तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धा पत्नी शरीरमिध्ममुरो वेदिर्लोमानि बर्हिर्वेदः शिखा हृदयं यूपः काम आज्यं मन्युः पशुस्तपोऽग्निर्दमः शमयिता दक्षिणा वाग्घोता प्राण उद्गाता चक्षुरध्वर्युर्मनो ब्रह्मा श्रोत्रमग्नीत् ॥

अन्वयः—तस्य एव विदुषः यः यज्ञः अस्ति तस्य यज्ञस्य देहेन्द्रियादिसाक्षी यः आत्मा सः एव यजमानसदृशः, या तु तदन्तःकरणे श्रद्धा सा पत्नी, यच्च शरीरं तद् इध्मं, उरः वेदिः, लोमानि बर्हिः, वेदः शिखा, हृदयं यूपः, कामः आज्य, मन्युः पशुः, तपः अग्निः, शमयिता दमः दक्षिणा, वाक् होता, प्राणः उद्गाता, चक्षुः अध्वर्युः, मनः ब्रह्मा, श्रोत्रं अग्नीत् ॥

अर्थ—त्या पूर्वोक्त ब्रह्माचें महत्त्व जाणणाऱ्या संन्यासी जीवन्मुक्ताचा जो यज्ञ त्याचा देहेन्द्रियादिसाक्षी आत्मा हाच यजमानासारखा आहे. त्याचप्रमाणें त्याच्या अन्तःकरणातील जी श्रद्धा तीच पत्नी आहे.

शरीर हाच इध्म, उर हीच वेदि, लोम हेच दर्भ, वेद हीच शिखा, हृदय हाच यूप, काम हेंच आज्य, क्रोध हाच पशु, तप हाच अग्नि, सर्वेन्द्रियांचें दमन करणारा दम ही दक्षिणा; वाणी हा होता, प्राण उद्गाता, चक्षु अध्वर्यु, मन ब्रह्मा, व श्रोत्र अग्नीत् आहे.

या अनुवाकाच्या दुसऱ्या भागानें योग्याच्या व्यवहाराला ज्योतिष्टोमांगभूत क्रियारूपत्व आहे, असें सांगतात—

**यावद्ध्रियते सा दीक्षा यदश्नाति तद्धविर्यत्पिबति तदस्य सोमपानं यद्रमते तदुपसदो यत्संचरत्युपविशत्युत्तिष्ठते च स प्रवर्ग्यो यन्मुखं तदाहवनीयो या व्याहृतिराहुतिर्यदस्य विज्ञानं तज्जुहोति यत्सायं प्रातरत्ति तत्समिधं यत्प्रातर्मध्यंदिनᳪसायं च तानि सवनानि ॥**

अन्वयः—यावत् ध्रियते सा दीक्षा, यत् अश्नाति तत् हविः, यत् पिबति तत् अस्य सोमपानं, यत् रमते तत् उपसदः, यत् संचरति, उपविशति, उत्तिष्ठते च सः प्रवर्ग्यः, यत् मुखं तत् आहवनीयः, या व्याहृतिः सा आहुति, यत् अस्य विज्ञानं तत् जुहोति, यत् सायंप्रातः अत्ति तत् समिधं, यत् प्रातः मध्यंदिनं सायं च तानि सवनानि ॥

अर्थ—विद्वान् जोंवर कांहीं भोजन न करितांना राहतो तीच याची दीक्षा, जें भोजन करितो तेंच हवि, जें जलादिकांचें पान करितो तें सोमपान, त्याचें रममाण होणें तेंच उपसद्, त्याचा संचार, बसणें व उठणें तेंच प्रवर्ग्य, जें मुख तेंच आहवनीय अग्नि, भाषण हीच आहुति, त्याचें जें विज्ञान तेंच हवन, जें सायंकाळीं व प्रातःकाळीं भोजन तीच समिधा, जे प्रातःकाळ, मध्याह्नकाळ व सायंकाळ तींच सवनें.

आतां या अनुवाकाच्या तिसऱ्या भागानें जीवन्मुक्ताच्या विशेष कालांना नानाविध यागरूपता सांगतात—

ये अहोरात्रे ते दर्शपूर्णमासौ येऽर्धमासाश्च मासाश्च ते चातुर्मास्यानि य ऋतवस्ते पशुबन्धा ये संवत्सराश्च परिवत्सराश्च तेऽहर्गणाः सर्ववेदसं वा एतत्सत्रं यन्मरणं तदवभृथः ॥

अन्वयः—ये अहोरात्रे ते दर्शपूर्णमासौ, ये अर्धमासाः च मासाः च ते चातुर्मास्यानि, ये ऋतवः ते पशुबन्धाः, ये संवत्सराः च परिवत्सराः ते अहर्गणाः,| एतत् सत्रं सर्ववेदसं वै, यत् मरणं तत् अवभृथः ॥

अर्थ—जे अहोरात्र तेच दर्शपूर्णमास, जे पक्ष व मास तीं चातुर्मास्यें, जे ऋतू तेच पशुबन्ध, जे संवत्सर व परिवत्सर तेच अहर्गण, हें सत्र सर्वस्वदक्षिणाक आहे, ह्म० यांत आयुष्यरूपी सर्व दक्षिणा दिली जाते. जें मरण तेंच अवभृथ स्नान होय.

या अनुवाकाच्या चवथ्या भागानें सर्व यज्ञात्मक योग्याची उपासना करणाऱ्याला क्रममुक्ति हें फल सांगतात.—

एतद्वै जरामर्यमग्निहोत्रꣳ सत्रं य एवं विद्वानुदगयने प्रमीयते देवानामेव महिमानं गत्वादित्यस्य सायुज्यं गच्छत्यथ यो दक्षिणे प्रमीयते पितृणामेव महिमानं गत्वा चन्द्रमसः सायुज्यꣳ सलोकतामाप्नोत्येतौ वै सूर्याचन्द्रमसोर्महिमानौ ब्राह्मणो विद्वानभिजयति तस्माद्ब्रह्मणो महिमानमाप्नोति तस्माद्ब्रह्मणो महिमानम् ॥ ८० ॥

सह नाववत्विति शान्तिः ॥

अन्वयः—एतत् जरामर्यं अग्निहोत्रं सत्रं इति एवं विद्वान् यः उदगयने प्रमीयते सः देवानां महिमानं गत्वा आदित्यस्य सायुज्यं गच्छति। अथ यः दक्षिणायने प्रमीयते सः पितॄणां ( पितृणां ) एव महिमानं गत्वा चन्द्रमसः सायुज्यं सलोकता च आप्नोति। यः एवं एतौ सूर्याचन्द्रमसोः महिमानौ विद्वान् ब्राह्मणः अभिजयति तस्मात् ब्रह्मणः महिमानं आप्नोति। तस्मात् ब्रह्मणः महिमानं आप्नोति ॥

अर्थ—जरामरणपर्यंत हें जें योग्याचें चरित आहे, तें वेदोक्त अग्निहोत्रादि सहस्र संवत्सर सत्रान्त कर्माचें स्वरूपच आहे, अशी जो उपासना करतो तो उत्तरायणांत मरण पावल्यास इन्द्रादि देवांच्या ऐश्वर्यास प्राप्त

होऊन त्यानंतर भावनेच्या न्यूनाधिकतेप्रमाणें आदित्याच्या सायुज्यास ह्म० सहवासाला अथवा तादात्म्याला प्राप्त होतो. पण याच्या उलट जो उपासक दक्षिणायनांत मरतो तो अग्निष्वात्तादि पितराच्या ऐश्वर्यास प्राप्त होऊन पूर्वीप्रमाणें चन्द्रमाच्या सायुज्यास प्राप्त होतो. अशा रीतीनें सूर्य व चन्द्रमा याच्या ऐश्वर्यांचा अनुभव घेणारा ब्राह्मण तेथें सगुण ब्रह्मरूप हिरण्यगर्भाची उपासना करून हिरण्यगर्भाच्या साक्षात्कारास प्राप्त होतो. नंतर त्या साक्षात्कारामुळें तेथील मरणानंतर तो हिरण्यगर्भाच्या लोकीं जाऊन तेथें त्याच्या ऐश्वर्यास प्राप्त होतो. पुढें त्या लोकीं ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे, असा तो ज्ञानामुळें ब्रह्मलोकाचा विनाश होतांच सत्यज्ञानादिरूप ब्रह्माच्या महत्त्वास प्राप्त होतो. ( ८० )

इति श्रीकृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीय आरण्यकाचें दशम प्रपाठकरूप याज्ञिकी नारायणोपनिषत् सान्वयार्थ समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला वर्ष २ रें अंक ६ वा ७ वा.

रत्न आठवें.

# तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ.

( मूळ, भाष्य व अर्थ यांसह )

संपादक व प्रकाशक

आचार्यभक्तः—विष्णु वामन बापट.

पुणें, सदाशिव पेठ २४१.

निद्राजाग्रन्मध्यभागे संविच्छेदान्तरे तथा ।
मध्ये संविद्द्वयोश्च सूक्ष्मबुद्ध्याभिलक्षय ॥ १ ॥
एतत्पदं निजं रूपं यत्प्राप्य न विमुह्यति ।
एतद्विज्ञानमात्रेण प्रवृत्त जगदीश्वरम् ॥ २ ॥

श्रावण शु० ५ शके १८३६ आनंदनाम संवत्सर.

पुणें, ता० २७ जुलै १९१४.

हें पुस्तक दत्तात्रय गणेश खाडेकर ह्यांनीं पुणें पेठ शनिवार घर नं. ४४१ येथें आपल्या 'लॉ प्रिंटिंग' प्रेसमध्यें छापिलें व विष्णु वामन बापटशास्त्री यांनीं पुणें पेठ सदाशिव घर नंबर २४१ येथें प्रसिद्ध केलें.

किंमत १ रुपाया.

# प्रस्तावना.

आज आह्मी ब्रह्मविद्याग्रथरत्नमालच्या वाचकास आठवें रत्न "तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ" सप्रेम समर्पण करीत आहो यात मूळ उपनिषद साध्या अक्षरात देऊन त्या खालीं जाड अक्षरानीं भाष्य व त्याच्या पुढे साध्या अक्षरात भाष्यार्थ दिला आहे पहिल्या भाष्यार्थापेक्षा यात वाचकाना अधिक सोयीची वाटेल अशी सुधारणा केली आहे मूळ उपनिषदाचा शब्दश अर्थ चवथ्या रत्नात दिलेला असल्यामुळें तो येथें दिलेला नाहीं. तथापि भाष्य कोणत्या श्रुतिवचनाचें आहे, हे स्पष्ट कळावें, ह्मणून त्या त्या भाष्याच्या आरभीं तें त मूळ दिलें आहे तसेंच अर्थाच्याच ओळींत भाष्य न देता या पुस्तकात अर्थ व भाष्य हीं अगदीं निरानिराळीं दिलीं आहेत

मूळ उपनिषदाचा साराश चवथ्या रत्नात दिला आहे यास्तव या प्रस्तावनेंत त्याविषयीं अधिक काहीं न लिहिता भाष्याचा तेवढा मुख्य विशेष सागून ती सपवितों भाष्याच्या आरभीं उपोद्घातात आचार्यांनी पूर्वोत्तरकाडाचा सबध व प्रयोजन सागितलें आहे पूर्वकाडावरून नित्य व काम्य कर्माचें ज्ञान झालें आता कर्मानुष्ठानाच्या हेतूचा परिहार करण्यासाठीं उत्तरकाण्डाचा आरभ केला आहे काम कर्मानुष्ठानाचा हतु आहे निष्काम अथवा आप्तकाम पुरुष कर्मामध्यें प्रवृत्त होत नाहीं अविद्या निवृत्त झाली असता स्वात्म्यामध्यें अवस्थान होणें हीच परप्राप्ति आहे कर्मे प्रारब्धफल व अनारब्धफल अशीं दोन प्रकारचीं असून तीं अनेक जन्मामध्यें घडलेलीं असतात. तीं परस्पर विरुद्ध फळ देणारींही असतात त्यामुळें एकाच जन्मात त्या सर्वांचा उपभोगान क्षय होऊन काम्य व निषिद्ध कर्मे न केल्यामुळें स्वात्म्यामध्यें अवस्थान होणें हा मोक्ष अनायासानें प्राप्त होऊ शकत नाहीं शिवाय-प्रत्यवायपरिहार एवढेंच नित्य शुभ कर्मांचें फळ मानणें अयाग्य आह नित्य कर्माच्या योगानें फक्त अशुभ कर्माचाच क्षय होईल शुभ कर्मांचा क्षय हाणार नाहीं कारण शुभ कर्मांचा नित्य कर्माशीं विरोध नाहीं कारण तींही शुभ कर्मेच आहेत, शुभ व अशुभ याचा विरोध असतो, आणि विरुद्ध कर्मेच परस्पराना बाधक होतात, असा नियम आहे

त्याचप्रमाणें कर्मांना कारण होणाऱ्या कामाची निवृत्ति ज्ञानावाचून होत नाहीं. आत्म्याला न जाणणाऱ्या पुरुषाला अनात्मविषयाविषयीं कामना होते. आत्मा नित्य प्राप्त असल्यामुळें त्याच्याविषयीं कामना होणें अनुपपन्न आहे.

नित्य कर्माचें अकरण-अननुष्ठान हा अभाव आहे. त्याच्यापासून भावरूप प्रत्यवायाची उत्पत्ति होऊं शकत नाहीं. यास्तव पूर्व संचितपापामुळें नित्य कर्मेंही न करणें, हें पुढील प्रत्यवायाचें ज्ञापक आहे. तसेंच निरतिशय प्रीतिरूप स्वर्ग हाच मोक्ष असून तो कर्मारब्धच आहे, असें क्रित्येकाचें ह्मणणें आहे. पण मोक्ष नित्य असल्यामुळें त्याचा आरंभ संभवत नाहीं, इत्यादि पुष्कळ विचार करून आचार्यांनीं ब्रह्मविद्येकरिता उपनिषदाचा आरंभ आहे, असें उपोद्घातांत ठरविलें आहे.

त्यानंतर शीक्षाध्यायाच्या बाराही अनुवाकांचें सरळ व सोपपत्तिक व्याख्यान केलें आहे. शेवटीं उपसंहार करताना पुनः नुसत्या कर्मामुळेंच परम श्रेय होतें, कीं विद्यायुक्त कर्मामुळें तें होतें, कीं विद्या व कर्म या दोन्हींमुळें होतें, कीं कर्मयुक्त विद्येनें होतें, कीं केवळ विद्येनें होतें, असे पाच प्रश्न उपस्थित करून त्यांतील पहिल्या चार प्रश्नांचें निराकरण केलें आहे.

नंतर ब्रह्मवल्ल्यध्यायाच्या व्याख्यानास आरंभ करून 'ब्रह्मविदाप्नोति परं' या वाक्याचा सोपपत्तिक अर्थ सांगितला आहे. ब्रह्मज्ञ ब्रह्माला प्राप्त होतो, ह्मणजे काय याचा सविस्तर विचार केला आहे. नंतर त्याच सूत्रभूत वाक्याचें विवरण करण्यासाठीं प्रवृत्त झालेल्या 'सत्यं ज्ञानं०' इत्यादि ऋचेचें व्याख्यान करून सत्यादि पदें ब्रह्माचीं नुसतीं विशेषणें नसून लक्षणें आहेत असें सांगितलें आहे. नंतर लक्षणातील सत्यादि पदांचा उपयोग सांगितला आहे. पुढें सत्यादि पदांच्या अर्थाविषयींच पुष्कळ विचार करून त्या लक्षणानें लक्षित झालेलें ब्रह्म हृदयाकाशातील बुद्धिगुहेंत आहे, असें जो जाणतो त्याला सर्व कामांची एकाच वेळीं प्राप्ति होते, हें त्या विज्ञानाचें फळ सांगितलें आहे.

'सत्यं ज्ञानं–' या मंत्राच्या व्याख्यानानंतर पुढील ग्रंथाच्या अवतरणार्थ मागील ग्रंथाचा अनुवाद करून पुनरपि ब्रह्म सत्य ज्ञान व अनन्त कसें

तें सविस्तर वर्णिलें आहे. नंतर 'तस्माद्वा०' या सृष्टिवाक्याचें तात्पर्य सांगून त्याच्या व्याख्यानास आरंभ केला आहे. त्यांत सर्वच शरीरें अन्नापासून होत असतांना अन्नापासून पुरुष होतो, असें ह्मणून मनुष्यशरीराचेंच ग्रहण करण्याचें कारण काय तें सांगितलें आहे. नंतर अन्नमयादि कोशांचें सविस्तर व सोपपत्तिक व्याख्यान करून शेवटीं आनन्दमय हा मुख्य आत्मा नसून कार्यात्मा आहे, असें अनेक उपपत्तींनीं दाखविलें आहे.

ब्रह्म आहे किंवा नाहीं, असा पुष्कळाना संशय येतो. यास्तव तें आहे, असेंच प्रत्येकानें समजावें, ह्मणून 'तें नाहीं,' असें ह्मणणारा असत् होतो; व 'आहे' असें ह्मणणाराला ब्रह्मज्ञ 'सन्त' समजतात,' असें सांगितलें आहे. त्यानंतर अनुप्रश्न व त्यांचें सोपपत्तिक उत्तर, कार्यांतील प्रवेश, आनंदाच्या मीमांसेचें कारण, ती मीमांसा, या सर्वांचें व्याख्यान केल्यावर दुसरा ब्रह्मवल्ल्यध्यायही संपविला आहे.

भाष्यकारानीं तिसऱ्या भृगुवल्ल्यध्यायाचेंही व्याख्यान आपल्या नेहमींच्या विवेचक व सोपपत्तिक पद्धतीनें करून प्रस्तुत उपनिषद्भाष्य संपविलें आहे. आह्मी येथें त्यांतील विषयाचें दिग्दर्शन केलें आहे. त्याचें साक्षात् ज्ञान मूळ भाष्यावरूनच अगदीं स्पष्टपणें होण्यासारखें असल्यामुळें व तें सरळ अर्थासह या पुढेंच दिलेलें असल्यामुळें येथें अधिक विस्तार करीत नाहीं. या पुढील अंक 'श्रीवल्लभदर्शनसार' (समतभेद) भाद्रपद शु० पंचमीला प्रसिद्ध होईल, असें सुचवून ही प्रस्तावना संपविली.

पुणें, आषाढ वद्य द्वादशी, शके १८३६ — विष्णु वामन बापट, संपादक ब्र. वि. ग्रं. रत्नमाला.

---

## विषयानुक्रमणिका.


| क्रम | विषय | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | मंगलाचरण, गुरुवंदन व ग्रंथप्रतिज्ञा ... ... | १ |
| २ | कर्मकांड व ज्ञानकांड यांचा संबंध व प्रयोजन ... | ४ |
| ३ | ब्रह्मविद्येकरिता उपनिषदांचा आरंभ करणें अनवश्यक आहे, असें ह्मणणाऱ्या वादांचें खंडन ... ... | ६ |

| क्रम. विषय | पृष्ठ- |
|---|---|
| ४ शांतिपाठ व शीक्षाध्यायाच्या व्याख्यानाचा आरंभ ... | ५१ |
| ५ विद्या व कर्म यांच्या विवेकार्थ विचार ... ... | ५६ |
| ६ ब्रह्मवल्ल्यध्यायाच्या व्याख्यानास आरंभ-पूर्वोत्तरसंबंध | ७२ |
| ७ ' ब्रह्मविदाप्नोति परं ' या वाक्याचें सविस्तर व्याख्यान | ७५ |
| ८ 'सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म' या लक्षणवाक्याचें व्याख्यान | ७९ |
| ९ तसल्या ब्रह्माला जाणणारास सर्व कामप्राप्ति हें फळ | ९२ |
| १० पुढील ग्रंथाच्या अवतरणार्थ मागील ग्रंथाचा अनुवाद | ९५ |
| ११ ब्रह्माच्या आनन्त्यादिकाविषयीं विचार ... ... | ९६ |
| १२ ' तस्माद्वा एतस्मात्० ' या वाक्याचें व्याख्यान ... | ९८ |
| १३ अन्नमयादि पांच कोशाचें व्याख्यान ... ... | १०३ |
| १४ आनन्दमयाचें विशेष उपपादन .. ... | ११८ |
| १५ आनन्दमयाच्या प्रियादि अवयवाचें उपपादन .. | १२१ |
| १६ ' असन्नेव स भवति० ' या वाक्याचें व्याख्यान ... | १२३ |
| १७ चार अनुप्रश्न व त्यांचीं क्रमानें उत्तरें ... .. | १२६ |
| १८ कार्यातील प्रवेशाविषयीं सविस्तर विचार .. | १३३ |
| १९ ' असद्वा० ' इत्यादि वाक्याचें व्याख्यान ... | १४३ |
| २० आनन्दाचें अस्तित्व ... ... ... | १४४ |
| २१ अभयप्राप्ति ... ... ... ... | १४७ |
| २२ भेददृष्टीची निंदा व फळ ... ... ... | १४९ |
| २३ आनंदाची मीमांसा ... ... ... | १५१ |
| २४ ' स एकः ' या महावाक्याचें व्याख्यान ... | १५७ |
| २५ एवंविद् कोण व तो उपसंक्रमण कसें करतो .. | १६० |
| २६ ' यतो वाचो० ' या वाक्याचें व्याख्यान ... | १७२ |
| २७ ' एतं ह वाव न तपति ' याचें व्याख्यान ... | १७४ |
| २८ पूर्वासंबंध पूर्वक भृगुवल्लीचें व्याख्यान ... | १७६ |
| २९ संसार आत्म्याचा धर्म आहे, याविषयीं विचार ... | १९४ |
| ३० अन्न व अन्नाद याविषयीं विचार ... ... | १९८ |

ब्रह्मविद्याग्रन्थरत्नमाला, वर्षे दुसरें, अंक ६ वा.

रत्न ८ वें.

# तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ.

श्रीगणेशाय नमः। श्रीसरस्वत्यै नमः। श्रीसद्गुरवे नमः। वेदान्तसंप्रदायप्रवर्तक ऋषी व आचार्य यांस प्रणाम करून स्वबोधशुद्ध्यर्थ व जिज्ञासुजनोपकारार्थ मी हा तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ लिहितों.

यजुर्वेदाच्या तैत्तिरीयशाखेच्या उपनिषदाचें व्याख्यान करण्याची इच्छा करणारे भगवान् भाष्यकार त्या उपनिषदाचें प्रतिपाद्य जें ब्रह्म तें नमस्काराच्या मिषानें संक्षेपतः दाखवितात—

*यस्माज्जातं जगत्सर्वं यस्मिन्नेव प्रलीयते।*

*येनेदं धार्यते चैव तस्मै ज्ञानात्मने नमः॥ १॥*

अन्वयः—यस्मात् सर्वं जगत् जातं यस्मिन् एव प्रलीयते येन च इदं सर्वं धार्यते तस्मै ज्ञानात्मने नमः॥

अर्थ—ज्याच्यापासून हें सर्व जगत् उत्पन्न झालें, ज्यामध्येंच तें पूर्णपणें लीन होतें, व ज्याच्याकडून हें धारण केलें जातें त्या ज्ञानात्म्याला नमस्कार असो. ('यस्मात्' या पंचमीवरून जगाच्या प्रकृतीचा चांगलासा बोध होत नाहीं. कारण ती विभक्ति कार्याचें निमित्तही सुचविते. यास्तव 'यस्मिन्०' इत्यादि दुसऱ्या चरणानें जगाची प्रकृति दाखविली आहे. कारण कार्याचा विलय प्रकृतींतच होतो, असा नियम आहे. 'येन०' इत्यादि तिसऱ्या चरणानें जगाचें साधारण कारण सांगितलें आहे. या श्लोकाच्या तिन्ही चरणांनीं ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगितलें आहे आणि 'ज्ञानात्मने' या पदानें त्याचें स्वरूप-लक्षण सांगितलें आहे. तटस्थ व स्वरूप लक्षणाचें लक्षण रत्न ६ पृष्ठ ११२ यांत पहा.) १.

गुरुभक्ति हें विद्याप्राप्तीचें अंतरंग साधन आहे, असें सुचविण्यासाठीं गुरूंना प्रणाम करतात—

**यैरिमे गुरुभिः पूर्वं पदवाक्यप्रमाणतः ।**
**व्याख्याताः सर्ववेदान्तास्तान्नित्यं प्रणतोऽस्म्यहम् ॥ २ ॥**

अन्वय —पूर्वं यैः गुरुभिः इमे सर्ववेदान्ताः पदवाक्यप्रमाणतः व्याख्याताः अहं तान् नित्यं प्रणतः अस्मि ॥

अर्थ—पूर्वी ज्या गुरूंनीं हे सर्व वेदान्त ( उपनिषदें ) पद वाक्य व अनुमानादि प्रमाणं यांच्या विवेचनपूर्वक स्पष्ट रीतीनें सांगितले ( त्यांचें व्याख्यान केलें ) त्यांच्यापुढें मी नित्य प्रणत आहे ( त्यांच्या विषयीं मी नित्य आदर बाळगतों मी त्यांना नित्य नमस्कार करतों कारण त्यांनीं कृपा करून वेदान्ताचें व्याख्यान करून मला ते शिकविले ह्मणून मी आतां आत्मानुभव घेत आहें त्यांनीं ते जर शिकविले नसते तर मी अपरोक्ष ज्ञानाचा अधिकारी कधीं झालो नसतों यास्तव त्यांचे उपकार आठवणें सर्वथा उचित आहे ) २

आतां पुढील श्लोकांत भाष्यकार आपल्या इष्ट कर्तव्याची प्रतिज्ञा करितात—

**तैत्तिरीयकसारस्य मयाऽऽचार्यप्रसादतः ।**
**विस्पष्टार्थरुचीनां हि व्याख्येयं सम्प्रणीयते ॥ ३ ॥**

अन्वयः—मया तैत्तिरीयकसारस्य इयं व्याख्या विस्पष्टार्थरुचीनां अर्थे आचार्यप्रसादतः संप्रणीयते ॥

अर्थ—मी तैत्तिरीयकसाराची ही व्याख्या विशेष प्रकारें स्पष्टार्थ जाणण्याची इच्छा करणाराकरिता आचार्यांच्या प्रसादानें करतों ( मजकडून ही व्याख्या केली जाते, असा मूळ श्लोकांत कर्मणि प्रयोग आहे ज्यांना शास्त्रव्युत्पत्ति झालेली असते, त्यांना सूत्रकारानीं निरूपिलेल्या उपनिषत्तात्पर्यावरूनच त्यांचा बोध होतो पण साधारण मतिमंदांना त्यावरून

बोध होऊं शकत नाहीं. यास्तव तशा अगदीं स्पष्टार्थाची इच्छा करणारां-करितां हें व्याख्यान आहे, असा भाष्यकारांचा आशय आहे.) २.

'या उपनिषदाची निराळी व्याख्या करण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण कर्मविचारांतच त्याचा अर्थ येऊन गेला आहे, आणि निःश्रेयस ह्म० मोक्ष हें प्रयोजन कर्मांच्या अनुष्ठानानेंच सिद्ध होणें शक्य आहे,' असें कोणी ह्मणेल ह्मणून भाष्यकार कर्मकांडाचें प्रयोजन सांगतात—

**नित्यान्यधिगतानि कर्माण्युपात्तदुरितक्षयार्थानि, काम्यानि च फलार्थिनां पूर्वस्मिन्ग्रन्थे ॥**

*अन्वयः—पूर्वस्मिन्ग्रन्थे उपात्तदुरितक्षयार्थानि नित्यानि कर्माणि अधिगतानि फलार्थिनां काम्यानि च कर्माणि अधिगतानि ॥*

अर्थ—पूर्व ग्रथांत ( ह्म० कर्मकांडांत ) संचित पापाचा क्षय व्हावा यासाठीं सांगितलेल्या ( पाप-क्षय हें ज्याचें प्रयोजन आहे, अशा ) नित्य कर्मांचें ज्ञान झालें ( तीं कर्में कळलीं ). त्याचप्रमाणें फलाची इच्छा कर-णाऱ्या पुरुषांना त्या त्या फलासाठीं करावयास उचित असलेल्या काम्य कर्मांचेंही ज्ञान झालें. ( वरील शंकेचें समाधान—जैमिनीनें ' अथातो धर्म-जिज्ञासा ' या सूत्रांत धर्मशब्दाचा उल्लेख करून साध्य धर्माचाच विचार आरंभिला आहे. त्यामुळें उपनिषदें गतार्थ झालेलीं नाहींत; त्यांचा अर्थ धर्मविचारांत-कर्मविचारांत-होऊन गेलेला नाही. 'पुरुष धर्माचरणानें पापाचा क्षय करतो,' अशा अर्थाचें श्रुतिवाक्य असल्यामुळें जिवंत मनुष्याला अवश्य कर्तव्य असलेलीं कर्में संचित कर्माचा क्षय व्हावा, यासाठीं आहेत. मोक्षप्राप्तीकरितां तीं नाहींत. त्याचप्रमाणें स्वर्ग, पशु इत्यादिकांची इच्छा करणाऱ्या पुरुषांकरितां काम्य कर्में आहेत. तींही मोक्षाकरितां नाहींत. कारण ज्यांना स्वर्गाची इच्छा असेल त्यानें अमुक करावें, पशूंची इच्छा असेल त्यानें अमुक करावें; इत्यादि विधानांप्रमाणें ज्याला मोक्षाची इच्छा असेल त्यानें अमुक कर्म करावें, असें विधान कोठेंही नाहीं. यास्तव कर्मांचें फळ संसार हेंच आहे. )

याप्रमाणें कर्मकांडाचा अर्थ सांगून त्यात ज्याचा विचार केलेला नाहीं अशा उपनिषदाचें प्रयोजन सांगतात—

**इदानीं कर्मोपादानहेतुपरिहाराय ब्रह्मविद्या प्रस्तूयते ॥**

अर्थ—आता कर्माच्या उपादानामध्यें ह्म० अनुष्ठानामध्यें जो हेतु त्याच्या निवृत्तीकरिता ( या ग्रंथात ) ब्रह्मविद्येचा आरंभ केला जातो ( वास्तव उपनिषदें कर्माचें त्याच्या हेतूसह उन्मूलन करणारीं असल्यामुळें कर्मकांडाच्या विरुद्ध आहेत त्यामुळें कर्मकांडात तीं गतार्थ होऊं शकत नाहींत.)

'अहो पण कर्मानुष्ठानाचा हेतु नियोगआहे ( नियोग ह्मणजे 'हें कर' अशा प्रकारचें विधिवाक्य ) तो प्रमाणसिद्ध असल्यामुळें त्याचा विषयीं विरोध संभवत नाहीं ' या शंकेचा परिहार करितात—

**कर्महेतुः कामः स्यात् । प्रवर्तकत्वात् । आप्तकामाना हि कामाभावे स्वात्मन्यवस्थानात् प्रवृत्त्यनुपपत्तिः । आत्मकामित्वे चाप्तकामता । आत्मा हि ब्रह्म । तद्विदो हि परप्राप्तिं वक्ष्यति । अतोऽविद्यानिवृत्तौ स्वात्मन्यवस्थानं परप्राप्तिः । " अभयं प्रतिष्ठां विन्दते ' एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति ' इत्यादि श्रुतेः ॥**

अर्थ—कर्माचा हेतु काम आहे ( नियोग नव्हे ) कारण काम पुरुषाचा प्रवर्तक आहे ( अमुक साध्याचें ह अमुक साधन आहे, एवढेंच शास्त्र सांगतें. तें ऐकून ज्याचा ज्या विषयीं अभिलाष असतो, तो त्यामध्यें कामामुळेंच प्रवृत्त होतो वास्तव कामच प्रवर्तक आहे नियोग नव्हे काम असला तरच पुरुषाची प्रवृत्ति होते, असा काम व प्रवृत्ति याचा अन्वय दाखवून कामाच्या अभावीं प्रवृत्तीचाही अभाव असतो असा व्यतिरेक दाखवितात —) कारण ज्याला सर्व काम प्राप्त झाले आहेत, ज्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत अशा पुरुषाचें कामाच्या अभावीं स्वात्म्यामध्यें ( स्वरूपामध्य ) अवस्थान होत असल्यामुळ त्याच्या प्रवृत्तीची अनुपपत्ति होते. ( अहो पण इष्ट विषयाची प्राप्ति झाली ह्मणजे कामाची निवृत्ति होते, असा अनुभव आहे त्यामुळ इष्ट विषयप्राप्ति हाच कामनिवृत्तीचा

हेतु आहे. विद्या कामनिवृत्तीचा हेतु नव्हे तेव्हां कर्मांच्या हेतूचा परिहार करण्यासाठीं विद्येचा आरंभ आहे, असें कसें ह्मणता ? ' अशी शंका घेऊन सांगतात. ) *आत्म्याची कामना झाली कीं आप्तकामता सिद्ध होते* ( अर्थात् इष्ट विषयाची प्राप्ति झाली असता कामाची तात्कालिक शांति होते, सर्वथा उच्छेद होत नाहीं. कारण कामाचा जर सर्वथा उच्छेद झाला असता तर पुनः विषयाची आकांक्षा झाली नसती. पण इतर विषय तर राहिलेच, पण त्या विषयाचीही थोड्याच वेळानें पुनः कामना होते, असा अनुभव आहे. यास्तव विषयप्राप्ति झाली असता क्षणभर निवृत्त होणारी जी तृप्ति ती खरी कामनिवृत्ति नव्हे. आत्मा हीच एक वस्तु आहे. त्याहून दुसरी वस्तूच नाहीं, अशी दृढ भावना होणें हीच आत्मकामना आहे. ती झाली असतां पुरुष आप्तकाम होतो. ( आप्तकाम ह्म० ज्याला सर्व काम प्राप्त आहेत असा, निष्काम, तृप्त. कारण ज्याला आत्म्याचें अद्वय आनंदरूप माहीत नसतें तोच विषयांना आत्मव्यतिरिक्त पाहतो व त्यांची इच्छा करतो. त्यामुळें काम आत्म्याच्या अज्ञानामुळं उद्भवणारा आहे, हें निर्विवाद आहे. ह्मणूनच त्या कामाच्या निवृत्तीकरितां आत्मविद्येचा आरंभ केला जातो. ) आणि आत्माच ब्रह्म आहे. ( त्यामुळें कर्म-हेतु जो काम त्याच्या निवृत्तीसाठीं ब्रह्मविद्या आरंभिली जाते. ) आनन्दमय परमात्म्याला जाणणाऱ्या पुरुषालाच परप्राप्ति होते, असें श्रुति पुढें सांगेल. यास्तव अविद्येची निवृत्ति झाली असता स्वात्म्यामध्यें, स्वत च्या अविनाशी स्वरूपामध्यें स्थित होणें ही परप्राप्ति आहे. ' अभयं प्रतिष्ठां विन्दते ' ' एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति ' इत्यादि श्रुति याविषयीं प्रमाण आहे ( रत्न ४ पृष्ठ ८६ पहा. )

येणेंप्रमाणें उपनिषदें कर्मकांडानें गतार्थ झालेलीं नाहींत व कर्मांच्या अनुष्ठानानें स्वरूपावस्थानरूप मोक्ष संभवत नाहीं; यास्तव उपनिषद्वाच्या व्याख्यानाचा आरंभ करणें उचित आहे, असें सांगून पुनः त्याचा आरंभ करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, असें ह्मणणाऱ्या त्याच वाक्याचा अभिप्राय प्रगट करितात.—

**काम्यप्रतिषिद्धयोरनारम्भादारब्धस्य चोपभोगेन क्षयान्नित्यानुष्ठानेन प्रत्यवायाभावादयत्नत एव स्वात्मन्यवस्थानं मोक्षः ॥**

अर्थ—काम्य व निषिद्ध कर्मांचा आरंभच केलेला नसल्यामुळें; आरब्ध कर्मांचा, त्याच्या फळाचा उपभोग घेतल्यामुळें क्षय झाल्याकारणानें व नित्य कर्मांच्या अनुष्ठानानें प्रत्यवायाचा अभाव झाल्यामुळें अनयासानेंच *स्वात्म्यामध्यें अवस्थान, हा मोक्ष सिद्ध होतो.* (*कारण काम्य व निषिद्ध* कर्मांचें अनुष्ठान, प्रारब्धाचा अवशेष, व प्रत्यवायप्राप्ति हीं पुनर्जन्माचीं कारणें आहेत. यास्तव त्यांचा अभाव होतांच आगामि शरीराची उत्पत्ति होत नाहीं आणि शरीराच्या अभावीं स्वरूपावस्थानरूप मोक्ष यत्नावाचूनच सिद्ध होतो. ह्मणजे शरीराच्या उत्पत्तीचें कांहीं कारणच न राहिल्यामुळें मोक्षाकरितां निराळा यत्न करावा लागत नाहीं. अर्थात् मोक्ष अन्य उपायानें साध्य होण्यासारखा जर आहे तर ज्ञानाकरितां उपनिषदांच्या व्याख्यानास आरंभ करण्याची काय आवश्यकता आहे, असा भावार्थ.)

आतां याचविषयीं दुसरें मत सांगतात.—

**अथवा निरतिशयायाः प्रीतेः स्वर्गशब्दवाच्यायाः कर्महेतुत्वात्कर्मभ्य एव मोक्ष इति चेत् ।**

अर्थ—किंवा ' स्वर्गशब्दवाच्यायाः निरतिशयायाः प्रीतेः कर्महेतुत्वात् कर्मभ्यः एव मोक्षः इति चेत्—' अथवा स्वर्गशब्दवाच्य निरतिशय प्रीतीला कर्महेतुत्व असल्यामुळें कर्मापासूनच मोक्ष होतो, असें ह्मणाल (तर तें बरोबर नाहीं. ज्योतिष्टोमादि जें स्वर्गाचें साधन तेंच मोक्षाचें साधन आहे. कारण स्वर्ग या नांवाच्या निरतिशय प्रीतीचा मोक्षावाचून इतर अवस्थेंत संभव नाहीं. कारण शरीर असेपर्यंत क्लेश होणें, अत्यंत अवश्य आहे, असा भावार्थ.)

*यातील पहिलें मत हा ऐकभविक पक्ष आहे. ऐकभविक ह्म० सर्व* संचित कर्मांमुळें एकच उत्तर जन्म प्राप्त होतो, अशी समजूत. यास्तव भाष्यकार प्रथम त्या मतानेंच निरसन करितात—

न। कर्मानेकत्वात्। अनेकानि ह्यारब्धफलान्यनारब्धफलानि चानेकजन्मान्तरकृतानि विरुद्धफलानि कर्माणि सम्भवन्ति। अतस्तेष्वनारब्धफलानामेकस्मिञ्जन्मन्युपभोगक्षयासंभवाच्छेषकर्मनिमित्तशरीरारम्भोपपत्तिः कर्मशेषसद्भावसिद्धिश्च। "तद्य इह रमणीयचरणाः" "ततः शेषेण" इत्यादिश्रुतिस्मृतिशतेभ्यः॥

अर्थ—तें बरोबर नाहीं. कारण कर्में अनेक आहेत. 'आरब्धफलानि, अनारब्धफलानि च अनेकजन्मान्तरकृतानि विरुद्धफलानि कर्माणि अनेकानि संभवन्ति हि–' ज्यांच्या फलांना आरंभ झाला आहे व ज्यांच्या फलांना आरंभ झालेला नाहीं, अशीं अनेक जन्मामध्यें आचरलेलीं व विरुद्ध फळें देणारीं अशी कर्में अनेक संभवतात, हें श्रुतींत प्रसिद्ध आहे. यास्तव त्यांतील ज्यांच्या फलांना आरंभ झालेला नाहीं, जीं कर्में फलोन्मुख झालेलीं नाहींत त्यांचा एका जन्मांतील फलोपभोगानें क्षय होणें संभवत नाहीं. त्यामुळें अवशिष्ट राहिलेल्या कर्माच्या योगानें शरीराचा आरंभ होऊं शकतो आणि कर्मांच्या शेषाचीही सिद्धि होते. याविषयीं 'या लोकीं जे रमणीय (शुभ) आचरण करणारे असतात त्यांना देवादिकांची शुभ योनि प्राप्त होते' (आणि जे अशुभ आचरण करणारे असतात त्यांना कुत्रा, चांडाल इत्यादिकांची अशुभ योनि प्राप्त होते) 'उपभोग घेऊन राहिलेल्या कर्माच्या योगानें जीवाला उत्तर शरीर प्राप्त होतें.' इत्यादि शेंकडों श्रुति–स्मृति–वचनें प्रमाण आहेत. (तात्पर्य वर्तमान शरीरानें काम्य व निषिद्ध आचरण जरी न केलें तरी संचित कर्मच अनेक प्रकारचें असतें. त्यामुळें एकाच जन्मांत त्याचा उपभोगानें क्षय होऊं शकत नाहीं. कर्में जर एका प्रकारचींच असतीं तर सर्व तीं मिळून एका शरीराचा आरंभ होतो व त्यामुळें त्या शरीरानेंच त्यांच्या फलांचा उपभोग घेतल्यानें त्यांचा क्षय होऊन संचित कर्मच उरत नाहीं, असें ह्मणतां आलें असतें; पण संचित कर्में एकाच प्रकारचीं नसतात. तर तीं विरुद्ध फळें देणारीं असतात. त्यामुळें एकाच शरीरानें त्या सर्वांच्या परस्परविरुद्ध फळांचा उपभोग संभवत नाहीं. यास्तव प्रबल कर्म दुर्बल कर्माला

प्रतिबंध करून आपलें फळ अगोदर भोगावयास लावते आणि त्यानंतर दुर्बल कर्मांना अवकाश मिळतो तस्मात् एकाच शरीरानें सर्व कर्मांचा फळभोग संभवत नाहीं )

आता यावर तुह्मी कदाचित् ह्मणाल कीं,

इष्टानिष्टफलानामनारब्धाना क्षयार्थानि नित्यानीति चेत्।

अर्थ—इष्ट व अनिष्ट अशीं दोन्हीं प्रकारचीं फळें देणाऱ्या संचित कर्मांच्या क्षयाकरिता नित्य कर्में आहेत

न। अकरणे प्रत्यवायश्रवणात्। प्रत्यवायशब्दो ह्यनिष्टविषय। नित्याकरणनिमित्तस्य प्रत्यवायस्य दुःखरूपस्याऽऽगामिनः परिहारार्थानि नित्यानीत्यभ्युपगमान्नानारब्धफलकर्मक्षयार्थानि।

अर्थ—तर तें बरोबर नाहीं कारण नित्य कर्मांचें अनुष्ठान जर न केलें तर प्रत्यवायप्राप्ति होते, असें शास्त्रात सांगितलें आहे. प्रत्यवाय हा शब्द नेहमींच अनिष्टविषय आहे ‘नित्यानि नित्याकरणनिमित्तस्य दुःखरूपस्य प्रत्यवायस्य परिहारार्थानि इति अभ्युपगमात् न अनारब्धकर्मक्षयार्थानि’–नित्य कर्में, नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणें, या निमित्तामुळें उत्पन्न होणाऱ्या दुःखरूप व आगामि ( भविष्यत्कालीन ) प्रत्यवायाच्या परिहारासाठीं आहेत, असा सिद्धांत असल्यामुळें तीं ज्याच्या फलास आरंभ झाला आहे अशा कर्मांच्या क्षयासाठीं आहेत, असें ह्मणता येत नाहीं.

बरें, ‘मुमुक्षूनें केलेलीं नित्यादि कर्में संचित कर्मांचा क्षय करण्यासाठींच आहेत,’ असें जरी समजलें तरी इष्टसिद्धि होत नाहीं, असें सांगतात–

यदि नामानारब्धकर्मक्षयार्थानि नित्यानि कर्माणि तथाऽप्यशुद्धमेव क्षपयेयुर्न शुद्धम्। विरोधाभावात्। न हीष्टफलस्य कर्मणः शुद्धरूपत्वान्नित्यैर्विरोध उपपद्यते। शुद्धाशुद्धयोर्हि विरोधो युक्तः॥

अर्थ—आतां प्रारब्धकर्मांच्या क्षयासाठीं नित्य कर्में आहेत, असें जरी समजलें तरीसुद्धां तीं अशुद्ध कर्मांचाच क्षय करूं शकतील, शुद्ध कर्मांचा क्षय करूं शकणार नाहींत. कारण नित्य कर्में व शुद्ध कर्में यांचा

विरोध नाहीं. ज्यांचें फळ इष्ट आहे अशा कर्माला शुद्धरूपत्व असल्यामुळें ( ह्म० इष्ट फळ देणारीं कर्मे शुद्ध असल्यामुळें ) त्यांचा नित्य कर्माशीं विरोध संभवत नाहीं. कारण शुद्ध व अशुद्ध याचाच विरोध असणें सयुक्तिक आहे.

शिवाय विवेकवल असल्यावांचून काम्यकर्माचा त्याग करतां येत नाहीं. कारण मूल अज्ञान असेपर्यंत कामाचा उद्भव होणें, अगदीं साहजिक आहे, असें सांगतात—

**न च कर्महेतूनां कामानां ज्ञानाभावे निवृत्त्यसंभवादशेषकर्मक्षयोपपत्ति । अनात्मविदो हि कामोऽनात्मफलविषयत्वात्स्वात्मनि च कामानुपपत्तिर्नित्यप्राप्तत्वात्स्वयं चात्मा परं ब्रह्मेत्युक्तम् ॥**

अर्थ—' ज्ञानभावे कर्महेतूनां कामानां निवृत्त्यसंभवात् न अशेषकर्मक्षयोपपत्तिः ' ज्ञानाच्या अभावीं कर्माला कारण होणाऱ्या कामाची निवृत्ति होण्याचा असंभव असल्यामुळें सर्व कर्माचा क्षय होऊं शकत नाहीं. अनात्मज्ञानालाच काम होतो. कारण तो अनात्मफलविषय असतो. ( ह्म० त्या कामाचा विषय अनात्मरूप वस्तु असते. ) स्वात्म्याविषयीं काम होणें अनुपपन्न आहे. कारण आत्मा नित्य- प्राप्त असतो, आणि स्वतः आत्माच परब्रह्म आहे, हें वर सांगितलेंच आहे. ( ह्म० सर्व आत्मा आहे, असें पाहणारांना तत्त्वतः विषयच नाहींसा होत असल्यामुळें कामना होत नाहीं. भोजनादिकविषयींच्या प्रवृत्तीला अत्यंत अवश्य असलेला जो काम तो मोक्षप्रतिबंधक होत नसल्यामुळें वस्तुतः कामच नव्हे. तर कामाभास आहे; आणि स्वतः आत्माच ब्रह्म असल्यामुळें आत्मज्ञांना अर्चिरादि मार्गानें ब्रह्मप्राप्ति करून घेण्याची इच्छा नसते. )

आता प्रत्यवायपरिहारार्थ नित्य कर्मे आहेत, असें जें ह्मणणें आहे त्याविषयीं भाष्यकार सांगतात—

**नित्यानां चाकरणमभावस्ततः प्रत्यवायानुपपत्तिरिति । अतः पूर्वोपचितदुरितेभ्यः प्राप्यमाणायाः प्रत्यवायक्रियाया नित्याकरणं लक्षणमिति ॥**

अर्थ—नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणें, हा कर्माचा अभाव आहे. त्या अभावापासून प्रत्यवायरूप भावाची उत्पत्ति होणें युक्त नव्हे. ( कारण आगामि दुःखालाच प्रत्यवाय ह्मणतात. त्यामुळें तो भावरूप आहे; त्याची अभावापासून उत्पत्ति होणें युक्त नव्हे. ) यास्तव पूर्वी संपादन केलेल्या पापांमुळें प्राप्त होणाऱ्या प्रत्यवाय क्रियेचें नित्य कर्माचें अनुष्ठान न करणें, हें लक्षण आहे. ( ह्म० यानें जर यथाशास्त्र नित्य-नैमित्तिक कर्मांचें अनुष्ठान केलें असतें तर संचित पापाचा क्षय झाला असता. पण यानें तें केलेलें नाहीं. ह्मणून ' पापः पापेन ' ह्म० पापाचरणानें पापपुरुष होतो, या न्यायानें हा पापी झाला आहे, असें शिष्ट ओळखतात. त्यामुळें )—

'अकुर्वन्विहितं कर्म' इति शतुर्नानुपपत्तिः। अन्यथाऽभावाद्भावोत्पत्तिरिति सर्वप्रमाणव्याकोप इति। अतोऽयत्नतः स्वात्मन्यवस्थानमित्यनुपपन्नम् ॥

अर्थ—( अकुर्वन् विहितं कर्म निन्दितं च समाचरन्। प्रसज्जंश्चेन्द्रियार्थेषु नरः पतनमृच्छति ॥' ह्म० विहित कर्म न करणारा, निंदित कर्म करणारा व इंद्रियार्थांमध्यें प्रसक्त होणारा नर पतन पावतो; या वाक्यांतील अकुर्वन्, समाचरन् व प्रसज्जन्, या पदांमधील ) शतृप्रत्ययाची अनुपपत्तिही होत नाहीं. ( कारण तो प्रत्यय लक्षण व हेतु अशा दोन अर्थी आहे. त्यामुळें नित्य कर्मांचें अनुष्ठान न करणें, या कारणानें प्रत्यवाय होतो, असें ह्मणतां येत नाहीं. कारण ) तसें जर न मानलें तर अभावापासून भावाची उत्पत्ति होते, असें ठरून सर्व प्रमाणांचा बाध होतो. ( भावरूप कार्याचें भावरूप कारण असतें, असें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं ठरलेलें आहे. यास्तव शतृप्रत्ययाच्या बळावर अभावही हेतु होतो, असें ह्मटल्यास सर्व प्रमाणांशीं विरोध येतो. ' अहो पण तुह्मीही अननुष्ठानाला प्रत्यवायाचें लक्षण मानतां. भाट्ट मीमांसक अनुपलंभाला अभावज्ञानाचें कारण मानतात. तार्किकही प्रतिबंधकाभावाला व त्याच्या प्रागभावाला त्यां त्या कार्यांचा व्यवस्थापक मानतात. तेव्हां भावच कार्याचें कारण

होतें, अभाव कार्याचें कारण होऊं शकत नाहीं, असें कसें ह्मणतां' असें कोणी विचारील तर त्याचें उत्तर असें.-अभाव स्वरूपतः ( खुद्द, जातीनें ) कोणत्याही कारणाचें कार्य होत नाहीं. पण त्याचें ज्ञान प्रत्यवायाचें सूचक आहे. असें आम्ही समजतों. यास्तव नित्य कर्म, अनुष्ठान न करणें या दोषामुळें प्राप्त होणारा जो प्रत्यवाय त्याच्या परिहारार्थ आहे, असें ह्मणतां येत नाहीं. तर ' कर्माच्या योगानें पितृलोक, हे सर्व पुण्यलोकभाक् होतात; ' इत्यादि श्रुति-वचनांच्या अनुसार त्यांचें पितृलोक-प्राप्ति हें फळ आहे. तस्मात् नित्य कर्माचें अनुष्ठान केलें, ह्मणजे शरीराचा उद्भव होत नाहीं, असें ह्मणतां येत नाहीं. )

आतां पूर्वोक्त दुसऱ्या मताचा परिहार करितात—

**यच्चोक्तं निरतिशयप्रीतेः स्वर्गशब्दवाच्यायाः कर्मनिमित्तत्वात्कर्माऽऽरब्ध एव मोक्ष इति । तन्न । नित्यत्वान्मोक्षस्य । न हि नित्यं किंचिदारभ्यते । लोके यदारब्धं तदनित्यमिति । अतो न कर्मारब्धो मोक्षः ॥**

*अर्थ—' स्वर्गशब्दवाच्याया: निरतिशयप्रीतेः कर्मनिमित्तत्वात् मोक्षः कर्मारब्धः एव इति यत् उक्तं तन्न ' स्वर्ग या शब्दानें वाच्य असलेली जी निरतिशय प्रीति ती कर्मनिमित्त असल्यामुळें ( ह्मणजे तिचें कारण कर्म असल्यामुळें ) मोक्ष कर्मारब्धच आहे. ( ह्म० तो कर्मापासूनच उद्भवतो ), असें जें ह्मटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण मोक्ष नित्य आहे; आणि कोणत्याही नित्य वस्तूचा आरंभ केला जात नाहीं. व्यवहारांत जें आरब्ध ( ह्म० कृतक ) तें अनित्य अशी व्याप्ति दिसते. यास्तव मोक्ष कर्मारब्ध नाहीं. आतां—*

**विद्यासहितानां कर्मणां नित्यारम्भसामर्थ्यमिति चेत् । न । विरोधात् । नित्यं चाऽऽरभ्यत इति विरुद्धम् । यद्धिनष्टं तदेव नोत्पद्यत इति । प्रध्वंसाभाववन्नित्योऽपि मोक्ष आरभ्य एवेति चेन्न । मोक्षस्य भावरूपत्वात् । प्रध्वंसाभावोऽप्यारभ्यत इत्याभावस्य विशेषाभावाद्विकल्पमात्रमेतत् । भावप्रतियोगी ह्यभावः ॥**

अर्थ--( मोक्ष केवळ कर्मानीं आरब्ध जरी नसला तरी ) विद्यायुक्त कर्मामध्यें नित्य मोक्षाचा आरम करण्याचें सामर्थ्य आहे, असें ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तसें ह्मणणें विरुद्ध आहे. नित्य वस्तु व ती आरब्ध होते, हें ह्मणणें विरुद्ध आहे. कारण जें नष्ट झालेलें असतें तेंच उत्पन्न होत नाहीं, असा नियम आहे आता तुह्मी कदाचित् ह्मणाल कीं, ' प्रध्वसाभाववत् मोक्ष नित्य. अपि आरभ्य. एव इति चेत्–' प्रध्वसाभावाप्रमाणें मोक्ष नित्य असला तरी आरभ्य आहे तर तं बरोबर नाहीं. कारण मोक्ष भावरूप आहे. ( तार्किक ' सादिरनन्त. प्रध्वसः ' असें ह्मणतात. (पहा दर्शन ६ वें पृष्ठ ७८ ) ह्म० प्रध्वंस उत्पन्न होणारा; कार्य आहे, असें ह्मणतात तं त्यांचें ह्मणणं मान्य करून हा दोष दिला आहे. प्रध्वंस जरी अनन्त असला तरी तो भावरूप नाहीं. पण वस्तुत· जर पाहिलें तर प्रध्वं-

**यथा ह्यभिन्नोऽपि भावो घटपटादिभिर्विशेष्यते। अभिन्न एव घटभावः पटभाव इति एवं निर्विशेषो भावाभावः क्रियागुणयोगात् द्रव्यादिवद्विकल्प्यते। न ह्यभाव उत्पलादिवद्विशेषेण सहभावी। विशेषणवत्त्वे भाव एव स्यात्॥**

*अर्थ*—ज्याप्रमाणें भाव अभिन्न असला तरी घट, पट इत्यादि विशेषणांच्या योगानें त्याच्यामध्यें विशेष आणतां येतो; ह्मणजे घटभाव, पटभाव अशा रीतीनें तो एकरूपच भाव अनेकरूप असल्यासारखा बोलला जातो त्याप्रमाणें सर्व विशेषरहित भावाचा अभाव क्रिया व गुण यांच्या संबंधानें द्रव्यादिकांप्रमाणें विकल्पिला जातो. ( पण त्यामुळें तो तत्त्वतः सविशेष होत नाहीं. शिवाय ) अभाव कमलादि पदार्थांप्रमाणें विशेषणसहभावी ( विशेषणयुक्त ) नसतो. कारण तो जर विशेषणवान् आहे असें ह्मटलें तर तोही भावच ठरेल. ( कारण विशेषण नेहमीं विशेष्याशीं संबंध ठेवतें, हें प्रसिद्ध आहे. पण प्रतियोगी विशेषणांशीं अभावाचा संबंध संभवत नाहीं. शिवाय घटाचा प्रध्वंसाभाव जर नित्य आहे, असें समजलें तर त्याचा प्रतियोगी घटही नित्य आहे, असें होईल. कारण घट जर अनित्य आहे, ह्मणून ह्मटलें तर त्याचा अभाव तरी नित्य कसा असणार? घटावाचून घटाचा अभाव उपलक्षित होऊं शकत नाहीं. बरें तो अभाव घटसहभावी आहे असें समजलें तर त्याच्या अभावत्वाचा बाध होतो. तस्मात् अभावाला प्रतियोगीमुळें सविशेष मानणें, युक्त नव्हे. )

याप्रमाणें प्रध्वंसाप्रमाणें मोक्ष नित्य आहे, असें जें वाद्याचें ह्मणणें होतें त्याचें निरसन करून आतां मोक्ष कर्मजन्य आहे, या शंकेचें निरसन निराळ्या प्रकारानें करितात—

**विद्याकमकर्तृनित्यत्वाद्विद्याकर्मसन्तानजनितमोक्षनित्यत्वमिति। चेन्न। गङ्गास्रोतोवत्कर्तृत्वस्य दुःखरूपत्वात्। कर्तृत्वोपरमे च मोक्षविच्छेदात्। तस्मादविद्याकामकर्मोपादानहेतुनिवृत्तौ स्वात्मन्यवस्थानं मोक्ष इति। स्वयं चात्मा ब्रह्म तद्विज्ञानादविद्यानिवृत्तिर्मोक्ष इति ब्रह्मविद्यार्थोपनिषदारभ्यते॥**

अर्थ—विद्या व कर्म याचा कर्ता नित्य असल्यामुळें विद्या व कर्म यांच्या संतानापासून ( अविच्छिन्न प्रवाहापासून ) झालेला मोक्षही नित्य आहे, असें जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण गंगेच्या प्रवाहाप्रमाणें कर्तृत्व दुःखरूप आहे. ( त्यामुळें तें असेपर्यंत मोक्ष संभवत नाहीं. ) आणि त्या कर्तृत्वाचा उपरम होतो ह्मणून जर ह्मटलें तर तो होतांच मोक्षाचाही विच्छेद होण्याचा प्रसंग येतो. यास्तव ( ह्म० मोक्ष ब्रह्मज्ञानावांचून प्राप्त होणें शक्य नसल्यामुळें ) अविद्या-काम-कर्म इत्यादिकांच्या हेतूची निवृत्ति झाली असता स्वात्मरूपांत अवस्थित होणें हा मोक्ष सिद्ध होतो. स्वतः आत्माच ब्रह्म आहे. यास्तव त्याच्या विज्ञानामुळें अविद्येची निवृत्ति होणें, हा मोक्ष आहे. ह्मणून ब्रह्मविज्ञानाकरितां उपनिषदाचा आरंभ केला जातो.

ब्रह्मविद्या या अर्थी ' उपनिषद् ' या शब्दाचा प्रयोग होत असल्यामुळेंही विद्याच मोक्षाचें कारण आहे, असें सिद्ध होतें, असें सांगतात—

उपनिषदिति विद्योच्यते । तच्छीलिनां गर्भजन्मजरादिनिशातनात्तदवसादनाद्वा ब्रह्मणो वोपनिगमयितृत्वादुपनिषद् । न यास्यां परं श्रेय इति । तदर्थत्वाद्ग्रन्थोऽप्युपनिषत् ॥

अर्थ—उपनिषद् या शब्दानें 'विद्या' सांगितली जाते. अर्थात् उपनिषद् ह्म० विद्या. ती आपलें परिशीलन करणाऱ्या पुरुषाच्या-गर्भ, जन्म, जरा-इत्यादिकांस शिथिल करीत असल्यामुळें किंवा त्यांचा नाश करीत असल्यामुळें अथवा ब्रह्मापाशीं नेऊन पोंचवीत असल्यामुळें तिला उपनिषद् असें ह्मणतात. ही विद्या निमित्तभूत झाली असतां परम श्रेय जें ब्रह्म तें जीवाच्या स्वात्मरूपानें अवस्थित होत नाहीं. ग्रंथ त्या विद्येकरितां असल्यामुळें त्यालाही उपनिषद् असें ह्मणतात.

———

याप्रमाणें उपनिषदाचें व्याख्यान समजवें, असें सिद्ध करून आत भाष्यकार त्याच्या प्रत्येक पदाचें व्याख्यान आरंभितात—

शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा ।
शं न इन्द्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः ॥

शं सुखं प्राणवृत्तेरहश्चाभिमानी देवतात्मा मित्रो नोऽस्माकं भवतु । तथैवापानवृत्तेरात्रेश्चाभिमानी देवतात्मा वरुणः । चक्षुष्यादित्ये चाभिमान्यर्यमा । बल इन्द्रः । वाचि बुद्धौ च बृहस्पतिः । विष्णुरुरुक्रमो विस्तीर्णक्रमः पादयोरभिमानी । एवमध्यात्मदेवताः शं नो भवत्विति सर्वत्रानुषङ्गः । तासु हि सुखकृत्सु विद्याश्रवणधारणोपयोगा अप्रतिबन्धेन भविष्यन्तीति तत्सुखकर्तृत्वं प्रार्थ्यते- शं नो भवत्विति ।

अर्थ—प्राणवृत्तीचा व दिवसाचा अभिमानी देवतात्मा मित्र आह्माला सुखावह होवो. त्याचप्रमाणें अपानवृत्तीचा व रात्रीचा अभिमानी देवतात्मा वरुण; चक्षु व आदित्य यांतील अभिमानी अर्यमा; बलांतील इंद्र; वाक् व बुद्धि यांतील बृहस्पति; ज्याचा क्रम ( पाउल ) विस्तीर्ण आहे, असा विष्णु दोन्ही पायांचा अभिमानी आहे. अशा रीतीनें या सर्व अध्यात्म देवता आह्मांला सुखावह होवोत. कारण त्या प्राण व इंद्रियें यांच्या अभिमानिनी देवता सुखकर झाल्या असतां विद्येचें श्रवण ( गुरुमुखानें वेदान्त तात्पर्याचा निश्चय ), धारण ( तिचें अविस्मरण ), व उपयोग ( शिष्यांस निवेदन ) हीं कार्ये कोणत्याही प्रकारच्या प्रतिबंधावांचून होऊं शकतात. यास्तव त्याचें सुखकर्तृत्व वरील ' शं नो मित्र० ' इत्यादि मंत्रानें प्रार्थिलें जातें ( ह्म० त्या सर्व देवतांनीं आपल्याला सुखकर व्हावें, अशी विद्यार्थी प्रार्थना करितो. )

---

नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि । ऋतं वदिष्यामि । सत्यं वदिष्यामि । तन्मामवतु । तद्वक्तारमवतु । अवतु माम् । अवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥१॥

ब्रह्म विविदिषुणा नमस्कारवन्दनक्रिये वायुविषये ब्रह्मविद्यो‐पसर्गशान्त्यर्थं क्रियेते । सर्वक्रियाफलानां तदधीनत्वाद्ब्रह्म वायु‐स्तस्मै ब्रह्मणे नमः । प्रह्वीभावं करोमीति वाक्यशेषः । नमस्ते तुभ्यं हे वायो नमस्करोमीति । परोक्षप्रत्यक्षाभ्यां वायुरेवाभिधीयते । किं च त्वमेव चक्षुराद्यपेक्ष्य बाह्यं संनिकृष्टमव्यवहितं प्रत्यक्षं ब्रह्मासि यस्मात्तस्मात्त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि । ऋतं यथाशास्त्रं यथा‐कर्तव्यं बुद्धौ सुपरिनिश्चितमर्थं तदपि त्वदधीनत्वात्त्वामेव वदि‐ष्यामि । सत्यमिति वाक्कायाभ्यां संपाद्यमानः सोऽपि त्वदधीन एव संपाद्य इति त्वामेव सत्यं वदिष्यामि । तत्सर्वात्मकं वाय्वाख्यं ब्रह्म मयैव स्तुतं सन्मां विद्यार्थिनमवतु विद्यासंयोजनेन । तदेव ब्रह्म वक्तारमाचार्यं वक्तृत्वसामर्थ्यसंयोजनेनावतु । मामवतु वक्ता‐रमिति पुनर्वचनमादरार्थम् । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिरिति त्रिर्व‐चनमाध्यात्मिकाधिभौतिकाधिदैविकानां विद्याप्राप्त्युपसर्गाणां प्र‐शमार्थम् ( इति श्रीशांकरभाष्ये प्रथमोऽनुवाकः )

अर्थ—-ब्रह्मजिज्ञासूकडून वायुविषयक नमस्कार वंदनक्रिया ब्रह्म‐विद्येला होणाऱ्या उपसर्गांची शांति व्हावी ह्मणून केल्या जातात. कारण सर्व क्रियांचीं फळें त्यांच्या अधीन आहेत. ब्रह्म ह्म० वायु, त्या वायुरूप ब्रह्माला मी नमस्कार करतों. नमस्कार ह्म० प्रह्वीभाव, नम्रपणा, तो करतों; असा क्रियापदाचा अध्याहार करावा. हे वायो, तुला नमस्कार असो. मी तुला नमस्कार करतों येथील ब्रह्म या परोक्ष व वायु या प्रत्यक्ष शब्दानें वायुच सांगितला जातो. ' यस्मात् बाह्यं चक्षुरादि अपेक्ष्य त्वं एव सन्निकृष्टं अव्यव‐हितं प्रत्यक्षं ब्रह्म असि ' ज्या अर्थी बाह्य चक्षुरादिकांच्या अपेक्षेनें तूंच समीप व आड पडद्यावाचून—साक्षात् ( कारण प्राणवायु प्रत्यक्ष आहे. ), तसेंच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस, त्याअर्थी मी तुलाच प्रत्यक्ष ब्रह्म ह्मणेन. ( चक्षु‐रादि इंद्रियांचें रूपदर्शनादि कार्यावरून अनुमान होतें, त्यामुळें तीं प्राणाहून बाह्य व व्यवहित आहेत. पण प्राण साक्षात् सान्निध्य असल्यामुळें भोक्त्या जीवाला संनिहित आहे. तसाच तो चक्षुरादिकांच्या अपेक्षेनें प्रत्यक्ष आहे.

'श्वास घेणें, इत्यादि प्राणकृत क्रियेमुळें शरीरादिकांचें पोषण होतें, हें प्रसिद्ध आहे. प्राणाला त्या बृंहणामुळें ( वृद्धीमुळें ) ब्रह्म ह्मटलें आहे. राजाला भेटण्याची इच्छा करणारा एकादा द्वारपालालाही तूंच राजा आहेस, असें ज्याप्रमाणें ह्मणतो त्याप्रमाणें हृदयस्थ ब्रह्माला पाहण्याची इच्छा करणारा मुमुक्षु हृदयस्थ ब्रह्माच्या द्वारपाल-प्राणाला उद्देशून 'तुलाच मी प्रत्यक्ष ब्रह्म ह्मणेन' असें देवतास्तुत्यर्थ ह्मणतो. तशीच आणखीही स्तुति करतो. ) मी तुलाच ऋत ह्मणेन. ऋत ह्म० बुद्धींत यथाशास्त्र व यथाकर्तव्य अतिशय निश्चित केलेला अर्थ. पण तें ऋतही तुझ्याच अधीन असल्यामुळें मी तुलाच तें ऋत ह्मणेन. वाक् व शरीर यांच्या योगानें संपादन केला जाणारा जो अर्थ त्याला सत्य असें ह्मणतात. तोही तुझ्या अधीन राहूनच संपादन करतां येतो. यास्तव मी तुलाच सत्य ह्मणेन. तें सर्वात्मक वायुसंज्ञक ब्रह्म माझ्याकडून अशा प्रकारें स्तुति केलें गेलेलें होत्सातें मज विद्यार्थ्याचें विद्या-संयोजनानें ह्म० मला विद्या देऊन रक्षण करो. तेंच ब्रह्म वक्ता जो आचार्य त्याला वक्तृत्वसामर्थ्य देऊन त्याचें रक्षण करो. माझें रक्षण करो; वक्त्याचें रक्षण करो. असें पुनरपि जें ह्मटलें आहे तें आदरार्थ आहे. 'ॐ शांतिः, शांतिः, शांतिः,' असें तीन वेळ जें ह्मटलें आहे तें विद्याप्राप्तीच्या आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक उपसर्गांच्या प्रशमनाकरितां ह्मटलें आहे. ( इति शीक्षाध्याये प्रथमोऽनुवाकः ) १.

---

ॐ शीक्षा व्याख्यास्यामः । वर्णः स्वरः मात्रा बल साम संतानः । इत्युक्तः शीक्षाध्यायः ॥ ( २ )

अर्थज्ञानप्रधानत्वादुपनिषदो ग्रन्थपाठे यत्नोपरमो मा भूदिति शीक्षाध्याय आरभ्यते—शिक्षा शिक्ष्यतेऽनयेति वर्णाद्युच्चारणलक्षणम् । शिक्ष्यन्त इति वा शिक्षा वर्णादयः । शिक्षैव शीक्षा । दैर्घ्यं छान्दसम् । तां शीक्षां व्याख्यास्यामो विस्पष्टमा समन्तात्कथयिष्यामः । चक्षिङो वा ख्याञादिष्टस्य व्याङ्पूर्वस्य व्यक्तवाक्कर्मण एतद्रूपम् । तत्र वर्णोऽकारादिः । स्वर उदात्तादिः ।

मात्रा ह्रस्वाद्याः । बलं प्रयत्नविशेषः । साम वर्णानां मध्यमवृत्त्योच्चारणं समता । संतानः संततिः । संहितेत्यर्थः । एष हि शिक्षितव्योऽर्थः । शिक्षा यस्मिन्नध्याये सोऽयं शीक्षाध्याय इत्येवमुक्त उदितः । उक्त इत्युपसंहार उत्तरार्थः (इति शांकरभाष्ये द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥)

अर्थ--उपनिषद् अर्थज्ञानप्रधान आहे (ह्म० त्याचें अर्थज्ञान हीं मुख्य गोष्ट आहे.) पण त्यासाठीं ग्रंथाच्या पाठाविषयींचा यत्न शिथिल होऊं नये ह्मणून शीक्षाध्यायाचा आरंभ केला जातो. जिच्या योगानें वर्णादिकांचें उच्चारण-शास्त्र शिकविलें जातें ती शिक्षा किंवा जिच्या योगानें वर्णादिक शिकविले जातात ती शिक्षा. शिक्षा या शब्दाचाच येथें 'शीक्षा' असा दीर्घ उच्चार केला आहे. हें दीर्घत्व छान्दस आहे. त्या शिक्षेचें आह्मी व्याख्यान करूं. ह्म० अगदीं स्पष्टपणें सर्व बाजूंनी कथन करूं. (हें रूप 'ख्या-प्रकथने' या धातूपासून 'वि' व 'आ' हे उपसर्ग लागून झालेलें आहे, असें समजून वरील व्याख्यान केलें. आता 'चक्ष्' धातूला 'ख्या' असा आदेश होऊन तें झालेलें आहे, असें सांगतात. कारण उपसर्गासह वरील ख्या--धातूचा प्रयोग उक्त नाहीं.) किंवा व्यक्त वाणी करणें या अर्थीं असलेल्या चक्षिङ्-धातूला आर्धधातुक प्रकारात 'ख्याञ्' असा जो आदेश होतो ह्मणून सांगितलें आहे त्या 'वि' व 'आ' या उपसर्गयुक्त धातूचें हें रूप आहे. असो; अकरादि वर्ण, उदात्तादि स्वर, ह्रस्वादिक मात्रा, विशेष प्रकारचा प्रयत्न हें बळ, वर्णांचें मध्यमवृत्तीनें उच्चारण करणें हें साम ह्म० समता, संतति हेंच संतान, अर्थात् संहिता; हाच अवश्य शिकण्यासारखा अर्थ आहे. अशा प्रकारची शिक्षा ज्या अध्यायांत आहे तो हा शीक्षाध्याय अशा प्रकारें सांगितला आहे. येथें 'उक्त' असें ह्मणून जो उपसंहार केला आहे तो पुढच्या ग्रंथासाठीं आहे. (इति द्वितीयोऽनुवाकः) २.

---

सह नौ यशः सह नौ ब्रह्मवर्चसम् ।

अधुना संहितोपनिषदुच्यते । तत्र संहितादुपनिषत्परिज्ञाननिमित्तं यद्यशः प्रार्थ्यते तच्चावयोः शिष्याचार्ययोः सहैवास्तु ।

तन्निमित्तं च यद्ब्रह्मवर्चसं तेजस्तच्च सहैवास्त्विति शिष्यवचनमाशीः। शिष्यस्य ह्यकृतार्थत्वात्प्रार्थनोपपद्यते नाऽऽचार्यस्य । कृतार्थत्वात्। कृतार्थोऽह्याचार्यो नाम भवति ।

अर्थ—आतां संहितेसंबंधीं वर्णाची उपासना ( प्रथम ) सांगितली जाते. (संहिता ह्मणजे वर्णांचा अतिशय संनिधि. उपासनेकरितां आपापल्या शाखेची संहिता घ्यावी. 'शं नो मित्र०' इत्यादि जो शांतिरूप आशीर्वाद आहे तो सर्व उपनिषदांचा भाग आहे यास्तव आतां येथें अगोदर या संहितोपनिषदाशींच संबंध ठेवणारा, त्याचा एक भाग, अशा प्रकारचा दुसरा स्वतंत्र आशीर्वाद सांगतात- ) तिच्या आरंभीं संहितादि उपनिषदांच्या ह्म० उपासनेच्या परिज्ञानामुळें प्राप्त होणाऱ्या ज्या यशाची प्रार्थना केली जाते तें यश आह्मां दोघांना ह्म० शिष्य व आचार्य या दोघांना एकाच वेळीं प्राप्त होवो. तसेंच त्या उपासनेच्या निमित्तानें प्राप्त होणारें जें ब्रह्मवर्चस या नावाचें तेज तेंही आह्मां उभयतांना एकाच वेळीं प्राप्त होवो. हा आशीर्वाद, हें शिष्याचें वचन आहे. कारण शिष्य कृतार्थ झालेला नसल्यामुळें त्याचीच अशी प्रार्थना उपपन्न होते. आचार्य कृतार्थ असल्यामुळें त्याची असली प्रार्थना उपपन्न होत नाहीं. जो कृतार्थ असतो तोच आचार्य होऊं शकतो.

अथातः सꣳहिताया उपनिषदं व्याख्यास्यामः । पञ्चस्वधिकरणेषु ।

अथानन्तरमध्ययनलक्षणविधानस्य, यतोऽत्यर्थं ग्रन्थभाविता बुद्धिर्न शक्यते सहसाऽर्थज्ञानविषयेऽवतारयितुमित्यतः संहिताया उपनिषदं संहिताविषयं दर्शनमित्येतद्ग्रन्थसंनिकृष्टामेव व्याख्यास्यामः । पञ्चस्वधिकरणेष्वाश्रयेषु ज्ञानविषयेष्वित्यर्थः ॥ १ ॥

अर्थ— 'अथ-' अध्ययनरूप विधानानंतर; 'अतः-' ज्या अर्थी ग्रंथाच्या पाठाविषयींच्या भावनेनें अतिशय भावित झालेली बुद्धि सहसा अर्थज्ञानविषयामध्यें आणविता येत नाहीं त्याअर्थी 'संहिताया उपनि-

---

१ या शब्दानें वस्तूची उपासना सोडून प्रथम शब्दाच्या उपासनेचें विधान करण्याचें कारण सांगतात.

पदं–' संहिताविषयक दर्शन; या ग्रंथाशीं अगदीं संनिकृष्ट असलेलीच उपासना अगदीं स्पष्टपणें सांगतों. ती पांच अधिकरणांमध्यें ह्म० आश्रयांमध्यें, ज्ञानविषयांमध्यें असा भावार्थ; सांगतों. (ज्ञानाचे विषय होणारे जे पांच आश्रय त्यांमध्यें संहिताविषयक दृष्टि कशी ठेवावी तें सांगतों.)

अधिलोकमधिज्यौतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्मम्। ता महासꣳहिता इत्याचक्षते।

कानि तानीत्याह—अधिलोकं लोकेष्वधि यद्दर्शनं तदधिलोकम्। तथाऽधिज्यौतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्ममिति। ता एताः पञ्चविषया उपनिषदो लोकादिमहावस्तुविषयत्वात्संहिताविषयत्वाच्च महत्यश्च ताः संहिताश्च महासंहिता इत्याचक्षते कथयन्ति वेदविदः॥

अर्थ—तीं पांच अधिकरणें कोणतीं तेंच सांगतात– ' अधिलोकं– ' लोकांविषयींचें जें दर्शन तें अधिलोक दर्शन. (लोकांचें ग्रहण करून ध्यानाचा विषय होणें, हें अधिलोक होय. अधिज्योतिष, अधिविद्य, अधिप्रज व अध्यात्म याचाही असाच अर्थ समजावा. ज्या या पांच विषयांविषयींच्या उपासना, त्यांना लोकादि महावस्तुविषयत्व व संहिताविषयत्व असल्यामुळें ह्म० त्यांचा विषय लोक, ज्योति, विद्या, प्रजा व आत्मा असा मोठा असल्यामुळें व संहिता हाही त्यांचा विषय असल्यामुळें वेदवेत्ते त्यांना महा संहिता ह्मणतात. मोठ्या अशा संहिता, असा ' महा-संहिता ' या सामासिक पदाचा विग्रह करावा. (त्यांतील विद्याशब्दानें विद्येनें प्रतिबद्ध झालेले आचार्यादि घ्यावे. तसेच प्रजाशब्दानें प्रजाप्रतिबद्ध पित्रादिक विवक्षित आहेत. आत्मा ह्म० भोक्ता. त्याला उद्देशून असलेलें जें जिह्वादि, तें सर्व येथें अध्यात्मशब्दानें विवक्षित आहे. या सर्व उपासनांमध्यें त्या त्या विषयाच्या अभिमानी देवता घ्याव्या. कारण देवतांवाचून दुसऱ्या कोणाला उपास्यत्व संभवत नाहीं. (*त्या ह्या महासंहिता आहेत, हा विधीचा शेष–अर्थवाद–आहे.* संहितोपासना कराव्या, हा उत्पत्तिविधि आहे. त्या

कशा कराव्या अशी आकांक्षा झाली असतां विनियोग विधि सांगतात. पण कर्ता एक असून अनुष्ठेय उपासना अनेक असल्यामुळें त्या क्रमानेंच होणार हें उघड आहे. यास्तव त्या क्रमाविषयीं विशेष नियम करण्यासाठीं अथ-शब्दाचा उपयोग करून त्या विधीस आरंभ करितात.—)

अथाधिलोकम् । पृथिवी पूर्वरूपम् । द्यौरुत्तररूपम् । आकाशः संधिः ( १ ) । वायुः संधानम् । इत्यधिलोकम् ॥ अथाधिज्यौतिषम् । अग्निः पूर्वरूपम् । आदित्य उत्तररूपम् । आपः संधिः । वैद्युतः संधानम् । इत्यधिज्यौतिषम् ॥ अथाधिविद्यम् । आचार्यः पूर्वरूपम् (२) । अन्तेवास्युत्तररूपम् । विद्या संधिः । प्रवचनꣳ संधानम् । इत्यधिविद्यम् ॥ अथाधिप्रजम् । माता पूर्वरूपम् । पितोत्तररूपम् । प्रजा संधिः । प्रजननꣳ संधानम् । इत्यधिप्रजम् ( ३ ) ॥ अथाध्यात्मम् । अधरा हनुः पूर्वरूपम् । उत्तरा हनुरुत्तररूपम् । वाक्संधिः । जिह्वा संधानम् । इत्यध्यात्मम् ॥

अथ तासां यथोपन्यस्तानामधिलोकं दर्शनमुच्यते । दर्शनक्रमविधक्षार्थोऽथशब्दः सर्वत्र । पृथिवी पूर्वरूपं पूर्वो वर्णः पूर्वरूपम् । संहितायाः पूर्वे वर्णे पृथिवीदृष्टिः कर्तव्येत्युक्तं भवति । तथा द्यौरुत्तररूपमाकाशोऽन्तरिक्षलोकः । संधिर्मध्यं पूर्वोत्तररूपयोः संधीयेते अस्मिन्पूर्वोत्तररूपे इति ॥ वायुः संधानम् । संधीयतेऽनेनेति संधानम् । इत्यधिलोकं दर्शनमुक्तम् ॥ अथाधिज्यौतिषमित्यादि समानम् ॥

अर्थ—आतां वर ज्याचा उपन्यास केला आहे, अशा त्या उपसनांतील अधिलोकदर्शन सांगितलें जातें. या प्रकरणांत सर्वच ठिकाणीं दर्शनाचा क्रम सांगण्याच्या इच्छेनें अथशब्द योजला आहे. संहितेचें पूर्वरूप पृथिवी आहे. पूर्ववर्ण हेंच पूर्वरूप आहे. संहितेच्या पूर्ववर्णाच्या ठिकाणीं पृथिवीदृष्टि करावी, असें येथें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें तिचें उत्तररूप

आकाश ह्म० अन्तरिक्षलोक आहे संधि ह्मणजे पूर्व व उत्तर रूपाचा मध्य, ज्यात पूर्वोत्तर रूपाचें संधान केलें जातें, ज्यात पूर्व व उत्तर रूप एकत्र केलें जाते वायु हें संधान आहे ह्म० ज्याच्या योगानें त्याचें संधान होतें. अशा रीतीनें हें अधिलोकदर्शन सांगितलें 'अथाधि ज्योतिष' इत्यादि पुढील पर्यायाचा अर्थ असाच करावा

इतीमा महा संहिता । य एवमेता महा संहिता व्याख्याता वेद। संधीयते प्रजया पशुभि । ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन ॥(३)

इतीमा इत्युक्ता उपप्रदर्श्यन्त । य. कश्चिदेवमेता महासंहिता व्याख्याता वेदोपास्त । वेदत्युपासनं स्याद्विज्ञानाधिकारात् 'इति प्राचीनयोग्योपास्स्व' इति च वचनात् । उपासनं च यथाशास्त्र तुल्यप्रत्ययसंततिरसंकीर्णा चातत्प्रत्ययै शास्त्रोक्तालम्बनविषया च । प्रसिद्धश्चोपासनशब्दार्थो लोके गुरुमुपास्ते राजानमुपास्त इति यो हि गुर्वादीन्संततमुपचरति स उपास्त इत्युच्यते। स च फलमाप्नोत्युपासनस्य । अतोऽत्रापि च य एवं वेद संधीयते प्रजादिभि स्वर्गान्तै प्रजादिफलान्याप्नोतीत्यर्थ ॥ (इति शांकरभाष्ये तृतीयोऽनुवाक ॥ ३ ॥)

अर्थ—'इति' व 'इमा' या शब्दांनीं पूर्वोक्त उपासनांचें उपप्रदर्शन (परामर्श) केलें जातें जो कोणी अशा रीतीनें या वर सांगितलेल्या महासंहिता जाणतो, ह्म० त्याची उपासना करतो, येथ 'वेद' या शब्दाचा उपासन हा अर्थ होतो कारण येथील हा अधिकार (प्रकरणारंभ) विज्ञानाचा ह्म० उपासनेचा आहे (ज्ञानाचा ह्म० जाणण्याचा नाहीं) तसेंच पुढें 'इति प्राचीनयोग्योपास्स्व' (ह्म० हे प्राचीनयोग्य, अशा प्रकारें तू उपासना कर) असें वचन आहे उपासना ह्म० यथाशास्त्र समान प्रत्ययांची—तुल्यप्रत्ययांची संतति (एकाच विषयाच्या प्रत्ययांचा अविच्छिन्न प्रवाह) परंतु ती अतत्प्रत्ययांनीं ह्म० त्या प्रत्ययाहून निराळ्या जातीच्या प्रत्ययांनीं संकीर्ण न झालेली

असली पाहिजे; व शास्त्रोक्त आलंबन हा त्या उपासनेचा विषय असला पाहिजे. ( अर्थात् शास्त्रोक्त आलंबनविषयक व भिन्न जातीय प्रत्ययांनीं असंकीर्ण अशा प्रकारच्या समान प्रत्ययाचा अविच्छिन्न प्रवाह ही उपासना होय ) व्यवहारांत गुरूची उपासना करतो, राजाची उपासना करतो इत्यादि वाक्यांत उपासनाशब्दाचा अर्थ प्रसिद्ध आहे. कारण जो गुरु, राजा, इत्यादिकांची सतत परिचर्या करतो तोच उपासना करतो, असें ह्मणतात; आणि त्यालाच उपासनेचें फळ मिळतें. यास्तव या संहितांमध्येंही जो अशा रीतीनें उपासना करतो तो प्रजादि-स्वर्गान्त फलांशीं संयुक्त केला जातो. ह्म० प्रजेपासून स्वर्गापर्यंत जेवढीं फळें आहेत तेवढीं सर्व त्याला प्राप्त होतात; असा याचा अर्थ. ( फलाची इच्छा करणाऱ्या पुरुषाकडून केलें जाणारें संहितोपासन इष्ट फळ यावयास समर्थ होतें. पण फलाची इच्छा न करणाऱ्या पुरुषानें जर तें केलें तर ब्रह्मविद्या हें त्याचें फळ मिळतें. ज्याला मेधा (ह्म० धारणाशक्ति ) नसते त्याला ब्रह्मज्ञान होऊं शकत नाहीं. यास्तव मेधाप्राप्तीकरितां केलेला जपही ब्रह्मविद्येच्या उपयोगी पडतो. ज्याच्यापाशीं संपत्ति नसते त्याला चित्तशुद्धीकरितां यागादिकांचें अनुष्ठान करतां येत नाहीं. यास्तव संपत्तीची इच्छा करणारासाठीं पुढें सांगितलेला होमही परंपरेनें ब्रह्मविद्येच्या उपयोगी आहे; असें या मुख्य ब्रह्मविद्येच्या समीप सांगितलेल्या उपासनादिकांचें महत्तात्पर्य जाणावें. इति शीक्षाध्याये तृतीयोऽनुवाकः ) ३.

---

यश्छन्दसामृषभो विश्वरूपः । छन्दोभ्योऽध्यमृतात्संबभूव । स मेन्द्रो मेधया स्पृणोतु । अमृतस्य देवधारणो भूयासम् । शरीरं मे विचर्षणम् ।।

यश्छन्दसामिति । मेधाकामस्य श्रीकामस्य च तत्प्राप्तिसाधनं जपहोमावुच्येते । " स मेन्द्रो मेधया स्पृणोतु " " ततो मे श्रियमावह " इति च लिङ्गदर्शनात् । यश्छन्दसां वेदानामृषभ इवर्षभः प्राधान्यात् । विश्वरूपः सर्वरूपः सर्ववाग्व्याप्तेः " तद्यथा शङ्कुना " इत्यादि श्रुत्यन्तरात् । अत एवर्षभत्वमोंकारस्य । ओंकारो ह्यत्रोपास्य इति ऋषभादिशब्दैः स्तुतिर्न्याय्यैवोंकारस्य । छन्दोभ्यो

वेदेभ्यो वेदा ह्यमृतं तस्मादमृतादधिसंबभूव। लोकदेववेदव्याहृतिभ्यः सारिष्ठं जिघृक्षोः प्रजापतेस्तपस्यत ओंकारः सारिष्ठत्वेन प्रत्यभादित्यर्थः। न हि नित्यस्योंकारस्याञ्जसैवोत्पत्तिरेव कल्प्यते। स एवंभूत ओंकार इन्द्रः सर्वकामेशः परमेश्वरो मा मां मेधया प्रज्ञया स्पृणोतु प्रीणयतु बलयतु वा। प्रज्ञाबलं हि प्रार्थ्यते। अमृतस्यामृतत्वहेतुभूतस्य ब्रह्मज्ञानस्य तदधिकारात्, हे देव धारणो धारयिता भूयासं भवेयम्। किंच शरीरं मे मम विचर्षणं विचक्षणं योग्यमित्येतत्। भूयादिति प्रथमपुरुषविपरिणामः।

अर्थ—ज्याला मेधेची व श्रीची कामना आहे त्याला त्यांच्या प्राप्तीचें साधन जप व होम सांगितला जातो. कारण त्यांत ' तो इंद्र मला मेधा देवो; ' आणि ' यास्तव मला श्री दे; ' असें लिंग दिसतें. असो; जो वेदांतील ऋषभासारखा आहे. कारण त्याला प्राधान्य आहे; विश्वरूप ह्म० सर्वरूप आहे; कारण त्यानें सर्व वाणीला व्यापलें आहे. याविषयीं 'ज्याप्रमाणें देंठानें ( शिरानीं ) सर्व पान व्यापलेलें असतें त्याप्रमाणे अकारानें सर्व वाणी व्यापलेली आहे,' अशा अर्थाची ' तद्यथा शङ्कुना० ' इत्यादि दुसरी श्रुति आहे. ह्मणूनच ओंकाराला ऋषभत्व आहे. ओंकारच येथें ( या प्रकरणांत ) उपास्य आहे. यास्तव ऋषभादि–शब्दांनीं त्याची स्तुति करणें न्याय्यच आहे. छंदांपासून ह्म० वेदांपासून; वेदच अमृत आहे. त्या अमृतापासून तो आधिक्यानें प्रादुर्भूत झाला. लोक, देव, वेद व व्याहृति यांपासून त्यांतील सर्वोत्कृष्ट सार काढून घेण्याची इच्छा करणाऱ्या व तप करणाऱ्या प्रजापतीला ओंकार अत्यंत साररूपानें भासला, असा याचा अर्थ. ( ह्म० ओंकार उत्पन्न झाला, असा ' संबभूव ' या पदाचा अर्थ न करितां तो प्रजापतीला भासला, असा करावा. ) कारण नित्य ओंकाराची साक्षात उत्पत्तिच झाली, अशी कल्पना करतां येत नाहीं. तो अशा प्रकारचा ओंकार, इंद्र, सर्व कामांचा ईश, परमेश्वर मला मेधेनें ह्म० प्रज्ञेनें प्रसन्न करो. किंवा बळयुक्त करो. येथें प्रज्ञाबळाची प्रार्थना केली जात आहे. 'हे देव, अमृतस्य

धारणः भूयासं—' हे देवा, मी अमृताचा ह्मणजे अमृतत्वाला कारण होणाऱ्या ब्रह्मज्ञानाचा, कारण ब्रह्मज्ञानप्रकरणाचा आरंभ झालेला आहे. 'धारणः' ह्म० धारण करणारा व्हावें. तसेंच माझें शरीर विचर्षण ह्म० विचक्षण (योग्य, असें तात्पर्य) होवो. पूर्व वाक्यांत 'भूयासं' असें जें उत्तम पुरुषीं पद आहे त्याचाच येथें 'भूयात्' असा प्रथम पुरुष करून घ्यावा.

जिह्वा मे मधुमत्तमा। कर्णाभ्यां भूरि विश्रुवम्। ब्रह्मणः कोशोऽसि मेधया पिहितः। श्रुतं मे गोपाय। आवहन्ती वितन्वाना (१)। कुर्वाणाऽचीरमात्मनः। वासा‍ꣳसि मम गावश्च। अन्नपाने च सर्वदा। ततो मे श्रियमावह। लोमशां पशुभिः सह स्वाहा। आ मा यन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा। विमाऽऽयन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा। प्र माऽऽयन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा। दमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा। शमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा। (२)।

जिह्वा मे मधुमत्तमा मधुमत्यतिशयेन मधुरभाषिणीत्यर्थः। कर्णाभ्यां श्रोत्राभ्यां भूरि बहु विश्रुवं व्यश्रवं[?] श्रोता भूयासमित्यर्थः। आत्मज्ञानयोग्यः कार्यकरणसंघातोऽस्त्विति वाक्यार्थः। मेधा च तदर्थमेव हि प्रार्थ्यते। ब्रह्मणः परमात्मनः कोशोऽसि। असेरिवो-पलब्ध्यधिष्ठानत्वात्। त्वं हि ब्रह्मणः प्रतीकं त्वयि ब्रह्मोपलभ्यते। मेधया लौकिकप्रज्ञया पिहित आच्छादितः स त्वं सामान्यप्रज्ञैरवि-दिततत्त्व इत्यर्थः। श्रुतं श्रवणपूर्वकमात्मज्ञानादिकं मे गोपाय रक्ष। तत्प्राप्त्यविस्मरणादि कुर्वित्यर्थः। जपार्था एते मन्त्रा मेधाकामस्य। होमार्थास्त्वधुना श्रीकामस्य मन्त्रा उच्यन्ते। आवहन्त्यानयन्ती। वितन्वाना विस्तारयन्ती। तनोतेस्तत्कर्मत्वात्। कुर्वाणा निर्वर्त-यन्ती। अचीरमचिरं क्षिप्रमेव। छान्दसो दीर्घः। चिरं वा कुर्वाणा। आत्मनो मम, किमित्याह—वासांसि वस्त्राणि मम गावश्च गाश्चेति यावत्। अन्नपाने च सर्वदैवमादीनि कुर्वाणा श्रीर्या तां ततो मेधानिर्वर्तनात्परमावहाऽऽनय। अमेधसो हि श्रीरनर्थायैवेति।

किंविशिष्टाम् । लोमशामजाव्यादियुक्तामन्यैश्च पशुभिः संयुक्तामा-वहेत्यधिकारदोंकार एवाभिसंबध्यते । स्वाहा, स्वाहाकारो होमा-र्थमन्त्रान्तज्ञापनार्थः । आयन्तु मामिति व्यवहितेन संबन्धः । ब्रह्मचारिणो वि माऽऽयन्तु प्रमाऽऽयन्तु दमायन्तु शमायन्त्वित्यादि ॥

अर्थ—माझी जिह्वा मधुमत्तमा ह्म० अतिशय मधुर भाषण करणारी असो; दोन कानांनीं ह्म० श्रोत्रेंद्रियांनीं मीं पुष्कळ ऐकावें. ह्म० मीं श्रोता व्हावें, असा अर्थ. शरीर व इंद्रियें यांचा संघात ( समुदाय ) आत्मज्ञानाला योग्य होवो, असा वाक्यार्थ. मेधाही त्याचसाठीं प्रार्थिली जाते. हे ओंकारा, तूं ब्रह्माचा परमात्म्याचा कोश आहेस. कारण तरवारीच्या म्यानाप्रमाणें तूं त्याच्या उपलब्धीचें अधिष्ठान आहेस. तूंच ब्रह्माचें प्रतीक आहेस. तुजमध्यें ब्रह्म उपलब्ध होतें. ( वाच्य ब्रह्म व वाचक ओंकार यांचा अभेद आहे, असें सांगण्याच्या इच्छेनें त्या अचेतन शब्दाची प्रार्थना केली आहे व त्याला ' इंद्र ' असें वर ह्मटलें आहे. मग असें जर आहे ह्मणजे प्रणव ब्रह्माहून भिन्न नसल्यामुळें इष्टफल देण्यास जर समर्थ आहे तर सर्वच त्याची उपा-सना कां करीत नाहींत, असें कोणी विचारील ह्मणून ह्मणतात. ) मेधेनें ह्म० लौकिक प्रज्ञेनें आच्छादित झालेला तो तूं सामान्य बुद्धिमानांना ज्ञात-तत्त्व होणारा नाहींस. ( ह्म० तुझें तत्त्व त्यांना ज्ञात झालेलें नाहीं. ) श्रुत ह्मणजे श्रवणपूर्वक आत्मज्ञानादिक. माझ्या श्रुताचें तूं रक्षण कर. त्याची प्राप्ति, अविस्मरण, इत्यादि कर, असा याचा अर्थ. ज्याला मेधेची इच्छा असते त्याच्या जपासाठीं हे मंत्र आहेत. आतां ज्याला श्रीची इच्छा असते त्याच्या होमाकरितां हे मंत्र सांगितले जातात.—आवहन्ती ह्म० आणणारी वितन्वाना ह्म० विस्तृत करणारी. कारण तनुधातूचा विस्तार करणें हा अर्थ आहे. आणि कुर्वाणा ह्म० करणारी. अचिरं ह्म० सत्वर. येथें ' अचीर ' असें जें दीर्घत्व आहे तें छान्दस आहे. किंवा चीरं ( चिरं ) कुर्वाणा ह्म० मला वस्त्रें, गायी इत्यादि दीर्घकाळ करणारी. ' मम वासांसि, च गावः, च अन्नपाने सर्वदा आवहन्ती च वितन्वाना

निम्नवता देशेन यन्ति गच्छन्ति । यथा च मासा अहर्जरं संवत्सरोऽहर्जरः । अहोभिः परिवर्तमानो लोकाञ्जरयतीत्यहानि चाऽस्मिञ्जीर्यन्त्यन्तर्भवन्तीत्यहर्जरः । तं च यथा मासा यन्त्येवं मां ब्रह्मचारिणो हे धातः सर्वस्य विधातः, मामायन्त्वागच्छन्तु सर्वतः सर्वदिग्भ्यः । प्रतिवेशः-श्रमापनयनस्थानमासन्नगृहमित्यर्थः । एवं त्वं प्रतिवेश इव प्रतिवेशस्त्वच्छीलिनां सर्वपापदुःखापनयनस्थानमसि, अतो मा मां प्रति प्रभाहि प्रकाशयाऽऽत्मानं प्रपद्यस्व च । मां रसविद्धमिव लोहं त्वन्मयं त्वदात्मानं कुर्वित्यर्थः । श्रीकामोऽस्मिन्विद्याप्रकरणेऽभिधीयमानो धनार्थः । धनं च कर्मार्थम् । कर्म चोपात्तदुरितक्षयाय । तत्क्षये हि विद्या प्रकाशते ।

तथा च स्मृतिः—

त्यात जिरतात, अन्तर्भूत होतात म्हणून तो अहर्जर होय त्या अहर्जराला मास असे जातात त्याप्रमाणें मजकडे ब्रह्मचारी हे धात्या, हे सर्वांच्या विधात्या, सर्व दिशांनी, सर्व बाजूनीं येवात प्रतिवेश ह्म० श्रम घालविण्याचें स्थान, शेजारच घर असा याचा भाव तसाच तू प्रतिवेशासारखा प्रतिवेश आहेस तुझें परिशीलन करणाऱ्या पुरुषाचें सर्व पाप व दुःख याच्या निरसनाचें स्थान आहेस. यास्तव मला आपलें स्वरूप प्रकट कर व प्राप्त हो रसायनक्रियेनें–रस करून एकरूप केलेल्या धातूप्रमाणें मला त्वन्मय–त्वद्रूप कर, असा याचा भावार्थ या विद्याप्रकरणामध्यें श्रीकामाचें जें कथन केलें आहे त धनासाठीं आहे धन कर्मासाठीं आहे, कर्मसंचित पापक्षयार्थ आहे, *आणि संचित पापाचा क्षय झाला असता विद्या प्रकाशमान होते याच अर्थी–* 'पाप कर्माचा क्षय झाल्यामुळें पुरुषाना ज्ञान होतें ज्याप्रमाणे स्वच्छ आरशाच्या तळावर ताड पाहतात त्याप्रमाणें ते आत्म्याला आपल्या अन्तःकरणात पाहतात ' अशी स्मृति प्रमाण आहे. ( इति चतुर्थोऽनुवाक ) ४

---

भूर्भुव सुवरिति वा एतास्तिस्रो व्याहृतय । तासामु ह स्मैतां चतुर्थीम् । माहाचमस्य प्रवेदयते । मह इति । तद्ब्रह्म । स आत्मा । अङ्गान्यन्या देवता । भूरिति वा अय लोक । भुव इत्यन्तरिक्षम् । सुवरित्यसौ लोक ( १ ) । मह इत्यादित्य । आदित्येन वाव सर्वे लोका महीयन्ते । भूरिति वा अग्नि । भुव इति वायु । सुवरित्यादित्य । मह इति चन्द्रमा । चन्द्रमसा वाव सर्वाणि ज्योतींषि महीयन्ते । भूरिति वा ऋच । भुव इति सामानि । सुवरिति यजूंषि ( २ ) ।

संहिताविषयमुपासनमुक्तं तदनु मेधाकामस्य श्रीकामस्य मन्त्रा अनुक्रान्तास्ते च पारम्पर्येण विद्योपयोगार्था एव । अनन्तरं व्याहृत्यात्मनो ब्रह्मणोऽन्तरुपासनं स्वाराज्यफलं प्रस्तूयते । भूर्भुव सुवरित्युक्तोपप्रदर्शनार्थं । एतास्तिस्र इति प्रदर्शितानां परामर्शार्थं

निम्नवता देशेन यन्ति गच्छन्ति । यथा च मासा अहर्जरं संवत्सरोऽहर्जरः। अहोभिः परिवर्तमानो लोकाञ्जरयतीत्यहानि वाऽस्मिञ्जीर्यन्त्यन्तर्भवन्तीत्यहर्जरः । तं च यथा मासा यन्त्येवं मां ब्रह्मचारिणो हे धातः सर्वस्य विधातः, मामायन्त्वागच्छन्तु सर्वतः सर्वदिग्भ्यः । प्रतिवेशः-श्रमापनयनस्थानमासन्नगृहमित्यर्थः। एवं त्वं प्रतिवेश इव प्रतिवेशस्त्वच्छीलिनां सर्वपापदुःखापनयनस्थानमसि, अतो मा मां प्रति प्रभाहि प्रकाशयाऽऽत्मानं प्रपद्यस्व च। मां रसविद्धमिव लोहं त्वन्मयं त्वदात्मानं कुर्वित्यर्थः । श्रीकामोऽस्मिन्विद्याप्रकरणेऽभिधीयमानो धनार्थः। धनं च कर्मार्थम्। कर्म चोपात्तदुरितक्षयाय। तत्क्षये हि विद्या प्रकाशते।

तथा च स्मृतिः—

ज्ञानमुत्पद्यते पुंसां क्षयात्पापस्य कर्मणः ।
यथाऽऽदर्शतले प्रख्ये पश्यन्त्यात्मानमात्मनि ॥ इति ॥

अर्थ— ‘अहं जने यशः असानि–’ मी जनसमूहांत यशस्वी व्हावें. ‘अहं वस्यसः श्रेयान् असानि–’ मी वसुतर किंवा वसुमत्तर याहून अतिशय प्रशस्य व्हावें. (वसु हा शब्द वस्–राहणें, किंवा आच्छादन करणें या धातूपासून झाला आहे. त्याचा अर्थ क्रमानें वसनशील किंवा पराच्छादनशील असा आहे. वसुतर ह्म० अतिशय वसु व वसुमत्तर ह्म० अतिशय वसुमान्) तसेंच त्या ब्रह्माच्या कोशभूत अशा तुला हे भग (भगवन्, पूजावन्–पूज्य,) मी प्रवेश करावा. तुजमध्यें प्रवेश करून, अनन्य (एकरूप) होऊन त्वद्रूपच व्हावें, असा याचा अर्थ. हे भग (भगवन्, पूजावन्) तो तूंही मजमध्यें प्रवेश कर. ह्मणजे आह्मी उभयतांचें एकरूप असो. त्या तुज सहस्रशाखायुक्त ह्म० बहु भेदयुक्त ब्रह्मामध्यें मी आपल्या पापाचरणाचें शोधन करतों. ज्याप्रमाणें व्यवहारांत जल उतरत्या प्रदेशानें जातें, किंवा जसे महिने अहर्जराप्रत प्राप्त होतात; अहर्जर ह्म० संवत्सर, दिवसांच्या योगानें परिवर्तमान पावणारा संवत्सर लोकांना जीर्ण करतो; किंवा अहर् ह्म० दिवस

त्यात जिरतात, अन्तर्भूत होतात म्हणून तो अहर्जर होय. त्या अहर्जराला मास जसे जातात त्याप्रमाणें मजकडे ब्रह्मचारी हे धात्या, हे सर्वांच्या विधात्या, सर्व दिशांनीं, सर्व बाजूंनीं येवोत. प्रतिवेश म्ह० श्रम घालविण्याचें स्थान, शेजारचें घर असा याचा भाव. तसाच तूं प्रतिवेशासारखा प्रतिवेश आहेस. तुझें परिशीलन करणाऱ्या पुरुषांचें सर्व पाप व दुःख यांच्या निरसनाचें स्थान आहेस. यास्तव मला आपलें स्वरूप प्रकट कर व प्राप्त हो. रसायनक्रियेनें–रस करून एकरूप केलेल्या धातूप्रमाणें मला त्वन्मय–त्वद्रूप कर, असा याचा भावार्थ. या विद्याप्रकरणामध्यें श्रीकामाचें जें कथन केलें आहे तें धनासाठीं आहे. धन कर्मासाठीं आहे, कर्मसंचित पापक्षयार्थ आहे; आणि संचित पापाचा क्षय झाला असतां विद्या प्रकाशमान होते. याच अर्थी–' पाप कर्मांचा क्षय झाल्यामुळें पुरुषांना ज्ञान होतें. ज्याप्रमाणें स्वच्छ आरशाच्या तळावर तोंड पाहतात त्याप्रमाणें ते आत्म्याला आपल्या अन्तःकरणांत पाहतात. ' अशी स्मृति प्रमाण आहे. ( इति चतुर्थोऽनुवाकः ) ४

---

भूर्भुवः सुवरिति वा एतास्तिस्रो व्याहृतयः । तासामु ह स्मैतां चतुर्थीम् । माहाचमस्यः प्रवेदयते । मह इति । तद्ब्रह्म । स आत्मा । अङ्गान्यन्या देवताः । भूरिति वा अय लोकः । भुव इत्यन्तरिक्षम् । सुवरित्यसौ लोकः ( १ ) । मह इत्यादित्यः । आदित्येन वाव सर्वे लोका महीयन्ते । भूरिति वा अग्निः । भुव इति वायुः । सुवरित्यादित्यः । मह इति चन्द्रमाः । चन्द्रमसा वाव सर्वाणि ज्योतींषि महीयन्ते । भूरिति वा ऋचः । भुव इति सामानि । सुवरिति यजूंषि ( २ ) ।

संहिताविषयमुपासनमुक्तं तदनु मेधाकामस्य श्रीकामस्य मन्त्रा अनुक्रान्तास्ते च पारम्पर्येण विद्योपयोगार्था एव । अनन्तरं व्याहृत्यात्मनो ब्रह्मणोऽन्तरुपासनं स्वाराज्यफलं प्रस्तूयते । भूर्भुवःसुवरित्युक्तोपप्रदर्शनार्थः । एतास्तिस्र इति प्रदर्शितानां परामर्शार्थः

परामृष्टाः स्मार्यन्ते वा इत्यनेन । तिस्र एता प्रसिद्धा व्याहृतयः स्मार्यन्ते तावत् । तासामियं चतुर्थी व्याहृतिर्मह इति । तामेतां चतुर्थीं महाचमसस्यापत्यं माहाचमस्यः प्रवेदयते । उ ह स्म, इत्येतेषां वृत्तानुकथनार्थत्वाद्विदितवान्ददर्शेत्यर्थः । माहाचमस्यग्रहणमार्षानुस्मरणार्थम् । ऋषिस्मरणमप्युपासनाङ्गमिति गम्यत इहोपदेशात् । येयं महाचमस्येन दृष्टा व्याहृतिर्मह इति तद्ब्रह्म महद्धि ब्रह्म । महश्च व्याहृतिः । किं पुनस्तत् ? स आत्मा । आप्नोतेर्व्याप्तिकर्मण । आत्मेतराश्च व्याहृतयो लोका देवा वेदाः प्राणाश्च मह इत्यनेन व्याहृत्यात्मनाऽऽदित्यचन्द्रब्रह्मान्नभूतेन व्याप्यन्ते यत अतोऽङ्गान्यवयवा अन्या देवता । देवताग्रहणमुपलक्षणार्थं लोकादीनाम् । मह इत्येतस्य व्याहृत्यात्मनो देवलोकादयः सर्वेऽवयवभूताः । यत आहाऽऽदित्यादिभिर्लोकादयो महीयन्त इति । आत्मनो ह्यङ्गानि महीयन्ते महनं वृद्धिरुपचयो महीयन्ते वर्धन्त इत्यर्थः । अयं लोकोऽग्निर्ऋग्वेदः प्राण इति प्रथमा व्याहृतिर्भूरिति । एवमुत्तरोत्तरैकैका चतुर्धा भवति ।

अर्थ—संहिताविषयक उपासन सांगितलें. त्यानंतर मेधेची कामना करणारा व श्रीची कामना करणारा यांच्या साठीं मंत्र सांगावयास आरंभ केला आहे. पण ते मंत्रही परंपरेनें विद्येच्या उपयोगाकरिताच आहेत. त्यानंतर आता स्वाराज्य हें ज्याचें फळ आहे, असें व्याहृतिरूप ब्रह्माचें अन्तःउपासन सांगावयास आरंभ करितात. (ब्र० व्याहृति हेंच ज्याचें शरीर आहे) अशा हिरण्यगर्भसंज्ञक ब्रह्माचा–हृदयांतील ध्यानाचा विषय–या रूपानें उपदेश करितात. ) ' भूः, भुवः, सुवः ' हा उल्लेख उक्त व्याहृतींच्या उपप्रदर्शनार्थ आहे. ' एताः तिस्रः ' हा उल्लेख ' भूः, भुवः ' इत्यादिकांनीं उपप्रदर्शित केलेल्या त्यांच्या परामर्शाकरिता आहे. ' वै ' या पदानें त्या परामृष्ट व्याहृतींचेंच स्मरण करविलें जात, या तीन प्रसिद्ध व्याहृती प्रथम स्मरण करविल्या जातात. त्यांतील ' महः ' ही चवथी व्याहृति आहे. ह्या चवथ्या व्याहृतीला महाचमसाचा पुत्र माहाचमस्य मुनि जाणतो. पण ' उ ह स्म, '

हे तीन निपात मागील घडलेल्या वर्तमानाचें अनुकथन करण्यासाठीं असल्या-मुळें माहाचमस्य त्याना जाणता झाला, पाहता झाला, असा अर्थ जाणावा. ' मह ' या चवथ्या व्याहृतीच्या ऋषीचें अनुस्मरण करण्यासाठीं ' माहा-चमस्य ' या नांवाचें ग्रहण केलें आहे. येथें त्याचा उपदेश केलेला असल्या-मुळें ऋषीचें स्मरणही उपासनेचें अग आहे, असें वाटतें. ही जी ' महः ' अशी माहाचमस्यानें पाहिलेली व्याहृति तें ब्रह्म आहे. कारण ब्रह्म महत् आहे व व्याहृति ' महः ' आहे. पण तें ब्रह्म काय आहे? तोच आत्मा आहे. कारण 'आप्' हा धातु व्याप्ति हें कार्य याअर्थी आहे. आत्म्याहून भिन्न अस-लेल्या व्याहृती, लोक, देव, वेद व प्राण ' महः ' या आदित्य, चंद्र, ब्रह्म व अन्नभूत अशा व्याहृत्यात्म्याकडून ज्या अर्थी व्यापल्या जातात त्या अर्थी इतर देवता अंगें ह्म० अवयव आहेत. येथील देवता हा शब्द लोकादि कांच्या उपलक्षणार्थ आहे. देव, लोक, इत्यादि सर्व 'महः' या व्याहृत्यात्म्याच्य। अवयवभूत आहेत. कारण आदित्यादिकाच्या योगानें लोकादिक वृद्धि पाव तात, असें सागितलें आहे आत्म्याचीं अंगेंच वाढतात 'महीयन्ते,' यांतील महन ह्म० वृद्धि, उपचय, आणि महीयन्ते ह्म० वृद्धि पावतात. हा लोक, अग्नि, ऋग्वेद, व प्राण हें सर्व पहिली ' भू ' ही व्याहृति आहे. अशाच रीतीनें उत्तरोत्तर एकेक व्याहृति चार चार प्रकारची होते.

मह इति ब्रह्म । ब्रह्मणा वाव सर्वे वेदा महीयन्ते । भूरिति वै प्राणः । भुव इत्यपानः । सुवरिति व्यानः । मह इत्यन्नम् । अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते । ता वा एताश्चतस्रश्चतुर्धा । चतस्रश्चतस्रो व्याहृ-तयः । ता यो वेद । स वेद ब्रह्म । सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति (३)॥

मह इति ब्रह्म । ब्रह्मेत्योंकार. । शब्दाधिकारेऽन्यस्यासंभवात् । उक्तार्थमन्यत् । ता वा एताश्चतस्रश्चतुर्धेति । ता वा एता भूर्भुवः-सुवर्मह इति चतस्र एकैकशश्चतुर्धा चतुष्प्रकाराः । धाशब्दः प्रकार-वचनः । चतस्रश्चतस्र. सत्यश्चतुधा भवन्तीत्यर्थ. । तासा यथाक्लृ-

तासां पुनरुपदेशस्तथैवोपासननियमार्थः । ता यथोक्तव्याहृतीर्यो वेद स वेद विजानाति । किं ब्रह्म । ननु तद्ब्रह्म स आत्मेति ज्ञाते ब्रह्मणि न वक्तव्यमविज्ञातवत्स वेद ब्रह्मेति । न । तद्विशेषविवक्षुत्वाददोषः । सत्यं विज्ञातं चतुर्थव्याहृत्यात्मा ब्रह्मेति न तु तद्विशेषो हृदयान्तरुपलभ्यत्वं मनोमयत्वादिश्च । 'शान्तिसमृद्धम्' इत्येवमन्तो विशेषणविशेष्यरूपो धर्मपूगो विज्ञायत इति तद्विवक्षु हि शास्त्रमविज्ञातमिव ब्रह्म मत्वा स वेद ब्रह्मेत्याह । अतो न दोषः । यो हि वक्ष्यमाणेन धर्मपूगेन विशिष्टं ब्रह्म वेद स वेद ब्रह्मेत्यभिप्रायः । अतो वक्ष्यमाणानुवाकेनैकवाक्यताऽस्योभयोर्ह्यनुवाकयोरेकमुपासनं लिङ्गाच्च । भूरित्यग्नौ प्रतितिष्ठतीत्यादिकं लिङ्गमुपासनैकत्वे । विधायकाभावाच्च । न हि वेद उपासितव्य इति विधायकः कश्चिच्छब्दोऽस्ति । व्याहृत्यनुवाके 'ता यो वेद' इति च वक्ष्यमाणार्थत्वान्नोपासनभेदकः । वक्ष्यमाणार्थत्वं च तद्विशेषविवक्षुत्वादिनोक्तम् । सर्वे देवा अस्मा एवं विदुषेऽङ्गभूता आवहन्त्यानयन्ति बलिं स्वाराज्यप्राप्तौ सत्यामित्यर्थः ॥

अर्थ— 'मह' हें ब्रह्म आहे. पण येथें ब्रह्म म्ह० ओंकार. कारण शब्दाधिकारामध्यें ओंकारावाचून अन्य ब्रह्माचा संभव नाहीं. बाकीच्या सर्व वाक्याचा अर्थ वर सांगितला आहे. ('ब्रह्मणा वाव' येथून 'अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते' येथपर्यंत जीं वाक्यें आहेत त्यांचा अर्थ वर सांगितल्याप्रमाणेंच समजावा ) 'ता वा एताः–' त्या या चार व्याहृती चार प्रकारच्या आहेत. म्ह० भूः, भुवः, सुवः, व महः, या चार व्याहृती प्रत्येकीं 'चतुर्धा' चार प्रकारच्या आहेत. 'चतुर्धा' यांतील 'धा' हा शब्द प्रकारवाचक आहे. त्या चार चार होऊन त्यांतील प्रत्येक चार प्रकारच्या होतात, असा याचा भावार्थ. त्यांची वर जशी कल्पना केली आहे तशीच उपासना करावी, असा नियम करण्यासाठीं पुनः उपदेश केला आहे. त्या वर सांगितलेल्या व्याहृतींना जो जाणतो तो जाणतो, काय ब्रह्म. 'अहो पण वर सांगितल्याप्रमाणें तें 'महः' च ब्रह्म; व तोच आत्मा,' असें ब्रह्माला

जाणलें असतां पुनः त्याला न जाणल्याप्रमाणें 'तो ब्रह्माला जाणतो' असें सांगणें उचित नाहीं,' अशी शंका कोणी घेईल पण ती बरोबर नाहीं. कारण 'तद्ब्रह्म स आत्मा' या वाक्यावरून सामान्य ज्ञान जरी झालें तरी त्याचा विशेष सांगण्याची इच्छा असल्यामुळें 'स वेद ब्रह्म' असें ह्मणण्यांत कांहीं दोष नाहीं. चतुर्थ व्याहृतिरूप ब्रह्म आहे, असें जाणलें हें खरें; पण हृदयामध्यें उपलब्ध होणें, मनोमयत्वादि, हा त्याचा विशेष जाणलेला नाहीं. पुढच्या सहाव्या अनुवाकांतील 'शान्तिसमृद्धं' या वाक्यापर्यंत पुढील ग्रंथानें विशेषण–विशेष्यरूप धर्मसमूह जाणला जातो. यास्तव त्याला सांगण्याची इच्छा करणारें शास्त्र ब्रह्म जणुं काय अज्ञातच आहे, असें मानून 'तो ब्रह्म जाणतो' असें ह्मणत आहे. यास्तव त्यांत कांहीं दोष नाहीं. अर्थात् जो पुढें सांगितलेल्या धर्मसमूहानें विशिष्ट, असें ब्रह्म जाणतो 'तो ब्रह्माला जाणतो' असा याचा अभिप्राय. यास्तव पुढच्या अनुवाकाशीं या अनुवाकाची एकवाक्यता होते. दोन्ही अनुवाकांमध्यें एकच उपासना उक्त आहे; आणि असें समजण्यास कांहीं लिंग–ज्ञापक–ही आहे. 'भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति' ह्म० भूः या व्याहृतीचें ध्यान करून उपासक अग्नीमध्यें प्रतिष्ठित होतो, इत्यादि फलश्रुति, हेंच पांचव्या व सहाव्या अनुवाकांतील उपासना एक आहे, असें समजण्यास लिंग आहे. (तसेंच एका अनुवाकामध्यें प्रधानविधि व दुसऱ्या अनुवाकांत गौणविधि अशी भिन्न अनुवाकांची व्यवस्था लावितां येत असल्यामुळें या दोन अध्यायांमध्यें दोन भिन्न उपासना सांगितल्या आहेत, असें ह्मणतां येत नाहीं.) कारण तसें विधान करणारें वाक्य नाहीं. 'वेद, उपासितव्यः' अशा प्रकारचा एकादाही विधायक शब्द त्यांत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. आतां पांचव्या व्याहृत्यनुवाकांत 'ता यो वेद' असा वेद-

१. व्याहृति ज्याचे अवयव आहेत असें ब्रह्मच जर पुढील अनुवाकातील उपास्य असेल तरच उपासक प्रथम व्याहृतिरूप अग्नींत प्रतिष्ठित होतो, असें म्हणणें युक्त होईल; आणि तसें ह्मणणें हेंच दोन्ही अनुवाकांतील उपासना एक आहे, असें समजण्यास सबल कारण आहे.

शब्द आहे. पण तो पुढील उपासनेकरितांच असल्यामुळें तो उपासनेचा भेद करणारा ( ह्म० त्या उपासनेला पुढच्या उपासनेहून पृथक् करणारा ) नाहीं. आतां 'त्यांतील वेद हा शब्द पुढील उपासनेकरितांच आहे, ह्मणून कशा-वरून' असें ह्मणाल तर त्याचें उत्तर वर 'तद्विशेषविवक्षुत्वात्' इत्यादि वाक्यानें दिलें आहे. असो; सर्व अंगभूत देव अशाप्रकारें उपासना करणाऱ्या या उपासकाला बलि आणून देतात. उपासनेचें फळ–स्वाराज्यप्राप्ति झाली असतां बलि आणतात, असा भावार्थ. ( इति पंचमोऽनुवाकः ) ५

---

भूर्भुवःसुवःस्वरूपा मह इत्येतस्य व्याहृत्यात्मनो ब्रह्मणोऽङ्गा-न्यन्या देवता इत्युक्तम् । यस्य ता अङ्गभूतास्तस्यैतस्य ब्रह्मणः साक्षादुपलब्ध्यर्थमुपासनार्थं च हृदयाकाशः स्थानमुच्यते शालग्राम इव विष्णोः । तस्मिन्हि तद्ब्रह्मोपास्यमानं मनोमयत्वादिधर्मविशिष्टं साक्षादुपलभ्यते । पाणाविवामलकम् । मार्गश्च सर्वात्मभावप्रतिपत्तये वक्तव्य इत्यनुवाक आरभ्यते—

अर्थ—' मह ' या व्याहृतिरूप ब्रह्माचीं–भूः, भुवः, सुवर् या स्वरू-पाच्या अन्य देवता हीं–अंगें आहेत, असें 'अङ्गान्यन्या देवताः' या वाक्यानें सांगितलें. आतां ज्याच्या त्या अंगभूत देवता आहेत त्या ह्या ब्रह्माच्या साक्षात् ज्ञानाकरितां व उपासनेकरितां हृदयाकाश हें स्थान सांगितलें जातें. शालग्राम हें जसें विष्णूचें स्थान ( त्याप्रमाणें हृदयाकाश हें ब्रह्माच्या ज्ञानादिकांनें स्थान आहे. ) कारण त्या हृदयाकाशांत मनोमयत्वादि धर्मांनीं विशिष्ट असें ब्रह्म उपासना केलें जाऊं लागलें असतां साक्षात् उप-लब्ध होतें ह्म० हातावरील आवळा जसा साक्षात् उपलब्ध होतो त्याप्रमाणें. तसाच सर्वात्मभाव प्राप्त होण्यासाठीं मार्गही सांगावा, या उद्देशानें हा पुढील सहावा अध्याय आरंभिलेला आहे.

स य एषोऽन्तर्हृदय आकाशः । तस्मिन्नयं पुरुषो मनोमयः । अमृतो हिरण्मयः । अन्तरेण तालुके । य एष स्तन इवावलम्बते ।

सेन्द्रयोनिः । यत्रासौ केशान्तो विवर्तते । व्यपोह्य शीर्षकपाले । भूरि-त्यग्नौ प्रतितिष्ठति । भुव इति वायौ ( १ ) ।

सुवरित्यादित्ये । मह इति ब्रह्मणि । आप्नोति स्वाराज्यम् । आप्नोति मनसस्पतिम् । वाक्पतिश्चक्षुष्पतिः । श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः । एतत्ततो भवति । आकाशशरीरं ब्रह्म । सत्यात्म प्राणारामं मनआन-न्दम् । शान्तिसमृद्धममृतम् । इति प्राचीनयोग्योपास्स्व ( २ ) ॥

इति शीक्षाध्याये षष्ठोऽनुवाकः ।

इति व्युत्क्रम्य ' अयं पुरुषः ' इत्यनेन संबध्यते । य एषो-ऽन्तर्हृदये हृदयस्यान्तर्हृदयमिति पुण्डरीकाकारो मांसपिण्डः प्राणा-यतनोऽनेकनाडीसुषिर ऊर्ध्वनालोऽधोमुखो विशस्यमाने पशौ प्रसिद्ध उपलभ्यते । तस्यान्तर्य एष आकाशः प्रसिद्ध एव करका-काशवत् । तस्मिन्सोऽयं पुरुषः । पुरि शयनात्पूर्णा वा भूरादयो लोका येनेति पुरुषो मनोमयः । मनो विज्ञानम् । मनुतेर्ज्ञानकर्मणस्तन्मय-स्तदुपलभ्यत्वात् । मनुतेऽनेनेति वा मनोऽन्तःकरणं तदभिमानी तन्मयस्तल्लिङ्गो वा । अमृतोऽमरणधर्मा हिरण्मयो ज्योतिर्मयः । तस्यैवं लक्षणस्य हृदयाकाशे साक्षात्कृतस्य विदुष आत्मभूतस्येन्द्रस्येश्वर-स्वरूपप्रतिपत्तये मार्गोऽभिधीयते । हृदयादूर्ध्वं प्रवृत्ता सुषुम्ना नाम नाडी योगशास्त्रेषु च प्रसिद्धा । सा चान्तरेण मध्ये प्रसिद्धे तालुके तालुकयोर्गता । यश्चैष तालुकयोर्मध्ये स्तन इवावलम्बते मांसख-ण्डस्तस्य चान्तरेणेत्येतत् । यत्र च केशान्तः केशानामन्तोऽवसानं मूलं केशान्तो विवर्तते विभागेन वर्तते मूर्धप्रदेश इत्यर्थः । तं देशं प्राप्य तत्र विनिःसृता । व्यपोह्य विभज्य विदार्य शीर्षकपाले शिरः-कपाले विनिर्गता या सेन्द्रयोनिरिन्द्रस्य ब्रह्मणो योनिर्मार्गः स्वरू-पप्रतिपत्तिद्वारमित्यर्थः । तयैवं विद्वान्मनोमयात्मदर्शी मूर्ध्नो विनि-ष्क्रम्यास्य लोकस्याधिष्ठाता भूरिति व्याहृतिरूपो योऽग्निर्महतो ब्रह्मणोऽङ्गभूतस्तस्मिन्नग्नौ प्रतितिष्ठत्यग्न्यात्मनेमं लोकं व्याप्नोती-त्यर्थः । तथा भुव इति द्वितीयव्याहृत्यात्मनि वायौ । प्रतितिष्ठती-त्यनुवर्तते ॥

सुवरिति तृतीयव्याहृत्यात्मन्यादित्ये । मह इत्यग्निनि चतुर्थे व्याहृत्यात्मनि ब्रह्मणि प्रतितिष्ठति । तेष्वात्मभावेन स्थित्वाऽऽप्नोति ब्रह्मभूत. स्वाराज्यं स्वराड्भावं स्वयमेव राजाऽधिपतिर्भवति । अङ्गभूतानां देवानां यथा ब्रह्म । देवाश्च सर्वेऽस्मै बलिमावहन्त्यङ्गभूता यथा ब्रह्मणे । आप्नोति मनसस्पतिम् । सर्वेषा हि मनसां पतिः सर्वात्मकत्वाद्ब्रह्मण । सर्वैर्हि मनोभिस्तन्मनुते । तदाप्नोत्येवं विद्वान् । किंच वाक्पति. सर्वासां वाचां पतिर्भवति । तथैव चक्षुष्पतिश्चक्षुषां पतिः । श्रोत्रपतिः श्रोत्राणां पति. । विज्ञानपतिर्विज्ञानानां च पतिः । सर्वात्मकत्वात्सर्वप्राणिनां करणैस्तद्वान्भवतीत्यर्थः । किंच ततोऽप्यधिकतरमेतद्भवति । किं तत् । उच्यते । आकाशशरीरमाकाश. शरीरमस्याऽऽकाशवद्वा सूक्ष्मं शरीरमस्येत्याकाशशरीरम् । किं तत् । प्रकृत ब्रह्म । सत्यात्म सत्यं मूर्तामूर्तमवितथं स्वरूपं चाऽऽत्मा स्वभावोऽस्य तदिदं सत्यात्म । प्राणारामं प्राणेष्वाराम आक्रीडा यस्य तत्प्राणारामम् । प्राणानां वाऽऽरामो यस्मिंस्तत्प्राणारामम् । मनआनन्दम् । आनन्दभूतं सुखकृदेव यस्य मनस्तन्मनआनन्दम् । शान्तिसमृद्धं शान्तिरुपशम., शान्तिश्च तत्समृद्धं च शान्तिसमृद्धम् । शान्त्या वा समृद्ध तदुपलभ्यत इति शान्तिसमृद्धम् । अमृतममरणधर्मि । एतच्चाधिकतरं विशेषणं तत्रैव मनोमय इत्यादौ द्रष्टव्यमिति । एवं मनोमयत्वादिधर्मैर्विशिष्टं यथोक्तं ब्रह्म हे प्राचीनयोग्य, उपास्स्वेत्याचार्यवचनोक्तिरादरार्था ॥

इति शांकरभाष्ये षष्ठोऽनुवाकः

अर्थ— 'स. ' हें पहिलें पद पाठक्रम सोडून 'अयं पुरुष.' या पुढील पदाशीं संबद्ध होतें. जो हा अन्तर्हृदयांत–हृदयामध्यें, हृदय ह्मणजे शुभ्रकमळाकार मांसाचा गोळा. तो प्राणाचें आयतन ( स्थान ) आहे. त्याला अनेक नाडीछिद्रें आहेत. त्याचें नाळ वर व मुख खालीं आहे. अशा रीतीनें प्रसिद्ध असलेला तो हृदयसंज्ञक मांसपिंड पशूची हिंसा करूं लागलें असतां उपलब्ध होतो. त्या हृदयाच्या आंत जो हा कमंडलूंतील

आकाशासारखा प्रसिद्ध आकाश आहे. त्यांत 'सः अयं पुरुषः' तो हा पुरुष आहे. ( पुरुष या शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारांनी संभवते. एक ) शरीराख्य-पुरींत शयन केल्यामुळें, राहिल्यामुळें पुरुष किंवा ज्यानें भूरादि लोकांना भरून सोडलें आहे, पूर्ण केलें आहे तो पुरुष. 'मनोमयः' मन ह्म० विज्ञान; कारण 'मन्' हा धातु ज्ञान या अर्थी आहे. पुरुष तन्मय ह्म० विज्ञानमय आहे. कारण ज्ञानाकार परिणत झालेल्या मनांतच तो उपलब्ध होतो. किंवा जीव ज्याच्या योगानें मनन करतो तें मन ह्म० अन्तःकरण. त्याचा अभिमानी, ह्मणून पुरुष तन्मय अथवा तल्लिंग आहे. (शास्त्रांत मन सर्व इंद्रियांचें अधिष्ठातृ ह्मणून प्रसिद्ध आहे. यास्तव पुरुष मनोलिंग आहे. ह्मणजे मन हें त्याचें लिंग आहे. मनाच्या प्रवृत्तीवरून त्याच्या नियामकाचा बोध होतो, ह्मणून तो तल्लिंग आहे. ) तसाच तो अमृत ह्म० अमरणधर्मा व हिरण्मय ह्म० ज्योतिर्मय आहे. त्या अशा लक्षणाच्या, हृदयाकाशांत साक्षात् जाणलेल्या आत्मभूत व इंद्र अशा विद्वानाला अशाप्रकारच्या स्वरूपाची प्राप्ति होण्यासाठीं मार्ग सांगितला जातो. हृदयापासून सुषुम्ना नांवाची नाडी वर प्रवृत्त झाली आहे व ती योगशास्त्रांतही प्रसिद्ध आहे. ती दोन्ही तालूंच्या मध्यें शिरली आहे. दोन्ही तालूंच्या मध्यें जो हा स्तनासारखा मांसखंड खालीं लोंबत आहे, ( ज्याला व्यवहारांत पडजीभ ह्मणतात ) त्याच्या आतून, असा भावार्थ, आणि—जेथें—ज्या मूर्धप्रदेशीं असा याचा भाव—केंसाचा अन्त—मूळ अगदीं पृथक् होऊन राहिलें आहे त्या प्रदेशास प्राप्त होऊन तेथून ती बाहेर पडली आहे. अशा रीतीनें मस्तकाच्या कपालाना निर्दीर्ण करून बाहेर निघालेली जी सुषुम्ना ती इंद्रयोनि आहे. इंद्राची ह्म० ब्रह्माची योनि ह्म० मार्ग, स्वरूप प्राप्तीचें द्वार आहे, असा याचा अर्थ. त्या सुषुम्ना नाडीनें असें जाणणारा ह्म० मनोमय आत्म्याची उपासना करणारा मस्तकांतून निघून या लोकाचा अधिष्ठाता, 'भूः' या व्याहृतिरूप व महत् ब्रह्माचा अंगभूत जो अग्नि त्या अग्नीमध्यें प्रतिष्ठित होतो. अग्निरूपानें या लोकास व्यापतो, असा याचा भावार्थ. तसाच 'भुवः' या

द्वितीय व्याहृतिरूप वायूंत प्रतिष्ठित होतो; अशा रीतीनें पुढील पर्यायांतही 'प्रतितिष्ठति' या पदाची अनुवृत्ति करावी. 'सुवर्' या तृतीय व्याहृतिरूप आदित्यांत आणि 'महः' या चतुर्थव्याहृतिरूप अंगी ब्रह्मांत उपासक प्रतिष्ठित होतो. त्यामध्यें आत्मभावानें स्थित होऊन, ब्रह्मभूत होऊन स्वाराज्यास ह्म० स्वराड्भावास प्राप्त होतो. स्वतःच राजा—अधिपति होतो. अंगभूत देवांचें ( अंगी ) ब्रह्म जसें अधिपति आहे त्याप्रमाणें तो अधिपति होतो. सर्व अंगभूत देव जसे ब्रह्माला तसेच त्यालाही बलि आणून देतात. मनाच्या पतीला प्राप्त होतो. ब्रह्म सर्वात्मक असल्यामुळें तें सर्वांच्या मनांचें अधिपति आहे. सर्व मनांनींच तें ब्रह्म मनन करतें. असें जाणणारा उपासक त्याला प्राप्त होतो. तसेंच, तो वाक्पति ह्म० सर्व वाणींचा पति होतो. त्याचप्रमाणें चक्षूंचा पति होतो, श्रोत्रांचा पति होतो, क सर्व विज्ञानांचा पति होतो. तो सर्वात्मक असल्यामुळें सर्व प्राण्यांच्या इंद्रियांनीं इंद्रियवान् होतो, असा याचा अर्थ. फार काय पण याहूनही तें अधिक होतें. तें काय ह्मणून विचाराल तर सांगतों—'आकाश-शरीरं—' आकाश आहे शरीर ज्याचें किंवा आकाशाप्रमाणें सूक्ष्म शरीर आहे ज्याचें तें आकाश-शरीर. पण तें काय? तर हें प्रकृत ब्रह्म. 'सत्यात्म—' सत्य ह्म० मूर्तामूर्त व अमिथ्या स्वरूप हाच ज्याचा आत्मा ह्म० स्वभाव आहे, तें हें सत्यात्म आहे 'प्राणारामम्—' प्राणामध्यें आरमण ह्म० आक्रीडा आहे ज्याची तें प्राणाराम, किंवा प्राणांचा आराम आहे ज्यामध्यें तें प्राणाराम. 'मनआनन्दम्—' आनन्दभूत ह्म० सुखकरच मन आहे ज्याचें तें मन—आनन्द. 'शान्तिसमृद्धम्' शांति ह्म० उपशम. शांति तेंच समृद्ध; किंवा शांतीनें तें समृद्ध ब्रह्म उपलब्ध होतें, ह्मणून शांतिसमृद्ध. 'अमृतम्—' अमरणधर्मी. हें सर्वांहून अधिक असलेलें विशेषण त्याच मनोमय इत्यादिकांमध्यें पहावें. हे प्राचीनयोग्य शिष्या, अशा रीतीनें मनोमयत्वादि धर्मांनीं विशिष्ट असलेल्या यथोक्त ब्रह्माची तूं उपासना कर. ही आचार्यवचनानी उक्ति आदरार्थ आहे. ( इति षष्ठोऽनुवाकः ) ६

---

यदेतद्व्याहृत्यात्मकं ब्रह्मोपास्यमुक्तं तस्यैवेदानीं पृथिव्यादि-पाङ्क्तस्वरूपेणोपासनमुच्यते। पञ्चसंख्यायोगात्पङ्क्तिच्छन्दःसंपत्तिः। ततः पाङ्क्तत्वं सर्वस्य। पाङ्क्तश्च यज्ञः। पञ्चपदा पङ्क्तिः। "पाङ्क्तो यज्ञः" इति श्रुतेः। तेन यत्सर्वं लोकाद्यात्मान्तं च पाङ्क्तं परिकल्पयति यज्ञमेव तत्परिकल्पयति। तेन यज्ञेन परिकल्पितेन पाङ्क्तात्मकं प्रजापतिमभिसंपद्यते। तत्कथं पाङ्क्तमिदं सर्वमित्यत आह--

अर्थ—जें हें व्याहृत्यात्मक ब्रह्म उपास्य ह्मणून सांगितलें आहे त्याचेंच आता पृथिव्यादि पांक्तरूपानें उपासन सागितलें जात आहे. पांच या संख्येच्या संबंधानें पंक्तिछंदाची संपत्ति त्यात आहे. त्यामुळें पृथिव्यादि पुढें सांगितलेल्या सर्वांला पाङ्क्तत्व आहे. यज्ञ पाक्त आहे व पंक्ति पंचपदा आहे. कारण 'पाङ्क्तो यज्ञः' अशी श्रुति आहे. त्यामुळें ह्या विधी लोकापासून आत्म्यापर्यंत हें सर्व पांक्त आहे, अशी जी कल्पना करवितो, ती तो सर्व यज्ञाचीच परिकल्पना करवितो. त्या परिकल्पित यज्ञानें उपासक पाङ्क्तरूप प्रजापतीला प्राप्त होतो. वास्तव हें सर्व पाक्त कसें, तेंच सांगतात--

पृथिव्यन्तरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरदिशाः। अग्निर्वायुरादित्यश्चन्द्रमा नक्षत्राणि। आप ओषधयो वनस्पतय आकाश आत्मा इत्यधिभूतम्॥

पृथिव्यन्तरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरदिशा इति लोकपाङ्क्तं। अग्निर्वायुरादित्यश्चन्द्रमा नक्षत्राणीति देवतापाङ्क्तम्। आप ओषधयो वनस्पतय आकाश आत्मेति भूतपाङ्क्तम्। आत्मेति विराड् भूताधिकारात्। इत्यधिभूतमित्यधिलोकाधिदैवतपाङ्क्तद्वयोपलक्षणार्थम्। लोकदेवतापाङ्क्तयोश्चाभिहितत्वात्।

अर्थ—पृथिवी, अन्तरिक्ष, द्यौः, दिशा व अवान्तर दिशा हें लोकपाक्त; अग्नि, वायु, आदित्य, चन्द्रमा, व नक्षत्रें हें देवतापाक्त; आप, ओषधि, वनस्पति, आकाश व आत्मा हें भूतपाक्त, येथें आत्मा ह्म॰ विराट. कारण हा भूताधिकार-भूतप्रकरण आहे. असें हें अधिभूत आहे. 'इत्यधि-

व्याहृत्यात्मनो ब्रह्मण उपासनमुक्तम्। अनन्तर च पाङ्क्तस्वरूपेण तस्यैवोपासनमुक्तम्। इदानीं सर्वोपासनाङ्गभूतस्याकारस्योपासन विधित्स्यते। परापरब्रह्मदृष्ट्या ह्युपास्यमान आकारः शब्दमात्रोऽपि परापरब्रह्मप्राप्तिसाधन भवति। स ह्यालम्बन ब्रह्मण परस्यापरस्य च। प्रतिमेव विष्णो। "एतेनैवाऽऽयतनेनैकतरमन्वेति" इति श्रुते॥

अर्थ—प्रथम व्याहृत्यात्मक ब्रह्माची उपासना सांगितली त्यानंतर पाङ्क्तरूपानें त्याचेंच उपासन सांगितलें. आता सर्व उपासनेच्या अङ्गभूत ओंकाराच्या उपासनेचें विधान केलें जातें कारण परब्रह्म व अपर ब्रह्म याच्या दृष्टीनें उपासना केला जाणारा ओंकार शब्दमात्र जरी असला तरी पर व अपर ब्रह्माच्या प्राप्तीचें साधन होतो. विष्णूचें प्रतिमा ही जसें आलंबन आहे त्याचप्रमाणें ओंकार पर व अपर ब्रह्माचें आलंबन आहे. कारण याच प्रणवरूप आलंबनानें उपासक अपर व पर यातील एका ब्रह्माला प्राप्त होतो, अशी श्रुति आहे.

ओमिति ब्रह्म। ओमितीद९ सर्वम्।

ओमिति। इतिशब्द स्वरूपपरिच्छेदार्थ। ओमित्येतच्छब्दरूप ब्रह्मेति मनसा धारयेदुपासीत। यत ओमितीद सर्व हि शब्दरूपमोंकारेण व्याप्तम्। "तद्यथा शङ्कुना" इति श्रुत्यन्तरात्। अभिधानतन्त्र ह्यभिधेयमित्यत इद सर्वमोंकार इत्युच्यते॥

अर्थ—ओमिति येथील 'इति' हा शब्द स्वरूपाचा परिच्छेद करण्यासाठीं आहे ओं हें शब्दस्वरूप ब्रह्म आहे, असें मनानें धारण करावें ह्म० उपासना करावी कारण हें सर्व 'ओं' च आहे सर्व शब्दरूप ओंकारानें व्याप्त आहे 'ज्याप्रमाणें देंठानें सर्व पान व्याप्त असतें' अशी याविषयीं दुसरी श्रुति आहे. सर्व अभिधेय ह्म० वाच्य अभिधानतंत्र असत. (अर्थ शब्दाच्या अधीन असतो, असा न्याय आहे) यास्तव हें सर्व ओंकारच आहे, असें ह्मटलें जातें

तात. ( रत्न ४, पृष्ठ २८, २९ पहा ) त्याचप्रमाणें सामगान करणारे 'ओं' असें ह्मणून सामें गातात. यज्ञांत शस्त्राचें शंसन करणारेही 'ओं' असें ह्मणूनच शस्त्रें ह्मणतात ( शस्त्रें ह्मणजे गीतिरहित ऋचा ). तसाच अध्वर्यु 'ओं' असें ह्मणून प्रतिगरास उद्देशून प्रतिगृणन करतो. ( ह्म० प्रतिशंसन उच्चारतो ) 'ओं' असें ह्मणून ब्रह्मा अनुज्ञा देतो. प्रेषपूर्वक ऐकवितो. 'ओं' असें ह्मणून अग्निहोत्रास अनुज्ञा देतो. ह्म० मी हवन करतों असें यजमानानें ह्मटलें असतां 'ओं' असें ह्मणून अनुज्ञा देतो. प्रवचन करणारा, अध्ययन करणारा ब्राह्मण 'ओं' असेंच ह्मणतो. 'ओं' असें ह्मणून अध्ययनास आरंभ करतो, असा याचा इत्यर्थ. ब्रह्म ह्म० वेद. त्याला मीं प्राप्त व्हावें, त्याचें मी ग्रहण करीन, असें ह्मणून वेद ग्रहण करतोच. किंवा ब्रह्म ह्म० परमात्मा. त्याला मी प्राप्त होतों, असें ह्मणून आत्म्याला ब्रह्मापाशीं नेऊन पोंचवीत असता 'ओं' असें ह्मणतो, आणि तो त्या ओंकारानें ब्रह्माला प्राप्त होतोच. ज्या अर्थी ओंकारपूर्वक आरंभिलेल्या क्रियाना फलवत्त्व असतें ( ह्म० त्याच क्रिया सफल होतात ) त्याअर्थी ओंकाराची ब्रह्मरूपानें उपासना करावी, असा वाक्यार्थ ( येथें प्रवक्ष्यन् याचे दोन अर्थ केले आहेत. त्यांतील पहिल्या ( ह्म० प्रवचन करणारा या ) अर्थीं तें 'वच' या धातूचें व दुसऱ्या ( ह्म० 'ब्रह्मापाशीं नेऊन पोचविणें' या ) अर्थीं 'वह' या धातूचें रूप आहे. इति अष्टमोऽनुवाकः )

---

ऋतं च स्वाध्यायप्रवचने च । सत्यं च स्वाध्यायप्रवचने च । तपश्च स्वाध्यायप्रवचने च । दमश्च स्वाध्यायप्रवचने च । शमश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च । अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च । अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च । मानुषं च स्वाध्यायप्रवचने च । प्रजा च स्वाध्यायप्रवचने च । प्रजनश्च स्वाध्यायप्रवचने च । प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च । सत्यमिति सत्यवचा

राथीतरः । तप इति तपो नित्यः पौरुशिष्टिः । स्वाध्यायप्रवचने एवेति नाको मौद्गल्य. । तद्धि तपस्तद्धि तपः ॥

इति शीक्षाध्याये नवमोऽनुवाकः ।

विज्ञानादेवाऽऽप्नोति स्वाराज्यमित्युक्तत्वाच्छ्रौतस्मार्तानां कर्मणामानर्थक्यं प्राप्तमित्यतस्तन्मा प्रापदिति कर्मणां पुरुषार्थं प्रति साधनत्वप्रदर्शनार्थमिहोपन्यास । ऋतमिति व्याख्यातम् । स्वाध्यायोऽध्ययनम् । प्रवचनमध्यापनं ब्रह्मयज्ञो वा । एतान्यृतादीन्यनुष्ठेयानीति वाक्यशेष । सत्यं च सत्यवचनं यथाव्याख्यातार्थं वा । तपः कृच्छ्रादि । दमो बाह्यकरणोपशमः । शमोऽन्तःकरणोपशमः । अग्नय आधातव्याः । अग्निहोत्रं च होतव्यम् । अतिथयश्च पूज्याः । मानुषमिति लौकिकः संव्यवहारः । तच्च यथाप्राप्तमनुष्ठेयम् । प्रजा चोत्पाद्या । प्रजनश्च प्रजननमृतौ भार्यागमनमित्यर्थः । प्रजातिः पौत्रोत्पत्ति. पुत्रो निवेशयितव्य इत्येतत् । सर्वैरेतैः कर्मभिर्युक्तस्यापि स्वाध्यायप्रवचने यत्नतोऽनुष्ठेये इत्येवमर्थं सर्वेण सह स्वाध्यायप्रवचनग्रहणम् । स्वाध्यायाधीनं ह्यर्थज्ञानम् । अर्थज्ञानायत्तं च परं श्रेय. । प्रवचनं च तदविस्मरणार्थं धर्मप्रवृद्ध्यर्थं च । अतः स्वाध्यायप्रवचनयोरादर. कार्य. । सत्यमिति सत्यमेवानुष्ठातव्यमिति सत्यवचाः सत्यमेव वचो यस्य सोऽयं सत्यवचा नाम वा तस्य । राथीतरो रथीतरस्य गोत्रो राथीतराचार्यो मन्यते । तप इति तप एव कर्तव्यमिति तपोनित्यस्तपसि नित्यस्तप.परस्तपोनित्य इति वा नाम । पौरुशिष्टि. पुरुशिष्टस्यापत्यं पौरुशिष्टिराचार्यो मन्यते । स्वाध्यायप्रवचने एवानुष्ठेये इति नाको नामतो मुद्गलस्यापत्यं मौद्गल्य आचार्यो मन्यते । तद्धि तपस्तद्धि तपः । हि यस्मात्स्वाध्यायप्रवचने एव तपस्तस्मात्ते एवानुष्ठेये इति । उक्तानामपि सत्यतप.स्वाध्यायप्रवचनानां पुनर्ग्रहणमादरार्थम् ॥

इति शांकरभाष्ये नवमोऽनुवाकः ।

अर्थ—विज्ञानामुळेंच स्वाराज्याला प्राप्त होतो, असें सांगितलेलें असल्यामुळें श्रौत-स्मार्त-कर्मांचें आनर्थक्य प्राप्त झालें म्ह० तीं कर्में व्यर्थ आहेत, असें ठरण्याचा

प्रसंग आला. पण तीं तशीं व्यर्थ ठरूं नयेत ह्मणून कर्में पुरुषार्थाचीं साधनें आहेत, असें दाखविण्यासाठीं येथें त्यांचा उपन्यास केला आहे. ऋत ह्मणजे काय तें वर (पृष्ठ १७) सांगितलें आहे. स्वाध्याय ह्म० अध्ययन, व प्रवचन ह्म० अध्यापन किंवा ब्रह्मयज्ञ. या ऋतादिकांचें अनुष्ठान करावें, असा वाक्यशेष लावावा. ( ह्म० एवढे शब्द वाक्यपूर्तीकरितां अधिक जोडावे. ) सत्य ह्म० सत्य भाषण किंवा वर जसें व्याख्यान केलें आहे, तसा त्याचा अर्थ समजावा तप ह्म० कृच्छ्रादिक. दम ह्म० बाह्य इंद्रियांचा उपशम. शम ह्म० अन्तःकरणाचा उपशम. आधानास योग्य असलेले अग्नी; हवन करण्यास उचित असलेलें अग्निहोत्र; पूज्य अतिथी; मानुष ह्मणजे लौकिक विवाहादि उत्तम व्यवहार; तें मानुष जसें प्राप्त असेल तसेंच त्याचें अनुष्ठान करावें. प्रजा उत्पन्न करावी; प्रजन ह्म० ऋतुकालीं भार्यागमन; प्रजाति ह्म० पौत्रोत्पत्ति. पुत्राचें निवेशन करावें, असा याचा भावार्थ ( त्याला विद्या व शील यांनीं संपन्न करून गृहस्थपदीं स्थापावें ). या सर्व कर्मानीं युक्त असलेल्या पुरुषाअही स्वाध्याय व प्रवचन यांचें यत्नपूर्वक अनुष्ठान करावें, असें सांगण्यासाठीं वरील ऋतादि प्रत्येक साधनांबरोबर स्वाध्याय व प्रवचन यांचें ग्रहण केलें आहे. कारण अर्थज्ञान स्वाध्यायाच्या अधीन असतें व परम श्रेय अर्थज्ञानाच्या अधीन असतें; आणि प्रवचन त्याचें विस्मरण होऊं नये व धर्माची अतिशय वृद्धि व्हावी, यासाठीं आहे. यास्तव स्वाध्याय व प्रवचन यांचा आदर करावा. ' सत्यमिति ' ह्म० सत्याचेंच अनुष्ठान करावें असें ' सत्यवचा ' सत्य हेंच ज्याचें वचन आहे तो किंवा ' सत्यवचा ' हें ज्याचें नांव आहे तो राथीतर आचार्य मानतो रथीतराचा जो गोत्र तो राथीतर ( गोत्र ह्म० पौत्रापासून पुढील वंश. अर्थात् रथीतर वंशांतील राथीतर आचार्य सत्याचेंच अनुष्ठान करावें, असें समजतो ) तपच करावें, असें ' तपोनित्य ' ह्म० तपामध्यें नित्य असलेला तपःपरायण किंवा ' तपोनित्य ' या नांवाचा व पुरुशिष्टीचें अपत्य असा आचार्य मानतो स्वाध्याय व प्रवचन यांचेंच अनुष्ठान करावें, असें ' नाक ' नांवाचा व मुद्गलाचें अपत्य-

मौद्गल्य आचार्य मानतो तेंच तप आहे; तेंच तप आहे ह्म० ज्या अर्थी स्वाध्याय व प्रवचन हेंच तप आहे त्या अर्थी त्यांचेंच अनुष्ठान करावें. पूर्वी एकदा सांगितलें-ल्याही सत्य, तप, स्वाध्याय व प्रवचन यांचें पुनः ग्रहण आदरार्थ केलें आहे. (मुमुक्षूनें त्यांचा अतिशय आदर करावा, असा भावार्थ. इति शीक्षाध्याये नवमोऽनुवाकः ) ९



अहं वृक्षस्य रेरिवा । कीर्तिः पृष्ठं गिरेरिव । ऊर्ध्वपवित्रो वाजिनीव स्वमृतमस्मि । द्रविण५ सवर्चसम् । सुमेधा अमृतोक्षितः । इति त्रिशङ्कोर्वेदानुवचनम् ( १ ) ॥

इति शिक्षाध्याये दशमोऽध्यायः ।

अहं वृक्षस्य रेरिवेति स्वाध्यायार्थो मन्त्राम्नाय. । स्वाध्यायश्च विद्योत्पत्तये । प्रकरणात् । विद्यार्थं हीदं प्रकरणम् । न चान्यार्थत्वमवगम्यते । स्वाध्यायेन च विशुद्धसत्त्वस्य विद्योत्पत्तिरवकल्प्यते । अहं वृक्षस्योच्छेदात्मकस्य संसारवृक्षस्य रेरिवा प्रेरयिताऽन्तर्याम्यात्मना । कीर्तिः ख्यातिर्गिरे· पृष्ठमिवोच्छ्रिता मम । ऊर्ध्वपवित्र ऊर्ध्वं कारणं पवित्रं पावनं ज्ञानप्रकाश्यं पवित्रं परमं ब्रह्म यस्य सर्वात्मनो मम सोऽहमूर्ध्वपवित्र । वाजिनीव वाजवतीव । वाजमन्नं तद्वति सवितरीत्यर्थ· । यथा सवितर्यमृतमात्मतत्त्वं विशुद्धं प्रसिद्धं श्रुतिस्मृतिशतेभ्य एवं स्वमृतं शोभनं विशुद्धमात्मतत्त्वमस्मि भवामि । द्रविणं धन सवर्चसं दीप्तिमत्तदेवाऽऽत्मतत्त्वमस्मीत्यनुवर्तते । ब्रह्मज्ञानं वाऽऽत्मतत्त्वप्रकाशकत्वात्सवर्चसम् । द्रविणमिव द्रविणं मोक्षसुखहेतुत्वात् । अस्मिन्पक्षे प्राप्तं मयेत्यध्याहारः कर्तव्यः । सुमेधाः शोभना मेधा सर्वज्ञलक्षणा यस्य मम सोऽहं सुमेधाः । संसारस्थित्युत्पत्त्युपसंहारकौशलयोगात्सुमेधस्त्वम् । अत एवामृतोऽमरणधर्माऽक्षितोऽक्षीणोऽव्ययः । उक्षितो वाऽमृतेन वोक्षितः सिक्तः । "अमृतोक्षितोऽहम्" इत्यादि ब्राह्मणम् । इत्येवं

त्रिशङ्कोर्ऋषेर्ब्रह्मभूतस्य ब्रह्मविदो वेदानुवचनं वेदो वेदनमात्मैकत्वविज्ञानं तस्य प्राप्तिमनु वचनं वेदानुवचनम् । आत्मनः कृतकृत्यताख्यापनार्थं वामदेववत्त्रिशङ्कुनाऽऽर्षेण दर्शनेन दृष्टो मन्त्राम्नाय आत्मविद्याप्रकाशक इत्यर्थः । अस्य च जपो विद्योत्पत्त्यर्थोऽवगम्यते । ऋतं चेत्यादिकर्मोपन्यासादनन्तरं च वेदानुवचनपाठादेतदवगम्यत एवं श्रौतस्मार्तेषु नित्येषु कर्मसु युक्तस्य निष्कामस्य परं ब्रह्म विविदिषोरार्षाणि दर्शनानि प्रादुर्भवन्त्यात्मादिविषयाणीति ॥

अर्थ—' अहं वृक्षस्य रेरिवा ' हा स्वाध्यायार्थ मन्त्राम्नाय आहे. स्वाध्याय विद्योत्पत्तीकरतां आहे. कारण हें प्रकरण विद्येचें आहे. हें प्रकरण विद्येकरितां आहे, हें उघड आहे. कारण तें दुसऱ्या कशाकरितां आहे, असें वाटत नाहीं. स्वाध्यायानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे त्याच्या ठिकाणीं विद्येची उत्पत्ति होऊं शकते. मी वृक्षाचा ह्म० उच्छेद्यरूप संसारवृक्षाचा ' रेरिवा ' अन्तर्यामिरूपानें प्रेरयिता ( प्रेरणा करणारा ) आहें. माझी कीर्ति ( ख्याति ) पर्वताच्या पृष्ठाप्रमाणें उंच आहे. मी ऊर्ध्वपवित्र आहें. ज्या मज सर्वात्म्याचें पवित्र पावन-ज्ञानप्रकाश्य ऊर्ध्वकारण पवित्र परम ब्रह्म आहे तो मी ऊर्ध्वपवित्र होय. ' वाजिनीव ' वाज ह्म० अन्न, त्यानें युक्त असलेल्या वाजवानामध्यें सूर्यामध्यें असा भावार्थ; ज्याप्रमाणें शेंकडों श्रुतिस्मृतींवरून प्रसिद्ध असलेलें विशुद्ध, अमृत, आत्मतत्त्व सवित्यामध्यें आहे त्याप्रमाणें मीही ' स्वमृतं ' शोभन विशुद्ध आत्मतत्त्व होतों. तेंच आत्मतत्त्व मी दीप्तियुक्त धन होतों, (आहें,) अशी 'अस्मि' या क्रियापदाची अनुवृत्ति होते. अथवा ब्रह्मज्ञान आत्मतत्त्वप्रकाशक असल्यामुळें 'सवर्चस'—दीप्तियुक्त आहे. तें धनासारखें आहे. कारण तें मोक्षसुखाचें निमित्त आहे. पण या दुसऱ्या पक्षीं ( *वरील अस्मि या पदाची अनुवृत्ति न करतां* ) तें धनासारखें दीप्तियुक्त आत्मज्ञान मला प्राप्त झालें आहे, असा अध्याहार करावा. ' सुमेधाः ' शोभना सर्वज्ञलक्षणा मेधा ज्याची आहे तो मी 'सुमेधाः' आहें, संसारस्थिति, उत्पत्ति व संहार यांचें कौशल असल्यामुळें सुमेधस्त्व. ह्मणूनच

मी ' अमृतः ' ह्म० अमरणधर्मा व ' क्षितः ' ह्म० अक्षीण, अव्यय आहें. किंवा उक्षितः असें पद तोडावें. अर्थात् किंवा मी अमृतानें ' उक्षित ' ह्म० सिक्त-सिंचिला गेलेला-आहें. कारण ' अमृतोक्षितोऽहम् ' इत्यादि ब्राह्मण आहे. असें हें त्रिशंकु ऋषीचें-ब्रह्मभूत ब्रह्मवेत्त्या मुनीचें-वेदानुवचन आहे. वेद ह्म० वेदन. आत्म्याचें एकत्वविज्ञान त्याच्या प्राप्तीनंतरचें जें वचन, जें वेदानुवचन. आपली कृतकृत्यता प्रकट करण्यासाठीं वामदेवा-प्रमाणें त्रिशंकूनें आर्षदर्शनानें ( दिव्य दृष्टीनें ) पाहिलेला हा मन्त्राम्नाय आत्मविद्याप्रकाशक आहे, असा याचा अर्थ. ( वामदेवाचा असलाच मन्त्राम्नाय रत्न दुसरें पृष्ठ १९७-२०० वर पहा. यावरून श्री शंकराचार्यांनीं ऐतरेयभाष्य पूर्वीं लिहून हें भाष्य त्यानंतर लिहिलें असावें, असें वाटतें. ) याचा जप विद्योत्पत्तीकरितां आहे, असेंही यावरून समजतें. ' ऋतं च ' इत्यादि अनुवाकांत कर्मांचा उपन्यास केल्यानंतर या वेदानुवचनाचा पाठ केलेला असल्यामुळें त्यावरून ' अशा प्रकारें श्रौत स्मार्त-नित्य कर्मांमध्यें युक्त असलेल्या निष्काम व परब्रह्माला जाणण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाला आत्मा, इत्यादिकांविषयीं अशीं आर्ष ( अतींद्रियविषयक ) दर्शनें प्रादुर्भूत होतात, ही गोष्ट कळते. ( इति शीक्षाध्याये दशमोऽनुवाकः ) १०

---

वेदमनूच्याऽऽचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति ।

वेदमनूच्येत्येवमादिकर्तव्यतोपदेशारम्भः प्राग्ब्रह्मविज्ञानान्नियमेन कर्तव्यानि श्रौतस्मार्तकर्माणीत्येवमर्थः । अनुशासनश्रुतेः पुरुषसंस्कारार्थत्वात् । संस्कृतस्य हि विशुद्धसत्त्वस्याऽऽत्मज्ञानमञ्जसैवोत्पद्यते । " तपसा कल्मषं हन्ति विद्ययाऽमृतमश्नुते " इति स्मृतिः । वक्ष्यति च—" तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व " इति । अतो विद्योत्पत्त्यर्थमनुष्ठेयानि कर्माणि । अनुशास्तीत्यनुशासनशब्दादनुशासनातिक्रमे हि दोषोत्पत्तिः । प्रागुपन्यासाच्च कर्मणां केवलब्रह्मविद्यारम्भाच्च पूर्वं कर्माण्युपन्यस्तानि । उदितायां च विद्यायां " अभयं

प्रतिष्ठा विन्दते " " न बिभेति कुतश्चन " " किमहं साधु नाकरवम् " इत्येवमादिना कर्मनैष्किंचन्य दर्शयिष्यतीत्यतोऽवगम्यते पूर्वोपचितदुरितक्षयद्वारेण विद्योत्पत्त्यर्थानि कर्माणीति। मन्त्रवर्णाच्च—" अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते " इति। ऋतादीनां पूर्वत्रोपदेश आनर्थक्यपरिहारार्थः। इह तु ज्ञानोत्पत्त्यर्थत्वात्कर्तव्यनियमार्थं। वेदमनूच्याध्याप्याऽऽचार्योऽन्तेवासिनं शिष्यमनुशास्ति ग्रन्थग्रहणादनु पश्चाच्छास्ति तदर्थं ग्राहयतीत्यर्थः। अतोऽवगम्यतेऽधीतवेदस्य धर्मजिज्ञासामकृत्वा गुरुकुलान्न समावर्तितव्यमिति। " बुद्ध्वा कर्माणि चाऽऽरभेत् " इति स्मृतेश्च। कथमनुशास्तीत्याह—

अर्थ—' वेदमनूच्य ' इत्यादि हा कर्तव्यतेच्या उपदेशाचा आरंभ आहे ब्रह्मविज्ञानाच्या पूर्वी श्रौतस्मार्त कर्मे नियमानें करावीं, असें सागण्यासाठीं तो आहे. कारण ' अनुशास्ति ' अशी जी अनुशासनाची श्रुति आहे ती पुरुष सस्कारार्थ आहे. कारण जो सस्कृत व त्यामुळेंच विशुद्धचित्त पुरुष असतो त्याला आत्मज्ञान अनायासानेंच होतें याविषयीं ' तपानें पापाचा नाश करतो व विद्येनें मोक्षाचा अनुभव घेतो, ' अशी स्मृति आहे. या उपनिषदांतही ' तपाने ब्रह्माला विशेषतः जाणण्याची इच्छा कर,' असें वरुण पुढें सागणार आहे. यास्तव विद्योत्पत्तीकरिता कर्माचें अनुष्ठान करावें. ' अनुशास्ति ' असा अनुशासन-शब्द असल्यामुळें अनुशासनाचा अतिक्रम केल्यास दोषाची उत्पत्ति होते. ( आता कर्मे पूर्वीच करावीं, याविषयीं आणखीं एक नियम सागतात. ) आणि कर्मांचा उपन्यास पूर्वी केलेला असल्यामुळेंहीं (कर्मे) विद्येच्या उत्पत्त्यर्थ आहेत, असा निश्चय होतो. (आता या सूत्ररूप वाक्याचेंच व्याख्यान करितात ) केवळ ब्रह्मविद्येला आरभ करण्यापूर्वी कर्मांचा उपन्यास केला आहे, आणि ब्रह्मविद्या सागून झाल्यावर वेद पुढें ' निर्भयपणें प्रतिष्ठेस प्राप्त होतो; तो कोणत्याहीं कारणानें भयभीत होत नाहीं, मीं शुभाचरण का केलें नाहीं,' इत्यादि वचनांनीं

क्ष्यत् । सत्यान्न प्रमदितव्यं प्रमादो न कर्तव्यः। सत्याच्च प्रमदनमनृतप्रसङ्गः। प्रमादशब्दसामर्थ्यात्। विस्मृत्याप्यनृतं न वक्तव्यमित्यर्थः। अन्यथाऽसत्यवदनप्रतिषेध एव स्यात् । धर्मान्न प्रमदितव्यम् । धर्मशब्दस्यानुष्ठेयविषयत्वादननुष्ठानं प्रमादः स न कर्तव्यः । अनुष्ठातव्य एव धर्म इति यावत् । एवं कुशलादात्मरक्षार्थात्कर्मणो न प्रमदितव्यम् । भूतिर्विभूतिस्तस्यै भूत्यै भूत्यर्थान्मङ्गलयुक्तात्कर्मणो न प्रमदितव्यत् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् । स्वाध्यायोऽध्ययनं प्रवचनमध्यापनं ताभ्यां न प्रमदितव्यम् । ते हि नियमेन कर्तव्ये इत्यर्थः ।

अर्थ—सत्य भाषण कर. प्रमाणतः जसें अवगत झालें असेल तसेंच जें बोलावयाचें असेल तें बोल. तसेंच धर्माचें आचरण कर. 'धर्म' हें अनुष्ठान करण्यास उचित असलेल्या सामान्य आचरणाचें नाव आहे. कारण सत्यादि विशेष धर्मांचा पृथक् निर्देश केला आहे. स्वाध्याय ह्म० अध्ययन. त्यापासून प्रमाद पावूं नको. ह्म० त्याविषयीं अनवधान करूं नको. विद्यानिष्क्रयार्थ आचार्याकरिता इष्ट धन आणून देऊन आचार्यानें अनुज्ञा दिली असता अनुरूप भार्येचें पाणिग्रहण करून प्रजातंतूचा—प्रजेच्या संतानाचा—व्यवच्छेद करूं नको. प्रजासंततीचा विच्छेद करूं नये. पुत्र जर उत्पन्न होत नसेल तर पुत्रकाम्यादि कर्मानें त्याला उत्पन्न करण्याविषयीं यत्न करावा, असा याचा अभिप्राय. कारण वर (अनु० ९) प्रजा, प्रजनन व प्रजाति अशा त्रयाचा निर्देश आहे. त्याच सामर्थ्यावरून असें ह्मणता येतें. नाहींतर 'प्रजनन' असें एकच साधन तेथें सांगितलें असतें. असो, सत्यापासून प्रमादयुक्त होऊं नये. सत्याविषयीं प्रमाद करूं नये. सत्यापासून प्रमदन ह्मणजे असत्याचा प्रसंग. कारण प्रमाद या शब्दाच्या सामर्थ्यावरूनच तसें ठरतें, विसरूनही अनृत भाषण करूं नये, असा याचा अर्थ. नाहींतर तो असत्यभाषणाचा नुस्ता प्रतिषेधच होईल पण त्यांत कांहीं मोठासा अर्थ नाहीं. धर्मापासून प्रमाद पावूं नये. धर्मशब्द अनुष्ठेयविषय असल्यामुळें त्याचें अननुष्ठान हाच प्रमाद आहे. पण तो करूं नये. ह्मणजे धर्माचें अनुष्ठान

करावेंच, असा याचा भावार्थ. त्याचप्रमाणें आत्मरक्षणार्थ जें कुशल कर्म त्यापासून प्रमाद पावू नये. भूति ह्म० विभूति ऐश्वर्य, त्या भूतीसाठीं असलेलें जें मंगलयुक्त कर्म त्यापासून प्रमाद पावू नये. स्वाध्याय ह्म० स्वतः अध्ययन करणें व प्रवचन ह्म० अध्यापन, यापासून प्रमाद पावू नये. तीं दोन्हीं नियमानें करावीं असा याचा अर्थ

देवपितृकार्याभ्या न प्रमदितव्यम् । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि । तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकꣳ सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि ( २ ) । नो इतराणि ।

तथा देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् । देवपित्र्ये कर्मणी कर्तव्ये । मातृदेवो माता देवो यस्य स त्वं मातृदेवो भव स्या । एवं पितृदेव आचार्यदेवोऽतिथिदेवो भव । देवतावदुपास्या एत इत्यर्थः । यान्यपि चान्यान्यनवद्यान्यनिन्दितानि शिष्टाचारलक्षणानि कर्माणि तानि सेवितव्यानि कर्तव्यानि त्वया । नो अकर्तव्यानीतराणि सावद्यानि शिष्टकृतान्यपि । यान्यस्माकमाचार्याणां सुचरितानि शोभनचरितान्याम्नायाद्यविरुद्धानि तान्येव त्वयोपास्यान्यदृष्टार्थान्यनुष्ठेयानि, नियमेन कर्तव्यानीति यावत् । नो इतराणि विपरीतान्याचार्यकृतान्यपि ।

अर्थ—त्याचप्रमाणें देवकार्य व पितृकार्य यापासून प्रमाद पावू नये ह्म० देवकर्म व पित्र्यकर्म अवश्य करावें. माताच आहे देव ज्याचा असा तू मातृदेव हो तसाच पितृदेव, आचार्यदेव, व अतिथिदेव हो. या सर्वांची देवताप्रमाण उपासना करावी, असा याचा अर्थ तशींच जीं अनवद्य व अनिंदित शिष्टाचारलक्षण कर्में तीं सेवावीं तू तीं करावींस. दुसरीं सदोष अकर्तव्यें शिष्टकृत जरी असलीं तरी करू नये. ( शिष्टांचींही अकार्ये करू नयेत ) जीं आह्मां आचार्यांचीं सुचरितं–शोभन आचरणें–शास्त्रादिकांच्या विरुद्ध नसलेलीं कर्में तींच तू उपासावींस अदृष्टाकरिता तूं त्यांचें अनुष्ठान

करावेंस. नियमानें तीं करावींस, असें तात्पर्य. आचार्यांनीं केलेलींही इतर ह्म० विपरीत कर्में तूं करू नयेस.

ये के चास्मच्छ्रेयाꣳसो ब्राह्मणाः। तेषां त्वयाऽऽसनेन प्रश्वसितव्यम्।

ये के च विशेषिता आचार्यत्वादिधर्मैरस्मदस्मत्- श्रेयांसः प्रशस्यतरास्ते च ब्राह्मणा न क्षत्रियादयस्तेषामासनेनाऽऽसनदानादिना त्वया प्रश्वसितव्यम्। प्रश्वसनं प्रश्वासः श्रमापनयः, तेषां श्रमस्त्वयाऽपनेतव्य इत्यर्थः। तेषां चाऽऽसने गोष्ठीनिमित्ते समुदिते तेषु न प्रश्वसितव्यं प्रश्वासोऽपि न कर्तव्यः। केवलं तदुक्तसारग्राहिणा भवितव्यम्॥

अर्थ—जे कोणी आचार्यादि धर्मांनीं विशेषित ( विशिष्ट ) असलेले आह्माहून अधिक प्रशस्त व तेही ब्राह्मण, क्षत्रियादिक नव्हेत, त्यांना आसनानें ह्म० आसन देणें इत्यादि उपचारानीं तूं प्रश्वसित करावेंस प्रश्वसन ह्म० प्रश्वास, श्रमाचा अपनय ( श्रमपरिहार ), त्याचा श्रम तूं घालवावास, असा भावार्थ आणि त्यांच्या आसनानंतर ह्म० ते बसल्यावर गोष्टींचें निमित्त उद्भवलें असतां त्यांच्या ठिकाणीं प्रश्वसित होऊं नये ह्मणजे प्रश्वासही करूं नये ( श्वास घेण्यासाठीं ह्मणूनही त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करू नये. ) तर ते जें बोलतील त्याचें सार ग्रहण करणारा, असें तू व्हावेंस ( ह्म० त्यांच्या भाषणाकडे थोडेंसुद्धां दुर्लक्ष न करितां त्यांतील सार ग्रहण करावें. )

श्रद्धया देयम्। अश्रद्धयाऽदेयम्। श्रिया देयम्। ह्रिया देयम्। भिया देयम्। संविदा देयम्। अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् ( ३ )। ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः। युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा ते तत्र वर्तेरन्। तथा तत्र वर्तेथाः। अथाभ्याख्यातेषु। ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः। युक्ता आयुक्ताः। अलूक्षा धर्मकामाः स्युः। यथा ते तेषु वर्तेरन्। तथा तेषु वर्तेथाः।

किंच यत्किंचिद्देयं तच्छ्रद्धयैव दातव्यम्। अश्रद्धयाऽदेयं न दातव्यम्। श्रिया विभूत्या देयं दातव्यम्। ह्रिया लज्जया च देयम्। भिया च भयेन देयम्। संविदा च। संविन्मित्रादिकार्यम्। अथैवं वर्तमानस्य यदि कदाचित्ते तव श्रौते स्मार्ते वा कर्मणि वृत्ते वाऽऽचारलक्षणे विचिकित्सा संशयः स्यात्। ये तत्र तस्मिन्देशे काले वा ब्राह्मणास्तत्र कर्मादौ युक्ता इति व्यवहितेन संबन्धः कर्तव्यः। संमर्शिनो विचारक्षमाः। युक्ता अभियुक्ताः कर्मणि वृत्ते वा। आयुक्ता अपरप्रयुक्ताः। अलूक्षा अरूक्षा अक्रूरमतयः। धर्मकामा अदृष्टार्थिनोऽकामहता इत्येतत्स्युर्भवेयुः। ते यथा येन प्रकारेण ब्राह्मणास्तत्र तस्मिन्कर्मणि वृत्ते वा वर्तेरंस्तथा त्वमपि वर्तेथाः। अथाभ्याख्यातेष्वभ्युक्ता दोषेण संदिह्यमानेन संयोजिताः केनचित्तेषु च यथोक्तं सर्वमुपनयेद्ये तत्रेत्यादि।

अर्थ—तसेंच जें कांहीं द्यावयाचें असेल तें श्रद्धेनेंच द्यावें. अश्रद्धेनें देऊं नये. विभूतीनें द्यावें. ( ह्म० ऐश्वर्याला शोभेल असें द्यावें. आपल्या शक्तीप्रमाणें द्यावें ) लज्जेनें द्यावें; भीतीनें द्यावें; संविद् ह्म० मित्रादिकार्वे कार्य. त्या कार्याच्या निमित्तानें द्यावें. अशा रीतीनें सर्व व्यवहार करणाऱ्या तुला जर कदाचित् ( एकादे वेळीं ) श्रौत किंवा स्मार्त कर्म अथवा आचारलक्षण वृत्त याविषयीं संशय आला तर त्या देशांत किंवा त्या कालीं जे ब्राह्मण त्या कर्मादिकांत 'युक्त' असतात, 'तत्र' याचा 'युक्ताः' या पुढच्या पदाशीं संबंध लावावा. 'विचर्षण–' विचार करण्यास समर्थ असतात; युक्त ह्म० कर्म किंवा वृत्त ( आचरण ) यांत सर्व प्रकारें निमग्न झालेले व आयुक्त ह्म० दुसऱ्याकडून प्रेरित न झालेले स्वतंत्र, 'अलूक्ष' ह्म० अरूक्ष, अक्रूरमती ( ज्यांची बुद्धि क्रूर नाहीं, ) 'धर्मकामा' ह्म० अदृष्टाची–पुण्याची इच्छा करणारे, कामानें हत–विवेकरहित न झालेले, असा याचा भावार्थ, असतात ते ब्राह्मण त्या कर्मांत, किंवा आचारांत ज्या प्रकारें वागतील तसाच तूंही त्या कर्मादिकांत वाग. त्याचप्रमाणें अभ्याख्यात पुरुषामध्यें ह्म० ज्याच्यावर कोणी संदिग्ध दोषारोप केला आहे अशा पुरु-

पाशीं व्यवहार करावयाचा प्रसंग आला असतां त्या देशांत किंवा त्या समयीं जे विचारी, कर्मप्रधान, स्वतंत्र, अरूक्ष, व धर्माची इच्छा करणारे ब्राह्मण असतील ते त्याच्याशीं जसा व्यवहार करतील तसाच तूं वाग.

एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषत् । एतदनुशासनम् । एवमुपासितव्यम् । एवमु चैतदुपास्यम् ( ४ ) ॥

इति शीक्षाध्याये एकादशोऽनुवाकः ॥ ११ ॥

एष आदेशो विधिः । एष उपदेशः पुत्रादिभ्यः पित्रादीनाम् । एषा वेदोपनिषद्वेदरहस्यं वेदार्थ इत्येतत् । एतदेवानुशासनमीश्वरवचनम् । आदेशवाक्यस्य विधेरुक्तत्वात्सर्वेषां वा प्रमाणभूतानामनुशासनमेतत् । यस्मादेवं तस्मादेवं यथोक्तं सर्वमुपासितव्यं कर्तव्यम् । एवमु चैतदुपास्यमुपास्यमेव चैतत्त्वानुपास्यमित्यादरार्थं पुनर्वचनम् ॥

इति शांकरभाष्ये एकादशोऽनुवाकः ।

अर्थ—हा आदेश ह्म० विधि आहे. हा पुत्रादिकांस पित्रादिकांचा उपदेश आहे. ही वेदोपनिषद् ह्म० वेदरहस्य, वेदार्थ असा भाव, आहे. हेंच अनुशासन ह्म० ईश्वरवचन आहे. किंवा आदेशवाक्य असा जो विधि त्याचें कथन वर केलेलें असल्यामुळें हें सर्व प्रमाणभूत उपदेशकांचें अनुशासन आहे, असें तात्पर्य. ज्या अर्थी असें आहे त्या अर्थी वर जसें सांगितलें आहे तसें सर्व करावें. असेंच हें करावें. आणि तें करावेंच, त्याला कधींही सोडूं नये; असें आदरार्थ पुनः सांगितलें आहे. ( इति शीक्षाध्याये एकादशोऽनुवाकः )

---

शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा । शं न इन्द्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः । नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्मावादिषम् । ऋतमवादिषम् । सत्यमवादिषम् । तन्मामावीत् । तद्वक्तारमावीत् । आवीन्माम् । आवीद्वक्तारम् । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ( १ ) ॥

अतीतविद्याप्राप्त्युपसर्गशमनार्थं शान्तिं पठति—शं नो मित्र इति। व्याख्यातमेतत्पूर्वम्।

अर्थ—मागील विद्याप्राप्तीचे उपसर्ग शांत व्हावे, म्हणून 'शं नो मित्र,' ही शांति येथे पढली आहे. पूर्वी (पृष्ठ ११) या शांतीचा अर्थ होऊन गेला आहे. पण येथें विद्या संपलेली असल्यामुळे 'अवादिषम्' 'तन्मामावीत्, तद्वक्तारमावीत्,' इत्यादि भूतकाळीं प्रयोग केले आहेत. आरंभींच्या शांतींत 'वदिष्यामि' व 'अवतु' असे भविष्यत्काळीं व प्रार्थना या अर्थी प्रयोग केले होते. यास्तव येथें 'तुलाच प्रत्यक्ष ब्रह्म म्हटलें, मी ऋत बोललों, सत्य बोललों, तें माझें रक्षण करतें झालें,' इत्यादि अर्थ करावा.

अत्रैतच्चिन्त्यते विद्याकर्मणोर्विवेकार्थं किं कर्मभ्य एव केवलेभ्यः परं श्रेय उत विद्यासव्यपेक्षेभ्य आहोस्विद्विद्याकर्मभ्यां संहताभ्यां विद्याया वा कर्मापेक्षाया उत केवलाया एव विद्याया इति। तत्र केवलेभ्य एव कर्मभ्यः स्यात्। समस्तवेदार्थज्ञानवतः कर्माधिकारात्। "वेदः कृत्स्नोऽधिगन्तव्यः सरहस्यो द्विजन्मना" इति स्मरणात्। अधिगमश्च सहोपनिषदर्थेनाऽऽत्मज्ञानादिना। "विद्वान्यजते" "विद्वान्याजयति" इति च विदुष एव कर्मण्यधिकारः प्रदर्श्यते सर्वत्र। "ज्ञात्वा चानुष्ठानम्" इति च। कृत्स्नश्च वेदः कर्मार्थ इति हि मन्यन्ते केचित्। कर्मभ्यश्चेत्परं श्रेयो नावाप्यते वेदोऽनर्थकः स्यात्॥ १॥

अर्थ—आता येथें विद्या व कर्म यांच्या विवेकार्थ या गोष्टींचें चिंतन केलें जातें १ केवळ कर्मांपासूनच परम श्रेय होतें कीं २ विद्येची अपेक्षा ज्यांना आहे अशा कर्मांपासून तें होतें, कीं ३ विद्या व कर्म यांच्या समुच्चयानें तें होतें, किंवा ४ कर्मांची जिला अपेक्षा आहे अशा विद्येपासून तें होतें कीं ५ नुसत्या विद्येपासून होतें? (असे पांच विकल्प संभवतात.) त्यांतील केवळ कर्मांपासूनच परम श्रेय होतें (हा पक्ष अगोदर पुढें येतो.) कारण समस्तवेदार्थ जाणणाऱ्याला कर्माचा अधिकार असतो. कारण 'द्विजानें

रहस्यासह सर्व वेद जाणावा, ' असें स्मृतींचें विधान आहे. आत्मज्ञानादि उपनिषदर्थासह त्याचें ज्ञान होणें, हाच अधिगम आहे ' विद्वान् यजन करतो, ' ' तो यजन करवितो ' अशा रीतीनें विद्वानाचाच कर्माचे ठिकाणीं अधिकार आहे, असें सर्व ठिकाणीं दाखविलें जातें ' आणि ह्मणूनच अनुष्ठान करावें, ' असेंही ह्मटलें आहे सर्व वेद कर्माकरिताच आहे, असें कित्येक समजतात कर्मापासून जर परम श्रेय प्राप्त होत नसेल तर वेद अनर्थक होईल

असा पूर्वपक्ष करून भाष्यकार सिद्धान्त सांगतात—

न। नित्यत्वान्मोक्षस्य। नित्यो हि मोक्ष इष्यते। कर्मकार्यस्यानित्यत्वं प्रसिद्धं लोके। कर्मभ्यश्चेच्छ्रेयो नित्यं स्यात्तच्चानिष्टम्। " तद्यथेह कर्मचितो लोकः क्षीयते ' इतिन्यायानुगृहीतश्रुतिविरोधात्॥

अर्थ—पण हें ह्मणणें बरोबर नाहीं कारण मोक्ष नित्य आहे मोक्ष नित्य आहे, असें इच्छिलें आहे– ( मोक्ष नित्य मानलेला आहे, हें प्रसिद्ध आहे.) तसेंच कर्माचें कार्य अनित्य असतें, हेंही लोकांमध्यें प्रसिद्ध आहे यास्तव कर्मापासून जर नित्य श्रेय होईल तर तें अनिष्ट आहे कारण ' ज्याप्रमाणें येथें कर्मानें संपादन केलेला लोक–फळ–क्षीण होतो (त्याप्रमाणें पुण्यकृत लोक क्षीण होतो )' या न्यायानुगृहीत श्रुतीशीं विरोध येतो

काम्यप्रतिषिद्धयोरनारम्भादारब्धस्य च कर्मण उपभोगेन क्षयान्नित्यानुष्ठानाच्च ज्ञाननिरपेक्ष एव मोक्ष इति चेत्॥

अर्थ—काम्य व निषिद्ध कर्मांचा आरंभच न केल्यामुळें, व आरब्ध कर्मांचा उपभोगानें क्षय झाल्यामुळें आणि नित्य कर्माचें अनुष्ठान केल्यामुळें मोक्ष ज्ञाननिरपेक्षच होतो. ( ह्म० तो ज्ञानाची अपेक्षा न करिताच, ज्ञानावांचूनच होतो. ) असें ह्मणाल,

तच्च न। शेषकर्मसंभवात्तन्निमित्तशरीरान्तरोत्पत्तिः प्राप्नोतीति प्रत्युक्तम्। कर्मशेषस्य च नित्यानुष्ठानेनाविरोधात्क्षयानुपपत्तिरिति च॥

अर्थ—तर तेंही बरावर नाहीं. कारण 'अवशिष्ट कर्माचा संभव असल्यामुळें त्याच्या निमित्तानें दुसऱ्या शरीराची उत्पत्ति प्राप्त होते' असें सांगून वर (पृष्ठ ७) त्या ह्मणण्याचें प्रत्याख्यान (निराकरण) केलें आहे त्याचप्रमाणें अवशिष्ट कर्मांचा नित्य कर्मांच्या अनुष्ठानाशीं अविरोध असल्यामुळें अवशिष्ट कर्मांच्या क्षयाची उपपत्ति लागत नाहीं' असेंही वर (पृष्ठ ८) सांगितलें आहे

यदुक्तं समस्तवेदार्थज्ञानवतः कर्माधिकारादित्यादि। तच्च न। श्रुतज्ञानव्यतिरेकादुपासनस्य॥

अर्थ—आतां 'ज्याला समस्त वेदार्थाचें ज्ञान असतें त्याचाच कर्माचे ठिकाणीं अधिकार असतो' इत्यादि जें ह्मटलें आहे, तें बरोबर नाहीं कारण गुरुकुलांत ज्याचा विचार केला आहे अशा वाक्यावरून होणाऱ्या कर्मानुष्ठानोपयोगी ज्ञानाहून उपासन निराळें आहे (यद्यपि अध्ययनविधीच्या अनुसार प्रत्येकानें सर्व वेदार्थाचा विचार करावा, असें प्राप्त होतें तथापि प्रत्येक वाक्याचें अध्ययन व प्रत्येक वाक्याचा अर्थविचार हीं दोन्ही एकाच वेळीं होऊं शकत नाहींत तर एकदां अध्ययन व दुसऱ्यादां अर्थज्ञान करून घ्यावें लागतें. पण अध्ययनानंतर कर्मोपयोगी वाक्याचें अर्थज्ञान झालें कीं तेवढ्यानेच पुरुषाला कर्माचा अधिकार प्राप्त होण्याचा संभव असतो कारण ब्रह्मसाक्षात्काराचा कर्मामध्यें कांहीं उपयोग नसतो यास्तव समस्त वेदाचें अर्थज्ञान ज्याला असतें तोच कर्माचा अधिकारी होतो, असें नाहीं शिवाय अध्ययनविधीमुळें गुरुकुलांत वेदान्तविचारही केला, असें जरी समजलें तरी त्यावरून समस्त वेदार्थाचें ज्ञान ज्याला असेल त्याला कर्माधिकार आहे, असें होत नाहीं कारण उपासनेनें साध्य होणारा जो ब्रह्मसाक्षात्कार तो कर्माहून निराळा आहे आतां या सूत्ररूप वाक्याचाच विस्तार करितात– )

श्रुतज्ञानमात्रेण हि कर्मण्यधिक्रियते नोपासनामपेक्षते। उपासनं च श्रुतज्ञानादर्थान्तरं विधीयते। मोक्षफलमर्थान्तरप्रसिद्धं च

स्यात् । " श्रोतव्यः" इत्युक्त्वा तद्व्यतिरेकेण " मन्तव्यो निदिध्यासितव्य " इति यत्नान्तरविधानात्। मनननिदिध्यासनयोश्च प्रसिद्धं श्रवणज्ञानादर्थान्तरत्वम् ॥

अर्थ--पुरुष नुसत्या श्रुत ज्ञानानेंच ( ह्म० गुरुकुलात केलेल्या वाक्यविचारजन्य ज्ञानानेंच ) कर्माचा अधिकारी होतो. तो ( कर्माधिकारार्थ ) उपासनेची अपेक्षा करीत नाहीं, उपासनही श्रुतज्ञानाहून निराळें आहे, असें त्याचें विधान केलें जातें. मोक्ष हें फळ पृथक् साधनानेंच सिद्ध होईल कारण ' श्रोतव्य ' ह्म० श्रवण करावें, असें सांगून त्याहून पृथक्पणें ' मनन करावें व निदिध्यासन करावें ' अशा रीतीनें त्यासाठीं निराळ्या यत्नाचें विधान केलेलें असल्यामुळें मनन व निदिध्यासन यांचें श्रवणज्ञानाहून अर्थान्तरत्व ( पृथक्त्व ) पूर्णपणें सिद्ध आहे (पण हें सुद्धां आह्मी केवळ कर्ममीमांसेच्या न्यायाचा अंगीकार करून सांगितलें आहे. वस्तुत. ' श्रोतव्य. ' या विधीपुढेंच उपनिषद्विचाराला आरंभ होतो, व तो भिन्न अधिकार आहे. असो, याप्रमाणें केवळ कर्म मोक्षाचें साधन आहे, या पहिल्या पक्षाचें निरसन करून विद्यासमुच्चित कर्म मोक्षसाधन आहे, या दुसऱ्या पक्षाचें निरसन करितात )

एवं तर्हि विद्यासव्यपेक्षेभ्य कर्मभ्यः स्यान्मोक्षः। विद्यासहितानां च कर्मणां भवेत्कार्यान्तरारम्भसामर्थ्यम् । यथा स्वतो मरणज्वरादिकार्यारम्भसामर्थ्यानामपि विषदध्यादीनां मन्त्रशर्करादिसंयुक्तानां कार्यान्तरारम्भसामर्थ्यम्, एवं विद्यासहितै: कर्मभिर्मोक्ष आरभ्यत इति चेत् । न । आरभ्यस्यानित्यत्वादित्युक्तो दोष ॥

अर्थ --असें जर असेल तर विद्येची ज्यांना अपेक्षा आहे अशा कर्मांपासून मोक्ष होईल. विद्यायुक्त कर्मांच्या ठिकाणीं निराळ्या कार्याचा आरंभ करण्याचें सामर्थ्य असू शकेल. स्वत मरण, ज्वर, इत्यादि कार्यांच्या आरंभाचें सामर्थ्य ज्यांच्यामध्यें असतें असे-विष, दहीं इत्यादि-पदार्थ मंत्र, शर्करा इत्यादिकांनीं युक्त झाले असतां त्यांच्यामध्यें ( मरण, ज्वर, इत्यादि-

काच्या अगदीं विरुद्ध असें ) निराळें कार्य आरभण्याचें सामर्थ्य जसें येतें, त्याप्रमाणें विद्यायुक्त कर्मांच्या योगानें मोक्ष आरब्ध होतो, असें जर ह्मणाल तर ते बरोबर नाहीं. कारण आरभ्य पदार्थाला अनित्यत्व असतें, हा त्या पक्षावर येणारा दोष वर सांगितला आहे

पुन पूर्वपक्षीयाची शका घेऊन समाधान करितात—

**वचनादारभ्योऽपि नित्य एवेति चेत्। न। ज्ञापकत्वाद्वचनस्य वचन नाम यथाभूतस्यार्थस्य ज्ञापक विद्यमानस्य कर्तृ। न हि वचनशतेनापि नित्यमारभ्यत आरब्ध वाऽविनाशि भवेत्॥**

अर्थ—अहो पण ( ' न स पुनरावर्तते ' ह्म० तो पुन या ससारात परत येत नाहीं, असें ) वचन असल्यामुळें मोक्ष आरभ्य जरी असला तरी नित्यच आहे, ह्मणून जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण वचनाला ज्ञापकत्व आहे वचन यथाभूत अर्थाचें ज्ञापक आहे ( ह्म० पदार्थ जसा असेल तसें त्याचें ज्ञान करून देणारें आहे ) ह्म० विद्यमान वस्तूचें कर्तृ आहे शेकडों वचनांनींही नित्य वस्तूचा आरभ केला जात नाहीं, किंवा आरब्ध वस्तु अविनाशी ( नित्य ) होत नाहीं ( आरभ्य ह्म० ज्याचा आरभ होतो तें अशा आरभ्य वस्तूमध्यें नित्यत्व योग्यताच नसते, आणि ती वचनावरून त्यात येते, ह्मणून जर ह्मटलें तर वचन ज्ञापक नसून कारक आहे, असें होईल आणि वचन असभाव्य अर्थही करणारे आहे, असें जर ह्मटलें तर मग ' आधळयाला रत्न सापडलं, दिसलें,' अशा अर्थाच्या वचनावरूनही आधळयाचे ठिकाणीं पाहण्याची योग्यता यते, असें ह्मणावें लागेल पण तें सयुक्तिक नाहीं यास्तव वचन ज्ञापक आहे, कारक नाहीं त विद्यमान अर्थाचें कर्तृ-करणारें व्यक्त करणारें आहे अविद्यमान अर्थाच कर्तृ नाहीं, असा भावार्थ. )

असो, याप्रमाण कर्म प्रधान व विद्या गौण, याच्या असम समुच्चयाचें निरसन करून यान्या समसमुच्चयाचे ठिकाणींही त्याच न्यायाचा अतिदेश करितात—

एतेन विद्याकर्मणो· संहतयोर्मोक्षारम्भकत्वं प्रत्युक्तम् ॥

अर्थ--या अनित्यत्वादि दोषप्रसगानें संहत ( ह्मणजे सम-प्राधान्यानें समुच्चित ) विद्या-कर्मांना मोक्षारंभकत्व आहे, या पक्षाचेंही प्रत्याख्यान ( निरसन ) झालें ( ह्म० कर्म व विद्या याच्या समुचायानें मोक्षाला आरंभ होतो, ह्मणून जरी ह्मटलें तरी तो आरब्ध मोक्ष अनित्य ठरतो. यास्तव तो पक्षही अयोग्य आहे, असा भावार्थ. )

विद्याकर्मणी मोक्षप्रतिबन्धहेतुनिवर्तके इति चेत् । न । कर्मणः फलान्तरदर्शनात् । उत्पत्तिसंस्कारविकाराप्तयो हि फलं कर्मणो दृश्यते । उत्पत्त्यादिफलविपरीतश्च मोक्षः ॥

अर्थ- विद्या व कर्म हीं दोन्हीं मोक्षाला प्रतिबंध करणाऱ्या ( अविद्या, अधर्म इत्यादि ) कारणाचीं निवर्तक आहेत मोक्षाचें स्वरूप उत्पन्न करणारीं नव्हेत, ह्मणून ह्मणाल तरतेंही बरोबर नाहीं. कारण कर्माचें निराळेंच फळ दिसतें. उत्पत्ति, संस्कार, विकार व आप्ति, असें चार प्रकारचें कर्माचें फळ दिसतें, आणि मोक्ष तर उत्पत्त्यादि फळाच्या विपरीत आहे. ( पुरोडाशादिकाची उत्पत्ति, व्रीह्यादिकाचा संस्कार, सोमाचा विकार, व वेदाची आप्ति-प्राप्ति हें कर्माचें फळ आहे, असें प्रसिद्ध आहे. पण आत्मस्वरूपभूत मोक्ष अनादि आहे. त्यामुळें त्याच्यामध्यें कोणत्याही प्रकारचें अतिशयत्व, आधिक्य आणता येत नाहीं; व तो अविकार्य आहे, मोक्ष नित्यप्राप्तच असल्यामुळें त्याला आप्यत्वही नाहीं. त्यामुळें तो ( मोक्ष ) कर्मफळाहून विपरीत आहे )

(आता मोक्ष आप्य आहे, अशी शङ्का घेऊन तिचें समाधान करितात-)

गतिश्रुतेराप्य इति चेत् । " सूर्यद्वारेण, तयोर्ध्वमायन् " इत्येवमादिगतिश्रुतिभ्यः प्राप्यो मोक्ष इति चेत् । न । सर्वगतत्वाद्गन्तृभिन्नानन्यत्वाद्वाकाशादिकारणत्वात्सर्वगतं ब्रह्म । ब्रह्माव्यतिरिक्ताश्च सर्वे विज्ञानात्मानः । अतो नाऽऽप्यो मोक्षः । गन्तुरन्यद्विभिन्नं देशं प्रति भवति गन्तव्यम् । न हि येनेवाव्यतिरिक्तं यत्तत्तेनैव

गम्यते । तदनन्यत्वप्रसिद्धेश्च । "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" "क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि" इत्येवमादिश्रुतिस्मृतिशतेभ्यः ॥

अर्थ—(अर्चिरादि मार्गानें) गति सांगितलेली असल्यामुळें (ब्रह्मांडाच्या बाहेर असलेल्या ब्रह्माची प्राप्ति, हाच मोक्ष असल्यामुळें) मोक्ष आप्य-प्राप्य आहे, असें ह्मणाल; ह्म० 'सूर्यद्वारेण' 'तयोर्ध्वमायन्०' सूर्यद्वारानें, त्या सुषुम्ना नाडीनें वर जाणारा अमरणधर्मत्वास प्राप्त होतो इत्यादि प्रकारच्या गतिश्रुती असल्यामुळें मोक्ष प्राप्य आहे, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. (ह्म० त्याची संयोगरूप किंवा तादात्म्यरूप प्राप्ति संभवत नाहीं.) कारण तें ब्रह्म सर्वगत आहे. गमन करणारे जे जीव त्याच्याशीं त्याचें अनन्यत्व आहे. त्याला आकाशादिकांचें कारणत्व आहे. ब्रह्म सर्वगत आहे व सर्व विज्ञानात्मे ब्रह्माहून व्यतिरिक्त नाहींत. यास्तव मोक्ष आप्य नाहीं. गमन करणाऱ्या पुरुषाहून पृथक् असलेल्या देशालाच गमन करतां येतें. जें ज्याहून पृथक् नसतें तें त्यालाच प्राप्त होत नसतें, तें त्यालाच जात नाहीं. शिवाय 'तें उत्पन्न करून मागून तो त्यांतच प्रवेश करता झाला' व 'क्षेत्रज्ञही मलाच जाण,' इत्यादि शेंकडों श्रुतिस्मृतिवचनांवरून ब्रह्म अनन्य आहे, या गोष्टीची पूर्णपणें सिद्धि होते

(आतां शंका घेऊन गत्यादिश्रुतींचें तात्पर्य सांगतात—)

गत्यैश्वर्यादिश्रुतिविरोध इति चेत्। अथापि स्यादप्राप्यप्राप्त्यो मोक्षस्तत्र गतिश्रुतीनां "स एकधा" "स यदि पितृलोककामो भवति" "स्त्रीभिर्वा यानैर्वा" इत्यादिश्रुतीनां च कोपः स्यादिति चेत्। न। कार्यब्रह्मविषयत्वात्तासाम्। कार्ये हि ब्रह्मणि स्त्र्यादयः स्युर्न कारणे। "एकमेवाद्वितीयं" "यत्र नान्यत्पश्यति" "तत्केन कं पश्येत्" इत्यादिश्रुतिभ्यः ॥

अर्थ—गति, ऐश्वर्य इत्यादिकांचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींशीं विरोध येतो, म्हणून जर म्हणाल ह्म० यावर असें कोणी म्हणेल कीं, जर मोक्ष अप्राप्य आहे तर गतिश्रुति (तो अर्चिरादि मार्गानें गमन करतो, असा

अर्थाची श्रुति ) व ' तो एकधा होतो,' 'तो जर पितृलोकाची इच्छा करणारा असला तर त्याला तो लोक तत्काल प्राप्त होतो.' 'तो स्त्रियांशीं यानांनीं रममाण होतो ' इत्यादि श्रुतीचा कोप ( बाध ) होतो ह्मणून जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण त्या श्रुति कार्यब्रह्मविषय आहेत (ह्मा० त्यांचा विषय कार्यब्रह्म आहे. ) कार्यब्रह्मामध्येंच स्त्र्यादिक संभवतात. कारणब्रह्मांत त्या संभवत नाहींत. कारण 'एकच व अद्वितीय;' 'जेथें दुसरें कांहीं पहात नाहीं, ' ( जेव्हां सर्वच आत्मा होतो ) 'तेव्हां कोण कोणत्या साधनानें कोणाला पाहणार ? ' इत्यादि श्रुतींवरून हें सिद्ध होतें.

( समुच्चयाचा अंगीकार करून मोक्षामध्यें कांहीं कर्मकार्य संभवत नाहीं, असें सांगितलें; पण आतां तो समुच्चयच संभवत नाहीं, असें सांगतात–)

विरोधाच्च विद्याकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः । प्रविलीनकर्त्रादिकारकविशेषतत्त्वविषया हि विद्या तद्विपरीतकारकसाध्येन कर्मणा विरुध्यते । न ह्येकं वस्तु परमार्थतः कर्त्रादिविशेषवत्तच्छून्यं चेत्युभयथा द्रष्टुं शक्यते । अवश्यं ह्यन्यतरन्मिथ्या स्यात् । अन्यतरस्य च मिथ्यात्वप्रसङ्गे युक्तं यत्स्वाभाविकाज्ञानविषयस्य द्वैतस्य मिथ्यात्वम् । " यत्र हि द्वैतमिव भवति " " मृत्योः स मृत्युमाप्नोति " " अथ यत्रान्यत्पश्यति तदल्पम् " " अन्योऽसावन्योऽहमस्मि " " उदरमन्तरं कुरुते " " अथ तस्य भयं भवति " इत्यादिश्रुतिशतेभ्यः । सत्यत्वं चैकत्वस्य "एकधैवानुद्रष्टव्यम्" "एकमेवाद्वितीयम्" " ब्रह्मैवेदꣳ सर्वम् " " आत्मैवेदꣳ सर्वम् " इत्यादिश्रुतिभ्यः । न च संप्रदानादिकारकभेदादर्शने कर्मोपपद्यते । अन्यत्वदर्शनापवादश्च विद्याविषये सहस्रशः श्रूयते । अतो विरोधो विद्याकर्मणोः । अतश्च समुच्चयानुपपत्तिः ॥

अर्थ—विद्या व कर्म यांचा विरोध असल्यामुळें समुच्चयाची अनुपपत्ति आहे. कारण ज्यांत कर्ता, कर्म, करण, इत्यादि कारकविशेषांचा पूर्णपणे लय झाला आहे, असें तत्त्व हाच जिचा विषय आहे, अशी विद्या आहे. त्यामुळें त्याहून विपरीत (ह्मा० लीन न झालेल्या) कारकांनीं साध्य होणाऱ्या

कर्माशीं तिचा विरोध आहे कारण एकच वस्तु परमार्थतः कर्त्रादिविशेष-युक्त आहे व त्यांनीं रहित आहे, अशी दोन्ही प्रकारांनीं पाहतां येणें शक्य नाहीं. त्यांतील कांहीं तरी एक अवश्य मिथ्या असलें पाहिजे, आणि त्यांतील कोणत्या तरी एकाला मिथ्या ठरण्याचा प्रसंग आला असता स्वाभाविक अज्ञानविषय द्वैतालाच मिथ्यात्व असणें युक्त आहे कारण ' ज्यावेळीं द्वैतसें होतें, तेव्हां इतरापासून आपणाला भिन्न समजणारा एक दुसऱ्याला पाहतो, ऐकतो, इत्यादि ' ' जो या सृष्टींत भेद पाहतो तो मृत्यूच्या परंपरेंत पडतो,' ' जेथें भेद पाहतो तें अल्प' ' हा निराळा, व मी निराळा आहें, ' ' जो थोडेसेंही अंतर पाहतो त्याला मोठें भय होतें, ' इत्यादि अर्थाच्या शेकडों श्रुती आहेत तसेंच एकत्वाचें सत्यत्व एका प्रकारानेंच अनुभवानुसार पहावें कारण ' एकच व अद्वितीय, ' ' ब्रह्मच हें सर्व आहे, ' ' आत्माच हें सर्व आहे, ' इत्यादि श्रुतींवरून त्याची सिद्धि होते संप्रदानादि कारकभेदाचें अदर्शन झालें असता कर्म उपपन्न होत नाहीं ( ह्मo अमुक देवतेला उद्देशून हें अमुक द्रव्य मी देतों, अशा रीतीनें ज्याला द्यावयाचें तें संप्रदान, जें द्यावयाचें तें कर्म व जो देणारा तो कर्ता इत्यादि कारकांचा भेदच जर प्रतीत न झाला तर कर्म उपपन्न होत नाहीं ) विद्याविषयामध्यें अन्यत्वदर्शनाचा ( भेददृष्टीचा ) अपवाद हजारों ठिकाणीं केलेला आढळतो यास्तव विद्या व कर्म यांचा विरोध आहे त्यामुळेंच त्यांच्या समुच्चयाची अनुपपत्ति आहे

( आतां यावर शंका घेऊन तिचेंच विवरण करितात —)

तत्र यदुक्तं सहताभ्यां विद्याकर्मभ्यां मोक्ष इति । अनुपपन्नं तत् । विहितत्वात्कर्मणाम् । श्रुतिविरोध इति चेत् । यद्युपमृद्य कर्त्रादिकारकविशेषमात्मैकत्वविज्ञानं विधीयते । सर्पादिभ्रान्तिविज्ञानोपमर्दकरज्ज्वादिविषयविज्ञानवत्प्राप्तं कर्मविधिश्रुतीनां निर्विषयत्वाद्विरोध । विहितानि च कर्माणि । स च विरोधो न युक्तः । प्रमाणत्वाच्छ्रुतीनामिति चेन्न पुरुषार्थोपदेशपरत्वाच्छ्रुतीनाम् ॥

अर्थ—आता समुच्चित ज्ञानकर्मांच्या योगानें मोक्ष होतो, ह्मणून जें तुह्मीं ह्मटलें आहे तें अयोग्य आहे. कारण कर्मांना विहितत्व आहे. पण तसें ह्मटल्यास श्रुतिविरोध हा दोष येतो, ह्मणून ह्मणाल—ह्मणजे जर कर्त्रादिविशेष कारकाचा बाध करून आत्म्याच्या एकत्वज्ञानाचें विधान केलेलें आहे, असें ह्मटलें तर सर्पादिभ्रातिविज्ञानाचा बाध करणाऱ्या रज्जुप्रभृतिविषयाच्या ज्ञानाप्रमाणें कर्मविधि श्रुतींना निर्विषयत्व येत असल्यामुळें विरोध प्राप्त होतो. पण कर्में विहित आहेत. त्यामुळें तो विरोध येणें युक्त नव्हे. कारण श्रुतींना प्रमाणत्व आहे, असें ह्मणाल—तर तें बरोबर नाहीं कारण श्रुतींना पुरुषार्थोपदेशपरत्व आहे. ( श्रुती पुरुषार्थोपदेशपर आहेत. त्याचें प्रामाण्य पुरुषार्थोपदेशावर अवलंबून आहे, भेदाच्या सत्यत्वावर अवलंबून नाहीं. त्यामुळें सर्व प्राण्याच्या प्रसिद्धीनेंच सिद्ध व सफल क्रिया करण्यास समर्थ अशा कारकादि भेदाचा स्वीकार करूनच प्रवृत्त झालेल्या श्रुतिवाक्याचें प्रामाण्य बाधित होत नाहीं, असा भावार्थ आता वरील संक्षिप्त वाक्याचेंच विवरण करितात—)

विद्योपदेशपरा तावच्छ्रुतिः संसारात्पुरुषो मोक्षयितव्य इति संसारहेतोरविद्याया विद्यया निवृत्तिः कर्तव्येति विद्याप्रकाशकत्वेन प्रवृत्तेति न विरोधः । एवमपि कर्त्रादिकारकसद्भावप्रतिपादनपरं शास्त्रं विरुध्यत एवेति चेन्न । यथाप्राप्तमेव कारकास्तित्वमुपादायोपात्तदुरितक्षयार्थं कर्माणि विदधच्छास्त्रं मुमुक्षूणां फलार्थिनां च फलसाधनं न कारकास्तित्वे व्याप्रियते । उपचितदुरितप्रतिबन्धस्य हि विद्योत्पत्तिर्नावकल्पते । तत्क्षये च विद्योत्पत्तिः स्यात्ततश्चाविद्यानिवृत्तिस्तत आत्यन्तिकः संसारोपरमः ॥

अर्थ—विद्योपदेशपर श्रुति तर पुरुषाला संसारापासून सोडवावें, ह्मणून संसाराचा हेतु अशी जी अविद्या तिची विद्येनें निवृत्ति करण्यासाठीं विद्याप्रकाशक या रूपानें प्रवृत्त झाली आहे. त्यामुळें वरील विरोध येत नाहीं. ' अहो पण असें जरी ह्मटलें तरी कर्त्रादि कारकाच्या सद्भावाचें प्रतिपादन

करण्यास तत्पर झालेलें शास्त्र विरुद्ध होतेंच (त्या शास्त्राशीं विरोध येतोच),' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण यथाप्राप्त ( स्वभावतःच प्राप्त ) कारकास्तित्वाचाच अंगीकार करून संचित पापाच्या क्षयाकरितां कर्माचें विधान करणारें शास्त्र मुमुक्षू व फलेच्छू याच्या फलाचें साधन आहे. तें कर्ता, कर्म इत्यादि कारकाचें अस्तित्व सिद्ध करावयास प्रवृत्त होत नाहीं. ज्याच्या ठिकाणीं संचित पापरूप प्रतिबंध असतो त्याच्या ठिकाणीं विद्येची उत्पत्ति होऊं शकत नाहीं. पण त्या पापाचा क्षय झाला असतां विद्येची उत्पत्ति होते, तिच्यामुळें अविद्येची निवृत्ति होते आणि त्या अविद्यानिवृत्तीमुळें संसाराचा आत्यन्तिक ह्म० सकारण उपरम होतो.

( वर विद्येचा विषय सत्य व कर्माचा विषय मिथ्या असल्यामुळें विद्या व कर्म यांचा विरोध स्वीकारून समुच्चयाचें निरसन केलें. आतां काम्य व कामी यांचा विषय असल्यामुळें विरोध कसा येतो, तें सांगतात—)

**अपि चानात्मदर्शिनो ह्यनात्मविषयः कामः। कामयमानश्च करोति कर्माणि । ततस्तत्फलोपभोगाय शरीराद्युपादानलक्षणः संसारः। तद्व्यतिरेकेणाऽऽत्मैकत्वदर्शिनो विषयाभावात्कामानुत्पत्तिरात्मनि चानन्यत्वात्कामानुत्पत्तौ स्वात्मन्यवस्थानं मोक्ष इत्यतोऽपि विद्याकर्मणोर्विरोधः। विरोधादेव च विद्या मोक्षं प्रति न कर्माण्यपेक्षते ॥**

अर्थ—दुसरें असें कीं, अनात्मदर्शी जो असतो त्यालाच अनात्मविषयक काम असतो ( ह्म० आत्मभिन्न पदार्थ पाहणारा जो असतो त्यालाच आत्मभिन्न पदार्थांची इच्छा असते, ) आणि जो कामना करणारा असतो तोच कर्में करतो. त्यानंतर त्या कर्माचें फळ भोगण्यासाठीं शरीरादिकाचें ग्रहण करणें एतद्रूप संसार प्राप्त होतो. पण त्याच्या उलट आत्म्याचें एकत्व पाहणारा जो असतो त्याच्या दृष्टीनें विषयांचाच अभाव झाल्यामुळें कामाची उत्पत्ति होत नाहीं आणि आत्म्यामध्यें अनन्य ( एकरूप ) होऊन राहिल्यामुळें कामाची अनुत्पत्ति झाली असतां

स्वात्म्यामध्यें (स्वरूपांत) अवस्थित होणें, हाच मोक्ष आहे. त्यामुळेंही विद्या व कर्म याचा विरोध आहे आणि विरोध असल्यामुळेंच विद्या मोक्ष हें फळ देण्यासाठीं कर्माची अपेक्षा करीत नाहीं.

( तर मग विद्येच्या जवळच ह्म० विद्याप्रकरणात कर्माचा पाठ कां केला आहे, असें कोणी विचारील ह्मणून सागतात—)

**स्वात्मलाभे तु पूर्वोपचितप्रतिबन्धापनयद्वारेण विद्याहेतुत्वं प्रतिपद्यन्ते कर्माणि नित्यानीति । अत एवास्मिन्प्रकरण उपन्यस्तानि कर्माणीत्यवोचाम । एवं चाविरोध· कर्मविधिश्रुतीनाम् । अतः केवलाया एव विद्यायाः परं श्रेय इति सिद्धम् ॥**

अर्थ—पण स्वात्मलाभाकरिता पूर्व संचित प्रतिबधाचें निरसन करून त्याच्या द्वारा नित्य कर्में विद्येच्या हेतुत्वास प्राप्त होतात. ( ह्म० तीं विद्येचीं कारणें होतात. ) ह्मणूनच या प्रकरणात कर्मांचा उपन्यास केला आहे, असें आह्मीं ह्मटलें आहे. अशा प्रकारें कर्माचें विधान करणाऱ्या श्रुतींचा अविरोध आहे. यास्तव केवळ विद्येच्या योगानेंच परम श्रेय होतें, असें सिद्ध झालें.

( पण कर्में विद्येचीं साधनें आहेत, असें ऐकून ' तर मग केवळ गृहस्थाश्रमाचेंच अनुष्ठान करावें ' असें कर्मजड ह्मणतात—)

**एवं तर्ह्याश्रमान्तरानुपपत्ति· । कर्मनिमित्तत्वाद्विद्योत्पत्ते· । गार्हस्थ्ये च विहितानि कर्माणीत्येकाश्रम्यमेव । अतश्च यावज्जीवादिश्रुतयोऽनुकूलतराः ॥**

अर्थ—मग असें जर असेल तर गृहस्थावाचून इतर आश्रमाची अनुपपत्ति होते कारण विद्येची उत्पत्ति कर्मामुळेंच होते, आणि कर्में गृहस्थाश्रमामध्यें विहित आहेत. त्यामुळें एक—आश्रमत्वच आहे. ( ह्म० गृहस्थ हाच एक आश्रम आहे. ) आणि त्यामुळेंच ' यावज्जीव अग्निहोत्राचें हवन करावें ' इत्यादि श्रुती अतिशय अनुकूळ आहेत.

( पण श्रुति स्मृत्यादि प्रमाण ग्रंथांत इतर आश्रमांचेंही विधान केलेलें असल्यामुळें व त्यांच्या कर्मानाही गृहस्थांच्या कर्माप्रमाणें कर्मत्व असल्यामुळें वरील प्रश्न केवळ ग्राम्य धर्माविषयीं आसक्ति ठेवणाऱ्या लोकांकडूनच उद्भवणारा आहे. असें सांगतात—)

न । कर्मानेकत्वात् । न ह्यग्निहोत्रादीन्येव कर्माणि । ब्रह्मचर्यं तपः सत्यवदनं शमो दमोऽहिंसेत्येवमादीन्यपि कर्माणीतराश्रमप्रसिद्धानि विद्योत्पत्तौ साधकतमान्यसंकीर्णत्वाद्विद्यन्ते ध्यानधारणादिलक्षणानि च । वक्ष्यति च—" तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व " इति । जन्मान्तरकृतकर्मभ्यश्च प्रागपि गार्हस्थ्याद्विद्योत्पत्तिसंभवात्कर्मार्थत्वाच्च गार्हस्थ्यप्रतिपत्तेः कर्मसाध्यायां च विद्यायां सत्यां गार्हस्थ्यप्रतिपत्तिरनर्थिकैव । लोकार्थत्वाच्च पुत्रादीनाम् । पुत्रादिसाध्येभ्यश्चायं लोकः पितृलोको देवलोक इत्येतेभ्यो व्यावृत्तकामस्य नित्यसिद्धात्मलोकदर्शिनः कर्मणि प्रयोजनमपश्यतः कथं प्रवृत्तिरुपपद्यते । प्रतिपन्नगार्हस्थ्यस्यापि विद्योत्पत्तौ विद्यापरिपाकाद्विरक्तस्य कर्मसु प्रयोजनमपश्यतः कर्मभ्यो निवृत्तिरेव स्यात् । " प्रव्रजिष्यन्वा अरेऽहमस्मात्स्थानादस्मि " इत्येवमादिश्रुतिलिङ्गदर्शनात् ॥

अर्थ—हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण कर्में अनेक आहेत. अग्निहोत्रादि हींच कांहीं कर्में नव्हेत. तर ब्रह्मचर्य, तप, सत्य भाषण, शम, दम, अहिंसा, इत्यादि दुसरींही कर्में इतर आश्रमाकरितां प्रसिद्ध आहेत. तीं असंकीर्ण ( ह्म० हिंसादि दोषांनीं अमिश्र ) असल्यामुळें विद्योत्पत्तीचीं साधकतम ( ह्म० अतिशय सिद्धि करणारीं ) साधनें आहेत. तशींच ध्यान-धारणादि लक्षण कर्मेंही साधकतम आहेत. वेद याच उपनिषदांत पुढें ' तपानें ब्रह्माला जाणण्याची इच्छा कर ' असें सांगणार आहे. ( कर्मे विद्येचीं साधनें जरी असलीं तरी त्याकरितां गार्हस्थ्यच कांहीं आवश्यक नाहीं. याविषयीं हाही एक हेतु आहे.—) जन्मान्तरीं केलेल्या कर्मांमुळें गृहस्थाश्रम स्वीकारण्याच्या पूर्वीही विद्योत्पत्तीचा संभव असल्याकारणानें आणि गृहस्थाश्रमाचा

स्वीकार कर्माकरिताच असल्यामुळें कर्मसाध्य विद्या साध्य झाली असतां गृहस्थाश्रमाचा अंगीकार करणें व्यर्थ आहे. ( कामी पुरुषांना गृहस्थाश्रमाचे धर्म अनुष्ठेय असले तरी ते सर्वांनाच अनुष्ठेय नसतात, याविषयीं आणखीं हेतु.—) तसेंच, पुत्रादिक मानुषादि साधनांनीं साध्य होणाऱ्या—हा लोक, पितृलोक व देवलोक—या लोकांपासून ज्याची कामना व्यावृत्त झाली आहे ( ह्म० ज्याला पुत्रादि साध्य लोकाची इच्छा नाहीं ) आणि जो नित्यसिद्ध आत्मलोकाला पाहत आहे, ( ज्याला आत्मलोक हेंच फळ पाहिजे आहे ) त्या कर्माचें कांहीं प्रयोजनच नाहीं, असें समजणाऱ्या पुरुषाची प्रवृत्ति कर्मामध्यें कशी होऊं शकेल ? फार काय पण ज्यानें गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आहे, अशा पुरुषालाही विद्या प्राप्त झाली असतां, विद्येच्या परिपाकामुळें विरक्त झालेल्या व कर्मामध्यें प्रयोजन न पाहणाऱ्या त्याची कर्मांपासून निवृत्तिच होईल. कारण ' हे मैत्रेयि, मी या स्थानापासून सर्वसंगत्याग करून निघून जाणार आहें ' इत्यादि श्रुतींतील लिंग ( सूचक चिह्न ) दिसत आहे.

( याप्रमाणें गार्हस्थ्य अनावश्यक असल्यामुळें त्याचें विकल्पानें अनुष्ठान होतें, असें सांगितलें. पण विकल्पांतील दोन पक्षांचें बळ समान नसल्यामुळें त्यावर आक्षेप घेतात— )

कर्म प्रति श्रुतेर्यत्नाधिक्यदर्शनादयुक्तमिति चेन्नाग्निहोत्रादिकर्म प्रति श्रुतेरधिको यत्नो महांश्च कर्मण्यायासोऽनेकसाधनसाध्यत्वादग्निहोत्रादीनाम् । तपोब्रह्मचर्यादीनां चेतराश्रमकर्मणां गार्हस्थ्येऽपि समानत्वादल्पसाधनापेक्षत्वाच्चेतरेषा न युक्तस्तुल्यवद्विकल्प आश्रमिभिस्तस्येति चेन्न । जन्मान्तरकृतानुग्रहात् ॥

अर्थ—अहोपण कर्माचें विधान करण्याविषयीं श्रुतीचा अधिक यत्न दिसतो. त्यामुळें गृहस्थाश्रमाचा विकल्प समजणें अयुक्त आहे, ह्मणून ह्मणाल ह्मणजे अग्निहोत्रादिकर्मांचें विधान करण्यासाठीं श्रुतीचा अधिक यत्न आहे, व कर्मानुष्ठानामध्यें फार आयास होतात; कारण अग्निहोत्रादि

कर्मे अनेक साधनांनीं साध्य होणारीं असतात. तसेंच तप, ब्रह्मचर्य, इत्यादि इतर आश्रमाचीं कर्मे गृहस्थाश्रमांतही समान असल्यामुळें ( ब्र० तीं गृहस्थालाही इतरांप्रमाणेंच अनुष्ठेय असल्यामुळें ) व त्या इतर कर्मांना अल्प साधनाची अपेक्षा असल्यामुळें इतर आश्रमींशीं त्या आश्रमाचा एकसारखाच विकल्प करणें युक्त नव्हे, ( गृहस्थाश्रमांत आयास फार, श्रुतीचाही अग्निहोत्रादि गृहस्थकर्माचें विधान करण्याकडेच सारा रोख व इतर आश्रमींचे धर्म गृहस्थालाही अनुष्ठेय. तेव्हां अशा कठिण आश्रमाचा दुसऱ्या सोप्या आश्रमाशीं एकसारखाच विकल्प मानणें अयुक्त आहे. ज्या साधनाची योग्यता एकसारखी असते त्यांतील कोणतेंही करावें, असा विकल्प करिता येतो. पण ज्याची योग्यता अशी न्यूनाधिक असते त्या साधनाचा विकल्प संभवत नाहीं; असें जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. ) कारण इतर आश्रमावर जन्मान्तरकृत अनुग्रह असतो.

( आतां वरील शेवटच्या परिहाराचेंच विवरण करितात– )

यदुक्तं कर्मणि श्रुतेरधिको यत्न इत्यादि । नासौ दोषः । यतो जन्मान्तरकृतमप्यग्निहोत्रादिलक्षणं कर्म ब्रह्मचर्यादिलक्षणं चानुग्राहक भवति विद्योत्पत्तिं प्रति । येन जन्मनैव विरक्ता दृश्यन्ते केचित् । केचित्तु कर्मसु प्रवृत्ता अविरक्ता विद्याविद्वेषिणः । तस्माज्जन्मान्तरकृतसंस्कारेभ्यो विरक्तानामाश्रमान्तरप्रतिपत्तिरेवेष्यते कर्मफलबाहुल्याच्च । पुत्रस्वर्गब्रह्मवर्चसादिलक्षणस्य कर्मफलस्यासंख्येयत्वात् । तत्प्रति च पुरुषाणां कामबाहुल्यात्तदर्थं श्रुतेरधिको यत्न. कर्मसूपपद्यते । आशिषां बाहुल्यदर्शनादिदं मे स्यादिदं मे स्यादिति । उपायत्वाच्च । उपायभूतानि हि कर्माणि विद्यां प्रतीत्यवोचाम । उपायेऽधिको यत्न कर्तव्यो नोपेये ॥

अर्थ—कर्माविषयीं श्रुतीचा अधिक यत्न दिसतो, असें जें ह्मटलें आहे तो कांहीं दोष नव्हे. कारण जन्मान्तरीं केलेलेंही अग्निहोत्रादिरूप व ब्रह्मचर्यादिरूप कर्म विद्योत्पत्तीकरितां अनुग्राहक होतें. त्यामुळें कित्येक

जन्मतःच विरक्त दिसतात व दुसरे कित्येक कर्मामध्यें प्रवृत्त, अविरक्त, व विद्येचा द्वेष करणारे आढळतात. यास्तव जन्मान्तरांतील संस्कारांमुळें विरक्त झालेल्या पुरुषांना गृहस्थेतर आश्रमाची प्राप्तिच इष्ट आहे. तसेंच कर्म-फलबाहुल्यामुळें ह्मणजे पुत्र, स्वर्ग, ब्रह्मवर्चस इत्यादि रूप कर्मफलाला, असंख्येयत्व असल्यामुळें ( ह्म० त्या कर्मफलाची गणना करता येत नसल्या-मुळें ) आणि त्या असंख्येय फलाकरितां पुरुषाच्या कामनाही पुष्कळ अस-ल्यामुळें त्यासाठीं श्रुतीचा कर्माविषयीं अधिक यत्न होणें, उचितच आहे. कारण हें मला असावें; हें मला मिळावें, इत्यादि प्रकारें मनुष्याचे ठिकाणीं आशाचें बाहुल्य दिसतें. तसेंच कर्मांना विद्येचें उपायत्व असल्यामुळेंही श्रुतीचा कर्माविषयींचा अधिक यत्न उपपन्न होतो. विद्येकरितां कर्मे उपाय-भूत आहेत, हें आह्मी वर ( पृष्ठ ) सांगितलें आहे. उपायाविषयींच अधिक यत्न करावा लागतो; उपेयाविषयीं नव्हे. ( तात्पर्य कर्माविषयींच्या यत्नाधिक्याची उपपत्ति अन्य रीतीनें लागत असल्यामुळें श्रुतीचा अधिक यत्न आश्रमाच्या विकल्पाचा विघात करूं शकत नाहीं, असा याचा भावार्थ. आता आणखीं एका आक्षेपाचें निरसन करून प्रस्तुत विचाराचा उपसंहार करितात—)

कर्मनिमित्तत्वाद्विद्याया यत्नान्तरानर्थक्यमिति चेत्कर्मभ्य एव पूर्वोपचितदुरितप्रतिबन्धक्षयाद्विद्योत्पद्यते चेत्कर्मभ्यः पृथगुप-निषच्छ्रवणादियत्नोऽनर्थक इति चेत् । न । नियमाभावात् । न हि प्रतिबन्धक्षयादेव विद्योत्पद्यते न त्वीश्वरप्रसादतपोध्यानाद्यनुष्ठा-नादिति नियमोऽस्ति । अहिंसाब्रह्मचर्यादीनां च विद्यां प्रत्युपकार-कत्वात्साक्षादेव च कारणत्वाच्छ्रवणमनननिदिध्यासनानाम् । अतः सिद्धान्याश्रमान्तराणि । सर्वेषां चाधिकारो विद्यायां परं च श्रेयः केवलाया विद्याया एवेति सिद्धम् ॥

इति शांकरभाष्ये द्वादशोऽनुवाकः ।

अर्थ—विद्येला कर्मनिमित्तत्व असल्यामुळें ( ह्म० विद्या कर्मरूप निमित्तानें प्राप्त होणारी असल्यामुळें ) तिच्यासाठीं दुसरा यत्न करणें व्यर्थ

आहे, असें जर ह्मणाल ह्मणजे कर्मापासूनच पूर्व संचित पापरूप प्रतिबंधाचा क्षय झाल्यामुळेंच विद्येची उत्पत्ति होते, असें जर ह्मटलें तर कर्माशिवाय उपनिषच्छ्रवणादिकांविषयीं प्रयत्न यत्न करणें व्यर्थ आहे, ह्मणून जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तशा नियमाचा अभाव आहे. केवळ प्रतिबंधाचा क्षय झाल्यानेंच विद्या उत्पन्न होते व ईश्वरप्रसाद, तप, ध्यान, इत्यादिकाच्या अनुष्ठानानें होत नाहीं, असा कांहीं नियम नाहीं. कारण अहिंसा ब्रह्मचर्य इत्यादि साधनें विद्येला उपकारक आहेत; आणि श्रवण, मनन व निदिध्यान हीं विद्येचीं साक्षात् कारणें आहेत यास्तव इतर आश्रमांची सिद्धि झाली; विद्येचा अधिकार सर्वांना आहे, हेंही ठरलें आणि केवळ विद्येमुळेंच परम श्रेय होतें हेंही सिद्ध झालें. ( इति शीक्षाध्याये द्वादशोऽनुवाकः)

शीक्षाध्यायः समाप्तः

## अथ द्वितीयो ब्रह्मवल्ल्यध्यायः

शं नो मित्रः शं वरुणः । शं नो भवत्वर्यमा । शं न इन्द्रो बृहस्पतिः । शं नो विष्णुरुरुक्रमः । नमो ब्रह्मणे । नमस्ते वायो । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि । ऋतं वदिष्यामि । सत्यं वदिष्यामि । तन्मामवतु । तद्वक्तारमवतु । अवतु माम् । अवतु वक्तारम् ॥ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

शं नो मित्र इत्याद्यतीतविद्याप्राप्त्युपसर्गप्रशमनार्था शान्तिः पठिता । इदानीं तु वक्ष्यमाणब्रह्मविद्याप्राप्त्युपसर्गोपशमनार्था शान्तिः पठ्यते—शं नो मित्र इति सह नाववत्विति च । शं नो मित्र इत्यादि पूर्ववत्स्पष्टम् । सह नाववतु नौ शिष्याचार्यौ सहैवावतु रक्षतु । सह नौ भुनक्तु भोजयतु । सह वीर्यं विद्यादिनिमित्तं सामर्थ्यं करवावहै निर्वर्तयावहै । तेजस्वि नावावयोस्तेजस्विनोरधीतं स्वधीतमस्तु । अर्थज्ञानयोग्यमस्त्वित्यर्थः । मा विद्विषावहै

विद्याग्रहणनिमित्तं शिष्यस्याऽऽचार्यस्य वा प्रमादकृतादन्यायाद्वि-द्वेषः प्राप्तस्तच्छमनायेयमाशीर्मा विद्विषावहा इति । मैवेतरेतरं विद्वेषमापद्यावहे । शान्तिः शान्तिः शान्तिरिति त्रिर्वचनमुक्तार्थम्। वक्ष्यमाणविद्याविघ्नप्रशमनार्थं चेयं शान्तिः । अविघ्नेनाऽऽत्मविद्या-प्राप्तिराशास्यते तन्मूलं हि परं श्रेय इति ॥

अर्थ—' शंनो मित्रः० ' इत्यादि पूर्वीच्या विद्येच्या प्राप्तीला होणारे जे उपसर्ग त्यांच्या शमनासाठीं शांति पढली. आतां पुढील ब्रह्मविद्या-प्राप्तीच्या उपसर्गांचें शमन व्हावें ह्मणून ' शं नो मित्रः० ' व 'सहनाववतु०' अशी शांति पढतात. त्यांतील 'शं नो मित्रः०' ही शांति पूर्वीप्रमाणेंच स्पष्ट आहे. ( यास्तव ' सह नौ अवतु ' याचा अर्थ सांगतों– ) आह्मां शिष्य व आचार्य यांचें एकाच वेळीं रक्षण करो. आह्मांकडून एकाच वेळीं भोग घेववो आह्मी दोघे विद्यादिनिमित्तक सामर्थ्य बरोबर संपादन करूं. आह्मां तेज स्यांचें अध्ययन स्वधीत–तेजस्वी असो. ह्मणजे अर्थज्ञान स योग्य असो. आह्मीं परस्परांचा द्वेष न करावा. शिष्याचा विद्याग्रहणामुळं उद्भवणारा द्वेष व आचार्यांचा प्रमादकृत अन्यायामुळें द्वेष प्राप्त आहे त्या दोन्ही प्रका-रच्या द्वेषाचें शमन व्हावें, ह्मणून ' मा विद्विषावहै ' हा आशीर्वाद आहे. आह्मीं परस्परांचा द्वेष करावयास प्रवृत्त न व्हावें. वर सांगितलेल्या कारणानें ' ॐ शांतिः शांतिः शांतिः ' असें तीन वेळ ह्मटलें आहे. ही शांति पुढें सांगितल्या जाणाऱ्या विद्येच्या विघ्नांचें प्रशमन व्हावें, ह्मणून आहे. या शांतीनें ' आत्मविद्येची प्राप्ति निर्विघ्नपणें व्हावी, ' अशी आशा केली जाते. कारण परम श्रेय आत्मविद्यामूलकच आहे.

( मागें होऊन गेलेल्या अर्थांचा अनुवाद करून आनंदवल्लीचें तात्पर्य सांगतात– )

संहितादिविषयाणि कर्मभिरविरुद्धान्युपासनान्युक्तानि। अन-न्तरं चान्तःसोपाधिकात्मदर्शनमुक्तं व्याहृतिद्वारेण स्वाराज्यफ-लम् । न चैतावताऽशेषतः संसारबीजस्योपमर्दनमस्तीत्यतोऽशेषो-

ग्रहण, धारण व अभ्यास यासाठीं प्रवृत्त होतो. 'श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः' इत्यादि दुसऱ्या श्रुतींवरून विद्येचें फळ श्रवणादिपूर्वकच मिळतें, असा निश्चय होतो.

ॐ ब्रह्मविदाप्नोति परम् ।

ब्रह्मविद्ब्रह्मेति वक्ष्यमाणलक्षणं बृहत्तमत्त्वाद्ब्रह्म तद्वेत्ति विजानातीति ब्रह्मविदाप्नोति परं निरतिशयं तदेव ब्रह्म परम् । न ह्यन्यस्य विज्ञानादन्यस्य प्राप्तिः । स्पष्टं च श्रुत्यन्तरं ब्रह्मप्राप्तिमेव ब्रह्मविदो दर्शयति "स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति" इत्यादि ।

अर्थ—'ब्रह्मविद्' यातील ब्रह्म म्हणजे पुढें ज्याचें लक्षण सांगावयाचें आहे तें अतिशय मोठें असल्यामुळें तें ब्रह्म. तें जो जाणतो तो ब्रह्मविद्. 'आप्नोति'-प्राप्त होतो. 'परं-' *निरतिशयाला ( ज्याहून अधिक आणखी कांहीं नाहीं त्या* ब्रह्माला ) त्याच निरतिशय ब्रह्माला प्राप्त होतो. ( पर म्ह० उत्कृष्ट. तेव्हां त्या परशब्दानें ब्रह्मच कां घ्यावयाचें? दुसरें एकादें उत्कृष्ट तत्त्व घ्यावयास कोणती हरकत आहे? असें कोणी विचारतील म्हणून सांगतात– ) कारण *अन्य वस्तूच्या ज्ञानानें अन्य वस्तूची प्राप्ति होत नाहीं.* ( ब्रह्माच्या ज्ञानानें ब्रह्माहून निराळ्याच उत्कृष्ट वस्तूची प्राप्ति होते, हें म्हणणें उचित दिसत नाहीं. ) शिवाय 'स यो ह वै०' इत्यादि दुसरी श्रुति ब्रह्मवेत्त्याला ब्रह्मप्राप्तिच होते, असें दाखवीत आहे. त्या श्रुतिवाक्याचा शब्दार्थ–तो जो कोणी त्या पर ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो–असा आहे. ( आतां 'आप्नोति' या शब्दाचा औपचारिक अर्थ दाखविण्यासाठीं शंकेच्या द्वारा मुख्यार्थ केल्यास त्याचें बाधक दाखवितात– )

ननु सर्वगतं सर्वस्याऽऽत्मभूतं ब्रह्म वक्ष्यति । अतो नाऽऽप्यम् । प्राप्तिश्चान्यस्यान्येन परिच्छिन्नस्य च परिच्छिन्नेन दृष्टा । अपरिच्छिन्नं सर्वात्मकं च ब्रह्मेत्यतः परिच्छिन्नवदनात्मवच्च तस्याऽऽप्तिरनुपपन्ना ॥

अर्थ—अहो पण ब्रह्म सर्वगत व सर्वांच्या आत्मभूत आहे, असें पुढें श्रुति सांगणार आहे. त्यामुळें तें आप्य–प्राप्य नाहीं. कारण प्राप्ति एकाला

होउन मी त्या अनात्मरूप कोशाहून निराळा नाहीं तर तद्रूपच आहें, असा अभिमान धरतो. ह्म० ज्याप्रमाणें एकादा दहावा पुरुष बरोबरीच्या नवाना मोजून त्याच्या कडेच चित्त वेधल्यामुळें आपल्याला विसरतो व आपण नाहींच असें जाणतो त्याप्रमाणें ब्रह्माचा अभाव पाहणें, या अविद्येमुळें पुरुष बाह्य अनात्म्याना आत्मा समजतो, व त्या कोशातच चित्त आसक्त झाल्या-कारणानें त्याहून मी निराळा नाहींच असें जाणतो ) अशा रीतीनें अवि-द्येमुळें आत्मरूप असलेलेंही ब्रह्म प्राप्त न झालेलेंसें होतें. ( साराश वस्तुतः ब्रह्मस्वरूप असलेल्याही जीवाला अविद्येमुळें ब्रह्म अप्राप्तसें होतें अन्नमयादि-काना आत्मा जाणणें, हें अविद्येचें विक्षेपक स्वरूप आहे व परमार्थत ब्रह्म-स्वरूप नाहीं, असें अभावदर्शन हें अविद्येविपर्यीच्या अनुमानाचें आवरणरूप लिंग आहे. स्वरूपाचेंही अग्रहण व विपरीत भावना होऊ शकते, याविपर्यी दहा जणाच्या समुदायातील मोजणाऱ्या दहाव्या मनुष्यानें आपणाला सोडून इतर नवाना मोजणें, हा दृष्टान्त दिला आहे. असो, याप्रमाणें स्वत च्या अभानामुळें स्वत चीच अप्राप्ति कशी होतें तें सोदाहरण व्यक्त करून स्वत.च्या भानानें आपलीच आपल्याला प्राप्ति कशी होते ते व्यक्त करून दाख-वितात— ) ज्याप्रमाणें दहा ही सख्या पूर्ण करणाऱ्या आपल्याला अविद्येमुळें प्राप्त न झालेल्या पुरुषाला ( अरे, दहावा तो तूच असें ह्मणून ) कोणी आठवण करून दिली असता त्यालाच त्या विद्येमुळें स्वत ची प्राप्ति होते त्याप्रमाणें वर सागितलेल्या प्रकारानें अविद्येमुळें ज्याला ब्रह्मस्वरूप प्राप्त झालेलें नाहीं अशा त्या जीवालाच श्रुतीनें ज्याचा उपदेश केला आहे, अशा सर्वात्मरूप ब्रह्माच्या आत्मदर्शनानें, ( ह्म० तें ब्रह्मच आत्मा आहे अशा ज्ञानानें ) ह्म० त्याच विद्येनें त्याची प्राप्ति उपपन्न होतेच.

( याप्रमाणें 'ब्रह्मविदाप्नोति पर' ह्या ब्राह्मणवाक्याचें व्याख्यान करून व पुढील मन्त्राचा सक्षेपत अर्थ सागून त्याला पुढें व्याख्यानार्थ घेतात— )

ब्रह्मविदाप्नोति परमिति वाक्य सूत्रभूत। सर्वस्य वल्ल्यर्थस्य ब्रह्मवि-दाप्नोति परमित्यनेन वाक्येन वेद्यतया सूत्रितस्य ब्रह्मणोऽनिर्धारित-

स्वरूपविशेषस्य सर्वतो व्यावृत्तस्वरूपविशेषसमर्पणसमर्थस्य लक्षणस्याभिधानेन स्वरूपनिर्धारणायाविशेषेण चोक्तवेदनस्य ब्रह्मणो वक्ष्यमाणलक्षणस्य विशेषेण प्रत्यगात्मतयाऽनन्यरूपेण विज्ञेयत्वाय ब्रह्मविद्याफलं च ब्रह्मविदो यत्परब्रह्मप्राप्तिलक्षणमुक्तं स सर्वात्मभावः सर्वसंसारधर्मातीतब्रह्मस्वरूपत्वमेव नान्यदित्येतत्प्रदर्शनायैषर्गुदाह्रियते तदेषाऽभ्युक्तेति ॥

अर्थ—' ब्रह्मविदाप्नोति परं ' हें वाक्य सूत्रभूत आहे. ' ब्रह्मविदाप्नोति परं ' या वाक्यानें वेद्यत्वानें ब्र० जाणण्यास योग्य, ज्ञानाचा विषय अशा रूपानें सूचित, या सर्व वल्लीचा अर्थ ( विषय ), आणि ज्याच्या विशेष स्वरूपाचा निश्चय झालेला नाही, अशा ब्रह्माच सर्वांपासून व्यावृत्त झालेला जो स्वरूपाचा विशेष त्याचें समर्पण करण्यास समर्थ अशा लक्षणाचें कथन करून स्वरूपाचा निश्चय करण्यासाठीं ( पुढील ऋचेचा उल्लेख केला जातो त्या वाक्यानें सामान्यतः ज्याचें ज्ञान सांगितलें आहे त्या वक्ष्यमाणलक्षण ब्रह्माचें ब्र० ज्याचें लक्षण ' सत्यं ज्ञान० ' या वाक्यानें सांगणार आहेत त्या ब्रह्माचें (' यो वेद निहितं गुहायां ' या वाक्यानें ) विशेषतः प्रत्यगात्मरूपानें, अन्तर्यामी या रूपानें एकत्वानें साक्षात् ज्ञान होण्यासाठीं ( पुढील ऋचा पुढें आणली जाते ) आणि ब्रह्मवेत्त्याला परब्रह्माची प्राप्ति होते असें ह्मणून ब्रह्मप्राप्तिरूप जें ब्रह्मविद्याफळ सांगितलें आहे तो सर्वात्मभाव ह्मणजे सर्व संसारधर्मरहित ब्रह्मस्वरूपत्वच आहे, दुसरें कांहीं नाहीं, असें दाखविण्यासाठीं ' तदेषाभ्युक्ता ' या वाक्यानें पुढील ऋचा उदाहरण ह्मणून दिली जाते

तदेषाऽभ्युक्ता । सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ।

तत्तस्मिन्नेव ब्राह्मणवाक्योक्तऽर्थ एषर्गभ्युक्ताऽऽम्नाता । सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मेति ब्रह्मणो लक्षणार्थं वाक्यम् । सत्यादीनि हि त्रीणि विशेषणार्थानि पदानि विशेष्यस्य ब्रह्मणः । विशेष्यं ब्रह्म विवक्षितत्वाद्वेद्यतया । विशेषणविशेष्यत्वादेव सत्यादीन्येकविभक्त्यन्तानि पदानि समानाधिकरणानि । सत्यादिभिस्त्रिभिर्विंश-

यथैर्विशेष्यमाणं ब्रह्म विशेष्यान्तरेभ्यो निर्धार्यते। एवं हि तज्ज्ञातं भवति यदन्येभ्यो निर्धारितम्। यथा लोके नीलं महत्सुगन्ध्युत्पलमिति॥

अर्थ—' तत् ' ह्म० त्याच ब्राह्मणवाक्योक्त अर्थी ही ऋचा ह्मटलेली आहे. ' सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म ' हें वाक्य ब्रह्माच्या लक्षणार्थ आहे. सत्यादि तीन पदें विशेष्य जें ब्रह्म त्याच्या विशेषणार्थ ह्मणजे व्यावृत्त्यर्थ आहेत. विशेष्य ब्रह्म आहे. कारण तें वेद्यतया ह्म० ज्ञानाचा विषय, या रूपानें येथें विवक्षित आहे. सत्यादि चारी पदें समानाधिकरण आणि ह्मणूनच एकविभक्त्यन्त आहेत ( कारण भिन्न अर्थी प्रवृत्त झालेल्या पदांची एकाच अर्थी वृत्ति असणें, हेंच समानाधिकरण आहे. सत्य, ज्ञान व अनन्त हीं पदें भिन्न भिन्न अर्थी प्रवृत्त झालेलीं आहेत; पण या वाक्यांत तीं सर्व ब्रह्म या एका अर्थी आहेत. तीं ब्रह्माशीं संबद्ध आहेत. ह्मणून समानाधिकरण आहेत. अशा समानाधिकरण पदाची विभक्ति एक असते. ' निळें, मोठें व सुगंधी कमळ ' यांतील पदें समानाधिकरण असल्यामुळेंच त्याची प्रथमा ही एक विभक्ति जशी आहे तशीच सत्य ज्ञान इत्यादि शब्दाची प्रथमा विभक्ति आहे. असो; ) सत्यादि तीन विशेषणांनीं विशेषित केलें जाणारें ब्रह्म इतर विशेष्याहून अगदीं पृथक्पणें निश्चित केलें जातें. ( आतां या विशेषणविशेष्यभावाचें फळ सांगतात.— ) कारण अशा रीतीनें ज्याचें इतरापासून निर्धारण केलें जातें त्याचेंच ज्ञान होतें ( किंवा अशा रीतीनेंच त्याचें ज्ञान होतें. कारण त्याचें इतरापासून निर्धारण केलें जातें.) जसें—व्यवहारांत ' नीळें, मोठें व सुगंधी कमल ' असें ह्मणून इतर कमळापासून निर्धारण केलें असता त्या विशिष्ट कमलाचें ज्ञान होतें.

( आतां या विशेषणविशेष्यभावाविषयीं आक्षेप घेतात. )

ननु विशेष्यं विशेषणान्तरं व्यभिचरद्विशेष्यते। यथा नीलं रक्तं चोत्पलमिति। यदा ह्यनेकानि द्रव्याण्येकजातीयान्यनेकविशेषणयोगीनि तदा विशेषणस्यार्थवत्त्वम्। न ह्येकस्मिन्नेव वस्तुनि। विशेष

णान्तरायागाद्यथाऽसावेक आदित्य इति। तथैकमेव च ब्रह्म न ब्रह्मान्तराणि यभ्यो विशष्यत नीलोत्पलवत् ॥

अर्थ—अहो पण दुसऱ्या विशेषणाशीं व्यभिचार पावणार विशेष्यच विशेषित केलें जातें. जसें निळें व लाल कमल ह्मणजे जेव्हां एका जातीचीं अनेक द्रव्य अनेक विशेषणाशीं संबध ठेवणारीं असतात तेव्हाच विशेषणाला सार्थकत्व असतें एकाच वस्तूमध्यें विशेषणाचें सार्थकत्व नसत कारण त्याच्या ठिकाणीं दुसऱ्या विशेषणाचा योगच नसतो जसा—हा एक आदित्य आहे त्याचप्रमाण ब्रह्महीं एक आह दुसरीं अनक ब्रह्म नाहींत, कीं ज्याच्यापासून नील कमलाप्रमाणें तें विशेषित-व्यावृत-केलें जाईल ( ह्म० जें विशेष्य अनेक विशेषणाशीं व्यभिचार पावणारें असतें त्यालाच विशेषणाचे योगान इतरापासून व्यावृत्त करून दाखविता यतें कमळें लाल असतात, निळीं असतात पांढरीं असतात त्यामुळ कमल ह्या विशेष्याची लाल या विशेषणानें निळ्या, पांढऱ्या इत्यादि इतर कमळापासून व्यावृत्ति करिता येत त्यामुळें अनेक विशेषणानीं युक्त असलेल्या एका जातीच्या अनेक द्रव्याच्या ठिकाणींच विशषणें सार्थ होतात. एकाच वस्तूच्या ठिकाणीं तीं निरुपयोगीं असतात सूर्य हा एकच पदार्थ असल्यामुळे त्याला पांढरा सूर्य, लाल सूर्य, काळा सूर्य इत्यादि जसें ह्मणता यत नाहा त्याचप्रमाणें ब्रह्म एकच असल्यामुळ तें सत्य ब्रह्म, ज्ञान ब्रह्म, अनन्त ब्रह्म इत्यादि ह्मणणें सयुक्तिक नव्हे, असा याचा भावार्थ आता यापुढ भाष्यकार वरील शंकेच समाधान करितात—).

न। लक्षणार्थत्वाद्विशेषणानाम् नाय दोष। कस्मात्। यस्माल्लक्षणार्थप्रधानानि विशषणानि न विशषणप्रधानान्यव। क पुनर्लक्षणलक्ष्ययार्विशषणविशष्ययोर्वा विशष इति। उच्यत। समानजातीयभ्य एव निवर्तकानि विशषणानि विशष्यस्य। लक्षण सर्वत एव यथाऽवकाशदातृ आकाशमिति। लक्षणार्थं च वाक्यमित्यवाचाम ॥

अर्थ—हे ह्मणणें बरोबर नाहीं. कारण विशेषणें लक्षणार्थ आहेत. ( ह्मणजे ब्रह्म जरी एकच असलें तरी त्याला सत्य, ज्ञान व अनंत हीं विशेषणें देणं ) हा काहीं दोष नाहीं. तो का ( ह्मणून ह्मणाल तर सांगतों— ) कारण तीं विशेषणें लक्षणार्थप्रधान आहेत. केवळ विशेषणार्थप्रधानच नाहींत. आता लक्षण-लक्ष्य व विशेषण-विशेष्य यांमध्यें विशेष कोणता आहे, ह्मणून विचाराल तर सांगतों. विशेषणें विशेष्याला समान जातीयांपासून निवृत्त करणारीं असतात. पण लक्षणें लक्ष्याला ( सजातीय, विजातीय इत्यादि ) सर्वांपासून निवृत्त करणारीं असतात. जसें-अवकाश देणारें आकाश. ( येथें अवकाश देणारें हें लक्षण आहे कारण तो अनन्यसाधारण धर्म आहे. ) ' सत्यं ज्ञानं० ' इत्यादि वाक्य लक्षणार्थ आहे, हे आह्मीं वर सांगितलें आहे. ( आता पुनः विशेषणविशेष्यभावपक्षाचा आश्रय करून सांगतात— )

सत्यादिशब्दा न परस्परं संबध्यन्ते परार्थत्वात् । विशेष्यार्था हि ते । अत एकैको विशेषणशब्दः परस्परं निरपेक्षो ब्रह्मशब्देन संबध्यते । सत्यं ब्रह्म ज्ञानं ब्रह्मानन्तं ब्रह्मेति । सत्यमिति यद्रूपेण यन्निश्चितं तद्रूपं न व्यभिचरति तत्सत्यं । यद्रूपेण निश्चितं यत्तद्रूपं व्यभिचरदनृतमित्युच्यते । अतो विकारोऽनृतं " वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् " एवं सदेव सत्यमित्यवधारणादतः सत्यं ब्रह्मेति ब्रह्म विकारान्निवर्तयति । अतः कारणत्वं प्राप्तं ब्रह्मणः । कारणस्य च कारकत्वं वस्तुत्वान्मृद्वदचिद्रूपता च प्राप्ताऽत इदमुच्यते ज्ञानं ब्रह्मेति । ज्ञानं ज्ञप्तिरवबोधो भावसाधनो ज्ञानशब्दो ब्रह्मविशेषणत्वात्सत्यानन्ताभ्यां सह । न हि सत्यताऽनन्तता च ज्ञानकर्तृत्वे सत्युपपद्यते । ज्ञानकर्तृत्वेन हि विक्रियमाणं कथं सत्यं भवेदनन्तं च । यद्धि न कुतश्चित्प्रविभज्यते तदनन्तम् । ज्ञानकर्तृत्वे च ज्ञेयज्ञानाभ्यां प्रविभक्तमित्यनन्तता न स्यात् । " यत्र नान्यद्विजानाति स भूमा " " अथ यत्रान्यद्विजानाति तदल्पम् " इति श्रुत्यन्तरात् ॥

अर्थ—वरील वाक्यांतील सत्यादि–शब्दांचा परस्परसंबंध नाहीं. कारण ते परार्थ आहेत. ते शब्द विशेष्याकरितां आहेत. यास्तव एकेक विशेषणशब्द परस्पर अपेक्षा न धरतां 'सत्यं ब्रह्म, ज्ञानं ब्रह्म, अनन्तं ब्रह्म,' अशा रीतीनें ब्रह्मशब्दाशीं संबद्ध होतो. 'सत्यमिति-' ज्या रूपानें जें निश्चित केलेलें असतें तें रूप व्यभिचार पावत नाहीं, तें सत्य व ज्या रूपानें जें निश्चित असतें तें रूप व्यभिचार पावणारें असल्यास त्याला ' अनृत ' असें म्हणतात. म्हणूनच विकार अनृत आहे. कारण 'विकार, हें केवल वाणीनेंच आरंभ करितां येण्याजोगें नांव आहे ( शब्दमात्र आहे ) मृत्तिकाच सत्य आहे,' अशाप्रकारें सत्व सत्य आहे, असें अवधारण केलेलें आहे. यास्तव ' सत्यं ब्रह्म ' हें विशेषण ब्रह्माला विकारापासुन निवृत्त करतें. त्यामुळें ब्रह्माला कारणत्व प्राप्त झालें व कारणाला कारकत्व असतें कारण कोणतेंही कारण वस्तु असते ( व वस्तुच क्रियेचें कारक होऊं शकतें. ) त्याचप्रमाणें त्या कारण ब्रह्माला मृत्तिकेप्रमाणें अचिद्रूपत्व ( म्ह० जडत्वही ) प्राप्त झालें त्यासाठीं ' ज्ञानं ब्रह्म ' असें म्हटलें जातें. ज्ञान म्हणजे ज्ञप्ति, बोध ( अनुभव ). येथील हा ज्ञानशब्द भावव्युत्पत्तिक आहे ( म्ह० ज्ञप्तिः–ज्ञानपणा, जाणणेंपणा, जाणीव, असा ज्ञानाचा भाव, हा त्या ज्ञानशब्दाचा अर्थ आहे. ) कारण तो शब्द सत्य व अनन्त या दोन विशेषणासह ब्रह्माचें विशेषण आहे. त्या ब्रह्माला ज्ञानकर्तृत्व आहे, असें जर म्हटलें तर सत्यता व अनन्तता उपपन्न होत नाहीं. कारण ज्ञानकर्तृत्वानें विकार पावणारें ब्रह्म सत्य व अनन्त कसें असेल? कारण जें कशापासूनही विशेषेंकरून विभक्त केलें जात नाहीं तें अनन्त होय. पण ब्रह्माला ज्ञानकर्तृत्व आहे, म्ह० तें जाणणारें आहे, असें म्हटलें कीं, ज्ञेय–विषय व ज्ञान–वृत्ति याहून तें विभक्त होतें, त्यामुळें त्याला अनन्तता नसते. कारण ' ज्या अनन्त तत्त्वामध्यें अन्य विज्ञाता अन्य साधनानें अन्य वस्तु जाणत नाहीं तो भूमा पण ज्या तत्त्वामध्यें अन्य विज्ञाता अन्य साधनानें अन्य विषय पहातो तें अल्प आहे,' अशी दुसरी ( छान्दोग्य ) श्रुति आहे.

( विशेष वस्तूंचा निषेध तदितर वस्तूंना अनुज्ञा देतो, असा न्याय आहे. त्याला अनुसरून वरील श्रुतिवचनाविषयीं शंका घेऊन समाधान करितात.— )

नान्यद्विजानातीति विशेषप्रतिषेधादात्मानं विजानातीति चेन्न। भूमलक्षणविधिपरत्वाद्वाक्यस्य । यत्र नान्यत्पश्यतीत्यादि भूम्नो लक्षणविधिपरं वाक्यम् । यथा प्रसिद्धमेवान्योऽन्यत्पश्यतीत्येतदुपादाय यत्र तन्नास्ति स भूमेति भूमस्वरूपं तत्र ज्ञाप्यतेऽन्यग्रहणस्य प्राप्तप्रतिषेधार्थत्वान्न स्वात्मनि क्रियास्तित्वपरं वाक्यम्। स्वात्मनि च भेदाभावाद्विज्ञानानुपपत्तिः । आत्मनश्च विज्ञेयत्वे ज्ञात्रभावप्रसङ्गः। ज्ञेयत्वेनैव विनियुक्तत्वात् । एक एवाऽऽत्मा ज्ञेयत्वेन ज्ञातृत्वेन चोभयथा भवतीति चेन्न युगपदनंशत्वात् । न हि निरवयवस्य युगपज्ज्ञेयज्ञातृत्वोपपत्तिः । आत्मनश्च घटादिवद्विज्ञेयत्वे ज्ञानोपदेशानर्थक्यम् । न हि घटादिवत्प्रसिद्धस्य ज्ञानोपदेशोऽर्थवान् । तस्माज्ज्ञातृत्वे सत्यानन्त्यानुपपत्तिः । सन्मात्रत्वं चानुपपन्नं ज्ञानकर्तृत्वादिविशेषवत्त्वे सति । सन्मात्रत्वं च सत्यत्वम्, तत्सत्यमिति श्रुत्यन्तरात् । तस्मात्सत्यानन्तशब्दाभ्यां सह विशेषणत्वेन ज्ञानशब्दस्य प्रयोगाद्भावसाधनो ज्ञानशब्दः । ज्ञानं ब्रह्मेति कर्तृत्वादिकारकनिवृत्त्यर्थं मृदादिवदचिद्रूपतानिवृत्त्यर्थं च प्रयुज्यते । ज्ञानं ब्रह्मेतिवचनात्प्राप्तमन्तवत्त्वम् । लौकिकस्य ज्ञानस्यान्तवत्त्वदर्शनात् । अतस्तन्निवृत्त्यर्थमाह—अनन्तमिति ॥

अर्थ —अहो पण त्या श्रुतींत ' दुसरें जाणत नाहीं ' असा विशेष निषेध केला असल्यामुळें पुरुष–ज्ञाता त्या तत्त्वामध्यें आपल्याला जाणतो असा अर्थ निष्पन्न होतो. ह्मणून जर ह्मणाल तर बरोबर नाहीं. कारण तें वाक्य भूमलक्षणविधिपर आहे ह्मणजे भूमाच्या लक्षणाचें विधान करणारें आहे. ह्म० ' यत्र नान्यत्पश्यति ' हें वाक्य भूमाच्या लक्षणाचें विधान करावयास प्रवृत्त झालेलें आहे. लोकाची जशी प्रसिद्धि आहे ( अनुभव आहे )

तिला अनुसरूनच भूम्याहून अन्य द्रष्टा भूम्याहून पृथक् विषय पहातो, ह्या वस्तुस्थितीचा अंगीकार करून ' जेथें तें ( अन्यदर्शन ) नाहीं तो भूमा ' असें ह्मणून तेथें भूमस्वरूप जाणविलें जातें ( भूमस्वरूपाचें ज्ञान करून दिलें जातें ) त्यात ' अन्य ' या शब्दाचें जें ग्रहण केल आहे तं प्राप्त द्वैताचा निषेध करण्यासाठीं असल्यामुळे ' नान्यद्विजानाति ' हें वाक्य स्वात्म्यामध्यें क्रिया असते, ( ह्म० आपल्याच ठिकाणीं आपल्याला क्रिया करता येते ) असें सागावयास प्रवृत्त झालेलें नाहीं स्वात्म्यामध्यें भेदाचा अभाव अस ल्यामुळ त्याच्या विज्ञानाची अनुपपत्ति आहे ( ह्म० स्वात्मा निराळा राहून इतर अनात्म–विषयाप्रमाणें आपल्याला जाणू शकत नाहीं ) शिवाय आत्म्याला जर विज्ञेयत्व आहे, असें ह्मटले तर ज्ञात्याचाच अभाव होण्याचा प्रसग यणार. ( कारण आत्माही विज्ञेय ह्म० विज्ञानाचा विषय झाल्यावर ज्ञाता कोठचा ? ) कारण आत्म्याचा ज्ञेयत्वानेंच विनियोग झालला असतो. बरें ' एकच आत्मा ज्ञेयत्वानें व ज्ञातृत्वानें दोन प्रकारचा होतो ह्म० तो एकच ज्ञेय व ज्ञाता होतो ' असें ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं कारण एकाच वेळीं आत्मा उभयरूप होऊ शकत नाहीं कारण त्याला अश नाहींत. निरवयव आत्म्याचें एकाच वेळीं ज्ञेयत्व व ज्ञातृत्व याची उपपत्ति लागत नाहीं ( ह्म निरवयव आत्म्यानें एकाच वेळीं ज्ञाता व ज्ञेय असें उभयरूप होण युक्त नव्हे ) शिवाय आत्म्याला घटादिकाप्रमाणें विज्ञेयत्व आहे, असें जर ह्मटलें तर ज्ञानोपदेशाचें आनर्थक्य होतें ( ह्म० त्या जडाला ज्ञानाचा उपदश करणे व्यर्थ होतें ) कारण घटादिकाप्रमाणें प्रसिद्ध असलेल्या ज्ञाला ज्ञानाचा उपदेश अर्थवान् ( सार्थ, उपयोगी ) होत नाहीं तस्मात् ब्रह्माला ज्ञातृत्व आहे असें ह्मटलें कीं त्याच्या अनन्तत्वाची अनुपपत्ति होते तसेंच त्याला ज्ञानकर्तृत्वादि विशेषवत्त्व आहे, असें ह्मटल कीं, त्याचें सन्मात्रत्व ( ह्म० केवल सत्त्व ) अनुपपन्न होतें. सन्मात्रत्व ह्म० सत्यत्व कारण छान्दोग्यात त्या सतला उद्देशून ' तें सत्य ' असें ह्मटलें आहे तस्मात् सत्य व अनन्त या शब्दासहवर्तमान ज्ञानशब्दाचा विशषणत्वानें प्रयोग केलेला अस

त्यामुळें ज्ञानशब्द भावसाधन ह्म० भावव्युत्पत्तिक आहे. 'ज्ञानं ब्रह्म' हें विशेषण कर्तृत्वादि कारकांची निवृत्ति करण्यासाठीं व मृत्तिकादिकांप्रमाणें अचिद्रूपतेची ( जडतेची ) निवृत्ति करण्यासाठीं योजलें आहे. पण 'ज्ञानं ब्रह्म' असें ह्मटलेलें असल्यामुळें ब्रह्माला अन्तवत्त्व प्राप्त होतें. कारण लौकिक ज्ञानाला अन्तवत्त्व असतें, असा अनुभव येतो. यास्तव त्याच्या निवृत्ती-करितां 'अनन्त' असें ह्मटलें आहे.

(असो, सत्यादि शब्द ब्रह्माला इतर जडादि पदार्थांपासून व्यावृत्त करण्यासाठीं आहेत, असें जें वर ह्मटलें आहे त्याविषयीं शंका घेऊन समाधान करितात— )

सत्यादीनामनृतादिधर्मनिवृत्तिपरत्वाद्विशेष्यस्य ब्रह्मण उत्पलादिवदप्रसिद्धत्वात्

" मृगतृष्णाम्भसि स्नातः खपुष्पकृतशेखरः ।
एष वन्ध्यासुतो याति शशशृङ्गधनुर्धरः ॥ "

इतिवच्छून्यार्थतैव प्राप्ता सत्यादिवाक्यस्येति चेन्न लक्षणार्थत्वात् । विशेषणत्वेऽपि सत्यादीनां लक्षणार्थप्राधान्यमित्यवोचाम । शून्ये हि लक्ष्येऽनर्थकं लक्षणवचनं लक्षणार्थत्वान्मन्यामहे न शून्यार्थतेति । विशेषणार्थत्वेऽपि च सत्यादीनां स्वार्थापरित्याग एव ॥

अर्थ—" अहो पण 'सत्यं ज्ञानं०' इत्यादि वाक्यांतील सत्यादि शब्द अनृतादि धर्मांची निवृत्ति करण्यासाठीं असल्यामुळें व विशेष्य जें ब्रह्म तें कमलादि इतर विशेष्यांप्रमाणें प्रसिद्ध नसल्यामुळें 'मृगजळांत स्नान केलेला, आकाशपुष्पांचा किरीट मस्तकावर घातलेला व सशाच्या शिंगाचें धनुष्य धारण करणारा हा वंध्यापुत्र जात आहे,' या वाक्याप्रमाणें 'सत्यं ज्ञानं' या वाक्यालाही शून्यार्थत्वच प्राप्त होतें. " (ह्म० कमलादिक विद्यमान पदार्थ प्रत्यक्षादि प्रमाणाचे विषय असतात. पण ब्रह्म तसें नाहीं. केवळ सत्यादि पदेंच पदार्थाविषयीं प्रमाण होऊं शकत नाहींत. कारण तीं केवळ व्यावृत्ती-

करिता आहेत यास्तव हें वाक्य शून्यार्थ आहे ह्म० त्याचा अर्थ शून्य आहे ) असें ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण त्याला लक्षणार्थत्व आहे ( ह्मणजे तें वाक्य ब्रह्माच्या लक्षणा करिता आहे. ) सत्यादिशब्दांना विशेषणत्व जरी असलें तरी लक्षणार्थाचें प्राधान्य आहे ( ह्म० ते शब्द मुख्यत लक्षणार्थ आहेत, ) असें आह्मी वर ( पृष्ठ ८१ ) सांगितलें आहे त्याचें लक्ष्य जर शून्य असेल तर ' सत्य ज्ञान०' इत्यादि लक्षणवचन अनर्थक होईल पण ज्यापक्षीं त्या वचनाला लक्षणार्थत्व आहे त्यापक्षीं त्याला शून्यार्थत्व नाहीं ( ह्म० त्याचें लक्ष्य शून्य नाहीं ), असें आह्मी मानतों ( विशेष्य कोण-त्याही प्रमाणानें सिद्ध होणारें असल ह्मणजे पुरे आहे तें कमलाप्रमाणे प्रत्यक्ष प्रमाणानेंच सिद्ध झालें पाहिजे, असा कांहीं नियम नाहीं रज्जुसर्पादि मिथ्या विषयाचेंही अधिष्ठान सत् असतें प्रपंचही दृश्य, जड, इत्यादि असल्यामुळें मिथ्या आहे, असें कळतें त्यामुळें त्याचेंही अधिष्ठान सत् संभवतें. त्याच्या विशेष स्वरूपाचें लक्षण सांगण्यासाठीं 'सत्य ज्ञान०' हें वाक्य आहे त्यामुळें त्याचा अर्थ शून्य आहे असें ह्मणता येत नाहीं. बरें, सत्यादिशब्दांना विशे-षणार्थत्व आहे, असें समजलं तरी कांहीं बिघडत नाहीं, असें सांगतात-) सत्यादि शब्दांना विशेषणार्थत्व आहे, असें जरी मानलें तरी त्यांच्या स्वार्थाचा-सत्यत्वादिकाचा-परित्याग करिताच येत नाहीं ( निळें, मोठें इत्यादि विशे-षणपद विशेष्याला आपला अर्थ समर्पण करून लाल, लहान इत्यादि विरुद्ध अर्थाची व्यावृत्ति करितात, असेंच प्रसिद्ध आहे त्याच न्यायानें सत् शब्द अबाधित सत्त्व या अर्थी प्रसिद्ध आहे, ज्ञानशब्द स्वप्रकाश विषय ज्ञानामध्ये प्रसिद्ध आहे आणि अनंतशब्द व्यापक या अर्थी प्रसिद्ध आहे त्यामुळें तीं तीन विशेषणें विशेष्य ब्रह्माला स्वार्थाचें समर्पण करून विरुद्ध अर्थाचें निवर्तन करितात त्यामुळें त्यांचें केवळ व्यावृत्तींतच पर्यवसान होतें, असें ह्मणतां येत नाहीं, असा याचा अर्थ ( शिवाय विशेषणांना व्यावर्त-कत्व व्यावर्त्य असलें तरच संभवतें. यास्तव ज्याची व्यावृत्ति करावयाची तो धर्म नसल्यास सत्यादिकांचें विशेषणत्वच अनुपपन्न होतें. त्यामुळें त्यांना

विशेषण ह्मणावयाचें झाल्यास त्याचा अर्थही शून्य नाहीं, असेंच समजणें भाग आहे, असें सांगतात—)

शून्यार्थत्वे हि सत्यादिशब्दाना विशेष्यनियन्तृत्वानुपपत्तिः। सत्याद्यर्थैरर्थवत्त्वे तु तद्विपरीतधर्मवद्भ्यो विशेषेभ्यो ब्रह्मणो विशेष्यस्य नियन्तृत्वमुपपद्यते। ब्रह्मशब्दोऽपि स्वार्थेनार्थवानेव। तत्रानन्तशब्दोऽन्तवत्त्वप्रतिषेधद्वारेण विशेषणम्। सत्यज्ञानशब्दौ तु स्वार्थसमर्पणेनैव विशेषणे भवतः॥

अर्थ—सत्यादिशब्दांना जर शून्यार्थत्व आहे, असें मानलें तर त्यांना विशेष्यनियंतृत्व आहे, असें समजणें अनुपपन्न होईल. (ह्म० ते शब्द विशेष्याचें नियमन करणारे आहेत, असें ह्मणता येणार नाहीं) पण तेंच त्या शब्दांना सत्यादि अर्थांनीं अर्थवत्त्व आहे, असें जर समजलें तरच त्याच्या विपरीत धर्मांनीं युक्त असलेल्या विषयापासून विशेष्य ब्रह्माचें नियन्तृत्व उपपन्न होतें. शिवाय ब्रह्मशब्दही स्वतःच्या अर्थानें अर्थवानच आहे, (कारण वृह् धातूपासून झालेल्या त्याचा वृद्धि, महत्त्व हा अर्थ आहे तें महत्त्व देश-काल-वस्तुपरिच्छेदरहित आहे. त्यामुळें त्याचें पर्यवसान निरतिशय महत्त्व-युक्त धर्मी ब्रह्मामध्यें होतें. तस्मात् ब्रह्मशब्द वंध्यापुत्रादिशब्दांसारखा नाहीं. तर त्याहून विलक्षण आहे. असो, आतां सत्यादि तीन विशेषणांचा अवान्तर भेद सांगतात—) सत्यादि तीन विशेषणांतील अनन्त हा शब्द ब्रह्माच्या अन्तवत्त्वाचा निषेध करून त्याच्या द्वारा ब्रह्माचें विशेषण होतो. पण सत्य व ज्ञान हे शब्द तर स्वतःचा अर्थ समर्पण करूनच विशेषणें होतात. (अनन्त या पदानें ब्रह्माचें आत्मैक्य सांगितलें आहे, अशा अभिप्रायानें ऐक्यामध्यें शास्त्राचें तात्पर्य आहे, असें दाखवितात—)

तस्माद्वा एतस्मादात्मन इति ब्रह्मण्येवाऽऽत्मशब्दप्रयोगाद्वेदितुरात्मा ब्रह्म। एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामतीति च तत्प्रवेशाच्च। तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशदिति च तस्यैव जीवरूपेण शरीरप्रवेशं दर्शयति। अतो वेदितुः स्वरूपं ब्रह्म॥

अर्थ—याच वल्लीमध्यें पुढें 'तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः' ह्म० त्या या प्रसिद्ध आत्म्यापासून आकाश झाला; असें ह्मणून ब्रह्म या अर्थीच आत्मशब्दाचा प्रयोग केला आहे. त्यामुळे जाणणाऱ्याचा आत्मा ब्रह्म आहे. 'या आनन्दमय आत्म्याला जाणतो,' ह्म० तो मी आहें असें जाणतो असेंही ह्मटलें आहे. त्याचाच प्रवेश सांगितला आहे. त्या सर्व कार्य–समूहाला उत्पन्न करून तो स्रष्टा त्यातच मागून शिरला. अशा प्रकारें त्याचाच जीवरूपानें शरीरप्रवेश दाखविला आहे. यास्तव ब्रह्म वेत्त्याचें स्वरूप आहे. (यावर शंका घेऊन समाधान करितात–)

एवं तर्ह्यात्मत्वाज्ज्ञानकर्तृत्वम्। आत्मा ज्ञातेति हि प्रसिद्धम्। सोऽकामयतेति च कामिनो ज्ञानकर्तृत्वप्रसिद्धिः। अतो ज्ञानकर्तृत्वाज्ज्ञप्तिर्ब्रह्मेत्ययुक्तमनित्यत्वप्रसङ्गाच्च। यदि नाम ज्ञप्तिर्ज्ञानमिति भावरूपता ब्रह्मणस्तथाऽप्यनित्यत्वं प्रसज्येत पारतन्त्र्यं च। धात्वर्थानां कारकापेक्षत्वात्। ज्ञानं च धात्वर्थोऽतोऽस्यानित्यत्वं परतन्त्रता च। न, स्वरूपाव्यतिरेकेण कार्यत्वोपचारात्। आत्मनः स्वरूपं ज्ञप्तिर्न ततो व्यतिरिच्यतेऽतो नित्यैव तथाऽपि बुद्धेरुपाधिलक्षणायाश्चक्षुरादिद्वारैर्विषयाकारेण परिणामिन्या ये शब्दाद्याकारावभासास्त आत्मविज्ञानस्य विषयभूता उत्पद्यमाना एवाऽऽत्मविज्ञानेन व्याप्ता उत्पद्यन्ते। तस्मादात्मविज्ञानावभासाश्च ते विज्ञानशब्दवाच्याश्च धात्वर्थभूता आत्मन एव धर्मा विक्रियारूपा इत्यविवेकिभिः परिकल्प्यन्ते॥

अर्थ—असें जर असेल तर ब्रह्माला आत्मत्व असल्यामुळें ज्ञानकर्तृत्वही आहे, असें होईल; कारण आत्मा ज्ञाता आहे ही गोष्ट प्रसिद्ध आहे. 'तो कामना–इच्छा करता झाला,' या वाक्यानें अशी कामनावान् ईश्वराच्या ज्ञानकर्तृत्वाची सिद्धि होते. यास्तव ब्रह्माला ज्ञानाचें कर्तृत्व असल्यामुळें ब्रह्म ज्ञप्तिरूप आहे, असें ह्मणणें अयुक्त आहे तसाच अनित्यत्व प्रसंगही येतो. ह्म० 'ज्ञप्तिः ज्ञानं' अशी ब्रह्माची भावरूपता ह्म० भावव्युत्पत्ति जरी घेतली तरी त्याला अनित्यत्व व पारतन्त्र्य हीं दोन्हीं प्राप्त होतात. कारण धात्वर्थांना कारकापेक्षत्व असतें. (ह्म० धात्वर्थाला कर्ता, कर्म इत्यादि कारकांची

अपेक्षा असते. ' ज्ञा ' धातूचा ज्ञान हा अर्थ आहे. त्यामुळें त्याला अनित्यत्व व पारतंत्र्य आहे. पण ही शंका बरोबर नाहीं. कारण तें ज्ञान ब्रह्माच्या स्वरूपाहून व्यतिरिक्त नसल्यामुळें त्याला ' कार्य ' असें जें ह्मटलें आहे तें औपचारिक आहे. ह्मणजे ज्ञप्ति हें आत्म्याचें स्वरूप आहे. त्यामुळें तें त्याहून निराळें नाहीं. वास्तव ती ज्ञप्ति नित्यच आहे. तथापि चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा बाहेर पडून विषयाच्या आकारानें परिणाम पावणाऱ्या उपाधिरूप बुद्धीचे जे शब्दाद्याकारानें अवभास होतात ते आत्मविज्ञानाचे विषयभूत होत. ते उत्पन्न होत असतांना आत्मविज्ञानानें व्याप्त होत्सातेच उत्पन्न होतात. ह्मणून ते धात्वर्थभूत व विज्ञानशब्दवाच्य असे आत्मविज्ञानाचे अवभास, आत्म्याचेच विकाररूप धर्म आहेत, अशी अविवेक्यांकडून परिकल्पना केली जाते. ( मग असें जर आहे तर ब्रह्माला सर्वज्ञत्व तरी कोठचें ? अशी आशंका घेऊन सांगतात— )

यत्तु यद्ब्रह्मणो विज्ञानं तत्सवितृप्रकाशवदग्न्युष्णत्वच्च ब्रह्मस्वरूपाव्यतिरिक्तं स्वरूपमेव तत्त तत्कारणान्तरसव्यपेक्षम् । नित्यस्वरूपत्वात् । सर्वभावानां च तेनाविभक्तदेशकालत्वात्कालाकाशाविकारणत्वाच्च निरतिशयसूक्ष्मत्वाच्च न तस्यान्यदविज्ञेयं सूक्ष्मं व्यवहितं विप्रकृष्टं भूतं भवद्भविष्यद्वाऽस्ति तस्मात्सर्वज्ञं तद्ब्रह्म । मन्त्रवर्णाच्च—"अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः । स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महान्तम्" इति। "न हि विज्ञातुर्विज्ञातेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति" इत्यादिश्रुतेश्च ॥

अर्थ—परंतु त्या ब्रह्माचें जें विज्ञान तें सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें किंवा अग्नीच्या उष्णतेप्रमाणें ब्रह्मस्वरूपाहून व्यतिरिक्त नाहीं. तें त्याचें स्वरूपच आहे. तें दुसऱ्या कारणाची अपेक्षा करणारें नाहीं. कारण त्याला नित्यस्वरूपता आहे; सर्व भावपदार्थांना त्याहून अविभक्त देशकालत्व आहे; ( ह्मणजे सर्व भावाचा देश व काळ या ब्रह्माच्या देश-कालाहून पृथक्

नाहीं. ब्रह्माच्या देशात व कालांतच त्यांच्या देशाचा व कालाचा अन्तर्भाव होतो. ) तसेंच तें ब्रह्म काल, आकाश इत्यादिकांचेंही कारण आहे व निरतिशय सूक्ष्म आहे. त्या ब्रह्माला न कळणारें असें दुसरें सूक्ष्म, आड असलेलें, दूर असलेलें, भूतकालीन, वर्तमान कालीन किंवा भविष्यत्कालीन कांहीं नाहीं. यास्तव तें ब्रह्म सर्वज्ञ आहे. ( ब्रह्मामध्यें नित्य ज्ञान असतें, याविषयीं मंत्राची संमति दाखवितात– ) अशा अर्थाचा मंत्रवर्णही आहे. "तो परमात्मा हस्त-पादरहित पण मोठा वेगवान् ( दूर जाणारा ) व हात नसतांनाही सर्व ग्रहण करणारा आहे. तो चक्षुरिन्द्रियरहित असूनही सर्व पाहतो. श्रोत्रेंद्रियरहित असूनही ऐकतो. तो अन्तःकरणशून्य असला तरी सर्व वेयाला जाणतो. पण त्याचा जाणता–त्याला जाणणारा–दुसरा कोणी नाहीं. तो सर्वांचें कारण असल्यामुळें त्याला प्रथम व परिपूर्ण असल्यामुळें पुरुष व महान्त असें ह्मणतात." अशा अर्थाचें श्वेताश्वतरोपनिषदाचें वचन आहे. " विज्ञात्याच्या विज्ञानशक्तीचा विशेष प्रकारें सर्वथा लोप संभवत नाहीं, " व " तें द्वितीय नाहींच " असें बृहदारण्यकाचें वचन आहे. ( त्यामुळें 'ब्रह्म अनित्य आहे. कारण त्याला ज्ञानत्व आहे; लौकिक ज्ञानाप्रमाणें,' हें अनुमानही बाधित होतें, असें सांगतात– )

विज्ञातृस्वरूपाव्यतिरेकात्कारणादिनिमित्तानपेक्षत्वाच्च ब्रह्मणो ज्ञानस्वरूपत्वेऽपि नित्यत्वप्रसिद्धिरतो नैव धात्वर्थस्तत्क्रियारूपत्वात् । अत एव च न ज्ञानकर्तृ, तस्मादेव च न ज्ञानशब्दवाच्यमपि तद्ब्रह्म । तथाऽपि तदाभासवाचकेन बुद्धिधर्मविषयेण ज्ञानशब्देन तल्लक्ष्यते न तूच्यते । शब्दप्रवृत्तिहेतुजात्यादिधर्मरहितत्वात् । तथा सत्यशब्देनापि सर्वविशेषप्रत्यस्तमितस्वरूपत्वाद्ब्रह्मणो बाह्यसत्तासामान्यविषयेण सत्यशब्देन लक्ष्यते सत्यं ब्रह्मेति न तु सत्यशब्दवाच्यमेव ब्रह्म । एवं सत्यादिशब्दा इतरेतरसंनिधानादन्योन्यनियम्यनियामकाः सन्तः सत्यादिशब्दवाच्यात्तन्निवर्तका ब्रह्मणो लक्षणार्थाश्च भवन्तीत्यतः

सिद्धं " यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह " " अनिरुक्तेऽनिलयने " इति चावाच्यत्वं नीलोत्पलवदवाक्यार्थत्वं च ब्रह्मणः ॥

अर्थ—विज्ञातृस्वरूपाख्य ज्ञानाहून तें ज्ञान पृथक् आहे व त्याला करणादि निमित्तांची अपेक्षा नाहीं. त्यामुळें ब्रह्माला ज्ञानस्वरूपत्व जरी असलें तरी त्याच्या नित्यत्वाची सिद्धि होते. त्यामुळें तें ज्ञान हा धात्वर्थ नव्हे. कारण ते ज्ञान क्रियारूप नाहीं. ह्मणूनच ब्रह्म ज्ञानकर्तृही नाहीं. (ह्म० ज्ञात्, जाणणें या क्रियेचा कर्ताही तें नाहीं. ) त्यामुळेंच ते ब्रह्म ज्ञानशब्द-वाच्यही नव्हे. ( ह्मणजे ज्ञान या वाचकशब्दाचा तें वाच्य–अर्थही नाहीं. त्याला ज्ञान असेंही ह्मणता येत नाहीं. ) तथापि ज्ञानाच्या आभासाचा वाचक व बुद्धिधर्मविषय असा जो ज्ञानशब्द त्याच्या योगानें तें लक्षिलें जातें; बोललें जात नाहीं कारण तें शब्दाच्या प्रवृत्तीला निमित्त होणाऱ्या जाति, गुण, क्रिया व संबंध या धर्मांनीं रहित आहे. त्याचप्रमाणें तें ब्रह्म सत्यशब्दानेंही वाच्य नाही. कारण त्याचें स्वरूप सर्व विशेषशून्य आहे. यास्तव बाह्य सत्ताजाति हा ज्याचा विषय आहे अशा सत्यशब्दानें तें ' सत्यं ब्रह्म ' अशा रीतीनें लक्षित होतें. पण तें ब्रह्म सत्यशब्दवाच्यच नाहीं. येणेंप्रमाणें सत्य, ज्ञान व अनन्त हे शब्द एकमेकाच्या सनिध एक-मेकाचे नियम्यनियामक होऊन सत्यादिशब्दाच्या अर्थापासून ब्रह्माची निवृत्ति करणारे व त्याच्या लक्षणाच्या उपयोगी, असे होतात. तस्मात् 'मनासह वाणी ज्याला प्राप्त न होताच निवृत्त होते,' 'अनिरुक्त, अनिलयन' इत्यादि वाक्यावरून ब्रह्माचें अवाच्यत्व व नील कमलाप्रमाणें अवाक्यार्थत्व सिद्ध झालें. ( ह्म० वाचकशक्तीनें तीं पद ब्रह्माचा बोध करितात, असें मानलेलें नसल्यामुळें तें सत्यादिशब्दाचें वाच्य होत नाहीं व सर्व अनिष्टाचा व्यव-च्छेद करून एका ब्रह्मालाच लक्ष्यत्व मानलेलें असल्यामुळें ब्रह्माला गुण-गुणी इत्यादि संसर्ग-वाक्यार्थत्व नाहीं, असा भावार्थ )

यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन् ।

तद्यथाव्याख्यातं ब्रह्म यो वेद विजानाति निहितं स्थितं गुहायाम् । गूहतेः संवरणार्थस्य निगूढा अस्यां ज्ञानज्ञेयज्ञातृपदार्था इति गुहा बुद्धिः । गूढावस्यां भोगापवर्गौ पुरुषार्थाविति वा तस्यां परमे प्रकृष्टे व्योमन्व्योम्न्याकाशेऽव्याकृताख्ये । तद्धि परमं व्योम "एतस्मिन्खल्वक्षरे गार्ग्याकाशः" इत्यक्षरसंनिकर्षात् । गुहायां व्योम्नीति वा सामानाधिकरण्यादव्याकृताकाशमेव गुहा । तत्रापि निगूढाः सर्वे पदार्थास्त्रिषु कालेषु कारणत्वात्सूक्ष्मतरत्वाच्च । तस्मिन्नन्तर्निहितं ब्रह्म । हार्दमेव तु परमं व्योमेति न्याय्यं विज्ञानाङ्गत्वेनोपासनाङ्गत्वेन व्योम्नो विवक्षितत्वात् ॥

अर्थ—वर जसें व्याख्यान केलें आहे तशा प्रकारचें तें ब्रह्म जो गुहेमध्यें स्थित आहे, असें जाणतो '*गुहू=संवरणे*' अशा पाणिनीचा धातुपाठ आहे त्या संवरण ह्मणजे आच्छादन या अर्थी असलेल्या गुहू धातूपासून गुहा हा शब्द झाला आहे ज्ञान, ज्ञातृ व ज्ञेय हे पदार्थ जिच्यामध्यें अगदीं गूढ आहेत ती गुहा ह्मणजे बुद्धि. किंवा जिच्यामध्यें भोग व मोक्ष हे पुरुषार्थ अत्यंत गूढ आहेत ती गुहा. तिच्यांतील परम ह्मणजे प्रकृष्ट अतिशय उत्कृष्ट अव्याकृतसंज्ञक आकाशांत ( तें ब्रह्म स्थित आहे, असें जो जाणतो ) कारण तें अव्याकृतच परम आकाश आहे. कारण 'हे गार्गि, खरोखर या अक्षरामध्यें आकाश ओतप्रोत आहे.' अशा अर्थाच्या श्रुतींत त्या आकाशाशीं अक्षराचा संनिकर्ष सांगितला आहे. ( संनिकर्ष ह्मणजे सामीप्य ); किंवा 'गुहायां व्योम्नि' या दोन पदार्थांचें सामानाधिकरण्य असल्यामुळे अव्याकृताकाशच गुहा आहे. त्या गुहेंतही सर्व पदार्थ त्रिकाळीं निगूढ आहेत. कारण तें अव्याकृताकाश सर्वांचें कारण आहे व अतिशय सूक्ष्म आहे. त्याच्या आंत ब्रह्म स्थित आहे. ( वर गुहाशब्दाचे दोन अर्थ केले आहेत. एक गुहा ह्म० बुद्धि, व दुसरा गुहा ह्म० अव्याकृत आकाशच. पहिल्या अर्थी बुद्धींत अनुगत असलेलें जें अव्याकृत आकाश त्यांत ब्रह्म

आहे, असा अर्थ होतो. आकाशशब्दाचा भूताकाश हा मुख्य अर्थ आहे. पण भूताकाश कार्य असल्यामुळें अपर आहे, व अव्याकृताकाश कारण असल्यामुळें पर आहे. त्याचप्रमाणें अव्याकृताचें अक्षर ब्रह्माशीं सामीप्य आहे. त्यामुळें त्यांत तें राहतें, असें ह्मणतां येतें. ह्मणून येथें व्योमशब्दानें अव्याकृत लक्षित होतें. पण ' गुहाया ' व ' व्योमन् ( व्योम्नि )' हीं दोन पदें व्यधिकरण नसून समानाधिकरण आहेत; ह्मणजे त्यांच्यामध्यें विशेषण-विशेष्यभाव आहे, असें जर समजलें तर अव्याकृत हीच गुहा असून त्यांत ब्रह्म स्थित आहे, असा अर्थ निष्पन्न होतो. पण भाष्यकारांनीं हीं दोन्हीं व्याख्यानें पूर्वीच्या व्याख्यात्यांच्या अनुरोधानें केलीं आहेत. त्यांना स्वतःला तीं संमत नाहींत. यास्तव आता स्वतःचा अभिप्राय प्रकट करितात– ) ' तु हार्दं एव परमं व्योम इति न्याय्यं ' (परमे व्योमन् ( व्योम्नि ) गुहायां ब्रह्म ( साक्षितया ) निहितं अभिव्यक्तं इति व्याख्यानं युक्तम् ) पण हृदयावच्छिन्न आकाशांत जी बुद्धि या नांवाची गुहा आहे तिच्यामध्यें ब्रह्म साक्षिरूपानें अभिव्यक्त झालें आहे, असें व्याख्यान करणें, सयुक्तिक आहे. ( कारण द्रष्ट्याशीं अभिन्न असलेल्या ब्रह्माचें अपरोक्ष ज्ञान हृदयातच होतें. ) कारण तें आकाश विज्ञानाचें अंग व उपासनेचें अंग या रूपानें विवक्षित आहे. ( पण भूताकाशाला ' परम व्योम ' ह्मणणें उपपन्न होत नाहीं, ह्मणून ह्मणाल तर सागतों– )

" यो वै स बहिर्धा पुरुषादाकाशो यो वै सोऽन्तः पुरुष आकाशो योऽयमन्तर्हृदय आकाशः " इति· श्रुत्यन्तरात्प्रसिद्धं हार्दस्य व्योम्नः परमत्वम् । तस्मिन्हार्दे व्योम्नि या बुद्धिर्गुहा तस्यां निहितं ब्रह्म तद्वृत्त्या विविक्ततयोपलभ्यत इति । न ह्यन्यथा विशिष्टदेशकालसंबन्धोऽस्ति ब्रह्मणः सर्वगतत्वान्निर्विशेषत्वाच्च ॥

अर्थ—" तो जो शरीरसंज्ञक पुरुषाच्या बाहेरील आकाश; जो पुरुषाच्या आंतील आकाश व जो हा हृदयांत आकाश " अशा दुसऱ्या श्रुतीवरून हृदयस्थ आकाशाचें परमत्व प्रसिद्ध आहे. त्या हार्द ( हृदयगत )

आकाशांत जी बुद्धि-गुहा तिच्यामध्यें ब्रह्म निहित आहे. ह्मणजे बुद्धिवृत्तीनें तें अगदीं स्पष्टपणें उपलब्ध होतें ( अहो पण निहित ह्मणजे स्थित, असें असताना त्याचें व्याख्यान-अगदीं स्पष्टपणें उपलब्ध होतें,-असें कसें करता ? ह्मणून कोणी विचारील तर सांगतात- ) कारण त्यावाचून ( ह्म० अविद्यावस्थेंत उपलब्ध होणें, यावाचून ) ब्रह्माचा विशिष्ट देश व काल याच्याशीं संबंध असत नाहीं. कारण तें सर्वगत व निर्विशेष आहे.

सोऽश्नुते सर्वान्कामान्सह । ब्रह्मणा विपश्चितेति ।

स एव ब्रह्म विजानन्किमित्याह—अश्नुते भुङ्क्ते सर्वान्निरवशिष्टान्कामान्भोगानित्यर्थः । किमस्मदादिवत्पुत्रस्वर्गादीन्पर्यायेण नेत्याह । सह युगपदेकक्षणोपारूढानेकयोपलब्ध्या सवितृप्रकाशवन्नित्यया ब्रह्मस्वरूपाव्यतिरिक्तया यामवोचाम सत्यं ज्ञानमनन्तमिति । एतत्तदुच्यते—ब्रह्मणा सहेति । ब्रह्मभूतो विद्वान्ब्रह्मस्वरूपेणैव सर्वान्कामान्सहाऽश्नुते. न यथोपाधिकृतेन स्वरूपेणाऽऽत्मना जलसूर्यकादिवत्प्रतिबिम्बभूतेन सांसारिकेण धर्मादिनिमित्तापेक्षांश्चक्षुरादिकरणापेक्षांश्च कामान्पर्यायेणाश्नुते लोकः । कथं तर्हि. यथोक्तेन प्रकारेण सर्वज्ञेन सर्वगतेन सर्वात्मना नित्यब्रह्मात्मस्वरूपेण धर्मादिनिमित्तानपेक्षांश्चक्षुरादिकरणनिरपेक्षांश्च सर्वान्कामान्सहैवाश्नुत इत्यर्थः । विपश्चिता मेधाविना सर्वज्ञेन । तद्धि वैपश्चित्यं यत्सर्वज्ञत्वं तेन सर्वज्ञस्वरूपेण ब्रह्मणाऽश्नुत इति । इतिशब्दो मन्त्रपरिसमाप्त्यर्थः ॥

अर्थ—तो अशा रीतीनें ब्रह्माला जाणणारा काय करतो, तें श्रुति सांगते-तो सर्व ह्म० निःशेष कामांना ह्म० भोगांना, असा अर्थ, भोगतो तो आह्मा-तुह्माप्रमाणें पुत्र, स्वर्ग इत्यादि भोगांना पर्यायानें ( ह्म० क्रमानें ) भोगतो कीं काय तर नाहीं, असें वेद सांगतो. तो एकाच वेळीं भोगतो. एका क्षणांतच बुद्धीवर आरूढ झालेल्या सर्व भोगांस ब्रह्मस्वरूपाहून व्यतिरिक्त नसलेल्या व सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें नित्य असलेल्या उपलब्धीनें-

ज्ञतीनें–तो त्यांस भोगतो. त्या उपलब्धीलाच सत्य, ज्ञान व अनन्त असें वर ह्मटलें आहे. 'ब्रह्मणा सह' अशा या वाक्यानें हा अर्थ सांगितला जातो. ब्रह्मभूत विद्वान् ब्रह्मस्वरूपानेंच सर्व कामांचा एकाच वेळीं उपभोग घेतो. ह्मणजे ज्याप्रमाणें इतर सर्व लोक उपाधिकृत स्वरूपानें ह्मणजे जलांतील सूर्याच्या प्रतिबिंबाप्रमाणें वगैरे प्रतिबिंबभूत सांसारिक आत्म्याच्या योगानें धर्मादि निमित्तांची व चक्षुरादि इंद्रियांची–साधनांची ज्यांना अपेक्षा आहे अशा कामांना क्रमानें भोगतात त्याप्रमाणें तो धर्मादि-निमित्तापेक्ष व इंद्रियापेक्ष भोग औपाधिक आत्म्याच्या योगानें क्रमानें भोगीत नाहीं. तर तो वर सांगितलेल्या प्रकारच्या सर्वज्ञ, सर्वगत, नित्यब्रह्मात्मस्वरूप अशा सर्वात्मरूपानें ज्यांना धर्मादि निमित्तांची व चक्षुरादि इंद्रियांची अपेक्षा नाहीं अशा सर्व कामास एकाच वेळीं भोगतो, असा याचा अर्थ. विपश्चित ह्म० मेधावी व सर्वज्ञ अशा ब्रह्माच्या योगानें; जें सर्वज्ञत्व तेंच विपश्चितत्व होय. यास्तव त्या सर्वज्ञस्वरूप ब्रह्मानें पुरुष उपभोग घेतो. मूळ श्रुतींत 'विपश्चिता इति' असा जो 'इति'–शब्द आहे तो मंत्राच्या परिसमाप्त्यर्थ आहे. (जे सुखाचे प्रकार हिरण्यगर्भादि उपाधींमध्यें भोग्यत्वानें अभिमत आहेत ते सर्व ब्रह्मानन्दाहून भिन्न नाहींत. त्यामुळें ब्रह्मीभूत विद्वान् सर्व आनंदांचा उपभोग घेतो. ह्मणून गौण रीतीनें 'सर्वान् कामान्' असें मुळांत बहुवचन योजलें आहे.)

(पुढील ग्रंथाच्या अवतरणार्थ मागील ग्रंथाचा अनुवाद करितात–)

सर्व एव वल्ल्यर्थो ब्रह्मविदाप्नोति परमिति ब्राह्मणवाक्येन सूत्रितः। स च सूत्रितोऽर्थः संक्षेपतो मन्त्रेण व्याख्यातः। पुनस्तस्यैव विस्तरेणार्थनिर्णयः कर्तव्य इत्युत्तरस्तद्वृत्तिस्थानीयो ग्रन्थ आरभ्यते तस्माद्वा एतस्मादित्यादिः॥

अर्थ—'ब्रह्मविदाप्नोति परं' या ब्राह्मणवाक्यानें या वल्लीचा सर्वच अर्थ सूत्रित केला आहे व त्या सूत्रित अर्थाचें मंत्रानें संक्षेपतः व्याख्यान केलें आहे. पण पुनरपि त्याचाच विस्तारानें अर्थनिर्णय करावा ह्मणून त्याच्याच

वृत्तीप्रमाणें असलेला पुढील 'तस्माद्वा एतस्मात्०' इत्यादि ग्रंथ आरंभिला जात आहे.

तत्र च सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मेत्युक्तं मन्त्रादौ तत्कथं सत्यं ज्ञानमनन्तं चेत्यत आह। तत्र त्रिविधं ह्यानन्त्यं देशतः कालतो वस्तुतश्चेति। तद्यथा देशतोऽनन्त आकाशो न हि देशतस्तस्य परिच्छेदोऽस्ति। न तु कालतश्चाऽऽनन्त्यं वस्तुतश्चाऽऽकाशस्य। कस्मात्कार्यत्वात्। नैवं ब्रह्मण आकाशवत्कालतोऽप्यन्तवत्त्वमकार्यत्वात्। कार्यं हि वस्तु कालेन परिच्छिद्यते। अकार्यं च ब्रह्म। तस्मात्कालतोऽप्यनन्तम्। तथा वस्तुतः। कथं पुनर्वस्तुत आनन्त्यं सर्वानन्यत्वात्। भिन्नं हि वस्तु वस्त्वन्तरस्यान्तो भवति। वस्त्वन्तरबुद्धिर्हि प्रसक्ता वस्त्वन्तराद्विनिवर्तते। यतो यस्य बुद्धेर्विनिवृत्तिः स तस्यान्तः। तद्यथा गोत्वबुद्धिरश्वत्वाद्विनिवर्तत इत्यश्वत्वान्तं गोत्वमित्यन्तवदेव भवति। स चान्तो भिन्नेषु वस्तुषु दृष्टो नैवं ब्रह्मणो भेदः। अतो वस्तुतोऽप्यानन्त्यम्। कथं पुनः सर्वानन्यत्वं ब्रह्मण इति। उच्यते, सर्ववस्तुकारणत्वात्। सर्वेषां हि वस्तूनां कालाकाशादीनां कारणं ब्रह्म। कार्यापेक्षया वस्तुतोऽन्तवत्त्वमिति चेन्न। अनृतत्वात्कार्यवस्तुनः। न हि कारणव्यतिरेकेण कार्यं नाम वस्तुतोऽस्ति। यतः कारणबुद्धिर्विनिवर्तेत। वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यमेवं सदेव सत्यमिति श्रुत्यन्तरात्। तस्मादाकाशादिकारणत्वाद्देशतस्तावदनन्तं ब्रह्म। आकाशो ह्यनन्त इति प्रसिद्धं देशतस्तस्य चायं कारणं तस्मात्सिद्धं देशत आत्मन आनन्त्यम्। न ह्यसर्वगतात्सर्वगतमुत्पद्यमानं लोके किंचिद्दृश्यते। अतो निरतिशयमात्मन आनन्त्यं देशतस्तथाऽकार्यत्वात्कालतस्तद्भिन्नवस्त्वन्तराभावाच्च वस्तुतोऽप्येव निरतिशयसत्यत्वम्॥

(ब्रह्म आकाशादिकांचें कारण आहे, असें सांगून त्याच्या आनन्त्याचा विस्तार करण्यासाठीं पुढील ग्रंथ आहे, असें दाखविण्याच्या उद्देशानें सत्यादि-शब्दांच्या विशेष अर्थाचा अनुवाद करितात—) त्या मंत्रांत आरंभीच 'सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म' असें म्हटलें. पण तें सत्य, ज्ञान व

अनन्त कसें ? ह्मणून कोणी विचारील, त्यासाठीं सागतात–त्यातील आनन्त्य तीन प्रकारचें आहे देशत , काळत व वस्तुत . जसें–आकाश देशत अनन्त आहे कारण त्याचा देशत परिच्छेद होत नाहीं पण आकाशाचें आनन्त्य काळत व वस्तुत नाहीं. का तर ते कार्य आहे पण ब्रह्माला तसें आकाशाप्रमाणें काळत सुद्धा अन्तवत्त्व नाहीं कारण तें कार्य नाहीं कार्य वस्तुच काळाकडून परिच्छिन्न केली जाते ब्रह्म तर अकार्य आहे. त्यामुळें तें काळत ही अनन्त आहे तसेंच त्याला वस्तुत ही आनन्त्य आहे वस्तुत आनन्त्य कसें तर तें सर्वांशी अनन्य आहे, ह्मणून. ( ह्म० तें कोणत्याही पदार्थाहून पृथक नाहीं ) भिन्न वस्तुच दुसऱ्या वस्तूचा अत होते ( घटाहून पट भिन्न आहे त्यामुळें तो घटाचा परिच्छेदक आहे ) कारण दुसऱ्या एकाद्या वस्तूचे ठिकाणीं प्रसक्त झालेली बुद्धि त्याहून इतर वस्तूपासून निवृत्त होते ज्या पदार्थापासून ज्या पदार्थविषयींची बुद्धि निवृत्त होते तो पदार्थ त्याचा अन्त आहे जशी गोत्वबुद्धि अश्वत्वबुद्धीपासून निवृत्त होते ह्मणून गोत्व अश्वत्वान्त आहे ( ह्म० गोत्वाचा अश्वत्वानें अत–परिच्छेद होतो ) यास्तव त गोत्व अन्तवत्च आहे पण तो (अशा प्रकारचा) अन्त भिन्नवस्तू मध्यच अनुभवास येतो. तसा ब्रह्माचा अन्त अनुभवास येत नाहीं यास्तव ब्रह्माला वस्तुत ही आनन्त्य आहे पण ब्रह्माला सर्वांशीं अनन्यत्व कसें आहे, ह्मणून विचाराल तर सागतों–त सर्व वस्तूचें कारण आहे, ह्मणून त्याला सर्वानन्यत्व आहे काळ, आकाश इत्यादि सर्व वस्तूचें ब्रह्म कारण आहे. पण कार्यांच्या अपेक्षेनें ब्रह्माला वस्तुत अनन्तत्व आहे, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण कार्यरूप वस्तुला मिथ्यात्व आहे कार्य ह्मणून कारणाहून निराळें वस्तुत काहीं नाहीं, कीं ज्या कार्यापासून कारणबुद्धि निवृत्त होऊ शकेल ! "मातीचा विकार नुसता वाणीनच आरंभ करता येण्याजोगा–नुस्तें नाव आहे मृत्तिकाच काय ती सत्य आहे," अशाप्रकारें सत्–च सत्य आहे, असें सागणारी दुसरी श्रुति आहे तस्मात् आकाशादि कार्यांचें कारण असल्यामुळ ब्रह्म देशत तर अनन्त आहेच कारण आकाश

देशतः अनन्त आहे, हें तर प्रसिद्ध आहे व हा आत्मा ( ब्रह्म ) त्याचें कारण आहे. त्यामुळें आत्म्याचें देशतः आनन्त्य सिद्ध झालें. कारण व्यवहारांत असर्वगत ( ह्म० अव्यापक पदार्थापासून ) कोणतीही सर्वगत ( ह्म० व्यापक ) वस्तु उत्पन्न होते, असें आढळत नाहीं. यास्तव आत्म्याचें देशतः अनन्तत्व निरतिशय आहे. त्याचप्रमाणें तो आत्मा कार्य नसल्यामुळें कालतःही अनन्त आहे, आणि त्याहून भिन्न अशी दुसरी वस्तु नसल्यामुळें वस्तुतः अनन्त आहे. त्यामुळेंच त्या आत्म्याला निरतिशय सत्यत्वही आहे. ( निरतिशय आनन्त्यामुळेंच त्याचें सत्यत्वही सिद्ध होतें. कारण परिच्छिन्न पदार्थालाच असत्यत्व असतें.)

( असो; याप्रमाणें पुढील सूत्रितवाक्याचें तात्पर्य सांगून भाष्यकार त्या वाक्याच्या पदांचें व्याख्यान करितात.—)

तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः। आकाशाद्वायुः। वायोरग्निः। अग्नेराप.। अद्भ्यः पृथिवी। पृथिव्या ओषधयः। ओषधीभ्योऽन्नम्। अन्नात्पुरुषः। स वा एष पुरुषोऽन्नरसमयः।

तस्मादिति मूलवाक्यसूत्रितं ब्रह्म परामृश्यते। एतस्मादिति मन्त्रवाक्येनानन्तरं यथालक्षितम्। यद्ब्रह्माऽऽदौ ब्राह्मणवाक्येन सूत्रितं यच्च सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मेत्यनन्तरमेव लक्षितं तस्मादेतस्माद्ब्रह्मण आत्मन आत्मशब्दवाच्यात्। आत्मा हि तत्सर्वस्य तत्सत्यं स आत्मेति श्रुत्यन्तरादतो ब्रह्माऽऽत्मा। तस्मादेतस्माद्ब्रह्मण आत्मस्वरूपादाकाशः संभूतः समुत्पन्न.। आकाशो नाम शब्दगुणोऽवकाशकरो मूर्तद्रव्याणाम्। तस्मादाकाशात्स्वेन स्पर्शगुणेन पूर्वेण च कारणगुणेन शब्देन द्विगुणो वायुः संभूत इत्यनुवर्तते। वायोश्च स्वेन रूपगुणेन पूर्वाभ्यां च त्रिगुणोऽग्निः संभूतः। अग्नेः स्वेन रसगुणेन पूर्वैश्च त्रिभिश्चतुर्गुणा आपः संभूताः। अद्भ्यः स्वेन गन्धगुणेन पूर्वैश्चतुर्भिः पञ्चगुणा पृथिवी संभूता। पृथिव्या ओषधयः। ओषधीभ्योऽन्नम्। अन्नाद्रेतोरूपेण परिणतात्पुरुषः शिर·

पाण्याद्याकृतिमान् । स वा एष पुरुषोऽन्नरसमयोऽन्नरसविकारः । पुरुषाकृतिभावितं हि सर्वेभ्योऽङ्गेभ्यस्तेजः संभूतं रेतो बीजं तस्माद्यो जायते सोऽपि तथा पुरुषाकृतिरेव स्यात् । सर्वजातिषु जायमानानां जनकाकृतिनियमदर्शनात् ।

अर्थ—' तस्मात् ' या पदांतील ' तत् ' या शब्दानें मूळ वाक्यानें सूत्रित केलेल्या ब्रह्माचा परामर्श केला जातो व मंत्रवाक्यानें त्यानंतर जसें लक्षण सांगितलें आहे तशा ब्रह्माचा ' एतस्मात् ' या वाक्यांतील ' एतत् ' या शब्दानें परामर्श केला आहे. यास्तव जें ब्रह्म आरंभीं ब्राह्मणवाक्यानें सूत्रित केलें आहे व जें ब्रह्म त्यानंतर लागलेंच ' सत्यं ज्ञानं अनन्तं,' अशा रीतीनें लक्षित केलें आहे, त्या ब्रह्मापासून—आत्म्यापासून—आत्मशब्दवाच्य ब्रह्मापासून, कारण ब्रह्म सर्वांचा आत्मा आहे कारण ' तें सत्च सत्य आहे. तो आत्मा आहे, ' अशी दुसरी श्रुति आहे त्यामुळें ब्रह्म आत्मा आहे. त्या ह्या आत्मस्वरूप ब्रह्मापासून आकाश उत्पन्न झाला. आकाश ह्मणजे शब्द हा ज्याचा गुण आहे व जो मूर्त द्रव्याना अवकाश देतो तो पदार्थ. त्या आकाशापासून स्वत.च्या स्पर्शगुणानें व पूर्वीच्या शब्द या कारणगुणानें द्विगुण वायु उत्पन्न झाला. ( पहिल्या पर्यायांतील ' संभूतः ' या पदाची सर्वत्र अनुवृत्ति करावी. ) वायूपासून स्वतःच्या रूपगुणानें व पूर्वीच्या दोन गुणांनीं युक्त असा त्रिगुण अग्नि झाला. अग्नीपासून स्वत.च्या रसगुणानें व पूर्वीच्या तीन गुणांनीं युक्त असें चतुर्गुण आप झालें. आपापासून स्वत.च्या गंधगुणानें व पूर्वीच्या चार गुणांनीं युक्त अशी पंचगुणा पृथिवी झाली. पृथिवीपासून ओषधी झाल्या. ओषधींपासून अन्न, वीर्याच्या रूपानें परिणत झालेल्या अन्नापासून मस्तक, हात, पाय इत्यादि आकृतीनें युक्त असलेला पुरुष झाला. तो हा प्रसिद्ध पुरुष अन्नरसमय—अन्नरसाचा विकार आहे. पुरुषाच्या आकृतीनें भावितवासित—व सर्व अंगापासून उत्पन्न झालेलं तेज असें जें रेत तेंच बीज आहे, हें प्रसिद्ध आहे. त्यापासून जो होतो तोही तसा पुरुषाच्या आकाराचाच होतो. कारण सर्व जातींमध्यें उत्पन्न होणाऱ्या देहाची नियमानें जनकाकृ-

तिच असते, असा अनुभव आहे. ( ह्म० बीजद पिता ज्या जातीचा असतो त्याच जातीचें अपत्य होतें, असें दिसतें. पुरुष ह्म० शरीर हें अन्त्य कार्य आहे. पण तेथपर्यंत सर्व कार्यांचें उपादान कारण मायाविशिष्ट ब्रह्मच आहे. यास्तव आकाशभावास प्राप्त झालेल्या परमात्म्यापासूनच वायु झाला. ह्मणू नच आकाशाच्या गुणाची वायूमध्यें, वायूच्या गुणांची तेजामध्यें इत्यादि उत्तरत्र अनुवृत्ति होते. आतां सर्वच शरीरें अन्नापासून होत असतांना अन्नापासून पुरुष होतो, असें ह्मणून मनुष्यशरीराचेंच ग्रहण कां केलें आहे, असें कोणी विचारील ह्मणून सांगतात—)

सर्वेषामप्यन्नरसविकारत्वे ब्रह्मवंश्यत्वे चाविशिष्टे कस्मात्पुरुष एव गृह्यते । प्राधान्यात् । किं पुनः प्राधान्यम् । कर्मज्ञानाधिकारः । पुरुष एव हि शक्तत्वादर्थित्वादपर्युदस्तत्वाच्चार्थी विद्वान्समर्थः कर्मज्ञानयोरधिक्रियते—" पुरुषे त्वेवाऽऽविस्तरामात्मा स हि प्रज्ञानेन संपन्नतमो विज्ञातं वदति विज्ञातं पश्यति वेद श्वस्तनं वेद लोकालोकौ मर्त्येनामृतमीप्सतीत्येवं संपन्नः । अथेतरेषां पशूनामशनापिपासे एवाभिविज्ञानम् । " इत्यादिश्रुत्यन्तरदर्शनात् ॥

अर्थ—सृष्टींतील सर्व आकारांना अन्नरसविकारत्व असतांना ( ह्म० सर्व पदार्थ अन्नरसाचेच विकार असतांना ) व सर्वांचें ब्रह्मवंश्यत्व ( ब्रह्माच्या वंशांत उत्पन्न होणें, हें सर्वांमध्यें ) एक सारखेंच असतांना वरील श्रुतिवचनांत ' अन्नात्पुरुषः ' असें ह्मणून पुरुषाचेंच ग्रहण कां केलें आहे ? ( ह्मणून ह्मणाल तर सांगतों—) कारण पुरुषाला प्राधान्य आहे. त्याचें प्राधान्य तें कोणतें ? ( ह्मणून विचाराल तर तेंही सांगतों-) कर्म व ज्ञान यांचा अधिकार हेंच प्राधान्य आहे. कारण पुरुषच समर्थ असल्यामुळें ( ह्म० तो विधि व निषेध यांचा विवेक करण्याच्या सामर्थ्यानें युक्त असल्यामुळें ) व त्याला स्वर्गादि उत्कर्षाची इच्छा असल्यामुळें व त्याचा पर्युदास केलेला नसल्यामुळें ( ह्म० त्यानें कर्म व ज्ञान संपादन करूं नये, असा निषेध केलेला नसल्यामुळें ) अर्थी, विद्वान् व समर्थ पुरुषच ज्ञान व कर्म यांचा अधिकारी आहे.

( याविषयीं ऐतरेयक श्रुतीची संमति दाखवितात–) " ब्राह्मण्यादि जातीनें युक्त असलेल्या मनुष्यादि उच्च प्रतीच्या देहांतच आत्मा अतिशय प्रकट झालेला आहे. कारण तो अतिशय ज्ञानानें अत्यंत संपन्न असतो. त्यामुळें आदल्या दिवशीं त्याला ज्या वस्तूचें ज्ञान झालेलें असतें तिचें स्मरण करून मला हें माहीत आहे, असें तो लोकांपुढें सांगूं शकतो. त्याचप्रमाणें पूर्व-दिवशीं जी वस्तु चांगल्या रीतीनें जाणलेली असते तिलाच आज स्मरून तिला पाहूं शकतो. तसेंच त्याला उद्यां आपणाला काय करणें उचित आहे तें आज कळतें. त्याचप्रमाणें त्याला स्वर्गासारख्या उत्तम व नरकासारख्या अधम लोकांचें ज्ञान शास्त्रावरून होतें. तसेंच तो ज्ञानकर्मरूप नश्वर साधनानें अविनश्वर मुक्तिपदाची इच्छा करतो. अशा रीतीनें मनुष्य अत्यंत विवेकसपन्न असतो. पण मनुष्येतर पशूंना खाण्याची इच्छा व पाणी पिण्याची इच्छा याना अनुलक्षूनच ज्ञान होत असतें. " इत्यादि अर्थाची दुसरी श्रुति आढळते.

स हि पुरुष इह विद्ययाऽन्तरतमं ब्रह्म संक्रामयितुमिष्टस्तस्य च बाह्याकारविशेषेष्वनात्मस्वात्मभाविता बुद्धिरनालम्ब्य विशेषं कंचित्सहसाऽन्तरतमप्रत्यगात्मविषया निरालम्बना च कर्तुमशक्येति दृष्टशरीरात्मसामान्यकल्पनया शाखाचन्द्रनिदर्शनवदन्तः प्रवेशयन्नाह—

अर्थ—तोच पुरुष येथें ( या ब्रह्मवल्लीमध्यें ) विद्येच्या योगानें सर्व कोशाच्या अगदीं आत असलेल्या ब्रह्माला नेऊन पोंचवावयास इष्ट आहे ( ह्म० त्याला सर्वान्तर ब्रह्म करण्याची इच्छा आहे. ) त्याची अनात्मभूत बाह्य विशेष आकारामध्यें आत्मदृष्टीनें भावित झालेली बुद्धि ( ह्म० आत्म-बुद्धि ) कोणत्याही विशेषाचा आश्रय न करितां एकाएकीं अगदीं सर्वांच्या आत असलेला जो प्रत्यगात्मा तद्विषय ( ह्म० तो आत्माच आहे विषय जिचा अशी ) व निराधार करितां येत नाहीं. यास्तव शाखाचन्द्रदृष्टान्ता-प्रमाणें दृष्ट जें शरीर तोच आत्मा या सामान्य–साधारण–कल्पनेनें त्याचा आत प्रवेश करवीत वेद ह्मणतो–

तस्येदमेव शिरः । अयं दक्षिणः पक्षः । अयमुत्तरः पक्षः । अयमात्मा । इदं पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ॥

इति ब्रह्मवल्ल्यध्याये प्रथमोऽनुवाकः ॥ १ ॥

तस्येदमेव शिरः । तस्यास्य पुरुषस्यान्नरसमयस्येदमेव शिरः प्रसिद्धम् । प्राणमयादिष्वशिरस्सां शिरस्त्वदर्शनादिहापि तत्प्रसङ्गो मा भूदितीदमेव शिर इत्युच्यते । एवं पक्षादिषु योजना । अयं दक्षिणो बाहुः पूर्वाभिमुखस्य दक्षिणः पक्षः । अयं सव्यो बाहुरुत्तरः पक्षः । अयं मध्यमो देहभाग आत्माऽङ्गानाम् । " मध्यं ह्येषामङ्गानामात्मा " इति श्रुतेः । इदमिति नाभेरधस्ताद्यदङ्गं तत्पुच्छं प्रतिष्ठा । प्रतितिष्ठत्यनयेति प्रतिष्ठा पुच्छमिव पुच्छमधोलम्बनसामान्याद्यथा गोः पुच्छम् । एतत्प्रकृत्योत्तरेषां प्राणमयादीनां रूपकत्वसिद्धिः । मूषानिषिक्तद्रुतताम्रप्रतिमावत् । तदप्येष श्लोको भवति । तत्तस्मिन्नेवार्थे ब्राह्मणोक्तेऽन्नमयात्मप्रकाशक एष श्लोको मन्त्रो भवति ॥

इति श्रीशांकरभाष्ये प्रथमोऽनुवाकः ॥ १ ॥

अर्थ—त्या ह्या अन्नरसमय पुरुषाचें हें प्रसिद्ध शिर, हेंच शिर आहे. प्राणमयादि पुढील कोशांत वस्तुतः शिर नसलेल्याही वस्तूंना शिर म्हटलेलें आहे, असें दिसतें. तसाच येथेंही प्रसंग न यावा म्हणून ' इदं-एव शिरः ' म्ह० त्याचें प्रत्यक्ष असलेलें हेंच शिर आहे, असें म्हटलें आहे. पक्षादि पुढील अवयवांमध्येंही अशीच योजना करावी. पूर्वाभिमुख पुरुषाचा हा जो दक्षिण बाहु ( दक्षिण दिशेकडील बाहु ) तोच त्याचा दक्षिण पक्ष ( पंख ) आहे. हा डावा बाहुच उत्तर पक्ष आहे. हा मधील देहभाग अंगांचा आत्मा आहे. ' या अंगांचा मध्य हाच आत्मा आहे, ' अशी श्रुति आहे. ' हें ' म्ह० नाभीच्या खालीं जें अंग आहे तें पुच्छ प्रतिष्ठा आहे. जिच्या योगानें शरीर प्रतिष्ठित होतें, ती प्रतिष्ठा. खालीं लोंबणें, या समान धर्मामुळें जसें गायीचें पुच्छ त्याप्रमाणें तें पुच्छाकारसें आहे. या अन्नमयापासून आरंभ करून पुढील प्राणमयादिकांच्या रूपकत्वाची सिद्धि होते. मुशींत घातलेल्या तांब्याच्या

पातळ रसाची प्रतिमा जशी होते त्याप्रमाणे (अन्नमयादिकाच्या आकाराच्या अनुरोधानें प्राणमयादिकाच्या शिर, दक्षिणोत्तर पक्ष, आत्मा व पुच्छ याच्या रूपकाची सिद्धि होते ) याच ब्राह्मणोक्त अर्थी हा अन्नमय आत्म्याचा प्रकाशक श्लोक ह्म० मंत्र आहे ( इति ब्रह्मवल्ल्यध्याये प्रथमाऽनुवाकः ) १.

---

अन्नाद्वै प्रजाः प्रजायन्ते । याः काश्च पृथिवीꣳ श्रिताः । अथो अन्नेनैव जीवन्ति । अथैनदपियन्त्यन्ततः अन्नꣳ हि भूतानां ज्येष्ठम् । तस्मात्सर्वौषधमुच्यते ।

अन्नाद्रसादिभावपरिणतात् । वै इति स्मरणार्थः । प्रजाः स्थावरजङ्गमाः प्रजायन्ते । याः काश्चाविशिष्टाः पृथिवीं श्रिताः पृथिवीमाश्रितास्ताः सर्वा अन्नादेव प्रजायन्ते । अथो अपि जाता अन्नेनैव जीवन्ति प्राणान्धारयन्ति वर्धन्त इत्यर्थः । अथाप्येनदन्नमपियन्त्यपि-गच्छन्ति । अपिशब्दः प्रतिशब्दार्थे । अन्नं प्रति प्रलीयन्त इत्यर्थः । अन्ततोऽन्ते जीवनलक्षणाया वृत्तेः परिसमाप्तौ । कस्मात् । अन्नं हि यस्माद्भूतानां प्राणिनां ज्येष्ठं प्रथमजम् । अन्नमयादीनां हीतरेषां भूतानां कारणमन्नमतोऽन्नप्रभवा अन्नजीवना अन्नप्रलयाश्च सर्वाः प्रजाः । यस्माच्चैवं तस्मात्सर्वौषधं सर्वप्राणिनां देहदाहप्रशमनमन्नमुच्यते ॥

अर्थ—रस रक्तादि भावानें परिणत झालेल्या अन्नापासून, 'अन्नात् वै' येथील 'वै' हा निपात स्मरणार्थ आहे (त्याच्या योगानें इतरत्र सांगितलेल्या अन्नाच्या परिणामाचें स्मरण होतें ) स्थावर–जंगमरूप प्रजा उत्पन्न होतात. सामान्यतः ज्या कांहीं प्रजा पृथिवीचा आश्रय करून राहिलेल्या आहेत त्या सर्व अन्नापासूनच उत्पन्न होतात. तशाच अन्नापासून झालेल्या त्या अन्नानेंच जिवंत राहतात, प्राणांना धारण करितात, वाढतात, असा याचा अर्थ. तशाच त्या या अन्नांत लीन होतात. 'अपि यन्ति' येथील अपि शब्द प्रति या शब्दाच्या अर्थी आहे. त्यामुळें त्या प्रजा अन्नांत

प्रलीन होतात; असा त्याचा अर्थ. ( पण त्या केव्हा प्रलीन होतात तर ) *अन्तत. ह्म० शेवटीं जीवन-लक्षण-वृद्धीची परिसमाप्ति झाली असता.* कारण कीं, अन्नच प्राण्याचें ज्येष्ठ, त्याच्या पूर्वी उत्पन्न झालेलें आहे. अन्न अन्नमयादि इतर भूताचें ( भौतिक कार्यांचें ) कारण आहे, त्यामुळें सर्व प्रजा अन्नापासून उत्पन्न होणाऱ्या, अन्नाच्या योगानें जिवत राहणाऱ्या व अन्नामध्यें प्रलीन होणाऱ्या आहेत, आणि ज्याअर्थी असें आहे त्याअर्थी अन्न सर्वौषध आहे, ह्म० सर्व प्राण्याच्या देहातील जाठराग्नीच्या दाहाचें प्रशमन करणारें आहे, असें ह्मटलें जातें.

सर्वं वै तेऽन्नमाप्नुवन्ति । येऽन्न ब्रह्मोपासते । अन्नः हि भूताना ज्येष्ठम् । तस्मात्सर्वौषधमुच्यते । अन्नाद्भूतानि जायन्ते । जातान्यन्नेन वर्धन्ते । अद्यतेऽत्ति च भूतानि । तस्मादन्न तदुच्यत इति ।

अन्नब्रह्मविद. फलमुच्यते । सर्व वे ते समस्तमन्नजातमाप्नुवन्ति । के । येऽन्न ब्रह्म यथोक्तमुपासते । कथमन्नजोऽन्नात्माऽन्नप्रलयोऽहं तस्मादन्न ब्रह्मेति । कुत पुन. सर्वान्नप्राप्तिफलमन्नात्मोपासनमित्युच्यते । अन्नं हि भूतानां ज्येष्ठम् । भूतेभ्यः पूर्व निष्पन्नत्वाज्ज्येष्ठं हि यस्मात्तस्मात्सर्वौषधमुच्यते । तस्मादुपपन्ना सर्वान्नात्मोपासकस्य सर्वान्नप्राप्ति । अन्नाद्भूतानि जायन्ते । जातान्यन्नेन वर्धन्त इत्युपसहारार्थं पुनर्वचनम् । इदानीमन्ननिर्वचनमुच्यते । अद्यते भुज्यते चैव यद्भूतैरन्नमत्ति च भूतानि स्वयं तस्माद्भूतैर्भुज्यमानत्वाद्भूतभोक्तृत्वाच्चान्नं तदुच्यते । इतिशब्द प्रथमकोशपरिसमाप्त्यर्थः ॥

अर्थ--अन्न ब्रह्म आहे, अशी उपासना करणाराला कोणतें फळ मिळतें तें सागतात. ते त्या समस्त अन्न जाताला प्राप्त होतात. कोण ? तर जे अन्न वर सागितलेल्या प्रकारचें ब्रह्म आहे, अशी उपासना करितात ते कशी उपासना करितात, तर मी अन्नापासुन झालेला, अन्नरूप व अन्नात प्रलय पावणारा आहें. त्यामुळें अन्न ब्रह्म आहे, अशी उपासना करितात. पण ' अन्नच आत्मा ब्रह्म

आहे, अशी उपासना सर्वान्नप्राप्ति हें फळ देणारी आहे, असें का ह्मटलें आहे? ( ह्मणून विचाराल तर सांगतों ) कारण अन्न भूतांचें ज्येष्ठ (कारण) आहे. भूतांच्या पूर्वी निष्पन्न झालेलें असल्यामुळें ज्याअर्थी अन्न ज्येष्ठ आहे त्याअर्थी त्याला सर्वौषध ह्मटलें जातें. त्यामुळें सर्वान्नच आत्मा आहे, अशी उपासना करणाराला सर्वान्नप्राप्ति होणें उपपन्न आहे. अन्नापासून भूतें उत्पन्न होतात. उत्पन्न झालेलीं तीं अन्नानें वाढतात. हें उपसंहारासाठीं पुनर्वचन आहे. आतां अन्नाचें निर्वचन-व्युत्पत्ति सांगतात—जें भूताकडून खाल्लें जातें तें अन्न; त्याचप्रमाणें तें अन्न स्वतः भूतांना खातें. यास्तव भूताकडून खाल्लें जात असल्यामुळें व भूतांना खाणारें असल्यामुळें त्याला अन्न असें ह्मटलें जातें. श्रुतींतील शेवटचा इतिशब्द प्रथम काण्डाच्या परिसमाप्तीकरितां आहे.

अन्नमयादिभ्य आनन्दमयान्तेभ्य आत्मभ्योऽभ्यन्तरतमं ब्रह्म विद्यया प्रत्यगात्मत्वेन दिदर्शयिषु शास्त्रमविद्याकृतपञ्चकोशापनयनेनानेकतुषकोद्रवधितुषीकरणेनेव तदन्तर्गततण्डुलान्प्रस्तौति तस्माद्वा एतस्मादन्नरसमयादित्यादि ॥

अर्थ—ज्याच्यावर अनेक सालें आहेत अशा भाताला कुटून जसें तुषरहित करितात व त्यांतील तांदुळ बाहेर काढतात त्याप्रमाणें अविद्याकृत पंचकोशांचें अपनयन करून अन्नमयादिकांपासून आनंदमयापर्यंत जे कल्पित आत्मे आहेत त्यांच्या अतिशय आंत असलेलें ब्रह्म विद्येच्या योगानें प्रत्यगात्मरूपानें दाखविण्याची इच्छा करणारें शास्त्र ( ह्म० सर्वान्तर ब्रह्मच प्रत्यगात्मा आहे, असें विद्येच्या योगानें दाखविण्याची इच्छा करणारें शास्त्र ) ' तस्माद्वा एतस्मादन्नरसमयात् ' इत्यादि वाक्यास आरंभ करतें

तस्माद्वा एतस्मादन्नरसमयात् । अन्योऽन्तर आत्मा प्राणमयः । तेनैष पूर्णः ।

तस्मादेतस्माद्यथोक्तादन्नरसमयात्पिण्डादन्यो व्यतिरिक्तोऽन्तरोऽभ्यन्तर आत्मा पिण्डवदेव मिथ्यापरिकल्पित आत्मत्वेन प्राण-

मय' प्राणा वायुस्तन्मयस्तत्प्राय' । तेन प्राणमयेनान्नरसमय आत्मैष पूर्णो वायुनेव दृतिः ॥

अर्थ—त्या या पूर्वोक्त अन्नरसमय पिंडाहून निराळा, त्यात अस णारा व या स्थूल पिंडाप्रमाणेंच आत्मत्वानें मिथ्या कल्पिलेला अन्तर आत्मा प्राणमय आहे प्राण ह्म० वायु तन्मय ह्म० तत्प्राय ( ह्म० ज्यात वायूचें बाहुल्य आहे, असा ) त्या प्राणमय आत्म्याच्या योगानें हा अन्न- मय आत्मा पूर्ण आहे ह्म० वायूच्या योगानें जशी चामड्याची पिशवी ( भाता ) पूर्ण—भरलेली असते ( तसा स्थूळ पिंड प्राणमयानें पूर्ण आहे )

स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् । अन्वयं पुरुष- विधः । तस्य प्राण एव शिरः । व्यानो दक्षिणः पक्षः । अपान उत्तरः पक्षः । आकाश आत्मा । पृथिवी पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ।

इति ब्रह्मवल्ल्यध्याये द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥

स वा एष प्राणमय आत्मा पुरुषविध एव पुरुषाकार एव । शिरःपक्षादिभिः किं स्वत एव, नेत्याह । प्रसिद्धं तावदन्नरसमय स्याऽऽत्मनः पुरुषविधत्वम् । तस्यान्नरसमयस्य पुरुषविधता पुरुषा कारताम् । अन्वयं प्राणमयः पुरुषविधो मूषानिषिक्तप्रतिमावन्न स्वत एव । एवं पूर्वस्य पूर्वस्य पुरुषविधतामनूत्तरोत्तरः पुरुषविधो भवति पूर्वः पूर्वश्चोत्तरोत्तरेण पूर्णः । कथं पुनः पुरुषविधताऽस्येत्यु च्यते । तस्य प्राणमयस्य प्राण एव शिरः प्राणमयस्य वायुविका- रस्य प्राणो मुखनासिकानिःसरणो वृत्तिविशेषः शिर एव परिक ल्प्यते वचनात् । सर्वत्र वचनादेव पक्षादिकल्पना । व्यानो व्यान वृत्तिर्दक्षिणः पक्षः । अपान उत्तरः पक्षः । आकाश आत्मा य आका शस्था वृत्तिविशेषः समानाख्यः स आत्मेवाऽऽत्मा प्राणवृत्त्यधि कारात् । मध्यस्थत्वादितराः पर्यन्ता वृत्तीरपेक्ष्याऽऽत्मा । "मध्य ह्येषामङ्गानामात्मा" इतिश्रुतिप्रसिद्धं मध्यमस्थस्याऽऽत्मत्वम् । पृथिवी पुच्छं प्रतिष्ठा । पृथिवीति पृथिवी देवताऽऽध्यात्मिकस्य प्राणस्य धारयित्री स्थितिहेतुत्वात् । सैषा पुरुषस्यापानमय

प्रभ्य " इति हि श्रुत्यन्तरम् । अन्यथोदानवृत्त्योर्ध्वगमनं गुरुत्वाच्च पतनं वा स्याच्छरीरस्य तस्मात्पृथिवी देवता पुच्छं प्रतिष्ठा प्राणमयस्याऽऽत्मनः । तत्तस्मिन्नेवार्थे प्राणमयात्मविषय एष श्लोको भवति । इति शांकरभाष्ये द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥

अर्थ—तो हा प्रसिद्ध प्राणमय आत्मा पुरुषविधच ह्म० पुरुषाकारच आहे. ह्म० तो काय शिर, पक्ष इत्यादि अवयवांनीं स्वतःच युक्त आहे? नाहीं, असें श्रुति सांगते. अन्नरसमय आत्म्याचें पुरुषविधत्व तर प्रसिद्ध आहे. त्या अन्नरसमय पुरुषविधतेच्या-पुरुषाकारतेच्या-अनुसार हा प्राणमय पुरुषाकार झाला आहे. मुशींत ओतलेल्या रसाची जशी प्रतिमा होते ( त्याप्रमाणें तो पुरुषाकार झाला आहे ) स्वतः नव्हे. अशा रीतीनें पूर्व पूर्व कोशाच्या पुरुषाकाराच्या अनुसार पुढचा पुढचा कोश पुरुषाकार होतो, व पूर्व पूर्व कोश पुढच्या पुढच्या कोशानें पूर्ण आहे. पण याला पुरुषाकारता कशी आहे, ह्मणून विचाराल तर सांगतों—त्या प्राणमय कोशाचें प्राण हेंच शिर आहे. प्राणमय ह्म० वायूचा विकार असा जो कोश त्याचें—मुख व नासिका यांतून बाहेर पडणारी प्राण या नावाची एक विशेष वृत्ति,—हेंच शिर आहे, अशी या श्रुतिवचनावरून कल्पना केली जाते. केवल येथेंच नव्हे तर पुढच्या सर्व कोशांमध्येंही श्रुतिवचनावरूनच पक्षादिकांची कल्पना केली जाते व्यान ह्मणजे वायूची व्यानवृत्ति. हा प्राणमयाचा दक्षिण पक्ष आहे. अपान उत्तर पक्ष आहे आकाश हा त्याचा आत्मा आहे ह्म०समान या नावाची जी एक प्रकारची आकाशस्थ वृत्ति ती जणुकाय त्या प्राणमय कोशाच्या आत्म्यासारखीच आहे. कारण प्राणवृत्तींचें हें प्रकरण आहे. (त्यामुळें श्रुतींतील आकाशशब्दानें आकाशस्थ समान संज्ञक वृत्ति घ्यावी.) त्याचप्रमाणें समान ही वृत्ति इतर आसपासच्या वृत्तींच्या अपेक्षेनें मध्यवर्ती आहे. त्यामुळें ती त्यांचा आत्मा आहे. मध्य प्रदेशीं असलेल्या अंगाचें आत्मत्व 'या अंगाचा मध्य हाच आत्मा आहे,' या श्रुतीवरून प्रसिद्ध आहे. पृथिवी प्राणमयाचें पुच्छ व प्रतिष्ठा आहे. पृथिवी या शब्दानें पृथिवी देवता घ्यावी. ती आध्यात्मिक ह्म० शरीरातील

प्राणाचें धारण करणारी आहे. कारण ती त्याच्या स्थितीचें निमित्त आहे. ' ती पृथिवीदेवताच या पुरुषाच्या अपान वृत्तीचें आकर्षण करून, तिला आपल्या अधीन करून घेऊन ( शरीरावर अनुग्रह करीत राहते. कारण तिनें जर त्याच्यावर तसा अनुग्रह केला नसता तर शरीर जडपणामुळें पडलें असतें किंवा पोकळींत कोणीकडे तरी गेलें असतें ) ' अशी दुसरी श्रुति आहे. कारण ती देवता जर प्राणाचें धारण करीत नसती तर उदान-वृत्तीमुळें शरीराचें ऊर्ध्वगमन झालें असतें किंवा गुरुत्वामुळें तें पडलें असतें. तस्मात् पृथिवी देवता प्राणमय आत्म्याचें पुच्छ–प्रतिष्ठा आहे त्याचअर्थी ह्म० या प्राणमय आत्म्याविषयीं हा पुढील श्लोक आहे. ( इति ब्रह्मवल्ल्य-ध्याये द्वितीयोऽनुवाकः । ) २

---

प्राणं देवा अनु प्राणन्ति । मनुष्याः पशवश्च ये । प्राणो हि भूतानामायुः । तस्मात्सर्वायुषमुच्यते । सर्वमेव त आयुर्यन्ति । ये प्राणं ब्रह्मोपासते । प्राणो हि भूतानामायुः । तस्मात्सर्वायुषमुच्यत इति । तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य ।

प्राणं देवा अनु प्राणन्ति । देवा अग्न्यादयः प्राणं वाय्वा-त्मानं प्राणनशक्तिमन्तमनु तदात्मभूताः सन्तः प्राणन्ति प्राणनकर्म कुर्वन्ति प्राणनक्रियया क्रियावन्तो भवन्ति । अध्यात्माधिकारा-द्वा इन्द्रियाणि प्राणमनु प्राणन्ति मुख्यप्राणमनु चेष्टन्त इति वा । तथा मनुष्याः पशवश्च ये ते प्राणनकर्मणैव चेष्टावन्तो भवन्ति । अतश्च नान्नमयेनैव परिच्छिन्नेनाऽऽत्मनाऽऽत्मवन्तः प्राणिनः । किं तर्हि तदन्तर्गतेन प्राणमयेनापि साधारणेनैव सर्वपिण्डव्यापि-नाऽऽत्मवन्तो मनुष्यादयः । एवं मनोमयादिभिः पूर्वपूर्वव्यापिभिरु-त्तरोत्तरैः सूक्ष्मैरानन्दमयान्तैराकाशादिभूतारब्धैरविद्याकृतैरात्म-वन्तः सर्वे प्राणिनः । तथा स्वाभाविकेनाऽऽप्याकाशादिकारणेन नित्येनाविकृतेन सर्वगतेन सत्यज्ञानानन्तलक्षणेन पञ्चकोशातिगेन सर्वात्मनाऽऽत्मवन्तः । स हि परमार्थत आत्मा सर्वेषामित्येतदप्य-

र्थादुक्तं भवति। प्राणं देवा अनु प्राणन्तीत्युक्तं तत्कस्मादित्याह। प्राणो हि यस्माद्भूतानां प्राणिनामायुर्जीवनम्। "यावद्ध्यस्मिञ्शरीरे प्राणो वसति तावदायुः" इति श्रुत्यन्तरात्। तस्मात्सर्वायुषम्। सर्वेषामायुः सर्वायुः सर्वायुरेव सर्वायुषमित्युच्यते। प्राणापगमे मरणप्रसिद्धेः। प्रसिद्धं हि लोके सर्वायुष्ट्वं प्राणस्य। अतोऽस्माद्बाह्यादसाधारणादन्नमयादात्मनोऽपक्रम्यान्तः साधारणं प्राणमयमात्मानं ब्रह्मोपासते येऽहमस्मि प्राणः सर्वभूतानामात्माऽऽयुर्जीवनहेतुत्वादिति ते सर्वमेवाऽऽयुरस्मिँल्लोके यन्ति नापमृत्युना म्रियन्ते प्राक्प्राप्तादायुष इत्यर्थः। शतं वर्षाणीति तु युक्तं सर्वमायुरिति श्रुतिप्रसिद्धेः। किं कारणं प्राणो हि भूतानामायुस्तस्मात्सर्वायुषमुच्यत इति। यो यद्गुणकं ब्रह्मोपास्ते स तद्गुणभाग्भवतीति विद्याफलप्राप्तेर्हेत्वर्थं पुनर्वचनं प्राणो हीत्यादि। तस्य पूर्वस्यान्नमयस्यैष एव शरीरेऽन्नमये भवः शारीर आत्मा। कः। य एष प्राणमयः॥

अर्थ—आग्न्यादिक देव वायुरूप प्राणन शक्तीनें युक्त असलेल्या प्राणाच्या अनुसार तद्रूप होत्साते प्राणन–कर्म करितात. प्राणन–क्रियेनें (प्रकृष्ट–अतिशय गति म्ह० बाहेर येणें ह्या क्रियेनें) क्रियावान् होतात. किंवा हें अध्यात्मप्रकरण असल्यामुळें 'देवाः' म्ह० इंद्रियें प्राणाच्या अनुसार, मुख्य प्राणाच्या मागून चेष्टा करितात, असा अर्थ समजावा. त्याचप्रमाणें जे मनुष्य व पशू ते प्राणनकर्मानेंच चेष्टायुक्त होतात. त्यामुळें केवळ परिच्छिन्न अन्नमय आत्म्यानेंच प्राणी आत्मवान् नसतात, तर त्यांतील साधारण अशाच सर्व पिंडव्यापी प्राणमयानेंही मनुष्यादिक आत्मवान् असतात. अशाच प्रकारें–पूर्वपूर्वव्यापी, उत्तरोत्तर सूक्ष्म, व आकाशादि भूतांपासून ज्यांचा आरंभ झाला आहे अशा, अविद्याकृत मनोमयादि आनंदमयान्त कोशांच्या योगानें सर्व प्राणी आत्मवन्त झाले आहेत; त्याचप्रमाणें स्वाभाविक अशाही आकाशादिकाचें कारण, नित्य, अविकृत, सर्वगत, सत्यज्ञानानन्तलक्षण, व पंचकोशातीत सर्वात्म्याच्या योगानें आत्मवन्त झाले आहेत; परमार्थतः तोच सर्वांचा आत्मा आहे, हेंही अर्थात् सांगितलें आहे,

असें होतें. देव प्राणाच्या मागून प्राणनक्रिया करितात, असें वर सांगितलें, पण तें कोणत्या कारणानें, तें सांगतात– कारण प्राणच भूतांचें-प्राण्यांचें-आयु ह्म० जीवन आहे. ' जोंवर या शरीरात प्राण राहतो तोंवर आयुष्य असतें' अशा अर्थाची दुसरी श्रुति आहे त्यामुळें त्याला ' सर्वायुष ' असें ह्मणतात सर्वांचें जो आयु तो सर्वायु. सर्वायुलाच येथें ' सर्वायुषं ' असें ह्मटलें आहे. कारण प्राण निघून गेले असता मरण येतें, अशी प्रसिद्धि आहे. त्यामुळें व्यवहारात प्राणाचें ' सर्वायुष्य ' प्रसिद्ध आहे. यास्तव या बाह्य असाधारण अन्नमय आत्म्यापासून अपक्रमण करून ह्म० त्याच्या ठिकाणची आत्मबुद्धि सोडून सर्वेंद्रियसाधारण प्राणमय आत्म्यालाच जे ब्रह्मदृष्ट्या उपासितात ह्म० मी तो प्राण–सर्व भूताचा आत्मा व जीवनाचें कारण असल्यामुळें आयु आहें, अशा प्रकारें जे प्राणाची उपासना करितात ते या लोकीं सर्वच ( पूर्ण ) आयुष्याला प्राप्त होतात. प्राप्त आयुष्याच्या पूर्वी अपमृत्यूनें ते मरत नाहींत, असा याचा इत्यर्थ. येथें शंभर वर्षे, हेंच सर्व आयु आहे, असें समजणें युक्त आहे. कारण ( शतायुर्वै पुरुषः ) अशी श्रुति प्रसिद्ध आहे. प्राणाला सर्वायु समजण्याचें काय कारण? ह्मणून विचाराल तर सांगतो. प्राणच सर्व भूताचें आयुष्य आहे. ह्मणून त्याला ' सर्वायुष ' असें ह्मटलें आहे. जो ज्या गुणानीं युक्त असलेल्या ब्रह्माची उपासना करितो तो त्या गुणाला पात्र होतो, असा प्रकार असल्यामुळें विद्याफलप्राप्तीच्या हेतूकरिता ' प्राणो हि भूताना आयु. ' हें पुनर्वचन आहे. त्या पूर्व अन्नमयाचा हाच शरीरात–अन्नमयात–होणारा शारीर आत्मा आहे. तो कोण, तर जो हा प्राणमय.

तस्माद्वा एतस्मात्प्राणमयात् । अन्योऽन्तर आत्मा मनोमयः । तेनैष पूर्णः । स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् । अन्वयं पुरुषविधः । तस्य यजुरेव शिर । ऋग्दक्षिण. पक्षः । सामोत्तरः पक्षः । आदेश आत्मा । अथर्वाङ्गिरसः पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ॥

इति ब्रह्मानन्दवल्ल्यां तृतीयोऽनुवाकः ।

तस्माद्वा एतस्मादित्युक्तार्थमन्यत् । अन्योऽन्तर आत्मा मनोमयः । मन इति संकल्पाद्यात्मकमन्तःकरणं तन्मयो मनोमयो यथाऽन्नमयः । सोऽयं प्राणमयस्याऽऽभ्यन्तर आत्मा । तस्य यजुरेव शिरः । यजुरित्यनियताक्षरपादावसानो मन्त्रविशेषस्तज्जातीयवचनो यजुःशब्दस्तस्य शिरस्त्वं प्राधान्यात् । प्राधान्यं च यागादौ संनिपत्योपकारात् । यजुषा हि हविर्दीयते स्वाहाकारादिना । वाचनिकी वा शिरआदिकल्पना सर्वत्र । मनसो हि स्थानप्रयत्ननादस्वरवर्णपदवाक्यविषया तत्संकल्पात्मिका तद्भाविता वृत्तिः श्रोत्रादिकरणद्वारा यजुःसंकेतविशिष्टा यजुरित्युच्यते । एवमृगेवं साम च । एवं च मनोवृत्तित्वे मन्त्राणां वृत्तिरेवाऽऽवर्त्यत इति मानसो जप उपपद्यते । अन्यथाऽविषयत्वान्मन्त्रो नाऽऽवर्तयितुं शक्यो घटादिवदिति मानसो जपो नोपपद्यते । मन्त्रावृत्तिश्च चोद्यते बहुशः कर्मसु । अक्षरविषयस्मृत्यावृत्त्या मन्त्रावृत्तिः स्यादिति चेन्न । मुख्यार्थासंभवात् । " त्रिः प्रथमामन्वाह त्रिरुत्तमाम् " इति ऋगावृत्तिः श्रूयते । तत्रर्चोऽविषयत्वे तद्विषयस्मृत्यावृत्तौ च क्रियमाणायां त्रिः प्रथमामन्वाहेति ऋगावृत्तिर्मुख्योऽर्थोऽदितः परित्यक्तः स्यात् । तस्मान्मनोवृत्त्युपाधिपरिच्छिन्नं मनोवृत्तिनिष्ठमात्मचैतन्यमनादिनिधनं यजुःशब्दवाच्यमात्मविज्ञानं मन्त्रा इति । एवं च नित्यत्वोपपत्तिर्वेदानाम् । अन्यथा विषयत्वे रूपादिवदनित्यत्वं च स्यान्नैतद्युक्तम् । " सर्वे वेदा यत्रैकं भवन्ति स मानसीन आत्मा " इति च श्रुतिर्नित्यात्मनेकत्वं ब्रुवत्यृगादीनां नित्यत्वे समञ्जसा स्यात् । " ऋचो अक्षरे परमे व्योमन्यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः " इति च मन्त्रवर्णः । आदेशोऽत्र ब्राह्मणम् । अतिदेष्टव्यविशेषानतिदिशतीति । अथर्वाङ्गिरसा च दृष्टा मन्त्रा ब्राह्मणं च शान्तिकपौष्टिकादिप्रतिष्ठाहेतुकर्मप्रधानत्वात्पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति मनोमयात्मप्रकाशकः पूर्ववत् । *इति शांकरभाष्ये तृतीयोऽनुवाकः ॥ ३ ॥*

अर्थ—' तस्माद्वा एतस्मात्० ' इत्यादि इतर पदांचा अर्थ वर सांगितला आहे. दुसरा अन्तर आत्मा मनोमय आहे. मन म्हणजे संकल्पादिरूप

अन्तःकरण, तन्मय ह्म॰ मनोमय जसा अन्नमय त्याप्रमाणें तो हा प्राणम याचा अभ्यंतर आत्मा आहे. त्याचें यजु हच शिर आहे ज्याच्या पादांची समाप्ति अनियत अक्षरांनीं होते तशा प्रकारचा विशेष मन्त्र हाच 'यजु' होय त्याच्या जातीच्या शब्दाचा उल्लेख करणारा यजु शब्द आहे त्याला प्राधान्यामुळें शिरस्त्व आहे यागादिकामध्यें संनिपत्य उपकारामुळें त्याला प्राधान्य आहे ( अंगें दोन प्रकारचीं असतात एक संनिपत्य उपकारक व दुसरीं अरात् उपकारक त्यांतील जीं अंगें साक्षात् किंवा परंपरेनें प्रधान यागाचें शरीर निष्पन्न करून त्याच्या द्वारा अपूर्वाच्या उपयोगी असतात तीं संनिपत्य उपकारक होत यजुर्मंत्र यागशरीरनिष्पन्न करणारे आहेत ) कारण यजुर्मंत्रानच स्वाहाकारादिकांच्या योगानें हवी दिला जातो अथवा या सर्व पर्यायात शिर इत्यादिकांची कल्पना वाचनिक आहे ( वाचनिक ह्म॰ वचनप्रामाण्यामुळेंच, श्रुतीचें तसें वचन आहे, ह्मणून अहो पण यजु ह्म॰ बाह्य यजुर्वेद–तो आन्तर मनोमयाचें शिर कसा असेल? अशी आशंका घेऊन सांगतात– ) स्थान, प्रयत्न, नाद, स्वर, वर्ण, पद, वाक्य, एतद्विषयक, त्याच्या संकल्पात्मक, त्यांनीं भावित झालेली, श्रोत्रादि इंद्रियांच्या द्वारा उत्पन्न होणारी व 'यजु' या शब्दसंकेतानें युक्त असलेली अशी जी मनाची वृत्ति तिला 'यजु' असें येथें ह्मटलें जातें अशीच या श्रुतिवचनांतील ऋग ही वृत्ति व साम ही वृत्ति आहे ( ह्म॰ यजुःशब्द बाह्य शब्द राशीमध्यें जरी रूढ असला तरी श्रुतीविषयीं अति शंका घेणें युक्त नसल्यामुळें 'यजु–' शब्दाच्या, संकेताचा विषयभूत, व संकल्परूप विशिष्ट मनोवृत्तिच येथें यजुःशब्दानें घ्यावी. आह्मीं यजुर्वेदाचें अध्ययन करावें, असा असा क्रमानें युक्त असलेल्या वर्णांचें यजुर्वेदरूपानें अध्ययन करावें इत्यादि प्रकारचे संकल्प हेंच त्या वृत्तीचें रूप जाणावें ) अशा रीतीनें मंत्रांना मनोवृत्तित्व आहे, असें जाणलें ह्मणजे वृत्तीचीच आवृत्ति केली जाते, आणि त्यामुळें मानस जप उत्पन्न होतो नाहीं तर ( ह्म॰ मंत्र घटादिकांप्रमाणें बाह्य द्रव्यरूप आहे असें समजल्यास ) मंत्र मनाचा विषयच होत नसल्यामुळें

घटादिकांप्रमाणेंच त्याची आवृत्ति करतां येणार नाहीं; आणि त्यामुळें मानस जप उपपन्न होणार नाहीं. पण कर्मामध्यें तर बहुत प्रकारें मंत्राची आवृत्ति करावयास सांगितलें आहे. अक्षरविषयक स्मृतीच्या आवृत्तीनें मंत्राची आवृत्ति होते, ह्मणून जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण तसें समजल्यास 'मंत्राची आवृत्ति करावी' या मुख्य अर्थाचा असंभव होतो. 'तीनदा प्रथम ऋचेची आवृत्ति करतो व तीन वेळा शेवटच्या ऋचेचें अन्वाख्यान करतो' अशा अर्थाच्या ब्राह्मण वाक्यांत ऋचेची आवृत्ति सांगितली आहे. (अध्वर्यु जेव्हां सामिधेन्य समिधांचा होम करतो तेव्हा 'प्र वो वाजा अभिद्यवः०' इत्यादि अठरा ऋचांचें सूक्त ह्मटलें जातें. त्यांतील पहिल्या व शेवटच्या ऋचांची तीनदा आवृत्ति करावयास सांगितलें आहे.) पण त्या ठिकाणीं बाह्य अक्षरात्मक ऋचा मनाचा विषय होणाऱ्या नाहींत. ह्मणून तद्विषयक स्मृतीची आवृत्ति जर करूं लागलें तर 'तीन वेळ पहिली ऋचा ह्मणतो' इत्यादि प्रकारें ऋचेची आवृत्ति हा जो मुख्य अर्थ सांगितला आहे तो सोडल्यासारखें होईल. यास्तव मनोवृत्तिरूप उपाधीनें परिच्छिन्न, मनोवृत्तिनिष्ठ, अनादिनिधन, आत्मचैतन्य हेंच यजुःशब्दवाच्य आत्मविज्ञानच मंत्र आहेत. अशा रीतीनेंच वेदांच्या नित्यत्वाची उपपत्ति लागते. कारण त्या वृत्तीला स्वप्रकाश चिदात्मत्व आहे, असें जर न मानलें तर रूपादिकांप्रमाणें वेदाला विषयत्व आहे, असें होऊन अनित्यत्व प्राप्त होईल. पण तें युक्त नव्हे. कारण 'सर्व वेद ज्यामध्यें एकरूप होतात तो साक्षिरूपानें मनांत असणारा आत्मा होय.' ऋग्वेदादिकांचें नित्य आत्म्याशीं एकत्व आहे, असें सांगणारी श्रुति ऋग्वेदादिकांना नित्यत्व असलें तरच समंजस होईल. 'ज्यामध्यें सर्व देव असतात त्या अक्षर व आकाशकल्प परब्रह्मामध्यें विधिनिषेधरूप ऋचा तादात्म्यानें व्यवस्थित आहेत,' असें सांगणारा मंत्र आहे. असो. आदेश मनोमय कोशाचा आत्मा आहे. येथें आदेश ह्म० ब्राह्मण. हेंच कर्तव्य आहे, अशा रीतीनें कर्तव्याचे विशेष तो सांगतो; उपदेशितो ह्मणून तो आदेश होय. अथर्वाङ्गिरसानें पाहिलेले मंत्र व ब्राह्मण हेंच पुच्छ प्रतिष्ठा आहे. कारण तो भाग शान्तिक-

पौष्टिकादि प्रतिष्ठेला कारण होणारें जें कर्म तत्प्रधान आहे. पूर्वीप्रमाणेच त्या अर्थीही ह्म० मनोमय आत्म्याचा प्रकाशक असा हा श्लोक आहे. ( इति ब्रह्मवल्ल्यध्याये तृतीयोऽनुवाक ) ३

---

यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह । आनन्द ब्रह्मणो विद्वान् । न बिभेति कदाचनेति । तस्यैष एव शारीर आत्मा । य. पूर्वस्य । तस्माद्वा एतस्मान्मनोमयात् । अन्योऽन्तर आत्मा विज्ञानमय । तेनैष पूर्ण । स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् । अन्वय पुरुषविध ।

यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सहेत्यादि । तस्य पूर्वस्य प्राणमयस्यैष एवाऽऽत्मा शारीर शरीरे प्राणमये भव शारीर. । क । य एष मनोमय. । तस्माद्वा एतस्मादित्यादि पूर्ववत्। अन्योऽन्तर आत्मा विज्ञानमयो मनोमयस्याऽऽभ्यन्तरो विज्ञान मय. । मनोमयो वेदात्मोक्त । वेदार्थविषया बुद्धिर्निश्चयात्मिका विज्ञान तच्चाध्यवसायलक्षणमन्त करणस्य धर्म । तन्मयो निश्चय-विज्ञानै. प्रमाणस्वरूपैर्निर्वर्तित आत्मा विज्ञानमय । प्रमाणविज्ञानपूर्वका हि यज्ञादिस्तायते । यज्ञादिहेतुत्व च वक्ष्यति श्लोकेन ॥

अर्थ—ज्याच्यापासन वाणी मनासह त्याला प्राप्त न होता निवृत्त होतात त्या मनोमय ब्रह्माच्या उपासनाफलभूत आनन्दाला जाणणारा पुरुष गर्भवासादि कोण याही, दुःखाला भीत नाहीं. त्या पूर्व प्राणमयाचा हाच शारीर आत्मा आहे. जो प्राणमय शरीरात होणारा तो शारीर तो कोण तर जो हा मनोमय ' *तस्माद्वा एतस्मात्०* ' *इत्यादि पूर्वीप्रमाणेंच जाणावें.* ( ह्म० त्या या मनोमयाहून ) दुसरा अन्तर आत्मा विज्ञानमय, मनोमयाचा अभ्यंतर विज्ञानमय आहे. मनोमय वेदात्मा, वेदरूप आहे, असें वर सांगि तलें आहे वेदाच्या अर्थविषयींची निश्चयात्मिका बुद्धि हेंच विज्ञान आहे. त निश्चयरूप विज्ञान अन्त करणाचा धर्म आहे. ( येथें निश्चयरूप

लौकिकज्ञानही घ्यावें. ) तन्मय ह्म० प्रमाणस्वरूप निश्चयविज्ञानांनीं झालेला जो आत्मा तो विज्ञानमय. प्रमाणविज्ञानपूर्वकच ( ह्म० प्रमाणाचें विज्ञान असलें ह्मणजेच ) यज्ञादिकांचें अनुष्ठान होतें. पुढें श्लोकानें 'विज्ञान' यज्ञादिकांचें कारण आहे, असें सांगतील.

तस्य श्रद्धैव शिरः । ऋतं दक्षिणः पक्षः । सत्यमुत्तरः पक्षः । योग आत्मा । महः पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ।

इति ब्रह्मवल्ल्यध्याये चतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥

निश्चयविज्ञानवतो हि कर्तव्येष्वर्थेषु पूर्वं श्रद्धोत्पद्यते । सा सर्वकर्तव्यानां प्राथम्याच्छिर इव शिरः । ऋतसत्ये यथाव्याख्याते एव । योगो युक्तिः समाधानम् । आत्मेवाऽऽत्मा । आत्मवतो हि युक्तस्य समाधानवतोऽङ्गानीव श्रद्धादीनि यथार्थप्रतिपत्तिक्षमाणि भवन्ति । तस्मात्समाधानं योग आत्मा विज्ञानमयस्य । मह पुच्छं प्रतिष्ठा । मह इति महत्तत्त्वं प्रथमजम् । "महद्यक्षं प्रथमजम्" इति श्रुत्यन्तरात् । पुच्छं प्रतिष्ठाकारणत्वात् । कारणं हि कार्याणां प्रतिष्ठा । यथा वृक्षवीरुधां पृथिवी । सर्वबुद्धिविज्ञानानां च महत्तत्त्वं कारणम् । तेन तद्विज्ञानमयस्याऽऽत्मनः प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति पूर्ववत् । यथाऽन्नमयादीनां ब्राह्मणोक्तानां प्रकाशकाः श्लोका एवं विज्ञानमयस्यापि ॥

इति शांकरभाष्ये चतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥

अर्थ—निश्चय ज्ञानवान् पुरुषाचे ठिकाणींच पूर्वी कर्तव्य विषयांविषयीं श्रद्धा उत्पन्न होते. ती सर्व कर्तव्याच्या आरंभीं अवश्य लागते, त्यामुळें ती जणुकाय 'शिर' आहे. ऋत व सत्य याचा अर्थ पूर्वी जसा सांगितला आहे, तसाच जाणावा. योग ह्म० युक्ति–समाधान. तोच जणुकाय आत्मा आहे. आत्मवान् जो योगी ह्म० समाधानवान् त्याचीं श्रद्धादिक जणुंकाय अंगें असुन तीं यथार्थ ज्ञानाला समर्थ होतात. ( किंवा समाधानवान् पुरुषाच्या अंगाप्रमाणें श्रद्धादिक यथार्थ ज्ञानाला समर्थ होतात. ) वास्तव

समाधान ह्मणजे योग, हा विज्ञानमयाचा आत्मा आहे. मह हें त्याचें पुच्छ व प्रतिष्ठा आहे. 'मह' या शब्दानें प्रथमज महत्तत्त्व घ्यावें. 'महत् यक्ष-पूज्य प्रथम उत्पन्न झालेलें' अशी दुसरी श्रुति आहे. तें प्रतिष्ठेचें कारण असल्यामुळें पुच्छ होय. कारण कोणतेंही कारणच कार्याची प्रतिष्ठा असते. जशी वृक्ष, वेलीं इत्यादिकांची प्रतिष्ठा पृथिवी आहे. सर्व बुद्धिविज्ञानांचें कारण महत्तत्त्व आहे. त्यामुळें तें विज्ञानमय आत्म्याची प्रतिष्ठा आहे. पूर्वी-प्रमाणेंच त्या अर्थीही हा श्लोक आहे. ह्म० ज्याप्रमाणें ब्राह्मणोक्त अन्नमया-दिकांचे प्रकाशक श्लोक वर आहेत त्याचप्रमाणें विज्ञानमयाचाही हा श्लोक आहे. ( इति ब्रह्मवल्ल्यध्याये चतुर्थोऽनुवाकः ) ४

---

विज्ञानं यज्ञं तनुते । कर्माणि तनुतेऽपि च । विज्ञानं देवाः सर्वे । ब्रह्म ज्येष्ठमुपासते । विज्ञानं ब्रह्म चेद्वेद । तस्माच्चेन्न प्रमाद्यति । शरीरे पाप्मनो हित्वा । सर्वान्कामान्त्समश्नुत इति ।

विज्ञानं यज्ञं तनुते । विज्ञानवान्हि यज्ञं तनोति श्रद्धादिपूर्व-कम् । अतो विज्ञानस्य कर्तृत्वं तनुत इति कर्माणि च तनुते । यस्मा-द्विज्ञानकर्तृकं सर्वं तस्माद्युक्तं विज्ञानमय आत्मा ब्रह्मेति । किंच विज्ञानं ब्रह्म सर्वे देवा इन्द्रादयो ज्येष्ठं प्रथमजत्वात्सर्वप्रवृत्तीनां वा तत्पूर्वकत्वात्प्रथमजं विज्ञानं ब्रह्मोपासते ध्यायन्ति तस्मिन्वि-ज्ञानमये ब्रह्मण्यभिमानं कृत्वोपासत इत्यर्थः । तस्मात्ते महतो ब्रह्मण उपासनाज्ज्ञानैश्वर्यवन्तो भवन्ति । तच्च विज्ञानं ब्रह्म चेद्यदि वेद विजानाति न केवलं वेदैव तस्माद्ब्रह्मणश्चेन्न प्रमाद्यति । बाह्ये-ष्वनात्मस्वात्मभावितत्वात्प्राप्तं विज्ञानमये ब्रह्मण्यात्मभावनायाः प्रमदनं तन्निवृत्त्यर्थमुच्यते तस्माच्चेन्न प्रमाद्यतीति । अन्नमयादि-ष्वात्मभावं हित्वा केवले विज्ञानमये ब्रह्मण्यात्मत्वं भावयन्नास्ते चेदित्यर्थः । ततः किं स्यादित्युच्यते—शरीरे पाप्मनो हित्वा । शरीराभिमाननिमित्ता हि सर्वे पाप्मानस्तेषां च विज्ञानमये ब्रह्म-

ण्यात्माभिमानान्निमित्तापाये हानमुपपद्यते । छत्रापाय इव च्छायापायः । तस्माच्छरीराभिमाननिमित्तान्सर्वान्पाप्मनः शरीरप्रभवाञ्छरीर एव हित्वा विज्ञानमयब्रह्मस्वरूपापन्नस्तत्स्थान्सर्वान्कामान्विज्ञानमयेनैवाऽऽत्मना समश्नुते सम्यग्भुङ्क्त इत्यर्थः ।

अर्थ—विज्ञानच यज्ञ करतें. विज्ञानवान् पुरुषच श्रद्धादिपूर्वक यज्ञाचा विस्तार करतो. यास्तव विज्ञानाला कर्तृत्व आहे. 'तनुते' ह्म० कर्मांचा विस्तार करतें. ज्या अर्थी सर्व विज्ञानकर्तृक आहे त्या अर्थी विज्ञानमय आत्मा ब्रह्म आहे, असें ह्मणणें युक्त आहे. तसेंच, इंद्रादि सर्व देव विज्ञान ब्रह्म, कीं जें प्रथम उत्पन्न झालेलें असल्यामुळें ज्येष्ठ आहे किंवा सर्व प्रवृत्ति तत्पूर्वक असल्यामुळें प्रथमज आहे तें विज्ञान ब्रह्म उपासितात; त्याचें ध्यान करितात. त्या विज्ञानमय ब्रह्माचे ठिकाणीं अभिमान धरून ह्म० तेंच मी आहें, अशी उपासना करितात, असा याचा अर्थ. त्यामुळें ह्म० त्या महत् ब्रह्माची उपासना केल्यामुळें ते देवादिक ज्ञानैश्वर्यवान् होतात. तें विज्ञान ब्रह्म आहे, असें जर साधक जाणूं लागला; केवल जाणूं लागला इतकेंच नव्हे तर तो त्या ब्रह्मापासून जर प्रमाद न पावला; बाह्य अनात्म्यांच्या ठिकाणीं आत्म्याची भावना केल्यामुळें विज्ञानमय ब्रह्माविषयींच्या आत्मभावनेपासून प्रमाद पावणें प्राप्त आहे (ह्म० विज्ञानमय ब्रह्म आत्मा आहे, या भावनेपासून च्युत होणें सर्वथा प्राप्तच आहे.) यास्तव त्या प्रमादाची निवृत्ति करण्यासाठीं 'तस्माचेन्न प्रमाद्यति' असें ह्मटलें आहे. अर्थात् अन्नमयादिकांविषयींची आत्मभावना सोडून; केवल विज्ञानमय ब्रह्माचे ठिकाणीं आत्मत्वाची भावना करीत जर राहिला, असा याचा भाव. तर मग काय होतें, तें सांगतों–शरीरांत पापें सोडून कारण शरीराभिमान या निमित्तामुळेंच सर्व पापें लागतात. पण विज्ञानमय ब्रह्मामध्यें आत्माभिमान धरल्यामुळें निमित्ताचाच अभाव झाला असतां त्या पापांचा त्याग करणें युक्त होतें. ह्म० छत्रीचा अभाव झाला असतां जसा छायेचा अभाव होतो, त्याचप्रमाणें (शरीरच आत्मा आहे, अशा प्रकारचा अभिमान सोडला असतां त्या

निमित्तामुळेंच लागणारीं सर्व पापें क्षीण होतात. ) [तस्मात् शरीराभिमान हेंच ज्यांचें निमित्त आहे, अशा शरीरापासून उद्भवलेल्या सर्व पापांना शरीरामध्येंच सोडून विज्ञानमय ब्रह्मस्वरूपास प्राप्त झालेला साधक त्यांतील सर्व कामांस ( भोगांस ) विज्ञानमय आत्म्यानेंच चांगल्या प्रकारें भोगतो, असा याचा अर्थ.

तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य । तस्माद्वा एतस्माद्विज्ञानमयात् । अन्योऽन्तर आत्माऽऽनन्दमयः । तेनैष पूर्णः । स वा एष पुरुषविध एव । तस्य पुरुषविधताम् । अन्वयं पुरुषविधः ।

तस्य पूर्वस्य मनोमयस्यात्मैष एव शरीरे मनोमये भवः शारीरः । कः । य एष विज्ञानमयः । तस्माद्वा एतस्माद्विज्ञानमयादित्युक्तार्थम् । आनन्दमय इति कार्यात्मप्रतीतिरधिकारान्मयट्शब्दाच्च । अन्नादिमया हि कार्यात्मानो भौतिका इहाधिकृताः । तदधिकारपतितश्चायमानन्दमयः । मयट् चात्र विकारार्थे दृष्टः यथाऽन्नमय इत्यत्र । तस्मात्कार्यात्माऽऽनन्दमयः प्रत्येतव्यः । संक्रमणाच्च, आनन्दमयमात्मानमुपसंक्रामतीति वक्ष्यति । कार्यात्मनां च संक्रमणमनात्मनां दृष्टम् । संक्रमणकर्मत्वेन चाऽऽनन्दमय आत्मा श्रूयते । यथाऽन्नमयमात्मानमुपसंक्रामतीति । न चाऽऽत्मन एवोपसंक्रमणम् । अधिकारविरोधादसंभवाच्च । न ह्यात्मनैवाऽऽत्मन उपसंक्रमणं संभवति । स्वात्मनि भेदाभावात् । आत्मभूतं च ब्रह्म । संक्रमितुः शिरआदिकल्पनानुपपत्तेश्च । न हि यथोक्तलक्षण आकाशादिकारणेऽकार्यपतिते शिरआद्यवयवरूपकल्पनोपपद्यते । अदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयने' अस्थूलमनणु' नेति नेति' इत्यादिविशेषापोहश्रुतिभ्यश्च । मन्त्रोदाहरणानुपपत्तेश्च । न हि प्रियशिरआद्यवयवविशिष्टे प्रत्यक्षतोऽनुभूयमान आनन्दमय आत्मनि ब्रह्मणि नास्ति ब्रह्मेत्याशङ्काभावात् " असन्नेव स भवति । असद्ब्रह्मेति वेद चेत् " इति मन्त्रोदाहरणमुपपद्यते । ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठेत्यपि चानुपपन्नं पृथग्ब्रह्मणः प्रतिष्ठात्वेन ग्रहणम् । तस्मात्कार्यपतित एवाऽऽन

न्दमयो न पर एवाऽऽत्माऽऽनन्द इति विद्याकर्मणोः फलं तद्विकार आनन्दमयः। स च विज्ञानमयादन्तरः । यज्ञादिहेतोर्विज्ञानमय-स्यान्तरत्वश्रुतेः । ज्ञानकर्मणोर्हि फलं भोक्त्रर्थत्वादन्तरतमं स्यात् । अन्तरतमश्चाऽऽनन्दमय आत्मा पूर्वेभ्यः । विद्याकर्मणो. प्रियाद्यर्थत्वाच्च। प्रियादिप्रयुक्ते हि विद्याकर्मणी । तस्मात्प्रिया-दीनां फलरूपाणामात्मसंनिकर्षाद्विज्ञानमयस्याऽऽभ्यन्तरत्वमुपप-द्यते प्रियादिवासनानिर्वृत्ता ह्यानन्दमयो विज्ञानमयाश्रित स्वप्न उपलभ्यते ।

अर्थ—त्या पूर्वीच्या मनोमयाचा आत्मा हाच मनोमय शरीरात झालेला शारीर आत्मा आहे हा कोण ? तरु जो हा विज्ञानमय 'तस्माद्वा' इत्यादि या पुढील दोन वाक्य उक्तार्थ आहेत इ० त्याचा अर्थ सांगितला आहे. 'आनन्दमय' या शब्दानें कार्यात्म्याची प्रतीति होते कारण हा अधिकार आरंभ-प्रकरण—कार्यात्म्याच आहे व 'मयट्' (मय) हा शब्द (प्रत्यय) आनंदाला लाविला आहे या अध्यायात अन्नमयादि भौतिक कार्यात्म्याचा आरंभ केलेला आहे त्या अधिकारानच हा आनंदमय पडला आहे. जसा 'अन्नमय' इत्यादि स्थानीं त्याचप्रमाणें आनन्दमय या शब्दा-तीलही मयट् विकार या अर्थी असल्याचें दिसतें यास्तव आनन्दमय हा कार्यात्मा आहे, असें जाणावें. सक्रमणावरूनही तेच ठरतें आनन्दमय आत्म्याशीं उपसक्रान्त होतो, असें पुढें सागणार आहे. कार्यरूप अनात्म्या-चेंच सक्रमण हात असल्याचें दिसतें. सक्रमणाचें कर्म या रूपानें आनन्दमय आत्मा श्रुतींत सांगितला आहे. इ० ज्याप्रमाण अन्नमय आत्म्याला पुरुष प्राप्त होतो, असें सांगितलें आहे, त्याचप्रमाणें आनन्दमय आत्म्याला पुरुष प्राप्त होतो, असें म्हटलें आहे. आत्म्याचेंच काहीं उपसक्रमण सांगितलें नाहीं. कारण तसें मानणें अधिकाराच्या इ० आरंभलेल्या प्रकरणाच्या विरुद्ध आहे व आत्म्याच्या सक्रमणाचा संभवही नाहीं. कारण स्वत च स्वत ला प्राप्त होण्याचा सभव नाहीं. स्वत च्या स्वरूपात भेदाचा अभाव असतो. ब्रह्म तर आत्मभूत आहे. शिवाय जो सक्रमण करणार त्याच्या मस्तकादि अवयवाची कल्पना

करणें अयुक्त आहे कारण आकाशादिकांचें कारण व कार्यामध्यें न पडलेल्या आणि ज्याचें लक्षण वर सांगितलें आहे, अशा आत्म्याच्या ठिकाणीं शिर–आदि अवयवाची कल्पना उपपन्न होत नाहीं. त्याचप्रमाणें ' अदृश्य, अनात्म्य, अनिलयन, अनिरुक्त, अस्थूल, अनणु नेति नेति आत्मा ' इत्यादि सर्व विशेषाचा निषेध करणाऱ्या श्रुती आहेत ( त्यामुळेंही आत्म्याच्या अवयवाची कल्पना उपपन्न होत नाहीं. त्याचप्रमाणें पुढें मंत्राचें जें उदाहरण दिलें आहे तेंही अनुपपन्न आहे कारण प्रिय हेंच शिर, मोद दक्षिण पक्ष, प्रमोद उत्तर पक्ष इत्यादि अवयवांनीं विशिष्ट, प्रत्यक्षत. अनुभविला जाणारा, आनदमय आत्मा व ब्रह्म, याविषयीं ' तें ब्रह्म नाहीं ' अशी आशंकाच नाहीं त्यामुळें ' ब्रह्म नाहीं, असें जो जाणतो तो असत्च होतो, ' या मंत्राचें उदाहरण देणें, ह्या मंत्राचा प्रमाण ह्मणून उल्लेख करणें, उपपन्न होत नाहीं ' ब्रह्म पुच्छ व प्रतिष्ठा आहे, ' असें ब्रह्माच प्रतिष्ठारूपानें पृथक् ग्रहण करणेंही अनुपपन्न आहे यास्तव आनन्दमय कार्यरूप आत्म्यातीलच एक आहे. तो पर आत्मा आनन्दच नव्हे. यास्तव तो आनन्दमय विद्या व कर्म यांचें फळ आहे, त्याचा विकार आहे. तो विज्ञानमयाहून अन्तर आहे, कारण तो यज्ञादिकाना कारण होणाऱ्या विज्ञानमयाच्या अन्तर आहे, असें सागणारी श्रुति आहे. ज्ञान व कर्म यांचें फळ भोक्त्यासाठीं असल्यामुळे अतिशय अतर असतें अन्नमयादि पूर्व कोशाहून आनदमय आत्मा अतिशय अतर आहे विद्या व कर्म हीं प्रिय, मोद इत्यादिकांकरताच आहेत कारण विद्या व कर्म हीं दोन्हीं प्रियादिप्रयुक्तच आहेत. ( ह्म० प्रियादिकांसाठीं त्याची प्रवृत्ति होते ) हे प्रसिद्ध आहे. तस्मात् आत्म्याच्या सांनिध्यामुळें फलरूप प्रिय मोदादिकांना विज्ञानमयाचें आभ्यतरत्व उपपन्न होतें ( ह्म० प्रिय, मोद, व प्रमोद हे आनदाचे अवयव आत्म्याच्या अगदीं समीप अभिव्यक्त होतात त्यामुळें ते विज्ञानमयाच्याही आत आहेत, असें समजणें उपपन्न होतें कारण प्रियादि आनद व त्यांचीं साधनें याच्या उद्देशानें कर्ता विज्ञान व कर्मे करतो इष्ट वस्तूचें दर्शन,

प्राप्ति व भोग हीं सुद्धां विज्ञानेंच आहेत. तीं प्रियादि आनंदाच्या उद्देशानेंच होतात. त्यामुळें उद्दिश्य जीं प्रियादिक त्यांना विज्ञानमयाचें आंतरत्व असणें सयुक्तिकच आहे. शिवाय स्वप्नामध्यें साक्षी प्रियादिविशिष्ट असल्याचा अनुभव येतो. त्यामुळेंही आनंदमय हा मुख्य आत्मा नव्हे; असें सांगतात ). स्वप्नामध्यें प्रियादिकांच्या वासनांनीं झालेला आनंदमय विज्ञानमयाचा आश्रय करून असलेलाच अनुभवास येतो. ( असो, आतां आनन्दमयाचे शिरःप्रभृति अवयव सांगतात. )

तस्य प्रियमेव शिरः । मोदो दक्षिणः पक्षः । प्रमोद उत्तरः पक्षः । आनन्द आत्मा । ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति ।

इति ब्रह्मवल्ल्यध्याये पञ्चमोऽनुवाकः ॥ ५ ॥

तस्याऽऽनन्दमयस्याऽऽत्मन इष्टपुत्रादिदर्शनजं प्रियं शिर इव शिरः प्राधान्यात् । मोद इति प्रियलाभनिमित्तो हर्षः । स एव च प्रकृष्टो हर्षः प्रमोदः । आनन्द इति सुखसामान्यमात्मा प्रियादीनां सुखावयवानां तेष्वनुस्यूतत्वादानन्द इति परं ब्रह्म । तद्धि शुभकर्मणा प्रत्युपस्थाप्यमाने पुत्रमित्रादिविषयविशेषोपाधावन्तःकरणवृत्तिविशेषे तमसाऽप्रच्छाद्यमाने प्रसन्नेऽभिव्यज्यते । तद्विषयसुखमिति प्रसिद्धं लोके । तद्वृत्तिविशेषप्रत्युपस्थापकस्य कर्मणोऽनवस्थितत्वात्सुखस्य क्षणिकत्वम् । तद्यदाऽन्तःकरणं तपसा तमोघ्नेन विद्यया ब्रह्मचर्येण श्रद्धया च निर्मलत्वमापद्यते यावद्यावत्तावत्तावद्विविक्ते प्रसन्नेऽन्तःकरण आनन्दविशेष उत्कृष्यते विपुलीभवति वक्ष्यति च—" रसो वै सः । रसꣳ ह्येवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति - एष ह्येवाऽऽनन्दयाति " । " एतस्यैवाऽऽनन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति " इति च श्रुत्यन्तरात् । एवं च कामोपशमोत्कर्षापेक्षया शतगुणोत्तरोत्तरोत्कर्ष आनन्दस्य वक्ष्यते । एवं चोत्कृष्यमाणस्याऽऽनन्दमयस्याऽऽत्मनः परमार्थब्रह्मविज्ञानापेक्षया ब्रह्म परमेव यत्प्रकृतं सत्यज्ञानानन्तलक्षणं यस्य च प्रतिपत्त्यर्थं पञ्चान्नादिमयाः कोशा उपन्यस्ताः । यच्च तेभ्योऽभ्यन्तरं येन च ते सर्वे

आत्मवन्तस्तद्ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा । तदेव च सर्वस्याविद्यापरिकल्पितस्य द्वैतस्यावसानभूतमद्वैतं ब्रह्म प्रतिष्ठा आनन्दमयस्य । एकत्वावसानत्वात् । अस्ति तदेकमविद्याकल्पितस्य द्वैतास्यावसानभूतमद्वैतं ब्रह्म प्रतिष्ठा पुच्छं । तदेतस्मिन्नप्यर्थ एष श्लोको भवति ॥

इति शाङ्करभाष्ये पञ्चमोऽनुवाकः ॥ ५ ॥

अर्थ—त्या आनन्दमय आत्म्याचें इष्ट पुत्रादिकांच्या दर्शनामुळें होणारें जें प्रिय या नांवाचें सुख तेंच शिर आहे. खरोखर शिर नव्हे; तर शिरासारखें शिर. कारण त्या प्रियाला प्राधान्य आहे. मोद म्हणजे प्रियवस्तूचा लाभ झाला असतां त्या निमित्तानें होणारा हर्ष. तोच हर्ष प्रकृष्ट म्ह० अतिशय झाला असतां प्रमोद होतो. ( इष्ट वस्तूचा लाभ होऊन त्याचा उपभोग घेत असतांना प्रकृष्ट हर्ष होतो, हें प्रसिद्ध आहे. ) आनन्द म्हणजे सामान्य सुख. तोच प्रियादि सुखावयवांचा आत्मा आहे. कारण तो त्यांमध्यें अनुस्यूत ( ओतप्रोत भरलेला ) असतो. आनंद म्ह० पर ब्रह्म. तें शुभ कर्मानें पुत्र-मित्रादि विशेष प्रकारचे विषय हीच उपाधि पुढें उपस्थित केली असतां तमानें आच्छादित न केलेल्या अन्तःकरणाच्या विशेष प्रकारच्या प्रसन्न वृत्तीमध्यें अभिव्यक्त होतें. तेंच या लोकांत विषयसुख म्हणून प्रसिद्ध आहे. त्या सुखाच्या विशेष प्रकारच्या वृत्तीला प्रत्युपस्थापित करणारें कर्म अनवस्थित ( अस्थिररूप ) असल्यामुळें सुखाला क्षणिकत्व आहे. तें जें अन्तःकरण ते तमाचा नाश करणाऱ्या तपानें, विद्येनें, ब्रह्मचर्यानें व श्रद्धेनें जों जों किंवा जितक्या जितक्या प्रमाणानें निर्मलतेस प्राप्त होतें तों तों किंवा तितक्या प्रमाणानें पवित्र व प्रसन्न झालेल्या अन्तःकरणांत विशेष आनंद उत्कर्ष पावतो; विपुळ होतो. " तो रस आहे. त्या रसाला प्राप्त होऊनच हा पुरुष आनंदी होतो. हाच रस सर्वांना आनंदित करतो, " असें याच अध्यायांत पुढें सांगणार आहेत. " याच आनंदाच्या लेशावर अन्य भूतें उपजीविका करितात. " अशीही दुसरी श्रुति आहे; आणि अशा प्रकारें कामशांतीच्या उत्कर्षाच्या अपेक्षेनें आनन्दाचा उत्तरोत्तर शतपट उत्कर्ष यांतच

पुढें सांगितला जाणार आहे. ( ह्म. कामशांतीचें प्रमाण जसें जसें वाढत जातें तसें तसें आनन्दाचें प्रमाणही उत्तरोत्तर वाढतें, हें पुढें मानुष, गंधर्व, इत्यादिकांच्या आनंदांच्या उदाहरणानें सांगणार आहेत. उत्तरोत्तर उत्तम विषयांपासून होणाऱ्या आनंदाचाच जर वास्तविक उत्कर्ष श्रुतीला मान्य असता तर तिनें निष्काम श्रोत्रियाच्या आनंदोत्कर्षाचें वर्णन केलें नसतें, त्यामुळें याप्रमाणें उत्कर्ष पावणाऱ्या आनन्दमय आत्म्याच्या-परमार्थब्रह्म-विज्ञानाच्या अपेक्षेनें ब्रह्म परच आहे. जें सत्य-ज्ञानानन्तलक्षण प्रकृत ब्रह्म, ज्याच्या ज्ञानाकरितां अन्नादिमय पांच कोशांचा उपन्यास केला आहे, जें त्याच्याहून अभ्यंतर ( आंत ) आहे, आणि ज्याच्या योगानें ते सर्व कोश आत्मवान् आहेत तें ब्रह्म पुच्छ व प्रतिष्ठा आहे. तेंच सर्व अविद्याकल्पित द्वैताचें अवसानभूत अद्वैत ब्रह्म आनन्दमयाची प्रतिष्ठा आहे. कारण त्याचें एकत्वामध्यें अवसान होतें. तें एक अविद्याकल्पित द्वैताचें अवसानभूत अद्वैत ब्रह्म प्रतिष्ठा व पुच्छ आहे. या अर्थीही हा पुढील श्लोक आहे. ( इति ब्रह्म-वल्ल्यध्याये पञ्चमोऽनुवाकः ) ५

---

असन्नेव स भवति। असद्ब्रह्मेति वेद चेत्। अस्ति ब्रह्मेति चेद्वेद। सन्तमेनं ततो विदुरिति।

असन्नेवासत्सम एव यथाऽसन्न पुरुषार्थसंबध्येवं स भवति अपुरुषार्थसंबन्धी। कोऽसौ। योऽसदविद्यमानं ब्रह्मेति वेद विजानाति चेद्यदि। तद्विपर्ययेण यत्सर्वविकल्पास्पदं सर्वप्रवृत्तिबीजं सर्वविशेषप्रत्यस्तमितमप्यस्ति तद्ब्रह्मेति वेद चेत्। कुतः पुनराशङ्का तन्नास्तित्वे, व्यवहारातीतत्वं ब्रह्मण इति ब्रूमः। व्यवहारविषये हि वाचारम्भणमात्रेऽस्तित्वभाविता बुद्धिस्तद्विपरीते व्यवहारातीते नास्तित्वमपि प्रतिपद्यते। यथा घटादिर्व्यवहारविषयतयोपपन्नः संस्तद्विपरीतोऽसन्निति प्रसिद्धम्। एवं तत्सामान्यादिहापि स्याद्ब्रह्मणो नास्तित्वप्रत्याशङ्का। तस्मादुच्यते—अस्ति ब्रह्मेति चेद्वेदेति। किं पुनः स्यात्तदस्तीति विजानतस्तदाह-सन्तं

विद्यमानब्रह्मस्वरूपेण परमार्थसदात्मापन्नमेनमेवंविदं विदुर्ब्रह्मविदस्ततस्तस्मादस्तित्ववेदनात्सोऽन्येषां ब्रह्मवद्विज्ञेयो भवतीत्यर्थः । अथवा यो नास्ति ब्रह्मेति मन्यते स सर्वस्यैव सन्मार्गस्य वर्णाश्रमादिव्यवस्थालक्षणस्याश्रद्दधानतया नास्तित्वं प्रतिपद्यतेऽब्रह्मप्रतिपत्त्यर्थत्वात्तस्य । अतो नास्तिकः सोऽसन्नसाधुरुच्यते लोके । तद्विपरीतः सन्योऽस्ति ब्रह्मेति चेद्वेद स तद्ब्रह्मप्रतिपत्तिहेतुं सन्मार्गं वर्णाश्रमादिव्यवस्थालक्षणं श्रद्दधानतया यथावत्प्रतिपद्यते यस्मात्ततस्तस्मात्सन्तं साधुमार्गस्थमेनं विदुः साधवः । तस्मादस्तीत्येव ब्रह्म प्रतिपत्तव्यमिति वाक्यार्थः ।

अर्थ—असत्-च, असत् सारखाच, ज्याप्रमाणें असत् ( ह्म० अविद्यमान पदार्थ ) पुरुषार्थाशीं संबंध ठेवणारा नसतो त्याप्रमाणें तो अपुरुषार्थसंबंधी होतो. तो कोण ? तर जो असत् ह्म० अविद्यमान ब्रह्म आहे, असें जाणतो. त्यानें जर ब्रह्म असत् आहे असें जाणलें तर तो स्वतःच असत्सारखा होतो पण त्याच्या उलट सर्व विकल्पाचें अधिष्ठान, सर्व प्रवृत्तींचें बीज, सर्व विशेषशून्य असेंही जें तत्त्व आहे, तें ब्रह्म आहे, असें जर त्यानें जाणलें ( तर त्याला सन्त समजतात असा पुढच्या वाक्याशीं अन्वय ) पण त्याच्या नास्तित्वाविषयीं शंकाच का येते ? ( ह्मणून विचाराल तर तिचें कारण ) ब्रह्माचें व्यवहारातीतत्व, हें आहे, असें आह्मी सांगतों. व्यवहारविषयामध्यें केवळ शब्दानींच ज्याचा उच्चार करता येतो अशा नाममात्र विषयाच्या अस्तित्वानें भावित झालेली बुद्धि व्यवहारातीत विषयाविषयीं नास्तित्वही जाणते ( व्यवहारातील शब्दमात्र विषयानाच 'ते आहेत' असें जाणणारी बुद्धि व्यवहारातीत ब्रह्म नाहीं, असेंही जाणते. ) ह्मणजे ज्याप्रमाणें पाणी आणणें इत्यादि व्यवहाराचा विषय या रूपानें उपपन्न झालेला घटादि पदार्थ सन् ( विद्यमान आहे, असें समजलें जातें ) व त्याच्या विपरीत असलेला वंध्यापुत्रादि पदार्थ असन् ( अविद्यमान आहे असें जाणलें जातें ) हें प्रसिद्ध आहे त्याचप्रमाणें तत्तुल्य प्रकारामुळें प्रस्तुत प्रकरणींही ब्रह्माच्या नास्तित्वाविषयीं आशंका येते. ह्मणून 'ब्रह्म आहे, असें जर त्यानें

जाणलें, ' असें ह्मटलें आहे. पण तें आहे असें जाणणाराला काणतें फळ मिळतें तें सांगतात–' ततः–' त्या अस्तित्वज्ञानामुळें ' एनं–' याला तत्त्ववेत्ते संत समजतात. विद्यमान ब्रह्मस्वरूपानें परमार्थसदात्म्यास प्राप्त झालेल्या या असें जाणणाराला ब्रह्मवेत्ते सन्त समजतात. कारण तो त्याचें अस्तित्व मानतो. त्यामुळें तो ब्रह्मवेत्ता इतरांना विज्ञेय ( विशेषतःच जाणण्यास योग्य होतो, असा याचा अर्थ. ) किंवा जो ब्रह्म नाहीं, असें मानतो तो सर्व वर्णाश्रमादिव्यवस्थालक्षण सन्मार्गाचें अश्रद्धालुत्वामुळे नास्तित्व जाणतो. कारण ' ब्रह्म नाहीं ' या त्याच्या समजुतीमुळें सन्मार्ग ब्रह्मप्राप्त्यर्थ आहे, असें त्याला ह्मणतांच येत नाहीं. त्यामुळें तो सन्मार्ग ब्रह्मप्राप्त्यर्थ नाहीं, असें होतें. त्यामुळें व्यवहारांत तो नास्तिक असन्–असाधु ह्मटला जातो. ( सन्मार्ग कांहीं कामाचा नाहीं, असें जाणणाऱ्या नास्तिकाला लोक असाधु–असत्पुरुष असें ह्मणतात. त्यामुळें ब्रह्म नाहीं, असें ह्मणणारा पुरुष असत् ठरतो; ) पण त्याच्या अगदीं उलट असलेला जो ब्रह्म आहे, असें जाणतो तो सन् होय. ज्याअर्थी तो त्या ब्रह्माच्या प्राप्तीला कारण होणाऱ्या वर्णाश्रमादि व्यवस्थालक्षण सन्मार्गाला श्रद्धालुत्वामुळें यथावत् जाणतो त्याअर्थी त्याला दुसरे साधुलोक ( शिष्ट ) सन्त ह्म० साधुमार्गस्थ ( शिष्टांच्या मार्गानें चालणारा ) समजतात. यास्तव ब्रह्म आहे, असेंच जाणावें, हा वाक्यार्थ होय.

तस्यैष एव शारीर आत्मा । यः पूर्वस्य । अथातोऽनुप्रश्नाः ।

तस्य पूर्वस्य विज्ञानमयस्यैष एव शरीरे विज्ञानमये भवः शारीर आत्मा । कोऽसौ । य एष आनन्दमयः । तं प्रति नास्त्याशङ्का नास्तित्वे, अपोढसर्वविशेषत्वात्तु ब्रह्मणो नास्तित्वं प्रत्याशङ्का युक्ता । सर्वसामान्याच्च ब्रह्मणो यस्मादेवमतस्तस्मात् । अथानन्तरं श्रोतुः शिष्यस्यानुप्रश्ना आचार्योक्तिमन्वेते प्रश्ना अनुप्रश्नाः ।

अर्थ—त्या पूर्व ज्ञानमयाचा हाच विज्ञानमय शरीरांत होणारा शारीर आत्मा आहे. तो कोण ? तर जो हा आनन्दमय. (कित्येक वरील मंत्र आनन्दमयाचा प्रकाशक आहे असें समजतात. यास्तव त्याचें निराकरण

करितात–)त्याच्या नास्तित्वाविषयीं तर मुळीं शंकाच नाहीं- (कारण आनन्दमय सविशेष असल्यामुळे प्रत्यक्ष आहे) पण ब्रह्म सर्वविशेषशून्य असल्यामुळें त्याच्या नास्तित्वाविषयीं शंका येणें योग्य आहे. तसेंच ब्रह्म सर्वांना समान असल्यामुळें (त्याचा सर्वांना व्यवहार करता येणें अवश्य आहे, पण तसा अनुभव मात्र कोठही नाहीं त्यामुळेंही 'ते नाहीं' अशी त्याच्या नास्तित्वाची शंका येते,) आणि ज्याअर्थीं असें आहे त्याअर्थीं आता यानंतर आलेले–शिष्याचे हे अनुप्रश्न ह्म० आचार्यांच्या उक्तीनंतर हे प्रश्न आहेत.

उताविद्वानमुं लोकं प्रेत्य । कश्चन गच्छती३ । आहो विद्वानमुं लोकं प्रेत्य । कश्चित्समश्नुता३ उ ।

सामान्यं हि ब्रह्माऽऽकाशादिकारणत्वाद्विदुषोऽविदुषश्च । तस्मादविदुषोऽपि ब्रह्मप्राप्तिराशङ्क्यते । उतापि । अविद्वानमुं लोकं परमात्मानमितः प्रेत्य कश्चन । चनशब्दोऽप्यर्थे । अविद्वानपि गच्छति प्राप्नोति किंवा न गच्छतीति द्वितीयोऽपि प्रश्नो द्रष्टव्योऽनुप्रश्ना इति बहुवचनात् । विद्वांसं प्रत्यन्यौ प्रश्नौ । यद्यविद्वान्सामान्यं कारणमपि ब्रह्म न गच्छति ततो विदुषोऽपि ब्रह्मागमनमाशङ्क्यते । अतस्तं प्रति प्रश्न आहो विद्वानिति । विद्वान्ब्रह्मविदपि कश्चिदितः प्रेत्यामुं लोकं समश्नुत उ इत्ययं स्थितेऽयादेशे पठापि च कृतऽकारस्य प्लुतिः समश्नुता३ उ इति । उकारं च वक्ष्यमाणमधस्तादपकृष्य तकारं च पूर्वस्मादुतशब्दाद्ध्यासज्याऽऽहो इत्येतस्मात्पूर्वमुतशब्दं संयोज्य पृच्छत्युताऽऽहो विद्वानिति । विद्वान्समश्नुतेऽमुं लोकम् । किंवा यथाऽविद्वानेव विद्वानपि न समश्नुत इत्यपरः प्रश्नः । द्वावेव वा प्रश्नौ विद्वदविद्वद्विषयौ । बहुवचनं तु सामर्थ्यप्राप्तप्रश्नान्तरापेक्षया घटते । “असद्ब्रह्मेति वेद चेत् । अस्ति ब्रह्मेति चेद्वेद” इति श्रवणादस्ति नास्तीति संशयस्ततोऽर्थप्राप्तः किमस्ति नास्तीति प्रथमोऽनुप्रश्नः । ब्रह्मणोऽपक्षपातित्वादविद्वान्गच्छति न गच्छतीति द्वितीयः । ब्रह्मणः समत्वेऽप्यविदुष इव विदुषोऽप्यगमनमाशङ्क्यते । किं विद्वान्समश्नुते न समश्नुत इति तृतीयोऽनुप्रश्नः ।

एतेषां प्रतिवचनार्थमुत्तरग्रन्थ आरभ्यते । तत्रास्तित्वमेव तावदुच्यते । यच्चोक्तं " सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म " इति, तच्च कथं सत्यत्वमित्येतद्वक्तव्यमितीदमुच्यते सत्त्वोक्त्यैव सत्यत्वमुच्यते । उक्तं हि " सदेव सत्यम् " इति । तस्मात्सत्त्वोक्त्यैव सत्यत्वमुच्यते । कथमेवमर्थताऽवगम्यतेऽस्य ग्रन्थस्य शब्दानुगमात् । अनेनैव ह्यर्थेनान्वितान्युत्तराणि वाक्यानि । " तत्सत्यमित्याचक्षते " " यदेप आकाश आनन्दो न स्यात् " इत्यादीनि ।

अर्थ—ब्रह्म आकाशादिकांचें ( भूतविशिष्ट सर्व जीवांचें ) कारण असल्यामुळें विद्वान् व अविद्वान् या उभयतांनाही तुल्य आहे. यास्तव अविद्वानालाही ब्रह्मप्राप्ति होते अशी शंका घेतली जाते. उत ह्म० अपि–ही; अविद्वान्-ही या लोकास ह्म० परमात्म्याला या लोकाहून–या शरीरांतून निघून जाऊन पोंचतो-प्राप्त होतो कीं नाहीं. ' कश्चन ' यांतील ' चन ' हा शब्दही अपि या अर्थी आहे व 'कश्चन' हें पद अविद्वान् या पदाशीं संबंध ठेवतें त्यामुळें १ कोणी अविद्वान् सुद्धां ब्रह्माला प्राप्त होतो, २ कीं नाहीं ? असा दुसराही प्रश्न येथें आहे, असें जाणावें. कारण वर 'अनुप्रश्नाः' असें बहुवचन आहे. तसेंच विद्वानाकरितां, विद्वानाला उद्देशून दुसरे दोन प्रश्न आहेत. जर अविद्वान् ( विद्वान् व अविद्वान् या उभयतांनाही ) साधारण कारण असलेल्याही ब्रह्माला प्राप्त होत नाहीं तर विद्वान्ही ब्रह्माला जाऊं शकणार नाहीं, अशी आशंका घेतली जाते. यास्तव त्या विद्वानाला उद्देशून ' आहो विद्वान्० ' हा प्रश्न आहे. कोणी विद्वान्–ब्रह्मवेत्ताही या लोकाहून किंवा या शरीरांतून निघून जाऊन त्या लोकाला ह्म० परमात्म्याला प्राप्त होतो का ? मूळ उपनिषदांत ' समश्नुता३ उ ' असा पाठ आहे. पण त्यांचीं पदें ' समश्नुते उ ' अशीं आहेत. पण ' ते ' यांतील एच्या पुढें उ आल्यामुळें एचा अय् झाला. नंतर पुढें ' उ ' असल्यामुळें पाणिनीच्या ' लोपः शाकल्यस्य ' या सूत्रानें ' य ' चा लोप झाला. तेव्हां ' समश्नुता उ ' असें राहिलें. नंतर ' त ' या अक्षरांतील अकार प्लुत केला. त्यामुळें ' समश्नुता३ उ ' असा

पाठ झाला. 'उ' हा पुढील उकार मागें ओढून घेऊन आणि पूर्वीच्या उत-शब्दांतील तकार त्याला जोडून झालेल्या उतशब्दाची 'अहो' याच्या पूर्वी योजना करून, त्यांचा संयोग करून शिष्य 'उताहो विद्वान्' इत्यादि प्रश्न करीत आहे. विद्वान् या आत्माला जातो का ? कीं 'जसा विद्वान् तसाच *अविद्वान्-ही त्याला प्राप्त होत नाहीं?'* असा दुसरा प्रश्न. (*मिळून अविद्वाना*-विषयीं दोन व विद्वानाविषयीं दोन असे चार प्रश्न होतात ) किंवा विद्वान् व अविद्वान् यांतील प्रत्येकाविषयीं एकेक, असे दोनच प्रश्न समजावे. ( पण मग 'अथातोनुप्रश्नाः' या बहुवचनाची उपपत्ति कशी लागणार ? तर सांगतों—) बहुवचन तर सामर्थ्यानें प्राप्त होणाऱ्या दुसऱ्या प्रश्नाच्या अपेक्षेनें उपपन्न होतें. ( *कोणाच्या सामर्थ्यानें दुसरा प्रश्न प्राप्त होतो, तें सांगतात*—) 'असत् ब्रह्म असें जर जाणलें; ब्रह्म आहे असें जर जाणलें' इत्यादिश्रुति-वचनात 'चेत्' ह्म० जर या संशयबोधक पदाचा प्रयोग केला आहे, त्या-वरून दुसऱ्या पक्षीं ब्रह्म आहे व नाहीं, असा संशय येतो. त्यावरून 'काय ब्रह्म आहे, कीं नाहीं,' असा अर्थावरूनच प्राप्त झालेला पहिला अनुप्रश्न आहे. *ब्रह्म पक्षपाती नसल्यामुळें अविद्वान् ब्रह्माला प्राप्त होतो व प्राप्त होत* नाहीं, हा दुसरा अनुप्रश्न आहे. ब्रह्माला समत्व जरी असलें तरी अविद्वाना-प्रमाणें विद्वानाच्याही आगमनाविषयीं आशंका घेतली जाते. काय विद्वान् ब्रह्माला पोंचतो कीं पोंचत नाहीं, असा तिसरा अनुप्रश्न आहे. त्या तीन प्रश्नाच्या प्रतिवचनाकरितां पुढील ग्रंथ आरंभिला जातो. त्यापैकीं प्रथम त्याचें अस्तित्वच सांगितलें जातें 'सत्य, ज्ञान, अनन्त ब्रह्म' असें जें सांगि-*तलें आहे, तें सत्यत्व कसें हें सांगितलें पाहिजे, असें जें ह्मटलें होतें* तेंच हें आता सांगितलें जात आहे. ब्रह्माच्या सत्त्वकथनानेंच त्याचें सत्यत्व सांगि-तलें आहे. ( ह्म० तें सत् आहे, असें ह्मटल्यानेंच तें सत्य आहे, असें सिद्ध होतें ) सत्-च सत्य आहे, असें वर सांगितलेंच आहे. तस्मात् सत्त्वकथनानेंच सत्यत्व सांगितलें जातें. पण या ग्रंथाला 'एतमर्थनाच' आहे ह्म. याचा हाच अर्थ आहे, हें कसें कळतें ह्मणून विचाराल तर शब्दानुगमामुळें तें कळतें

( असें आह्मी सांगतों ). ' तें सत्य असें सांगतात; जर हा आकाश आनंद नसता,' इत्यादि पुढचीं वाक्यें याच अर्थाशीं अन्वित आहेत.

तत्रासदेव ब्रह्मेत्याशङ्क्यते। कस्मात्। यदस्ति तद्विशेषतो गृह्यते यथा घटादि। यन्नास्ति तन्नोपलभ्यते यथा शशविषाणादि। तथा नोपलभ्यते ब्रह्म। तस्माद्विशेषतोऽग्रहणान्नास्तीति। तन्न। आकाशादिकारणत्वाद्ब्रह्मणः। न नास्ति ब्रह्म कस्मादाकाशादि हि सर्वं कार्यं ब्रह्मणो जातं गृह्यते। यस्माच्च जायते किंचित्तदस्तीति दृष्टं लोके यथा घटाङ्कुरादिकारणं मृद्बीजादि। तस्मादाकाशादिकारणत्वादस्ति ब्रह्म। न चासतो जातं किंचिद्गृह्यते लोके कार्यम्। असतश्चेन्नामरूपादिकार्यं निरात्मकत्वान्नोपलभ्येत। उपलभ्यते तु। तस्मादस्ति ब्रह्म। असतश्चेत्कार्यं गृह्यमाणमप्यसदन्वितमेव तत्स्यात्। न चैवं। तस्मादस्ति ब्रह्म। तत्र कथमसतः सज्जायेतेति श्रुत्यन्तरमसतः सज्जन्मासंभवमन्वाचष्टे न्यायतः। तस्मात्सदेव ब्रह्मेति युक्तम्। तद्यदि मृद्बीजादिवत्कारणं स्यादचेतनं तर्हि, न, कामयितृत्वात्। न हि कामयित्रचेतनमस्ति लोके। सर्वज्ञं हि ब्रह्मेत्यवोचाम। अतः कामयितृत्वोपपत्तिः। कामयितृत्वादस्मदादिवदनाप्तकामं चेत्, न। स्वातन्त्र्यात्, यथाऽन्यान्परवशीकृत्य कामादिदोषाः प्रवर्तयन्ति न तथा ब्रह्मणः प्रवर्तकाः कामाः। कथं तर्हि, सत्यज्ञानलक्षणाः स्वात्मभूतत्वाद्विशुद्धा न तैर्ब्रह्म प्रवर्त्यते। तेषां तु प्रवर्तकं ब्रह्म प्राणिकर्मापेक्षया। तस्मात्स्वातन्त्र्यं कामेषु ब्रह्मणः। अतो नानाप्तकामं ब्रह्म॥

**अर्थ**—त्या शंकांतील ' ब्रह्म असत्‌च आहे ' ही शंका घेतली जाते. ती कां? तर जें असतें त्याचें विशेषतः ग्रहण केलें जातें. जसें–घटादि पदार्थ. जें नाहीं तें उपलब्ध होत नाहीं. जसें–शशविषाणादिक. तसेंच ब्रह्म उपलब्ध होत नाहीं. तस्मात् विशेषतः ग्रहण होत नसल्यामुळें ब्रह्म नाहीं. पण ही शंका बरोबर नाहीं. कारण ब्रह्म आकाशादिकांचें कारण आहे. ( आतां याच सूत्रभूत वाक्याचा विस्तार करितात–) ब्रह्म नाहीं, असें नाहीं.

त्याचें प्रवर्तक आहे. तस्मात् ब्रह्माला कामाविषयीं स्वातन्त्र्य आहे. त्यामुळें ब्रह्म अनाप्तकाम नाहीं.

( पण ' शरीरादि संबंधावांचून कामांचा उद्भव होत नाहीं. यास्तव कामना करणाऱ्या ब्रह्माला शरीर असतें, असें ह्मणण्याचा प्रसंग येतो ' ह्मणून ह्मणाल तर सांगतों— )

*साधनान्तरानपेक्षत्वाच्च । किंच यथाऽन्येषामनात्मभूता धर्मा-* दिनिमित्तापेक्षा. कामाः स्वात्मव्यतिरिक्तकार्यकरणसाधनान्तरापे-क्षाश्च न तथा ब्रह्मणो निमित्ताद्यपेक्षत्वं किं तर्हि स्वात्मनोऽनन्याः ॥

अर्थ—त्याचप्रमाणें ब्रह्माला दुसऱ्या साधनाची अपेक्षा नसते. त्यामुळेंही तें स्वतंत्र आहे. ह्म० ज्याप्रमाणें इतर पामरांचे काम ( इच्छा ) अनात्मभूत, धर्मादिनिमित्ताची अपेक्षा करणारे व स्वात्म्याहून व्यतिरिक्त दुसऱ्या देहेंद्रियादि साधनांची अपेक्षा करणारे असतात त्याप्रमाणें ब्रह्माच्या कामनाना निमित्तादिकाची अपेक्षा नसते. तर ते स्वात्म्याहून अनन्य असतात.

सोऽकामयत बहु स्यां प्रजायेयेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा । इदꣳ सर्वमसृजत ।

तदेतदाह-सोऽकामयत स आत्मा यस्मादाकाशः संभूतोऽकामयत कामितवान् । कथं, बहु स्यां बहु-प्रभूतं स्यां भवेयम् । कथमेकस्यार्थान्तराननुप्रवेशे बहुत्वं स्यादित्युच्यते। प्रजायेयोत्पद्येय। न हि पुत्रोत्पत्त्येवार्थान्तरविषयं बहुभवनं कथं तर्ह्यात्मस्थानभिव्यक्तनामरूपाभिव्यक्त्या । यदाऽऽत्मस्थे अनभिव्यक्ते नामरूपे व्याक्रियेते तदा नामरूपे आत्मस्वरूपापरित्यागेनैव ब्रह्मणाऽप्रविभक्तदेशकाले सर्वावस्थासु व्याक्रियेते तदा तन्नामरूपव्याकरणं ब्रह्मणो बहुभवनम् । नान्यथा निरवयवस्य ब्रह्मणो बहुत्वापत्तिरुपपद्यतेऽल्पत्वं वा । यथाऽऽकाशस्याल्पत्वं बहुत्वं च वस्त्वन्तरकृतमेव । अतस्तद्द्वारेणैवाऽऽत्मा बहु भवति । न ह्यात्मनोऽन्यदनात्मभूतं तत्प्रविभक्तदेश-

कालं सूक्ष्मं व्यवहितं विप्रकृष्टं भूतं भवद्भविष्यद्वा वस्तु विद्यते। अतो नामरूपे सर्वावस्थे ब्रह्मणैवाऽऽत्मवती, न ब्रह्म तदात्मकम्। ते तत्प्रत्याख्याने न स्त एवेति तदात्मके उच्येते। ताभ्यां चोपाधिभ्यां ज्ञातृज्ञेयज्ञानशब्दार्थादिसर्वसंव्यवहारभाग्ब्रह्म। स आत्मैवं-कामः संस्तपोऽतप्यत। तप इति ज्ञानमुच्यते। "यस्य ज्ञानमयं तपः" इतिश्रुत्यन्तरात्। आप्तकामत्वाच्चेतरस्यासंभव एव तपसः। तत्तपोऽतप्यत तप्तवान्। सृज्यमानजगद्रचनादिविषयामालोचनमकरोदात्मेत्यर्थः। स एवमालोच्य तपस्तप्त्वा प्राणिकर्मादिनिमित्तानुरूपमिदं सर्वं जगद्देशतः कालतो नाम्ना रूपेण च यथानुभवं सर्वैः प्राणिभिः सर्वावस्थैरनुभूयमानमसृजत सृष्टवान्।

अर्थ—आतां श्रुति तेंच सांगते–ज्याच्यापासून आकाश हा पदार्थ उत्पन्न झाला तो आत्मा कामना करता झाला. ती कशी? मीं बहु–पुष्कळ व्हावें, अशी. पण एकाला दुसऱ्या पदार्थांत प्रवेश केल्यावांचून बहुत्व कसें संभवेल अशी शंका येते, ह्मणून 'प्रजायेय' असें ह्मटलें आहे. प्रजायेय ह्मणजे उत्पन्न होतों. ब्रह्माचें हें बहुभवन–पुष्कळ होणें पुत्रोत्पत्तीप्रमाणें भिन्न पदार्थविषयक नाहीं; तर कसें? आत्म्यामध्येंच स्थित असलेल्या अव्यक्त नामरूपांना व्यक्त करून बहु होणें आहे. जेव्हा आत्मस्थ अव्यक्त नामरूपें व्यक्त केलीं जातात तेव्हां तीं नामरूपें सर्व अवस्थांमध्यें आत्मस्वरूपाचा परित्याग न करताच ज्यांचा देश व काल ब्रह्माहून पृथक् नाहीं, अशींच व्यक्त केलीं जातात. त्यामुळें तें नामरूपव्याकरण (ह्म० नामरूपाला व्यक्त करणें) हेंच ब्रह्माचें बहुभवन आहे. त्यावाचून निरवयव ब्रह्माची बहुत्वापत्ति (ह्म० बहु होणें) किंवा अल्पत्व उपपन्न होत नाहीं. जसें–आकाशाचें अल्पत्व किंवा बहुत्व दुसऱ्या वस्तूंमुळेंच संभवतें (त्याप्रमाणें ब्रह्माचेंही अल्पत्व व बहुत्व नामरूप-उपाधीमुळेंच संभवनीय आहे.) यास्तव त्याच्या द्वाराच आत्मा पुष्कळ होतो. आत्म्याहून पृथक्, अनात्मभूत, त्याहून अगदीं भिन्न देश व काल यांत राहणारी, सूक्ष्म, आड असलेली, दूर असलेली, भूत, वर्तमान किंवा भविष्यत् वस्तु नाहीं. यास्तव सर्व अवस्थामधील नामरूपें ब्रह्माच्या

योगानेंच आत्मवन्त आहेत. ब्रह्म तद्रूप नाहीं. पण ब्रह्माचा निषेध केला असतां नामरूपांचा अभाव होतो. ह्मणून नामरूपें ब्रह्मात्मक आहेत, असें ह्मटलें जातें. नाम व रूप या दोन उपाधींच्या योगानें ब्रह्म ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान इत्यादि शब्द व त्यांचे अर्थ इत्यादि सर्वांच्या उत्तम व्यवहाराला पात्र होतें. तो आत्मा अशा कामनेनें युक्त होत्साता तप करता झाला. 'तप' या पदानें ज्ञान सांगितलें जातें. कारण 'ज्याचें तप ज्ञानमय असतें' अशी दुसरी श्रुति आहे. त्याचप्रमाणें ब्रह्म आप्तकाम असल्यामुळें इतर तपाचा असंभवच आहे. तें ब्रह्म तप करतें झालें, ह्म॰ आत्मा उत्पन्न केल्या जाणाऱ्या जगाच्या रचनादिकांविषयीं आलोचन-विचार करता झाला, असा याचा अर्थ. तो असें आलोचन करून तप करून प्राण्यांच्या कर्मादि निमित्तांच्या अनुसार हें सर्व जगत् देशतः, कालतः, नामतः व रूपतः अनुभवानुसार-सर्व अवस्थांतील सर्व प्राण्यांकडून जसें अनुभविलें जात आहे तसें उत्पन्न करता झाला.

यदिदं किंच । तत्सृष्ट्वा । तदेवानुप्राविशत् ।

यदिदं किंच यत्किंचेदमविशिष्टम् । तदिदं जगत्सृष्ट्वा किमकरोदित्युच्यते-तदेव सृष्टं जगदनुप्राविशदिति । तत्रैतच्चिन्त्यं कथमनुप्राविशदिति । किं यः स्रष्टा स तेनैवाऽऽत्मनाऽनुप्राविशदुतान्येनेति, किं तावद्युक्तम् । क्त्वाप्रत्ययश्रवणाद्यः स्रष्टा स एवानुप्राविशदिति ।

अर्थ—हें जें कांहीं सर्व साधारण जगत् आहे तें हें जगत् उत्पन्न करून त्यानें काय केलें, तें सांगतात-त्याच उत्पन्न केलेल्या जगांत मागून तें प्रवेश करतें झालें. पण त्याविषयीं तें कसें प्रवेश करतें झालें, या गोष्टीचा विचार 'केला' जातो. जो स्रष्टा तो त्याच रूपानें प्रवेश करता झाला कीं दुसऱ्या रूपानें? पण ह्या दोन पक्षांतील युक्त प्रश्न कोणता दिसतो? 'तत्सृष्ट्वा' येथें 'त्वा' हा प्रत्यय असल्यामुळें जो स्रष्टा तोच मागून प्रवेश करता झाला, हें युक्त दिसतें. ( संस्कृतांतील 'क्त्वा' प्रत्ययाच्या जागीं मराठींत 'ऊन' हा प्रत्यय होतो. 'क्त्वा' प्रमाणेंच ऊनप्रत्ययान्त धातुला-

थित अव्ययाचा कर्ता व मुख्य क्रियेचा कर्ता एकच असतो. जसें ' रामा जेवून गावाला गेला ' या वाक्यात रामा हें पद जेवून या ऊन प्रत्ययान्ताचा व गेला या मुख्य क्रियापदाचा कर्ता आहे. त्याच न्यायानें जगत् उत्पन्न करून त्यात प्रवेश करणारा एकच आहे, असा भाव ).

( यावर पूर्ववादी शंका घेतो– )

ननु न युक्तं मृद्वच्चेत्कारणं ब्रह्म तदात्मकत्वात्कार्यस्य। कारणमेव हि कार्यात्मना परिणतमित्यतोऽप्रविष्ट इव कार्योत्पत्तेरूर्ध्वं पृथक्कारणस्य पुनः प्रवेशोऽनुपपन्नः। न हि घटपरिणामव्यतिरेकेण मृदो घटे प्रवेशोऽस्ति। यथा घटे चूर्णात्मना मृदोऽनुप्रवेश एवमन्येनाऽऽत्मना नामरूपकार्येऽनुप्रवेश आत्मन इति चेच्छ्रुत्यन्तराच्च " अनेन जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रविश्य " इति। नैवं युक्तमेकत्वाद्ब्रह्मणः। मृदात्मनस्त्वनेकत्वात्सावयवत्वाच्च युक्तो घटे मृदश्चूर्णात्मनाऽनुप्रवेशः। मृदश्चूर्णस्याप्रविष्टदेशवत्त्वाच्च। न त्वात्मन एकत्वे सति निरवयवत्वादप्रविष्टदेशाभावाच्च प्रवेश उपपद्यते। कथं तर्हि प्रवेशः स्यात्। युक्तश्च प्रवेशः श्रुतत्वात्तदेवानुप्राविशदिति। सावयवमेवास्तु तर्हि सावयवत्वान्मुखे हस्तप्रवेशवन्नामरूपकार्ये जीवात्मनाऽनुप्रवेशो युक्त एवेति चेन्नाशून्यत्वात्। न हि कार्यात्मना परिणतस्य नामरूपकार्यदेशव्यतिरेकेणाऽऽत्मशून्यः प्रदेशोऽस्ति यं प्रविशेज्जीवात्मना। कारणमेव चेत्प्रविशेज्जीवात्मत्वं जह्याद्यथा घटो मृत्प्रवेशे घटत्वं जहाति। तदेवानुप्राविशदिति च श्रुतेर्न कारणानुप्रवेशो युक्तः।

अर्थ—मृत्तिकेप्रमाणें ब्रह्म जर कारण असेल तर कार्यही तदात्मक असल्यामुळें ब्रह्मच त्यात प्रविष्ट झालें, हें ह्मणणें युक्त नव्हे. कारणच कार्यरूपानें परिणाम पावलें आहे. यास्तव प्रविष्ट न झालेल्या दुसऱ्या एकाद्या पदार्थाप्रमाणें कार्योत्पत्तीच्या नंतर कारणाचा पुनरपि पृथक् प्रवेश अनुपपन्न आहे. घटरूपानें परिणाम पावणें, यावाचून मृत्तिकेचा घटामध्यें प्रवेश होत नाहीं. ' ज्याप्रमाणें घटामध्यें चूर्णरूपानें ( ह्म० धुळीच्या रूपानें ) मृत्तिकेचा मागून प्रवेश होतो त्याप्रमाणें अन्य स्वरूपानें आत्म्याचा

नामरूपकार्यामध्यें अनुप्रवेश होतो, ' ह्मणून ह्मणाल आणि ' या जीवरूप आत्म्याच्या योगानें अनुप्रवेश करून ' अशी दुसरी श्रुतिही आहे, असें ह्मणाल तर बरोबर नाहीं. कारण ब्रह्माला एकत्व आहे. (ह्म० तें एक आहे.) मृत्तिकारूप कारणाला तर अनेकत्व व सावयवत्व असल्यामुळें घटामध्यें मृत्तिकेचा धुळीच्या रूपानें अनुप्रवेश होणें युक्त आहे. शिवाय घटाची माती धुळीच्या प्रदेशात प्रविष्ट झालेली नसते. ( तर ती धुळीच्या प्रदेशाहून निराळयाच प्रदेशात असते. त्यामुळे धुळीचा प्रवेश तिच्यामध्यें होऊं शकतो) पण आत्म्याचा तसा प्रवेश उपपन्न नाहीं. कारण आत्मा एक असून निर-वयव असतो आणि तो प्रविष्ट झालेला नाहीं, असा मुळीं देशच नसतो. तर मग त्याचा प्रवेश कसा होणार? ' तदेवानुप्राविशत् ' ह्म० त्यातच प्रवेश करता झाला, अशी श्रुति असल्यामुळें त्याचा प्रवेश होणें युक्तच आहे. यास्तव तें ब्रह्म सावयव असूंदे. तें सावयव असल्यामुळें मुखामध्यें जसा हस्तप्रवेश होतो त्याप्रमाणें त्याचा नामरूपकार्यामध्यें जीवरूपानें अनु-प्रवेश होणें युक्तच आहे, ह्मणून ह्मणाल तर ( पूर्ववादीच या मध्यस्थाच्या ह्मणण्याचें निराकरण करतो- ) तेंही बरोबर नाहीं. कारण त्याला अशू-न्यत्व आहे. ( या संक्षिप्तवाक्याचेंच विवरण करितात- ) कार्यरूपानें परि-णत झालेल्या ब्रह्माचा नामरूपात्मक कार्य हाच प्रदेश आहे. त्याहून निराळा आत्मशून्य प्रदेशच नाहीं, कीं ज्यामध्यें तो जीवात्मरूपानें प्रवेश करील. ( कार्याकारानें परिणत झालेल्या ब्रह्मांत कार्याचा एक प्रकार असा जीवात्मा प्रवेश करूं शकेल, ह्मणून जर ह्मणाल तर ), कारणांतच जर त्यानें प्रवेश केला तर तो आपल्या जीवात्मत्वाचाच त्याग करील. जसा-घट मृ-त्तिकेंत प्रवेश करताच घटत्वाचा त्याग करतो, त्याप्रमाणें. शिवाय ' त्या कार्यांतच मागून प्रवेश करता झाला, ' अशी श्रुति असल्यामुळें कारणामध्यें अनुप्रवेश युक्त नव्हे.

( आतां पूर्वपक्षवादीच मध्यस्थाच्या मताचा अनुवाद करून त्यावर दूषण देतो- )

कार्यान्तरमेव स्यादिति चेत्। तदेवानुप्राविशदिति जीवात्मरूपं कार्यं नामरूपपरिणतं कार्यान्तरमेवाऽऽपद्यत इति चेन्न। विरोधात्। न हि घटो घटान्तरमापद्यते। व्यतिरेकश्रुतिविरोधाच्च। जीवस्य नामरूपकार्यव्यतिरेकानुवादिन्य श्रुतयो विरुध्येरन्। तदापत्तो मोक्षासंभवाच्च। न हि यतो मुच्यमानस्तदेवाऽऽपद्यते। न हि शृङ्खलापत्तिर्बद्धस्य तस्करादेः।

अर्थ—प्रवेश करणारें दुसरें कार्यच आहे, असें ह्मणाल ह्म० 'तदेवानुप्राविशत्' ह्म० तेंच कारण मागून त्या कार्यांत प्रविष्ट झालें, या श्रुतीचा अर्थ—*जीवात्मरूप कार्य नामरूपाच्या आकारानें परिणत झालेल्या दुसऱ्या* कार्यास प्राप्त होतें, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं कारण त्याशीं विरोध येतो घटच कांहीं दुसऱ्या घटास प्राप्त होत नाहीं तसाच व्यतिरेक प्रतिपादक श्रुतींशींही विरोध येतो. ह्म० जीव नामरूपात्मककार्याहून पृथक् आहे, असा अनुवाद करणाऱ्या श्रुतींशीं विरोध येतो. शिवाय जीव जर कार्यत्वास प्राप्त झाला तर त्याच्या मोक्षाचा असंभव होतो कारण ज्याच्या पासून मुक्त होणारा त्यालाच तो प्राप्त होत नाहीं (जीव नामरूपात्मक कार्यापासून मुक्त होणारा आहे त्यामुळें तो नामरूपात्मकच होणें युक्त नव्हे.) तस्करादि बद्ध पुरुषाला शृंखलाभाव प्राप्त होत नसतो, हें प्रसिद्ध आहे

(पुन. मध्यस्थाची शंका घेऊन पूर्ववादीच दोष देतो–)

बाह्यान्तर्भेदेन परिणतमिति चेत्तदेव कारणं ब्रह्म शरीराद्याधारत्वेन तदन्तर्जीवात्मनाऽऽधेयत्वेन च परिणतमिति चेन्न, बहिष्ठस्य प्रवेशोपपत्ते। न हि यो यस्यान्तःस्थ स एव तत्प्रविष्ट उच्यते। बहिष्ठस्यानुप्रवेशः स्यात्प्रवेशशब्दार्थस्यैव दृष्टत्वात्। यथा गृहं कृत्वा प्राविशदिति। जलसूर्यकादिप्रतिबिम्बवत्प्रवेशः स्यादिति चेन्न। अपरिच्छिन्नत्वादमूर्तत्वाच्च। परिच्छिन्नस्य मूर्तस्यान्यस्यान्यत्र प्रसादस्वभावके जलादौ सूर्यकादिप्रतिबिम्बोदयः स्यात्। न त्वात्मनः अमूर्तत्वादाकाशादिकारणस्याऽऽत्मन. अव्यापकत्वात्तद्विप्रकृष्टदेशप्रतिबिम्बाधारवस्त्वन्तराभावाच्च प्रतिबिम्बवत्प्रवेशो न युक्तः॥

अर्थ—तें कारण बाह्य व अन्तर्भेदानें परिणत झालें आहे, ह्म० तेंच कारणब्रह्म शरीरादि आधाररूपानें व तदन्तर्गत जीवरूप आधेयरूपानें परिणत होतें, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. जो ज्याच्या बाहेर स्थित असतो त्याचाच त्यात प्रवेश उपपन्न होतो. कारण जो ज्याच्या आंत स्थित असतो तोच त्यांत प्रविष्ट झाला, असें ह्मटलें जात नाहीं. त्याचप्रमाणें जो बाहेर स्थित असतो त्याचाच अनुप्रवेश होतो. कारण प्रवेश या शब्दाचा अर्थ असाच अनुभवास येतो. जसें–गृह करून त्यांत प्रविष्ट झाला. 'अहोपण जलामध्यें सूर्यादिकाच्या प्रतिबिंबाप्रमाणें प्रवेश होऊं शकेल,' ह्मणून ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण ब्रह्म अपरिच्छिन्न व अमूर्त आहे. 'प्रसाद' या स्वभावानें युक्त असलेल्या दुसऱ्या पदार्थामध्यें परिच्छिन्न, मूर्त ( साकार ) व भिन्न असलेल्या पदार्थाचाच–सूर्यादि प्रतिबिंबाचा उदय होतो. आत्म्याचा नाहीं. कारण आकाशादिकाचें कारण असा तो अमूर्त आहे, त्याचप्रमाणें आकाशादिकार्यें ब्रह्माच्या अपेक्षेनें अव्यापक आहेत; व त्याहून दूर देशीं असणाऱ्या प्रतिबिंबाधारभूत दुसऱ्या वस्तूंचा अभाव आहे. त्यामुळेंही ब्रह्माचा कार्यामध्यें प्रतिबिंबाप्रमाणें प्रवेश होणें युक्त नव्हे.

( याप्रमाणें मध्यस्थाच्या शंकाचें निरसन करून पूर्ववादी आपल्या पूर्वपक्षाचा उपसंहार करतो– )

एवं तर्हि नैवास्ति प्रवेशो न च गत्यन्तरमुपलभामहे। "तदेवानुप्राविशत्" इति च श्रुतेः। श्रुतिश्च नोऽतीन्द्रियविषये विज्ञानोत्पत्तौ निमित्तम्। न चास्माद्वाक्याद्यत्नवतामपि विज्ञानमुत्पद्यते। हन्त तर्ह्यनर्थकत्वादपोह्यमेतद्वाक्यं "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्। इति॥

अर्थ—मग असें जर असेल तर त्याचा प्रवेशच होत नाहीं. आह्माला दुसरी गतिही उपलब्ध होत नाहीं. 'तेंच अनुप्रवेश करतें झालें,' अशी श्रुति आहे. अतीन्द्रिय विषयाचें ज्ञान होण्यास आह्मांला श्रुति हेंच निमित्त

आहे. पण या वाक्यावरून मोठ्या यत्नशील पुरुषांनाही कांहींच विज्ञान होत नाहीं. अहो असें जर असेल तर ' तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत् ' हें वाक्य अर्थरहित असल्यामुळे निषेध करण्यास योग्य आहे. ( आता याचा सिद्धान्त सांगतात- )

न । अन्यार्थत्वात् । किमर्थमस्थाने चर्चा ।प्रकृतो ह्यन्यो विवक्षितोऽस्य वाक्यस्यार्थोऽस्ति स स्मर्तव्य । " ब्रह्मविदाप्नोति परम् " " सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म " " यो वेद निहितं गुहायाम् " इति । तद्विज्ञानं च विवक्षितं प्रकृतं च तत् । ब्रह्मस्वरूपानुगमाय चाऽऽकाशाद्यन्नमयान्तं कार्यं प्रदर्शितं ब्रह्मानुगमश्चाऽऽरब्धः । तत्रान्नमयादात्मनोऽन्योऽन्तर आत्मा प्राणमयस्तदन्तर्मनोमयो विज्ञानमय इति विज्ञानगुहायां प्रवेशितस्तत्र चाऽऽनन्दमयो विशिष्ट आत्मा प्रदर्शित । अत परमानन्दमयलिङ्गाधिगमद्वारेणाऽऽनन्दविवृद्ध्यवसान आत्मा ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा सर्वविकल्पास्पदो निर्विकल्पोऽस्यामेव गुहायामधिगन्तव्य इति तत्प्रवेश प्रकल्प्यते ॥

अर्थ—नाहीं, तसें मुळींच नाहीं कारण त्या वाक्याचा अर्थ तुम्ही समजता त्याहून निराळा आहे. ही अस्थानीं चर्चा कशासाठीं करता ? या वाक्याचा प्रकृत व विवक्षित अर्थ अगदींच निराळा आहे तो कोणता, याची आठवण केली पाहिजे. ' ब्रह्मवित् परब्रह्माला प्राप्त होतो,' ' सत्य, ज्ञान व अनन्त ब्रह्म आहे, ' ' जो त बुद्धिरूप गुहेंत अवस्थित आहे, असें जाणतो, ' अशा अर्थाच्या या अध्यायाच्या आरंभींच्या वाक्यावरून येथें ब्रह्माचें विज्ञान विवक्षित आहे; व तें प्रकृतही आहे. ब्रह्मस्वरूपाचा सर्वत्र अनुगम होतो, हें दाखविण्यासाठीं आकाशापासून अन्नमयापर्यंत कार्याचें प्रदर्शन केलें आहे. ब्रह्माचा अनुगम ( ह्म० अनुवृत्ति ) आरंभिलेला आहे. त्यात अन्नमय आत्म्याहून दुसरा अंतर आत्मा प्राणमय आहे. त्याच्या आत मनोमय व विज्ञानमय सांगून विज्ञानमय गुहेमध्यें आत्म्याचा प्रवेश करविला व त्यांत आनन्दमय हा विशिष्ट आत्मा दाखविला आहे. आतां यापुढें आनन्दमय या लिंगाच्या ज्ञानाच्या द्वारा आनन्दाच्या विशेष वृद्धीमध्यें पर्यवसान

पावणारा आत्माच ब्रह्म, पुच्छ, प्रतिष्ठा, सर्व विकल्पांचें आस्पद (स्थान, आधार), व निर्विकल्प आहे, आणि तो या गुहेमध्येंच जाणावा, अशा हेतूनें त्याचा प्रवेश कल्पिलेला आहे. (बुद्धिरूप गुहेमध्येंच ब्रह्माची उपलब्धि संभवनीय असल्यामुळें त्या बुद्धींतच त्याचा प्रवेश सांगण्याची इच्छा केली आहे, असें भाष्यकार सांगतात- )

न ह्यन्यत्रोपलभ्यते ब्रह्म निर्विशेषत्वाद्विशेषसंबन्धो ह्युपलब्धिहेतुर्दृष्टः। यथा राहोश्चन्द्रार्कविशिष्टसंबन्धः। एवमन्तःकरणगुहात्मसंबन्धो ब्रह्मण उपलब्धिहेतुः। संनिकर्षादवभासात्मकत्वाच्चान्तःकरणस्य। यथा चाऽऽलोकविशिष्टा घटाद्युपलब्धिरेवं बुद्धिप्रत्ययालोकविशिष्टात्मोपलब्धिः स्यात्तस्मादुपलब्धिहेतौ गुहायां निहितमिति प्रकृतमेव। तद्वृत्तिस्थानीये त्विह पुनस्तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशदित्युच्यते।

अर्थ—ब्रह्म निर्विशेष असल्यामुळें बुद्धीवांचून दुसऱ्या कोठेंही उपलब्ध होत नाहीं. कारण विशेषसंबंधच उपलब्धीचें निमित्त आहे, असें दिसतें. जसें राहूच्या उपलब्धीचें चंद्र व सूर्य यांचा विशिष्ट संबंध हेंच निमित्त आहे त्याचप्रमाणें अन्तःकरणगुहा व आत्मा यांचा संबंध ब्रह्माच्या उपलब्धीचा हेतु आहे कारण अन्तःकरणाचें आत्म्याशीं सान्निध्य आहे व तें अवभासात्मक आहे. ज्याप्रमाणें प्रकाशयुक्त घटादिकांचीच उपलब्धि (ज्ञान) होते त्याप्रमाणें बुद्धीचा प्रत्ययरूप जो प्रकाश त्यानें विशिष्ट असलेल्या आत्म्याची उपलब्धि होते. यास्तव उपलब्धीला (साक्षात्काराला) कारण होणाऱ्या गुहेंत ब्रह्म अवस्थित आहे, अशा वाक्यावरून तें प्रकृतच आहे, असें ठरतें; आणि त्या वाक्याच्या वृत्तीप्रमाणें ह्म० व्याख्येप्रमाणें असलेल्या या वाक्यांत 'तें उत्पन्न करून त्यांतच प्रवेश करतें झालें' असें ह्मटलें आहे.

तदनुप्रविश्य। सच्च त्यच्चाभवत्। निरुक्तं चानिरुक्तं च। निलयनं चानिलयनं च। विज्ञानं चाविज्ञानं च। सत्यं चानृतं च सत्यमभवत्। यदिदं किंच।

तदेवेदमाकाशादिकारणं कार्यं सृष्ट्वा तदनुप्रविष्टमिवान्तर्गुहायां बुद्धौ द्रष्टृ श्रोतृ मन्तृ विज्ञातृत्येवं विशेषवदुपलभ्यते। स एव तस्य प्रवेशस्तस्मादस्ति तत्कारणं ब्रह्म। अतोऽस्तित्वादस्तीत्येवोपलब्धव्यं तत्। तत्कार्यमनुप्रविश्य, किं, सच्च मूर्तं त्यच्चामूर्तमभवत्। मूर्तामूर्ते ह्यव्याकृतनामरूपे आत्मस्थे अन्तर्गतेनाऽऽत्मना व्याक्रियेते व्याकृते च मूर्तामूर्तशब्दवाच्ये ते आत्मना त्वप्रविभक्तदेशकाले इति कृत्वाऽऽत्मा ते अभवदित्युच्यते। किंच निरुक्तं चानिरुक्तं च निरुक्तं नाम निष्कृष्य समानासमानजातीयेभ्यो देशकालविशिष्टतयेदं तदित्युक्तमनिरुक्तं तद्विपरीतं निरुक्तानिरुक्ते अपि मूर्तामूर्तयोरेव विशेषणे। यथा सच्च त्यच्च प्रत्यक्षपरोक्षे, तथा निलयनं चानिलयनं च। निलयनं नीडमाश्रयो मूर्तस्यैव धर्मः। अनिलयनं तद्विपरीतममूर्तस्यैव धर्मः। त्यदनिरुक्तानिलयनान्यमूर्तधर्मत्वेऽपि व्याकृतविषयाण्येव। सर्गोत्तरकालभावश्रवणात्। त्यदिति प्राणाद्यनिरुक्तं तदेवानिलयनं च। अतो विशेषणान्यमूर्तस्य व्याकृतविषयाण्येवैतानि। विज्ञानं चेतनमविज्ञानं तद्रहितमचेतनं पाषाणादि सत्यं च व्यवहारविषयमधिकारान्न परमार्थसत्यम्। एकमेव हि परमार्थसत्यं ब्रह्म। इह पुनर्व्यवहारविषयमापेक्षिकं सत्यं मृगतृष्णिकाद्यनृतापेक्षयोदकादि सत्यमुच्यते। अनृतं च तद्विपरीतम्। किं पुनरेतत्सर्वमभवत्परमार्थसत्यं किं पुनस्तद्ब्रह्म सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मेति प्रकृतत्वात्॥

अर्थ—याप्रमाणें तें आकाशादिकाचें कारण कार्याला उत्पन्न करून त्यांत मागून जणुकाय प्रविष्टसें होऊन गुहा या नावाच्या बुद्धींत पाहणारें, ऐकणारें, मनन करणारें, जाणणारें, अशाप्रकारें विशेषयुक्तसें उपलब्ध होतें, तोच त्याचा प्रवेश आहे. यास्तव तें कारण ब्रह्म आहे यास्तव त्याच्या अस्तित्वामुळें तें आहे, असेंच जाणावें. असो, त्या कार्यांत अनुप्रवेश करून मग काय? मग तें सत् ह्म० मूर्त व त्यत् ह्म० अमूर्त झालें. अन्तर्गत आत्म्याकडून ज्यांचें नाम रूप अव्यक्त आहे अशा आत्मस्वरूपात स्थित असलेल्या

मूर्तामूर्तांना व्यक्त केलें जातें. पण मूर्त व अमूर्त या शब्दांनीं वाच्य अशीं तीं व्यक्त केलेलीं नाम-रूपें आत्म्याशीं अविभक्त देशकाल असतात. ह्म० त्यांचा देश व काल आत्म्याच्या देश-कालाहून पृथक् नसतो. त्यामुळेंच आत्माच मूर्तामूर्त नाम-रूप झाला, असें येथें ह्मटलें जातें. तसाच तो निरुक्त व अनिरुक्त झाला. निरुक्त ह्म० समान व असमान जातीच्या पदार्थांपासून निराळें करून देश-कालविशिष्टतेनें 'हें तें' असें सांगितलेलें; व अनिरुक्त ह्म० तसें–सजातीय व विजातीय पदार्थांपासून पृथक् करून देशकालविशिष्ट, या रूपानें न सांगितलेलें. निरुक्त व अनिरुक्त हीं मूर्त व अमूर्त यांचींच विशेषणें आहेत. ज्याप्रमाणें सत् व त्यत् ह्मणजे प्रत्यक्ष व परोक्ष त्याप्रमाणें निलयन व अनिलयन. निलयन ह्म० नीड, आश्रय. तो मूर्ताचाच धर्म आहे, व अनिलयन ह्म० त्याच्या उलट–अनाश्रय. तो अमूर्तांचा धर्म आहे. त्यत्, अनिरुक्त व अनिलयन हे अमूर्ताचे धर्म असले तरी व्याकृताचीं विशेषणें आहेत. कारण सृष्टीच्या उत्तरकालीं त्यांचा भाव सांगितलेला आहे. त्यत् ह्म० प्राणादि (आकाररहित, रूपरहित), तेंच अनिरुक्त व अनिलयन आहे. यास्तव अमूर्ताचीं हीं विशेषणें व्याकृतविषयकच आहेत. विज्ञान ह्म० चेतन व अविज्ञान ह्म० चेतनरहित–अचेतन पाषाणादिक. सत्य ह्म० व्यवहारविषयक अबाधित. (ह्म० व्यवहारसमयीं बाधित न होणारें.) परमार्थविषयक सत्य नव्हे. कारण परमार्थ सत्य एक ब्रह्मच आहे. यास्तव येथें व्यवहारविषयक आपेक्षिक सत्य हाच सत्यशब्दाचा अर्थ आहे. मृगजलादि असत्य–मिथ्या पदार्थांच्या अपेक्षेनें उदकादिक सत्य ह्मटलें जातें. अनृत ह्म० अशा व्यावहारिक सत्याच्या उलट. हें सर्व कोण झालें ? परमार्थ सत्य हें सर्व झालें. परमार्थ सत्य काय ? तर ब्रह्म. कारण 'सत्य, ज्ञानं, अनन्तं ब्रह्म' अशा रीतीनें तें प्रकृत आहे.

तत्सत्यमित्याचक्षते । तदप्येष श्लोको भवति ।

इति ब्रह्मवल्ल्यध्याये षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥

यस्मात्सत्त्यदादिकं मूर्तामूर्तधर्मजातं यत्किंचेदं सर्वमविशिष्टं विकारजातमेकमेव सच्छब्दवाच्यं ब्रह्माभवत्तद्व्यतिरेकेणाभावान्नामरूपविकारस्य, तस्मात्तद्ब्रह्म सत्यमित्याचक्षते ब्रह्मविदः । अस्ति नास्तीत्यनुप्रश्नः प्रकृतस्तस्य प्रतिवचनविषय एतदुक्तमात्माऽकामयत बहु स्यामिति । स यथाकामं चाऽऽकाशादिकार्यं सृष्ट्वा तदनु प्रविश्य पश्यञ्शृण्वन्मन्वानो विजानन्बह्वभवत्तस्मात्तदेवेदमाकाशादिकारणं कार्यस्थं परमे व्योमन्हृदयगुहायां निहितं तत्प्रत्ययावभासविशेषेणोपलभ्यमानमस्तीत्येवं विजानीयादित्युक्तं भवति । तदेतस्मिन्नर्थे ब्राह्मणोक्त एष श्लोको मन्त्रो भवति । यथा पूर्वेष्वन्नमयाद्यात्मप्रकाशकाः पञ्चस्वप्येवं सर्वान्तरतमात्मास्तित्वप्रकाशकोऽपि मन्त्रः कार्यद्वारेण भवति ॥

इति ब्रह्मवल्ल्यर्थभाष्ये शांकरभाष्ये षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥

अर्थ—ज्या अर्थी हें जें काहीं सत्यादि मूर्तामूर्त धर्मजात आहे तें सर्व साधारण विकारजात एकच सत्-शब्दवाच्य ( सद्—या नावाचें.) ब्रह्म झालें आहे व त्यावांचून नामरूपविकाराचा अभाव आहे, ( ब्र० नामरूपविकार त्याहून पृथक् पदार्थ नाहीं ) त्या अर्थी तें ब्रह्म सत्य आहे, असें ब्रह्मवेत्ते ह्मणतात. ब्रह्म आहे कीं नाहीं, हा प्रकृत अनुप्रश्न आहे. त्याच्या प्रतिवचनप्रसंगीं (त्याच्या प्रतिवचन—विषयामध्यें) 'आत्मा मी बहु व्हावें अशी कामना करिता झाला,' असें ह्मटलें आहे. तो आपल्या कामनेप्रमाणें सत् त्यत् इत्यादि लक्षण आकाशादि कार्याला उत्पन्न करून व त्यामागून त्यात प्रवेश करून पहाणारा, ऐकणारा, मनन करणारा, जाणणारा इत्यादि प्रकारें बहु झाला, त्याअर्थी तेंच हें आकाशादिकार्याचें कारण ब्रह्म कार्यामध्यें स्थित असलेलें परम आकाशांतील हृदयगुहेंत अवस्थित असून त्या बुद्धिगुहेंचे मी कर्ता, भोक्ता इत्यादि प्रकारचे जे विशेष प्रत्यय त्यांनीं उपलब्ध होतें, असें जाणावें, असें या वाक्यानें सांगितल्यासारखें होतें. ( अर्थात् अन्तःकरणप्रत्ययविशिष्ट ब्रह्म जरी विषय होत असलें तरी स्वरूपतः तें अविषय आहे, असा भावार्थ ) या ब्राह्मणोक्त अर्थाविषयीं हा श्लोक—मन्त्र आहे. ज्याप्रमाणें पूर्वींच्या पांच पर्यायांत अन्न-

मयादिरूप आत्म्यांचे प्रकाशक श्लोक आहेत, त्याप्रमाणें सर्वांच्या अगदीं आंत असलेल्या आत्म्याचें अस्तित्व कार्यांच्या द्वारा प्रकाशित करणारा हा पुढील मंत्र आहे, (असा याचा भावार्थ. इति ब्रह्मवल्ल्यध्याये षष्ठोऽनुवाकः) ६

---

असद्वा इदमग्र आसीत्। ततो वै सदजायत। तदात्मानꣳ स्वयमकुरुत। तस्मात्तत्सुकृतमुच्यत इति।

असद्वा इदमग्र आसीत्। असदिति व्याकृतनामरूपविशेषविपरीतरूपमविकृतं ब्रह्मोच्यते। न पुनरत्यन्तमेवासत्। न ह्यसतः सज्जन्मास्ति। इदमिति नामरूपविशेषवद्व्याकृतं जगदग्रे पूर्वं *प्रागुत्पत्तेर्ब्रह्मैवासच्छब्दवाच्यमासीत्। ततोऽसतो वै सत्प्रविभक्तनामरूपविशेषमजायतोत्पन्नम्। किं ततः प्रविभक्तं कार्यमिति* पितुरिव पुत्रो नेत्याह। तदसच्छब्दवाच्यं स्वयमेवाऽऽत्मानमेवाकुरुत कृतवत्। यस्मादेवं तस्मात्तद्ब्रह्मैव सुकृतं स्वयं कर्त्रुच्यते। स्वयं कर्तृ ब्रह्मेति प्रसिद्धं लोके सर्वकारणत्वात्। यस्माद्वा स्वयमकरोत्सर्वं सर्वात्मना तस्मात्पुण्यरूपेणापि तदेव ब्रह्म कारणं सुकृतमुच्यते। सर्वथाऽपि तु फलसंबन्धादिकारणं सुकृतशब्दवाच्यं प्रसिद्धं लोके। यदि पुण्यं यदि वाऽन्यत्सा प्रसिद्धिर्नित्ये चेतनवत्कारणे सत्युपपद्यते तस्मादस्ति तद्ब्रह्म सुकृतप्रसिद्धेः। इतश्चास्ति। कुतः। रसत्वात्। कुतो रसत्वप्रसिद्धिर्ब्रह्मण इत्यत आह–

अर्थ—हें पूर्वी असत् होतें. 'असत्' या शब्दानें ज्याचें स्वरूप व्यक्त नाम व रूप या विशेषांच्या विपरीत आणि अविकृत आहे, असें ब्रह्म सांगितलें जातें. त्या शब्दानें तें वंध्यापुत्राप्रमाणें अत्यंत असत् होतें, शून्य होतें, असें सांगितलें जात नाहीं. कारण असत्-पासून-शून्यापासून सत्-वस्तूचा जन्म संभवत नाहीं 'इदं' ह्म० नामरूपविशेषांनी युक्त, व्याकृत—व्यक्त जगत्; 'अग्रे' ह्म० पूर्वी, उत्पत्तीच्या अगोदर 'असत्'— शब्दवाच्य ब्रह्मच होतें. त्या असत्-पासून सत् ह्म० ज्याचे नाम-रूपविशेष अगदीं

विभक्त आहेत असें जगत् उत्पन्न झालें. तर मग काय पित्यापासून जसा पुत्र अगदीं पृथक् असतो त्याप्रमाणें कार्य त्या ब्रह्माहून अगदीं भिन्न आहे? नाहीं, असें श्रुति सांगते—तें असत्-शब्दवाच्य ब्रह्म आपल्यालाच तें जगत् करतें झालें. ज्याअर्थी असें आहे त्या अर्थी स्वतः ब्रह्मच सुकृत ह्म० स्वयंकर्तृ ह्मटलें जातें. सर्वांचें कारण असल्यामुळें ब्रह्म स्वयंकर्तृ आहे, असें लोकामध्यें प्रसिद्ध आहे. किंवा ज्या अर्थी त्यानें स्वत. सर्वरूपानें सर्व केलें त्याअर्थी पुण्यरूपानेंही तेंच कारण ब्रह्म 'सुकृत' असें ह्मटलें जातें. सारांश कसेंही जरी समजलें तरी फलसंबंधादिकाचें कारण 'सुकृत' या शब्दाचें वाच्य आहे. हें लोकांत प्रसिद्ध आहे. मग ते जरी पुण्य असलें किंवा आणखी कांहीं असलें तरी ती प्रसिद्धि नित्य व चेतनयुक्त कारण असलें तरच उपपन्न होते. तस्मात् सुकृत-प्रसिद्धीवरून तें ब्रह्म आहे, असें ठरतें. आणखीही एका कारणानें तें आहे. कोणत्या? तर त्याला रसत्व आहे, या. पण ब्रह्माच्या रसत्वाची प्रसिद्धि कोणत्या निमित्तानें होते? असें कोणी विचारील ह्मणून श्रुति सांगते—

यद्वै तत्सुकृतम् । रसो वै सः । रसꣳ ह्येवायं लब्ध्वाऽऽनन्दी भवति । को ह्येवान्यात्कः प्राण्यात् । यदेष आकाश आनन्दो न स्यात् । एष ह्येवाऽऽनन्दयाति ।

यद्वै तत्सुकृतम् । रसो वै सः रसो नाम तृप्तिहेतुरानन्दकरो मधुराम्लादिः प्रसिद्धो लोके । रसमेवाय लब्ध्वा प्राप्याऽऽनन्दी सुखी भवति । नासत आनन्दहेतुत्वं दृष्टं लोके । बाह्यानन्दसाधनरहिता अप्यनीहा निरेषणा ब्राह्मणा बाह्यरसलाभादिव सानन्दा दृश्यन्ते विद्वांसो नून ब्रह्मैव रसस्तेषाम् । तस्मादस्ति तत्तेषामानन्दकारण रसवद्ब्रह्म । इतश्चास्ति कुत । प्राणनादिक्रियादर्शनात् । अयमपि हि पिण्डो जीवतः प्राणेन प्राणित्यपानेनापानिति । एवं वायवीया ऐन्द्रियकाश्च चेष्टाः संहतैः कार्यकरणैर्निर्वर्त्यमाना दृश्यन्ते । तच्चैकार्थवृत्तित्वेन संहननं नान्तरेण चेतनमसंहतं संभवति । अन्यत्रादर्शनात् । तदाह—यद्यदि ।

एष आकाशे परमे व्योम्नि गुहायां निहित आनन्दो न स्याच्च भवेत्को ह्येव लोकेऽन्यादपानचेष्टां कुर्यादित्यर्थः । कः प्राण्यात्प्राणनं वा कुर्यात्तस्मादस्ति तद्ब्रह्म । यदर्थाः कार्यकरणप्राणनादिचेष्टास्तत्कृत एव चाऽऽनन्दो लोकस्य । कुत । एष ह्येव पर आत्माऽऽनन्दयात्यानन्दयति सुखयति लोकं धर्मानुरूपम् । स एवाऽऽत्माऽऽनन्दरूपोऽविद्यया परिच्छिन्नो विभाव्यते प्राणिभिरित्यर्थः । भयाभयहेतुत्वाद्विद्वद्विदुषोरस्ति तद्ब्रह्म । सद्वस्त्वाश्रयणेन ह्यभयं भवति । नासद्वस्त्वाश्रयणेन भयनिवृत्तिरुपपद्यते । कथमभयहेतुत्वमित्युच्यते

अर्थ—तें जें सुकृत तोच प्रसिद्ध रस आहे. तृप्तीला कारण होणारा व आनंद देणारा असा मधुर, आम्ल इत्यादि हा ' रस ' म्हणून लोकामध्यें प्रसिद्ध आहे. हा पुरुष रसालाच प्राप्त होऊन आनन्दी सुखी होतो. असत्-अविद्यमान-वस्तु आनन्दाचें कारण होतें, असें व्यवहारात आढळत नाहीं. बाह्य आनन्दाच्या साधनानें रहित असलेले, प्रयत्नशून्य व निरिच्छ विद्वान् ब्राह्मण मधुरादि बाह्य रसाच्या लाभानें जसे तसेच ( म्ह० बाह्य रसाचा लाभ झाल्याप्रमाणेच ) आनन्दयुक्त झालेले दिसतात. खरोखर ब्रह्मच त्याचा रस आहे. तस्मात् त्याच्या आनन्दाचें कारण तें रसवत् ब्रह्म आहे. आणखीही एका कारणानें तें आहे कोणत्या ? तर प्राणनादि क्रिया दिसते, त्यावरून; जिवंत प्राण्याचा हाही पिंड प्राणाच्या योगानें प्राणन ( उच्छ्वास ) व अपानानें अपानन ( निश्वास ) क्रिया करतो. अशा प्रकारें वायुसंबंधीं व इंद्रियसंबंधीं चेष्टा संघात पावलेल्या शरीरेंद्रियांकडून केल्या जात असल्याचें दिसतें. पण वायु व इंद्रियें यांचे एका प्रयोजनाच्या साधनरूपानें संहनन होणें ( संघात पावणें, परस्पराच्या अधीन होणें म्ह० प्राणादिवायु व श्रोत्रादि इंद्रियें, यानीं एकाच प्रयोजनाचें साधन होऊन परस्पराना अनुकूल होणें ), हें असंहत ( म्ह० त्याच्याशीं संघात न पावलेल्या, साधनरूपानें परस्परानुकूल न झालेल्या ) चेतनावाचून संभवत नाहीं. कारण अन्यत्र तसा अनुभव येत नाहीं. ( म्ह० गृह, प्रासाद इत्यादिकामध्यें स्वतंत्र, गृहादिकामुळे अस्ति-

त्यांत न येणाऱ्या विलक्षण स्वामीवाचून माती, दगड, लांकडें, चुना इत्यादि अवयवांचा परस्पर संघात झालेला दिसत नाहीं. घर, वाडा, इत्यादि एका कार्याकरितां माती, दगड इत्यादि त्याचे अवयव एकमेकांच्या आधारानें एका विशिष्ट अवस्थेंत राहिलेले असतात. पण धन्यावांचून त्यांच्या त्या परस्पर पारतंत्र्याची उपपत्ति लागत नाहीं. त्याच न्यायानें शरीर इंद्रियें यांच्या संघातांतही त्याहून विलक्षण स्वामी असावा, असें वाटतें व तोही चेतन असल्यामुळें ब्रह्मच होय. कारण चेतनामध्यें भेद मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. अर्थात् त्यावरून ब्रह्माच्या अस्तित्वाची सिद्धि होते. ) श्रुति आतां तेंच सांगते. जर हा आकाशांत–परम आकाशांतील गुहेंत–स्थित असलेला आनंद नसता तर लोकांत अपानक्रिया कोणी केली असती ? अपानाचा अधोनयन हा व्यापार करण्यास कोण समर्थ झाला असता ? असा भावार्थ. किंवा प्राणन तरी कोणी केलें असतें ? ( या आनंदाच्या अभावीं कोणालाही कांहीं करता आलें नसतें. ) तस्मात् तें ब्रह्म आहे; आणि ज्याच्याकरितां शरीरेंद्रियाच्या प्राणनादि चेष्टा होतात त्याच्यामुळेंच लोकांना आनंद होतो. कारण काय कीं हाच पर आत्मा लोकाला धर्मानुरूप सुख देतो. ह्मणजे तोच आनन्दरूप आत्मा अविद्येमुळें परिच्छिन्न झाला आहे, असें प्राण्यांकडून जाणलें जातें, ( ह्म० प्राण्यांना तोच परिच्छिन्नसा भासतो, ) असा याचा अर्थ. विद्वान् व अविद्वान् याच्या क्रमानें अभयाला व भयाला कारण होत असल्यामुळेंही तें ब्रह्म आहे. कारण सद्वस्तूचा आश्रय केल्यानेंच अभय होतें, हें प्रसिद्ध आहे. असत् वस्तूच्या आश्रयानें भयाची निवृत्ति होऊं शकत नाहीं. आतां त्याला अभयहेतुत्व कसें तें सांगतात—

यदा ह्येवैष एतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयनेऽभयं प्रतिष्ठां विन्दते । अथ सोऽभयं गतो भवति । यदा ह्येवैष एतस्मिन्नुदरमन्तरं कुरुते । अथ तस्य भयं भवति । तत्त्वेव भयं विदुषोऽमन्वानस्य । तदप्येष श्लोको भवति ।

इति ब्रह्मवल्लयध्याये सप्तमोऽनुवाकः ॥ ७ ॥

यदा ह्येव यस्मादेष साधक एतस्मिन्ब्रह्मणि किंविशिष्टेऽदृश्ये दृश्यं नाम द्रष्टव्यं विकारो दर्शनार्थत्वाद्विकारस्य । न दृश्य-मदृश्यमविकार इत्यर्थः । एतस्मिन्नदृश्येऽविकारेऽविषयभूतेऽनात्म्येऽशरीरे यस्माददृश्यं तस्मादनात्म्यं यस्मादनात्म्यं तस्मादनिरुक्तम् । विशेषो हि निरुच्यते विशेषश्च विकारः । अविकारं च ब्रह्म । सर्वविकारहेतुत्वात्तस्मादनिरुक्तम् । यत एवं तस्मादनिलयनं निलयनं नीड आश्रयो न निलयनमनिलयनमनाधारं तस्मिन्नेतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयने सर्वकार्यधर्मविलक्षणे ब्रह्मणीति वाक्यार्थः । अभयमिति क्रियाविशेषणम् । अभयामिति वा लिङ्गान्तर परिणम्यते । प्रतिष्ठां स्थितिमात्मभावं विन्दते लभते । अथ तदा स तस्मिन्नानात्वस्य भयहेतोरविद्याकृतस्यादर्शनादभयं गतो भवति । स्वरूपप्रतिष्ठो ह्यसौ यदा भवति तदा नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति । अन्यस्य ह्यन्यतो भयं भवति नाऽऽत्मन एवाऽऽत्मनो भयं युक्तं तस्मादात्मैवाऽऽत्मनोऽभयकारणम् । सर्वतो हि निर्भया ब्राह्मणा दृश्यन्ते सत्सु भयहेतुषु तच्चायुक्तमसति भयत्राणे ब्रह्मणि । तस्मात्तेषामभयदर्शनादस्ति तदभयकारणं ब्रह्मेति । कदाऽसावभयं गतो भवति साधको यदा नान्यत्पश्यत्यात्मनि चान्तरं भेदं न कुरुते तदाऽभयं गतो भवतीत्यभिप्रायः । यदा पुनरविद्यावस्थायां हि यस्मादेषोऽविद्यावानविद्यया प्रत्युपस्थापितं वस्तु तैमिरिकद्वितीयचन्द्रवत्पश्यत्यात्मनि चैतस्मिन्ब्रह्मणि उदपि अरमल्पमप्यन्तरं छिद्रं भेददर्शनं कुरुते । भेददर्शनमेव ह्यन्तरकरणमल्पमपि भेदं पश्यतीत्यर्थः । अथ तस्माद्भेददर्शनाद्धेतोरस्य भेददर्शिन आत्मनो भयं भवति । तस्मादात्मैवाऽऽत्मनो भयकारणमविदुषस्तदेतदाह । तद्ब्रह्म त्वेव भयं भेददर्शिनो विदुष ईश्वरोऽन्यो मत्तोऽहमन्यः संसारीत्येवं विदुषो भेददृष्टमीश्वराख्यं तदेव ब्रह्माल्पमप्यन्तरं कुर्वतो भयं भवत्येकत्वेनामन्वानस्य । तस्माद्विद्वानप्यविद्वानेवासौ योऽयमेकमभिन्नमात्मतत्त्वं न पश्यति। उच्छेदहेतुदर्शनाद्धयु-

च्छेद्याभिमतस्य भय भवति । अनुच्छेद्यो ह्युच्छेदहेतुस्तत्रास-त्युच्छेदहेतावुच्छेद्ये न तद्दर्शनकार्यं भय युक्तम् । सर्वं च जगद्भयवद्दृश्येत । तस्माज्जगतो भयदर्शनाद्गम्यते नूनं तदस्ति भयकारणमुच्छेदहेतुरनुच्छेद्यात्मकं यतो जगद्बिभेतीति । तदेत-स्मिन्नप्यर्थ एष श्लोको भवति ॥

इति श्रीशांकरभाष्ये सप्तमोऽनुवाकः ॥ ७ ॥

अर्थ—ज्या वेळींच–ज्याअर्थी हा साधक या ब्रह्मामध्ये, कशाप्रकारच्या ब्रह्मामध्ये–अदृश्य ब्रह्मामध्यें. दृश्य ह्म० द्रष्टव्य पाहण्यास योग्य विकार कारण विकाराला दर्शनार्थत्व आहे ( ह्म० विकार दर्शनाकरिताच आहे. कोणताही विकार उपादान कारण विशेषआकारानें दिसावें, ह्मणूनच होतो ) जें दृश्य नव्हे तें अदृश्य. ह्म० अविकार असा भाव. या अदृश्य, अविकार, अविषयभुत, ' अनात्म्य '–अशरीर, ज्याअर्थी अदृश्य त्या अर्थी अनात्म्य, आणि ज्याअर्थी अनात्म्य त्याअर्थी अनिरुक्त, कारण विशेषच सांगितला जातो व विशेष विकार असतो. ब्रह्म अविकार आहे कारण तें सर्व विकाराचा हेतु आहे. ह्मणून तें अनिरुक्त. ज्याअर्थी असें आहे त्या अर्थी अनिलयन निलयन ह्म० नीड, आश्रय जें निलयन नव्हे तें अनिलयन, अनाधार त्या ह्या अदृश्य, अनात्म्य, अनिरुक्त, अनिलयन, व सर्व कार्याच्या धर्माहून विलक्षण अशा ब्रह्मामध्यें, असा याचा अर्थ ' अभय ' हें क्रियाविशेषण आहे. किंवा ' अभया ' असा त्याचा लिंगविपरिणाम करावा ( ह्म० अभय असें जें नपुंसक लिंग आहे त्याचें ' अभया ' असें स्त्रीलिंग करून घ्यावें ह्मणजे तें ' प्रतिष्ठा ' या पदाचें विशेषण होईल ) प्रतिष्ठेस स्थितीस-आत्मभावास प्राप्त होतो ( जेव्हा हा साधक या अविकार, अशरीर व अनिर्वाच्य ब्रह्मामध्यें निर्भयपणें अथवा भयरहित स्थितीस प्राप्त होतो ) तेव्हा तो त्याच्यामध्यें अविद्याकृत नानात्व या भयहेतूच्या अदर्शनामुळें अभयाला प्राप्त झालेला असा होतो जेव्हा तो स्वरूपामध्यें प्रतिष्ठित होतो तेव्हा दुसरें कांहीं पहात नाहीं, दुसरें कांहीं ऐकत नाहीं, व दुसरें कांहीं जाणत नाहीं कारण

स्वतः भिन्न असलेल्या एकाला दुसऱ्यापासून भय होतें. आपल्यालाच आपलें भय असणें, युक्त नव्हे. यास्तव आत्माच आत्म्याच्या अभयाचें कारण आहे. पण भयाचीं कारणें असतांना सुद्धां ब्राह्मण सर्वतः निर्भय दिसतात. परंतु भयापासून रक्षण करणारें ब्रह्म जर नसतें तर ब्राह्मणांनीं निर्भय होणें अयुक्त आहे. तस्मात् ह्म० ते अभय असल्याचें प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें त्यांच्या अभयाचें कारण ब्रह्म आहे. हा साधक अभयास पोंचला आहे असें केव्हां होतें तर जेव्हां दुसरें कांहीं ( भेद ) पहात नाहीं; जेव्हां तो आत्म्यामध्यें अंतर–भेद करीत नाहीं तेव्हां अभयास पोंचला आहे, असा होतो; हा अभिप्राय. पण जेव्हां हा अविद्यावस्थेंत अविद्येनें पुढें उभ्या केलेल्या वस्तूला, तिमिररोग झालेल्या पुरुषाला दिसणाऱ्या दुसऱ्या चंद्राप्रमाणें, पहातो व या आत्म्यामध्यें–ब्रह्मामध्यें थोडेंसेंही अंतर, छिद्र, भेददर्शन करतो; भेद पाहणें हेंच अन्तर करणें आहे; अल्पही भेद पाहतो, असा याचा अर्थ; तेव्हां त्या भेददर्शनामुळेंच त्या भेद पाहणाऱ्या आत्म्याला भय होतें. तस्मात् अविद्वान् आत्म्याच्या भयाचें कारण आत्माच आहे. तेंच आतां सांगतात–तें ब्रह्मच भददर्शी विद्वानाचें भय आहे. मजहून ईश्वर निराळा व मी संसारी ईश्वराहून निराळा असें जाणणाऱ्या, थोडेंसेंही अन्तर करणाऱ्या व एकत्वानें त्याला न मानणाऱ्या पुरुषाला तेंच भेदानें पाहिलेलें ईश्वरसंज्ञक ब्रह्म भय होतें. तस्मात् जो हा एक अभिन्न आत्मतत्त्व पहात नाहीं तो विद्वान् असला तरी अविद्वानच होय. मी उच्छेद–नाश पावण्यास योग्य आहें, असें मानणाऱ्या पुरुषाला उच्छेदाचें निमित्त पाहिल्यानें भय होतें. ( संहार करणारा परमेश्वर माझा संहार करील किंवा मला नरकांत टाकील, असें समजणाऱ्या पुरुषाला भय होतें. ) पण उच्छेदाचा हेतु ( ब्रह्म ) अनुच्छेद्य ( ह्म० उच्छेद नाश न पावणारा )आहे.(कारण त्यालाही उच्छेद पावणारा मानल्यास अनवस्था दोष येतो. त्यामुळें त्या नाशाच्या हेतूला नित्य समजणेंच उचित आहे. पण ब्रह्मावाचून दुसरें कांहींच नित्य संभवत नाहीं; असा याचा भावार्थ. ) तेव्हां उच्छेदाचा हेतु ब्रह्म जर नसतें तर उच्छेद्याच्या ठिकाणीं त्या उच्छेदहेतूच्या-

दर्शनाचें कार्य जें भय तें उपपन्न झालें नसतें. सर्व जगत् भयानें युक्त असलेलें दिसतें. यास्तव जगाचें भय प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें ' खचित तें अनुच्छेद्यरूप उच्छेदहेतु व भयाचें कारण आहे कीं ज्याला हें सर्व जगत् भीत आहे, ' असें कळतें. याच अर्थी हा पुढील श्लोक ( मंत्र ) आहे. ( इति ब्रह्मवल्ल्यध्याये सप्तमोऽनुवाकः ) ७

---

भीषाऽस्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च । मृत्युर्धावति पञ्चम इति ।

भीषा भयेनास्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः । भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च । मृत्युर्धावति पञ्चम इति । वातादयो हि महार्हाः स्वयमीश्वराः सन्तः पवनादिकार्येष्वायासबहुलेषु नियताः प्रवर्तन्ते । तद्युक्तं प्रशास्तरि सत्यन्यस्मिन्नियमेन तेषां प्रवर्तनं । तस्मादस्ति भयकारणं तेषां प्रशास्तृ ब्रह्म । यतस्ते भृत्या इव राज्ञोऽस्माद्ब्रह्मणो भयेन प्रवर्तन्ते। तच्च भयकारणमानन्दं ब्रह्म।

अर्थ—याच्या भयानें वायु वाहतो. याच्या भयानें सूर्य उदय पावतो. याच्या भयानें अग्नि, इंद्र व पांचवा मृत्यु धावतो. वायुप्रभृति महापूज्य व स्वतः ईश्वर असूनही ज्यांत पुष्कळ आयास आहेत, अशा वाहणें, उगवणें इत्यादि कार्यांमध्यें नियमानें प्रवृत्त होतात. पण दुसरा प्रशास्ता जर असेल तरच त्यांचें हें नियमानें प्रवृत्त होणें उपपन्न होईल. यास्तव त्याच्या भयाचें कारण त्यांचें प्रशासन करणारें ब्रह्म आहे. ते राजाच्या भृत्यांप्रमाणें ज्या या ब्रह्माच्या भयानें प्रवृत्त होतात, तें भयाचें कारण आनन्द ब्रह्म आहे.

सैषाऽऽनन्दस्य मीमाꣳसा भवति ।

तस्यास्य ब्रह्मण आनन्दस्यैषा मीमांसा विचारणा भवति । किमानन्दस्य मीमांस्यमित्युच्यते । किमानन्दो विषयविषयि-

संबन्धजनितो लौकिकानन्दवदाहोस्वित्स्वाभाविक इत्येवमेषाऽऽनन्दस्य मीमांसा ॥

अर्थ—त्या या ब्रह्माच्या आनन्दाची ही मीमासा—विचारणा आहे. पण आनन्दामध्यें मीमासा करण्यासारख काय आहे? ह्मणून कोणी विचारील, वास्तव श्रुति सागते—हा आनन्द लौकिक आनदाप्रमाणें विषय व विषयी याच्या संबधापासून उत्पन्न झालेला आहे कीं, स्वाभाविक आहे, अशी ही आनंदाची मीमासा ( विचारणा या पुढें केली जाते. )

तत्र लौकिक आनन्दो बाह्याध्यात्मिकसाधनसंपत्तिनिमित्त उत्कृष्ट । स य एष निर्दिश्यते ब्रह्मानन्दानुगमार्थम् । अनेन हि प्रसिद्धेनाऽऽनन्देन व्यावृत्तविषयबुद्धिगम्य आनन्दोऽनुगन्तु शक्यते । लौकिकोऽप्यानन्दो ब्रह्मानन्दस्यैव मात्राऽविद्यया तिरस्क्रियमाणे विज्ञान उत्कृष्यमाणायां चाविद्यायां ब्रह्मादिभिः कर्मवशाद्यथाविज्ञान विषयादिसाधनसबन्धवशाच्च विभाव्यमानश्च लोकेऽनवस्थितो लौकिक सपद्यते स एवाविद्याकामकर्मापकर्षेण मनुष्यगन्धर्वाद्युत्तरोत्तरभूमिष्वकामहतविद्वच्छ्रोत्रियप्रत्यक्षो विभाव्यते शतगुणोत्तरोत्तरोत्कर्षेण यावद्धिरण्यगर्भस्य ब्रह्मण आनन्द इति । निरस्ते त्वविद्याकृते विषयविषयिविभागे विद्यया स्वाभाविक. परिपूर्ण एक आनन्दोऽद्वैतो भवतीत्येतमर्थं विभावयिष्यन्नाह—

अर्थ—त्यातील लौकिक आनद बाह्य व आध्यात्मिक ( शरीरसबधी ) साधनाची सपत्ति या निमित्तानें होणारा व ह्मणूनच उत्कृष्ट आहे. ब्रह्मानन्दाच्या अनुगमार्थ त्याचाच निर्देश केला जातो. ( अनुगमार्थ ह्म० अनुसरणार्थ ब्रह्मानन्दाचें अनुसरण करण्यासाठीं ) याच प्रसिद्ध आनदानें विषयापासून व्यावृत्त झालेल्या बुद्धीनें ज्ञात होणारा आनंद प्राप्त करून घेता येतो कारण लौकिक आनदसुद्धा ब्रह्मानन्दाचाच लेश आहे अविद्येनें विज्ञान तिरस्कृत झालें असता व अविद्येचा ( उत्तरोत्तर ) उत्कर्ष होत असता या लोकीं ब्रह्मादिकाकडून कर्मवशात्, विज्ञानाच्या अनुसार, आणि

विषयादि साधनाच्यासंबंधामुळें अनुभविला जाणारा अस्थिर लौकिक आनंद निष्पन्न होतो. तोच कामनेनें पराभूत न झालेल्या विद्वान् श्रोत्रियाला प्रत्यक्ष असलेला आनंद अविद्या, काम व कर्म यांच्या अपकर्षानें ( ह्म० उत्तरोत्तर न्यूनतेमुळें ) मनुष्य, गंधर्व इत्यादि उत्तरोत्तर भूमींमध्यें हिरण्यगर्भ, या ब्रह्माच्या आनंदापर्यंत उत्तरोत्तर शतपट उत्कर्षानें रहात असल्याचा अवभास होतो. पण अविद्याकृत विषय विषयिविभागाचें विद्येनें निरसन केलें असता स्वाभाविक, परिपूर्ण, एक व अद्वैत आनन्द होतो, हा अर्थ अनुभवास आणून देत श्रुति ह्मणते–

युवा स्यात्साधुयुवाऽध्यायकः । आशिष्ठो दढिष्ठो बलिष्ठ. । तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् । स एको मानुष आनन्द. । ते ये शत मानुषा आनन्दाः ( १ ) । स एको मनुष्यगन्धर्वाणामानन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शत मनुष्यगन्धर्वाणामानन्दा. । स एको देवगन्धर्वाणामानन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शत देवगन्धर्वाणामानन्दाः । स एक. पितृणा चिरलोकलोकानामानन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शत पितृणा चिरलोकलोकानामानन्दाः । स एक आजानजाना देवानामानन्दः ( २ ) । श्रोत्रियस्य चाकामहतस्य ।

युवा प्रथमवयाः । साधुयुवेति साधुश्चासौ युवा चेति यूनो विशेषणम् । युवाऽप्यसाधुर्भवति साधुरप्ययुवाऽतो विशेषण युवा स्यात्साधुयुवेति । अध्यायकोऽधीतवेदः । आशिष्ठ आशास्तृतमः । दढिष्ठो दृढतमः । बलिष्ठो बलवत्तम' । एवमाध्यात्मिकसाधनसपन्नः । तस्येय पृथिव्युर्वी सर्वा वित्तस्य वित्तेनोपभोगसाधनेन दृष्टार्थेनादृष्टार्थेन च कर्मसाधनेन सपन्ना पूर्णा राजा पृथिवीपतिरित्यर्थः । तस्य च य आनन्द स एको मानुषो मनुष्याणां प्रकृष्ट एक आनन्दः । ते ये शत मानुषा आनन्दाः स एको मनुष्यगन्धर्वाणामानन्दः । मानुषानन्दाच्छतगुणेनोत्कृष्टो मनुष्यगन्धर्वाणामानन्दा भवति । मनुष्याः सन्तः कर्मविद्याविशेषाद्गन्धर्वत्व प्राप्ता मनुष्यगन्धर्वा । ते ह्यन्तर्धानादिशक्ति-

संपन्नाः सूक्ष्मकार्यकरणाः । तस्मात्प्रतिघाताल्पत्वं तेषां द्वंद्वप्रतिघातशक्तिसाधनसंपत्तिश्च । ततोऽप्रतिहन्यमानस्य प्रतीकारवतो मनुष्यगन्धर्वस्य स्याच्चित्तप्रसादः । तत्प्रसादविशेषात्सुखविशेषाभिव्यक्तिः । एवं पूर्वस्याः पूर्वस्या भूमेरुत्तरस्यामुत्तरस्यां भूमौ प्रसादविशेषतः शतगुणेनाऽऽनन्दोत्कर्ष उपपद्यते । प्रथमं त्वकामहताग्रहणं मनुष्यविषयभोगकामानभिहतस्य श्रोत्रियस्य मनुष्यानन्दाच्छतगुणेनाऽऽनन्दोत्कर्षो मनुष्यगन्धर्वेण तुल्यो वक्तव्य इत्येवमर्थम् । साधुयुवाऽध्यायक इति श्रोत्रियत्वावृजिनत्वे गृह्येते । ते ह्यविशिष्टे सर्वत्र । अकामहतत्वं तु विषयोत्कर्षापकर्षतः सुखोत्कर्षापकर्षाय विशेष्यते । अतोऽकामहतग्रहणम्, तद्विशेषतः शतगुणसुखोत्कर्षोपलब्धेरकामहतत्वस्य परमानन्दप्राप्तिसाधनत्वविधानार्थम् । व्याख्यातमन्यत् । देवगन्धर्वा जातित एव । चिरलोकलोकानामिति पितॄणां विशेषणम् । चिरकालस्थायी लोको येषां पितॄणां त चिरलोकलोका इति । आजान इति देवलोकस्तस्मिन्नाजाने जाता आजानजा देवाः स्मार्तकर्मविशेषतो देवस्थानेषु जाताः ॥

अर्थ—'युवा–' पूर्ववयस्क. 'साधुयुवा' साधु व तोच युवा, असें साधु हें तरुणाचें विशेषण. तरुणही असाधु असतो व साधुही अतरुण असतो; यास्तव 'युवा स्यात्साधुयुवा' असें विशेषण दिलें आहे. 'अध्यायकः–' अधीतवेद; ज्यानें वेदाध्ययन केलें आहे; 'आशिष्ठ–' अतिशय आशा करणारा; अतिशय दृढ, अतिशय बलवान्; याप्रमाणें आध्यात्मिक साधनांनीं संपन्न; त्याचीच ही सर्व पृथ्वी वित्तानें ह्म० उपभोगसाधनानें दृष्टार्थ व अदृष्टार्थ अशा कर्मसाधनानें संपन्न–पूर्ण असावी ह्मणजे तो पृथिवीपति राजा असावा, हा भावार्थ. त्याचा जो आनंद तो एक मानुष–मनुष्याचा सर्वोत्कृष्ट एक–आनन्द आहे. असे जे शंभर मानुष आनंद तो एक मनुष्यगंधर्वांचा आनन्द आहे. मानुषानन्दाहून मनुष्यगंधर्वांचा आनन्द शतपट उत्कृष्ट असतो. प्रथम मनुष्य असून विशेष प्रकारचें कर्म

व उपासना यांच्या योगानें जे गंधर्वत्वास प्राप्त झालेले असतात ते मनुष्य-गंधर्व होत. ते अन्तर्धानादिशक्तींनीं संपन्न असतात व त्यांचीं देहेंद्रियें सूक्ष्म असतात. त्यामुळें त्याना शीतोष्णादिकाचा प्रतिघात थोडा होतो, व त्या द्वंद्वाना प्रतिघात करण्याचें सामर्थ्य व साधनें यांनीं ते संपन्न असतात. त्यामुळें ज्याला शीतोष्णादिकाचा उपसर्गच होत नाहीं व तो झाला तरी त्याला प्रतीकार करण्याचें सामर्थ्य ज्याला असतें त्या मनुष्यगंधर्वांच्या चित्तामध्यें प्रसाद असतो, आणि त्या विशेषप्रकारच्या चित्तप्रसादामुळें विशेषप्रकारच्या सुखाची अभिव्यक्ति होते. याच न्यायानें पूर्व पूर्व भूमीपेक्षा उत्तर उत्तर भूमीमध्यें प्रसादविशेषामुळें शतपट आनंदोत्कर्ष उपपन्न होतो. पहिल्या ह्मणजे मानुषानंदाच्या पर्यायात ' श्रोत्रियस्य चाकामहतस्य ' हें पुढील सर्व पर्यायात असलेलें वाक्य नाहीं. त्याचें कारण मनुष्याच्या विषय-भोगाविषयींच्या कामनेनें व्याकुळ न झालेल्या श्रोत्रियाचा आनन्दोत्कर्ष मानुष आनंदाहून शतपट अधिक ह्मणजेच मनुष्यगंधर्वांच्या आनंदाइतका असतो, हें सांगावें, हें आहे ( ह्म० निष्काम श्रोत्रियाचा आनंद मानुषानंदाहून शतपट अधिक ह्मणजेच मनुष्यगंधर्वांच्या आनंदासारखा असतो, हें सांगण्यासाठीं, मानुषानंदाच्या पर्यायात श्रोत्रियाच्या आनंदाचा उल्लेख केला नाहीं, असा याचा भावार्थ ) श्रुतींत ' साधुयुवा ' व ' अध्यायकः ' अशीं जीं दोन विशेषणें आहेत त्यावरून त्या सार्वभौम राजाच्या ठिकाणींही श्रोत्रियत्व व निष्पापत्व असलें पाहिजे, असें होतें ( अर्थात् ' अध्यायक ' हें श्रोत्रियत्वाचें व ' साधु युवा ' यातील ' साधु ' हें पद विहितानुष्ठानाचें द्योतक आहे. त्यामुळें सद्विद्या व सच्छिल यानीं संपन्न असलेल्या तरुण, सुदृढ, सार्वभौम राजाचा आनन्द हा एक मानुषानन्द आहे. ) श्रोत्रियत्व व निष्पापत्व हे दोन धर्म पुढील सर्व पर्यायांत एक सारखेच समजावे. पण ' अकामहतत्व '-बरोबर श्रोत्रियत्वाचा जो उल्लेख केला आहे ह्मणजे अकामहतत्व या विशेषणाचा जो उपयोग केला आहे तो विषयाचा उत्कर्ष व अपकर्ष यांच्या अनुरोधानें सुखाचा उत्कर्ष व अपकर्ष होतो, हें सुचविण्यासाठीं

आहे अकामहतत्वाच्या विशेषामुळें शतगुण सुखोत्कर्ष अनुभवास येतो. यास्तव अकामहतत्व हें परमानन्द प्राप्तीचें साधन आहे, असें विधान करण्यासाठीं 'अकामहत' या विशेषणाचें ग्रहण केलें आहे. बाकी सर्व पदांचें व्याख्यान केलें आहे. देवगंधर्व जातितःच ह्म० जन्मतःच गंधर्व असतात. 'चिरलोकानां' हें पितरांचें विशेषण आहे. ज्या पितराचा लोक चिरकाल स्थायी असतो ते चिरलोकलोक होत. आजान ह्म० देवलोक. त्या आजानांत झालेले आजानज देव होत. ते विशेषप्रकारच्या स्मार्त कर्मामुळें त्या देवस्थानांमध्यें उत्पन्न झालेले असतात. ( येथें आह्मी केवल भाष्याचें भाषांतर केलें आहे. त्यावरून श्रुतींतील वाक्याचा शब्दशः अर्थ कळणार नाहीं. तथापि जिज्ञासूंनीं तो रत्न ४ थें पृष्ठ ७९ ते ८४ येथें पहावा. )

ते ये शतमाजानजाना देवानामानन्दाः । स एकः कर्मदेवाना देवानामानन्दः । ये कर्मणा देवानपियन्ति । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शत कर्मदेवानां देवानामानन्दाः । स एको देवानामानन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतं देवानामानन्दाः । स एक इन्द्रस्याऽऽनन्दः ( ३ ) । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शतमिन्द्रस्याऽऽनन्दाः । स एको बृहस्पतेरानन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शत बृहस्पतेरानन्दाः । स एकः प्रजापतेरानन्द । श्रोत्रियस्य चाकामहतस्य । ते ये शत प्रजापतेरानन्दाः । स एको ब्रह्मण आनन्दः । श्रोत्रियस्य चाकामहतस्य ( ४ ) ।

कर्मदेवा ये वैदिकेन कर्मणाऽग्निहोत्रादिना केवलेन देवानपियन्ति । देवा इति त्रयस्त्रिंशद्धविर्भुजः । इन्द्रस्तेषां स्वामी तस्याऽऽचार्यो बृहस्पतिः । प्रजापतिर्विराट् त्रैलोक्यशरीरो ब्रह्मा समष्टिव्यष्टिरूप संसारमण्डलव्यापी । यत्रैत आनन्दभेदा एकतां गच्छन्ति धर्मश्च तन्निमित्तो ज्ञानं च तद्विषयमकामहतत्वं च निरतिशयं यत्र स एष हिरण्यगर्भो ब्रह्मा, तस्यैष आनन्दः श्रोत्रियेणावृजिनेनाकामहतेन च सर्वत प्रत्यक्षमुपलभ्यते । तस्मादेतानि

त्रीणि साधनानीत्यवगम्यते । तत्र श्रोत्रियत्वावृजिनत्वे नियते अकामहतत्वं तूत्कृष्यत इति प्रकृष्टसाधनताऽवगम्यते । तस्याकामहतत्वप्रकर्षश्चोपलभ्यमानः श्रोत्रियप्रत्यक्षो ब्रह्मण आनन्दो यस्य परमानदस्य मात्रैकदेशः । " एतस्य वाऽऽनन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति " इति श्रुत्यन्तरात् । स एष आनन्दो यस्य मात्रा समुद्राम्भस इव विप्रुषः प्रविभक्ता यत्रैकतां गता स एष परमानन्दः स्वाभाविकोऽद्वैतत्वादानन्दानन्दिनोश्चाविभागोऽत्र । तदेतन्मीमांसाफलमुपसंह्रियते—

अर्थ—कर्मदेवा ह्म० जे केवळ अग्निहोत्रादि वैदिक कर्मांच्या योगानें देवभावास प्राप्त होतात ते. यज्ञांतील हविर्भाग घेणारे जे तेतीस देव त्यांचाच येथें देवशब्दानें उल्लेख केला आहे. ( आठ वसू, अकरा रुद्र, बारा आदित्य, इंद्र व प्रजापति असे मिळून तेतीस देव होतात. ) ' देवांचे जे शंभर आनंद तो इंद्राचा एक आनंद ' या वाक्यांतील इंद्र ह्मणजे वरील देवांचा स्वामी. ' इंद्राचे जे शंभर आनंद तो बृहस्पतीचा एक आनन्द ' या वाक्यांतील बृहस्पति ह्मणजे वरील इंद्राचा आचार्य. ' बृहस्पतीचे जे शंभर आनंद तो प्रजापतीचा एक आनंद ' या वाक्यांतील प्रजापति ह्मणजे विराट्. त्रैलोक्य हेंच ज्याचें शरीर आहे, असा समष्टिव्यष्टिरूप संसारमंडलव्यापी ब्रह्मा-ब्रह्मदेव. ' प्रजापतीचे जे शंभर आनंद तो ब्रह्माचा एक आनन्द ' येथील ब्रह्मा ह्म० हिरण्यगर्भ. जेथें हे सर्व आनंदाचे भेद एकत्वास प्राप्त होतात; तन्निमित्तक धर्म व तद्विषयक ज्ञानही एकत्वास प्राप्त होतें, ( ह्म० नुस्ता आनंदच एकरूप होत नाहीं तर त्या आनंदाना कारण होणारा धर्म व त्यांचें ज्ञान हीं सुद्धां एकरूप होतात ) आणि जेथें निरतिशय अकामहतत्व असतें ( ह्म० पराकाष्ठेस पोचलेलें विषयवैराग्य असतें ) तो हा हिरण्यगर्भ ब्रह्मा होय. त्याचा हा आनंद निष्पाप व निष्काम ( अकामहत ) श्रोत्रियाकडून सर्वतः प्रत्यक्ष अनुभवला जातो. यास्तव हीं तीन साधनें आहेत, असें ज्ञात होतें. त्यांतील श्रोत्रियत्व व निष्पापत्व हीं नियत ( ह्म० न्यूनाधिक न होणारीं ) आहेत, पण अकामहतत्व उत्तरोत्तर उत्कर्ष पावतें. त्यामुळें त्याची प्रकृष्ट साधनता ( ह्म०

तें सर्वोत्तम साधन आहे, हें ) ज्ञात होतें. निष्कामत्वाच्या आधिक्यामुळें अनुभविला जाणारा व श्रोत्रियालाच प्रत्यक्ष ज्ञात होणारा त्या हिरण्यगर्भाचा आनंद ज्या परमानन्दाची मात्रा–एकदेश–अंश आहे, कारण 'अन्य सर्व भूतें याच आनंदाच्या अंशावर आपला निर्वाह करितात' अशी दुसरी श्रुति आहे. तो हा हिरण्यगर्भाचा आनन्द ज्याची मात्रा–लेश आहे व अगदीं पृथक् असलेल्या समुद्रजलाच्या थेंबाप्रमाणें इतर सर्व लेशभूत आनंद ज्यामध्यें एकत्वास प्राप्त झाले आहेत तो हा परमानन्द स्वाभाविक आहे. कारण त्याला अद्वैतत्व आहे (ह्म० तो एकरूप झालेला आहे.) यात आनन्द व आनन्दी (ज्याला आनद आहे तो चेतन) याचा अविभाग ह्म० ऐक्य आहे. (भेद नाहीं. त्या आनंदाला विषयविषयिभाव असतो या अभिप्रायानें वर प्रत्यक्ष ह्मटलेलें नाहीं तर अज्ञान, संशय इत्यादि आवरणें त्यावर नसतात. या आशयानें प्रत्यक्ष ह्मटलें आहे.) असो; आतां या मीमांसेच्या फलाचा उपसंहार करितात.–

स यश्चायं पुरुषे । यश्चासावादित्ये । स एकः ।

स यश्चायं पुरुष इति । यो गुहायां निहितः परमे व्योम्न्याकाशादिकार्यं सृष्ट्वान्नमयान्तं तदेवानुप्रविष्टः स य इति निर्दिश्यते । कोऽसावयं पुरुषे । यश्चासावादित्ये यः परमानन्दः श्रोत्रियप्रत्यक्षो निर्दिष्टो यस्यैकदेशं ब्रह्मादीनि भूतानि सुखार्हाण्युपजीवन्ति स यश्चासावादित्य इति निर्दिश्यते । स एको भिन्नप्रदेशस्थघटाकाशाकाशैकत्ववत् । ननु तन्निर्देशे स यश्चायं पुरुष इत्यविशेषतोऽध्यात्मं न युक्तो निर्देशो यश्चायं दक्षिणेऽक्षन्निति तु युक्तः प्रसिद्धत्वात् । न पराधिकारात् । परो ह्यात्माऽत्राधिकृतोऽदृश्येऽनात्म्ये भीषाऽस्माद्वातः पवते सैषाऽऽनन्दस्य मीमांसेति । न ह्यकस्मादप्रकृतो युक्तो निर्देष्टुं परमात्मविज्ञानं च विवक्षितम् । तस्मात्पर एव निर्दिश्यते 'स एक' इति । नन्वानन्दस्य मीमांसा प्रकृता तस्या अपि फलमुपसंहर्तव्यम् । अभिन्नः स्वाभाविक आनन्दः परमात्मैव न विषयविष-

यिसंबन्धजनित इति । ननु तदनुरूप एवायं निर्देशः 'स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एक' इति भिन्नाधिकरणस्थविशेषोपमर्दन। नन्वेवमप्यादित्यविशेषग्रहणमनर्थकम्। नानर्थकम्। उत्कर्षापकर्षापोहार्थत्वात्। द्वैतस्य हि मूर्तामूर्तलक्षणस्य पर उत्कर्षः सवित्रभ्यन्तर्गत. स चेत्पुरुषगतविशेषोपमर्दन परमानन्दमपेक्ष्य समो भवति न कश्चिदुत्कर्षोऽपकर्षो वा तां गतिं गतस्येत्यभयं प्रतिष्ठां विन्दत इत्युपपन्नम्॥

अर्थ—तो जो आनंद या पुरुषामध्यें आहे. परम आकाशांतील गुहेंत स्थित असलेला जो आकाशादि अन्नमयान्त कार्य उत्पन्न करून त्यातच मागून प्रविष्ट झाला त्याचाच येथें 'स यः' या पदानीं निर्देश केला जात आहे. कोण तर जो हा या पुरुषात आहे आणि जो हा आदित्यामध्यें आहे, जो परमानन्द 'श्रोत्रियप्रत्यक्ष' म्हणून म्हटलेला आहे, ज्याच्या एकदेशावर सुखाला पात्र असलेलीं ब्रह्मादि स्थावरान्त भूतें आपली उपजीविका करितात त्याचाच 'यश्चासावादित्ये०' या वाक्यानें निर्देश केला जात आहे. तो एक आहे. भिन्नप्रदेशीं असलेल्या अनेक घटांतील आकाश व महाकाश याच्या एकत्वाप्रमाणें. शंका—अहोपण त्याचा जर तो निर्देश असता तर 'तो जो हा पुरुषांत आहे' असा सामान्यतः अध्यात्मनिर्देश करणें युक्त नव्हे. तर 'आणि जो हा दक्षिण नेत्रांत असलेला पुरुष तो एक आहे' असें म्हणणें युक्त आहे. कारण तो प्रसिद्ध आहे. (कारण 'य एष एतस्मिन्मण्डले पुरुषो यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुषः' इत्यादि दुसऱ्या श्रुतींत मंडलस्थ पुरुषाचें दक्षिणनेत्रस्थ पुरुषाशीं ऐक्य असल्याचें प्रसिद्ध आहे. त्यामुळें येथेंही आदित्यस्थ पुरुषाशीं ऐक्य सांगावयाचें झाल्यास दक्षिण नेत्राचें ग्रहण करणेंच युक्त दिसतें, असा याचा भावार्थ.) समाधान—(अध्यात्म व अधिदैवत लिंगात्म्याच्या उपासनेचें विधान जेव्हां करावयाचें असतें तेव्हां तसा निर्देश करिता येतो. पण येथें त्याचें उपासन विवक्षित नाहीं, असें सांगतात—) दक्षिणनेत्रस्थ पुरुषाचा निर्देश करणें युक्त नव्हे. कारण येथें

पर आत्म्याचा अधिकार आहे. ह्म० येथें पर आत्माच ' अदृश्ये अनात्म्ये ' ' भीषास्माद्वातः पवते ' ' सैषानन्दस्य मीमांसा० ' इत्यादि वाक्यांनीं अधिकृत आहे. ( ह्म० त्याचें प्रतिपादन आरंभिलेलें आहे. ) त्यामुळें अप्रकृत 'दाक्षिणेऽक्षन्' पुरुषाचा अकस्मात् निर्देश करणें युक्त नव्हे. परमात्मविज्ञान येथें विवक्षित आहे. तस्मात् ' स एकः ' या वाक्यानें परमात्म्याचाच निर्देश केला आहे. शंका–अहोपण आनन्दाची मीमांसा प्रकृत आहे. त्यामुळें तिच्या फलाचाही उपसंहार करणें उचित आहे. कारण अखंड स्वाभाविक आनंदच परमात्मा आहे. विषय व विषयी याच्या संबंधापासून उत्पन्न झालेला आनंद हा परमात्मा नव्हे. मध्यस्थ–तें खरें; पण ' स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एकः ' ह्म० तो जो हा पुरुषात आहे आणि जो हा आदित्यांत आहे तो एक आहे, असा भिन्न अधिकरणांतील विशेषाचा उपमर्द ( बाध ) करून या प्रकृत मीमांसेच्या अनुरूपच निर्देश केला आहे. शंका–अहोपण तसें जरी ह्मटलें तरी 'आदित्य' या विशेष पदार्थाचें ग्रहण करणें व्यर्थ आहे. समाधान–नाहीं; व्यर्थ नाहीं. तें आदित्याचें ग्रहण उत्कर्ष व अपकर्ष याचा निषेध करण्याकरितां आहे. कारण मूर्तामूर्तलक्षण द्वैताचा परम ( सर्वोत्तम ) उत्कर्ष सवित्याच्या मंडलामध्यें झालेला आहे. तो जर पुरुषातील विशेषाचा बाध करून परमानन्दाच्या अपेक्षेनें सम होत असला व त्या गतीला गेलेल्या पुरुषाचा कोणत्याही प्रकारचा उत्कर्ष किंवा अपकर्ष जर राहिला नाहीं तरच ' अभयं प्रतिष्ठां विन्दते ' ह्म० निर्भयपणें प्रतिष्ठेला प्राप्त होतो, हें ह्मणणें उपपन्न होईल. ( यास्तव आदित्य या विशेषाचें ग्रहण अनर्थक नाहीं. जो निरतिशय आनंदरूप चिदात्मा आदित्यमंडल या उत्कृष्ट उपाधींत प्रतिबिंबित झालेला आहे तोच हात-पाय-मस्तक इत्यादिकांनीं युक्त असलेला पुरुष, या निकृष्ट उपाधींत प्रतिबिंबित झाला आहे. यास्तव येथें परमानंदाच्या अपेक्षेनें आदित्य व पुरुष यांचें समत्व ह्मणजे स्वभावाचें ऐक्य विवक्षित आहे, असा याचा भावार्थ. असो; आतां मागील प्रकरणाचा अनुवाद करून पुढच्या ग्रंथाला व्याख्यानासाठीं पुढें घेतात– )

अस्ति नास्तीत्यनुप्रश्नो व्याख्यातः। कार्यरसलाभप्राणनाभयप्रतिष्ठाभयदर्शनोपपत्तिभ्योऽस्त्येव तदाकाशादिकारणं ब्रह्मेत्यपाकृतोऽनुप्रश्न एकः। द्वावन्यावनुप्रश्नौ विद्वदविदुषोर्ब्रह्मप्राप्त्यप्राप्तिविषयौ तत्र विद्वान्समश्नुते न समश्नुत इत्यनुप्रश्नोऽन्त्यस्तदपाकरणायोच्यते। मध्यमोऽनुप्रश्नोऽन्त्यापाकरणादेवापाकृत इति तदपाकरणाय न यत्यते—

अर्थ—ब्रह्म आहे कीं नाहीं, या अनुप्रश्नाचें व्याख्यान केलें. कार्यरूप रसाचा लाभ, प्राण न क्रिया, अभयप्रतिष्ठा व अभयदर्शन या उपपत्तींवरून तें आकाशादिकाचें कारण ब्रह्म आहेच, असें सिद्ध करून एका अनुप्रश्नाचें निराकरण केलें. आतां विद्वान् व अविद्वान् यांना ब्रह्मप्राप्ति होते कीं होत नाहीं, याविषयींचे दोन अनुप्रश्न राहिले. त्यांतील 'विद्वान् ब्रह्मभावास प्राप्त होतो कीं होत नाहीं,' हा शेवटचा अनुप्रश्न आहे. त्याचें अपाकरण करण्यासाठीं पुढील वाक्य आहे. मधला अनुप्रश्न शेवटच्या अनुप्रश्नाचें अपाकरण ( निराकरण ) केल्यानेंच निराकृत होणार आहे. यास्तव त्याच्या निरसनार्थ श्रुतीकडून यत्न केला जात नाहीं.—

स य एवंवित्। अस्माल्लोकात्प्रेत्य। एतमन्नमयमात्मानमुपसंक्रामति। एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रामति। एतं मनोमयमात्मानमुपसंक्रामति। एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रामति। एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति।

स यः कश्चिदेवं यथोक्तं ब्रह्मोत्सृज्योत्कर्षापकर्षमद्वैतं सत्यं ज्ञानमनन्तमस्मीत्येवं वेत्तीत्येवंवित्। एवंशब्दस्य प्रकृतपरामर्शार्थत्वात्। स किम्, अस्माल्लोकात्; दृष्टादृष्टविषयसमूहो ह्ययं लोकस्तस्मादस्माल्लोकात्प्रेत्य प्रत्यावृत्य निरपेक्षो भूत्वैतं यथाव्याख्यातमन्नमयमात्मानमुपसंक्रामति। विषयजातमन्नमयात्पिण्डात्मनो व्यतिरिक्तं न पश्यति। सर्वं स्थूलभूतमन्नमयमात्मानं पश्यतीत्यर्थः। ततोऽभ्यन्तरमेतं प्राणमयं सर्वान्नमयात्मस्थमविभक्तम्। अथैतं मनोमयं विज्ञानमयमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति॥

अर्थ--तो जो कोणी अशाप्रकारें उत्कर्ष व अपकर्ष यास सोडून वर सांगितलेल्या प्रकारचें ज्ञान व अनन्त ब्रह्म मी आहें,–असें जाणतो तो 'एवंवित्' कारण एवशब्दाला प्रकृतपरामर्शार्थत्व असतें. ( ह्म० तो शब्द प्रकृत विषयाचा परामर्श करण्यासाठीं असतो.) तो 'एवंविद्' काय करतो, तर तो या लोकांतून निघून जाऊन, दृष्ट, अदृष्ट व इष्ट विषय याचा समुदाय हाच हा लोक आहे, त्या या लोकापासून प्रेत्य ह्म० प्रत्यावर्तन करून ह्म० त्याविषयीं निरपेक्ष होऊन या वर व्याख्यान केलेल्या प्रकारच्या अन्नमय आत्म्यास प्राप्त होतो. ह्म० सर्व विषयजात अन्नमय पिंडात्म्याहून व्यतिरिक्त ( भिन्न ) पहात नाहीं. सर्व स्थूल भूतवर्ग हा अन्नमय आत्मा आहे, असें पाहतो, असा याचा इत्यर्थ त्याहून अभ्यंतर अशा या प्राणमयास सर्व अन्नमय आत्म्यामध्यें स्थित व अविभक्त पाहतो. नंतर या मनोमय विज्ञानमय व आनंदमय आत्म्यास प्राप्त होतो. ( ह्म० क्रमानें सर्व विषयजात तन्मय आहे, असें पाहतो )

अथादृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयनेऽभयं प्रतिष्ठां विन्दते। तत्रेतच्चिन्त्यम्। कोऽयमेवंवित्कथं वा संक्रामतीति। किं परस्मादात्मनोऽन्य· संक्रमणकर्ता प्रविभक्त उत स एवेति। किं तत, यद्यन्यः स्याच्छ्रुतिविरोधः। "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" "अन्योऽसावन्योऽहमस्मीति। न स वेद" "एकमेवाद्वितीयम्" "तत्त्वमसि" इति। अथ स एवाऽऽनन्दमयमात्मानमुपसंक्रामतीति, कर्मकर्तृत्वानुपपत्तिः। परस्यैव च संसारित्वं पराभावो वा। यदुभयथा प्राप्तो दोषो न परिहर्तुं शक्यत इति व्यर्था चिन्ता। अथान्यतरस्मिन्पक्षे दोषाप्राप्तिस्तृतीये वा पक्षेऽदुष्टे स एव शास्त्रार्थ इति व्यर्थैव चिन्ता। न तन्निर्धारणार्थत्वात्। सत्यं प्राप्तो दोषो न शक्यः परिहर्तुमन्यतरस्मिंस्तृतीये वा पक्षेऽदुष्टेऽवधृते व्यर्था चिन्ता स्यान्न तु सोऽवधृत इति तदवधारणार्थत्वादर्थवत्येवैषा चिन्ता।॰ सत्यमर्थवती चिन्ता शास्त्रार्थावधारणार्थत्वात्। चिन्तयसि च त्वं न तु निर्णेष्यसि, किं न निर्णेतव्यमिति वेदवचनं,

न, कथं तर्हि बहुप्रतिपक्षत्वादेकत्ववादी त्वं, वेदार्थपरत्वाद्बहवो हि नानात्ववादिनो वेदबाह्यास्त्वत्प्रतिपक्षा अतो ममाऽऽशङ्का न निर्णेष्यसीत्येतदेव मे स्वस्त्ययन यन्मामेकयोगिनमनेकयोगिबहुप्रतिपक्षमात्थ। अतो जेष्यामि सर्वानारभे च चिन्ताम् ॥

अर्थ—आता 'अदृश्य, अनात्म्य, अनिरुक्त व अनिलयन अशा आत्म्यामध्यें अभय प्रतिष्ठेस प्राप्त होतो' अशा अर्थाचें जें वर वाक्य आहे, त्याविषयीं 'हा एववित् कोण व तो सङ्क्रमण कसें करतो' हें विचारणीय आहे. काय परमात्म्याहून सङ्क्रमण करणारा दुसरा कोणी अगदीं निराळाच आहे कीं, तोच सङ्क्रमणकर्ता आहे? पण या विचारापासून लाभ कोणता? जर सङ्क्रमणकर्ता अन्य असेल तर श्रुतिविरोध हा दोष येईल कारण 'तें उत्पन्न करून मागून त्यातच प्रविष्ट झाला,' 'हा अन्य आहे व मी अन्य आहें, असें जो ह्मणतो तो कांहीं जाणत नाहीं,' 'एकच व अद्वितीय ब्रह्म आहे;' 'तें तू आहेस,' इत्यादि एक्यबोधक श्रुती अनेक आहेत. बरें, तोच परमात्मा आनन्दमय आत्म्याला जाऊन पोंचतो, असें ह्मटलें तर कर्मकर्तृत्वाची अनुपपत्ति होते. (ह्म० परमात्मा उपसङ्क्रमण हें कर्म करतो, असें ह्मणणें अनुपपन्न आहे) तसेंच परमात्म्यालाच संसारित्व किंवा परत्वाचा अभाव आहे, असें ह्मणणें प्राप्त होईल आणि अशा दोन्ही प्रकारें प्राप्त झालेला दोष जर परिहार करता येण्याजोगा नसेल तर ही चिन्ता (हा विचार) व्यर्थ आहे बरें 'या दोन पक्षातील कोणत्या तरी एका पक्षीं दोषाची प्राप्ति होत नाहीं किंवा तिसराच पक्ष निर्दुष्ट (ह्म० दोषरहित) आहे असं जरी ह्मटलं तरी तोच शास्त्रार्थ असल्यामुळें चिंता व्यर्थच ठरते,' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण एकत्वपक्षाचा निश्चय करण्यासाठीं ही चिन्ता (विचार) आहे ह्म० पूर्वोक्त दोन पक्षीं प्राप्त झालेल्या दोषाचा परिहार करता येणे शक्य नाहीं, व तिसऱ्या निर्दुष्ट पक्षाचा निश्चय झाला असता ही आरमिलेली चिंता व्यर्थ होईल हें खरें, पण जो तिसरा पक्ष निश्चित झालेला नाहीं, त्यामुळें ही चिन्ता उपयुक्त आहे. (वादी–)

खरें आहे. प्रस्तुत चिंता शास्त्रार्थाच्या निश्चयाच्या उपयोगी असल्यामुळें उपयुक्त आहे, हें खरें पण तू नुसतें चिंतनच करतोस, निर्णय करणार नाहींस. ( सिद्धान्ती ) का बरें ? निर्णय करू नये, असें वेदवचन आहे कीं काय ? ( वादी– ) नाहीं ( सिद्धान्ती– ) तर मग मी का निर्णय करणार नाहीं ? ( वादी– ) कारण तुला प्रतिपक्ष पुष्कळ आहेत तू एकत्ववादी आहेस कारण तू वेदार्थपरायण आहेस. पण तुझे प्रतिपक्षभूत वेदबाह्य नानात्ववादी पुष्कळ आहेत यास्तव तू माझ्या शंकेचा निर्णय करणार नाहींस ( सिद्धान्ती– ) विचाराला आरंभ करणाऱ्या मला तू एकत्ववादी ह्मणतोस व मला अनेक नानात्ववादी प्रतिपक्ष आहेत, असें ह्मणतोस हेंच माझ कल्याण आहे ( ह्म० तू नानावादी असूनही ज्याअर्थी मला एकत्ववादी ह्मणत आहेस त्याअर्थी तुलाही एक वस्तु संमत आहे शिवाय अनेक वाद्यांवर अन्यान्याश्रय दोष येतो ) यास्तव मी तुह्मा सर्वांना जिंकीन व त्यासाठींच मी विचाराला आरंभ करतों

स एव तु स्यात्तद्भावस्य विवक्षितत्वात् । तद्विज्ञानेन परमात्मभावो ह्यत्र विवक्षितो ब्रह्मविदाप्नोति परमिति । न ह्यन्यस्यान्यभावापत्तिरुपपद्यते । ननु तस्यापि तद्भावापत्तिरनुपपन्नैव । न । अविद्याकृततादात्म्यापोहार्थत्वात् । या हि ब्रह्मविद्यया स्वात्मप्राप्तिरुपदिश्यते साऽविद्याकृतस्यान्नादिविशेषात्मन आत्मत्वेनाध्यारोपितस्यानात्मनोऽपोहार्था । कथमेवमर्थताऽवगम्यते विद्यामात्रोपदेशात् । विद्यायाश्च दृष्टं कार्यमविद्यानिवृत्तिस्तच्चेह विद्यामात्रमात्मप्राप्तौ साधनमुपदिश्यते । मार्गविज्ञानोपदेशवदिति चेत्तदात्मत्वे विद्यामात्रसाधनोपदेशोऽहेतु । कस्मात् । देशान्तरप्राप्तौ मार्गविज्ञानोपदेशदर्शनात् । न हि ग्राम एव गन्तेति चेत् । न, वैधर्म्यात् । तत्र हि ग्रामविषयं विज्ञानं नोपदिश्यते । तत्प्राप्तिमार्गविषयमेवोपदिश्यते विज्ञानं न तथेह ब्रह्मविज्ञानव्यतिरेकेण साधनान्तरविषयं विज्ञानमुपदिश्यते । उक्तकर्मादिसाधनापेक्षं ब्रह्मविज्ञानं परप्राप्तौ साधनमुपदिश्यत इति

चेत् । न । नित्यत्वान्मोक्षस्येत्यादिना प्रत्युक्तत्वात् । श्रुतिश्च तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशदिति कार्यस्थस्य तदात्मत्वं दर्शयति । अभयप्रतिष्ठोपपत्तेश्च । यदि हि विद्यावान्स्वात्मनोऽन्यन्न पश्यति ततोऽभयं प्रतिष्ठां विन्दत इति स्याद्भयहेतोः परस्यान्यस्याभावात् ॥

अर्थ—संक्रमणकर्ता तो परमात्माच आहे. कारण परमात्मभाव येथें विवक्षित आहे. त्याच्या विज्ञानानें ' ब्रह्मविदाप्नोति परं ' या वाक्यानें येथें परमात्मभाव विवक्षित आहे, असें प्रसिद्ध आहे. अन्य पदार्थाला अन्य पदार्थाचा भाव प्राप्त होणें सयुक्तिक दिसत नाहीं. ( वादी–) अहो पण त्यालाही त्याचाच भाव प्राप्त होणें अनुपपन्नच आहे. ( ह्म० एका पदार्थाला दुसऱ्या पदार्थाचें स्वरूप प्राप्त होणें जसें अयोग्य आहे, तसेंच त्याच एका पदार्थाला आपलेंच स्वरूप प्राप्त होणें अयोग्य आहे; सिद्धान्ती– ) तसें नाहीं. कारण अविद्याकृत तादात्म्याचें निरसन करण्यासाठीं आत्मप्राप्तीचा उपदेश केला आहे. ह्म० ब्रह्मविद्येच्या योगानें या प्रकरणांत जी स्वात्मप्राप्ति सांगितली आहे ती अविद्येमुळें झालेले जे अन्नादि विशेष आत्मे व ज्याच्या ठिकाणीं आत्मत्वाचा अध्यारोप केलेला आहे त्या अनात्म्याचा अपवाद–निषेध करण्यासाठीं आहे. ( वादी–) अहो पण केवळ विद्येचा उपदेश केल्यानेंच तो याच कारणानें केला आहे, हें कसें सिद्ध होतें ? ( सिद्धान्ती–) अविद्येची निवृत्ति हें विद्येचें दृष्ट कार्य आहे ( ह्म० तें विद्येचें साक्षात् फळ आहे ) व अशी ती केवळ विद्याच आत्मप्राप्तीचें साधन आहे, असा उपदेश केलेला आहे. ( वादी– ) मार्गाच्या विज्ञानाच्या उपदेशाप्रमाणें तो उपदेश आहे, ( ह्म० गमन करणारा पुरुष स्वतः ज्याला जाऊन पोंचावयाचें तो गांवच जरी नसला तरी त्याला केलेला मार्ग-ज्ञानाचा उपदेश जसा व्यर्थ होत नाहीं त्याप्रमाणें स्वतः ब्रह्म नसलेल्या जीवाला विद्याभ्यासाच्या द्वारा ब्रह्मप्राप्ति व्हावी, यासाठीं केलेला विद्योपदेश व्यर्थ नाहीं. ह्म० स्वरूपाच्याच प्राप्तीला केवळ विद्यारूप साधनाचा उपदेश कारण होत नाहीं. ) कां कीं, दुसऱ्या

देशाची प्राप्ति करून घ्यावयाची असल्यासच मार्ग-विज्ञानाचा उपदेश करितात, असें आपण पाहतों. कारण ग्रामच कांहीं ग्रामगन्ता (त्याच ग्रामाला जाणारा) असत नाहीं. (सिद्धान्ती–) असें जर ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण ग्रामाला जाणारा व ब्रह्माला प्राप्त होणारा यांमध्यें वैधर्म्य (विधर्मत्व, वैषम्य) आहे. (ह्म० ग्रामाच्या मार्गाविषयींच्या उपदेशांत तूं तो ग्राम आहेस, असें सांगितलें जात नाहीं, पण येथें तूं ब्रह्म आहेस, असें ह्मटलें आहे.) दृष्टान्तांत ग्रामसंबधीं विज्ञान उपदेशिलें जात नाहीं, तर त्या ग्रामाच्या प्राप्तीचा जो मार्ग त्या विषयींचें जें विज्ञान तें उपदेशिलें जातें. पण या दार्ष्टान्तिकात तसें ब्रह्मविज्ञानावाचून दुसऱ्या साधनाविषयींचें विज्ञान उपदेशिलें जात नाहीं. (वादी–) अहो पण पूर्वकांडात सांगितलेल्या कर्मांची ज्याला अपेक्षा आहे असें ब्रह्मविज्ञान परप्राप्तीचें साधन सांगितलें जात आहे; (सिद्धान्ती-) असें ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं कारण 'मोक्ष नित्य आहे' असें ह्मणून आह्मीं त्याचें निरसन केलें आहे. 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' ह्म० जगाला उत्पन्न करून परमात्मा त्यात शिरला अशा अर्थाची श्रुति कार्यस्थ आत्म्याला परमात्मरूपत्व दाखवीत आहे. अभय प्रतिष्ठेची ही उपपत्ति त्याचें ऐक्य मानल्यासच लागते. विद्वान् स्वात्म्याहून भिन्न पदार्थ जर पहात नसेल तरच 'तो अभय प्रतिष्ठेस प्राप्त होतो,' हें ह्मणणें युक्त होईल. कारण त्या दशेंत त्याच्या भयाला कारण होणारा दुसरा पृथक् पदार्थ नसतो.

अन्यस्य चाविद्याकृतत्वे विद्ययाऽवस्तुत्वदर्शनोपपत्तिस्तद्धि द्वितीयस्य चन्द्रस्य सत्त्वं यदतैमिरिकेण चक्षुष्मता न गृह्यते। नैवं न गृह्यत इति चेन्न सुषुप्तसमाहितयोरग्रहणात्। सुषुप्तेऽग्रहणमन्यासक्तवदिति चेत्। न। सर्वाग्रहणात्। जाग्रत्स्वप्नयोरन्यस्य ग्रहणात्सत्त्वमेवेति चेत्। न। अविद्याकृतत्वाज्जाग्रत्स्वप्नयोर्यदन्यग्रहणं जाग्रत्स्वप्नयोस्तदविद्याकृतमविद्याभावेऽभावात्। सुषुप्तेऽग्रहणमप्यविद्याकृतमिति चेत्। न। स्वाभाविकत्वात्। द्रव्यस्य हि तत्त्वमविक्रिया परानपेक्षत्वात्। विक्रिया न तत्त्वं परापेक्ष-

त्वात् । न हि कारकापेक्षं वस्तुनस्तत्त्वं । सतो विशेषः कारकापेक्षो विशेषश्च विक्रिया। जाग्रत्स्वप्नयोश्च ग्रहणं विशेषः। यद्धि यस्य नान्यापेक्षं स्वरूपं तत्तस्य तत्त्वं यदन्यापेक्षं न तत्तत्त्वम् । अन्याभावेऽभावात् । तस्मात्स्वाभाविकत्वाज्जाग्रत्स्वप्नवन्न सुषुप्ते विशेषः ॥

अर्थ—कल्पित भेदविशिष्टरूपानें जीवाहून पृथक् मानलेल्या ईश्वराला अविद्याकृतत्व–मिथ्यात्व–असलें तरच विद्येच्या योगानें त्याच्या अवस्तुत्वाचें दर्शन उपपन्न होतें. ( ईश्वर माझा शास्ता आहे, हें ह्मणणें मिथ्या आहे. कारण वस्तुतः त्याचें व माझें एकात्मत्व ( एकरूपत्व ) आहे, अशा विद्वद्दृष्टीनें विशिष्ट ईश्वराचा अभाव उपपन्न होतो ) दुसऱ्या चद्राचें अस्तित्व तेंच होय कीं जें, ज्याच्या डोळ्याना तिमिर रोग झालेला नाहीं अशा डोळसाला दिसत नाहीं. ( वादी ) अहो पण ईश्वराचें द्वितीयत्व ग्रहण केलें जात नाहीं, असें नाहीं, ( चद्र वस्तुत. एकच आहे. त्यामुळें त्याचें द्वितीयत्व ग्रहण केलें जात नाहीं. पण जीवाहून भिन्न असलेल्या ईश्वराचें, ग्रहण केलें जात नाहीं असें नाहीं. सिद्धान्ती– ) पण हें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण निजलेल्या व समाधि लाविलेला अशा पुरुषाना त्याचें ग्रहण होत नाहीं ( वादी– ) सुषुप्तींत ईश्वराचें जें ग्रहण होत नाहीं तें ईश्वराच्या अभावामुळें नव्हे तर जागृतींतही आपल लक्ष दुसरीकडे वेधलेलें असल्यास पुढचा पदार्थही जसा दिसत नाहीं, त्याप्रमाण सुषुप्तींत ईश्वराचें ग्रहण होत नाहीं ( सिद्धान्ती– ) पण असें ह्मणणेंही बरोबर नाहीं. कारण सुषुप्तींत सर्वांचेंच अग्रहण होतें. ( ह्मणजे जागृतींत एकीकडे लक्ष लागल्यास दुसरे पदार्थ भासत नाहींत, हें खरें, पण ज्यां एकाकडे लक्ष लागतें त्याचें तरी भान असतच. सुषुप्तींत तसें कोणाचेंच भान नसतें. वादी–) अहो पण सुषुप्तींत द्वैत भासत नसल्यामुळ त्याचा अभाव जरी मानला तरी जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थामध्यें द्वैताचें ग्रहण होत असल्यामुळ तें विद्यमान असतेंच. ( सिद्धान्ती–) पण असें जरी ह्मटलें तरी समाधान होत नाहीं कारण जाग्रत् व.स्वप्न यांना अविद्याकृतत्व आहे ह्म० जाग्रत् व स्वप्न या दोन अवस्थामध्यें जें द्वैतग्रहण होत

तें अविद्याकृत होय. कारण अविद्येच्या अभावीं त्याचा अभाव होतो. ( वादी- ) तर मग सुषुप्तींतील अग्रहणही अविद्याकृतच आहे, ( ह्म० त लयरूप अविद्येमुळें आहे सिद्धान्ती- ) तसें नाहीं. कारण तें अग्रहण स्वाभाविक आहे. कारण कोणत्याही द्रव्याचें तत्त्व अविक्रिया आहे. कारण त्या अविक्रियेला ( अविकाराला ) दुसऱ्या कोणत्याही निमित्ताची अपेक्षा नसते पण विक्रिया तत्त्व नव्हे कारण तिला दुसऱ्या निमित्ताची अपेक्षा असते ज्याला कर्ता, कर्म, करण इत्यादि कारकाची अपेक्षा आहे तें वस्तूचें तत्त्व नव्हे विद्यमान वस्तूच्या विशेषाला कारकाची अपक्षा असते, आणि कोणतीही विक्रिया हा विशेष आहे. जाग्रत् व स्वप्न याच ग्रहण हा विशेष आहे ज्याचें जें अन्याची अपेक्षा न करणारे स्वरूप त्याचें तेंच तत्त्व, व जें अन्य कारकादिकाची अपेक्षा करणारे स्वरूप तें त्याचें तत्त्व नव्हे कारण अन्य कारकाचा अभाव झाला असता त्याचाही अभाव होतो. तस्मात् सुषुप्तींतील द्वैताचें अग्रहण स्वाभाविक असल्यामुळें जाग्रत् व स्वप्न याप्रमाणें त्यात कोणत्याही प्रकारचा विशेष नाहीं

( याप्रमाण आपल्या पक्षीं भयाला कारण होणाऱ्या चित्सत्ताव्यतिरिक्त ईश्वराचा अभाव असल्यामुळे विद्वानाला अभय-प्रतिष्ठा प्राप्त हाऊ शकते, असें उपपादन करून द्वैतपक्षीं अभय प्रतिष्ठेचा असभव दाखवितात- )

**येषां पुनरीश्वरोऽन्य आत्मनः कार्यं चान्यत्तेषां भयनिवृत्तिर्भयस्यान्यनिमित्तत्वात्सतश्चान्यस्याऽऽत्महानानुपपत्तिः । न चासत आत्मलाभः । सापेक्षस्यान्यस्य भयहेतुत्वमिति चेन्न तस्यापि तुल्यत्वात् । यद्धर्माद्यनुसहायीभूतं नित्यमनित्यं वा निमित्तमपेक्ष्यान्यद्भयकारणं स्यात्तस्यापि तथाभूतस्याऽऽत्महानाभावाद्भयानिवृत्तिरात्महाने वा सदसतोरितरेतरापत्तौ सर्वत्रानाश्वास एव ॥**

अर्थ—पण ज्याच्या मतीं ईश्वर आत्म्याहून अन्य आहे व ह कार्यजगतही त्याहून पृथक् आहे त्याच्या भयाची निवृत्ति संभवत नाहीं कारण

भयाला नेहमींच अन्यनिमित्तत्व असतें. ह्म० तें द्वैतबुद्धीमुळेंच संभवतें आणि दुसऱ्या सत्-च्या स्वरूपाची हानि उपपन्न होत नाहीं. असत्-ला तर स्वरूप लाभच नसतो. ह्म० असत्‌ला कांहीं स्वरूपच नाहीं. (वादी–) पण दुसऱ्या सापेक्ष पदार्थाला भयहेतुत्व असतें. ह्म० जीवाहून पृथक् असलेला ईश्वर केवळ सत्तेनेंच भयाचें निमित्त होत नाहीं तर प्राणिकृत धर्माधर्मांच्या अपेक्षेनें तो भयाचें कारण होतो, असें ह्मणाल तर (सिद्धान्ती–) तें बरोबर नाहीं. कारण तो सापेक्ष ईश्वरही तसाच आहे. (त्यालाही तुल्यत्व आहे.) कारण नित्य किंवा अनित्य अधर्मादि सहायभूत निमित्ताच्या अपेक्षेनें जें दुसरें भयाचें कारण असेल त्या तशा प्रकारच्या अन्य पदार्थाचें स्वरूपही नष्ट होत नाहीं. त्यामुळें भयाची निवृत्ति होऊं शकत नाहीं. वरें त्याच्या स्वरूपाची हानि होते ह्मणून समजलें तर सत् व असत् यांना इतरेतरत्व ह्म० सत्‌ला असत्त्व व असत्-ला सत्त्व प्राप्त होतें, असें होऊन कोठेंच विश्वास नाहीं, असें होईल (सर्वत्र अनाश्वासच होईल. अनाश्वास.ह्म० अविश्वास).

एकत्वपक्षे पुनः सनिमित्तस्य संसारस्याविद्याकल्पितत्वाद्दोषः। तैमिरिकदृष्टस्य हि द्वितीयचन्द्रस्य नाऽऽत्मलाभो नाशो वाऽस्ति। विद्याविद्ययोस्तद्धर्मत्वमिति चेन्न प्रत्यक्षत्वात्। विवेकाविवेकौ रूपादिवत्प्रत्यक्षावुपलभ्येते अन्तःकरणस्थौ। न हि रूपस्य प्रत्यक्षस्य सतो द्रष्टृधर्मत्वम्। अविद्या च स्वानुभवेन रूप्यते मूढोऽहमविविक्तं मम विज्ञानमिति। तथा विद्याविवेकोऽनुभूयते। उपदिशन्ति चान्येभ्य आत्मनो विद्यां बुधाः। तथा चान्येऽवधारयन्ति। तस्मान्नामरूपपक्षस्यैव विद्याविद्ये नामरूपे च नाऽऽत्मधर्मौ। "नामरूपयोर्निर्वहिता ते यदन्तरा तद्ब्रह्म" इति श्रुत्यन्तरात्। ते च पुनर्नामरूपे सवितर्यहोरात्रे इव कल्पिते न परमार्थतो विद्यमाने। अभेदे "एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रामति" इति कर्मकर्तृत्वानुपपत्तिरिति चेन्न। विज्ञानमात्रत्वात्संक्रमणस्य। न जलूकादिवत्संक्रमणमिहोपदिश्यते किं तर्हि विज्ञानमात्रं संक्रमणश्रुतेरर्थः॥

अर्थ—पण तोच जर एकत्व पक्ष स्वीकारला तर सनिमित्त ससाराला अविद्याकल्पितत्व असल्यामुळें ह्म० सनिमित्त ससार अविद्याकल्पित असल्याकारणानें त्यात काहीं दोष येत नाहीं. कारण तैमिरिक रोग्याला दिसलेल्या दुसऱ्या चद्राला स्वरूपलाभ होत नाहीं किंवा त्याचा नाशही होत नाहीं. (वादी–) अहो पण विद्या व अविद्या याना आत्मधर्मत्व आहे, (त्यामुळें त्याच्या योगानें आत्मा विकार पावतो, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. सिद्धान्ती–) नाहीं, विद्या व अविद्या याना आत्मधर्मत्व नाहीं. ह्म० ते आत्म्याचे धर्म नव्हेत कारण त्याना प्रत्यक्षत्व आहे. अंत:करणात स्थित असलेला विवेक व अविवेक रूपादि इतर विषयाप्रमाणें प्रत्यक्ष उपलब्ध होतात, आणि प्रत्यक्ष असलेल्या रूपाला द्रष्टृधर्मत्व नाहीं ह्म० प्रत्यक्ष उपलब्ध होणारें रूप द्रष्ट्या आत्म्याचा धर्म नव्हे. अविद्या स्वानुभवानेंच 'मी मूढ आहें, माझें ज्ञान अनिश्चित किंवा स्थूल आहे' असें ह्मणून व्यक्त केली जाते त्याचप्रमाणें विद्याविवेकही अनुभविला जातो. ज्ञानी आपली विद्या दुसऱ्याना उपदेशितात, व दुसरेही तिचा निश्चय करितात, तिचें ग्रहण करितात. यास्तव विद्या व अविद्या नामरूपाच्या पक्षातच येतात. (त्या, त्या पक्षाच्याच आहेत) आणि नामरूप हे आत्मधर्म नव्हेत 'नामरूपाचा निर्वाह करणारा व तीं नामरूपें ज्याच्यामध्यें असतात, ज्याच्या आधारानें राहतात, तें ब्रह्म' अशा अर्थाची दुसरी श्रुति आहे परंतु तीं नामरूपें, सूर्याच्या ठिकाणीं जसे अहोरात्र, तशीं कल्पिलेलीं आहेत. त्यामुळें तीं परमार्थत विद्यमान नाहींत. (वादी) अहो पण, ईश्वर व जीव याचा जर अभेद मानला तर 'या आनन्दमय आत्म्याला प्राप्त होतो' अशा प्रकारें श्रुतीनें पुरुषाचें कर्तृत्व व आनन्दमयाचें कर्मत्व जें सागितलं आहे तें उपपन्न होत नाहीं (सिद्धान्ती-) पण हे बरोबर नाहीं. कारण त्या सक्रमणाला केवळ विज्ञानरूपत्व आहे (ह्म० येथील सक्रमणशब्दाचा अर्थ 'जाऊन पोंचणें,' असा नाहीं तर 'जाणणें' असा आहे.) तृणावरील जळू जशी एका काडीवरून दुसऱ्या काडीवर जाते तसें येथ पुरुषाचें सक्रमण उपदेशिलेलें नाहीं, तर मग काय 'केवळ विज्ञान' हा सक्रमणश्रुतीचा अर्थ आहे.

ननु मुख्यमेव संक्रमणं श्रूयत उपसंक्रामतीति चेत्। न। अन्नमयेऽदर्शनात्। न ह्यन्नमयमुपसंक्रामतो बाह्यादस्माल्लोकाज्जलूकावत्संक्रमणं दृश्यतेऽन्यथा वा। मनोमयस्य बहिर्निर्गतस्य विज्ञानमयस्य वा पुन प्रत्यावृत्याऽऽत्मसंक्रमणमिति चेत्। न। स्वात्मनि क्रियाविरोधादन्योऽन्नमयमन्यमुपसंक्रामतीति प्रकृत्य मनोमयो विज्ञानमयो वा स्वात्मानमेवोपसंक्रामतीति विरोध स्यात्। तथा नाऽऽनन्दमयस्याऽऽत्मसंक्रमणमुपपद्यते। तस्मान्न प्राप्तिः सक्रमणं नाप्यन्नमयादीनामन्यतमकर्तृकं पारिशेष्यादन्नमयाद्यानन्दमयान्तात्मव्यतिरिक्तकर्तृक ज्ञानमात्रं च संक्रमणमुपपद्यते। ज्ञानमात्रत्वे चाऽऽनन्दमयान्तःस्थस्यैव सर्वान्तरस्याऽऽकाशाद्यन्नमयान्त कार्यं सृष्ट्वाऽनुप्रविष्टस्य हृदयगुहाभिसंबन्धादन्नमयादिष्वनात्मस्वात्मविभ्रमः सक्रमणेनाऽऽत्मविवेकविज्ञानोत्पत्त्या विनश्यति। तदेतस्मिन्नविद्याविभ्रमनाशे संक्रमणशब्द उपचर्यते न ह्यन्यथा सर्वगतस्याऽऽत्मन· संक्रमणमुपपद्यते। वस्त्वन्तराभावाच्च। न च स्वात्मन एव सक्रमणम्। न हि जलूकाऽऽत्मानमेव संक्रामति। तस्मात्सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मेति यथोक्तलक्षणात्मप्रतिपत्त्यर्थमेव बहुभवनसर्गप्रवेशरसलाभाभयसंक्रमणादि परिकल्प्यते ब्रह्मणि सर्वव्यवहारविषये न तु परमार्थतो निर्विकल्पे ब्रह्मणि कश्चिदपि विकल्प उपपद्यते ॥

अर्थ—( वादी– ) अहो पण ' उपसंक्रामति ' ह्म० समीप जातो असें मुख्यच सक्रमण श्रुत आहे ( ह्मणून ह्मणाल तर–सिद्धान्ती– ) नें तसें नाहीं अन्नमयामध्यें सैंऱ्या सक्रमणाचा अनुभव येत नाहीं. अन्नमयास प्राप्त होणाऱ्या पुरुषाचें या बाह्य लोकापासून जळूप्रमाणें सक्रमण होत असल्याचें अथवा त्याहून निराळ्या प्रकारें तें होत असल्याचें दिसत नाहीं. (वादी– ) बाहेर विषयाकडे गेलेल्या मनोमयाचें किंवा विज्ञानमयाचें पुनः परतून आत्मसंक्रमण होतें ( सिद्धान्ती– ) हें ह्मणणेंही सयुक्तिक नाहीं कारण स्वत:च्या स्वरूपातच स्वत:ची क्रिया होणें, हा विरोध येतो. स्वतः अन्नमयाहून पृथक्

असलेला पुरुष दुसऱ्या अन्नमयाला प्राप्त होतो असें प्रकरण आरंभून पुढें मनोमय किंवा विज्ञानमय स्वात्म्याला–स्वस्वरूपालाच प्राप्त होतो, असें सांगणें हा विरोध येतो. त्याचप्रमाणें आनन्दमयाचेंही आत्मसंक्रमण उपपन्न होत नाहीं. तस्मात् खरोखर प्राप्त होणें, हें संक्रमण नव्हे. किंवा त्याचा कर्ता अन्नमयादिकांतील कोणी तरी एक आहे, असेंही नाहीं. यास्तव त्याहून निराळें असलेलें नुसतें ज्ञान हेंच संक्रमण व त्याचा कर्ता अन्नमयापासून आनन्दमयापर्यंत जे गौण आत्मे सांगितले आहेत त्यांहून निराळा आहे, असें समजणेंच सयुक्तिक होय, आणि संक्रमण हें केवल ज्ञान आहे, असें झालें ह्मणजे आनन्दमयाच्या आंत असलेल्या–सर्वान्तर व आकाशादिकापासून अन्नमयापर्यंत सर्व कार्यजात उत्पन्न करून त्यात प्रविष्ट झालेल्या आत्म्याला हृदयगुहेच्या अभिसंबंधामुळे अन्नमयादि अनात्म्याचे ठिकाणीं झालेला आत्मभ्रम त्या संक्रमणानें ह्म० आत्मविवेक–विज्ञानोत्पत्तीनें विनाश पावलो त्यामुळें अविद्याजन्य विभ्रमाचा नाश, या अर्थी वरील संक्रमणशब्द उपचारानें योजला जातो. कारण असें मानल्यावाचून सर्वगत आत्म्याचें संक्रमण उपपन्न होत नाहीं. शिवाय परमार्थतः अन्य वस्तूचा अभाव आहे. स्वात्म्याचेंच संक्रमण संभवत नाहीं. कारण जळू स्वत.लाच प्राप्त होत नाहीं. तस्मात् ' सत्यं, ज्ञानं, अनन्तं ब्रह्म ' या वाक्यानें ज्याचें लक्षण सांगितलें आहे तशा आत्म्याचें ज्ञान व्हावें, यासाठींच पुष्कळ होणें, आकाशादिकांची सृष्टि, तिच्यामध्ये प्रवेश, आनंदाचा लाभ, अभय प्रतिष्ठाप्राप्ति, संक्रमण इत्यादि सर्व-व्यवहार विषय-ब्रह्मामध्यें कल्पिलें जात. पण परमार्थतः निर्विकल्प ब्रह्मामध्ये कोणत्याही प्रकारचा विकल्प उपपन्न होत नाहीं.

तदप्येष श्लोको भवति ।

इति ब्रह्मवल्ल्यध्यायेऽष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

तमेतं निर्विकल्पमात्मानमेवं क्रमेणोपसंक्रम्य विदित्वा न बिभेति कुतश्चनाभयं प्रतिष्ठां विन्दत इत्येतस्मिन्नर्थेऽप्येष श्लोको

भवति । सर्वस्यैवास्य प्रकरणस्याऽऽनन्दवल्ल्यर्थस्य संक्षेपतः प्रकाशनायैष मन्त्रो भवति ।

इति शांकरभाष्येऽष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

अर्थ—त्या या निर्विकल्प आत्म्याला अशा क्रमानें उपसंक्रान्त होऊन ब्र० जाणून कशालाही भीत नाहीं, व अभयप्रतिष्ठेस प्राप्त होतो, या अर्थी हा श्लोक आहे या सर्वच प्रकरणाचें ब्र० आनन्दवल्लीच्या अर्थाचें संक्षेपत प्रकाशन करण्यासाठीं हा मंत्र आहे (इति ब्रह्मवल्ल्यध्यायें अष्टमोऽनुवाक )८

---

यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह । आनन्दं ब्रह्मणो विद्वान् । न बिभेति कुतश्चनेति ।

यतो यस्मान्निर्विकल्पाद्यथोक्तलक्षणादद्वयानन्दादात्मनो वाचोऽभिधानानि द्रव्यादिसविकल्पवस्तुविषयाणि वस्तुसामान्यान्निर्विकल्पेऽद्वयेऽपि ब्रह्मणि प्रयोक्तृभिः प्रकाशनाय प्रयुज्यमानान्यप्राप्याप्रकाश्यैव निवर्तन्ते स्वसामर्थ्याद्धीयन्ते । मन इति प्रत्ययो विज्ञानम् । तच्च यत्राभिधानं प्रवृत्तमतीन्द्रियेऽप्यर्थे तदर्थे च प्रवर्तते प्रकाशनाय । यत्र च विज्ञानं तत्र वाचः प्रवृत्तिः । तस्मात्सहैव वाङ्मनसयोरभिधानप्रत्यययोः प्रवृत्तिः सर्वत्र । तस्माद्ब्रह्मप्रकाशनाय सर्वथा प्रयोक्तृभिः प्रयुज्यमाना अपि वाचो यस्मादप्रत्ययाविषयादनभिधेयाददृश्यादिविशेषणात्सहैव मनसा विज्ञानेन सर्वप्रकाशनसमर्थेन निवर्तन्ते तं ब्रह्मण आनन्दं श्रोत्रियस्यावृजिनस्याकामहतस्य सर्वैषणाविनिर्मुक्तस्याऽऽत्मभूतं विषयविषयिसंबन्धविनिर्मुक्तं स्वाभाविकं नित्यमविभक्तं परमानन्दं ब्रह्मणो विद्वान्यथोक्तेन विधिना न बिभेति कुतश्चन निमित्ताभावात् । न हि तस्माद्विदुषोऽन्यद्वस्त्वन्तरमस्ति भिन्नं यतो बिभेति । अविद्यया यदोदरमन्तरं कुरुते । अथ तस्य भयं भवतीति ह्युक्तम् । विदुषश्चाविद्याकार्यस्य तैमिरिकदृष्टद्वितीयचन्द्रवन्नाशाद्भयनिमित्तस्य न बिभेति कुतश्चनेति युज्यते । मनोमये चोदाहृतो मन्त्रो मनसो ब्रह्मविज्ञानसाध-

नत्वात् । तत्र ब्रह्मत्वमध्यारोप्य तत्स्तुत्यर्थं न बिभेति कदाचनेति भयमात्र प्रतिषिद्धमिहाद्वैतविषये न बिभेति कुतश्चनेति भयनिमित्त-मेव प्रतिषिध्यते। नन्वस्ति भयनिमित्त साधुकरण पापक्रिया च। नैवम्। कथमित्युच्यते—

अर्थ—'यत'–' ज्या उत्कृष्ट निर्विकल्पापासून, अद्वयानन्द आत्म्या-पासून 'वाच.' नावें, द्रव्यादि सविकल्पवस्तुविषयक शब्द इतर वस्तुप्रमाणें यालाही वस्तुत्व आहे, असें समजून निर्विकल्प व अद्वय अशाही ब्रह्माचे ठिकाणीं शब्द–प्रयोग करणाऱ्या लोकांकडून त्या ब्रह्माचें प्रकाशन करण्या-साठीं योजले जाणारे शब्द त्या ब्रह्माला 'अप्राप्य–' प्रकाशित न करताच निवृत्त होतात म्हणजे आपल्या अर्थप्रकाशन सामर्थ्यापासून भ्रष्ट होतात, 'मनसा सह' यातील मन म्ह० प्रत्यय, विज्ञान, तें ज्या अतींद्रिय पदार्थां मध्येंही अभिधान ( शब्द, वाणी ) प्रवृत्त होतें तेथेंच त्याला प्रकाशित करावयासाठीं प्रवृत्त होत आणि जेथें विज्ञान प्रवृत्त होतें तेथें वाणीची प्रवृत्ति होते यास्तव वाक् व मन म्हणजे अभिधान ( शब्द, नाव, वाचक ) व प्रत्यय ( विज्ञान ) याची सर्व विषयाचे ठिकाणीं सहवर्तमानच ( बरो-बरच ) प्रवृत्ति होते. तस्मात् ब्रह्म कसहीं असले तरी शब्दप्रयोग करणारा-कडून त्याच्या प्रकाशनासाठीं योजले जाणारेंही शब्द कोणत्याही प्रत्य-याचा विषय नसलेल्या, शब्दाचा विशेष न होणाऱ्या व अदृश्यादि विशे-षणानीं युक्त असलेल्या अशा ज्याच्यापासून मनासह म्ह० सर्वप्रकाशन-समर्थ विज्ञानासह निवृत्त होतात त्या ब्रह्माच्या आनन्दाला–निष्पाप व अकामहत म्ह० सर्व एषणारहित श्रोत्रियाच्या आत्मभूत, विषयविषयिसंबध-शून्य, स्वाभाविक, नित्य व अविभक्त ( म्ह० अखड ) अशा ब्रह्माच्या परमा नदाला, वर सागितलेल्या प्रकारानें जाणणारा कोणत्याही कारणानें भीत नाहीं. कारण त्याच्या भयाला काहीं निमित्तच नसतें. कारण त्या विद्वा-नाहून निराळी वस्तुच नाहीं, कीं जिला तो भिईल. पण अविद्येमुळें जेव्हा तो थोडेसेंही अन्तर–भेद करतो तेव्हा लागलेंच त्याला भय होतें, असें वर

सांगितलच आहे ज्याला तिमिर–रोग झाला आहे, अशा पुरुषाला दिस लेल्या दुस या चद्रप्रमाणें विद्वानाच्या भयाचें निमित्त असें जें अविद्येचें कार्य त्याचा नाश झाल्यामुळें तो कशालाही भीत नाहीं, हें ह्मणणें उपपन्न होतें मनोमयाच्या पर्यायातही हाच मत्र उदाहरणार्थ दिला आहे कारण मन ब्रह्मविज्ञानाचें साधन आहे त्यामुळें त्या मनाचे ठिकाणीं ब्रह्म त्वाचा आरोप करून त्याच्या स्तुतीकरिता ‘ न बिभेति कदाचन ’ असें ह्मणून नुस्त्या भयाचा निषेध केला आहे पण येथें या अद्वैतविषयामध्यें ‘ न बिभेति कुतश्चन ’ असें ह्मणून भयाच्या निमित्ताचाच निषेध केला आहे ( वादी–) ‘ अहो पण सदाचरण न करणें व पापाचें आचरण करणें असें दोन प्रकारचें भयाचें निमित्त आहे ( सिद्धान्ती–) असें नव्हे तें कसें तेंच श्रुति सागते—

एतꣳ ह वाव न तपति । किमहꣳ साधु नाकवरम् । किमहं पापमकरवमिति ।

एत यथोक्तमवविदम् । ह वावेत्यवधारणार्थौ । न तपति नोद्व जयति न सतापयति । कथ पुन साध्वकरण पापक्रिया च न तपती त्युच्यते । किं कस्मात्साधु शोभन कर्म नाकरव न कृतवानस्मीति पश्चात्सतापो भवत्यासन्ने मरणकाल । तथा किं कस्मात्पाप प्रति पिद्ध कर्माकरव कृतवानस्मीति च नरकपतनादिदुःखभयात्तापा भवति । त एते साध्वकरणपापक्रिये एवमन न तपतो यथाऽविद्वास तपत । कस्मात्पुनर्विद्वास न तपत इत्युच्यते—

अर्थ—‘ एत–’ या पूर्वोक्त एववेत्त्याला ‘ ह वाव–’ हे निपात निश्चयार्थ आहेत ‘ न तपति–’ उद्विग्न करीत नाहीं. सतापयुक्त करीत नाहीं ( वादी–) अहो पण सत्कार्य न करण व पाप कर्म हीं त्याला उद्विग्न कशीं करीत नाहींत ? ( सिद्धान्ती ) तेंच आता श्रुतीकडून सांगितलं जात आहे ‘ किं–’ कोणत्या कारणानें ‘ साधु–’ शुभ कर्म ‘ नाकरवम्–’ मीं केलें नाहीं ? असा मरणकाल समीप आला असता मागून सताप होतो त्याच

प्रमाणें मीं पाप ह्म० निषिद्ध कर्म कोणत्या कारणानें केलें आहे, असा नरक-पतनादि दुःखाच्या भीतीनें ताप होतो. तीं हीं दोन्हीं-शुभकर्माचें अकरण व पापकरण अशा रीतीनें याला ( पूर्वोक्त विद्वानाला ) ताप देत नाहींत. तीं जशीं अविद्वानाला ताप देतात (त्याप्रमाणें विद्वानाला ताप देत नाहींत.) कोणत्या बरें कारणानें तीं विद्वानाला ताप देत नाहींत, तेंच आता सांगि-तलें जात आहे.

स य एवं विद्वानेते आत्मा२ स्पृणुते । उभे ह्येवैष एते आत्मान२ स्पृणुते । य एव वेद । इत्युपनिषत् ॥

इति ब्रह्मवल्ल्यध्याये नवमोऽनुवाकः ॥ ९ ॥

स य एवंविद्वानेते साध्वसाधुनी तापहेतू इत्यात्मानं स्पृणुते प्रीणयति बलयति वा परमात्मभावेनोभे पश्यतीत्यर्थः । उभे पुण्य-पापे हि यस्मादेवमेष विद्वानेते आत्मानमात्मरूपेणैव पुण्यपापे स्वेन विशेषरूपेण शून्ये कृत्वाऽऽत्मानं स्पृणुत एव । को य एवं वेद यथो-क्तमद्वैतमानन्दं ब्रह्म वेद तस्याऽऽत्मभावेन दृष्टे पुण्यपापे निर्वीर्ये अतापके जन्मान्तरारम्भके न भवत इतीयमेवं यथोक्ताऽस्यां वल्ल्यां ब्रह्मविद्योपनिषत्सर्वाभ्यो विद्याभ्यः परमरहस्यं दर्शितमित्यर्थः । परं श्रेयोऽस्यां निषण्णमिति ॥

इति शांकरभाष्ये नवमोऽनुवाकः ॥ ९ ॥

अर्थ—तो जो असें जाणणारा पाप व पुण्य हीं संतापाचीं कारणें आहेत, असें समजून ' आत्मानं स्पृणुते–' आत्म्याला प्रसन्न करतो किंवा बलवान् करतो ह्म० तीं दोन्हीं परमात्मभावानें पाहतो, असा याचा अर्थ. पुण्य व पाप हीं दोन्हीं ज्याअर्थी अशाप्रकारें हा विद्वान् ' आत्मान–' पुण्य-पाप आत्मरूपानेंच आहेत. यास्तव स्वतःच्या विशेषरूपानें त्यांना शून्य करून आत्म्यालाच संतुष्ट करतो. तो कोण, तर जो असें जाणतो. पूर्वोक्त अद्वैत आनंदाला ब्रह्म जाणतो त्याचीं आत्मभावानें–आत्मस्वरूपानें पाहि-लेलीं पुण्यपापें निर्वीर्य, अतापक होतात. तीं दुसऱ्या जन्माचीं आरंभक

होत नाहींत. ' इति उपनिषद्-' अशी–या वल्लींत वर जशी सांगितली आहे तशी ही ब्रह्मविद्या उपनिषद् आहे. ह्म० सर्व विद्यांहून परमरहस्य येथें दाखविलें, असा याचा अर्थ. या विद्येंत परम श्रेय स्थित आहे. ( इति ब्रह्मवल्ल्यध्याये नवमोऽनुवाकः ) ९.

सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ।

ॐ शान्तिः शान्तिः शान्ति. ।

इति ब्रह्मवल्ल्यध्यायः समाप्तः ॥ २ ॥

---

## अथ तृतीयो भृगुवल्ल्यध्यायः ।

---

हरिः ॐ । सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्माऽऽकाशादिकार्यमन्नमयान्तं सृष्ट्वा तदेवानुप्रविष्टं विशेषवदिवोपलभ्यमानं यस्मात्तस्मात्सर्वकार्यविलक्षणमदृश्यादिधर्मकमेवाऽऽनन्दं तदेवाहमिति विजानीयादनुप्रवेशस्य तदर्थत्वात्तस्यैवं विजानतः शुभाशुभे कर्मणी जन्मान्तरारम्भके न भवत इत्येवमानन्दवल्ल्यां विवक्षितोऽर्थः । परिसमाप्ता च ब्रह्मविद्या । अतः परं ब्रह्मविद्यासाधनं तपो वक्तव्यमन्नादिविषयाणि चोपासनान्यनुक्तानीत्यत इदमारभ्यते—

अर्थ—ज्याअर्थी सत्य, ज्ञान व अनन्त ब्रह्म आकाशादि अन्नमयान्त कार्य उत्पन्न करून त्यांतच मागून प्रविष्ट होऊन जणुंकाय सर्व विशेषयुक्त असल्यासारखें उपलब्ध होतें त्याअर्थी सर्व कार्याहून विलक्षण अदृश्यादि धर्मकच व आनन्द असें तेंच मी आहें, असें जाणावें. कारण त्याचा अनुप्रवेश त्यासाठींच ह्म० तसें जाणण्यासाठींच आहे. असें जाणणाऱ्या पुरुषाचीं शुभाशुभ कर्में दुसऱ्या जन्माचीं आरंभक होत नाहींत, हा असा

आनन्दवल्लींतील विवक्षित अर्थ आहे. ब्रह्मविद्या त्या वल्लींत परिसमाप्त झाली. आतां यापुढें ब्रह्मविद्येचें साधन-तप सांगावें आणि त्याचप्रमाणें मार्गे न सांगितलेलीं अन्नादिविषयक उपासनें सांगावीं म्हणून हें प्रकरण आरंभिलें जातें.

भृगुर्वै वारुणिः । वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तस्मा एतत्प्रोवाच । अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनो वाचमिति । त॰ होवाच । यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति ।

आख्यायिका विद्यास्तुतये, प्रियाय पुत्राय पित्रोक्तेति—भृगुर्वै वारुणिः । वैशब्दः प्रसिद्धानुस्मारकी भृगुरित्येवंनामा प्रसिद्धोऽनुस्मर्यते । वारुणिर्वरुणस्यापत्यं वारुणिर्वरुणं पितरं ब्रह्म विजिज्ञासुरुपससारोपगतवान् । अधीहि भगवो ब्रह्मेत्यनेन मन्त्रेण । स च पिता विधिवदुपसन्नाय तस्मै पुत्रायैतद्वचनं प्रोवाच । अन्नं प्राणं चक्षुः श्रोत्रं मनो वाचमिति । अन्नं शरीरं तदभ्यन्तरं च प्राणमत्तारमुपलब्धिसाधनानि चक्षुः श्रोत्रं मनो वाचमित्येतानि ब्रह्मोपलब्धौ द्वाराण्युक्तवान् । उक्त्वा च द्वारभूतान्येतान्यन्नादीनि तं भृगुं होवाच ब्रह्मणो लक्षणम् । किं तत् । यतो यस्माद्वा इमानि ब्रह्मादीनि स्तम्बपर्यन्तानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति प्राणान्धारयन्ति वर्धन्ते । विनाशकाले च यत्प्रयन्ति यद्ब्रह्म प्रतिगच्छन्ति, अभिसंविशन्ति तादात्म्यमेव प्रतिपद्यन्ते । उत्पत्तिस्थितिलयकालेषु यदात्मतां न जहति भूतानि तदेतद्ब्रह्मणो लक्षणम् । तद्ब्रह्म विजिज्ञासस्व विशेषेण ज्ञातुमिच्छस्व । यदेवंलक्षणं ब्रह्म तदन्नादिद्वारेण प्रतिपद्यस्वेत्यर्थः । श्रुत्यन्तरं च—"प्राणस्य प्राणमुत चक्षुषश्चक्षुरुत श्रोत्रस्य श्रोत्रमन्नस्यान्नं मनसो ये मनो विदुस्ते निचिक्युर्ब्रह्म पुराणमग्र्यम्" इति ब्रह्मोपलब्धौ द्वाराण्येतानीति दर्शयति ॥

अर्थ—येथील आख्यायिका विद्येच्या स्तुतीकरितां आहे. कारण पित्यानें प्रिय पुत्राला ती सांगितली आहे. 'भृगुर्वै वारुणिः' येथील 'वै'

पत्ती द्वार लक्षणं च यतो वा इमानीत्याद्युक्तवान्। सावशेषं हि तत्साक्षाद्ब्रह्मणोऽनिर्देशात्। अन्यथा हि स्वरूपेणैव ब्रह्म निर्देष्टव्यं जिज्ञासवे पुत्रायेदमित्थंरूपं ब्रह्मेति। न चैवं निरदिशत्किं तर्हि सावशेषमेवोक्तवान्। अतोऽवगम्यते नूनं साधनान्तरमप्यपेक्षते पिता ब्रह्मविज्ञानं प्रतीति। तपोविशेषप्रतिपत्तिस्तु सर्वसाधकतमत्वात्, सर्वेषां हि नियतसाध्यविषयाणां साधनानां तप एव साधकतमं साधनमिति हि प्रसिद्धं लोके। तस्मात्पित्राऽनुपदिष्टमपि ब्रह्मविज्ञानसाधनत्वेन तपः प्रतिपेदे भृगुः। तच्च तपो बाह्यान्तःकरणसमाधानं तद्द्वारकत्वाद्ब्रह्मप्रतिपत्तेः।

" मनसश्चेन्द्रियाणां च ह्यैकाग्र्यं परमं तपः।
तज्ज्यायः सर्वधर्मेभ्यः स धर्मः पर उच्यते " इति स्मृतेः।

स च तपस्तप्त्वा—

इति शांकरभाष्ये प्रथमोऽनुवाकः ॥ १ ॥

अर्थ—तो भृगु पित्यापासून ब्रह्माच्या उपलब्धीचीं द्वारें व ब्रह्माचें लक्षण ऐकून ब्रह्माच्या साक्षात्काराचें साधन, यारूपानें तप करता झाला. पण ज्याचा उपदेश केलेला नाहीं, असें तप ब्रह्मज्ञानाचें साधन आहे, हें ज्ञान भृगुला कोठून झालें? पित्यानें त्याला सावशेष वचन सांगितलें व *त्यावरून त्याला तपाचें ज्ञान झालें.* ह्म० वरुण ब्रह्माच्या ज्ञानाचें द्वार 'अन्नादि' व लक्षण 'यतो वा इमानि०' ह्म० ज्याच्यापासून भूतें उत्पन्न झालीं इत्यादि त्याला सांगता झाला. पण साक्षात् ब्रह्माचा निर्देश केलेला नसल्यामुळें तें वाक्य सावशेष आहे. (ह्म० तें वाक्य पूर्ण नाहीं. त्याचा कांहीं अवशेष राहिला आहे.) नाहींतर जिज्ञासुपुत्राला हें अशा तऱ्हेचें ब्रह्म आहे, असा ब्रह्माचा स्वरूपानेंच निर्देश करून सांगणें उचित होतें. पण त्यानें तसा निर्देश केला नाहीं. तर सावशेषच उपदेश केला. त्यावरून पिता *ब्रह्मविज्ञानासाठीं दुसऱ्या साधनाचीही अपेक्षा करीत आहे, हें भृगूला कळणें* साहजिक आहे. पण अनेक साधनांतील तप या विशेष साधनाचीच त्याला जी प्रतिपत्ति झाली ती तप हें सर्व साध्याचें अतिशय साधक आहे, ह्मणून

होय. कारण ज्याचे साध्यविषय नियत आहेत अशा सर्व साधनातील तप हेंच अतिशय साधक साधन आहे, हें लोकात प्रसिद्ध आहे. त्यामुळें पित्यानें जरी सांगितलेलें नव्हतें तरी भृगु तप ब्रह्मविज्ञानाचें साधन आहे, असें जाणता झाला. तें तप ह्म० बाह्य व आंतर इंद्रियाचें समाधान हेंच आहे. कारण ब्रह्मज्ञानाचें तें द्वार आहे. ' मन व इंद्रियें याचें ऐकाग्र्य हेंच परम तप आहे. तें सर्व धर्माहून श्रेष्ठ आहे व तोच श्रेष्ठ धर्म असेंही ह्मणतात,' अशी स्मृति आहे. असो; तो भृगु तप करून ( अन्न ब्रह्म आहे, असें जाणता झाला, असा पुढील अनुवाकाशीं संबध. इति भृगुवल्ल्यध्याये प्रथमोऽनुवाकः ) १.

---

अन्नं ब्रह्मेति व्यजानात् । अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । अन्नेन जातानि जीवन्ति । अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तद्विज्ञाय । पुनरेव वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । त२ होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ।

इति भृगुवल्ल्यध्याये द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥

अन्नं ब्रह्मेति व्यजानाद्विज्ञातवान् । तद्धि यथोक्तलक्षणोपेतम् । कथम् । अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । अन्नेन जातानि जीवन्ति । अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तस्माद्युक्तमन्नस्य ब्रह्मत्वमित्यभिप्रायः । स एवं तपस्तप्त्वाऽन्नं ब्रह्मेति विज्ञाय लक्षणेनोपपत्त्या च पुनरेव संशयमापन्नो वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । कः पुनः संशयहेतुरस्येत्युच्यते । अन्नस्योत्पत्तिदर्शनात् । तपसः पुनः पुनरुपदेशः साधनातिशयत्वावधारणार्थः । यावद्ब्रह्मणो लक्षणं निरतिशयं न भवति यावच्च जिज्ञासा न निवर्तते तावत्तप एव ते साधनम् । तपसैव ब्रह्म विजिज्ञासस्वेत्यर्थः । ऋज्वन्यत् ॥

इति श्रीशांकरभाष्ये द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥

अर्थ—वर सांगितल्याप्रमाणें तो तप करून अन्न ब्रह्म आहे, असें जाणता झाला कारण तेंच वर सांगितलेल्या प्रकारच्या लक्षणानें युक्त आहे. तें कसें ? तर अन्नापासूनच हीं भूतें होतात उत्पन्न झालेलीं तीं अन्नानेंच जिवंत राहतात. व प्रलय पावणारीं तीं अन्नामध्यें प्रवेश करितात. यास्तव अन्नाला ब्रह्मत्व युक्तच आहे, असा अभिप्राय भृगु याप्रमाणें तप करून व अन्न ब्रह्म आहे, असें लक्षण व उपपत्ति यांच्या योगानें जाणून पुनरपि संशय आला असता वरुण पित्यापाशीं 'अधीहि भगवो ब्रह्म' हाच मंत्र ह्मणत गेला पण त्याच्या संशयाचें कारण काय ? असें कोणी विचारील तर सांगतों— अन्नाची उत्पत्ति होत असल्याचें दिसतें (त्यामुळें उत्पन्न होणारें अन्न ब्रह्म कसें, अशी शंका येणें साहजिक आहे असो,) या प्रकरणांत तपानें ब्रह्माला जाणण्याची इच्छा कर, तप ब्रह्म आहे, असा जो वारंवार उपदेश केला आहे तो तपाला साधनातिशयत्व आहे, असा निश्चय करण्यासाठीं आहे, ह्म० जोंवर ब्रह्माचें लक्षण निरतिशय झालेलें नाहीं व जोंवर जिज्ञासा निवृत्त झालेली नाहीं, तांवर तप हच तुला साधन आहे. ह्म० तपानेंच ब्रह्माला विशेषेंकरून जाणण्याची इच्छा कर, असा याचा अर्थ बाकी सर्व वाक्याचा अर्थ सरळ आहे. (इति भृगुवल्ल्यध्याये द्वितीयोऽनुवाकः) २.

---

प्राणो ब्रह्मेति व्यजानात् । प्राणाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । प्राणेन जातानि जीवन्ति । प्राणं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तद्विज्ञाय । पुनरेव वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तꣳ होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ।

इति भृगुवल्ल्यध्याये तृतीयोऽनुवाकः ॥ ३ ॥

मनो ब्रह्मेति व्यजानात् । मनसो ह्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । मनसा जातानि जीवन्ति । मनः प्रयन्त्यभिसंविशन्तीति ।

तद्विज्ञाय । पुनरेव वरुण पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तꣳ होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ।

इति भृगुवल्ल्यध्याये चतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥

विज्ञान ब्रह्मेति व्यजानात् । विज्ञानाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । विज्ञानेन जातानि जीवन्ति । विज्ञान प्रयन्त्यभिसविशन्तीति । तद्विज्ञाय । पुनरेव वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति । तꣳ होवाच । तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रह्मेति । स तपोऽतप्यत । स तपस्तप्त्वा ।

इति भृगुवल्ल्यध्याये पञ्चमोऽनुवाक. ॥ ५ ॥

अर्थ—( वरील तीन अनुवाकावर त्याचा अर्थ सरळ असल्यामुळे भाष्य नाहीं. तथापि वाचकाच्या सोईकरितां त्याचा शब्दार्थ आह्मी येथें देतों. त्याचा सविस्तर अर्थ चवथ्या रत्नात पहावा. प्राण ब्रह्म आहे; असें तो भृगु जाणता झाला. कारण प्राणापासूनच हीं सर्वभूतें उत्पन्न होतात, उत्पन्न झालेलीं तीं प्राणानेच जिवत राहतात व लय पावतांना प्राणात लीन होतात, असें जाणून तो पुनरपि वरुण पित्यापाशीं ' अधीहि भगवो ब्रह्म ' असें ह्मणत गेला त्याला पिता ह्मणाला तपानें ब्रह्माला जाणण्याची इच्छा कर तप ब्रह्म आहे. त्यानें तप केलें व तो तप करून ( ३ ) मन ब्रह्म आहे असें समजला. कारण मनापासूनच हीं भूतें होतात, इत्यादि सर्व वरच्याप्रमाणेंच ( ४ ) तप करून तो विज्ञान ब्रह्म आहे, असें समजला. कारण विज्ञानापासूनच हीं सर्व भूतं होतात इत्यादि. ( इति भृगुवल्ल्यध्याये तृतीय–चतुर्थ-पचमा अनुवाका ) ३—५.

---

आनन्दो ब्रह्मेति व्यजानात् । आनन्दाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । आनन्देन जातानि जीवन्ति । आनन्द प्रयन्त्यभिसविशन्तीति ।

एव तपसा विशुद्धात्मा प्राणादिषु साकल्येन ब्रह्मलक्षणमपश्यञ्छनैः शनैरन्तरनुप्रविश्यान्तरतममानन्दं ब्रह्म विज्ञातवांस्तपसैव साधनेन भृगुस्तस्माद्ब्रह्म विजिज्ञासुना बाह्यान्तःकरणसमाधानलक्षणं परम तपःसाधनमनुष्ठेयमिति प्रकरणार्थः । अधुनाऽऽख्यायिकातोऽपसृत्य श्रुतिः स्वेन वचनेनाऽऽख्यायिकानिर्वृत्तमर्थमाचष्टे—

अर्थ—अशा रीतीनें तपाच्या योगानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे, तो भृगु प्राणादिकांमध्य ब्रह्माचें लक्षण संपूर्णपणें न पाहिल्यामुळें हळू हळू त्यांना सोडून त्याच्या आत प्रवेश करून सर्वांच्या आत असलेला आनद ब्रह्म आहे, असें तप या साधनानेंच जाणता झाला. यास्तव ब्रह्मजिज्ञासूनें *बाह्य इद्रियें व अंत:करण यांचें समाधान हेंच परम तपसाधन अनुष्ठावें, ( त्या समाधान-लक्षण-तपाचेंच अनुष्ठान करावें, ) हा या प्रकरणाचा* अर्थ आहे. आता आख्यायिकेपासून निवृत्त होऊन श्रुति आपल्या वचनानें आख्यायिकेवरून निष्पन्न झालेला अर्थ सागते—

सैषा भार्गवी वारुणी विद्या । परमे व्योमन्प्रतिष्ठिता । स य एवं वेद प्रतितिष्ठति ।

*सैषा भार्गवी भृगुणा विदिता वरुणेन प्रोक्ता वारुणी विद्या परमे व्योमन्हृदयाकाशगुहायां परम आनन्देऽद्वैते प्रतिष्ठिता परिसमाप्ताऽन्नमयादात्मनोऽधिप्रवृत्ता । य एवमन्योऽपि तपसैव साधनेनानेनैव क्रमेणानुप्रविश्याऽऽनन्दं ब्रह्म वेद स एव विद्याप्रतिष्ठानात्प्रतितिष्ठत्यानन्दे परमे ब्रह्मणि ब्रह्मैव भवतीत्यर्थः । दृष्टं च फल तस्योच्यते—*

*अर्थ—ती ही भार्गवी ह्म० भृगूनें जाणलेली व वरुणानें सांगितलेली* ह्मणून वारुणी विद्या परम आकाशात ह्म० हृदयाकाश-गुहेंतील परम अद्वैत आनंदांत प्रतिष्ठित झालेली आहे ह्म० अन्नमय आत्म्यापासून आधिक्यानें प्रवृत्त झालेली ती आनदात परिसमाप्त ( सर्व प्रकारें समाप्त ) झाली. अशा

प्रकारें जो कोणी दुसराही तप या साधनानें याच क्रमानें अनुप्रवेश करून आनंद ब्रह्म आहे, असें जाणतो तो अशा प्रकारें विद्याप्रतिष्ठानामुळें स्वत. आनन्द परम ब्रह्मामध्यें प्रतिष्ठित होतो. तो ब्रह्मच होतो, असा याचा अर्थ. पुढील वाक्यानें श्रुति त्याचें दृष्ट फळ सांगते–

अन्नवानन्नादो भवति । महान्भवति । प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन। महान्कीर्त्या ॥

इति भृगुवल्ल्यध्याये षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥

अन्नवान्प्रभूतमन्नमस्य विद्यत इत्यन्नवान् । सत्तामात्रेण तु सर्वो ह्यन्नवानिति विद्याया विशेषो न स्यात् । एवमन्नमत्तीत्यन्नादो दीप्ताग्निर्भवतीत्यर्थः । महान्भवति । केन महत्त्वमित्यत आह– प्रजया पुत्रादिना पशुभिर्गवाश्वादिभिर्ब्रह्मवर्चसेन शमदमज्ञानादिनिमित्तेन तेजसा । महान्भवति कीर्त्या ख्यात्या शुभप्रचारनिमित्तया ॥

इति शांकरभाष्ये षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥

अर्थ—‘ अन्नवान्– ’ पुष्कळ अन्न ज्याच्यापाशीं असतें तो अन्नवान्, कारण नुस्तें परिमित अन्न असणें, एवढ्याच वरून सर्वच प्राणी अन्नवान् होतो, त्यामुळें नुस्तें अन्न असण यांत विद्येपासून प्राप्त होणारा विशेष कांहींच नाहीं. त्याचप्रमाणें अन्न खातो तो अन्नाद, ह्मणजे तो विद्यावान् दीप्ताग्नि होतो ह्म० ज्याचा अग्नि अतिशय दीप्त झाला आहे, असा तो होतो. तसाच तो महान् होतो. कोणत्या कारणानें त्याला महत्त्व येतें, तें वेद सांगतो–पुत्रादि प्रजेच्या योगानें, गाय, घोडे इत्यादि पशूंच्या योगानें व ब्रह्मवर्चसानें ह्म० शम–दम–ज्ञानादिनिमित्त तेजानें ( तो महान् होतो. ) तसाच तो शुभप्रचारनिमित्तक ख्यातीनें महान् होतो. ( इति भृगुवल्ल्यध्याये षष्ठोऽनुवाकः ) ६.

———

अन्नं न निन्द्यात् । तद्व्रतम् । प्राणो वा अन्नम् । शरीरमन्नादम् । प्राणे शरीरं प्रतिष्ठितम् । शरीरे प्राणः प्रतिष्ठितः । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् ।

किंचान्नेन द्वारभूतेन ब्रह्म विज्ञातं यस्मात्तस्माद्गुरुमिवान्नं न निन्द्यात्तदस्यैवं ब्रह्मविदो व्रतमुपदिश्यते । व्रतोपदेशोऽन्नस्तुतये, स्तुतिभाक्त्वं चान्नस्य ब्रह्मोपलब्ध्युपायत्वात् । प्राणो वा अन्नम् । शरीरान्तर्भावात्प्राणस्य । यद्यस्यान्तः प्रतिष्ठितं भवति तत्तस्यान्नं भवतीति । शरीरे च प्राणः प्रतिष्ठितस्तस्मात्प्राणोऽन्नं शरीरमन्नादम् । तथा शरीरमप्यन्नं प्राणोऽन्नादः । कस्मात्प्राणे शरीरं प्रतिष्ठितम् । तन्निमित्तत्वाच्छरीरस्थितेः । तस्मात्तदेतदुभयं शरीरं प्राणश्चान्नमन्नादश्च । येनान्योन्यस्मिन्प्रतिष्ठितं तेनान्नम् । येनान्योन्यस्य प्रतिष्ठा तेनान्नादः । तस्मात्प्राणः शरीरं चोभयमन्नमन्नादं च ।

अर्थ—तसेंच ज्याअर्थीं द्वारभूत अन्नाच्या योगानें ब्रह्म विशेषेंकरून ज्ञात झालें आहे त्याअर्थीं गुरुप्रमाणेंच अन्नाची निन्दा करू नये ब्रह्माला जाणणाऱ्या याला अशाप्रकारें त्या व्रताचा उपदेश केला जातो. व्रताचा उपदेश अन्नाच्या स्तुतीकरिता आहे. अन्न ब्रह्माच्या उपलब्धीचा उपाय आहे. त्यामुळें अन्नाला स्तुतिभाक्त्व आहे. (त्यामुळें अन्न स्तुतीला योग्य आहे.) प्राणच अन्न आहे. *कारण प्राणाचा शरीरात अन्तर्भाव होतो. ( प्राण शरीरात असतात. )* जें ज्याच्या आत प्रतिष्ठित असतें तें त्याचें अन्न असतें. शरीरात प्राण प्रतिष्ठित होतो. तस्मात् प्राण अन्न व शरीर अन्नाद् आहे त्याचप्रमाणें शरीरही अन्न व प्राण अन्नाद् आहे कारण प्राणात शरीर प्रतिष्ठित आहे. कारण शरीराची स्थिति प्राण-अन्न-निमित्तक आहे. तस्मात् शरीर व प्राण हीं दोन्हीं अन्न व अन्नादही आहेत. ज्यामुळें तीं एकमेकात प्रतिष्ठित आहेत त्यामुळें अन्न आणि ज्यामुळें तीं एकमेकाचीं प्रतिष्ठाभूत आहेत त्यामुळें अन्नाद आहेत. यास्तव प्राण व शरीर हीं दोन्हीं अन्न व अन्नाद आहेत.

स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ।

इति भृगुवल्ल्यध्याये सप्तमोऽनुवाकः ॥ ७ ॥

स य एवमेतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठत्यन्नान्नादात्मनैव। किंचान्नवानन्नादो भवतीत्यादि पूर्ववत् ॥

इति शांकरभाष्ये सप्तमोऽनुवाकः ॥ ७

अर्थ—तो जो अशारीतीनें हें अन्न अन्नांत प्रतिष्ठित आहे, असें जाणतो तो अन्न व अन्नाद या रूपानेंच प्रतिष्ठित होतो. तसेंच 'अन्नवान् अन्नादो भवति' इत्यादि वाक्यांचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच जाणावा. (इति भृगुवल्ल्यध्याये सप्तमोऽनुवाकः) ७.

---

अन्न न परिचक्षीत । तद्व्रतम् । आपो वा अन्नम् । ज्योतिरन्नादम् । अप्सु ज्योतिः प्रतिष्ठितम् । ज्योतिष्यापः प्रतिष्ठिताः । तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् । स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ॥

इति भृगुवल्ल्यध्यायेऽष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

अन्नं न परिचक्षीत न च परिहरेत् । तद्व्रतं पूर्ववत्स्तुत्यर्थम् । तदेवं शुभाशुभकल्पनयाऽपरिगृह्यमाणं स्तुतं महीकृतमन्नं स्यात् । एवं यथोक्तमुत्तरेष्वप्यापो वा अन्नमित्यादिषु योजयेत् । अप्सु ज्योतिरित्यब्ज्योतिषोरन्नान्नादगुणत्वेनोपासकस्यान्नस्य बहुकरणं व्रतम्—

इति शांकरभाष्येऽष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

अर्थ—अन्नाचा परिहार करूं नये. तें व्रत आहे. हें पूर्वीप्रमाणेंच स्तुतीकरितां सांगितलें आहे. शुभ व अशुभ कल्पनेनें ज्याचा परिग्रह केला जात नाहीं, असें तें अशा रीतीनें स्तुति केलेलें व स्तुतीनें श्रेष्ठ बनविलेलें अन्न होतें. हें येथें जें सांगितलें आहे त्याची 'आपो वा अन्नं' इत्यादि पुढील पर्यायांतही योजना करावी. 'अप्सु ज्योतिः' इ० जलांत ज्योति प्रतिष्ठित

आहे व ज्योतीमध्यें जल प्रतिष्ठित आहे, अशा रीतीनें अप् व ज्योति याची अन्नत्व व अन्नादत्व या गुणानीं उपासना करणाराचें 'अन्नाचें बहुकरण' हें व्रत आहे. ( इति भृगुवल्ल्यध्यायेऽष्टमोऽनुवाक. ) ८

---

अन्नं बहु कुर्वीत । तद्व्रतम् । पृथिवी वा अन्नम् । आकाशोऽन्नादः । *पृथिव्यामाकाश प्रतिष्ठितः । आकाशे पृथिवी प्रतिष्ठिता ।* तदेतदन्नमन्ने प्रतिष्ठितम् । स य एतदन्नमन्ने प्रतिष्ठितं वेद प्रतितिष्ठति । अन्नवानन्नादो भवति । महान्भवति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन । महान्कीर्त्या ॥

इति भृगुवल्ल्यध्याये नवमोऽनुवाकः ॥ ९ ॥

अर्थ—या अनुवाकाचा अर्थ स्पष्ट आहे. तथापि शब्दशः अर्थासाठीं चवथें रत्न पहा. ( इति भृगुवल्ल्यध्याये नवमोऽनुवाक ) ९

---

न कंचन वसतौ प्रत्याचक्षीत । तद्व्रतम् । तस्माद्यया कया च विधया बह्वन्नं प्राप्नुयात् । अराध्यस्मा अन्नमित्याचक्षते ।

तथा पृथिव्याकाशोपासकस्य वसतो वसतिनिमित्त कंचन कंचिदपि न प्रत्याचक्षीत वसत्यर्थमागतं न निवारयेदित्यर्थ । वासे च दत्तेऽवश्य ह्यशनं दातव्यम् । तस्माद्यया कया च विधया येन केन च प्रकारेण बह्वन्न प्राप्नुयाद्बह्वन्नसंग्रहं कुर्यादित्यर्थ । यस्मादन्नवन्तो विद्वांसोऽभ्यागतायान्नार्थिनेऽराधि संसिद्धमस्मा अन्नमित्याचक्षते न नास्तीति प्रत्याख्यानं कुर्वन्ति तस्माच्च हेतोर्बह्वन्न प्राप्नुयादिति पूर्वेण संबन्ध । अपि चान्नदानस्य माहात्म्यमुच्यते । *यथा यत्काल प्रयच्छत्यन्नं तथा तत्कालमेव प्रत्युपनमते ।* कथमिति तदेतदाह—

अर्थ—त्याचप्रमाणें पृथिवी व आकाश याच्या उपासकाच्या वसतीविषयीं ह्म० वसतीच्या निमित्तानें कोणाचाही निषेध करूं नये. वसतीकरिता

आलेल्या कोणाचेंही निवारण करू नये, असा याचा अर्थ. वास ( रहावयास जागा ) दिला असता अवश्य भोजनहीं देणें उचित आहे यास्तव कोणत्याही विधीनें कोणत्याही प्रकारानें पुष्कळ अन्न प्राप्त करून घ्यावें. पुष्कळ अन्नाचा संग्रह करावा, असा याचा अर्थ. ज्याअर्थीं अन्नवन्त विद्वान् अन्नाची इच्छा करणाऱ्या अभ्यागताला त्याच्याकरिता अन्न अगदीं सिद्ध आहे, असें सांगतात. ' नाहीं, ' असें ह्मणून प्रत्याख्यान ( निषेध ) कधीं करीत नाहींत, त्या कारणानेंही बहु अन्नाचा संग्रह करावा, असा पूर्व वाक्यार्शी संबंध. शिवाय अन्नदानाच माहात्म्य सांगितलें जात. जसें ज्यावेळीं अन्न देतो तसें त्याच वेळीं तें त्याला उलट नम्र होऊन परत मिळत. तें कसें तेंच सांगतात-

एतद्वै मुखतोऽन्नꣳ राद्धम् । मुखतोऽस्मा अन्नꣳ राध्यते । एतद्वै मध्यतोऽन्नꣳ राद्धम् । मध्यतोऽस्मा अन्नꣳ राध्यते । एतद्वा अन्ततोऽन्नꣳ राद्धम् । अन्ततोऽस्मा अन्नꣳ राध्यते ( १ ) । य एवं वेद ।

एतद्वा अन्नं मुखतो मुख्ये प्रथमे वयसि मुख्यया वा वृत्त्या पूजापुरःसरमभ्यागतायान्नार्थिने राद्धं संसिद्धं प्रयच्छतीति वाक्यशेषः । तस्य किं फलं स्यादित्युच्यते—मुखतः पूर्वे वयसि मुख्यया वा वृत्त्याऽस्मा अन्नदायान्नं राध्यते यथादत्तमुपतिष्ठत इत्यर्थः । एवं मध्यतो मध्यमे वयसि मध्यमेन चोपचारेण । तथाऽन्ततोऽन्ते वयसि जघन्येन चोपचारेण परिभवेन तथैवास्मै राध्यते संसिध्यत्यन्नम् । य एवं वेद य एवमन्नस्य यथोक्तं माहात्म्यं वेद तद्दानस्य यथोक्तं फलमुपनयेत् । इदानीं ब्रह्मण उपासनप्रकार उच्यते—

अर्थ—हें अन्न ' मुखतः '—मुख्य प्रथम वयांत किंवा मुख्य वृत्तीनें पूजापुरःसर अन्नाची इच्छा करणाऱ्या अभ्यागताला सिद्ध केलेलें देता, 'देतो' अशा अर्थाचें 'प्रयच्छति' हें क्रियापद बाहेरून घ्यावें ) त्याला कोणतें फळ मिळतें तें श्रुति सांगते—' मुखत ' ह्म० पूर्व वयांत किंवा मुख्य वृत्तीनें त्या अन्न देणाराला अन्न सिद्ध करून दिलें जातं. ह्म० तें जसें दिलें असेल तसेंच उलट उपस्थित होतें, असा याचा अर्थ त्याचप्रमाणें 'मध्यत. ' ह्म० मध्यम

वयांत किंवा मध्यम उपचारानें; तसेंच ' अन्ततः ' ह्म० अन्त्य वयांत किंवा हीन उपचारानें–तिरस्कारानें जें अन्न दिलें जातें तें अन्न त्याला तसेंच सिद्ध होतें. जो अशा रीतीनें अन्नाचें वर सांगितल्याप्रमाणें महात्म्य जाणतो त्याला अन्नदानाचें वर सांगितल्याप्रमाणें फल प्राप्त होतें. आतां ब्रह्माच्या उपासनेचा प्रकार सांगतात—

क्षेम इति वाचि । योगक्षेम इति प्राणापानयोः । कर्मेति हस्तयोः । गतिरिति पादयोः । विमुक्तिरिति पायौ । इति मानुषीः समाज्ञाः ।

क्षेम इति वाचि । क्षेमो नामोपात्तपरिरक्षणम् । ब्रह्म वाचि क्षेमरूपेण प्रतिष्ठितमित्युपास्यम् । योगक्षेम इति, योगोऽनुपात्तस्योपादानम् । तौ हि योगक्षेमौ प्राणापानयोः सतोर्भवतो यद्यपि तथाऽपि न प्राणापाननिमित्तावेव किं तर्हि ब्रह्मनिमित्तौ । तस्माद्ब्रह्म योगक्षेमात्मना प्राणापानयोः प्रतिष्ठितमित्युपास्यम् । एवमुत्तरेष्वन्येषु तेन तेनाऽऽत्मना ब्रह्मैवोपास्यम् । कर्मणो ब्रह्मनिर्वर्त्यत्वाद्धस्तयोः कर्माऽऽत्मना ब्रह्म प्रतिष्ठितमित्युपास्यम् । गतिरिति पादयोः । विमुक्तिरिति पायौ । इत्येता मानुषीर्मनुष्येषु भवा मानुष्यः समाज्ञाः, आध्यात्मिक्यः समाज्ञा ज्ञानानि विज्ञानान्युपासनानीत्यर्थः ॥

अर्थ—क्षेम ह्म० प्राप्त वस्तूचें परिरक्षण. ब्रह्म वाणीमध्यें क्षेमरूपानें प्रतिष्ठित आहे, असें जाणून उपासना करण्यास योग्य आहे. जें प्राप्त नसेल त्याचें संपादन करणें हा योग. योग व क्षेम हे दोन्हीं प्राण व अपान हे असले तरच होणार हें जरी खरें आहे, तरी ते प्राण व अपान यांच्याच निमित्तानें होणारे नाहींत. तर ते ब्रह्मनिमित्त आहेत. तस्मात् ब्रह्म योग व क्षेम यांच्या रूपानें प्राण व अपान यांमध्यें स्थित आहे, असें समजून तें उपासना करण्यास योग्य आहे. पुढील दुसऱ्या सर्व पर्यायांतही तसेंच त्या त्या रूपानें ब्रह्मच उपास्य आहे. कर्म ब्रह्माकडूनच केलें जाणारें असल्यामुळें दोन्ही हातांच्या ठिकाणीं ब्रह्म कर्मरूपानें प्रतिष्ठित आहे, असें समजून तें उपास्य आहे. दोन्ही पायांचे ठिकाणीं तें गतिरूपानें, व पायु या इंद्रियामध्यें

त्याग या रूपानें तें आहे, असें जाणून त्याची उपासना करावी. अशा या मानुषी ह्म० मनुष्यामध्यें होणाऱ्या मानुष्य समाज्ञा ह्म० आध्यात्मिक्या समाज्ञा–ज्ञानें–विज्ञानें–उपासनें आहेत, असा याचा अर्थ.

अथ दैवीः। तृप्तिरिति वृष्टौ । बलमिति विद्युति (२)। यश इति पशुषु। ज्योतिरिति नक्षत्रेषु। प्रजातिरमृतमानन्द इत्युपस्थे। सर्वमित्याकाशे। तत्प्रतिष्ठेत्युपासीत। प्रतिष्ठावान्भवति।

अथानन्तरं दैवीर्देव्यो देवेषु भवाः समाज्ञा उच्यन्ते। तृप्तिरिति वृष्टौ। वृष्टेरन्नादिद्वारेण तृप्तिहेतुत्वाद्ब्रह्मैव तृप्त्यात्मना वृष्टौ व्यवस्थितमित्युपास्यम्। तथाऽन्येषु तेन तेनाऽऽत्मना ब्रह्मैवोपास्यम्। तथा बलरूपेण विद्युति। यशोरूपेण पशुषु। ज्योतीरूपेण नक्षत्रेषु। प्रजातिरमृतममृतत्वप्राप्तिः पुत्रेण ऋणविमोक्षद्वारेणाऽऽनन्दः सुखमित्येतत्सर्वमुपस्थनिमित्तं ब्रह्मैवानेनाऽऽत्मनोपस्थे प्रतिष्ठितमित्युपास्यम्। सर्वं ह्याकाशे प्रतिष्ठितमतो यत्सर्वमाकाशे तद्ब्रह्मैवेत्युपास्यम्। तच्चाऽऽकाशं ब्रह्मैव। तस्मात्तत्सर्वस्य प्रतिष्ठेत्युपासीत। प्रतिष्ठागुणोपासनात्प्रतिष्ठावान्भवति। एवं पूर्वेष्वपि यद्यत्तदधीनं फलं तद्ब्रह्मैव तदुपासनात्तद्वान्भवतीति द्रष्टव्यम्। श्रुत्यन्तराच्च—" तं यथा यथोपासते तदेव भवति " इति॥

अर्थ—त्यानंतर आतां दैवी ह्म० देवांमध्यें झालेल्या समाज्ञा सांगितल्या जातात. तृप्ति या भावनेनें वृष्टीमध्यें ब्रह्माची उपासना करावी. ह्म० वृष्टि अन्नादिकांच्या द्वारा तृप्तीला कारण होणारी असल्यामुळें ब्रह्मच तृप्तिरूपानें वृष्टींत व्यवस्थित आहे, अशा भावनेनें ब्रह्म उपासना करण्यास योग्य आहे. त्याचप्रमाणें अन्य पदार्थांमध्येंही त्या त्या रूपानें ब्रह्माचीच उपासना करावी. कशी ती पहा–बलरूपानें विद्युत्–मध्यें; यशोरूपानें पशूंमध्यें; ज्योतीरूपानें नक्षत्रामध्यें, 'प्रजाति' पुत्रादि प्रजा, 'अमृत'–पुत्राच्या योगानें ऋणांतून सर्वथा मुक्त होणें, इत्यादिकांच्या द्वारा अमृतत्वप्राप्ति व 'आनन्द'–सुख-उपस्थेंद्रियनिमित्तक सर्व सुख, असा याचा अर्थ. ब्रह्मच या रूपानें उपस्थामध्यें प्रतिष्ठित

आहे, अशी त्याची उपासना करावी. सर्व वस्तुजात आकाशामध्यें प्रतिष्ठित आहे, हें प्रसिद्ध आहे. यास्तव जें सर्व आकाशांत आहे तें ब्रह्मच आहे, अशी उपासना करावी. शिवाय तें आकाश ब्रह्मच आहे. यास्तव तें सर्वांची प्रतिष्ठा आहे, अशी उपासना करावी. प्रतिष्ठा या गुणाची उपासना केल्यामुळें उपासक प्रतिष्ठावान् होतो. याच न्यायानें पूर्वींच्या पर्यायांतही जें जें ब्रह्माच्या अधीन असलेलें फळ सांगितलें आहे तें ब्रह्मच आहे. त्याच्या उपासनेनें पुरुष तद्वान् होतो, असें जाणावें. 'त्याची जशी जशी (ज्या भावानें) उपासना करतो तेंच तो होतो' अशी दुसरी श्रुति आहे (कोणत्याही विशेष फळाची इच्छा न धरता केलेली उपासना बुद्धिशुद्धीच्या द्वारा ब्रह्मज्ञानाला उपकारक होते. पण तीच मुख्य अधिकाऱ्याच्या अपवादाला ह्म० हें सर्व जग नसून ब्रह्मच आहे, अशा ज्ञानाला कारण होते.)

तन्मह इत्युपासीत । महान्भवति । तन्मन इत्युपासीत । मानवान्भवति ( ३ )। तन्नम इत्युपासीत । नम्यन्तेऽस्मै कामाः । तद्ब्रह्मेत्युपासीत । ब्रह्मवान्भवति । तद्ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । पर्येणं म्रियन्ते द्विषन्तः सपत्नाः । परि येऽप्रिया भ्रातृव्याः ।

तन्मह इत्युपासीत । महो महत्त्वगुणवत्तदुपासीत । महान्भवति । तन्मन इत्युपासीत । मननं मनः । मानवान्भवति मननसमर्थो भवति । तन्नम इत्युपासीत । नमनं नमो नमनगुणवत्तदुपासीत । नम्यन्ते प्रह्वीभवन्त्यस्मा उपासित्रे कामाः काम्यन्त इति भोग्या विषया इत्यर्थः । तद्ब्रह्मेत्युपासीत । ब्रह्म परिवृढतममित्युपासीत । ब्रह्मवांस्तद्गुणो भवति । तद्ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । ब्रह्मणः परिमरः परिम्रियन्तेऽस्मिन्पञ्च देवता विद्युद्वृष्टिश्चन्द्रमा आदित्योऽग्निरित्येताः । अतो वायुः परिमरः श्रुत्यन्तरप्रसिद्धेः । स एष वायुराकाशेनानन्य इत्याकाशो ब्रह्मणः परिमरस्तमाकाशं वाय्वात्मानं ब्रह्मणः परिमर इत्युपासीत । पर्येनमेवंविदं प्रतिस्पर्धिनो द्विषन्तोऽद्विषन्तोऽपि सपत्ना यतो भवन्त्यतो विशेष्यन्ते द्विषन्तः

सपत्ना इति। य एनं द्विषन्त सपत्नास्ते परिम्रियन्ते प्राणाञ्जहति। किंच ये चाप्रिया अस्य भ्रातृव्या अद्विषन्तोऽपि ते च परिम्रियन्त॥

अर्थ--तें मह या रूपानें उपासावें ह्म० त महत्त्वगुणयुक्त आहे, अशा भावनेनें त्याची उपासना करावी ह्म० तो उपासक महान् होतो तें मन असें उपासावें मनन हेंच मन होय ह्म० तो मानवान् होतो, मनन करावयास समर्थ होतो तें नम असें उपासावें नमन हेंच नम आहे अर्थात् तें नमन या गुणानें युक्त आहे, अशा रीतीनें त्याची उपासना करावी त्या उपासकाला उपासका पुढें सर्व काम नमतात ज्याची कामना केली जाते ते काम ह्म० भोग्य विषय असा त्याचा अर्थ तें ब्रह्म असें उपासावें ब्रह्म ह्म० सर्व प्रकारें अतिशय वाढलेलें, अशा गुणानें त्याची उपासना करावी ह्मणजे उपासक ब्रह्मवान् त्या गुणानें युक्त होतो तें ब्रह्माचा परिमर असें उपासावें ब्रह्माचा परिमर ह्म० यात विद्युत, वृष्टि, चन्द्रमा, आदित्य व अग्नि अशा या पाच देवता सर्वत मरतात-लीन होतात यास्तव वायु हा परिमर आहे दुसऱ्या श्रुतींत तशी प्रसिद्धिही आहे. (' य एवमेता पच देवता वायुर्वाव सवर्ग' इत्यादि छान्दोग्य (अ० ५) श्रुति आहे. त्या श्रुतीवरून ब्रह्माचें सहारकर्तृत्व वायुद्वारक आहे ह्म० ब्रह्म वायूच्या द्वारा सहार करणारें होतें, असें ठरतें ह्मणून वायु ब्रह्माचा परिमर ह्म० सहाराचें साधन आहे, ) तोच हा वायु आकाशाशीं अनन्य ( अभिन्न ) आहे ह्मणून आकाश हा ब्रह्माचा परिमर आहे त्या वायुरूप आकाशाला ब्रह्माचा परिमर या दृष्टीन उपासावें 'एन' असें जाणणाऱ्या, अशी उपासना करणाऱ्या उपसकाचे जे प्रतिस्पर्धी द्वेष करणारे, काहीं सपत्न द्वेष न करणारेही असतात ह्मणून 'द्विषन्त सपत्ना' असें सपत्नाना 'द्विषन्त' हें विशेषण दिलें जात जे त्याचा द्वेष करणारे सपत्न-प्रतिस्पर्धी असतात ते 'परिम्रियन्ते-' प्राणाना सोडतात तसेच जे याचे अप्रिय भ्रातृव्य द्वेष न करणारे असेही असतात तेही मरतात (येथें प्रमाणें अज्ञानदृष्टींत मन्द अधिकाऱ्याच्या उपयोगी असलेल्या सर्व उपासना सागून आतां अपवाददृष्टीचा आश्रय करून सागतात—)

प्राणा वा अन्न शरीरमन्नादमित्यारभ्याऽऽकाशान्तस्य कार्यस्यैवान्नान्नादत्वमुक्तम्। उक्त नाम किं तेन, तेनेतत्सिद्ध भवति, कार्यविषय एव भोज्यभोक्तृत्वकृतः ससारो न त्वात्मनीति। आत्मनि तु भ्रान्त्योपचर्यते ॥

अर्थ—प्राण हेंच अन्न आहे, व शरीर अन्नाद आहे, येथपासून आरभ करून आकाशापर्यंत कार्यालाच अन्नत्व व अन्नादत्व सांगितलें आहे (वादी–) बरें, सांगितलें आहे पण त्यानें झालें काय? (सिद्धान्ती–) त्याच्या योगानें भोज्य–भोक्तृत्वकृत ससार कार्यविषयकच आहे, तो आत्म्यामध्यें नाहीं, हें सिद्ध झालें आत्म्याच्या ठिकाणीं तो भ्रांतीनें कल्पिला जातो

(आता भागवतांचें मत उत्थापित करून त्याचें निरसन करितात–)

नन्वात्माऽपि परमात्मन कार्यं ततो युक्तस्तस्य ससार इति। न। असंसारिण एव प्रवेशश्रुतेः। 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" इत्याकाशादिकारणस्य ह्यससारिण एव परमात्मन कार्येऽनुप्रवेशः श्रूयते। तस्मात्कार्यानुप्रविष्टो जीव आत्मा पर एवाससारी। सृष्ट्वाऽनुप्राविशदिति समानकर्तृकत्वोपपत्तेश्च। सर्गप्रवेशक्रिययोश्चैककर्तृकत्वे सति क्त्वाप्रत्ययो युक्त। प्रविष्टस्य तु भावान्तरापत्तिरिति चेत्। न। प्रवेशस्यान्यार्थत्वेन प्रत्याख्यातत्वात्। अनेन जीवेनेति विशेषश्रुतेर्धर्मान्तरेणानुप्रवेश इति चेत्। न। तत्त्वमसीति पुनस्तद्भावोक्तेः। भावान्तरापन्नस्येव तदपोहार्था सपदिति चेत्। न। तत्सत्य स आत्मा तत्त्वमसीति सामानाधिकरण्यात्। दृष्ट जीवस्य ससारित्वमिति चेत्। न। उपलब्धुरनुपलभ्यत्वात्। ससारधर्मविशिष्ट आत्मोपलभ्यत इति चेत्। न। धर्माणा धर्मिणोऽव्यतिरेकात्कर्मत्वानुपपत्तेः। उष्णप्रकाशयोर्दाह्यप्रकाश्यत्वानुपपत्तिवत्। त्रासादिदर्शनाद्दुःखित्वाद्यनुमीयत इति चेत्। न। त्रासादेर्दुःखस्य चोपलभ्यमानत्वान्नोपलब्धृधर्मत्वम्। कापिलकाणादादितर्कशास्त्रविरोध इति चेत्। न। तेषा मूलाभावे वेदविरोधे च भ्रान्तत्वोपपत्तेः। श्रुत्यु–

पपत्तिभ्यां च सिद्धमात्मनोऽसंसारित्वमेकत्वाच्च । कथमेकत्वमित्युच्यते—

अर्थ—(वादी–) अहो पण आत्मा ही परमात्म्याचें कार्य आहे; त्यामुळें त्याचा संसार योग्यच आहे. ( सिद्धान्ती–) नाहीं; तसें नाहीं. कारण श्रुतींत असंसारी परमात्म्याचाच प्रवेश सांगितला आहे. 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' ह्म० त्या कार्याला उत्पन्न करून तो त्यातच मागून प्रविष्ट झाला, या श्रुतिवचनानें नर आकाशादिकाचें कारण जो असंसारी परमात्मा त्याचाच कार्यामध्यें अनुप्रवेश सांगितला आहे. यास्तव कार्यामध्ये प्रविष्ट झालेला जीव आत्मा पर असंसारीच होय. शिवाय उत्पन्न करून त्यात प्रविष्ट झाला; या वाक्यातील समानकर्तृकत्वाचीही उपपत्ति लागत असल्यामुळें असंसारीच प्रविष्ट झाला. ह्म० उत्पन्न करणें व प्रवेश करणें या दोन क्रियाचा एकच जर कर्ता असेल तरच 'सृष्ट्वा' येथील क्त्वाप्रत्यय उपपन्न होईल. ( त्यावाचून–त्या दोन्ही क्रियाचा समान कर्ता असल्यावाचून 'सृष्ट्वा' हें उपपन्न होत नाहीं. ) अहो पण प्रविष्ट झालेल्या त्याला दुसऱ्या भावाची प्राप्ति होते; ' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण प्रवेशाचें प्रयोजन निराळें आहे असें सांगून आह्मीं या आक्षेपाचें निरसन केलें आहे. 'अनेन जीवेन' अशी विशेष श्रुति असल्यामुळें दुसऱ्या धर्मानें त्याचा अनुप्रवेश होतो,' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण 'तं तूं आहेस' असें ह्मणून पुनः त्याला तद्रूपत्व सांगितलें आहे. ' निराळ्या भावास प्राप्त झालेल्या त्या भावाचा निषेध करण्यासाठीं ती स्तुती संपत् आहे, ह्मणून ह्मणाल; ( ह्म० भ्रान्तीनें देहादिभावास प्राप्त झालेल्या व ब्रह्माहून निराळ्याच असलेल्या जीवाला त्याच्या संसारित्वाचा निषेध करण्यासाठीं त्याच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी, असा उपदेश केला जात आहे. अर्थात् स्वाभाविक अभिलाषाचा निषेध करण्यासाठीं परस्त्रीच्या ठिकाणीं मातृबुद्धीचा जसा उपदेश करितात, त्याचप्रमाणें हें समजावें, ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण श्रुतींत 'तें सत्य आहे, तो आत्मा आहे व तेंच तूं आहेस ' असें सामानाधि-

करण्य आहे. ( ह्म० तत्पद व त्वंपद यांची विभक्ति एक आहे. त्यामुळें ' तत् उद्देश्य असून ' त्वं ' विधेय आहे, असा निश्चय होतो. ) ' अहो पण जीवाचें संसारित्व प्रत्यक्ष आहे, ' ह्मणून ह्मणाल तर तें बरोबर नाहीं. कारण जो उपलब्धा त्याला उपलभ्यत्व असूं शकत नाहीं. ( तर सुखादि विषयांनाच उपलभ्यत्व असतें. ) ' संसार या धर्मानें विशिष्ट असलेला आत्मा उपलब्ध होतो ' ह्मणून ह्मणाल तर तेंही युक्त नव्हे. कारण कोणतेही धर्म धर्मीहून पृथक् नसतात. त्यामुळें त्याना कर्मत्व संभवत नाहीं. ( धर्मी कर्ता व त्याचे धर्म, हे त्याचें कर्म असें संभवत नाहीं. ) अर्थात् उष्ण व प्रकाश ह्या सूर्याच्या धर्मांना जसें दाह्यत्व व प्रकाश्यत्व असूं शकत नाहीं त्याप्रमाणें. ( *काष्ठादि भिन्न पदार्थच दाह्य व प्रकाश्य ह्म० दहन करण्यास योग्य व* प्रकाशित करण्यास योग्य असतात. बरें, त्रासादिक व दुःखादिक साश्रय आहेत. कारण तींही कार्यें आहेत. घटादिकाप्रमाणें, या अनुमानावरून त्रासादिकाचा ( *भयादि विकाराचा* ) आश्रय सिद्ध होतो. पण त्यांचा दुसरा कोणी आश्रय नसल्यामुळें आत्माच त्यांचा आश्रय आहे, असें अनुमान होतें अशी शंका घेऊन तिचें निरसन करितात–) त्रासादिकांचा साक्षात् अनुभव येत असल्यामुळें त्यांवरून आत्म्याच्या दुःखित्वादिकांचें अनुमान होतें, ह्मणून ह्मणाल तेंही सयुक्तिक नाहीं. कारण त्रासादिक व दुःख यांना उपलभ्यमानत्व आहे. ह्म० तीं अनुभविलीं जातात. त्यामुळें त्याना त्यांचा अनुभव घेणाराचें धर्मत्व नाहीं. ह्म० त्रासादिक व दुःख हे त्याचा अनुभव घेणारा जो जीव त्याचे धर्म नव्हेत. तर त्याच्या अनुभवाचे विषय आहेत. ( *बरें, जीवाला ब्रह्मरूपत्व आहे, असें प्रतिपादन करणाऱ्या वेदान्त शास्त्राचा* ) ' कापिल, काणाद ( ह्म० सांख्य, वैशेषिक ) इत्यादि तर्कशास्त्राशीं विरोध येतो,' ह्मणून ह्मणाल तर तेंही बरोबर नाहीं. कारण त्यांच्या तर्कांना अपौरुषेय वेदवाक्यें, हें मूळ नाहीं; उलट त्या वेदाशीं त्यांचा विरोध आहे, असें झाल्यास त्या तर्कांना भ्रांतत्व असणेंच युक्त आहे. ह्म० त्यांच्या तर्कांना मूळ प्रमाण नाहीं व ते वेदविरुद्धही आहेत, असें झाल्यास ते भ्रामक आहेत, असें सम-

जणेंच सयुक्तिक आहे श्रुति व उपपत्ति याच्या योगानें आत्म्याचें असंसारित्व सिद्ध झालेलें आहे. आत्म्याच्या एकत्वावरूनही त्याच्या असंसारित्वाची सिद्धि होते. अहो पण त्याला एकत्व कसें ? अशी शंका घेऊन श्रुति सांगते—)

स यश्चाय पुरुषे । यश्चासावादित्ये । स एकः ( ४ ) । स य एवंवित् । अस्माल्लोकात्प्रेत्य । एतमन्नमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं प्राणमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं मनोमयमात्मानमुपसंक्रम्य । एतं विज्ञानमयमात्मानमुपसंक्रम्य । एतमानन्दमयमात्मानमुपसंक्रम्य । इमॉंल्लोकान्कामान्नी कामरूप्यनुसंचरन् । एतत्साम गायन्नास्ते ।

स यश्चाय पुरुषे यश्चासावादित्ये स एक इत्येवमादि पूर्ववत्सर्वम् । अन्नमयादिक्रमेणाऽऽनन्दमयमात्मानमुपसंक्रम्येतत्साम गायन्नास्ते । सत्यं ज्ञानमित्यस्या ऋचोऽर्थो व्याख्यातो विस्तरेण तद्विवरणभूतयाऽऽनन्दवल्ल्या । सोऽश्नुते सर्वान्कामान्सह ब्रह्मणा विपश्चितेति तस्य फलवचनस्यार्थविस्तारो नोक्तः । के ते किंविषया वा सर्वे कामाः कथं वा ब्रह्मणा सह समश्नुत इत्येतद्वक्तव्यमितीदमिदानीमारभ्यते । तत्र पितापुत्राख्यायिकायां पूर्वविद्याशेषभूताया तपो ब्रह्मविद्यासाधनमुक्तम् । प्राणादेराकाशान्तस्य च कार्यस्यान्नान्नादत्वेन विनियोगश्चोक्तः । ब्रह्मविषयोपासनानि च । ये च सर्वे कामा प्रतिनियतानेकसाधनसाध्या आकाशादिकार्यभेदविषया एते दर्शिता । एकत्वे पुनः कामकामित्वानुपपत्तिः । भेदजातस्य सर्वस्याऽऽत्मभूतत्वात् । तत्र कथं युगपद्ब्रह्मस्वरूपेण सर्वान्कामानेव विपश्चित्समश्नुत इत्युच्यते । सर्वात्मत्वापत्तेः । कथं सर्वात्मत्वापत्तिरित्याह । पुरुषादित्यस्थात्मैकत्वविज्ञानेनापोह्योत्कर्षापकर्षावन्नमयाद्यात्मनोऽविद्याकल्पितान्क्रमेण संक्रम्याऽऽनन्दमयान्तान्सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मादृश्यादिधर्मकं स्वाभाविकमानन्दमजममृतमभयमद्वैतं फलभूतमापन्न इमाँल्लोकान्भूरादीननुसंचरन्निति व्यवहितेन संबन्धः । कथमनुसंचरन् । कामान्नी कामतोऽन्नम-

स्योति कामाची। तथा कामतो रूपाण्यस्येति कामरूपी। अनुसंचरन्सर्वात्मनेमाल्लोकानात्मत्वेनानुभवन्। किम्, एतत्साम गायन्नास्ते। समत्वाद्ब्रह्मैव साम सर्वानन्यरूपं गायञ्शब्दयन्नात्मैकत्वं प्रख्यापयँल्लोकानुग्रहार्थं तद्विज्ञानफलं चातीव कृतार्थत्वं गायन्नास्ते तिष्ठति। कथम्—

अर्थ—तो जो हा या पुरुषांत आहे; आणि हा जो आदित्यामध्यें आहे तो एक आहे; इत्यादि हें सर्व पूर्वी ब्रह्मवल्ल्यध्यायांत असें सांगितलें आहे तसेंच समजावें. अन्नमयादि क्रमानें आनन्दमय आत्म्यास प्राप्त होऊन हें साम गात राहतो. ( या वाक्यांचा शब्दशः अर्थ चवथ्या रत्नांत पहावा. ) असो; ' सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ' या ऋचेचा अर्थ तिच्याच विवरणभूत आनन्दवल्लीनें विस्तरपूर्वक सांगितला. पण ' सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ब्रह्मणा विपश्चितेति ' या त्याच्या फलवचनाच्या अर्थाचा विस्तार करून सांगितला नाहीं. ते सर्व काम कोणते अथवा कशाविषयींचे अथवा तो ब्रह्मासह कसा भोगतो; हें सांगणें उचित आहे. यास्तव आतां या विचारास आरंभ केला जातो—त्यांत पूर्वविधेच्या शेषभूत अशा या पितापुत्रांच्या आख्यायिकेंत तप हें ब्रह्मविद्येचें साधन आहे, असें सांगितलें. प्राणादिकांपासून आकाशान्त कार्यांचा विनियोग अन्न व अन्नाद या रूपानें सांगितला. ब्रह्मविषयक उपासनेंही सांगितलीं. तसेच जे सर्व प्रत्येकाला नियत, अनेक साधनसाध्य व आकाशादि कार्यभेदविषयक काम ते दाखविले. पण आत्म्याचें जर एकत्व असेल तर काम व कामित्व यांची अनुपपत्ति होते. कारण सर्व भेदजात आत्मभूत आहे. 'तर मग असें असताना ब्रह्म हृदयाकाशांतील गुहेंत अवस्थित आहे, हें जाणणारा ब्रह्मस्वरूपानें सर्व कामांना एकाच वेळीं भोगतो, असें कसें ह्मणता?' ह्मणून कोणी विचारील तर सांगतात.—त्याला सर्वात्मता प्राप्त झाल्यामुळें तो सर्व काम एकाचवेळीं भोगतो. 'पण त्याला सर्वात्मताच कशी?' ह्मणून कोणी ह्मणतील तर वेद सांगतो— पुरुष व आदित्य यांतील आत्म्याच्या एकत्वविज्ञानानें त्यांच्याठिकाणचे उत्कर्षापकर्ष भाव नाहींसे

करून आनन्दमयापर्यन्त अन्नमयादि अविद्याकल्पित आत्म्याचें क्रमानें संक्रमण करून सत्य, ज्ञान, अनन्त, अदृश्यादिधर्मक, स्वाभाविक आनन्द, अज, अमृत, अभय, अद्वैत व फलभूत, अशा ब्रह्माला प्राप्त झालेला तो ' इमान् लोकान्–' ह्या भूः, भुव. इत्यादि लोकातून अनुसंचार करीत राहतो, असा मधलीं कांहीं पदें सोडून अन्वय लावावा. पण तो कसा अनुसंचार करणारा तर ' कामान्नी ' ह्म० इच्छेच्या अनुसार ज्याला अन्न प्राप्त होतें तो कामान्नी, त्याचप्रमाणें ज्याला इच्छेप्रमाणें रूपें प्राप्त होतात तो कामरूपी, अशा रीतीनें अनुसंचार करणारा ह्म० सर्वात्मरूपानें या लोकाचाही आत्मरूपानें अनुभव घेणारा तो, काय करतो ? तर हें साम गात राहतो. ब्रह्म सर्वत्र सम असल्यामुळें तेंच साम ( ह्म० सर्वांशीं अनन्यरूप असणारें ), तें गात, सामाचा उच्चार करीत आत्म्याचें एकत्व प्रकट करीत व लोकावर अनुग्रह करण्यासाठीं एकत्वविज्ञानाचें फळही प्रकट करीत, आपलें अत्यत कृतार्थत्व गात राहतो. तें कसें तर–

हा३वु हा३वु हा३वु ( ५ ) । अहमन्नमहमन्नमहमन्नम् ! अहमन्नादो३ऽहमन्नादो३ऽहमन्नादः । अह२ श्लोकक्रदह२ श्लोकक्रदह२ श्लोकक्रत् । अहमस्मि प्रथमजा ऋता३स्य । पूर्वं देवेभ्यो अमृतस्य ना३भायि ।

हा३वु हा३वु हा३वु । अहो इत्येतस्मिन्नर्थेऽत्यन्तविस्मयख्यापनार्थम् । क पुनरसो विस्मय इत्युच्यते—अद्वैत आत्मा निरञ्जनोऽपि सन्नहमेवान्नमन्नादश्च । किंचाहमेव श्लोककृत् । श्लोको नामान्नान्नादयोः संघातस्तस्य कर्ता चेतनावान् । अन्नस्यैव वा परार्थस्यान्नादार्थस्य सतोऽनेकात्मकस्य पारार्थ्येन हेतुना संघातकृत् । त्रिरुक्तिर्विस्मयत्वख्यापनार्था । अहमस्मि भवामि । प्रथमजाः प्रथमजः प्रथमोत्पन्न ऋतस्य सत्यस्य मूर्तामूर्तस्यास्य जगत । देवेभ्यश्च पूर्वम् । अमृतस्य नाभिरमृतत्वस्य नाभिर्मध्य मत्संस्थममृतत्व प्राणिनामित्यर्थः ॥

अर्थ—हा३वु हा३वु हा३वु। हे तीन शब्द 'अहो' या अर्थी अत्यंत विस्मय प्रकट करण्यासाठीं आहेत. पण तो विस्मय कोणता, तेंच सांगितलें जातें–अद्वैत आत्मा निरंजन असूनही मीच अन्न व अन्नाद आहे. त्याचप्रमाणें मीच श्लोककर्ता आहें. श्लोक ह्मणजे अन्न व अन्नाद यांचा संघात. त्याचा कर्ता–चेतनावान्. अथवा परार्थ ह्म० अन्नादासाठीं असलेल्या अनेकात्मक अन्नाचाच परार्थत्व ह्म० दुसऱ्या करितां असणें, या निमित्तानें संघात करणारा. 'श्लोककृत्' या शब्दाचा तीनदां जो उच्चार केला आहे तो विस्मयत्व प्रकट करण्यासाठीं आहे. मी 'प्रथमजाः' प्रथम उत्पन्न झालेला; मी या ऋत ह्म० सत्य अशा मूर्त व अमूर्त जगाचा प्रथमज ( हिरण्यगर्भही ) आहें. त्याचप्रमाणें देवांच्याही पूर्वी असणारा विराड्रूप आहें. अमृतत्वाची नाभि ह्म० मध्य आहें. प्राण्यांचें अमृतत्व मजमध्यें उत्तम-प्रकारें स्थित आहे, असा याचा अर्थ.

यो मा ददाति स इदेव मा३ऽऽवाः। अहमन्नमन्नमदन्तमा३द्मि। अहं विश्वं भुवनमभ्यभवा३म्।

यः कश्चिन्मा मामन्नमन्नार्थिभ्यो ददाति प्रयच्छत्यन्नात्मना ब्रवीति स इदित्थमेवमविनष्टं यथाभूतमावा अवतीत्यर्थः। यः पुनरन्यो मामदत्त्वाऽर्थिभ्यः काले प्राप्तेऽन्नमत्ति तमन्नमदन्तं भक्ष-यन्तं पुरुषमहमन्नमेव सन्प्रत्यद्मि भक्षयामि। अत्राऽऽहैवं तर्हि बिभेमि सर्वात्मत्वप्राप्तेर्मोक्षादस्तु संसार एव यतो मुक्तोऽप्यहमन्नभूत आद्यः स्यामन्नस्यैवं मा भैषीः सव्यवहारविषयत्वात्सर्वकामाशनस्यातीत्यायं संव्यवहारविषयमन्नान्नादादिलक्षणमविद्याकृतं विद्यया ब्रह्मत्वमा-पन्नो विद्वांस्तस्य नैव द्वितीयं वस्त्वन्तरमस्ति यतो बिभेत्यतो न भेतव्यं मोक्षात्। एवं तर्हि किमिदमाह—अहमन्नमहमन्नाद इत्यु-च्यते। योऽयमन्नान्नादादिलक्षणः संव्यवहारः कार्यभूत स संव्य-वहारमात्रमेव न परमार्थवस्तु। स एवंभूतोऽपि ब्रह्मनिमित्तो ब्रह्मव्य-तिरेकेणासन्निति कृत्वा ब्रह्मविद्याकार्यस्य ब्रह्मभावस्य स्तुत्यर्थ-मुच्यते। अहमन्नमहमन्नमहमन्नम्। अहमन्नादोऽहमन्नादोऽ-

हमन्नाद इत्यादि । अतो मयाविदोपगन्धोऽप्यविद्यानिमित्तोऽविद्योच्छेदाद्ब्रह्मभूतस्य नास्तीति । अहं विश्वं समस्तं भुवनं भूतैः संभजनीयं ब्रह्मादिभिर्भवन्तीति वाऽस्मिन्भूतानीति भुवनमभ्यभवामभिभवामि परेणेश्वरेण स्वरूपेण ॥

अर्थ—जो कोणी मज अन्नाला अन्नार्थी लोकांस देतो; ह्म० मला अन्नरूपानें बोलतो तो 'इत्—' अशाप्रकारें, अशा तऱ्हेनें विनष्ट न झालेल्या यथाभूत अन्नाचें रक्षण करतो, असा याचा अर्थ. पण याच्या उलट जो दुसरा काल प्राप्त झाला असता मला याचकाना न देतां स्वतः अन्न खातो त्या अन्न खाणाऱ्या, अन्न भक्षण करणाऱ्या पुरुषास मी आतां अन्नरूपानेंच खातों. हें ऐकून कोणी ह्मणतो कीं, असें जर असेल तर मी त्या सर्वात्मप्राप्तीला भितों. मला आपला मोक्षापेक्षां संसारच असूं दे. कारण मी मुक्त जरी झालों तरी अन्नभूत होत्साता अन्नाचाच भक्षणीय होईन! (पण त्यावर आह्मी सांगतों कीं बाबारे) असा भिऊं नकोस. कारण सर्व कामाशनाला संव्यवहारविषयत्व आहे. ह्म० सर्व कामांचा भोग घेणें, हा व्यवहाराचा विषय आहे. पण हा विद्वान् या अविद्याकृत अन्न, अन्नाद इत्यादिलक्षण संव्यवहाराच्या विषयाचें उल्लंघन करून विद्येच्या योगानें ब्रह्मत्वास प्राप्त झालेला आहे. त्याच्या दृष्टीनें दुसरी निराळी वस्तुच नाहीं; कीं, जिला तो भिईल. यास्तव मोक्षाला भिऊं नये. 'मग असें जर आहे, तर अहं अन्न व अन्नाद् आहें हें काय ह्मणत आहे,' असा प्रश्न आला असतां सांगतों—जो हा अन्न, अन्नाद् इत्यादि लक्षण कार्यभूत संव्यवहार तो नुसता संव्यवहारच आहे. परमार्थ वस्तु नव्हे. तो असा जरी आहे तरी ब्रह्मनिमित्तक असल्यामुळें ह्म० ब्रह्म हेंच त्या संव्यवहाराचें कारण असल्यामुळें ब्रह्माहून पृथक् पदार्थ या रूपानें असत् आहे; यास्तव ब्रह्मविद्येचें कार्य असा जो ब्रह्मभाव त्याच्या स्तुत्यर्थ 'अहमन्नमहमन्नमहमन्नम्' व 'अहमन्नादोऽहमन्नादोऽहमन्नादः' इत्यादि सांगितलें जात आहे. यास्तव अविद्येचा उच्छेद झाल्यामुळें ब्रह्मभूत विद्वानाला अविद्यानिमित्तक भयादि दोषांचा

गधही नाहीं. ' अहं ' मी ' विश्वं ' समस्तं ' भुवनं ' ब्रह्मादि भूतांकडून संविभाग करण्यास योग्य असलेलें अथवा यांत भूतें होतात, ह्मणून भुवन ' अभ्यभवाम् ' पराभूत करतों. ह्म० श्रेष्ठ ईश्वरस्वरूपानें या समस्त भुवनाचा उपसंहार करतों. ( अर्थात् ईश्वराशीं आपलें तादात्म्य आहे, असें ज्ञान झालें असतां ' मी ' या वृत्तीचा बाध होतो. अर्थात् अद्वैत सिद्ध होतें. त्यामुळें भयाचें कारणच उरत नाहीं, असा भावार्थ. )

सुवर्न ज्योतीः । य एवं वेद । इत्युपनिषत् ॥ ६ ॥

इति भृगुवल्ल्यध्याये दशमोऽनुवाक ॥ १० ॥

सुवर्न ज्योतीः सुवरादित्यो नकार उपमार्थे । आदित्य इव सकृद्विभातमस्मदीय ज्योतीर्ज्योति. प्रकाश इत्यर्थः । इति वल्लीद्वयविहितोपनिषत्परमात्मज्ञानं तामेतां यथोक्तामुपनिषद शान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वा भृगुवत्तपो महदास्थाय य एवं वेद तस्येदं फलं यथोक्तमोमिति ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ तैत्तिरीयोपनिषदि तृतीये भृगुवल्ल्यध्यायभाष्ये दशमोऽनुवाकः ॥ १० ॥

अर्थ—' सुवर्न ज्योतीः ' यातील ' सुवर् ' ह्म० आदित्य; नकार उपमा ( इव ) या अर्थी ह्म० आदित्याप्रमाणें 'सकृत् विभात'—नित्य प्रकाश पावणारी 'ज्योती.' ह्म० ज्योति–प्रकाश. आमची ज्योति–प्रकाश सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें नित्य प्रकाशमय आहे. ' इति ' ह्म० या दोन्ही वल्लींनीं सांगितलेलें ' उपनिषद् ' ह्म० परमात्मज्ञान आहे. त्या या वर सांगितलेल्या प्रकारच्या उपनिषदाला–परमात्मज्ञानाला शान्त, दान्त, उपरत, तितिक्षु व समाहित होऊन भृगूप्रमाणें मोठ तप करून जो असें जाणतो त्याला वर

सांगितलेल्या प्रकारचें फळ प्राप्त होतें ओमिति ॥ ( इति भृगुवल्ल्यध्याये दशमोऽनुवाकः ) १०.

सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु मा विद्विषावहै ।

ॐ शान्ति शान्ति शान्ति ।

हरि ॐ

इति कृष्णयजुर्वेदीयतैत्तिरीयोपनिषदि तृतीयो भृगुवल्ल्यध्यायः समाप्त ॥ ३ ॥

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत तैत्तिरीयोपनिषद्भाष्यार्थ समाप्त झाला

---

श्रीकृष्णार्पणमस्तु ।